# A HISTORY OF MODERN INDIA

# MARATHA PERIOD

## 1795-1848

KAMSHET,
DIST. POONA.

**G. S. SARDESAI, B. A.**

# मराठी रियासत

## उत्तर विभाग—३

[ सन १७९५ ते १८४८ ]


लेखक

गोविंद सखाराम सरदेसाई, बी. ए.



प्रकाशक

केशव भिकाजी ढवळे, गिरगांव–मुंबई

सन १९३२

किंमत ३॥ रुपये

# गो. स. सरदेसाई यांचीं पुस्तकें

| | कि. रु. |
|---|---|
| मुसलमानी रियासत भा. १ स.१००० ते १५२६ | ३–० |
| ” ” भा. २ स.१५२६–१८०३ | ३–८ |
| मराठी रियासत पूर्वार्ध स. १७०७ पर्यंत* | |
| ” ” मध्य विभाग १. स.१७०७-१७४० | ३–० |
| ” ” म. वि. २ स. १७४०–१७६१* | |
| ” ” ” ” ३ स. १७५०–१७६१* | |
| ” ” ” ” ४ स. १७६१–१७७४ | ३–० |
| ” ” उत्तर वि. १ स. १७७४–१७८३ | ३–८ |
| ” ” ” ” २ स. १७८४–१७९५ | ३–८ |
| ” ” ” ” ३ स. १७९५–१८४८ | ३–८ |
| ब्रिटिश रियासत, पूर्वार्ध स. १६००–१७५७ | ३–८ |
| शालोपयोगी भारतवर्ष | १–० |
| बालोपयोगी महाराष्ट्राचा इतिहास | ०–२ |
| इंग्लिश भाषेची गृहशिक्षा | ०–८ |

* यांच्या आवृत्ति खलास. पुनर्मुद्रण चालू आहे.

केशव भिकाजी ढवळे, गिरगांव–मुंबई.

**History is a process of ingenious guessing.—**

# शेवटचा निरोप

हा शेवटचा भाग वाचकांचे हातीं देऊन मराठी रियासतीचें काम आतां पुरें झालें हें कळविण्यास मला संतोष वाटतो. पूर्वींच्या भागांत वेळोवेळीं आलेल्या प्रस्तावनांवरून माझ्या एकंदर उद्योगाचें स्वरूप स्पष्ट झालेलें असल्यामुळें आणखी एक प्रस्तावना वाचण्याची तसदी वाचकांस देण्याचें आतां कारण नाहीं. आजपर्यंतची माझी सेवा गोड करून घेतल्याबद्दल मनःपूर्वक आभार मानून त्यांची रजा घेतों.

आतां कित्येक प्रकरणांच्या पुनरावृत्ति काढून त्यांत पेशवे दप्तरांतील साहित्याची भर घालणें, ब्रिटिश रियासतीचा उत्तरार्ध लिहिणें, आणि जमल्यास मराठ्यांचा समग्र इतिहास इंग्रजींत सादर करणें अशीं कित्येक कामें मनांत घोळत आहेत, तीं कशीं काय तडीस जातात हें काळच सांगूं शकेल.

दुसऱ्या बाजीरावाच्या अमदानीचा हा भाग मी मराठ्यांच्या एकंदर इतिहासाचा कळस समजतों. या भागांत मराठी राष्ट्राचें वास्तविक स्वरूप जितक्या पूर्णतेनें व्यक्त झालें आहे, तितकें तें माझ्या मतें पहिल्या शिवकालीन भागांत झालेलें नाहीं. आपल्या इतिहासास योग्य साधनांच्या अभावीं जो लंगडेपणा आरंभींच्या भागांत येतो, तो उत्तरोत्तर नाहींसा होऊन मराठ्यांच्या खऱ्या स्वभावाची ओळख आपणास जास्त पटत जाते आणि अध्ययनाचें सार्थक होतें. असा प्रकार असतांहि या उत्तरकालीन घडामोडींकडे अभ्यासकांचे हल्लीं बरेंचसें दुर्लक्ष होत असलेलें पाहून खेद वाटल्याशिवाय राहत नाहीं. शिवकालाप्रमाणेंच आपल्या इतिहासाचा हा अंतिम भाग देखील सर्वांनीं आस्थेनें अभ्यास करण्याच्या लायकीचा आहे, एवढेंच नव्हे, तर उपयोगाच्या दृष्टीनें पाहिलें तरी आजच्या आपल्या स्थितींत हाच भाग आपणांस मार्गदर्शी होणारा आहे, असें कोणासही वाटल्याशिवाय राहणार नाहीं. बाजीरावी वृत्तीचा समूळ उच्छेद राष्ट्रांतून होईल तेव्हांच त्यास शिवकालीन प्रतिष्ठा प्राप्त होईल, हें माझ्या आजपर्यंतच्या अभ्यासाचें सार मी वाचकांची रजा घेतांना त्यांस सादर करूं इच्छितों.

मु. कामशेत, वर्षारंभ
शके १८५४,
ता. ६-४-१९३२.

**मो. स. सरदेसाई.**

# दुरुस्ती व भर

पृ. ६ ओ. खा. ४. बाहेरचा दत्तक घेऊं नये असा सल्ला महादाजी बल्लाळ गुरुजीनें दिला. हा गुरुजी ता. १७·७·१७९६ रोजीं वारला.

पृ. २५ ओ. खा. ५. 'बाजीराव बर्वे' हा स. १८०८ सालीं वारला.

पृ. २३ ओ. खा. ३ 'थेऊरच्या तह्यावरील'–'थेऊरच्या तळावरील.'

पृ. ५१ टीप * बॉयडच्या नेमणुकीचा ठराव बा. रो. १८४ येथें आहे.

पृ. ८३ ओ. खा. ५ 'ले. १७९७ त' बद्दल 'ले. ४६९७ त' वाचावें.

पृ. ९९ ओ. ८ नानाची स्त्री निवर्तल्याची ता. २१·११·१७८७ आहे. हो. पृ. ८०

पृ. १५३ ओ. खा. ६ रुसवा 'काढून' बद्दल 'न काढितां' असें पाहिजे.

पृ. २०८ ओ. ६ गोपिकाबा० चा 'चुलत बंधु' नव्हे. पहा वंशावळ पृ. २७५.

पृ. २२६ ओ. ११·१२ स. १७९६ त नेमणूक व १७९७ त दाखल.

पृ. २९२ ओ. ६ हें पत्र खरें पृ. ७८११ वर छापलेलें आहे.

पृ. ३०८ नकाशांत बनास नदी टोंक रामपुरा यांचे दरम्यान पूर्ववाहिनी पाहिजे.

पृ. २१० ओळ १ व पृ. ३६९ ओ. १२ यांत **क्लोज**चा मृत्यु 'इंग्लंडांत २०·४·१८१३ रोजीं झाला' अशी दुरुस्ती समजावी.

पृ. ३९४ व पृ. २९६ स्ट्रॅकी Stratchey याचा उच्चार 'स्ट्रेची' असा आहे.

पृ. ४३० वॉशोप **Wauchope** चा उच्चार वॉचप असा आहे.

पृ. ४४४ ओ. १३ गफूरखानास इंग्रजांनीं जागीर दिली तेंच हल्लींचें जावरा संस्थान रतलामचे उत्तरेस आहे.

पृ. ५०९ **त्रिंबकजी डेंगळे मृत्यु** चुनारगड येथें ता. १६-१०-१८२९.

पृ. ५९४ ओ. ५ देहूचे ऐवजीं देहूर अगर देऊर असें पाहिजे.

पृ. ५३२ ओ. ५ 'विठ्ठलपंत फडनीस'चे ठिकाणीं 'विठ्ठलपंत महाजनी' वाचावें.

पृ. ५९१ ओ. १४ ता. ५·४·१८२२ रोजीं प्रतापसिंहास अधिकार मिळाला.

# आधार-ग्रंथ



काव्येतिहाससंग्रह—पत्रें यादी (नवीन आ०); धा. शा. चरित्र व चतुरसिंग च०; म. सा. छो. ब.; होळकरांची कै०; ना. भो. बखर व कागद; से० दाभाडे व गायकवाड ब.

इतिहास-संग्रह—पे. द. सनदापत्रें व सरंजाम यादी; ऐ. टि.; ऐ. स्फु. ल. इत्यादि.

इतिहास ऐतिहासिक—बखर, पेशवाई अखेर. (पे. अ.)

ऐतिहासिक लेखसंग्रह, खरे,-भा. १–१४ व ना. फ. चरित्र.

भारतवर्ष—शकावलि, प. या. १·२, अखबार, बखरी इ०

मराठी दप्तर—भावे, रुमाल १·२·३.

तह व करारमदार, कैफीयती व यादी.

होळकरी पत्रव्यवहार-भागवत.

भवानीशंकर रोजनिशी-भागवत.

राजवाडे खं. ४ व १०.

पुरंदरे दप्तर भा. १·२.

भालेराव — मराठशाहींतील पत्रें.

कोल्हापुर इतिहास-मोडक.

जीवबादादाचरित्र-राजाध्यक्ष.

बायजाबाईचरित्र (पारसनीस), अज्ञातवासाची ह० (कुंठे).

प्रभुरत्नमाला व का. प्र. इ० साधनें.

ऐतिहासिक पोवाडे-केळकर.

सांकेतिक पत्रें-वाकणकर.

प्रतिनिधींचा इतिहास.

भा. इ. सं. मंडळाचे ग्रंथ.

Grant Duff's History of the Marathas.

Forrest's Selections from the Bombay Secretariat.

Frazer—Our Faithful Ally the Nizam.

Macdonald's Nana Fadnis.

Martin's Despatches of Wellesley, Vols. 1–5.

Owen's Despatches of Wellington.

Colebrooke's Mount Stuart Elphinstone.

Mill's History of India Vol. 6.

Origin of the Pindharies.

Prinsep's Narrative of the Transactions of British India.

Malcolm's History of Central India.

Do. Political History of India.

Bishop Heber's Narrative of a Journey in Upper India.

Private Journal of the Marquess of Hastings.

Broughton's Letters and Letters of William Tone.

Gazetteers of Gwalior, Hyderabad, Indore, Baroda, Satara &c.

Jenkin's Reports of Nagpur.

Parasnis' Poona in Bygone Days and Mahableshwar.

Life of Sir Thomas Munro.

Lyall's British Dominion in India.

Burway's Tukoji Holkar and other lives.

Modern Review, Times of India &c.

# अनुक्रमणिका

प्रकरण आठवें—**बाजीराव विरुद्ध लॉर्ड वेल्स्ली.**



प्रकरण नववें—**सिंदे भोसल्यांशीं इंग्रजांचें युद्ध.**



प्रकरण दहावें—**होळकरानें इंग्रजांस दमविलें.**

प्रकरण पंधरावें—**गंगाधर शास्त्र्याचा खून, बाजीरावास शिक्षा.**



प्रकरण सोळावें—**पेशवाईची इतिश्री**



प्रकरण सतरावें—**साताऱ्यास छत्रपतींचा पुनरुद्धार.**

**७ वंशावळी, अखेरच्या.**



**वंशावळी मध्यंतरींच्या**

# मराठी रियासत,—अखेर
# उत्तरविभाग ३
## ( स. १७९५-१८४८ )

## प्रकरण पहिलें
### पेशवाईस धनी शोधण्याचा खटाटोप

**समाधान सर्वांस वाटलें कोपरगांवास ।**
**स्वारी शिकारिस बरोबर जाती कथा उत्सवास ।**
**जें करणें तें पुसून करिती अमृतरावास ॥**
**एकास नख लागल्या दुःख होई त्रिवर्ग भावांस ।**

प्रभाकर—

१ विषय विभागणी. २ दत्तक पुत्र घेण्याची नानाची योजना.
३ बाजीरावाचें पुण्यास आगमन. ४ नानाचें साताऱ्यास प्रयाण व छत्रपतीशीं वाटाघाट.
५ नानाभाऊंचें वितुष्ट.
६ बाजीरावास अटक, चिमाजीची पेशवाईवर स्थापना.

**१ विषय विभागणी.**—मराठ्यांचें राज्य शिवाजीनें निर्माण केलें. त्याचे पुत्र संभाजी व राजाराम यांनीं आपले प्राण वेंचून त्याचें रक्षण केलें. पश्चात् बाजीरावादि पेशव्यांनीं सिंदे, होळकर, भोसले वगैरे पराक्रमी सरदारांच्या साह्यानें त्या राज्याची वृद्धि केली; आणि ही वृद्धि सदाशिवरावभाऊ व माधवराव यांनीं आपले देह खर्चून पूर्ण केली. अशा या मराठी राज्याची अखेर मजल सिद्धीस नेणारे ग्रह त्याच पेशव्यांचे घरांत पैदा झाले, ते रघुनाथराव व बाजीराव हे पितापुत्र होत. पहिल्या मंडळींनीं इतिहासांत जशी कायम कीर्ति मिळविली, तशीच या दोघांनीं कायमची अपकीर्ति पदरीं घेतली. त्यांतल्या त्यांत बाजीरावाच्या अपकीर्तीस तर समग्र

दुनियेंत तोड मिळणार नाहीं. माराच्या ठोकरा बसत असतां व घटकोघटकीं प्रत्यक्ष अनुभव येत असतां ज्या पुरुषानें आपल्या वर्तनांत यत्किंचित् बदल केला नाहीं, किंबहुना, आपण वाईट करतों अशी ज्याची भावना यावज्जन्मांत कधीं झाली नाहीं, त्याची मनोरचना कांहीं तरी अजब असली पाहिजे. कारण एवढ्या पराक्रमी पुरुषांनीं कमावलेलें राज्य गमावल्याबद्दल काडीमात्र खेद न दाखवितां ज्यानें पुढील आयुष्याचीं तेहतीस वर्षें पहिल्या सारखींच ख्याली खुशालींत घालविलीं, त्याच्या उपमेस दुसरा इसम सहसा मिळणार नाहीं !

बाजीरावाच्या कारभाराचे उपलब्ध वृत्तान्त विपुल असून ते बहुतेक समकालीन लेखकांच्या लेखणींतून उतरले असल्यामुळें फारसे विकृतही नाहींत. बाजीरावाच्या पहिल्या आठ वर्षांच्या कारभारावर खऱ्यांचे सात खंड खर्ची पडले असून त्यांत भरपूर तपशील आहेत. शिवाय वेस्लली, वेलिंग्टन, एल्फिन्स्टन इत्यादींच्या ग्रंथांत असेंच प्रचंड साहित्य उपलब्ध आहे तेव्हां पूर्वींच्या भागांत सर्व साहित्याची जमवाजमव, छाननी व एकवाक्यता करण्यास जो खटाटोप पडे, तसा या भागांत पडण्याचें कारण नाहीं. सर्वसाहित्य लक्षांत घेऊन दरएक बाबीची चर्चा करून गुण दोषांची विभागणी ठरविणें एवढेंच काम मुख्यतः करावयाचें राहतें.

बाजीरावाच्या कारभाराचे उघडपणें दोन ठळक भाग पडतात. प्रथम पेशवेगिरीच्या भानगडी उरकल्यावर स. १७९६ अखेर बाजीरावाची स्थापना पेशवे पदावर झाली, तेव्हांपासून स. १८०२ अखेर इंग्रजांशीं वसईचा तह होऊन मराठशाहीचें स्वातंत्र्य नष्ट झालें तेथपावेतों सहा वर्षांचा काल, हा पहिला भागच कायतो विशेष महत्त्वाचा गणतां येईल. त्यानंतरचा सन १८१८ पर्यंतचा १६ वर्षांचा दुसरा भाग केवळ मांडलिकी सत्तेचा आहे. त्यांत कितीही उलाढाली असल्या तरी स्वातंत्र्याचें तेज नाहीं. प्रथम या पहिल्या भागाचें विवेचन हातीं घेऊन, तत्स्पष्टीकरणार्थ त्यांतील राजकारणाचे ठळक प्रसंगांची यादी प्रथम पासूनच ध्यानांत ठेवणें सोईचें होईल. त्यानंतर दुसऱ्या भागाचें विवेचनही यथाक्रम द्यावयाचें आहे.

ता. ७-१. १७७५ बाजीरावाचा जन्म; ता. १४-१. १८५१ बाजीरावाचा मृत्यु.

## सन १७९६

ता. ६-१ जिवबादादाचा मृत्यु.

ता. ११-३ बाजीराव व नाना यांची प्रथम भेट व करार.

ता. २१-३ पुण्याहून सिंहगड, सातारा, वाई महाडाकडे नानाचें प्रयाण.
ता. ९-५ बाजीरावास सिंद्याची अटक.
ता. २५-५ चिमाजीचें दत्तविधान व पेशवाईवर स्थापना.
ता, ५-६ मुशीरुन्मुल्कची कैदेंतून मुक्तता.
ता. २७-१० बाळोबा तात्या पागनीस यास कैद.
ता. २७-११ मांडवगण येथें परशुराम भाऊस कैद.
ता. ४-१२ नानाचें महाडाहून पुण्यास आगमन.
ता. ५-१२ बाजीरावास पेशवे पदप्राप्ति, ता. ३-६-१८१८ रोजीं पदत्याग, तदुत्तर ब्रह्मावर्तास वास्तव्य.

## सन १७९७

ता. १६-२ शनिवार वाड्यांत त्रिवर्ग बंधूंचा प्रथम प्रवेश.
ता. ६-४ खुन्या मुरलीधराचा बनाव.
ता. १३-७ रघूजी भोसल्याचें पुण्याहून नागपुरास प्रयाण.
ता. १५-८ तुकोजी होळकर मृत्यु.
ता. १४-९ पुण्याची लढाई, मल्हारराव होळकराचा मृत्यु, होळकर बंधू यशवंतराव व विठोजी यांचें पलायन व दंगा.
ता. ३१-१२ नाना फडणिसास सिंद्याची कैद.

## सन १७९८

ता. १६-३ बायजाबाईचें लग्न दौलतराव सिंद्याशीं.
ता. २६-३ सर्जेरावी कारभाराची पुण्यांत सुरुवात.
ता. १७-५ कलकत्त्यास ग. ज. वेल्स्लीचा कारभार सुरू.
ता. ३० एप्रिल ते ऑगस्ट पावेतों सातारकर छत्रपतीशीं बाजीरावाचें युद्ध.
ता. १५-५ सिंदे बायांवर सर्जेरावाचे अत्याचार व नगरास कैद; बायांचे बंडास सुरुवात, त्यांस प्रथम अमृतराव व पुढें यशवंतराव होळकर सामील; बुंदेलखंडांत लखबादादाकडून बायांचा पुरस्कार. ता. ७-२-१८०२ रोजीं लखबाचा मृ. व बायांचे बंडाचा उपशम; चार वर्षें पावेतों हा बंडावा कोल्हापुर ते झाशी पावेतों घुमला.

ता. १८—७ सिंद्यानें दोन कोट रुपये दंड घेऊन नानाची मुक्तता केली.

ता. २५—८ सर्जेरावानें चार प्रमुख सरदार तोफेच्या तोंडीं दिले; त्यावरून त्यास सिंद्यानें अटकेंत ठेविलें.

ता. १—९ निजामाकडे रेमंडचा मृ. ता. २५-३-९८ रोजीं होऊन त्यानंतर वाटाघाट चालून निजामानें इंग्रजांशीं तैनाती फौजेचा तह करून त्यांस घरांत आणिलें.

## सन १७९९

ता. २२—४ सिंद्यानें बाळोबा पागनिसास कैदेंतून मुक्त करून कारभारावर आणिलें.

ता. ४—५ टिपूसुलतानचा श्रीरंगपट्टणच्या लढाईंत मृत्यु.

ता. १८—९ हमीदवाडा येथील लढाईंत परशुरामभाऊचा मृत्यु, यशवंतराव होळकराचा दंगा.

## सन १८००

ता. ४—१ सर्जेरावाची कैदेंतून मुक्तता.

ता. १३—३ नाना फडणीस मृत्यु. पुढील महिन्यांत मानाजी फाकडे मृ.

मे—शेणवी सरदारां विरुद्ध बाजीरावानें त्रागा केला म्हणून सर्जेरावानें नारायण जिवाजी वगैरे वीस सरदारांस तोफेच्या तोंडीं दिलें. बाळोबा तात्याची हाल अपेष्टा होऊन तोही पुढें १८ आक्टोबर रोजीं मरण पावला.

ता. २२—७ अमृतरावानें कारभार सोडून जहागीर घेऊन भिवंडीस वास्तव्य केलें.

ता. २९—१० दौलतरावाचें पुण्याहून कायमचें उत्तरेंत प्रयाण.

ता. १०—११ सिंदे बायांचा माळव्यांत बंडावा.

## सन १८०१

ता. १—५ बाजीरावानें विठोजी होळकरास हत्तीचे पायीं दिलें.

ता. १४—१० इंदूर ते उज्जनीच्या दरम्यान व नर्मदेवर सिंदे होळकरांच्या अनेक लढाया व जाळपोळी.

## सन १८०२

जानेवारी महिन्यांत पुण्यास बाजीरावा विरुद्ध बंडावा. विनायक अमृतास पेशवाई देण्याचा घाट; बाजीरावानें यशोदाबाईस रायगडावर व बाबा फडके आणि मोरोबादादा यांस घनगडावर कैदेंत ठेविलें.

ता. २५-१० यशंवतराव होळकराची पुण्यावर चाल, दिवाळीच्या दिवशीं घोरपडीची लढाई, बाजीरावाचें पलायन.

ता. १६-१२ बाजीरावाचें वसईस आगमन, सिंहगड, महाड, सुवर्णदुर्ग या मार्गानें.

ता. २२-१२ अमृतराव, होळकर, बाबा फडके व मोरोबादादा यांनीं विनायकरावास पेशवाईचीं वस्त्रें आणिलीं.

ता. ३१-१२ बाजीरावाचा इंग्रजांशीं वसई येथें तैनाती फौजेचा तह. होळकरानें पुण्यास खणत्या लावून द्रव्य उकळिलें.

ता. १३-५-१८०३ बाजीरावाची पुण्यास पेशवाईवर स्थापना.

या ठळक घडामोडींवरून बाजीरावाच्या कारभाराची कसकशी अवनति होत गेली तें लक्षांत येईल. त्यांत उच्च प्रतीचें राजकारण अगर राज्यहितवर्धक एकही गोष्ट दिसत नाहीं. समस्त राष्ट्र-पुरुषांचे आपसांतील द्वेष व कावे आणि त्या भरांत त्यांनीं रचिलेलीं कारस्थानें यांचे कंटाळवाणे तपशील मात्र त्यांत दिसून येतात.

**२ दत्तकपुत्र घेण्याची नानाची योजना** *— उत्तर मराठशाहींत महादजी सिंद्या एवढा दमदार व नेटाचा पुरुष दुसरा झाला नाहीं. त्यानें निर्माण केलेलें अत्यंत प्रखर व प्रचंड लष्करी शस्त्र त्याचे पश्चात् अप्रबुद्ध व उल्लू दौलतरावाचे हातीं आलें; तरी जीवबाबक्षी आणि बाळोबातात्या हयात होते तों पर्यंत दौलतरावाचे स्वैर वर्तनास कांहीं तरी आळा होता. खर्ड्याचा संग्राम जीवबानें यशस्वी केला. त्या संग्रामानें मराठ्यांच्या आकांक्षा सतेज होऊन तरुण पेशव्याचे नेतृत्वानें पुनः सर्व राज्याची घडी नीट बसेल असा सुमार दिसूं लागला, तोंच तो पेशवा अपघातानें मृत्युवश होऊन राज्यांत बेबंदशाही सुरू झाली. मरणापूर्वी सवाई माधवरावानें सिंदे व भोसले यांस वस्त्रें देऊन पूर्व कामगिरीवर रवाना केलें. दौलतरावास 'श्रावण व॥ ५ स वस्त्रें होऊन

*आधार-जी० च० १८४-१८८, २१६, २२४; खं १०.४१५; ऐ. टि.६-६; का. सं. प. या. ४६३; पे. अ. पृ. ३. खऱ्यांचे ग्रंथांचा आधार सर्वत्रच समजावा.

(५-८-१७९५) सुमुहूर्तीं डेरे दाखल जाहले. जामगांवीं गेले. जीवबा व ते एकत्र होऊन जामगांवींहून कूच होईल.' परंतु पेशव्याचे मृत्यूचें वर्तमान ऐकल्यावर दौलत-रावानें पुढें हिंदुस्थानांत जाण्याचा बेत रहित केला; आणि कंपू बऱ्हाणपुर पर्यंत गेले होते ते परत बोलाविले. तुकोजी होळकर तर पुण्यांतून हाललाच नव्हता.

आश्विन पूर्णिमेस माधवराव दिवंगत झाल्याबरोबर नानानें पुढील व्यवस्थेची वाटाघाट चालविली. त्याचा सर्व भरंवसा परशुरामभाऊवर होता. त्यास नानानें तावडतोब फौज घेऊन पुण्यास बोलाविलें. ता. ४ नोव्हेंबर रोजीं म्हणजे अशौचाचे आठवे दिवशीं भाऊ पुण्यास दाखल झाला. भोसल्याचा मुक्काम अकोल्याजवळ आळे-गांवावर होता तेथून त्यानें आपले तर्फेनें श्रीधर लक्ष्मण मुनशी व कृष्णराव माधव चिटणीस यांस वाटाघाटीसाठीं पुण्यास पाठविलें. सिंद्याचे तर्फेनें बाळोबा पागनीस बोलण्यांत होता. परंतु राज्याच्या व्यवस्थेची ही चर्चा एकमतानें किंवा बहुमतानें ठरली नाहीं. 'एक दोन महिने नानानें राज्यकारभार तसाच चालविला. दादासाहेबांचे पुत्र त्रिवर्ग जुन्नरीं असतां त्यांस आणावें तें न करितां रावसाहेबांचे बायकोचे मांडीवर दत्तक बसवून राज्य चालवावें, या मसलतींत सिंदे होळकर आदि करून सरदार व मुत्सद्दी या सर्वांनीं, आपण करतों तें मान्य करावें हा प्रकार नानांनीं आरंभिला. निखालसपणें कोणी रुकार देईनात. प्रत्यक्ष श्रीमंतांचा वंश असतांना दुसरा वंश निभणार नाहीं. बाजीरावास वस्त्रें द्यावीं असा हट्ट सिंदे याचा पडला.' पण नानाचा आग्रह याचे उलट होता. 'दादासाहेबांचे पुत्रांपैकीं दत्तक घ्यावा तरी ते मागील द्वेष मनांत आणतील, सरदारांसीं व मुत्सद्दी वगैरे यांसीं त्यांचें पटणार नाहीं, दौलतींत बखेडा पडेल, याजकरितां यशोदाबाईस दत्तक पुत्र देऊन दौलतीचा बंदोबस्त बाळाजी-पंत नानांनीं करावा,' असा घाट रचून त्यास होळकरादि कित्येकांची अनुकूलता नानानें मिळविली. 'या गोष्टीस आम्ही कायावाचा मनःपूर्वक सर्व प्रकारें अनुकूल असों. ही गोष्ट आमचे विचारास आली. निःसंशय करावी. आम्हांकडून कोणेविशीं उणें पडणार नाहीं.' अशी कबुली होळकरानें ता. २२ नोव्हेंबर रोजीं व सिंद्यानें ता. २८ नोव्हेंबर रोजीं नानास लिहून दिली. याप्रमाणें बाहेरचा दत्तक आणण्याचा निश्चय ता. ६ डिसेंबर रोजीं म्हणजे पेशव्याचे निधनानंतर ४० दिवसांनीं ठरला. या गोष्टी ठरविण्यांत दिवसगत लागल्यानें खटपटी लोकांचें फावलें; आणि नानाची अधिकारलालसा त्यांत व्यक्त झाली. यापेक्षां आपण निवृत्त होतों, पुढें सर्वांनीं मिळून वाटेल ती व्यवस्था करा, अशी निरीच्छ भावना नानानें दाखविली

असती, तर इतरांसही स्वार्थाचे दृष्टीनें या प्रश्नाकडे पाहण्याची बुद्धि झाली नसती. बाजीराव कायमचा ठिकाणीं स्वस्थ बसेल, आणि सिंद्याचें लष्करी यंत्र असन्मार्गानें चालणार नाहीं अशी अटकळ नानास सुचली नाहीं. बाहेरचा दत्तक घेण्याच्या वरील निश्चयास बाळोबातात्याची अनुकूलता नव्हती. 'विचाराची गोष्ट लांबणीवर पडल्यानें सर्व आपापल्या जागीं योजना करितात, व गुणदोष पाहातात,' असा प्रकार झाला.

येथें संदर्भासाठीं आणखी एका गोष्टीचा उल्लेख करणें जरूर आहे. स. १७९४ त बाजीरावाची मातुश्री वारली, आणि पुढें खर्ड्याची स्वारी निघाली. तेव्हां बाजीरावास जास्त बंदोबस्तांत ठेवणें नानास आवश्यक वाटून त्यानें त्यास आनंदवल्लीहून जुन्नरास आणिलें, त्या वेळीं 'तुमची पुढील व्यवस्था स्वारी आटोपल्यावर लावून देऊं,' असें त्यास नानानें अभिवचन दिलेलें होतें. बाजीराव नानास लिहितो, 'आपण पत्र पाठविलें ते पावलें, लिहिलें कीं, 'आपण मंडळीसहवर्तमान जुन्नरास येऊन राहावें. प्रस्तुत मसलत आहे ही शेवटास जाऊन बाजद बरसाद हरयेक आपले सोईची आणि दौलतीस उपयोगी तोड काढावयास येईल.' त्यास आपणांवर विश्वास ठेवून संशय न धरतां मंडळी सहवर्तमान खातरजमेनें जुन्नरास येऊन राहिलों. श्रीचे कृपेंकरून मसलतही शेवटास जाऊन स्वारी पुण्यास आली. पुढें सर्व भरंवसा आपलाच आहे.' या वचनाप्रमाणें नानानें बाजीरावाची व्यवस्था ठरविली नाहीं, म्हणून पुढें त्यानें सवाई माधवरावाकडे गुप्त पत्रव्यवहार केला, त्याचा परिणाम कसा विपरीत झाला, हें पूर्वी सांगितलेंच आहे. सवाई माधवरावाचे मृत्युसमयीं बाजीरावाची मनःस्थिति कशा प्रकारची होती हें यावरून कळून येईल.

बाहेरचा दत्तक घेण्याचें ठरल्यावर मुलांचा शोध चालू झाला. श्रीवर्धन, केळशी वसई वगैरे ठिकाणीं तपास झाला. 'दहा मुलें तीन घराण्यांत आहेत, पैकीं सहा जणांच्या मुंजी झाल्या आहेत. चौघांच्या झाल्या नाहींत. मुलांस आणावयास पालख्या व घोडीं सरकारांतून रवाना झालीं. कोकणांतून मूल चार आणिले. निजसुरे यांचे घरीं आहेत. साताऱ्यास लिहून छत्रपतींची मंजुरी दत्तकास आणण्यांत आली. तथापि सिंदे होळकर यांचा बाहेरचा दत्तक घेण्यास रुकार मिळेना. चिमाजी आपास मांडीवर घ्यावें हा विचार त्यांचा, दुसरें मूल आणिल्यास त्यांचा रुकार नाहीं. दत्तकाचा मासला कोणासही बरा दिसत नाहीं. बायका देखील श्रमी आहेत. बाजीरावास आणावें तर मागील द्वेष मनांत आणून बखेडे करतील; त्यास आणूं नये, असें

स्पष्ट बोलावें तर लौकिकांत चांगलें नाहीं: सबब ज्योतिषांकडून पत्रिका वर्तवून नानानें असा पुकारा केला कीं, बाजीरावास आयुष्य थोडें, दहापांच महिन्याचेच सोबती, त्या पक्षीं थोडक्यासाठीं कां गोंधळ करावा ' ! याचे उलटही बाहेर बोल प्रसिद्ध झाला कीं, ' गणकांच्या सांगण्यांत तर बाजीरावाचे योग अपूर्व आहेत. नानांस स्वप्नें विपरीत पडतात, यामुळें रात्रौ उसणतात. भयस्त आहेत. ' सारांश नानाप्रकारचे बेत ठरविण्यांत कित्येक महिने निघून गेले. पण निश्चित जम बसला नाहीं असें होतां होतां ' मांडीवर मूल घेण्याचा प्रकार तूर्त राहिला. सिंदे दूर गेले, परंतु प्रसंग येईल तसें करण्यास सिद्ध आहेत. पुणें गडबडलें आहे '. असा प्रकार जानेवारी अखेर पावेतों चालला. लोकांत नाना प्रकारच्या चर्चा सुरू झाल्या. निजाम व इंग्रज चुळबूळ करूं लागले. तेव्हां औरस वंश असतां दत्तक घेण्याची योजना सिद्धीस जाणारी नाहीं, अशी नानाची खात्री झाली. इतक्यांत जिवबादादा बक्षी हा अनुभवी व अनेक तंत्रें सांभाळणारा सिंद्याचा सरदार पुण्याहून जामगांवास जातांच ता. ६ जानेवारी रोजीं मरण पावला. ' जिवाजी बल्लाळाचे शरीरीं ज्वरांश जाहला. एकही उपाय गुणावह न होतां मार्गशीर्ष व॥ १२ बुधवारीं दोन प्रहरां काळ जाहला. द्रव्यसंग्रह कांहीं केलाच नाहीं. दिगंतीं लौकिक मात्र मिळविला. ' मरणापूर्वी त्यानें दौलतरावास कळविलें, ' दत्तकपुत्र घेऊन पेशवाई चालविण्यास नानांनीं संमतिपत्र करून घेतलें, परंतु या गोष्टीस बहुमत अनुकूल नाहीं: बाळाजी विश्वनाथाचा अंश हयात असतां दत्तक घेणें रास्त नाहीं, तरी तुम्हीं बाजीरावास पदावर बसविण्याची तजवीज करावी.' यावरून दिसतें कीं, बाजीरावास बाजूस सारण्यांत नानानें पुढील अडचणी पहिल्यानें लक्षांत आणिल्या नाहींत.

इकडे जुन्नरास बाजीराव रिकामा बसला नव्हता. त्यास नानाचे सर्व बेत कळत होते आणि जिवबादादा व बाळोबा वगैरे आपल्या तर्फेनें बोलतात हें ओळखून त्यांजकडे संधान ठेवून त्यानें नानाचा घाट हाणून पाडण्याचा उपक्रम प्रथमपासूनच चालविला. अमृतरावाचा मेहुणा सिंद्याचे लष्करांत होता, त्याजकडे बाजीरावानें आपले हुजरे पाठविले, आणि संधान केलें. तेव्हां सिंद्यानें आपला वकील सदाशिव मल्हार यास जुन्नरास रवाना केलें. तेथें बाजीरावाबरोबर त्याच्या रात्रीं चार गुप्त बैठकी झाल्या. नंतर सदाशिवपंत गोखले व गणेशपंत फडके यांस बाजीरावानें सिंद्याकडे पाठवून ' बाहेरचा दत्तक होऊं देऊं नये, आपणास पेशवाईपद मिळवून द्यावें म्हणजे आम्ही तुम्हांस सव्वा कोट रुपये रोख व २५ लक्षांची जहागीर

देतों.' + असा करार इमान प्रमाण व बेल भंडार सह लिहून दिला. बाजीरावानें हें संधान इतक्या गुप्त रीतीनें व शिताफीनें जुळविलें, कीं त्याची वार्ता खुद्द नानासही मागाहून निजामाकडून कळली. निजामानें नानास जागें करून लिहिलें, कीं 'तुम्ही आहां कोठें ! तुमचे घरांत खुद्द काय चाललें आहे याची वार्ता सुद्धां तुम्हांस नाहीं हें काय ?' या गोष्टीवरून बाजीरावाच्या पाताळयंत्री स्वभावाची अटकळ नानास व इतरांस चांगलीच झाली. नानानें निजामाकडे उत्तर पाठवून त्याजकडून मागितल्याबरोबर कुमक येण्याची तजवीज केली, आणि बाहेरचा दत्तक घेण्याचा उद्योग सोडून चिमाजी आपास यशोदाबाईचे मांडीवर बसवून आपण कारभार करावयाचा निश्चय केला. परंतु नानाच्या योजनेस बाळोबा तात्यानें विरोध केला. ता. १३. २. १७९६ रोजीं परशुरामभाऊ मिरजेस लिहितो. 'दत्तक पुत्र घेण्याचा मनसुबा राहून बाजीरावास आणावें, आणि चिमाजी आपास दत्तविधान करून पदावर स्थापावें असें ठरलें. उद्यां आम्ही कूच करून त्यास आणावयास जातों. सिंद्याचें पाऊल वाकडेपणाचें आहे. त्यांचे राजकारण बाजीरावाशीं प्रगटांत आलें. यास्तव चिमाजी आपास पदावर स्थापावें म्हणजे सिंद्याचें राजकारण व्यर्थ होईल असा विचार ठरला आहे. हांशील गोष्ट रंग समजला. शेवटास जाईल तें खरें.'

नानाची या वेळची धरसोड, दिरंगाई व मनाची तारांबळ या गोष्टी त्यास फारच घातक झाल्या. बाजीरावानें व बाळोबानें सर्वत्र फितूर पेरून नानास अगदीं दुर्बल करून सोडिलें. सिंद्याची फौज त्वरेनें पुण्याकडे येऊं लागली. वाटेंत जुन्नराहून बाजीरावादि त्रिवर्ग बंधूंस घेऊन पुण्यास येण्याचा सिंद्याचा घाट होता. औरस वंश असतां दत्तक घेण्याचें प्रयोजन नाहीं असा पुकारा सिंद्यांनीं केला. होळकर, निजाम, इंग्रज यांपैकीं कोणाचीच मदत आपणास वेळेवर येईल असा संभव नानास दिसेना. अशा अडचणींत 'साहेबांचे पुत्र, कोठें आवाज निघाला नाहीं तों हाताखालीं घालावे, व त्यांपैकीं चिमाजी आप्पास दत्तक घेऊन पदावर बसवावें, म्हणजे सिंद्यांचें राजकारण व्यर्थ झालें व कारभार आपल्या हातीं राहतो,' असा इत्यर्थ नानानें रास्ते व पटवर्धन यांच्या विचारें ठरविला; आणि परशुरामभाऊस तासगांवाहून निकडीनें पुण्यास बोलावून त्याजबरोबर गोविंदराव पिंगळे व बहिरोपंत मेहेंदळे यांस देऊन ता. १३-२-१७९६ रोजीं जुन्नरास रवाना केलें. ही इमारत मूळपासूनच कच्च्या पायावर

+ या आंकड्यांत निरनिराळ्या वेळीं कमीजास्त तफावत झालेली आढळते.

उभारली गेली. चिमाजी आप्पा यशोदाबाईचा चुलत सासरा, त्यास सुनेच्या मांडीवर दत्तक देणें बहुधा अप्रशस्त. शिवाय या उपक्रमास खुद्द बाजीरावादि बंधूंचा विचार आगाऊ घेतला पाहिजे होता, तो न घेतल्यानें पुढें सर्वच गोष्टींचा घोळ माजला, आणि त्यांत शिंद्यांशीं नानाचा तीव्र विरोध उत्पन्न होऊन पुढील सर्व नाशाचें बीज रुजून गेलें. खरें म्हटलें तर लढाऊ बाबतींतील आपला लंगडेपणा ओळखून नानानें शिंद्यास म्हणजे पर्यायानें बाळोबा तात्यासच प्रथम पासून सामील करून घेऊन कोणतीही उभारणी केली पाहिजे होती. पण अशा प्रकारें अडचणींत सर्वांनीं एकत्र विचार करण्याचा प्रघातच त्या वेळीं नव्हता. प्रत्येकानें आपलें कारस्थान आडून रचावयाचें, व एकानें दुसऱ्यास हाणून पाडावयाचें, ही खोड रूढ झाली होती. असें करण्यांत सोन्यासारखे दिवस व महिने निघून गेले राज्यास धनी करण्याचे बाबतींत जें काय करणें तें झटपट उरकून घेतलें तरच लोकांच्या उलाढालींना आळा पडतो. यशोदाबाईचे मांडीवर दत्तक देऊन चिमणाजी रघुनाथाचे ऐवजीं चिमणाजी माधवराव करण्यांत नानाचा आणखी एक उद्देश असा होता, कीं माधवराव नारायणाचे नांवावर सावकारांकडून कोट्यावधि रुपये नानानें कर्ज काढलें होतें, आणि पुष्कळांस त्याचे नांवानें जहागिरी, इनामें, तैनाता वगैरे दिल्या होत्या. तेव्हां रघुनाथरावाचा वंश चालू झाल्यास पूर्वीचे कर्ज वारण्यास तो बांधलेला राहणार नाहीं. बाजीरावानें तर पुढें तसा आक्षेप दाखविलाच. माधवरावाचा दत्तक झाल्यानें बापाचें कर्ज फेडण्याची जबाबदारी मुलावर आली असती. हा हेतु कदाचित् योग्य असेल, पण तो बाजीरावासारख्या निगरगट्ट माणसास कितपत बांधूं शकता हा प्रश्नच आहे. परशुरामभाऊ बाजीरावास आणण्यास जुन्नरास गेला, तेव्हां त्यास नानानें सांगितलें, कीं बाजीरावापासून चिमाजी आपास तुम्ही दत्तविधानासाठीं मागून आपले ताब्यांत घ्यावें आणि सर्वांस घेऊन पुण्यास यावें. बाजीराव आपणच पेशवाई पद मिळविण्याचा आग्रह धरील तर त्यास सांगावें, कीं पूर्वी रघुनाथ बाजीरावानें पेशवाईबद्दल बेदावा पत्र लिहून दिलें असल्यामुळें आतां पुढें बाजीरावास हक्क राहत नाहीं. कोणीकडून तरी खुशीनें अगर जबरीनें सर्वांस पुण्यास घेऊन यावें असा नानाचा बेत परशुरामभाऊस सांगितलेला होता.

चिमाजी आपा या वेळीं लहान बारा वर्षांचा सर्वथैव वडील बंधूंच्या आज्ञेंत वागणारा असून, पुढेंहा स्वतंत्र बुद्धीचें त्याचें तेज फारसें झळकलें नाहीं. बाजीरावाचा स्वभाव अगदीं वेगळा होता. कोणीकडून तात्कालिक अडचण निभावली म्हणजे झालें, यापलीकडे त्याची दृष्टि कधीं गेली नाहीं. तिघां बंधूंत समंजस व राज्याचें कल्याण थोडेंबहुत

जाणणारा एक अमृतराव होता, आणि त्याचे तंत्रानें या गोष्टी घडत्या तर बराच जम बसला असता. दत्तकाचा लंगडेपणा त्यास नसता तर त्यानें कोणत्याही बाबतींत नेट धरण्यास कमी केलें नसतें. परंतु औरसत्वामुळें बाजीरावास जोर मिळून अमृतरावाचें शहाणपण फुकट गेलें. तथापि वेळीं अवेळीं सुद्धां बाजीरावास सावरून धरण्याचे प्रयत्न त्यानें यथाशक्ति केले. तो सुवुद्ध, व्यवहारज्ञ व बराच काल राज्याच्या घडामोडींत अनुभवलेला होता.

**३. बाजीरावाचें पुण्यास आगमन.**—ता. १५–२–१७९६ रोजीं परशु-रामभाऊ जुन्नरास कुकडी नदीवर जाऊन उतरला. आपाजीराम सहस्रबुद्धे बाजीरावाजवळ होता तो पुढें येऊन भाऊस भेटला. नंतर दुसरे दिवशीं भाऊनें जाऊन बाजीरावाची भेट घेतली. सामोपचारानें किंवा धाकदपटशानें चिमाजीआपास ताब्यांत घ्यावें असा नाना-भाऊंचा बेत ठरला होता, परंतु बाजीरावानें भाऊस बिलकूल दाद दिली नाहीं. आज-पावेतों हे कारभारी आपलें नांव घेत नव्हते, आतां सिंद्यासीं आपला करार ठरलेला पाहून ते घाबरून आपल्याकडे बोलणें करावयास आले, हें त्यानें पक्कें ओळखिलें. बाजीराव मोठा मायावी होता. भाऊंच्या पायांवर डोकी ठेवून पदर पसरून अंजुळीपुट जोडून त्यानें विनंति केली, ' मागील द्वेष तुम्हीं मनांत आणूं नये, मी आणीत नाहीं. वडिलांच्या जागीं आपण मला मान्य. धाकट्यास दौलतेवर बसवावें आणि मी बंदींत राहावें हें आपल्या विचारास येतें कीं काय ? या अन्वयें बहुत ग्लानतेचीं बोलणीं बोलून अश्रुपात गाळूं लागले. श्रीमंतांचें म्हणणें आम्ही दुसऱ्याचे ओट्यांत जावयाचे नाहीं. धनीपण करावें तें मीच करीन. नाहीं तर नानांचा जीवमान आहे तों ते करतील तें प्रामाण. आमचें अनहित नानानीं केलें नाहीं, आमचें राज्य रक्षिलें. अशा रीतीनें भाषण बहुत केलें. सिंदे येईनों बाजीराव कालहरण करूं लागला. आपांस बाईसाहेबांचे ओट्यांत घालावयास द्यावें व आपण दिवाणगिरी करावी म्हणोन भाऊंनीं त्यास विनंति केली. त्यावर श्रीमंतांचें म्हणणें, 'हा शास्त्रार्थ तुम्हीच पोथ्या सोडून पाहवा'. अशा घोळांतून पुढील मार्ग काढण्याकरितां सिंद्याकडील रामजी पाटील व परशुराम भाऊंचा गोविंद-राव पिंगळे हे दोघे जुन्नराहून नानाकडे पुण्यास गेले. तों इकडे ' आपण सांगाल तें मी ऐकणार,' असें श्रीमंतांनीं भाऊंस कळविलें. त्यांची दोन तीन वेळां एकांतीं गांठ पडून बोलणें झालें. ' बाजीराव राजप्रकरणीं अनेक प्रकारची विकल्पना काढून बोलत गेले. तितक्यांचीं निराकरणें परशुरामभाऊंनीं केलीं. शेवटीं त्यांनीं शपथा कर-विल्या त्याही केल्या. दूधभाताची क्रिया केली. गणपतीच्या दूर्वा उचलून दिल्या.

तुळशी दिल्या. गाईच्या शपथा केल्या. त्याप्रमाणें श्रीमंतांनींही आपले तर्फेनें शपथा करून कूच केलें. ' सर्वांनीं पुण्यास जावें, सिंदे वगैरे जमा व्हावे, तेथें सर्वांचे विचारें जो निश्चय होणें तो व्हावा, असें ठरून ता. २५-२रोजीं जुन्नराहून डेरे दाखल झाले. बाईसाहेब व अमृतराव जुन्नरास राहिले. प्रयाणसमयीं शिवनेरीच्या किल्ल्यांतून पांच तोफा झाल्या. शिवाभवानीचे व लेण्याद्रीचें दर्शन घेऊन निघाले. कलाबतूचे अंबारींत बसण्यास भाऊंनीं सांगितलें, पण बाजीराव बसले नाहींत. बरोबर राघोपंत गुरुजी ठोसर, धोंडोपंत गोडबोले, आपाजीराम सहस्रबुद्धे, बळवंतराव नागनाथ, आबा शेलूकर वगैरे व पटवर्धन मंडळी होती. खेड येथें आनंदीबाईचें श्राद्ध झालें. पुढें चाकणास आल्यावर गढींतून तोफांची सलामी झाली. ता. ३ मार्च रोजीं पुण्या नजीक खडकीस मुक्काम झाला. दुसरे दिवशीं दोन प्रहरीं इंग्रज रेसिडेंट मॅलिट दोन चार इंग्रजांसह घोड्यावर बसून बागे भोंवती फिरोन सारी स्वारी पाहोन आपले स्थलास गेले. शनिवार ता. ५ मार्च रोजीं पहांटेचे नऊ घटका रात्रीस श्रीमंतांचे भेटीकरितां नाना आले. त्यांजबरोबर आप्पा बळवंत, दादा गद्रे, पांडुरंगराव बारामतीकर व भोसले यांजकडील कारभारी होते. नानास पुष्पांचा तुरा श्रीमंतांनीं दिला उदईक रविवारीं पहाटेचे दहा घटका रात्रीं वाड्यांत प्रवेश व्हावा असा निश्चिय करून नाना शहरांत गेले. पर्वतीचें दर्शन घेऊन स्वारी वाड्यांत येणार म्हणून हजारों लोक स्वारी पाहाण्यास बाहेर आले, परंतु सायंकाळीं श्रीमंतांनीं सांगून पाठविलें, कीं आज दिवस चांगला नाहीं; आणि सिंदे होळकरांची भेट झाल्याशिवाय वाड्यांत जाणें ठीक नाहीं. म्हणून बेत राहिला. '

भाऊ पुण्याहून गेल्यापासून परत येई तोंपर्यंत सिंद्यांच्या लष्करांत बऱ्याच महत्त्वाच्या घडामोडी झाल्या. सिंद्यांनी फौजेसह जुन्नरास जाऊन बाजीरावास ताबडतोब पुण्यास आणावयाचें कबूल केलें होतें. परंतु तसें त्याच्या हातून न घडण्याचें कारण जिउबादादाचा मृत्यु होय. बक्षीच्या आकस्मिक मरणामुळें विस्कळित झालेली मसलत बाळोबा तात्यानें सावरून धरली; तेव्हांपासून तोच सिंद्याचा मुख्य कारभारी झाला. याच सुमारास दौलतराव सिंद्यावर महादजीच्या बायकांनीं दहाबारा असामी मारेकरी घातले. पण अगोदर बातमी कळल्यामुळें कटवाले सांपडले गेले. पैकीं सात असामींस ताबडतोब मेखसू घालून ठार करण्यांत आलें; व इतरांना दूर किल्ल्यावर पाठविण्यांत आलें. या प्रकरणामुळें सिंद्याचा बेत लगेच सिद्धीस गेला नाहीं. तेवढ्या अवधींत बाजीरावानें नानाची मर्जी संपादिली, पण मुद्याचा मतलब मात्र सोडिला नाहीं. उभ-

यतांची वाटाघाट चार पांच दिवस चालून ता. ११ मार्च रोजीं पुढील उद्योगाचे करार मुक्रर झाले त्यांत, नानांनीं प्रथम चार कलमांची याद बाजीरावास लिहून दिली ती अशीः—

१ हरयेक कामकाज स्वामींचे व माझे विचारें होत जावें. सरकारचें नफानुकसान समजावीत जाऊं, तें ध्यानांत आणून आज्ञा होईल तसें करीत जाऊं.

२ स्वामींचे ठायीं माझा विश्वास पूर्ण आहे. स्वामींनीं अभय दिल्याप्रमाणें स्वरूपाप्रमाणें सेवा घ्यावी.

३ घरामध्यें स्वराज्यांत स्वामींस वाकडे पडेल असें आम्हापासून होणार नाहीं.

४ स्वामी हरकोणासीं बोलले व कोणास बोलाविलें व आले गेले व कांहीं आज्ञा केली असतां, स्वामींनीं कृपा मजवर अंतःकरणपूर्वक केली त्या अर्थीं मजला संशय तिलप्राय यावयाचा नाहीं.

हा नानाचे हातचा लेख घेऊन बाजीरावानें आपला लेख त्यास लिहून दिला तो असाः–' मागील सर्व गोष्टी आजपावेतों झाल्या त्या श्रीच्या समक्ष अंतःकरणपूर्वक टाकल्या. पुढें तुम्ही एकनिष्ठपणें आम्हांसीं वर्तावें. तुमचें व तुमचे लक्षांतील मंडळीचें कायावाङ्मनसबाह्यांतर वाईट होणार नाहीं व कोणी करूं लागल्यास करूं देणार नाहीं. येविसीं कोणी कांहींही समजाविलें तरी वाकडे मनांत आणणार नाहीं; व तुमचे स्वरूपास उणें पडणार नाहीं. कोणी वाकडे बोलूं लागल्यास तुम्हास सांगूं. कैदी आहेत त्यांचे सोडविण्याविसीं तुमचे विनंती खेरीज घडणार नाहीं. कारभार करणें तें तुमचे आमचे विचारें होत जाईल. आजपावेतों तुम्ही केलें तें आम्ही केलें. कोणेविशीं संशय राहिला नाहीं. ' याप्रमाणें परस्पर लेख होऊन सफाई झाली.

हा प्रकार केवळ कागदी उडवाउडवीचा व छपवाछपवीचा होता हें उत्तरोउत्तर दिसून येईल. अंतःकरणापासून पाहतां नानास बाजीराव नको होता व बाजीरावासही नाना नको होता. त्यांतून सिंद्यास वगळून हे ठराव परभारें केल्यामुळें प्रकरण विकोपास गेलें. अमृतरावास सोडून एकटा बाजीराव पुण्यास आला, त्यामुळें अमृतरावाचे मनांत वाकडेपणा येऊन त्याचें अंतःकरण बाळोबाचे बाजूस वळलें आणि बाळोबासही कळून चुकलें कीं बाजीरावाचे वचनावर बिलकूल विश्वास ठेवतां येणार नाहीं. तो व नाना हरतऱ्हेनें सिंद्याचे दौलतीस अपाय करतील. त्यांतून दौलतराव लहान असल्यामुळें दौलतीस अपाय झाल्यास त्याची

जबाबदारी आपल्यावर येणार अशी बाळोबाची खात्री झाली, आणि कसेंही करून नानाचें करणें शेवटास न जाऊं देण्यांतच आपला बचाव आहे अशा समजुतीनें बाळोबा व सिंदे फौजेसह गंगातीराहून पुण्याकडे येऊं लागले.

बाजीरावानें ताबडतोब शनिवारवाड्यांत येण्याचें नाकारल्यामुळें नानाची तारांबळ उडाली. भाऊंचा निरोप नानास आला, कीं ' तुम्ही आपले बंदोबस्त पाहवे, आमचे हातीं गाठोडें नाहीं, पल्ला लांब दिसतो, याची तर्तूद करावी. ' त्यावरून नानाचीं खलबतें चालू झालीं. त्यानें बाजीरावाकडे बोलणें लाविलें, कीं 'आम्ही कलमबंदीची यादी करितों, त्यावर निखालस श्रीमंतांनीं मखलासी करावी आणि शपथपूर्वक गंगाजळी करावी ' एक दिवसा आड नाना श्रीमंतांचे डेऱ्यास जाऊं लागले. पुण्यांतील गृहस्थ मंडळी बहुतेक त्यांची भेट घेऊन गेली. श्रीमंतांचे मुख्य मुद्दे दोन, एक बाजीराव रघुनाथ असेंच राहवें, आणि दुसरा नानाच्या परवानगी शिवाय श्रीमंतांचे दर्शनास कोणी जाऊं येऊं नये, बोलूं नये, असा कै० माधवरावाच्या वेळचा बंदोबस्त होता तो आतां नसावा. हे दोन्ही मुद्दे नानास कबूल केल्याशिवाय गत्यंतर नव्हतें. बाजीरावानें गोड भाषणानें साखर पेरून हे मुद्दे नानाकडून कबूल करून घेतले. श्रीमंत बोलले कीं, ' गंगातीरीं वास करावा एक, किंवा नानांचा तरी समागम असावा. नाना असल्यास सर्व गोष्टी घडतील. आमचे दौलतींत मनुष्य आहे, पण पैका नाहीं. '

भाऊंनीं जुन्नराहून उभयतां यजमान आणले, यामुळें बाळोबा तात्यास भारी वाईट वाटूं लागलें. फौज वीस हजार पावेतों जमवून तो वाटेल तशा वल्गना करूं लागला. त्यामुळें त्याचें व नानाचें बहुत विरुद्ध वाढलें. तें मिटविण्यासाठीं गोविंदराव पिंगळे यास नानानें त्याजकडे पाठविलें. त्यांच्या वाटाघाटींत सिंद्याचे अनेक मतलब व्यक्त झाले. ' श्रीमंत व नाना सिंद्याचे विरुद्ध वागूं लागले. तेव्हां सिंद्याचे बोलणें पडलें कीं माझ्या दौलतीस दहा कोट पावेतों कर्ज आहे; त्याचा फडशा करून द्या, आणि हिंदुस्थानांत महादजींनीं मुलूख सोडविला आहे तो सरकारांत घ्या. तुम्ही धनी, आम्ही चाकर. आम्हांस कर्जापासून मुक्त करा म्हणजे झालें, नाहीं तर जड जाईल. सिंदे नानास म्हणतात, ' तुम्ही जन्मभर कारभार करावा असें कोठें आहे ? तुमचा दरक तुम्हीं करावा; श्रीमंतांचा कारभार ज्यास आज्ञा होईल तो करील. ' सिंदे मोठी फौज घेऊन पुण्यास बसल्यामुळें वैरणीसाठीं तो तमाम मुलूख लुटूं लागला. त्याबद्दल जाब विचारतां उत्तर केलें, कीं फौज थोर, आम्हीं काय करावें ? कारभारी कर्जे वारतील

त्यांत दहा पांच लाख या पायमल्लीबद्दल कमी करा. अशा स्थितींत श्रीमंतांचे आज्ञे-वरून भाऊंनीं सिंद्यास पत्र लिहिलें, त्याचा जबाब ता. १७ मार्चचा सिंद्याकडून आला तो असा.-'पूर्वीपासून चालत आलें तशीच सेवा आम्हाकडून घडेल. श्रीमंतही कृपा करतील. नानास सांगणारांनीं मनस्वी सांगून आम्हाविशीं आपले मनांत किंतु घातला आहे, ह्यामुळें नानानीं फौजबंदी केली. आमचे मनांत त्यांजबद्दल वाकडें यावें असें नाहीं. त्यांचा आमचा भाऊपणा आजचा नाहीं. राज्य चांगलें, श्रीमंताचा धनी-पणा, नानांचा कारभार सरळ चालावा हेंच आम्हांस पाहिजे. श्रीमंतांच्या सेवेस व नानांचे भाऊपणांत आम्हांकडून दुसरा प्रकार नाहीं. आमचे घरचा प्रकार लोकांचे देणें व सावकारी मनस्वी. कंपू आणऊन बखेडखोरांस जरब बसवून तोड पाडावी हें योजिलें, तों श्रीमंतांची स्वारी पुण्यास दाखल झाली. फौज सोडून सडे श्रीमंतांचे भेटीस जावें, तर फौज आम्हास सोडीना. लोकांची आंच आपणास माहीतच आहे. विना रुपये दिल्हेखेरीज तोड कसी निघणार ? श्रीमंतांच्या भेटीविना निघून जावें तेंही लौकिकांत चांगलें नाहीं. जाणोन दरकूच श्रीमंतांपाशीं जाऊन हकीकत निवेदन करावी, आज्ञा करतील ती मान्य करून हिंदुस्थानांत जावें, तिकडेही रजवाड्यांच्या नजरा ठीक नाहींत, स्वारी तिकडून आल्यास पांच वर्षें जालीं. आम्हांस दुसरा विचार किमपि कर्तव्य नाहीं. गोविंदराव पिंगळे आले आहेत त्यांसीं बोलून सरळ राज्यास चांगलें तेंच इकडून होईल.'

अशी बोलाचाली सुरू असतां सिंद्याचे कारभारी आबा चिटणीस याचे मार्फत नानानें फितूर करून सिंद्याची फोडाफोड मांडली. हा आबा चिटणीस देशस्थ ब्राह्मण सिंद्याचे लष्कराचा माहितगार होता. त्यानें फितवा करून बाळोबा तात्यास दगा करावा असें आरंभिलें. ही गोष्ट पुण्यांतील फडके, गोडबोले, पिंगळे, शेलूकर वगैरे मंडळीस समजली होती. तीन चार लाख द्रव्यही नानांनीं खर्चास पाठविलें, तें बाहेर फुटलें. तेव्हां सिंद्यांनीं गुन्हेगार धरले आणि त्यांची जबानी लिहून घेतली. मुद्दे शाबूत केले व म्हणूं लागले, कीं आमचा नाश करावयाचा उद्योग ज्यांनीं चालविला त्यांचा नाश करूं व बेअब्रू करूं. अशा मनस्वी वल्गना करूं लागले. हा प्रकार पुण्यांत समजण्यांत येतांच नानानें पिंगळे यांस सिंद्याचे समजुतीस जांबगांवास रवाना केलें, ते जाऊन सिंद्यास भेटले. दोन दिवस गेले तरी सिंद्यानें त्यांच्याशीं भाषणच केलें नाहीं. पुढें मग सिंदे बोलले, 'जें होणें तें पुण्यास गेल्यावरच होईल. जे या कामांत आहेत. त्यांची बेअब्रू करून रस्त्यांतून फिरवूं.' अशी भाषणें झालीं. ही बातमी येतांच

नानांनीं धास्ती खाल्ली, आणि श्रीमंतांस विनंति केली, आपलें आश्वासन असावें. तेव्हां श्रीमंत बोलले ‘ तुम्हांस जसें इमान प्रमाण दिलें, तसेंच जुन्नरांत असतां आम्हीं सिंदे यांस दिलें आहे. ’ त्यावरून आतां सिंदे आपला सूड घेईल म्हणून नानानें परचुरे व फडके यांस कारभार सांगून साताऱ्याकडे निघून जाण्याचा बेत ठरविला.

**४ नानाचें साताऱ्यास प्रयाण, छत्रपतीशीं वाटाघाट.***—बाजीराव पुण्यास आल्याबरोबर त्याचें व नाना भाऊंचें चांगलें रहस्य झाल्याचा भास कांहीं दिवस झाला. इतक्यांत नानाचा फितूर उमगल्यामुळें सिंदे जांबगांवाहून बाजीरावाचे भेटीस पुण्यास येऊं लागला, तेव्हां ते आल्यावरच आपण नगरप्रवेश करूं असें बाजीरावानें ठरविलें. नानावर सिंद्याचा रोष झाल्यामुळें, मोरोबा दादा फडणीस अटकेंत होता त्यास बाहेर काढून कारभार सांगावा असा विचार सिंद्यानें चालविला. सिंदे फौज घेऊन पुण्यावर येतात या वार्तेनें शहरांत गडबड उडाली. होळकरासही आजपावेतों कोणींच विचारलें नाहीं; परभारेंच सर्व उलाढाली केल्या, यामुळें तो अत्यंत नाराज झाला, पण तितक्यांत त्यास पक्षवायु झाल्यामुळें त्याचें महत्त्व राहिलें नाहीं. सिंदे जमावानिशीं येतात हें ऐकून नानास फारच भय प्राप्त झालें. ‘ आपणां-विषयीं कोणी कांहीं समजावील तर ऐकूं नये, ’ असें नानांनीं श्रीमंतास विनविलें. त्यावर श्रीमंत म्हणाले, ‘ तुम्हीं कारभार करावा, पण आम्हांस विचारल्या खेरीज कांहीं करूं नये. कृत्रिम विचार दृष्टीस पडल्यास कार्यास येणार नाहीं. ’ अशा प्रकारची भाषा होत आहे, तों गोविंदराव पिंगळे सिंद्याकडे गेलेले परत आले. त्यांनीं कळविलें कीं बाळोबा तात्याच्या वल्गना बहुतच चालू आहेत. तें नानास समजल्यावर चित्तास धीर न पुरे. श्रीमंतांनीं त्यांस कळविलें, तुम्ही सिंद्याचे धास्तीनें दिलगीर होऊं नये. तथापि नानास धीर न पुरतां ते श्रीमंतांचा निरोप घेऊन पुण्यास आले व मुहूर्तेंकरून डेरेदाखल झाले. साताऱ्यास जाण्याची योजणूक आहे. हा प्रकार बाळोबास समजल्यावर त्यांनीं स्पष्ट कळविलें कीं, “ नाना घाबरे कां जाहले ? त्यांचे अब्रूस खता नाहीं, वीस वर्षे त्यांनीं राज्य रक्षिलें. आम्हांस येथील कारभार कर्तव्य नाहीं. आमचे मुद्दे आहेत त्यांची मखलासी करून द्यावी, म्हणजे आम्ही जातों. ते मुद्दे असेः—१ सिंदे यांचे लष्करांत फितूर केला ते गृहस्थ हातीं द्यावे. २ मोरोबा दादांस सोडावें. ३ मोगलाची मसलत म्हणजे ‘ निजामावर स्वारी करण्याची ’ आम्ही करितों, त्यास तुमची कबुली असावी. ४ खर्ड्यांचे खंडणीपैकीं

* खरे, पे. अ., ऐ. स्फु. ले. ३-२१.

आमचे वांट्याचे एकोणीस लक्ष रुपये येणें आहेत ते द्यावे. ५ फितुराचे बंदोबस्तास फौज जमा केली त्या समयीं आम्हांस खर्च पडला आहे तो द्यावा. मोरोबास सोडण्या बद्दल ते आम्हास पन्नास लाख रुपये कबूल करितात, त्यांचा ऐवज तुमचेकडे शिल्लक आहे त्यांतून ही रक्कम आम्हास द्यावी आणि पुनः गैरवाजवी वागणार नाहीं, असा करार लिहून द्यावा. ' बाळोबाकडून ही कलमबंदीची याद आल्यावर नानाकडे पुष्कळच वाटाघाट चालली. 'भृगुवार ता. १८ मार्च रोजीं नाना बहुतच घाबरले. हल्लीं शरीरें करून बहुत कृश झाले आहेत. आठ दिवसांमागें रात्रौ लवकर भोजन करून मुशीरुन्मुल्क पुण्यास कैदेंत होता त्याचे भेटीस गेले आणि त्यास विचार पुसला. त्यानें सांगितलें, 'द्रव्य देऊन अब्रू वांचवावी अगर येथून कोठें तरी स्थळ पाहून जावें हें चांगलें. त्या कामीं त्यानें आपला स्वतःचा अनुभव सांगितला. तो म्हणाला, 'मी नबाबाकडून गुदस्तां कां आलों हें पुसाल तर याचें कारण मी एकटा आल्यानें नबाबाचे जिवास उपद्रव होणार नाहीं. जबरदस्ती करून मी राहतों तर नबाबाची सर्वच दौलत पेशव्यांस मिळाली असती. यास्तव मी एकटा गेल्यानें नबाबाची दौलत वांचते, मी न आल्यास घात होतो, हें समजून मी आपणांपाशीं आलों. ' पुढें सिंद्याचें लष्कर कंपू सुद्धां पुण्यानजीक येतांच आबा चिटणीस व नाना फडणीस धास्ती धरून पुण्यांतून ताबडतोब बाहेर निघाले.' बाळोबानें तरी हा शुद्ध देखावाच केला. वास्तविक नानाकडून द्रव्य उपटण्यापुरतीच ही कारवाई होती. 'त्याचीं पत्रें जरबेचीं गोविंदराव पिंगळ्याचे मार्फत आलीं त्यांवरून नानांनीं पुण्यांत सर्वांस सावध होण्यास सांगितलें, आपलें कुटुंब बाहेर लावून दिलें आणि आपण निघून गारपिरावर राहिले. पुण्यांत फार गडबड उडाली. फितव्यामुळें सिंद्यांचा राग वाढला. ते तुळापुरानजीक आल्याची बातमी लागतांच श्रीमंतांनींही नानास इशारा दिला कीं तुम्ही साताऱ्यास जाऊन राहवें. '

परशुराम भाऊंनीं नानास पुष्कळ सांगितलें, कीं ' असें धैर्य सोडूं नये. आम्ही सर्व सरदार असतां सिंदे एकटे काय करतील ? ' परंतु नानास धैर्य न पुरे. याकरितां परशुराम भाऊंस फौजेसह बाजीरावाजवळ ठेवून मनांत विचार केला कीं, हें सारेंच प्रकरण सोडून देऊन राज्याचे मालक छत्रपति त्यांस उभें करावें. अशी मसलत मनांत आणिली आणि त्याप्रमाणें सोमवार ता. २१ मार्च रोजीं श्रीमंतांचा निरोप घेऊन पुरंदरचे माचीस जाऊन दुसरे दिवशीं पुढें साताऱ्यास गेले. बरोबर सात हजार फौज, चार तोफा व राघोपंत गोडबोले होते. नाना साताऱ्यास पोंचण्यापूर्वीच बाजरिावाचें छत्रपतींस पत्र आलें कीं, यांस किल्ल्यावर घेऊं नये. त्यावरून करंजे गावांत मुक्काम करून राहिले.

जुन्नरास असतां सिंद्यांशीं करार झाला त्यांत बाजीरावानें लिहून दिलें होतें कीं आम्हांस नेऊन राज्यावर बसवावें, म्हणजे निंमें राज्य व पन्नास लाख रुपये तुम्हांस देऊं आणि मोरोबा दादास कैदेंतून सोडूं. ही रक्कम सिंदे पुण्यास दाखल होतांच बाजीरावाकडे मागूं लागला. 'करारप्रमाणें तुम्हीं वेळेवर येऊन आम्हांस पुण्यास आणिलें नाहीं. आतां येथें आल्यावर नाना निघून गेले. सरकारांत पैशाची ओढ.' असें म्हणून सिंद्यासही त्यानें उडवून दिलें. तथापि बोलण्यांत त्यानें सिंद्याची ओतप्रोत स्तुति केली. शनिवार ता. २६ रोजीं वस्त्रें घेण्याकरितां म्हणून पुणें सोडून बाजीरावानें खराडीवर येऊन मुक्काम केला. तेथून तो थेउरास गेला. प्रथम पासूनच लहान मोठ्या गोष्टींत आपणांस विचारून सर्वांनीं कामें करावीं असा रिवाज बाजीरावानें पाडिला. तूर्त सातान्यास जाऊन वस्त्रें घेण्यापूर्वीं सिंदे व नाना यांचें ऐक्य कसें करून द्यावें ही विवंचना बाजीरावास पडली. दोघेही त्यास नको होते. पण दोघांशिवाय त्याचा जम बसण्याजोगा नव्हता. तथापि तुमच्यामुळें आमची राज्यावर स्थापना झाली, असें उठल्यासुटल्या बोलून सिंद्यास त्यानें अगदीं गार केलें. आजच्या प्रसंगीं श्रीमंतांस सिंद्यांपेक्षां दुसरें ध्यानच नाहीं असें सर्वांस भासूं लागलें.

पुण्यास जाग्यावर असेपर्यंत नानास किंमत होती. पुणें सोडल्यापासून नानाचा अधिकार गेला आणि मागें बाजीरावास वाटेल तें करण्यास प्रतिबंध राहिला नाहीं. नाना सातान्यास जाण्यास निघाला, तेव्हां छत्रपतीस बाहेर काढून त्यासच प्रमुख करून आपण राज्याची नवीन घडी बसवावी असा एक विचार किंचित् काळ त्याचे मनांत आला. तो सिद्धीस जाता तर पुढील इतिहास साफ बदलला असता. दत्तविधानाच्या भानगडींत शिरून पेशवाईचा पुनरुद्धार करण्यापेक्षां छत्रपतीकडूनच, पुण्यास जी बजबज पुरी सिंदे बाजीरावाच्या असमंजस कृत्यांनीं माजली, ती बंद पाडून, राज्याचा बंदोबस्त करण्याचा हा मार्ग कदाचित् त्या अंदाधुंदींत श्रेयस्कर झाला असता असें वाटूं लागतें. नानानें महाराजांचें दर्शन घेऊन कळविलें, 'आपण खालीं उतरावें, फौजबंदी करावी, मी कोट रुपये आधीं आपणांपाशीं ठेवितों.' परंतु या बोलण्यांत नानाचा हेतु छत्रपतींचा अधिकार चालू करण्याचा नसून, केवळ सिंद्याचा शिरजोरपणा नाहींसा करून आपलाच कारभार सुरळीत करावा असा असल्यामुळें, छत्रपतीनें त्यास सांगितलें, 'असे प्रसंगांत तुम्ही मसलत करणार हे सिद्धीस न जातां विशोभा मात्र होणार.' या उत्तरावरून नानाचा जम बसला नाहीं. छत्रपतींच्या या वाटाघाटींत नानाचा पक्षपाती सातारचा फडणीस बापू

कान्हो होता त्यानेंच त्या वेळेचा संवाद आपल्या आत्मचरित्रांत नमूद केला आहे, तो असा. 'फाल्गुन शु. १५ स नाना फडणिसांनी साताऱ्यास जाऊन विनंति केली.

नाना–पूर्वी कै. शाहू महाराजांची सेवा नानासाहेबांनीं केल्यामुळें प्रसन्न होऊन राज्यकारभार चालविण्यास आज्ञा झाली त्याप्रमाणें आजपावेतों त्यांचे वंशानें राज्य कारभार चालविला. तसाच प्रकार यापुढेंही मर्यादेनें चालवावयाकरितां सवाई माधवरावांचे स्त्रीस दत्तकपुत्र देऊन वस्त्रें पेशवाईचीं द्यावीं.

छत्रपति–कै. शाहू महाराजांनीं ज्या पद्धतीनें राज्य केलें त्या अन्वयें हुजूर स्वामी सन्निध राज्यकारभार चालवावा, असा निश्चय होत असल्यास दत्तकाची आज्ञा देऊं. प्रत्यक्ष औरस वंश असतां दत्तक कशासाठीं करावा !

नाना–मी पंतप्रधानांचा चाकर. मजकडून निमक-हरामपणा होणार नाहीं.' याचा अर्थ मी पेशव्यांचें हित पाहणार आणि छत्रपतींना पूर्वीप्रमाणें अटकेंत ठेवून कारभार करणार. स्कॉट वेअरिंगनें हा मुद्दा चांगला स्पष्ट केला आहे, तो म्हणतो, 'मूळ राज्याचे मालक छत्रपति. त्यांना बाजूस सारून पेशव्यांनीं कारभार आपल्या हातीं घेतला. आतां पेशवाईस धनी नाहींसा झाला तेव्हां त्यांचा एक नोकर नाना सर्व राजसत्ता आपल्या हातीं घेऊं लागला, तेव्हां या भलत्याच भ्रमाचा निरास शेवटीं इंग्रजांनीं केला.'

छत्रपतीचा निरोप घेऊन नाना खालीं शहरांत आला. इकडे बाजीरावानें आंतून नम्रतेनें व लाघवानें महाराजांची मर्जी प्रसन्न केली, त्यामुळें महाराजांचे मनांत त्यास वस्त्रें द्यावीं. परंतु सिंदे व परशुरामभाऊ यांनीं चिमाजी आपांस पुण्यास आणिलें, त्यावरून नानांनीं आग्रह धरून बाबूराव आपटे यांस खालीं आपले वाड्यांत बोलावून आणून चिमाजीस वस्त्रें द्यावीं असें ठरविलें: आणि आपण कूच करून वाईस गेले. परंतु त्या पूर्वी पुण्यास दुसराच प्रकार बनला, त्याची हकीकत सांगितल्या शिवाय नानानें सातारा कां सोडला तें स्पष्ट होणार नाहीं.

बाळोबाची व सिंद्याची खात्री झाली कीं, बाजीरावाचे बोलण्यांत बोलणें नाहीं, केवळ थापा देऊन वेळ मारून नेण्यापलीकडे राज्य चालविण्याचें शहाणपण त्यास नाहीं; आणि नाना बाहेर असतां आपणांस सर्व सरदार अनुकूल होणार नाहींत, आणि तसें झाल्याशिवाय राज्याची घडी नीट बसणार नाहीं. त्यांना असेंही वाटलें कीं पुण्याचा नाद सोडून आपण हिंदुस्थानांत निघून जावें तर नाना पुढें आपल्या सरदारीचें वाटोळें करण्यास चुकणार नाहीं. या वेळीं सिंद्यांचे ब्राह्मण सरदार आबाजी रघुनाथ चिटणीस व राजाराम विठ्ठल हे नानास सामील होऊन आपापल्या मंडळी-

सह त्याजबरोबर साताऱ्याकडे गेले असून ते सुद्धां सिंद्यांच्या विरुद्ध खटपट करण्यास चुकले नसते. अशा गोष्टी मनांत आणून नाना इतःपर कारभारांत आले असतां आमचा निभाव नाहीं, त्यांस काढा, असा आग्रह सिंद्यानें बाजीरावास चालविला, आणि त्यास साताऱ्यास घेऊन जाण्याचा बेत त्यानें रहित केला. प्रथम बाजीरावाकडे त्यानें मागणी केली कीं, 'आम्हांस कबूल केलेला ऐवज द्या, किंवा तो नसल्यास वाटेल तिकडून वसूल करण्याची परवानगी आम्हांस द्या. नाना परत आले नाहींत तर तुमचा कारभार आम्ही चालवितों. त्याची फिकीर तुम्हीं ठेवूं नका; आणि आमचा बंदोबस्त केल्याशिवाय तुम्हीं साताऱ्यास जाऊं नये. आम्हीं तुम्हांस कूच करूं देणार नाहीं.' अशीं भाषणें थेऊरच्या मुक्कामीं अहोरात्र चाललीं. इकडे बाजीराव साताऱ्यास जाण्याची निकड करीत होता त्यास सिंदे म्हणे, नानाची तोड काढून मग साताऱ्यास चला. तोड न काढतां गेल्यास आम्हीं बरोबर येऊं, पण तेथें वस्त्रांस हरकत आल्यास आमचा इलाज चालणार नाहीं. अशा वाटाघाटींत दिवस भराभर निघून जाऊं लागले. या सर्व प्रकरणांत सिंदे म्हणजे बाळोबा तात्याच प्रमुखपणें वागत होता हें लक्षांत ठेवणें जरूर आहे. सिंदे अनुकूल होईना, तेव्हां बाजीरावानें नानास वरचेवर पत्रें पाठवून पुनः त्याची मनधरणी चालविली. त्यावर नानाचें पत्र त्यास आलें कीं, सिंद्याची फिकीर तुम्हीं बाळगूं नये. भलत्याच अटी कबूल करून त्यास गुंतूं नये. या वेळीं बाजीरावाजवळ बंदोबस्तास परशुरामभाऊ होता. त्याजकडून सिंद्यानें वचन घेतलें, कीं बाजीराव हट्ट धरून साताऱ्यास जाईल तर त्यास आम्ही जाऊं देत नाहीं. ही गोष्ट पक्की केल्यावर मग सिंद्यानें नानास कारभारांतून काढण्याची तजवीज सुरू केली. 'बाळाजी जनार्दन यांजकडील कारभार तहकूब केला आहे', अशीं पत्रें सुद्धां त्यानें बाहेरच्या मंडळीकडे पाठविलीं. या स्थितींत नानाची बाजू बचावण्याचा प्रयत्न शक्य तितका परशुरामभाऊनें केला, पण त्याचा उपयोग झाला नाहीं.

याप्रमाणें बाजीरावानें वस्त्रें घेण्याचा प्रकार मागें पडल्यानें नानालाही आपलें राजकारण सजविण्यास संधि मिळाली. निजामाकडे त्यानें आपलें संधान प्रथमपासूनच राखिलें होतें. हल्लीं त्यानें निजामास लिहून त्याचीं पलटणें आपल्या मदतीस बोलाविलीं. त्याचा सरदार मुसा रेमू पलटणें घेऊन पुण्याकडे निघाल्याची बातमी नानास आली. हा नानाचा नवीन उपक्रम सिंद्यास कळला तेव्हां त्यास नानाची मोठी चीड आली; आणि आपल्या घरगुती भांडणांत हात घातल्याबद्दल निजामाचा सूड घेण्याचा उद्योग सिंद्यानें चाल-

विला. खर्ड्यांचे तहांत कबूल केलेली रक्कम व मुलूख निजामानें पेशव्यांस मुळींच दिला नव्हता. उलट तो आतां पुण्यावर चालून येणार त्यापक्षीं आपणच त्याजवर चाल करून कबूल केलेला पैसा व मुलूख वसूल करावा अशी तजवीज बाळोबानें चालविली. खर्ड्यांची लढाई मुख्यतः सिंद्याच्याच फोजेनें जिंकली होती. शिवाय निजामास दक्षिणेंतून उखडून काढण्याचा मराठशाहीचा पूर्व संकल्प पुरा करण्यास ही संधि सिंद्यास योग्य वाटली. परंतु या कामीं मुख्य विरोध त्यास नानाचाच झाला. केवळ आपला अधिकार कायम राहवा म्हणून नानानें निजामाची कुमक आणिली, हा प्रकार सर्वांसच आत्मघातकी वाटला.

**५ नानाभाऊंचें वितुष्ट.**—ता. १८-४-१७९६ रोजीं बाळोबा व सिंदे यांनीं तीन हजार स्वार व चार पलटणें घेऊन बाजीरावाचे मुक्कामावर येऊन त्यास निकड लाविली, कीं आम्हांस खर्चास नाहीं, रक्कम आतांचे आतां टाका. या बाबतींत एक सबंध अहोरात्र बाजीरावा सुद्धां सर्व लोक बसून होते. भोजनासही कोणी उठूं शकलें नाहीं. त्या वेळीं मालोजी घोरपडे, बाजीराव बर्वे, मानाजी फाकडे वगैरेंनीं बाजीरावाचे तर्फेनें सिंद्यांशीं पुष्कळ रदबदली केली. अखेरीस नानास कारभारांत घेणार नाहीं असें बाजीरावानें लिहून दिलें आणि आठ दिवसांत ५० लाख रक्कम देण्याचें कबूल केलें, तेव्हां सिंद्याचें धरणें उठलें. वरील करार पुरा पाडण्याची जामीनगत बाजीरावाचे विनवणीवरून परशुराम भाऊनें स्वीकारली. नानानें कारभार करूं नये फंद फितूर करूं नये. मेणवलीस अगर क्षेत्रास स्नानसंध्या करून स्वस्थ असावें, पैका मिळविला असेल तो सरकारांत द्यावा, अशीं आठ कलमें वरील करारांत होतीं. "सिंदे सहा प्रहर अडून बसले. प्रातःकालच्या चार घटका दिवसास तोड निघाली." हा करार सातारा येथें नानास कळविण्यांत आला, तेव्हां त्यानें आपली हरएक प्रकारें बळकटी चालविली. मुद्दाम शेणवी मंडळींनीं नानास कारभारांतून काढण्याकरितां हा घाट रचला असा बोभाटा या वेळीं बाहेर सर्वतोमुखीं झाला. वरील करारानें नानाचा कारभार साफ नाहींसा झाला. त्याचे कित्येक पक्षपाती बाबा फडके, त्रिंबकराव परचुरे वगैरे पुण्यास बाजीरावाजवळ होते ते अत्यंत घाबरून गेले. सिंदे आपली वाट केव्हां काय करील याचा भंरवसा न पटून ते कारभार सोडून घरीं बसले. या स्थितीचा फायदा घेऊन बाजीरावानें मात्र आपला पक्ष बळकट केला. वडिलांच्या वेळचीं माणसें बाहेर भटकत होतीं त्यांस त्यानें जवळ आणून नोकरींत ठेविलें. मानाजी फाकडे, केसो कृष्ण दातार, बाजीराव बर्वे, बळवंतराव नागनाथ ही मंडळी बाजी-

रावाचें आत्मलिंग बनली. नाना साताऱ्यास असतां त्याजवर पलटणें पाठवून त्यास पकडून त्याचें द्रव्यहरण करणें सिंद्यास या वेळीं शक्य होतें. परंतु बाजीरावानें साताऱ्यावर जाण्याची गोष्ट कबूल केली नाहीं. असें करण्यांत नानाचा बचाव करण्याची त्याची भावना होती असें मात्र नाहीं. परंतु छत्रपति व सातारा किल्ला यांजवर सर्वस्वी नानाचा ताबा असल्यामुळें छत्रपतीकडून वस्त्रें मिळेपर्यंत नानास दुखविणें त्यास इष्ट वाटलें नाहीं.

बाजीरावास पुण्यास येऊन दोन महिने झाले. एवढ्या अवधींत त्याच्या स्वभावाची पुण्याच्या मंडळीस चांगलीच ओळख झाली. बोलण्यांत बोलणें बिलकूल नसल्यामुळें त्याची पत म्हणून कोणाजवळ राहिली नाहीं. याचे हातून राज्य चालणें शक्य नाहीं अशी परशुरामभाऊ वगैरे समस्त मंडळीची खात्री झाली. त्यावरून एक विचार मुख्यतः पुढें आला तो हा कीं नाना कारभारांत नसल्यास एकदम सर्वत्र गोंधळ उडेल, यास तोड काय काढावी ? या संबंधानें बाळोबा व परशुरामभाऊ यांनीं एकत्र बसून पुष्कळ गुप्त वाटाघाट केली आणि ठरविलें, कीं बाजीरावास दूर करावें, पण तो उगाच स्वस्थ बसणारा नव्हे, सबब त्यास अटकेंत ठेवावें. परंतु पेशवाईस धनी कोणी तरी पाहिजे, आणि माधवरावाचाच वंश पुढें चालणें पुष्कळांस आवडेल. नानानें तरी आरंभीं हाच प्रकार सुचविला होता. बाहेरचा दत्तक आणावा तर दादासाहेबांचे सर्वच पुत्र असंतुष्ट राहून नेहमीं बखेडा करणार. सबब चिमाजीआपा लहान आहे, त्यास दत्तक देऊन कारभार चालविणें सोईचें होईल. सुनेच्या मांडीवर सासऱ्यास देणें हा पक्ष जरी गौण असला तरी राजकारणांत तो या वेळीं अपरिहार्य व त्यांतल्या त्यांत कमी आपत्तीचा होता. असे विचार बाळोबा व परशुरामभाऊ यांनीं ठरविले.

परशुरामभाऊ या वाटाघाटी मुद्दाम नानास लिहून कळवीत होता. नानानें वरील योजनेस आपली संमति दिली. तरी त्यांतील एकच गोष्ट त्यास आवडली नाहीं, ती ही कीं आपल्या हातांतून डाव जातो, जाणि त्यांत बाळोबा व परशुरामभाऊ आपणांस वरचढ होणार. तेव्हां तूर्त आपण अलिप्त राहून काय होतें तें पाहत बाहेरच राहण्याचें त्यानें मनांत ठरविलें. इकडे बाळोबासही परशुरामभाऊचा पूर्ण विश्वास पटत नव्हता. बाजीराव व चिमाजी या दोघांही भावांस परशुरामभाऊचे ताब्यांत ठेवल्यास आपल्या हातीं कांहींच डाव शिल्लक राहत नाहीं असें बाळोबास वाटून त्यानें परशुरामभाऊपाशीं असें ठरविलें, कीं बाजीरावास सिंद्यांनीं आपल्या ताब्यांत घेऊन अटकेंत ठेवावें, आणि परशुरामभाऊनें चिमाजीचें दत्तविधान करून त्यास पेशवाईवर बसवावें. बहिरोपंत मेहेंदळ्यास साताऱ्यास पाठवून भाऊनें ही सर्व योजना नानास

कळविली; आणि चिमाजीच्या नांवें छत्रपतीकडून वस्त्रें मागविलीं. नानास ही गोष्ट कळल्यावर त्याच्या मनांत अनेक विकल्प आले. बाजीरावास सिंद्याचे ताब्यांत देण्याचें कबूल करून भाऊनें बाळोबाशीं सख्य केलें हें नानास आवडलें नाहीं. जुन्नराहून निघण्यापूर्वी भाऊनें बाजीरावास शपथा देऊन साह्य करण्याचें वचन दिलें आणि आतां त्याजविरुद्ध वागणें म्हणजे वचनभंग होणार, ही गोष्ट त्यास रुचली नाहीं. मेहें-दळ्यावरही त्यामुळें नानाची मर्जी रुष्ट झाली. तथापि उघड विरोध करण्यास तूर्त आपणांस ताकद नाहीं असें मनांत आणून नानानें चिमाजीकरतां छत्रपतीकडून वस्त्रें पाठवून देण्याचें काम बाबूराव आपट्यास सांगितलें, आणि मागें सांगितल्याप्रमाणें आपण सातारा सोडून वाईस जाऊन राहिला. बाजीरावास हातांतून जाऊं दिल्याबद्दल नानानें भाऊशीं अत्यंत वांकडें धरलें.

नाना व भाऊ यांच्या या वितुष्टाचीं कारणें ज्यास्त स्पष्ट केलीं पाहिजेत. नाना पुण्यांतून गेल्यावर मागें बाळोबा व भाऊ यांनीं एक प्रकारचें कपट नाटक चालविलें. बाळोबा कोणतीही गोष्ट दौलतरावास जवळ घेऊन करीत असे. थेऊरच्या तळावर भाऊ बाजीरावांचा मुक्काम असतां दौलतराव, बाळोबा व त्याचा पुतण्या धोंडीबा आणि सदाशिव मल्हार या मंडळींनीं एप्रिलचे आरंभीं गणपतीचे देवालयांत येऊन भाऊची गांठ गुप्तपणें घेतली; आणि बाजीराव नादान याचें पुढें काय करावयाचें याची वाटाघाट केली. प्रथम सर्वांनीं गणपतीसमोर शपथा केल्या, कीं उभयपक्षीं कोणी कोणास अंतर न देतां एकमतानें सर्व कारभार उरकावा. शपथक्रियेची वार्तासुद्धां बाजीरावास किंवा मानाजी फाकडे वगैरे त्याच्या साथीदारांस कळली नाहीं. त्यानंतर चार दोन दिवस अहोरात्र खलबतें होऊन मनसुबा ठरला कीं चिमाजीस यशोदा-बाईचे मांडीवर देऊन पेशवाईवर स्थापावें, आणि कारभार परशुरामभाऊनें करावा. बाजीरावास सिंद्यांनीं तूर्त आपल्या अटकेंत ठेवावें. इतकें झाल्यावर खर्ड्यांचे तहांतील कलमें उगवण्यासाठीं सिंदे भाऊंनीं निजामावर स्वारी करावी. त्या वसुलीपैकीं पाऊण कोट रुपये सिंद्यास द्यावे. भाऊस बाजीराव आपले ताब्यांत पाहिजे असल्यास त्याबद्दल आणखी पंचवीस लक्ष द्यावे. अशा रीतीनें पूर्वी बाजीरावानें कबूल केलेली एक कोट रुपयांची फेड झाली असें समजून सिंद्यानें कारभारांत भाऊचा जम बसवून देऊन आपण हिंदुस्थानांत निघून जावें. थेऊरच्या तहावरील या योजनेची बजावणी वर्षप्रतिपदेच्या मुहूर्तानें ( ८-४-१७९६ ) सुरू झाली. मात्र वस्त्रें आणण्याच्या बाबतींत नाना भाऊंचें जास्तच वितुष्ट आलें. नानाच्या हातून वस्त्रें आणावीं तर त्याचा

शह कारभारांत राहणार. त्यायोगें कदाचित् तो आपली योजना उलटून पाडील असें बाळोबास वाटून त्यानें भाऊस कळविलें कीं, वस्त्रें नानाचे मार्फत आणूं नयेत. इतकेंच नव्हे तर नानानें साताऱ्यास महाराजांजवळ राहूं सुद्धां नये. एवढ्या गोष्टी भाऊनें कबूल केल्या, परंतु पुढें जेव्हां बाळोबानें सुचविलें कीं, नानास पकडावें किंवा त्याची जिंदगी हस्तगत करावी, तेव्हां भाऊनें त्या गोष्टी साफ नाकारल्या. त्यानें बाळोबास निक्षून कळविलें कीं, ' नाना तुम्हांस राज्यकारभारांत नको असतील तर त्यांस घेऊं नका. पण त्यांचा फडणिसीचा दरक त्यांजकडे चालला पाहिजे. त्यांचे अब्रूस किंवा पैक्यास तुम्ही धोका आणतां नये. कारभार सोडून स्नानसंध्या करून मर्जीस येईल तेथें त्यांस राहूं द्यावें. ' या गोष्टी बाळोबानें कबूल केल्या, पण त्यांत खालील अटी घातल्याः—

( १ ) नानानें साताऱ्यास फौज जमविली आहे ती दूर करावी. ( २ ) मेणवली, मिरज, तासगांव किंवा टोंकें यांपैकीं वाटेल तेथें त्यानें स्वस्थ राहवें. ( ३ ) राज्यकारभारांत ढवळाढवळ करूं नये किंवा बाहेर कोणाशीं पत्रव्यवहार, राजकारण व फंद फितूरी करूं नये. ( ४ ) गड कोट व सरंजामाचा मुलूख ताब्यांत आहे तो नानानें सोडून द्यावा. मात्र या अटी त्यानें कबूल न केल्यास त्याचें पारिपत्य करण्यासाटीं बाळोबाचें साह्य करणें भाऊनें कबूल केलें, आणि चिंतोपंत लिमये म्हणून नानाच्या भरंवशाचा इसम होता त्यास हें सर्व प्रकरण नानास कळविण्यासाटीं भाऊनें साताऱ्यास रवाना केलें. पण सातारा सोडण्याची नानाची मर्जी दिसेना. छत्रपतीस हातीं ठेवून त्याच्या नांवानें इंग्रज निजाम वगैरेकडे कारस्थान रचण्याची नानास सवड होती, ती सातारा सोडल्यानें गेली असती. बाळोबानें भाऊस कळविलें, कीं नाना असा बऱ्या बोलानें वटणीस येणारा मनुष्य नव्हे. त्यास धाक दाखविणेंच जरूर आहे. नम्रतेच्या गोष्टी बोलून नानानें कालहरण चालविलें, तेव्हां बाळोबानें नारायणराव जिवाजीस दहा हजार फौज देऊन कवडीच्या तळावरून साताऱ्यास रवाना केलें. या बनावाची वर्दी भाऊनें मुद्दाम बहिरोपंत मेहेंदळ्यास तांतडीनें रवाना करून नानास दिली. ती वर्दी पोंचतांच नानानें प्रसंग ओळखून तारीख २२ एप्रिल रोजीं सातारा सोडून मेणवलीस प्रयाण केलें. अशी एक आख्यायिका आहे कीं नानास पकडण्यास लोक आले अशी वर्दी कारकुनानें आपले कानावर जान्हवें ठेवून नानास दिली; आणि लघवीच्या निमित्तानें नाना पळून गेला, ( भा. व. श. ). ही गोष्ट याच प्रसंगाची असेल काय ? मिरज तासगांवास पटवर्धनांच्या कबजांत जाणें त्यास इष्ट वाटलें नाहीं. आपण होऊन सिंद्याशीं मिलाफ करून पुढील व्यवस्था ठरविण्याची संधि नानानें या वेळीं फुकट घालविली.

वर्षप्रतिपदेच्या मुहूर्तानें आपण उभयतां बंधूंनीं वस्त्रे आणण्यासाटीं साताऱ्यास निघण्याचा विचार बाजीरावानें ठरविला होता. पण दैवाची लीला विचित्र होती. त्याच दिवशीं सिंदे आपल्या मंडळीसुद्धां पाडव्याच्या मुजऱ्यास म्हणून बाजीरावाकडे आला आणि धरणें धरून बसला. म्हणूं लागले कीं प्रथम आमच्या रकमेचा फडशा करा आणि मग पाहिजे तिकडे जा. रकमेचा फडशा होईपर्यंत आम्हीं तुम्हांस या तळावरून हालूं देणार नाहीं. त्यावरून तुमचा निकाल केल्याखेरीज आम्ही येथून हलणार नाहीं असें बाजीरावानें कबूल केलें. त्यावर सिंदे म्हणाले, 'तुम्ही धनी, आम्ही चाकर. तुम्हीं वचन मोडून निघून गेलां तर आम्हीं सेवकांनीं तुमचें काय पारिपत्य करावयाचें? तर आपण निघून जाणार नाहीं अशाबद्दल परशुराम भाऊस जामीन द्या.' त्यावरून बाजीरावानें भाऊची काकळूत चालविली, तेव्हां भाऊनें त्याची जामीनगत पत्करिली, ती अशी कीं, 'तुमच्या व श्रीमंतांच्या करारांतील प्रत्येक कलमाचा निकाल श्रीमंतांनीं केल्याशिवाय आम्ही त्यांस येथून हालूं देणार नाहीं.' याचा अर्थ यावेळेपासून बाजीराव सिंद्याचे अटकेंत पडल्यासारखा झाला, आणि त्यास भाऊची मर्जी राखण्याशिवाय गत्यंतर राहिलें नाहीं. भाऊनें हिय्या करून जामीनगत पत्करली नसती तर प्रकरण रक्तपाताशिवाय मिटलें नसतें, अशीच त्या वेळीं लोकांची खात्री होती.

**६ बाजीरावास अटक, चिमाजीची पेशवाईवर स्थापना ( १ जून, १७९६ ).**—तारीख १७ एप्रिल रोजीं चिमाजी आपाचे वयास १२ वें वर्ष संपून १३ वें लागत होतें. तन्निमित्त बाजीरावानें भोजनाचा समारंभ केला. परशुरामभाऊ व रघुनाथराव पटवर्धन हे दोघे आजाराचें निमित्त करून भोजनास गेले नाहींत. भोजन चालू असतां दौलतराव तीन हजार निवडक फौज व चार पलटणें बरोबर घेऊन बाजीरावाचे मुकामावर येऊन कचेरीच्या डेऱ्यांत बसला. जेऊन आल्यावर त्यांनीं बाजीरावास जिकिरीचा तगादा लावला कीं, 'आम्हांस तीन उपोषणें झालीं. दम निघत नाहीं. नानास कारभारांतून काढावें, आणि त्यांचेजवळ पैसा आहे तो घेऊन आमची कोट रुपयांची फेड करावी. श्रीमंतांचे तर्फे मानाजी फाकडे, बाजीराव बर्वे वगैरे मध्यस्थीचें बोलणें बोलूं लागले, परंतु त्यांची मध्यस्थी सिंदे ऐकेना. हातघाईवर प्रसंग येणार असा सुमार दिसूं लागला. बाजीरावाजवळ हजार दोन हजार लोक होते ते नागव्या तलवारींनिशीं त्याला गराडा घालून उभे राहिले. निकरावर गोष्ट आलेली पाहून बाजीरावानें परशुरामभाऊस बोलावणें पाठविलें. तो लगेच आपलीं हजारपांचशें माणसें

घेऊन आला. बाजीरावानें त्यास सिंद्याची समजूत घालण्यास सांगितलें. पण सिंदे भाऊचें ऐकेना. रात्र झाली. कोणीच माघार घेईना व जाग्यावरून उठेना. श्रीमंतांची व भाऊची संध्या देखील राहिली. रात्रभर मंडळी उपाशीं बसून होती. उजाडतांना सिंद्यांनीं सात कलमी यादी लिहून पुढें ठेविली, तिजवर बाजीरावानें कबुलात लिहून दिली, कीं आठ दिवसांत कलमांचा उलगडा करून देतों. त्यास भाऊ व पांडुरंगराव बारामतीकर यांची जामीनगत लिहून घेतली, तेव्हां सिंदे उठून परत गेले. भाऊ व बाळोबा यांनीं हें सर्व कपटनाटक मोठ्या शिताफीनें करून दाखविलें. आतां याचा उत्तरभाग सांगावयाचा आहे.

आठ दिवसांची मुदत भरून गेली. कबूल केलेली रकम हातीं येण्याचा मार्ग बाजीरावास दिसेना. तीन आठवडे गेले तरी रक्कम येईना. नानाचे भरंवशार बाजीराव दम धरीत असेल असें समजून बाळोबानें भर दरबारांत त्यास सांगितलें, कीं नाना साताऱ्यास गेले आहेत त्यांनीं इंग्रज अगर मोगल अगर टिपू यांस सामील करून आम्हांवर यावें. त्यास मुदतही आम्ही पाहिजे तर दोन महिन्यांची देतों. असें झालें असतां लढाई मारून नानास धरून आणूं, तरच आम्ही स्वामींचे एकनिष्ठ सेवक खरे. नानानें आपण बाजूस राहून मागें या भानगडी ठेविल्या, याबद्दल बाळोबा व सिंदे यांस त्याचा भारी राग आला. वैशाख शुद्ध प्रतिपदेपासून ( ९ मे ) उत्तर नाटकास सुरुवात झाली. त्या दिवशीं बाळोबा, धोंडीबा व सदाशिव मल्हार असे बोलणें करण्याकरतां म्हणून बाजीरावाचे तंबूंत आले. आज एकंदर प्रकरणाचा सोक्ष मोक्ष करावयाचा असा त्यांचा विचार दिसला. बरोबर आठ हजार फौज व तोफखाना घेऊन नारायण जिवाजी बक्षी हजर होता. रक्तपाताशिवाय बाजीरावास हस्तगत करावें असा त्यांचा बेत होता. येतांच त्यांनीं बाजीरावास पैशाचा तगादा लाविला बाजीरावाचे सभोंवती हजार दोन हजार हत्यार बंद लोकांचा गराडा असल्यामुळें त्यास हस्तगत करण्याचें काम बाळोबास साधेना. तेव्हां बाजीरावास अद्वातद्वा बोलून मंडळी परत आपल्या गोटास गेली. त्यांजबरोबर बाजीरावानें हिरोजी पाटणकर व मानाजी फाकडे यांस बोलणें करण्यास पाठविलें. त्या वेळीं कोणी शहाण्यांनीं श्रीमंतांस सांगितलें कीं सिंद्यांचे कारभारी संतोषानें गेले नाहींत, त्यांचा रुसवा कायम ठेवणें चांगलें नाहीं. अशा प्रसंगीं धन्यानें त्यांच्या घरीं जाऊन समजूत करावी असा परिपाठ आहे. या करितां आपण सिंद्यांच्या गोटांत जाऊन त्यांचा राग दूर करावा. बाजीरावास हा सल्ला पसंत पडून तो तात्काळ सिंद्यांचे गोटांत गेला. बरोबर त्याची कित्येक मंडळी

होती. निघतांना श्रीमंतांनीं भाऊस बरोबर बोलाविलें. परंतु त्यांनीं उत्तर केलें, " मला आज प्रदोष आहे. आतां सायंकाल झाला. स्नान पूजा व भोजन आटोपून मी मागून येतों. आपण पुढें चलावें." सिंद्याचे लष्करांत बाजीराव पोंचतांच सिंद्यांनीं तोफांची सरबत्ती करून बाजीरावाचा सत्कार केला; आणि समारंभानें बाजीरावास डेऱ्यास नेलें. थोडा वेळ सामान्य बोलणीं झाल्यावर यादींतील कलमांची गोष्ट निघाली. बाजीराव फार बोलका होता. सिंद्याकडील बाळोबा वगैरे मंडळीही बोलण्याच्या रंगांत आली. बोलणीं होतां होतां प्रहररात्र झाली, आणि आतां बाजीराव परत जाणार, तों एक घोडेस्वार दौडत दौडत डेऱ्याच्या दारापर्यंत आला, व घात झाला, घात झाला असें ओरडूं लागला. अरे काय झालें असें सर्व मंडळी आश्चर्यचकित होऊन विचारतात तों त्यानें उत्तर दिलें कीं, ' परशुरामभाऊ चिमाजी आपास घेऊन पळून गेले.' ही बातमी ऐकतांच श्रीमंतांकडील व सिंद्याकडील मंडळीही विस्मयानें व भीतीनें स्तब्ध झाली. बाजीराव तर दिङ्मूढच झाला. त्यानें सिंद्याचीं आर्जवें चालविलीं कीं, आतांच फौज पाठवून परशुरामभाऊचा पाठलाग करा व त्यास धरून आणा. सिंद्यांनीं उत्तर दिलें, " या वेळीं काळोखी रात्र. भाऊ कोणत्या रस्त्यानें कोठें गेले हें कसें कळणार? आतां फौज पाठवून कांहीं उपयोग नाहीं. आपण गोटास चलावें. सकाळीं हेंच काम प्रथम करूं." बाजीराव म्हणाला, " मला परत जाण्याची छाती होत नाहीं. भाऊनें मलासुद्धां दगा करण्याची तजवीज कशावरून केली नसेल?" तेव्हां सिंदे म्हणाले, " हा गोट काय आणि तो गोट काय, कोठेंही आपण मालकच आहां. खुशाल राहावें." तेव्हां श्रीमंत सिंद्यांचे गोटांत राहिले. त्यासाठीं चौकी पाहऱ्याचा बंदोबस्त सिंद्यांनीं स्वतःच्या नजरेखालीं करविला. उजाडल्यावर श्रीमंतांनीं परत जाण्याची गोष्ट काढतांच सिंद्यांनीं श्रीमंतांस सांगितलें, " आतां आपणास माझ्या गोटाबाहेर पाऊलसुद्धां टाकण्याची सोय नाहीं. तात्काळ दगा होईल. मीच जाऊं देणार नाहीं. त्यावरून बाजीरावाची खात्री झाली, कीं आपण कैदेंत सांपडलों. मानाजी फाकडे, हिरोजी पाटणकर व बाळाजीपंत पटवर्धन या तिघांस बाजीरावानें आपले जवळ ठेवून घेऊन बाकीच्यांस परत लावून दिलें.

याप्रमाणें अक्षतृतीयेच्या दिवशीं बाजीरावास थेऊरच्या तळावर अटक झाली. परशुरामभाऊशीं सिंद्याची वाटाघाट होऊन हा प्रकार अगोदरच गुप्तपणें ठरला होता, हें उघड आहे. इकडे भाऊनेंही आपल्या मुक्कामावर चांगलीच बतावणी केली. सिंद्याचे

गोटांत जाणेसाठीं पालखी तयार करण्यास सांगून आपण स्नान व भोजन उरकलें. नंतर पालखींत बसल्यावर सिंद्याचे गोटास न जातां तो बाजीरावाचे गोटांत गेला. बरोबर स्वतःचे दोन तीनशें लोक हत्यारबंद होत. सव्वाप्रहर रात्रीस तो चिमाजी आपाचे डेऱ्यास पोंचला. विनंति केली जे, "राज्यास अधिकारी कोणी नाहीं. राज्य बुडतें तरी आपण पुण्यास चलावें." तेव्हां श्रीमंत आपा बोलले, "मी येत नाहीं. राज्य बुडालें तरी चिंता नाहीं." मग भाऊंनीं साष्टांग नमस्कार घातला; आणि कृपा करून चलावें अशी विनंति केली. तरी मान्य न होय. तेव्हां दोघा-जणांनीं धरून पालखींत बसवलें, त्या वेळीं श्रीमंतांनीं शंखवाद्यांचा प्रयोग केला. हरि विष्णु सहस्रबुद्धे म्हणून पटवर्धनांचा कारकून बरोबर होता, त्यानें चिमाजीस जबरदस्तीनें बसवून पालखींत घातलें त्याचा पुढें बाजीरावानें चांगलाच सूड घेतला. भाऊनें चिमाजीस आणून रात्रीं रास्त्यांच्या वाड्यांत मुक्काम केला. तेथून तारीख १२ मे रोजीं रात्रीं वीस घटकांच्या सुमुहूर्तावर भाऊनें चिमाजीस शनिवार वाड्यांत आणिलें. चिमाजी दोन दिवस रुसून दुःखीच होता. पुढें विसर पडत चालला. शनिवार वाड्यांत चौकी पाहाऱ्याचा बंदोबस्त पटवर्धनांचा झाला आणि चालू कारभार भाऊ करूं लागला. ता. १६ मे रोजीं वस्त्रें देण्याचें ठरवून तीं आणण्याकरतां चिंतोपंत लिमये व त्रिंबक अमृत पेठे यांची रवानगी साताऱ्यास झाली. त्यांनीं वस्त्रें आणतांच १६ मे रोजीं सिंदे व बाळोबातात्या वाड्यांत आले. "चिमाजी आपाजवळ बैठक होऊन मग यशोदाबाईकडे गेले आणि दुखवट्याचीं वस्त्रें पुढें ठेविलीं. नंतर सेवा-धर्माचीं बोलणीं बहुत केलीं. त्यांतील हांशील असें. केला कारभार शेवटास नेतों, यांत चलबिचल नाहीं. असें खातरजमेनें बोलून बाईसाहेबांचे पायावर हात ठेविला. उपरांतिक विडे घेऊन निघाले ते भाऊंचे घरास आले. दोन घटका बसून बोलून फराळ केला. भाऊंनीं पोशाख देऊन बिदागी केली. पुढें दत्तविधानाचा विषय चालू झाला. बाळकृष्णशास्त्री थत्ते त्या विधीस सल्ला देईनात, तथापि महादेव दीक्षित आपटे व यज्ञेश्वरशास्त्री द्रविड यांनीं शास्त्रार्थ सांगितला, त्यावरून दौलतराव सिंदे वाड्यांत येऊन तारीख २५–५–१७९६ रोजीं दत्तविधान व दरबार झाला. त्यानंतर ता. २ जून रोजीं समारंभानें चिमाजीस पेशवाईचीं वस्त्रें देण्यांत आलीं. सिंदे होळकरादि सरदारांनीं नूतन पेशव्यास नजराणा केला. आनंदो-त्सवाप्रीत्यर्थ चिमाजीनें पुळ्याचे गणपतीस चौघडा दिला. एवंच बाळोबा व व परशुरामभाऊ यांच्या पुरस्कारानें कुजत पडलेला पेशवाईचा डाव कांहींसा मार्गास

लागला. मात्र सवाई माधवरावाच्या मृत्यूपासून सात महिने केवळ पेशवाईस धनी शोधण्यांत गेले. शिवाय बाजीराव, नाना वगैरे रुष्ट होऊन आपसांतील वैमनस्यें वाढलीं. आणि पुण्यास प्रचंड फौजा रिकाम्या बसून मुलूख मात्र फस्त झाला. चिमाजीची पेशवेगिरी अल्पकालीन कशी झाली तो प्रकार पुढील प्रकरणीं सांगण्यांत येईल.

---

# प्रकरण दुसरें

## महाडचें कारस्थान व नानास कैद

### स. १७९६-९७

**महाडास बसुनी नानांनीं बेत ठरविले ।**
**बाळोबास शिंद्यांकडून कैद करविलें ॥** प्रभाकर.

१ निजाम इंग्रजांचें नानास साह्य. २ बाळोबा तात्यावर नानाची मात.
३ बाजीरावास पेशवे पदप्राप्ति. ४ नानाचा जम बसण्याची अशक्यता.
५ तुकोजी व मल्हारराव होळकरांचे मृत्यु, सिंद्याची जबरदस्ती.
६ नानाफडणिसास कैद.

**१ निजाम इंग्रजांचें नानास साह्य.**—फौजेचा दांडगा खर्च भागविण्यासाठीं सिंद्यास पैशाची मोठी अडचण होती, ती भागविण्याकरितां चिमाजी आपास वस्त्रें झालीं त्याच्या तिसऱ्याच दिवशीं निजामावर स्वारी करण्यासाठीं चिमाजीकडून सिंद्यांनीं निरोपाचीं वस्त्रें घेतलीं. तथापि पावसाळा नजीक आल्यामुळें निजामाच्या स्वारीची ही केवळ दिखाऊ दहशत होती. इकडे सिंद्यांशीं कबूल केलेल्या शर्ती नानानें पाळल्या नाहींत. त्यानें जवळ बरीच फौज जमविली. किल्ल्यांच्या सोडचिठ्ठ्या दिल्या नाहींत; आणि भोसले व निजामअली यांजकडे राजकारण चालविलें. खर्ड्याच्या तहाची कलमें उगवून घेण्यासाठीं सिंद्यानें निजामावर स्वारी करण्याचें ठरविलें. त्यास नानानें पाठिंबा देण्याचे ऐवजीं उलट निजामाशींच त्यानें दोस्ती केली. ह्या गोष्टी भाऊ व बाळोबा ह्यांस फारच असह्य झाल्या, म्हणून त्यांनीं नानास लकडा लाविला कीं तुम्ही मेणवली सोडून टोक्यास जाऊन राहवें, व पावसाळ्यानंतर काशीस जावें. ही

व्यवस्था अमलांत आणण्यासाठीं पुनः भाऊचे वकील नानाकडे मेणवलीस गेले. त्यांस नानानें कळविलें, आम्ही राजकारण करीत नाहीं. आम्हास मेहेरबानी करून येथेंच तूर्त राहूं द्यावें. ही गोष्ट भाऊ व बाळोबा कबूल करीनात. टोक्यास गेल्यास तेथें सिंद्यांकडून उपसर्ग होणार नाहीं, अशी हमी भाऊनें घेतली. पण ह्या संबंधानें नानास भाऊचा जास्तच संशय येत चालला. भाऊनेंसुद्धां टोक्यास जाण्याची त्यास निकड लाविली· आणि मेणवलीहून त्यास आणण्यासाठीं सिंद्यानें पुण्याहून पलटणें रवाना केलीं. तीं जाण्यापूर्वीं आपणच नानाची समजूत करून त्यास टोक्यास आणावें, अशा विचारानें परशुरामभाऊनें आपला वडील पुत्र महादाजीपंत दाजी यास चार हजार फौज देऊन नानाकडे पाठविलें. तेव्हां नानास भास झाला कीं, भाऊच आपणास पकडून कैद करणार. सारांश नानाची जितकी म्हणून भाऊनें काळजी घ्यावी, तितका त्यास जास्तच वहीम येत गेला. महादाजीपंत येतो असें ऐकतांच ता. ४ जून रोजीं रात्रीं नानानें एकदम मेणवली सोडून रायगडाकडे प्रयाण केलें. जातांना वाटेंत महाबळेश्वराचे घाट लागले तेथें ठिकठिकाणीं चौक्या बसवून व घाट तोडून वाटा बंद केल्या. सावकार दादा गद्रे हा रायगडचा अंमलदार नानाचा मेहुणा होता. त्यानें तेथें नानाची व्यवस्था उत्तम केली. किल्ल्याखालीं पाचाड येथें नानाचा मुक्काम तीन दिवस होता. तेथें नानास असा संशय आला कीं, दादा गद्रे याच्या बायकोकडे सिंद्याची फितुरी चालू आहे. त्यावरून त्या बायकोस किल्ल्यावरून काढून देऊन वर आपल्या विश्वासाचे लोक भरून मग नाना तेथें राहवयास गेला. पण पावसाळा सुरू झाल्यामुळें तेथील सर्द हवा नानास मानेना, म्हणून दोन दिवस किल्ल्यावर राहून नंतर लगेच तो महाडास गेला. या वेळीं चिंतोपंत देशमुख हा गृहस्थ नानाबरोबर होता. आतां पावसाळ्या पुरती तरी नानास महाड येथें निश्चिन्ति मिळाली. ता. १० जून पासून ता. १० नोव्हेंबर पावेतों पांच महिने नानाचा मुक्काम महाडास झाला, त्या अवधींत त्यानें आपलें बुद्धिसर्वस्व खर्च करून प्रचंड उलाढाली केल्या; आणि नानाविध कारस्थानें रचून आपल्यावर आलेला डाव त्यानें परत बाळोबा व परशुरामभाऊ यांजवर उलटवून बाजीरावास पेशवे पदावर आणिलें. या राजकारणास महाडचें कारस्थान असें म्हणतात. महाडाहून रघूजी भोसले, निजामअली व इंग्रज यांच्याशीं संधान करून नानानें आपला पगडा पुण्यास बसवून सिंद्यावर तात्पुरती मात केली, परंतु त्यामुळें चुरस वाढून सिंद्यानें पुनः नानास कसें गोत्यांत आणिलें तो प्रकार उत्तरोत्तर व्यक्त होईल.

दौलतराव सिंदे या वेळीं सोळा वर्षांचा लहान असला तरी स्वतःचा मतलब साधण्यांत पूर्ण तरबेज असून कोणाही कारभाऱ्याचे मुठींत वागणारा नव्हता. पैसा हें त्याचें मुख्य दैवत. पैसा ज्या ज्या साधनांनीं मिळूं शकेल तीं तीं सर्व साधनें उपयोगांत आणण्यास तो बिलकूल कचरणारा नव्हता. मात्र त्यास मराठी राज्याच्या परिस्थितीची व बाहेर टपत बसलेल्या शत्रूंची यत्किंचित् कल्पना नव्हती. फौजेच्या जोरावर आपण पाहिजे तें करूं शकूं अशी त्याची कल्पना असून, जे कारभारी पैशाच्या कामीं त्यास अनुकूल ते तो जवळ करी. बाळोबा तात्या हुशार असून परिस्थिति जाणणारा होता. त्याची मुख्य भिस्त स्वजातीय सेनानायकांवर असल्यामुळें बाळोबाचा हा शेणवी मंडळीचा पाठिंबा मोडून काढणें व त्याकरितां कारस्थानें रचणें ही कामगिरी नानानें महाडास बसून केली. ह्यामध्यें शेणवी मंडळीचा तर चुराडा उडालाच, परंतु त्याजबरोबर मराठी राज्याचाही अंतीं नाश झाला.

सिंदे पैशासाठीं निजामावर स्वारी करणार म्हणून त्या उभयतांत सडकून वैरभाव उत्पन्न झाला आहे, ही गोष्ट नानास चांगली ठाऊक होती. मॅलेटच्या मनांत नानाबद्दल चांगला आदर असून त्याचे मार्फत नानाचा प्रवेश मुंबईकर इंग्रजांकडे होताच. महादजीच्या वेळेपासून किंबहुना टिपूवर त्रिवर्गांची स्वारी झाली तेव्हांपासून नाना व इंग्रज यांची बळकट गट्टी जमली होती. या गट्टीचें आणखी एक कारण असें होतें कीं, सिंद्यानें फ्रेंच सैनिकांच्या हाताखालीं कवाइती कंपू तयार केल्यापासून त्याजबद्दल इंग्रजांचे मनांत मोठी धास्ती उत्पन्न झाली. इंग्रजांच्या फौजेपेक्षांही सिंद्याची फौज वरचढ होती. तसेंच सिंद्याचे ताब्यांत सर्व उत्तर हिंदुस्थान असल्यामुळें तिकडे त्याचा वचक बसून तेथील सर्व उत्पन्न त्यास अविच्छन्न मिळे, ही गोष्ट इंग्रजांच्या डोळ्यांत शल्या सारखी सलत होती. तशांत युरोपमध्यें नेपोलियनचा बोलबाला होऊन फ्रेंचांची सरशी होऊं लागली, त्याबरोबर हिंदुस्थानांतही इंग्रजांचें धाबें दणाणूं लागलें. अर्थात् सिंदे व निजाम यांचे फ्रेंच अंमलदार त्यांचे डोळ्यांत सारखे खुपूं लागले. वास्तविक ही भीति अवास्तव होती. इकडील संस्थानिकांस फ्रेंच व इंग्रज असा भेदभाव मुळींच वाटत नव्हता. सिंद्याच्या किंवा निजामाच्या फौजेंत इंग्रज अंमलदारांचाही भरणा कांहीं कमी नव्हता. सिंद्यांची फौज इंग्रजांचे डोळ्यांत खुपते ही गोष्ट नाना चांगली जाणून होता; आणि हल्लीं खुद्द त्यावरच या फौजेचा प्रयोग होऊं लागल्यामुळें त्यास इंग्रजांची कास धरण्याची बुद्धि झाली. खर्ड्याच्या लढाईपासून सुमारें वर्षभर मॅलेट मुंबईस होता, तेथून तो परत येतो तोंच नानास पुणें सोडावें लागलें, म्हणजे नाना महाडास असतां मॅलेट पुण्यास

राहून त्याची साथ मुंबईकरांकडे करीत होता. कोणास कळूं न देतां कारस्थानें रचून ठिकठिकाणचीं संधानें राखण्यांत नानाची बरोबरी करणारा दुसरा मुत्सद्दी क्वचित्‌च सांपडेल. परशुरामभाऊ व बाळोबा पागनीस यांस नानाच्या पाताळयंत्री कारस्थानांची बातमी लागली नाहीं. बाळोबाचे मनांत तर नानास एकदम पकडावें असें होतें, आणि परशुरामभाऊनें त्याचा बचाव केला नसता तर नानाची रवानगी पूर्वींच एखाद्या किल्ल्यावर बाजीरावासमवेत झाली असती. नानानें या वेळीं मुद्दाम नम्रता धारण करून कालहरण केलें, आणि अगदीं जिवावर बेतली तेव्हांच सन १७९६ चा पावसाळा गांठून महाडास प्रयाण केलें. बाळोबास पाडण्याचा डाव न साधला तर त्यानें महाडाहूनच मुंबईकर इंग्रजांकडे संधान बांधून आपल्या बचावाची तजवीज करून ठेविली होती.

ज्या इंग्रजांनीं रघुनाथरावास जरूर नसतां सुरतेस आश्रय दिला तेच इंग्रज नानासारखा मोहरा आपल्या घरीं चालून येत असेल तर त्याचा अव्हेर कां करतील ! नानानें या वेळीं पुण्याहून महाडास पळून जाण्याची जी तालीम करून दाखविली तीच पुढें सहा वर्षांनीं खुद्द बाजीरावानें खरी केली, हें ध्यानांत ठेवण्या जोगें आहे. यांत नानाचा कदाचित् वर्ष दोन वर्षें बचाव झाला असेल, पण आपण आपल्या ह्या कृत्यानें मराठी राज्याची शक्ति नाहींशी करीत आहों ही गोष्ट नानाचे लक्षांत आली नसेल असें कोणी म्हणावें ? इंग्रजांचा आश्रय करण्यांत राज्याच्या कल्याणापेक्षां आपला अधिकार त्यास जास्त प्रिय वाटला. नाहीं तर अधिकार सोडून तो जर सिंद्यास आरंभींच येऊन मिळता आणि चिमाजी आपाचे स्थापनेस मदत करता तर नाना, बाळोबा व परशुरामभाऊ या तिघांचें शहाणपण आणि सिंद्याचें लष्करी सामर्थ्य यांचा उत्कृष्ट मिलाफ मराठी राज्यास लाभून बाजीराव दूर राहिल्यानें तें राज्य जास्त काल टिकलें असतें, असें वाटल्याशिवाय राहत नाहीं.

पटवर्धनी दप्तरापलीकडे नानाच्या महाड येथील कारस्थानाचे लेखी कागद फारसे उपलब्ध नाहींत. यावरून त्याचे धागे दोरे कागदांवर न लिहितां तोंडीं निरोपांवर रचलेले असावे असा अंदाज होतो. सिंदे आपल्यावर स्वारी करणार म्हणून निजामानेंही त्यास तोंड देण्याची तयारी केली; आणि रेमंडच्या हाताखालीं बरीच मोठी फौज बेदर येथें सिद्ध करून त्यांतलीं कांहीं पलटणें पुण्याच्या सरहद्दीकडे रवाना केलीं. हें पाहून सिंद्यानें आपला आणखी एक कंपू उत्तरेंतून पुण्यास मागविला; आणि त्याचा अंमलदार ड्रुप्रेट हाच पुढें सिंद्याच्या इकडील फौजेचा अधिकारी झाला; आणि मुख्य

सेनाध्यक्ष पेरोन हिंदुस्थानांत राहिला. निजाम व त्याचा पुण्यांतील दिवाण मुशीरुन्मुल्क, इंग्रज, बाजीराव, कोल्हापुरकर छत्रपति, जंजिरेकर हबशी, टिपू सुलतान, नागपुरकर रघूजी भोसले या बाहेरच्या आणि खुद्द पुण्यांतील हुजरातीचा अंमलदार बाबा फडके व तुकोजी होळकर इतक्यांशीं नानाचें संधान चार महिने चालून तें दसऱ्याचे सुमारास परिपक्व झालें. मानाजी फाकडे, बजावा शिरोळकर, सर्जेराव घाटगे, बाळोजी कुंजर इतके व आणखी नानाचे पुष्कळच हस्तक ठिकठिकाणीं राहून या कारस्थानाची सिद्धता करीत होते. शिवाय आणखी लहान मंडळी यांत पुष्कळ खपत होती. कारस्थान या दृष्टीनें नानाच्या या उद्योगास त्याच्या आयुष्यांतील सर्व प्रसंगांत प्रथम पद दिलें पाहिजे. जूनचे आरंभीं सिंद्यानें आपला एक कंपू निजामाचा परिंडा किल्ला काबीज करण्याकरितां रवाना केला; परंतु किल्ल्याच्या जवळ आल्यावर कंपूस बातमी कळली कीं, निजामाची व इंग्रजांची फौज आपणावर चालून येणार. त्यावरून सिंद्यानें आपला कंपू लगोलग परत बोलाविला. निजामाशीं व इंग्रजांशीं केलेल्या नानाच्या दोनही मसलती बाळोबास उमगल्या. जंजिरेकर हबशानें नानास आसरा दिला आहे असेंही त्यास कळलें. तेव्हां तो म्हणाला, 'काय चिंता आहे ! दोघांचेंही पारिपत्य करूं. टिपूची फौज आल्यास तिचा बंदोबस्त परशरामभाऊंनीं करावा. इंग्रज व निजाम आम्ही पाहून घेऊं.' इंग्रजांनीं मॅलिटचे मार्फत सिंद्याशीं बोलणें लाविलें कीं, नाना कारभारांत नको असतील तर नका घेऊं, परंतु त्यांना मेणवलीस अथवा मर्जीस येईल तेथें राहूं देण्याचें ठरलें असतां, तुम्ही त्यांना पकडावयाकरितां फौज रवाना करितां याचा अर्थ काय ? तुम्ही त्यांचे वाटेस जाऊं नये. ते फंदफितूर करणार नाहींत अशी हमी पाहिजे तर आम्ही देतों. नाना फडणीस यांनीं इंग्रजां जवळ साह्याचें बोलणें लाविलें तेव्हां त्यांनीं उत्तर दिलें कीं, पूर्वीं दादासाहेबांनीं राज्यांतील सहा आणे मुलूख इंग्रजांस देण्याचा करार लिहून दिला आहे, तसा तुम्हीं द्यावा. त्यावर नाना म्हणाले 'आम्ही केवळ कारभारी, असा करार लिहून देणार आम्ही कोण ?' त्यावर इंग्रजांनीं कळविलें, कीं 'दादा साहेबांनीं ५७ लक्ष रुपये कर्जाचें खत लिहून दिलें आहे; त्याचा ऐवज तुम्ही द्यावा.' 'कारभार हातीं आल्यावर कर्जाचा ऐवज देऊं,' असें नानानें कबूल केलें. तेव्हां ठाण्याचा किल्ला नानास राहण्यासाठीं इंग्रजांनीं खालीं केला. सिंद्याचें मुख्य सामर्थ्य दिल्लीचे प्रदेशांत होतें व बादशहा त्याचे कबजांत होता. तें सामर्थ्य नाहींसें करण्याकरितां इंग्रजांनीं तिकडच्या सरहद्दीवर आपली फौज जमविली आणि सिंद्यास धाक घातला. या सर्व गोष्टी नानाचे चिथावणीनें झाल्या. त्यामुळें सिंदे, बाळोबा व भाऊ नानावर अत्यंत संतप्त जाहले.

या वेळीं खुद्द परशुरामभाऊ मात्र चहूंकडे राज्यहिताचे दृष्टीनें वर्तत होता असें दिसतें. बाळोबासही तीच दृष्टि होती, परंतु नानाचे द्वेषाची भावना त्याचे ठिकाणीं तीव्र वसत असल्यामुळें फौजेच्या बळावर नानास सडकून नरम करावा, अशी त्याची इच्छा होती. आतां खुद्द सिंद्याचे घरांत नानानें फोडाफोड कशी केली ती पाहिली पाहिजे.

दौलतराव सिंद्यास तर राज्याचा किंवा राजकारणाचा गंधच नव्हता. पैसा मिळाला कीं तो संतुष्ट असे. फोजेचे खर्चाचा लकडा पाठीवर असला म्हणजे तो अगदीं वैतागून जाई. त्यामुळें जिकडून पैशाची आशा दिसे तो मार्ग त्यास पसंत वाटे. राज्य म्हणजे काय व त्याचे बंद कोणीकडे पसरलेले आहेत हें त्यास कळत होतेंसें दिसत नाहीं. तथापि इंग्रज निजामास सामील होणार हें त्यास दिसतांच इंग्रजांचा तडाखा ओळखून त्यानें परिंड्यावर गेलेला कंपू परत बोलाविला. अशा चिडखोर स्थितींत मनांतला राग कोणावर तरी काढण्याची उत्कंठा दौलतरावास उत्पन्न झाली. सवाई माधवरावाच्या मृत्युपासून आज आठ महिन्यांत अनेक करार झाले, अनेक उलाढाली झाल्या, पण सिंद्याचे पदरांत एक पै सुद्धां जास्त पडली नाहीं. अद्यापि त्या संबंधांत पहिला दिवस कायम होता. ही दौलतरावाच्या मनाची चलबिचल ओळखून नानानें पैसे चारलेल्या कित्येक इसमांनीं त्या तरुण सिंद्याचे मनांत कारभारी बाळोबा व शेणवी मंडळ यांजविषयीं वैषम्य भरविलें.' आबा चिटणीस तर खुद्द नाना जवळच होता. रायाजी पाटील व रामजी पाटील हे अगोदरच थोडे बहुत नानाचे पक्षपाती असून हल्लीं बाळोबाचे करभारांत मागें पडले होते. त्यांनीं सिंद्याचे मनांत बाळोबाविषयीं सडकून वाकडें भरविलें. तुम्ही नानाचे मर्जीविरुद्ध वागून चिमाजी आपास आणल्यामुळें राज्यांत केवढा अनर्थ माजला आहे पहा. नानास इंग्रज, निजाम व भोसले यांचें पाठबळ आहे. सातारचे छत्रपति त्यांचे मुठींत. अशा चोहोंकडून चाललेल्या विरोधास तोंड देण्याचें सामर्थ्य आपणांस आहे काय ? अशा स्थितींत आपल्या सरदारीचा मात्र चुराडा उडणार, याचा विचार कसा तो करा. तरी आतां झालें एवढें पुरें. या शेणवी मंडळीचा नाद सोडून तुम्ही नानाचे तंत्रानें वागा, म्हणजे सर्व कांहीं यथास्थित होईल.' महादजी सिंद्याची राख केशरी म्हणून नानाचे ओळखीची होती, ती उज्जनीस राहत असे. तिच्या मार्फत नानानें दौलतरावास बोध करविला कीं, नानास सोडून कारभार कराल तर तो तुम्हास जाचक होईल. ही गोष्ट दौलतरावास पटली, आणि त्यानें नानांशीं गुप्तपणें बोलणें सुरू केलें.

खुद्द सिंद्याचे छावणींत बाजीराव होता त्यानेंही आपल्या परी बाळोबा विरुद्ध खटपट करण्यास कमी केलें नाहीं. त्याचे सर्व गुण त्या वेळीं लोकांस स्पष्ट कळलें

नसल्यामुळें त्याबद्दल सामान्य लोकमत पुष्कळसें अनुकूलही होतें. चिमाजी लहान व अप्रबुद्ध असल्यामुळें, आपणास अधिकार पाहिजे म्हणून या कारभाऱ्यांनीं हवा तो खेळ चालविला आहे, अशी सामान्य समजूत बाहेर झाली. शिवाय चिमाजी आपास पेशवाईवर आणतांना बाळोबा व भाऊ यांनीं असा ठराव केला होता कीं, बाजीराव व अमृतराव यांस कुटुंबसह अशीरगडावर अटकेंत ठेवून त्यांचे खर्चास झांशीचा अगर गुजरातेंत पांच लक्षांचा प्रदेश तोडून द्यावा. तदनुसार अमृतरावास जुन्नराहून आणण्यासाठीं फौज रवाना झाली आणि बाजीरावाचीही रवानगी प्रथम जांबगांवास होऊन तेथून पुढें बऱ्हाणपुराकडे व्हावयाची होती. बाजीरावानें आपण जाणार नाहीं असा हट्ट धरिला. पुढेंही आपणास जन्मभर अटकेंतच राहवें लागणार हा विचार त्यास दुःसह होऊन तो म्हणूं लागला, मी जीव देईन, पण बाहेर जाणार नाहीं. तथापि तूर्त त्याची रवानगी जांबगांवास झाली. त्याचे खर्चासाठीं जहागिरीच्या सनदा तयार होण्यास थोडा अवधि लागला, नाहीं तर त्याचें प्रयाण लगेच झालें असतें.

या वेळीं मुशीरुन्मुल्काचें बोलणें आपणांस कैदेंतून सोडावें म्हणून पुणें दरबाराशीं चालू होतें. इंग्रज व निजाम यांचा जोर झाल्यास त्यांचें निराकरण करण्याचें साधन आपले हातीं असावें असें बाळोबा तात्यानें मनांत आणून त्या कामीं मुशीरुन्मुल्काचा उपयोग करून घेण्याचें त्यानें ठरविलें; आणि त्याच्याशीं करार केला कीं, तुम्हीं सिंद्यास कांहीं दंड द्यावा म्हणजे तुमची सुटका करूं. मात्र परत गेल्यावर खर्ड्यांचे तहांत ठरलेली रक्कम निजामअलीकडून तुम्हीं वसूल देववावी. या वेळीं गोविंदराव काळे हैदराबादेस असून त्याचा हस्तक गोविंदराव पिंगळे पुण्यास होता. दोघेही नानाच्या पक्षांत वागणारे होते. बाळोबानें गोविंदराव पिंगळ्याचे मार्फत मुशीरुन्मुल्काकडे बोलणें करून निजामाचा वकील रघूत्तमराव यास पुण्यास आणविलें. रघूत्तमरावानें बाळोबास आश्वासन दिलें कीं मुशीरुन्मुल्क यास सोडा म्हणजे आम्ही पूर्वींचे सर्व करार पुरे करून देतों. अशा रीतीनें करार पुरा होऊन बाळोबा व परशुरामभाऊ यांनीं ता. ५-६-१७९६ रोजीं मुशीरुन्मुल्कास कैदेंतून मुक्त केलें. त्यांचा उद्देश एवढाच कीं या कृत्यानें निजामअली खूष होऊन तो नानाचें कारस्थान मनावर घेणार नाहीं. पण परिणाम मात्र याच्या उलट झाला. निजामाचे दरबारीं बाळोबापेक्षां नानाचा वचक मोठा होता. त्याचा हस्तक गोविंदराव काळे नानाचे हेतु सिद्धीस नेण्याची शिकस्त करीत होता. त्याचे मार्फत नानानें मुशीरुन्मुल्काशीं एक गुप्त ठराव केला; आणि त्यास पैसे देऊन

त्याजकडून खुद्द पुण्यांतच कांहीं फौज उभारली. त्यासाठीं मुशीरुन्मुल्क पावसाळ्याचे महिने पुण्यासच राहिला. हा सगळा खेळ गोविंदराव काळे घडवीत होता. पुण्यास कारभाऱ्याशीं, महाडास नानाशीं, व हैदराबादेस निजामाशीं भिन्न कारस्थानें चालवून त्यानें पुष्कळ घोळ उत्पन्न केला. मुशीरुन्मुल्क म्हणजे निजामाकडील प्रतिनानाफडणीस. एकंदरींत त्यानें जेवढा अपाय मराठी राज्यास केला, तेवढा दुसरा कशानेंही झाला नसेल. आपल्या धन्याची प्रतिष्ठा वाढवून पेशवाई शक्य तितकी हलकी करावयाची एवढेंच त्याचें ध्येय होतें. अर्थात् त्यास या अडचणीच्या वेळीं मुक्त करून पुण्यांत उभें केलें ही बाळोबा व भाऊ यांची चूकच होय. तसेंच नानानेंही त्याजला भर देण्यांत स्वतःच्या मतलबाखेरीज राज्याचें हित तें काय केलें ! महाडास दृष्टिआड बसून हीं कारस्थानें खेळविलीं गेलीं त्यामुळें नुकसान झालें: ठासून पुण्यास बसून कारभाराचा जम नानानें बसविला असता तर वेगळा परिणाम झाला असता. गोविंदराव पिंगळ्याच्या मार्फत नानानें महाडाहून निजामाशीं निराळाच करार केला.* ‘ पंतप्रधानाचे दौलतींत बखेडा मनस्वी झाला. आपण कोंकणांत महाडास गेलों. पुढें दौलतीचा बचाव तें करावें असें मनांत येऊन अजीमुल्उमरा ( मुशीरुन्मुल्क ) यांचे विद्यमानें निश्चय झाला कीं गैर समजुतीनें कसूर जाला असेल तो मनांत न आणितां आजपर्यंत जालें तें जालें, पुढें हजरतीशीं स्वच्छ अंतःकरणें वर्तणूक करूं. उभयतांनीं एकमसलतीनें व एक विचारें वर्तणूक करावी. दोनही दौलतींस जोरकस चांगलें तें उभयतांचे विचारें व मसलतीनें अमलांत येईल. त्यांत तफावत हरगीज होऊं नये. तफावत करील त्यास त्याचे दिल-इमानाची कसम व शपथ असे. करारांतील कलमें:—

( १ ) निजामाची १५००० फौज नाना व रघूजी भोसले यांचे मदतीस येऊन त्यांनीं बाजीरावाची स्थापना करावी.

( २ ) इंग्रजांची मदतही या कामीं आणावी;

( ३ ) खर्ड्यांच्या तहांत घेतलेला निजामाचा प्रदेश व दंड परत द्यावा.

---

* १ त. क. म. पृ. २२ सनद १० ता. ७–१०–१७९६. येथें सर्व कलमें उतरून घेतलीं नाहींत. जरूरीपुरताच मजकूर दाखल केला आहे. असाच करार भोसल्याशीं केल्याचा उल्लेख त. क. म. पृ. १४७ यांत आहे. हाच करार पुढें ता. २४–३–१७९७ रोजीं बाजीरावाकडून पुरा झाला. पहा १०. ४४६.

(४) दिल्लीजवळचा कांहीं प्रदेश निजामाचा समजावा.

(५) निजाम पेशव्यांमधील वादाचे मुद्दे एकमेकांनीं सोडून द्यावे आणि निजामानें दरसाल चौथाईची रकम देत जावी.

(६) बेदरसुभा हें पेशव्याचें खासगी वतन समजलें जातें तें सोडून देण्याची शिफारस नानानें बाजीरावास करावी.

(७) निजामलीचे खर्चास नानानें दोन लाख रु. द्यावे.

(८) निजामाचे मुलखावर टिपूनें चाल केल्यास, नानानें इंग्रजांची मदत आणून बंदोबस्त करावा.

(९) निजामाकडून पळून आलेले इसम पेशव्यानें परत हवालीं करावे.

(१०) हा करार नानानें बाजीरावाकडून मंजूर करून द्यावा.

या महाडच्या तहाचा उल्लेख वसईचे तहांत असून दोहोंचें पर्यवसान एकच होतें. "सिंद्याचे कारभारीं बाळाजी अनंत वगैरेनीं गैर रीत करून परशराम रामचंद्र यांस आपले संमतांत घेऊन बाजीरावांस अटकेंत ठेविलें आहे, त्यास निजामसरकारची फौज, पेशव्यांची हुजरात, व रघूजी भोसले यांनीं एक होऊन बाजीरावांस एक जागां करावें. अजमुल् उमरावांनीं जंगी सरंजामानें मसलतीस शरीक असावें. कंपनी इंग्रज बहादुर या मसलतीस शरीक होतील. निदान शरीक न जाल्यास प्रतिकूलता तरी त्यांजकडून व्हावयाची नाहीं, याची मजबुदी दोस्तदारानें (=नानानें) केली असे. निजाम सरकारचा मुलूक, दौलताबादचा किल्ला वगैरे व नगदी ऐवज एकंदर देण्याचा करार खर्ड्यांचे मुकामीं जाला तो समग्र मुलूक व किल्ला व नगदी ऐवजाचे दस्तैवज माघारे देऊं; व पेसजी यादगीरचे मुकामीं स. १७८५ त तहनामा जाला त्याप्रमाणें पुढें चालावें. टिपूची फौज नमूद होऊन आल्यावर त्याचा बंदोबस्त इंग्रजांकडून व निजामाकडून व्हावा. या करारावर श्रीमंतांचे हातचें दस्तक करून देऊं. दोनही दौलतींच्या दरम्यान बिघाड कोणी कितीही समाजाविल्यास मनांत येऊं नये. वरचेवर स्वच्छता करीत जावी. कोणी बखेडखोर उभा राहिला तर दोघांनीं एक होऊन निराकरण करावें. एकूण कलमें सुमारें चौदा."

हा करार गोविंदराव पिंगळ्यानें कसा घडवून आणिला त्याचें वर्णन नागपुर बखरींत आहे. या कागदावरून नानाच्या कारस्थानाची स्पष्टता होते. इंग्रजानें नानास आपल्या बाजूस वळविलें होतें ही गोष्ट त्यांतच नमूद आहे. टिपू व रघूजी भोसले यांजकडेही नानानें असेंच संधान जमविलें. वस्तुतः या करारानें कोणाचा फायदा

होणारा असेल तर तो निजामाचा होय. दौलताबादचा किल्ला परत देणें म्हणजे सर्व पेशवाईचा उद्योग उखडून काढणेंच होय. खर्ड्यांच्या स्वारींत मिळविलेली किफायत नानानें आपण होऊन सोडून दिली, आणि त्याजबद्दल फायदा काय तर बाजीरावास पेशवाईवर आणणें आणि नानाचा कारभार कायम टिकणें. पैकीं बाजीराव पेशवाईवर आल्यामुळें राज्याचा फायदा बिलकूल नव्हता, आणि नानाचा कारभार टिकणें बाळोबाशीं संगनमत करूनही शक्य झालें असतें. तेव्हां असला हा करार करून नानानें स्वराज्याची सेवा काय केली याचा कयास ज्याचा त्यानें करावा.

वरील करार घाटत असतांच मश्रूल्मुल्कचें पुण्यास तात्याभाऊंशीं रघूत्तमरावामार्फत बोलणें चालू होतें. जिकडून आपला फायदा जास्त ती गोष्ट तो करीत होता. इंग्रजांची दृष्टि सुद्धां अशीच मतलबाची म्हणजे पुण्यांतील अडचणीचा फायदा घेऊन आपलें बळ वाढविण्याची होती. खालील ता. १७-७-१७९६ चें वर्तमान पहा. ' महाडाहून कारकून व माणसें मुंबईस इंग्रजांकडे गेलीं आहेत. त्यांजकडे बोलणें मनसब्याचें पडलें आहे. त्यास इंग्रजांनीं जाब दिला, कीं सर्व हकीगत कलकत्त्यास लिहिली आहे. तेथून हुकूम येईल तसें करूं. इंग्रजांची तऱ्हा निराळीच. महाडाकडे लक्ष म्हणावें तरी नाहीं, शिंद्याकडे खचित आहे म्हणावें तरी नाहीं. ' नानास इंग्रजांचें नैतिक पाठबळ आज कैक वर्षें मिळत असून हल्लीं महाडाहून त्याचे कारकून मुंबईस गेले, त्यानंतर इंग्रजांनीं साष्टीचा किल्ला आपला माल बाहेर काढून नानासाठीं रिकामा केला. तदनंतर त्यांचीं पल्टणें मुंबई, कलकत्ता, लखनौ वगैरे ठिकाणीं जमा झालीं, आणि ते दिल्लीवर चालून येणार हें ऐकून सिंद्यांचा सेनापति पेरॉन दिल्लीचे बंदोबस्तास गेला. या गोष्टीचा अर्थ असा, कीं नानाच्या चिथावणीनें इंग्रज आपल्यावर उठणार अशी दौलतरावाची खात्री झाली. इंग्रजांच्या मदतीशिवाय पेशवाईची धडगत नाहीं अशी जर नानाची प्रामाणिक समजूत होती तर कॉर्नवॉलिसनें पूर्वी सुचविल्याप्रमाणें इंग्रजांशीं एकदम बचावाचा तह केला असता तर त्यांत राज्याचा फायदा जास्त झाला असता.

**२ बाळोबा तात्यावर नानाची मात.**—नानाच्या बुद्धिप्रभावानें बाळोबा तात्याचा कारभार ' दौलतरावास सगळीकडून जाचक होऊं लागला. त्यांतही खुद्द दौलतरावाचें मन नानानें आपल्या हस्तकांकरवीं बाळोबाविरुद्ध कसें कलुषित केलें हें वर सांगितलेंच आहे. या संबंधानें सिंद्याचीं खलबतें नानाशीं व बाजीरावाशीं सारखीं चालू होतीं. दौलतराव बाबांनीं त्रिवर्ग शेणवी कारभारी यांस आज्ञा केली कीं बाजीराव हट निग्रहास पडले. जांबगांवास जात नाहींत. आमचा ऐवज त्यांजकडून करारा-

प्रमाणे येत नाहीं. नाना हस्तगत झाले नाहींत त्यामुळें लौकिक वाईट झाला. याचा विचार कसा करावयाचा तो सांगा.' अशा रीतीनें सिंद्याचें बाळोबाशीं वैमनस्य वाढूं लागलें. तो बाळोबास म्हणूं लागला, 'तुम्ही आम्हांस जो कांहीं कोट दोन कोट पैसा मिळवून देणार तो तर दृष्टीस पडत नाहीं. उलट या कामीं इंग्रजांचा शह मात्र उत्पन्न झाला. बाजीरावास कैदेंत ठेवल्यामुळें दुर्लौकिक होतो. या गोष्टीचें निराकरण कसें करणार तें सांगा, असा दौलतरावाचा लकडा कारभाऱ्यांस लागला. अशा कैचींत असतां पैसा उत्पन्न करण्यासाठीं भाऊ बाळोबांनीं नानाच्या तर्फेची कामावर असलेली प्रमुख मंडळी दूर केली. नानाचा पैसा ठिकाठिकाणीं पेरलेला होता त्याचा सुगावा काढून त्या मंडळीस पकडून त्यांजपासून पैसा घेतला. रामचंद्र हरि ऊर्फ बाबा फडके व त्याचा दिवाण नारोपंत चक्रदेव यांजकडे हुजरातचा कारभार होता तो दूर करून त्यांस घरीं बसविलें. अर्थात् ते बाळोबाच्या विरुद्ध पक्षांत सामील झाले. एवंच सिंद्याचें मन बाळोबा विषयीं कलुषित होऊन अंतःस्थें नानाचें व दौलतरावाचें एक चित्त झालें. मात्र बाळोबा व भाऊ यांजमध्यें दुजाभाव बिलकूल नव्हता. उलट दूर महाडास बसून नानानें जीं कुलंगडीं चहूंकडे सुरू केलीं त्यामुळें भाऊचे मनांत नानासंबंधानें अत्यंत तिरस्कार उत्पन्न झाला.

बापू लेले वगैरे मंडळीच्या मार्फत नानानें सिंद्यास रकमा देऊं करून परशुराम भाऊस कारभारांतून काढावें आणि बाजीरावास पेशवाई द्यावी असा घाट सिद्ध केला. भाऊच्या साह्यामुळेंच बाळोबास पुण्यांत महत्त्व प्राप्त झालें; नाहीं तर एकट्या बाळोबाच्या हातून चिमाजी आपास पेशवाईवर आणण्याचें काम सिद्धीस गेलें नसतें. 'सिंद्यास नानानें २५ लक्ष रुपये देऊं केले. दहा पांच दिले. बाकी द्यावयाचे आहेत. मुशीरुन्मुल्कास ता. ६-८-१७९६ रोजीं बहुमान वस्त्रें होऊन परत जाण्यास सरकारचा निरोप जाला.' मानाजी फाकडे व हुजरातच्या लोकांनीं फितूर केला. परंतु बाजीरावास खूष ठेवण्याची सिंद्याची इच्छा असल्यामुळें मानाजीस अटक करणें युक्त वाटलें नाहीं. तो निजामाकडे जाण्याच्या मिषानें पुण्यांतून निघाला आणि रस्त्यानें लुटालूट करीत वाईस गेला. महाराष्ट्रांतील शिलेदारांवर त्याचें वजन पराकाष्ठेचें होतें. त्यानें नानाकडून पैसा आणून नवीन फौज तयार केली. या फौजेच्या बळावर तो बाजीरावास कैदेंतून पळवून नेणार होता. परंतु बाळोबास ती बातमी आगाऊ कळल्यानें त्यानें बाजीरावाची नजरकैद जास्त सख्त केली. असाच दुसरा एक कट नानाचे पैशानें सिद्ध झाला. बाबा फडके व नारोपंत चक्रदेव यांनीं

नानाकडून पैसा आणून तो हुजरातच्या लोकांस व होळकराच्या फौजेस वांटून त्या फौजांचें साह्य वेळेवर आपणांस मिळण्याची सिद्धता केली; आणि असा घाट रचिला कीं परशुरामभाऊस कैद करून बाजीरावास पेशवाईवर स्थापावें. हा फितूर उघडकीस येतांच भाऊ बाळोबांनीं तपास करून बाबा फडक्यास कैद केलें ( २८-९-१७९६ ), आणि चाकणचे किल्ल्यावर अटकेंत ठेविलें. इकडे मुशीरुन्मुल्कानें नारोपंत चक्रदेवास आपल्याच जवळ कैद करून ठेविलें. मतलब कीं आपण तुमच्याच बाजूचे आहों असें मुशीरुन्मुल्कानें बाळोबास भासविलें.

पैशाच्या बळावर नानानें चहूंकडे जीं कारस्थानें उभारलीं, त्यांत कोल्हापुर छत्रपतीकडील करारास अग्रपद द्यावें लागेल. चिकोडी व मनोळी हे दोन छत्रपतींचे परगणे कर्जफेडीसाठीं पटवर्धनांकडे दिलेले होते, ते आपले परत मिळावे अशी छत्रपतींस मोठी उत्कंठा होती. हें जाणून नानानें त्यांस सुचविलें कीं, तुम्ही आपले तालुके बेलाशक परत घ्या; आणि पटवर्धन आपली कर्जरकम मागतील तर तीही देऊं नका. परंतु नुसत्या एवढ्या सूचनेवर अवलंबून न राहतां करवीरकरांनीं नानाकडून करार लिहून घेतला, कीं "भाऊंनीं तुमच्यावर पुढें मागें स्वारी केल्यास, आम्ही तुमचा बचाव करूं." असा करार लिहून देऊन शिवाय फौज ठेवण्याकरितां छत्रपतीस दोन लाख रुपये रोख नानानें दिले. ही गोष्ट भाऊवरील सुडाच्या भावनेंत नानानें केली, ती पुढें सर्वांसच फार जाचक झाली आणि त्याच भानगडीमुळें पट्टणकुडीच्या लढाईत परशुरामभाऊचा शेवट झाला. 'करवीरकरांचें ध्यान हेंच दिसतें जे कांहीं निमित्त ठेवून गळीं पडून पटवर्धनास नेस्तनाबूत करावें.'

"बाजीरावानें सिंद्याचे अटकेंत असतां चिमाजी आपाचा छंद फार घेतला.* उपोषणें देखील केलीं. परंतु उभयतांची भेट करीनात. बाजीरावास परस्थळीं नेऊन कैदेंत ठेवावें असा निश्चय करून म्हणों लागले कीं तूर्त येथें बखेडा आहे, नानाचें पारिपत्य जाल्याउपरी तुमची गादी तुम्हांस देऊं. तूर्त आपण चार दिवस जांबगांवास जावें. त्यास बाजीराव बोलले कीं, तुम्ही आम्हांस आणलें, त्यापक्षीं येथेंच काय होणें तें होईल. आम्हां त्रिवर्गबंधूंस एकत्र करून मग चित्तास येईल तेथें ठेवावें. तों पर्यंत आम्ही येथून सुप्रवृत्तीनें जाणार नाहीं. म्हणून मांजरीच्या तळावर हट्ट धरून बसले. तेव्हां यांनीं बहुत अमर्याद तगादा केला, पाणी बंद केलें, तेव्हां निरुपाय म्हणून

* खं. १०. ४१५.

सिंद्यासीं उत्तर केलें कीं आम्हीं मरणास सिद्ध झालों असतां तुमच्या चित्तास येईल तेथें राहूं. मग दौलतरावांनीं शपथ वाहिली कीं तुमच्या पायाशीं दुसरा अर्थ आमचा नाहीं. महिना पंधरा दिवसांत सर्व बंदोबस्त करून आपण गादीवर बसतील अशी खातरजमा करून जांबगांवास वाटेस लाविलें. इकडे नानाकडे गोविंदराव बापूंची रवानगी केली. नानांनीं मसलत लढविली कीं पागनीस व परशुराम भाऊ यास धरावें, म्हणजे आम्हीं येतों. " बाजीरावावर नजर ठेवण्यासाठीं सर्जेराव घाटग्याची नेमणूक सिंद्याकडून होती, त्याचेच मार्फत बाजीरावाचें व नानाचें हें अंतःस्थ कारस्थान चाललें.

खुद्द दौलतरावाशींही रायाजी पाटलाचे मार्फत नानानें करार केला कीं, 'पागनीस यांस कैद करावें. बाजीराव यांस पेशवाईवर स्थापावें, आणि सिंदे यांनीं फौजेसुद्धां हिंदुस्थानास निघून जावें. म्हणजे १० लक्षांची जहागीर व नगरचा किल्ला त्यांस द्यावा, बाबा फडके यास ऐवज पाठवून हुजरात आपले लक्षांत घेतली. मानाजी फाकडे यास खर्चास पाठवून त्यांजकडून फौज जमा करवून आपले साह्यास वाईस आणिली. मालोजी घोरपडे व नीलकंठ रामचंद्र प्रभु भाऊंचे लक्षांत आले नाहींत. फौजसुद्धां निघोन वाईप्रांती गेले. बजाबा शिरवळकर यास महाडाहून नानांनीं पुढें वाईस पाठवून तजवीज चालविली.'

येणेप्रमाणें नानानें चहूंकडे पैशाची खैरात करून त्या सामर्थ्यानें आंत बाहेरचे सर्व प्रमुख लोक आपल्या पक्षांत आणिले, आणि सर्व सिद्धता झाल्यावर मग सिंद्याकडून बाळोबा तात्या व भाऊ यांस कैद करविलें तो प्रकार आतां सांगावयाचा आहे.

बाळोबा व भाऊ एकेका अडचणीस तोंड देत धिमेपणानें कारभार रेटीत होते. पुण्यांत चिमाजी आपाचा दसऱ्याचा समारंभ ता. ११ ऑक्टोबर रोजीं मोठा टोलेजंग झाला. चिमाजी आपाची मर्जी भाऊवर विशेष होती. स्वतः निवड करून त्यानें भाऊसाठीं दसऱ्याचा पोषाख पसंत करून दिला. दसऱ्यानंतर लौकरच नानास महाडाहून पकडून आणण्यासाठीं बॉयडचा कंपू व आणखी फौज रवाना करण्यांत आली. इतक्यांत इकडे सिंद्यानें बाळोबास कैद केलें त्याची हकीगत त्यानेंच नानास लिहून पाठविली ती अशी. " पूर्वीं आपलें आमचें पुण्याचे मुकामीं वचनप्रमाण झालें, त्यावर आम्हांकडील कारभारी यांनीं वाईट वर्तणूक करून श्रीमंतांशीं बेअदबी केली, व आमचे स्वच्छतेंत अंतर पाडून मनस्वी वांकडी चाल धरली, याजकरतां आम्हीं त्यांचा बंदोबस्त केला आहे. कारभाऱ्यांचे कारणामुळें परस्पर संशय आले असतील ते सोडावे. आम्हांकडून आपलें वाईट होणार नाहीं, व कोणी करूं लागल्यास नशियत करूं यांत

अंतर करणार नाहीं. येविशीं साहेबांची उदी व बेलभंडार व पाटीलबावांचे पायाची शपथ असे. " ( ता. २६·१०·१७९६ ).

शनिवार वाड्यावर चालून जाण्याची कामगिरी मशीरानें सिद्धीस नेली. तिला मिलाफी नारोपंत चक्रदेव त्याच्याजवळ होता. तारीख २७·१०·१७९६ रोजीं अरुणोदयास मशीरानें व होळकरानें आपआपल्या फौजा तयार करून श्रीमंतांचे वाड्यावर चालून गेले. ही बातमी आगाऊच भाऊस कळून ते आपल्या राहत्या वाड्यांतून सरकारचे वाड्यांत जाऊन मुख्यास पाठीशीं बांधून निघाले. त्यांजवर होळकराची चिकाटी बसली. पाठलाग सुरू केला. २–४ वार जाहले तैसे मारीत पर्वतीच्या तळ्यापाशीं आले. एक वार भाऊसाहेबांचे घोड्यावर बापू होळकरानें टाकला तो दुमचीवर लागला. मिरजेकडे गेल्यास परिणाम लागणार नाहीं असें समजून जुन्नराकडे पळून गेले. त्यांचे पाठीवर नारोपंत चक्रदेव सुद्धां मशीर व होळकराच्या फौजा चालून गेल्या. जुन्नरजवळ लढाई झाली तींत यशवंतराव होळकरानें भाऊचा पराभव केला. यशवंतरावाचा हा पहिला पराक्रम होय. नंतर चिमाजी आपास नारोपंत चक्रदेवाचे हवाल्यांत शिवनेरीच्या किल्ल्यांत ठेवून परशुरामपंत भाऊ माचीवर राहिले. तेथून माधवराव रास्ते यानें त्यास होळकराकडून आपणाकडे मागून घेतलें, आणि आपल्या ताब्यांतील मांडवगणचे किल्ल्यांत कैदेंत ठेविलें. कात्रजेवर भाऊचा कोट होता तो सर्व मशीरानें लुटून फस्त केला. तदनंतर नारोपंत चक्रदेवानें चिमाजी आपास जुन्नराहून पुण्यांत सिंद्यांचे गोटांत आणिलें.

" काल रात्रौ बाळोबा तात्या, धोंडीबा, सदाशिव मल्हार व पांडोबा लाड तोफखानेवाला यांजवर सरकारची गैरमर्जी होऊन चौक्या बसविल्या. कारभार रायाजी पाटील मनास आणीत आहेत. नारायणराव बक्षीस बोलावून नेऊन खातरजमा केली कीं तुम्हीं आपलें काम पहिलेप्रमाणें सरकार लक्ष ठेवून करावें. "+ वरील बातम्या नानास महाडास पोंचतांच तो तेथून निघून मेणवलीस व पुढें पुण्यास आला ती हकीकत आतां सांगावयाची आहे.

**३ बाजीरावास पेशवेपद प्राप्ति.**—त्या वेळचा कारभार म्हणजे सुळावरची पोळीच होय. बाळोबानें जीं कामें केलीं तीं सर्व दौलतरावास समजावून त्याचे देखत केलीं. त्याचे परोक्ष स्वतःचें असें कांहीं केलें नाहीं. तरी त्यास दौलतरावानें कैद

---

+ जी. च. ले २२६. भो. ब; ना. भो. का. ६२; ऐ. टि. १-४.

दाखविली. त्यानें लांच दिला नाहीं किंवा घेतला नाहीं. फंद फितूर किंवा घातपात केले नाहींत नानास बाजूस ठेवून चिमाजीस पेशवाईवर आणण्याची त्याची योजना सिंद्यानेंच अंगावर घेतली. आतां ती योजना फिरवायची होती तर चार दिवस बाळोबास बाजूस ठेवून कार्यभाग झाला असता. त्यांत बाळोबाचा अगर भाऊचा स्वार्थ असा कांहीं नव्हता. चिमाजी आपास पेशवाईवर ठेवणें कदाचित् राज्याच्या हिताचें झालें असतें. नाना फडणीसानें इतका खटाटोप करून तूर्त हा डाव जिंकला तरी त्याचाही परिणाम पुढें तसाच झाला.

इकडे बाजीरावाची रवानगी जांबगांवास झाली होती. बरोबर बंदोबस्तास सर्जेराव घाटगे होता, त्यास सिंद्यानें पत्र पाठविलें, कीं बाजीरावास परत घेऊन या. त्याप्रमाणें ते परत कोरेगांवास आले. तेथून बाजीरावानें नानास चिठ्ठी पाठविली कीं, आमची स्वारी कोरेगांवास आली. तुमचें येणें लवकर न जाहलें, त्यास तुम्हीं पुण्यानजीक सिंदे व मशीर या सुद्धां लवकर भेटीस येणें. सरकारचे हिताकरतां तुमचीं वचनें ज्यापाशीं गुंतलीं असतील तीं सरकारचींच वचनें अशा खातरजमेनें लवकर यावें. आपल्या विचाराखेरीज कांहीं एक घडावयाचें नाहीं. याच समयांत दौलतरावानें अमृतरावास जुन्नरहून व बाबा फडक्यास चाकणहून पुण्यास आणिलें. बाजीराव वगैरे त्रिवर्ग बंधूंच्या भेटी मुंढव्याचे तळावर सोमवार कार्तिक वद्य सप्तमीस झाल्या, ( ता. २१·११·१७९६ ).

चिमाजी आपास घेऊन परशुराम भाऊ निघून गेल्यावर त्रिंबक नारायण परचुऱ्यानें येऊन पुण्याचा बंदोबस्त केला. बहिरोपंत मेहेंदळे व त्याचा पुत्र अन्याबा आणि परशुराम भाऊ कडील लोक यांची धराधर करून घरें लुटलीं. शहर हवालदील झालें. बाळोबाचा बंदोबस्त होतांच सिंद्यानें नानास पत्र पाठवून पुण्यास बोलाविलें, तें पत्र असें.—

ता. ५·११·१७९६. ‘आपल्या सूचनेप्रमाणें बाजीरावाची स्वारी पुण्या नजीक येईल. आपल्या खातरजमेचें पत्र नबाबांनीं लिहिलें असे, व त्यांनीं हसनखान भाई व रघूत्तमराव यांस आपल्याकडे पाठविलें आहे. तरी आपण कोणे विशीं संशय न धरतां खातरजमेनें सत्वर पुण्या नजीक यावें, म्हणजे आम्ही व मशीर आपल्या भेटीस येऊन आपणांस घेऊन येऊं.’ त्याच तारखेचें पत्र नानाचें सिंद्यास आलें, कीं ‘आम्ही येथून फौजसुद्धां निघोन पुरंदरा नजीक जाण्याचा बेत केला आहे.’

नानानें रघूजी भोसल्यास आपले साह्यार्थ पुण्यास बोलाविलें होतें. गेल्या सालीं पुण्याहून परत गेल्यावर तो वऱ्हाडांत अकोल्याजवळ निर्गुणा नदीचे कांठीं आळेगांव

येथें छावणी करून राहिला होता. ‘ बाळोबा कैद झाले, आतां आम्ही पुण्यास येतों’ असें नानानें त्यास लिहून कळविलें, ( ता. २–११–१७९६ ), त्यापूर्वी भोसल्याचे हस्तक श्रीधर लक्ष्मण, कृष्णराव माधव चिटणीस व व्यंकटराव काशी पुण्यांत राहून यजमानाचीं संधानें राखीत होते. त्यांचेच मार्फत नानानें महाडाहून रघूजीचा मिलाफ करून घेतला, आणि नानाची सूचना जातांच तो आळेगांवाहून पुण्यास येण्यास निघाला, तो २५ नोव्हेंबर रोजीं म्हणजे नानाचे बरोबरच पुण्यास दाखल झाला.

या वेळीं पेशवेबंधूंचे मुकाम सिंद्याचे तळाजवळच खराडी येथें पृथक् होते. वाईहून नाना सासवडास आला. तेथून पुढें त्यानें आपला मुकाम पुलाजवळ येरंडवणें येथें आपले बागेंत ठेविला. तेथून १२ नोव्हेंबर रोजीं सिंदे होळकर व मशीर यांनीं पर्वतीजवळ जाऊन नानाची भेट घेतली. त्याच दिवशीं अस्तमानीं चिमाजी आपानेंही येऊन नानाची भेट घेतली. पुढें नानानें २६ नोव्हेंबर रोजीं हडपसरचे तळावर जाऊन बाजीरावाची भेट घेतली. त्या वेळीं प्रथम नाना व मग रघूजी भोसले, मशीर, होळकर व सिंदे अशा क्रमानें एकाच दरबारांत बाजीरावानें सर्वांच्या भेटी घेतल्या.

‘ नाना पुण्यास आले पण बाजीरावाचा भरंवसा नाहीं. याकरतां मशीर यास दरम्यान घेऊन निजामअलीस बाजीरावाची चिठ्ठी देवविली. त्यांतील मजकूर बाळाजी जनार्दन फडणीस यांस आम्हांकडून त्यांचे जिवास व अब्रूस अपाय होईल, येविशीं त्यांस संशय. यास्तव मशारनिल्हेची खातरजमा आम्हीं आपल्याकडून करविली. त्याप्रमाणें आपणही केली. त्याप्रमाणें त्यांजकडून आमचे जातीस, दौलतीस व पंतप्रधानीस व खावंदगिरीस व तेजास सबाह्याभ्यंतर वाकडें होऊं नये. पंत महसूफ आम्हांजवळ असेल अथवा सोईस न पडल्यास स्नानसंध्येस नियमाप्रमाणें निरोप दिला जाईल. त्यांचे ज्यानास व मालास व हुरमतीस वाकडे होणार नाहीं व चित्तांत येणार नाहीं. ’ याप्रमाणें चिठ्ठी देवविली. त्याजवरून नानाची खातरजमा होऊन कारभार त्यांचे विचारें होऊं लागला. येणेंप्रमाणें होऊन कार्तिक व. ११ ( २५ नोव्हेंबर रोजीं ) नानानें कारभार हातीं घेतला, त्या समयीं राज्यकारभाराचीं कलमें नानानें बाजीरावास लिहून दिलीं आणि प्रत्येक कलमाखालीं बाजीरावाची कबुली लिहून घेतली. तो लेख ३१·१२·१७९६ चा आहे.

महाडास जाऊन नानानें जें प्रचंड कारस्थान रचिलें तें मराठी इतिहासांत महत्त्वाचें गणलें जातें; आणि त्याबद्दल अनेकांनीं नानाची वाखाणणी केली आहे. खरे लिहितात, ‘मराठी राज्य काबीज करण्यासाठीं इंग्रज टपून बसले असतां राज्याचा कारभार आपल्या

हातीं राहिला तरच राज्यांत स्वस्थता नांदून त्याचा उत्कर्ष होणें शक्य आहे अशी नानाची समजूत होती, ती स्वार्थमूलक होती असें म्हणवत नाहीं. इंग्रजांच्या वर्चस्वाची आपत्ति टळावी व मराठी राज्याचें स्वातंत्र्य कायम राहवें म्हणून महाडचें कारस्थान नानानें रचिलें. परंतु त्यापासून राज्यास किंवा खुद्द नानास सुद्धां कांहीं एक फायदा झाला नाहीं. उलट तेजोभंग, द्रव्यापहार, कारागृहवास व अखंड चिंता यांचें चक्र जें एकदां त्यांचे पाठीस लागलें त्यांतून मृत्यूनें त्यांची सुटका केली. एवढ्या शहाणपणानें लढविलेल्या मसलतीचें असें विपरीत पर्यवसान कां व्हावें याचा शोध करतां असें दिसून येतें, कीं हा नानाच्या बुद्धीचा दोष नसून तो राज्याच्या ऱ्हासकाळाचा प्रताप होय. ' काळावर दोष लोटण्याची ही चिकित्सा कितपत ऐतिहासिक आहे हें अभ्यासूंनीं ठरवावें.

करार व आणा शपथा झाल्या, तरी बाजीरावाचें मन नानासंबंधानें भीति व मत्सर यांनीं ग्रस्त असून इकडे नानाही तितकाच साशंक होता. नानानें भोसले, निजाम, इंग्रज वगैरेंना अनुकूल करून घेऊन बाजीरावाचा जम बसविला यांत त्याचें जें सामर्थ्य व्यक्त झालें, त्यानेंच बाजीराव घाबरून गेला. नानाचें वर्चस्व कायम असल्यावर आपणांस स्वातंत्र्य तें काय मिळणार असें बाजीरावास वाटून त्यानें सर्जेरावाच्या द्वारें सिंद्याकडून एक गुप्त करार लिहून घेतला, कीं ' नानाकडून तुम्हांस यत्किंचित् अपाय होऊं देणार नाहीं. त्याजबद्दलची हमी आम्ही घेतों. ' हा करार गुप्त असून प्रथम तो नानास माहीत नव्हता. पुण्यास आल्यावर मग तो त्यास ठाऊक झाला. शिवाय बाजीरावाचे तळावर सिंद्याचा पाहारा अद्यापि कायम होता, याचा अर्थ नानानें असा घेतला, कीं बाजीराव आपणांस सिंद्याकडून कैद करवील; म्हणून सिंद्याची पलटणें जवळून उठल्याशिवाय आम्ही तुमचे भेटीस येणार नाहीं असें नानानें बाजीरावास कळविलें. त्यामुळें हा नवीनच घोळ उपस्थित झाला. त्याचे निरसनासाठीं सिंदे व निजामअली या दोघांकडून नानानें असा करार लिहून घेतला कीं, बाजीरावास पेशवाई पदावर बसविण्यांत येईल आणि त्याचा कारभार नानाचे हातीं राहील, याबद्दल आम्ही दोघे जामीन आहों. असा पक्का बंदोबस्त नानानें आधीं करून घेतला तेव्हांच तो बाजीरावाचे भेटीस गेला. इकडे साताऱ्याहून वस्त्रें आणण्यासाठीं आबा शेलूकरास नानानें पाठविलें होतें. तो वस्त्रें व शिकेकट्यार घेऊन आला. तथापि नाना बाजीरावांची निखालसता झाली नव्हती. ' सिंद्याचा कंपू श्रीमंतांजवळ म्हणून नानास दिक्कत. ता. ३·१२·१७९६ रोजीं नानानें जाऊन तुकोजी होळकराची गांठ

घेतली. ' तारीख ४ रोजीं प्रातःकालींच दौलतराव सिंदे नानाचे डेऱ्यास आले. प्रहरभर बोलणीं होऊन निखालसता झाली. उपरांतिक वानवडी येथें सिंद्यांनीं बाजीराव, त्याचे बंधू व नाना यांस भोजनास बोलाविलें. तेथें पुनः सर्वांचे बोलणें होऊन संशय निरस्त झाले. उपरांतिक श्रीमंत खराडीवर आपल्या गोटांत गेले. नानाही सिंद्याचे डेऱ्यास जाऊन खराडीस गेले. त्याच दिवशीं आबा शेलूकर वस्त्रें घेऊन परत आला. दुसरे दिवशीं मार्गशीर्ष शु. ६ सोमवार ता. ५·१२·१७९६ रोजीं १३ घटका रात्रीस छावणीचे तळावर वस्त्रें स्वीकारून बाजीराव रघुनाथ पंत प्रधान झाले. नंतर नाना आपले गोटास परत आले, सिंदे, भोसले, होळकरांपैकीं मोठे सरदार पुण्यास असूनही कोणी समारंभास हजर नव्हते. याच सुमारास मॅलेटची बदली मुंबईच्या कौन्सिलांत झाली, तेव्हां त्यानें आपली आटपाआटप करून पुढें २१·२·१७९७ रोजीं पुणें सोडून मुंबईस प्रयाण केलें.

**४ नानाचा जम बसण्याची अशक्यता.**—करार झाले, शपथा झाल्या तरी एकमेकांच्या पोटांतील कृत्रिम नाहींसें झालें नाहीं. द्रव्याचें मुख्य कूळ नाना. तें द्रव्य त्याजपासून कसें उपटायचें ही विवंचना बाजीराव व सिंदे यांस लागली. सिंदे हिंदुस्थानचा मार्ग चालूं लागल्यावर त्यास एक कोट रुपये देण्याचा करार नानानें केला होता, त्यावरून बाजीरावास वस्त्रें झाल्याबरोबर सिंद्यानें नानास पैशाचा तगादा लाविला. पैसा मिळवून लोकांचे पगार दिल्याशिवाय लोक जागचे हालेनात; व तळ हालल्याशिवाय नाना पैसे देईना. आठचार दिवसांतच हा पेंच अगदीं निकरावर आला. सिंद्याचा हल्ला आपणांवर केव्हां येईल नेम नाहीं अशी भीति नानास पडून रात्रंदिवस लष्करांत घोड्यावर जिनें कायम ठेवून नाना सज्ज राहूं लागला. शेवटीं बाजीरावानें उभय पक्षीं मध्यस्थी व आर्जवें केलीं तेव्हां नानानें कांहीं द्रव्य सिंद्यास दिलें. वीस लाख दिले असा अंदाज होता. या पहिल्याच घासाघासीवरून नानाचा कारभार किती सुरळीत चालणार याची कल्पना झाली. बाजीरावानें तर अनेक वेळां नानास उघड बोलून दाखविलें, कीं आम्हीं कांहीं सवाई माधवरावाप्रमाणें तुमच्या ताब्यांत राहणार नाहीं. अशा प्रकारें या वेळचा सगळाच व्यवहार अविश्वासानें गुदमरून गेला. जो तो आपल्यापुरतें पाहूं लागला. अशा स्थितींत कोणी तरी धिटाई करून सार्वजनिक हितासाठीं अंगावर जोखीम घेऊन पुढें झाला तरच निभाव लागतो, तसा प्रकार झाला नाहीं. उलट नाना बाजीरावांमध्यें घासाघिसींचीं कारणें वाढलीं तीं अशीं. ( १ ) पूर्वीच्या कारकीर्दीत नानाकडून शिक्षा पावलेले पुष्कळसे लोक होते त्यांस

प्रथमच बाजीरावानें आपल्याजवळ आणिलें. नानानें सांगितलें या लोकांचा आम्हांस विश्वास येत नाहीं, यांस काढून लावावें. बाजीरावानें ही गोष्ट साफ नाकबूल केली. ( २ ) सिंद्याचा पाहरा सोडून आपण हुजरातीच्या बंदोबस्तांत यावें असें नानानें बाजीरावास सुचविलें तें त्यानें नाकबूल केलें. ( ३ ) खर्ड्यांच्या वेळची खंडणी माफ करून मुलूख परत देऊं असा करार नानानें निजामास लिहून दिला होता तो सिंदे व बाजीराव मंजूर करीनात. कारण निजामाकडून पैसे काढण्याकरतां सिंद्याचे मनांत त्याजवर स्वारी करावयाची होती, ती या करारानें रद्द होऊं लागली. मुशीरुन्मुल्क पुण्यांत होताच, त्यानें तगादा लावला कीं नानांनीं केलेला करार सर्वांनीं पुरा करून द्यावा. त्यासाठीं मशीरास घेऊन नानानें ता. २०·१२·१७९७ रोजीं बाजीरावाची भेट घेतली, तेव्हां त्यानें साफ कानांवर हात ठेवले. अर्थात् सामोपचारानें प्रकरण मिटत नाहींसें पाहून मशीरानें मुसा रेमूची फौज व तोफखाना पुण्यावर बोलाविला. ( ४ ) रघूजी भोसल्यास ‘ गढा मंडळ ’ देण्याचा करार पूर्वी सवाई माधवरावाचे वेळेस झाला होता, तोही बाजीरावानें नाकबूल केला. तेणें करून भोसले संतापून नानास सामील झाला, आणि सिंद्याचें व त्याचें एवढें वितुष्ट पडलें कीं आतां उभयतांचें पुण्यांत युद्ध जुंपण्याची सिद्धता झाली. भोसल्यानें नागपुराहून आणखी फौज बोलाविली, ती पैठणापर्यंत आल्याची बातमी आली, तेव्हां सिंद्यानेंही आणखी एक कंपू व अंबूजी इंगळे यास हिंदुस्थानांतून बोलाविलें. पुण्यांत बाजीराव, नाना, मशीर, सिंदे, भोसले वगैरे सर्वच मंडळी रात्रंदिवस लढाईच्या तयारीनें सज्ज राहूं लागली. ( ५ ) आपल्या मर्जीतल्या लोकांस भलभलतींच बक्षिसें बाजीराव देऊं लागला. शालजोड्या न द्यावयाच्या लोकांस दिल्या, ग्रहणास १९ हजार रुपये खर्च केला. नाना म्हणतात, अशा कारभारास आमचे हातून निभावणी पडावयाची नाहीं.

अशीं किती तरी प्रकरणें रोजच्या घासाघाशीचीं सुरू झालीं. नानास दुखविण्याचें सुद्धां धाडस बाजीरावास होईना. तेव्हां त्याची समजूत काढण्याचें मनांत आणून अमृतरावास बाजीरावानें नानाकडे पाठविलें. अमृतरावानें ता. ४·१·१७९७ रोजीं नानाची गांठ घेतली. खलबतांत रायाजी पाटील, आबा शेलूकर व दादा गद्रे असे होते. अमृतरावांनीं नानास सांगितलें, या यादी करार करून आणिल्या आहेत, अतः-पर ओढूं नये, काम सोईस लावावें. दादा साहेबांचे ठायीं आम्ही आपणांस म्हणतों.

बंदोबस्त करावा, बखेडा होऊं देऊं नये. बाजीरावांचा कारभार अव्यवस्थ त्याचा बंदोबस्त मीं करतों, आपण त्यांचे डेऱ्यास चलावें.' यानंतर दोन दिवसांनीं नाना श्रीमंतांकडे गेले. चार घटका रात्रपर्यंत उभयतांचें बोलणें झालें. अशाच प्रकारचे समजुतीचे व वाटाघाटीचे प्रसंग घटकेंत रुसणें, घटकेंत पाया पडणें, वगैरेचे प्रयोग उभय पक्षीं इतके झाले कीं त्याची गणती करतां येणार नाहीं. बाजीरावास अज्ञातवासांत ठेवावें आणि आप्पासाहेबांस घेऊन नानांनीं कारभार करावा; नानास अज्ञातवासांत ठेवावें आणि कारभार अमृतरावानें करावा; किंवा मोरोबादादास बाहेर काढून त्यांजला कारभार द्यावा. असे घटकेंत सतरा विचार सतराजणांचे चालू झाले. सिद्धीस एकही जात नसे. 'झालें हें कांहींच नाहीं. आणखी अधिक होणार,' अशा वाक्यांत एका लेखकानें पुढचें भविष्य वर्तविलेलें आहे. भोसले सिंदे वर्दळीस येऊं लागले, तेव्हां त्यांच्या फौजांत मोठी चळवळ उडाली. पुण्यांतले लोक गडबडले. लोक आपलीं माणसें व मत्ता सुरक्षित स्थळीं पाठवूं लागले. नानानें सुद्धां पुनरपि कोंकणांत जाण्याच्या वाटा दुरुस्त करविल्या. भोसल्याची भेट घेण्यास बाजीराव कचरूं लागला. पण त्याचें डोकें अत्यंत सुपीक होतें. त्यानें आपल्या लग्नाची शक्कल काढून सिद्धता केली; आणि त्या निमित्तानें लोकांस कांहीं काल त्यानें शांत केलें.

त्याची दुसरी बायको मंडलिकांकडची ता. ६·१·१७९७ रोजीं जांबगांवास मृत्यु पावली. तिची क्रिया बाजीरावानें मुंढव्यास डेऱ्यांत केली. पहिली बायको भागीरथीबाई, पूर्वींच आनंदीबाई हयात असतां सन १७९३ त वारली होती. नंतर ही दुसरी मेली ही सरस्वती. तिचें लग्न ता. १८·६·१७९३ रोजीं झालें. पुढें आतां तिसरी बायको चिंतामण हरि ऊर्फ दाजीबा फडके याची मुलगी बाजीरावानें पसंत केली. हें लग्न पुण्यास ता. १६·२·१७९७ रोजीं झालें, नांव राधाबाई. लग्नाच्या निमित्तानें बाजीराव आदल्या दिवशीं बाहेरच्या तळावरून सर्व बंधूसह शनिवारवाड्यांत येऊन राहिला. भोसले व सिंदे यांचें हातघाईवर आलेलें प्रकरण कांहीं दिवस थंड पडलें. लग्नानंतर मेजवान्या, रंग, नाच, सोळन्हाणीं वगैरेंत बाजीरावानें कांहीं दिवस निभावले. खुद्द यजमानांचेंच लग्न, मग त्यास कारभाऱ्यांनीं तरी व्यत्यय कसा आणावा! असे भिडेभिडेनें कांहीं दिवस गेले. अमृतरावाचा मुलगा विनायक बापू याची मुंज व चिमाजीचें लग्न हेही समारंभ या वेळीं करून बाजीरावानें चार दोन महिने निभावले. मोरोपंत दामले यांची कन्या चिमाजीस करून (ता. १६·५·१७९७)

नांव सीताबाई* ठेविलें. लग्नापूर्वी चिमाजी आपाचें दत्तविधान रद्द करून त्या पापाबद्दल त्यास सक्षौर प्रायश्चित्त देण्यांत आलें.

चिमाजी आपास पेशवाईवर आणल्याबद्दल परशुराम भाऊवर बाजीरावाची अत्यंत वक्र दृष्टि झाली. सर्जेराव घाटग्यास सांगून त्यानें भाऊची मालमत्ता जप्त केलीच, पण इतर पटवर्धनांचाही त्यानें छळ चालू केला. पांच पन्नास लाख उपटण्याचें तें एक बाजीरावास साधन मिळालें. हरि विष्णु सहस्त्रबुद्धे यानें चिमाजी आपास जबरदस्तीनें पालखींत बसविलें, त्यावरून त्यास 'सरकार वाड्यांत नेऊन ५० कोरडा मारिला. पाठींतून रक्तें फार निघालीं. हातांचे बोटावरून व कानांस चाप लाविले. एक कान तुटला. मार दिल्यानंतर बाजारांतून गल्लोगल्लीं फिरविलें. चिमाजी आपाच्या आग्रहावरून इतकें केलें असें म्हणतात.' गोविंदराव पिंगळे यास बाजीरावानें बोलावून सांगितलें, " पटवर्धन हरामखोर. भाऊनीं आम्हांसीं व पूर्वी गोपाळरावांनीं दादासाहेबांसीं कृत्रिम केलें. मागें पुणें जाळलें. पटवर्धनांचें कूळच पहिल्यापासून खोटें. आमच्या वडलांसही बद्ध कटाक्ष पटवर्धनांचा. सबब त्यांजकडे कांहीं एक ठेवावयाचें नाहीं. यावर नाना म्हणाले, श्रीमंत बकवा करितात. अशा धनीपणानें कसा शेवट लागेल ! "

मॅलेट पुण्याहून निघून गेल्यामुळें इंग्रजांकडे नानाचें कांहीं कारस्थान असावें अशी पुष्कळांची कल्पना झाली. पुण्याच्या प्रस्तुतच्या गोंधळांत मुंबईस किंवा कैलकत्त्यास उपद्व्यापी गृहस्थ कारभारावर नव्हते. सर जॉन शोअरच्या शांत धोरणामुळें या वेळचीं एक दोन वर्षे देशांत कुरापतीवांचून निभावलीं. राज्याचीं बाहेर नानाविध तंत्रें काय असतात आणि चालकाच्या लहरीमुळें राज्याची शक्ति कशी क्षीण होत जाते याची कल्पना तरुण बाजीरावास बिलकूल नव्हती. बाजीराव व दौलतराव यांचे जे रोज निरनिराळे ढंग चालू झाले ते कोणी कोणापासून उचलले हें सांगणें कठिण आहे. बाळोबास कैद केल्यावर सिंद्याचा कारभार कांहीं

* पे. अ. पृ. २६ वर ही तिथि वार बिनचूक दिला आहे. पण खरे ले. ४२३९ व ४२४१ व ४२४५ यांत चिमाजीचें लग्न ता. ८-६-१७९८ रोजीं झालें असें आहे. भा. व. श.त ही ता. १८-६-१७९७ आहे. तसेंच पे. अ. पृ. ४४वर विनायकरावाची मुंज ता. ७-२-१७९९ रोजीं ८व्या वर्षी झाली असें नमूद आहे, म्हणजे त्याचा जन्म स. १७९१ चा होतो.

दिवस रायाजी पाटलानें केला. पण त्यासही लवकरच घरीं बसवून कृष्णाजी शेट्या खिजमतगार होता त्याजकडून दौलतराव कारभार घेऊं लागला. बाजीरावाचें तर देवतार्चन, मंत्रतंत्र, लग्नसोहळे इत्यादींकडे जितकें लक्ष होतें, त्याच्या शतांश देखील कारभाराकडे नव्हतें. अमृतराव व त्याचा मुलगा विनायकराव यांस रोजची कामगिरी काय तर मोठा लवाजमा बरोबर घेऊन बाहेर जाऊन दूर्वा आणाव्यात. बाजीरावाच्या दानशौर्याची आख्या अद्यापि महाराष्ट्रांत दुमदुमते. परंतु वाटेल त्याला लुबाडून अन्यायानें लोकांचा पैसा गोळा करणें आणि चैनींत व भटाभिक्षुकांस त्याची उधळपट्टी करणें म्हणजे कांहीं औदार्य नव्हे. अगोदरच पुण्याचा मुलूख फौजांनी बेचिराख झाला होता. त्यांतच अवर्षण व टोळधाड यांची भर पडली. त्यामुळें वसुली बंद झाली. खर्च अनिवार वाढले. व्यापार बसला. रयत गांजून गेली. फौजाही आपल्या धन्यावर रुष्ट झाल्या. ‘ रयतेचा भोग सरेल तेव्हां लष्करें पुण्यांतून उठतील. काईल होऊन गेले. येथें दरबारांत लहान मनुष्याची चलती. पृथ्वींत कोणी खुशाल असूं नये, सावकार हलके व्हावे, अशा सरकारच्या व कारभाऱ्यांच्या बुद्धी. कोणी चुकून राहिलाच तर दिवसेंदिवस आपलें पुण्य खर्च करणारे लोक जवळ आहेतच.’ या संबंधानें पुढें अठराव्या प्रकरणीं समकालीन लोकमत या कलमांत बाजीरावाच्या राहणीचा मजकूर एकत्र आणला आहे तो वाचकांनीं ध्यानांत घ्यावा.

सिंदे, भोसले व मशीर हे पुण्यांत आपल्या फौजा तयार करून सज्ज राहत असतांच गद्रे सावकाराच्या मुरलीधराचे देवळांत प्राणप्रतिष्ठेसमयीं खून पडले. दादा गद्रे हा नाना फडणीसाचा मेहुणा होता त्यानें मंदिर बांधलें. ता. १२–४–१७९७ रोजीं देवाची अर्चा व्हावयाची त्यासाठीं नानाकडील बॉयडचा कंपू व आरबाचीं पलटणें वाद्यें घेऊन पाठविण्यांत आलीं असतां, वादनाच्या बाबतींत कंपू व आरब यांजमध्यें कलह वाढून त्यांनीं गोळीबार केले. त्या प्रसंगांत पुष्कळ मुडदे पडले व कित्येक जखमी झाले. त्यावरून त्या देवालयाचें नांव खुन्या मुरलीधर असें पडलें.

**सदाशिव रघुनाथ गद्रे, सावकार**
|
**विष्णुपंत दादा**

कांहीं दिवसांनीं शांति करून मग प्राणप्रतिष्ठा करण्यांत आली. वरील प्रसंगाच्या दुसरेच दिवशीं सिंद्याचे गोटांत सखाराम घाटगे याच्या आरबांनीं तलबेसाठीं खटला करून तलवार चालविली. २८ असामी ठार झाले. नानाचा कारभारी धोंडो

बल्लाळ* निजसुरे याजकडील एका आरबानेंही अशीच तक्रार करून ता. १४ एप्रिल रोजीं आपली मान कापून घेतली. ता. १५ रोजीं बेट ( Boyd ) + यानें पुलाजवळ एक आरब ठार मारिला. या बनावावरून त्या वेळच्या अस्थिर स्थितीची कल्पना होते.

खर्चास अडचण पडूं लागली तेव्हां बाजीरावानें लोकांवर नवीन पट्टया बसविल्या. ( १ ) कर्जपट्टी, ( २ ) सरंजाम पट्टी, ( ३ ) वेतन पट्टी ( ४ ) सावकार पट्टी, ( ५ ) उंबरे पट्टी, ( ६ ) भाडे पट्टी ( ७ ) संतोष पट्टी, अशा असंख्य नवीन पट्टया बाजीरावाचे डोक्यांतून व जवळच्या क्षुद्र सल्लागारांकडून रोज रोज निघूं लागल्या. संतोषपट्टी म्हणजे बाजीराव पेशवाईवर आल्यानें लोकांस संतोष झाला त्याबद्दल त्यांनीं द्यावयाचा कर. बाजीरावाच्या या वर्तनानें लोक त्रासून गेले. नानाचेंही त्याजपुढें कांहीं

---

* हा नानाच्या विश्वासांतला गृहस्थ पुढें त्याचे मृत्यूनंतर लोहगडावर नानाची बायको जिऊबाई व तिचा सर्व अजबाब संभाळून होता. त्यानेंच लोहगडावर बंडावा करून से. वेस्लीचे मार्फत जिऊबाईचें संरक्षण केलें.

**निजसुरे धोंडो बल्लाळ**
|
**गणेशपंत ऊ. रावजी**

म्हणून बाजीरावानें त्याचा पुढें फार उच्छेद केला. तेव्हां तो आपली चीजवस्त घेऊन ठाण्यास इंग्रजी हद्दींत राहिला. तेथूनही त्याची जिंदगी बाजीरावानें हरण केली, तेव्हां त्यानें बाजीरावावर मुंबईचे कोर्टांत दावा लाविला. हें प्रकरण कैक वर्षें चालू होतें. ठाण्यास उच्छेद झाल्यामुळें धोंडो बल्लाळ गोवळकोंड्यास निजामाचे हद्दींत जाऊन राहिला, तेथेंच तो स. १८१० सालीं मरण पावला.

+कर्नल जे. पी. बॉयड ( Boyd ) हा अमेरिकन गृहस्थ इंग्रजांच्या शिफारशीनें निजामाचे नोकरींत राहिला. त्याचे साह्यानें फ्रेंच रेमंड याचा उठाव करण्याची त्यांची खटपट होती. खर्ड्याच्या लढाईत बॉयड निजामाच्या तर्फेनें हजर होता. स. १७९६ त इंग्रज रेसिडेंट व रेमंड यांचें वाकडें आल्यामुळें रेमंड इंग्रजांवर हल्ला करणार होता. त्या प्रसंगीं बॉयड व त्याचा जोडीदार फिंग्लस ( Finglass ) यांनीं रेसिडेंटाचें संरक्षण केलें, त्यावरून निजामानें बॉयड यास नोकरींतून काढून टाकिलें. तेव्हां तो पुण्यास येऊन नाना फडणिसाचे मार्फत बाजीरावाचे नोकरींत राहिला. बाजीरावास पेशवाईपद मिळवून देण्यांत त्यानें मदत केली. स. १७९७ त तो नोकरींतून निघाला, तेव्हां त्याचे जागीं टोनची नेमणूक झाली. ( ख. ले. ४७०३ ).

चालेनासें झालें. पण कित्येक प्रकरणांत बाजीरावाचेंही नानाची आर्जवें केल्याशिवाय चालत नसे. रघूजी व मुशीर यांचीं प्रकरणें अगदींच हातघाईवर आलीं होतीं, तीं नानाच्याच कलानें मिटविणें बाजीरावास भाग पडलें. निजामाचें साह्य संपादण्याकरितां नानानें मुशीरास करार लिहून दिला, तो बाजीराव मंजूर करीना, म्हणून मुशीर अत्यंत चिडून पुण्यांतून रागानें चालता झाला, तेव्हां त्याची समजूत काढण्याकरितां बाजीरावानें उभयतां गोविंदरावांस त्याचे मागोमाग सिद्धटेक येथें पाठवून खर्ड्याच्या तहांतील खंडणीची व मुलखाची पाऊण हिस्सा सूट ता. १०-५-१७९७ रोजीं मंजूर करून मुशीरकडे पाठविली, त्यावरून त्याची थोडी शांतता होऊन तो आपले राज्यांत निघून गेला, तो जुलईंत हैदराबादेस पोंचला. तेथें त्यानें पुण्याची सर्व हवाल यजमानास कळवून सावध केलें. निजामांचा वकील रघूत्तमराम पुण्यास आला होता त्यासही पुढें नानानें परत पाठविलें. कैदेंतून सुटल्यावर जवळ जवळ एक वर्ष मुशीर पुण्यास राहून तेथील सर्व छिद्रें समजून घेतल्यावर मग परत गेला.

रघूजी भोसल्याचीही अशीच समजूत बाजीरावास काढावी लागली. त्यासाठीं भोसले व नाना बाजीरावाचे भेटीस वाड्यांत गेले. मेजवानी होऊन वस्त्रें दिलीं. हा सर्व सत्कार स. १७९७ च्या जून महिन्यात सिंद्याकडील नागव्या तरवारीच्या पाहाऱ्यांत उरकला. नाना तशीच जरूर पडल्याशिवाय बाजीरावाचे भेटीस बहुधा जात नसे. काय कारभार करणें तो आपल्या घरीं बसून करी. भोसल्याशीं त्याचें रहस्य चांगलें होतें. रघूजी ता. १७-७-१७९७ रोजीं पुणें सोडून नागपुरास गेला. वाटेंत नाव फुटून त्याचें जवाहीर बुडालें. सिंद्यास या वेळीं बाजीरावानें नगरचा किल्ला दिला हें मागें सांगितलेंच आहे. त्यामुळें किल्ल्यांत मोरोबादादा कैदेंत होता त्यास तेथून काढणें भाग आलें. त्यास आणण्यास नानानें दादागद्रे यास पाठविलें. त्यास मोरोबा म्हणाला, दुसरीकडे तरी कैदेंतच ठेवणार त्यापक्षीं मी येथून हालत नाहीं. जबरदस्तीनें नेल्यास प्राणनाश करीन. पुढें युक्तीनें त्यास काढून नानानें त्रिंबकचे किल्ल्यावर ठेविलें आणि नगरचें ठाणें सिंद्यास खालीं करून दिलें. आबा चिटणीस व त्याचा भाऊ कृष्णोबा हे नानाबरोबर महाडास होते, म्हणून त्यांजवरही सिंद्याचा राग झाला. तथापि नानाचे आग्रहावरून दहा लाख रुपये सिंद्यानें नजराणा घेऊन कृष्णोबाच्या नांवें चिटणिसी करून दिली. रायाजी पाटील नानाचे पक्षांत दिसल्यावरून त्याचा सरंजाम सिंद्यानें जप्त केला. दौलतरावाचा कारभार कृष्णाजी शेण्या करीत होता, तो १७९७ च्या मे महिन्यांत वारला. पुढें बाणाजी शेण्या कारभार करूं लागला. हे कारभारी तात्पुरतीं प्रकरणें उरकणारे असल्यामुळें सिंद्याचें

व नानांचें अंतःकरण एकमेकाविषयीं सारखें विटत चाललें. बाणाजी हुजऱ्यानें नानाकडे जाऊन मध्यस्थी केली, तेव्हां त्यांचा कांहीं सलूख झाला; पण बाजीरावाचें व नानाचें मात्र दिवसेंदिवस अगदींच फाटत गेलें. शेवटीं नाइलाज होऊन नानानें कारभार सोडून मेणवलीस जाण्यास निरोप मागितला. माझे हातून कारभार होत नाहीं असें साफ कळविलें. ' मिळून रयतेचें संकट. ' मेस्तर बैटचे पलटणास याच वेळीं नानानें रजा दिली.

अमृतरावास युद्धकलेचा बराच अनुभव असल्यामुळें त्यानें बाजीरावाकडून एक स्वतःचा कवाइती कंपू तयार करविला. सिंदे निजाम वगैरेंचा ओढा फ्रेंचांकडे होता, तसा अमृतरावाचा इंग्रजांकडे होता. म्हणून स. १७९६ त बॉयडच्या हाताखालीं वुल्यम टोन यास त्यानें नेमिलें. हा टोन देखणा, रुबाबदार, भाषणानें दुसऱ्यावर लगेच छाप बसविणारा, कुशल लेखक व चतुर सेनानायक असल्यामुळें पेशव्याचे दरबारीं त्याची चांगली चहा होऊं लागली. पण या पलटणीच्या योगानें जास्तच उपद्व्याप होईल असा संभव दिसल्यामुळें नानानें हें पलटण पुढें कमी केलें. या वेळच्या हकीकती टोननें रसभरित वर्णिल्या आहेत. *

---

* वुइल्यम टोन याचा जन्म १७६४ त आयर्लंडांत झाला. याचा भाऊ वुल्फ टोन हा इंग्रजांविरुद्ध आयरिश लोकांनीं केलेल्या बंडाचा सुप्रसिद्ध पुढारी होता. सोळाव्या वर्षी वुइल्यमनें कंपनीची नोकरी पत्करिली, आणि कांहीं वर्षे सेंटहेलेना बेटांत नोकरी करून तो हिंदुस्थानांत आला, आणि निजामाचे फौजेंत दाखल झाला. परंतु तेथें त्याचें रेमंडशीं पटलें नाहीं. तेव्हां कर्नल पामर बरोबर स. १७९६ त तो पुण्यास येऊन बाजीरावाचे पदरीं क० बॉयडच्या हाताखालीं रुजू झाला. स १८०१ त सेंधवा येथें सिंदे बायांच्या बाजूनें लढत असतां तो जखमी होऊन पेरॉनचे हातीं पडला. तेथून सुटून तो यशवंतराव होळकराकडे गेला. यशवंतरावानें औषधोपचार करून त्याच्या जखमा बऱ्या केल्या. परंतु त्याच सालीं महेश्वरजवळ सिंदे होळकरांची लढाई झाली तींत होळकराचे तर्फेनें लढत असतां तो मारला गेला. त्यास लिहिण्याचा नाद असून फावल्या वेळांत त्यानें स्वतः पाहिलेल्या सहा वर्षांच्या घडामोडींची माहिती माल्कम यास पत्रांनीं लिहून पाठविली. टोनचीं तीं पत्रें त्या वेळीं निरनिराळ्या ठिकाणीं छापण्यांत आलीं, तीं ग्रँट डफ यास मिळालीं होतीं. बाजीराव, मानाजी फाकडे, यशवंतराव होळकर वगैरे ज्या ज्या ऐतिहासिक व्यक्तींशीं त्याचा प्रत्यक्ष परिचय घडला, त्यांचीं स्वभावचित्रें त्यानें लिहिलेलीं अद्यापि अप्रतिम वाटतील. तसेंच तत्कालीन रीतरिवाजांची अवांतर माहिती सुद्धां टोनच्या पत्रांत पुष्कळ सांपडते.

**५ तुकोजी व मल्हारराव होळकरांचे मृत्यु, सिंद्याची जबरदस्ती.*** राज्यांतले लहान मोठे सरदार व परराष्ट्रसत्ताधीश यांचा परिपाठ थेट पानिपतच्या प्रसंगापासून नानाफडणिसाशींच व्यवहार करण्याचा असल्यामुळें, त्याच्या शब्दाला व शिस्तीला राज्यांत पराकाष्ठेचा मान होता, तसा मान बाजीराव किंवा सिंदे या अल्पकालीन मंडळींस मिळणें शक्य नव्हतें, ही गोष्ट होळकराच्या प्रकरणावरून याच संधीस स्पष्ट झाली. तुकोजी होळकर अलीकडे बरेच दिवस पुण्यास आजारी असून तो ता. १५–८–१७९७ रोजीं मरण पावला. या संबंधाचें पुण्याहून पत्र गेलें तें असें. 'सेवेशीं विज्ञापना. श्रावण व॥ ८ मंगळवार दीड प्रहर दिवस प्रातःकालचा विशेष. श्रीमंत सुभेदार यांचें शरीर क्षीण होतेंच. या पांच सात रोजांत शौच्याचा उपद्रव जाला. कफही जाला. उपाय होतच होते. गुणास न येतां आज येच वेळेस प्राणोत्क्रमण जालें. श्री. काशीरावबाबा संनिध आहेत. श्री. बाबासाहेबही (मल्हारराव) काल भेटून गेले. मोठा पुरुष गेला. ऐसा गरीबनवाज गरीबगुरीबांचें चालवणार पुरुष विरळा. श्रीइच्छाप्रमाण. याउपरी दहनाची तर्तूद होत आहे.'

महादजीच्या चुरशींत तुकोजीचा ओढा नानाकडे होता हें सुप्रसिद्ध आहे. विशेषतः दौलतरावाचे हातांत लष्कराची सत्ता असल्यामुळें तो आपल्या घराण्याची वाट लावील अशी भीति अलीकडे होळकरांस वाटत होती. तुकोजीच्या चार पुत्रांची व गृह-

---

मराठ्यांचें घोड्यावरील प्रेम व त्याजवर चालणारी त्यांची उपजीविका, यांचें मोठें मार्मिक वर्णन टोननें केले आहे. यशवंतराव होळकराचा या टोनवर अतिशय लोभ जडला असून, त्याच्या मृत्यूनें यशवंतरावास पराकाष्ठेचें दुःख झालें.

टोनचीं तीन पत्रें, स. १७९६ जून १८, सेप्टेंबर ३ व डिसेंबर १९ या तारखांचीं, 'एशियाटिक ॲन्युअल राजिस्टरच्या स० १८०३ सालच्या भागांत प्रसिद्ध झालीं होतीं, तीं आपल्या इतिहासास विशेष उपयोगाचीं आहेत टोनचे अस्सल लेख ब्रिटिश म्युझिअममध्यें ठेवलेले असून वरील तीन पत्रें 'बांबेकूरियर' मध्यें प्रथम प्रसिद्ध झालीं; आणि टोनचे दुसरे कांहीं लेख स. १८१८ त 'टाइम्स प्रेस' नें कलकत्ता येथें छापले होते. आपण लिहीत असलेला मजकूर स्वानुभवाचा किंवा स्वतः सरकारांत तपास करून बिनचूक वाटला तेवढाच लिहिला आहे, असें खुद्द टोननें लिहून ठेवलें आहे.

* हो. प. १.११५; हो. कै.; पे. अ.; भवानीशं. रो. १९; खरे.

स्थितीची हकीकत मागें येऊन गेली आहे, ती येथें संदर्भासाठीं लक्षांत बाळगली पाहिजे. ' मल्हाररावाचें कुटुंब जिजीबाई यांनीं यशवंतरावाच्या बायकोला आपल्याबरोबर घेऊन तुकोजींचा आश्रय केला होता. ते परलोकवासी झाले, ते चार मुलगे आपसांत भांडखोर असें स्मारक मागें ठेवून गेले. हे चौघे मुलगे तीन बायकांपासून झालेले होते. एकाचे ताब्यांत राज्य राहून दुसरे त्याच्या ताब्यांत राहतील असें नव्हतें. ' वडील पुत्र काशीराव यानें उत्तर क्रिया केली. काशीराव व मल्हारराव हे दोघे तुकोजीचे औरस मुलगे, यांपैकीं मल्हारराव व्रात्य पण कर्तृत्ववान होता. काशीराव पंगु, निर्बुद्ध व सर्वथा परावलंबी असल्यामुळें पुढें सरदारी चालविण्याची लायकी त्याच्यांत नव्हती. पण तो वडील असल्यामुळें त्यास मुठींत ठेवून होळकरांची दौलत घशांत घालण्याचा घाट सिंदे वगैरे मंडळीचा होता. दुसरे दोघे अनौरस पुत्र वडील विठोजी व धाकटा यशवंतराव. हेही पराक्रमी पण लहरी व उतावीळ आणि घराण्याचे अभिमानी होते. मरणापूर्वी तुकोजीनें काशीरावास दौलतीची मालकी दिली, आणि इतर मुलांस त्याचे आज्ञेंत वागण्यास सांगितलें. पण मल्हाररावाचें काशीरावाशीं बनेना; आणि त्यास नानाचा पाठिंबा होता याचें वैषम्य वाटून दौलतरावानें काशीरावाचा पक्ष घेतला. काशीराव सिंद्याचे तंत्रानें वागतो, तेणें करून होळकराची दौलत सिंदे हस्तगत करणार असा सुमार पाहून बाकीचे तिघे बंधू एक विचारानें वागून थोडी स्वतःची फौज जमवून काशीरावाचा मुख्य गोट सोडून जवळच भांबुर्ड्यास स्वतंत्र राहूं लागले. सवड सांपडेल तेव्हां काशीरावास तरी कैद करावें, अगर बाहेर मुलखांत विशेषतः सिंद्याचे प्रदेशांत दंगा करावा असा त्यांचा विचार दिसूं लागला. तेव्हां यांचा वेळींच चहूंकडून बंदोबस्त न केला तर हे बाहेर जाऊन बंड उभारतील या भीतिस्तव मल्हाररावास पकडून कैदेंत ठेवावें, असा विचार दौलतरावसिंद्याचे सल्ल्यानें काशीरावानें ठरविला. पण तो सिद्धीस नेण्याचें चातुर्य खुद्द काशीरावास नव्हतें. मल्हारराव अत्यंत धाडसी होता. त्यास पकडण्याचें तर दूरच, उलट तोच आपणास पकडील, किंवा हातचा निसटून तरी जाईल अशी भीति काशीरावास पडली. तेव्हां ती कामगिरी दौलतरावानें आपल्या अंगावर घेतली. त्याबद्दल काशीरावानें सिंद्यास कांहीं रोख ऐवज व मुत्सद्दी यांस दरबारखर्च व इनाम गांव द्यावयाचे कबूल केले. तदनुसार ता. १४-९-१७९७ रोजीं दौलतरावानें चार घटकारात्र असतांच पर्वतीचे रमण्याजवळ फौज आणून कांहीं पलटणें मल्हाररावास धरण्यास पाठविलीं. त्याच वेळीं दुसऱ्या बाजूनें काशीरावाची फौजही मल्हाररावावर चालून गेली. आपल्यावर कांहीं तरी

संकट येणार अशी कुणकूण अगादेरच मल्हाररावास असल्यामुळें रात्रभर तो फौजबंद व सावध राहिला होता. पुढें त्यास बातमी कळली कीं आतां हल्ला येत नाहीं, म्हणून पहांटेच्या सुमारास तो व त्याचे लोक लढाईचा मोर्चा सोडून मुक्कामावर जाऊन गृह-कृत्यांस लागले. इतक्यांत त्यांजवर एकदम दोहोंकडून हल्ला आला. त्याबरोबर सांपडले ते लोक बरोबर घेऊन मल्हारराव व त्याचा धाडसी साथीदार लाख्या बारगीर तसेच तलवारीनिशीं हल्ला करणारांवर बेधडक चालून गेले. त्यास धरण्याकरितां सिंद्याची मंडळी पुढें धावली त्या गर्दीत दौलतरावाचा लष्करी अंमलदार मुजफरखान यानें मल्हाररावास तलवारीनें छाटून मारिलें. या प्रसंगाची होळकर कैफीयतींतील हकीकत वाचण्याजोगी आहे. मल्हाररावाचा मुडदा काशीरावानें नेला. चार दिवसांपूर्वी दौलतरावानें मल्हाररावास सूचना केली होती, कीं ' फौजेस रजा द्यावी व आम्ही सांगतों तें ऐकावें. परंतु तें न ऐकिलें. प्रातःकाळीं तोंड धुऊन डेऱ्यापुढें बसले म्हणोन बेहुशारीमुळें अशी गोष्ट घडली. लाख्या बारगीर हा लाख रुपये तनख्याची बोली करून चाकरीस राहिला होता, तो ठार पडला. रविराव सिंदे लोणीकर व आणीक लोक त्या प्रसंगांत मारले गेले. रविरावाची बायको सितोळ्याची लेक लोणीस होती, तिनें नवऱ्याचें हें वर्तमान ऐकतांच प्राण सोडिला. ' मल्हाररावाची बायको जिजीबाई गरोदर होती, ती पुण्यांत केसोपंत कुंटे यांचे वाड्यांत येऊन राहिली केशव * गणेश कुंटे यानें कठिण प्रसंगीं होळकरास चांगला आश्रय दिला, म्हणून या कुंटे घराण्याचा प्रसार पुढें हिंदुस्थानांत झाला. मल्हाररावाची बायको कुंटे यांज-कडे प्रसूत होऊन मुलगा झाला, त्याचें नांव खंडेराव. त्या दोघांसही दौलतरावानें आपल्या कबजांत घेतलें. विठोजी व यशवंतराव पळून जाऊन मुलखांत बंडाळी करूं लागले. हा बनाव नुसता मल्हाररावासच प्राणघातक झाला नाहीं तर समस्त राज्याचे नाशास कारण झाला. दौलतरावानें उघड छापा घालून मल्हाररावास ठार मारिलें, हा प्रकार पाहून सर्व लोक घाबरून गेले. सिंद्याचा दुष्टपणा कोठवर जाणार याची लोकांस काळजी पडून कोणाचेंच जीवित व वित्त सुरक्षित नाहीं अशी त्यांची

**गणेशपंत कुंटे**
- **केशव**
  - **विष्णु**
- **महादेव**

---

* केशव गणेश कुंटे राहणार नागाव यास तुकोजी होळकरानें पुण्यास आपला बातमीदार म्हणून स. १७६८ त खाजगीवाल्याजवळ ठेविलें, व मुलगा विष्णु केशव कुंटे ( बी. ए., रावबहादुर ) देवासचा कारभारी होता.

खात्री झाली. नानास तर याबद्दल अत्यंत वैषम्य वाटलें, आणि म्हणूनच पुढें दसऱ्याचे वगैरे स्वारीस त्यानें बाजीरावाकडे जाणेंच सोडलें.

सिंद्याच्या मध्यस्थीवरून पेशव्यानें काशीरावास सरदारी दिली, तेव्हां नानानें सिंद्याविरुद्ध मल्हाररावाचा पुरस्कार केला. नानाच्या आधारावर आपणास मागें पुढें सरदारी मिळेल या भावनेनें मल्हारराव काशीरावाशीं फडकून स्वतंत्र राहूं लागला. तेव्हां त्यास पकडून कबजांत आणण्याची सर्व कारवाई सर्जेरावानें केली. पुढें नानास असाच कारभारावर राहूं दिला तर शेणवी मंडळ, सिंदे बाया, अमृतराव, पटवर्धन व बाहेरचे निजाम व इंग्रज हे सर्व एक होण्याचा संभव दिसतांच नानाचा वेळींच बंदोबस्त करण्याचा घाट सर्जेरावानें रचिला, त्याचीं कारणें नीट समजून घेण्यासारखीं आहेत.

होळकरांचे सारखाच अतिप्रसंग कुलाबेकर आंगऱ्यांवर येण्याचा प्रसंग आला होता, पण सुदैवानें त्यांत रक्तपात झाला नाहीं. कुलाब्यास रघूजीचा मुलगा मानाजी व त्याचा चुलता बाबूराव यांचा तंटा लागून त्यांत बाबूराव हा दौलतराव सिंद्याचा मातुल असल्यामुळें त्याचे साह्यार्थ सिंद्याचीं पलटणें मानाजीवर चालून गेलीं. ता. ५-२-१७९७ रोजीं बाजीरावानें कोंकणच्या मामलेदारांस हुकूम पाठविले कीं, बाबूरावास दारूगोळ्याचा पुरवठा करून मानाजीची जप्ती करावी. यास इंग्रजांनीं हरकत केली तेव्हां ता. १९-५-१७९७ रोजीं पेशव्यानें बाबूरावाचें साह्य करण्याविषयीं त्यांसही पत्रें लिहिलीं. सिंद्याच्या फौजेनें कुलाबा हस्तगत केला आणि मानाजीस पकडून बाबूरावाचे हवालीं केलें. बाबूरावानें त्यास कैदेंत ठेविलें. पुढें दसऱ्याचे मुहूर्तावर (ता. २०-९-१७९७) बाजीरावानें सरखेलीचीं वस्त्रें बाबूरावास दिलीं. सिंद्याच्या लष्करी नेटानें हा प्रकार उरकला; पण त्यामुळें सर्व सरदार चिंताक्रांत झाले, कीं सिंदे आतां लष्करी जोरावर पाहिजे ती अरेरावी बाजीरावाकडून करविणार. बाबूराव आंगरे पुढें दौलतरावाजवळ सरदारी करून असे. बायांचे युद्धांत व समेटांत तोच प्रमुख होता. इंग्रजांचें युद्ध झाल्यावर कांहीं काळ त्यानें दौलतरावाचा कारभार केला; आणि हिंदुस्थानांतून दक्षिणेंत परत येत असतां ता. १-९-१८१३ रोजीं जांबगांव येथें मरण पावला. त्याचाच वंश हल्लीं ग्वालेरीस आहे. (ग्वालेर जागीरदारान).

**६ नानाची कैद** (३१-१२-१७९७).—नानाचे हातीं कारभार आला तरी तो सहसा बाजीरावाकडे जात नसे, घरीं बसूनच कामें करी. वाड्यांत बाजीरावाजवळ तेरीख घालण्याचें म्हणजे हुकमाप्रमाणें जमाखर्च करण्याचें काम त्रिंबकराव

परचुरे व कारभारासंबंधानें नाना व बाजीराव यांचे दरम्यान बोलणीं करण्याचें काम नारोपंत चक्रदेव करूं लागला. आरंभीं तरी सिंदे व नाना यांचें सूत होतें. सिंद्यानें बाजीरावास नानासमक्ष कळविलें, कीं आम्हां दोघांच्या प्रयत्नांमुळेंच तुम्हांस पेशवाईची मालकी प्राप्त झाली. आतां आम्हीं हिंदुस्थानांत जातों, तुम्हीं नानांच्या सल्ल्यानें कारभार चालवावा. या बोलण्यास बाजीरावानें शाब्दिक मान्यता दाखविली. पण वाड्यावर सिंद्यांचीं पलटणें पाहऱ्यास होतीं, तीं सिंदे उठवून नेऊं लागला, तेव्हां ती गोष्ट बाजीराव कबूल करीना. त्यानें चालढकल चालविली. पुढें सिंद्यानें निकड लाविली तेव्हां बाजीरावानें कळविलें, 'तुम्ही पलटणें उठवून न्याल तर आम्हीच वाडा सोडून तुमचे लष्करांत राहावयास येतों. कारण तुम्ही गेल्यावर नाना आमची काय वाट करील याचा भरंवसा आम्हांस मुळींच येत नाहीं.' बाजीरावास नानाची दहशत केवढी वाटत होती तें यावरून स्पष्ट होतें. याच कारणास्तव सिंद्यास दोन कोट रुपये देण्याचें कबूल करून नानापासून आपला बचाव करावा असा गुप्त करार बाजीरावानें सर्जेरावामार्फत सिंद्यांशीं केला होता. इकडे सिंद्यानें हिंदुस्थानांत निघून जावें म्हणून त्यास कांहीं रक्कम देण्याचें नानानेंही कबूल केलें होतें. या दोन करारांपैकीं कोणता कसा पाळायचा याचा निश्चय सिंद्यास करणें जरूर होतें. नाना देईल ती रक्कम घेऊन बाजीरावास त्याचे हवालीं करून आपण पुण्यांतून निघून जाणें हा एक मार्ग; किंवा बाजीरावाकडून दोन कोट घेऊन नानास अटकेंत डांबून ठेवणें हा दुसरा मार्ग. या तिघां मुख्यांच्या दरम्यान सर्जेराव घाटग्याचें आणखी एक कारस्थान वेगळेंच होतें. सर्वांवरच अधिकार गाजविण्याची घाटग्याची आसुरी महत्त्वाकांक्षा असून, प्रथम मुलगी सिंद्यास देऊन त्याजवर व पर्यायानें त्याच्या लष्करी सामर्थ्यावर आपला ताबा बसवावा, मग बाजीराव व त्याची पेशवाई यांजवर शह बसविण्यास काय उशीर ! यास अडचण काय ती एक नानाची. त्यास दूर करण्याचा उपाय सिद्ध झाला, म्हणजे घाटग्याचा डाव साधणार होता. मिळून नानास बाजूस सारण्याच्या प्रयत्नांत हा एक प्राणी घाटगे सामील झाला.

कारभाराच्या या भानगडींत आणखी एका व्यक्तीचा संबंध आला. पेशव्यांच्या घरची पूर्ववहिवाट म्हणजे बंधूनें कारभार करायची. त्यावरून अमृतराव म्हणे कारभार मी करणार, त्यांत नानाचा संबंध नाहीं. बाजीरावास वस्त्रें झालीं, तेव्हांपासूनच अमृतरावाची ही मागणी बाजीरावाकडे होती. अमृतरावाचें वयही आतां प्रौढ तिशीच्या वर असून त्यानें राज्याच्या घडामोडी पाहिल्या होत्या. अमृतराव म्हणे 'नाना-

जवळ द्रव्य आहे तें सरकारी खजिन्यांतून नेलें आहे. तें त्यांनीं सिंद्यास देऊन त्यांचे फौजेची फेड करावी. सवाई माधवरावाचे ल्हानपणीं नानांनीं कारभार केला हें ठीकच, परंतु आतां आम्ही सज्ञान झालों असतां कारभार आमचे हवालीं करून नानांनीं फक्त आपली फडणिशी सांभाळून असावें; आणि सरकारचा पैसा दाबून ठेविला आहे, + तो सिंद्यांस देऊन त्यांची खानगी उत्तरेंत करावी. सिंद्यांच्या राहण्यानें प्रांत ओस झाला, रयत नागवली, पुणें दरबारचा उपमर्द केला, बखेडखोर लोकांचे तंटे तोडण्याच्या निमित्तानें लोकांकडून मन मानेल तसा पैसा उकळला,' इत्यादि प्रकार अमृतरावास अत्यंत असह्य झाले. नाना बाजीराव यांचें पटणें शक्य नाहीं असें जाणून त्यानें आपला पक्ष बळकट केला. स. १७९७ च्या पावसाळ्यांत बाबा फडके, नारोपंत चक्रदेव, आबा शेलूकर, गोविंदराव पिंगळे व काळे या नानांच्या पक्षांतील मंडळींशीं बोलून त्यांस नानाकडून फितवून अमृतरावानें आपले लगामीं लाविलें, आणि त्यांपासून खर्चाकरितां थोडें बहूत द्रव्यही जमविलें. तसेंच बाजीरावाशीं इमानानें वागण्याच्या शपथा त्यानें हुजरातीच्या लोकांकडून घेवविल्या. नंतर अमृतरावानें काशीराव होळकरास फौजे सुद्धां आणून आपल्यागोटा शेजारीं उतरविलें. हा रोख पाहून नानानें अमृतरावाची समजूत काढली. त्यांचीं अनेक खलबतें होऊन एकवाक्यतेनें कारभार करण्याची योजना ठरली; परंतु ती बाजीरावाकडून मंजूर झाली नाहीं. बाजीरावास कोणतेंही बंधन नको होतें. अमृतराव कारभार पाहूं लागला, तेव्हां त्याजबद्दलही मत्सर उत्पन्न होऊन हा आपला भाऊ नानास मिळवून घेऊन त्याचे साह्यानें पेशवाई सुद्धां बळकावील, आणि आपणास कैद दाखवील, या भीतीमुळें बाजीरावानें अमृतरावाची योजना सिद्धीस जाऊं दिली नाहीं. वास्तविक त्या वेळीं कारभार म्हणजे राज्याचें जोखीम सांभाळून सगळ्या प्रकरणांची व्यवस्था लावणें असें नसून, केवळ तें पैसे उकळण्याचें साधन असेंच सर्वांस वाटत असे. कारभाराच्या या भानगडी लवकरच विकोपास जाण्याचा रंग दिसूं लागला. अमृतरावानें जहागीर घेऊन गंगातीरीं स्वस्थ बसावें, असाही एक मार्ग सुचविण्यांत आला. नानाला सुद्धां स्पष्ट दिसत होतें कीं, बाजीराव व सिंदे यांचा परिहार झाल्याशिवाय पुण्यास आपला निभाव लागणार नाहीं.

याच परिस्थितींत आणखी एक राजकारणी बनाव उत्पन्न झाला. इंग्रज व टिपू हे एकमेकांविरुद्ध वर्दळीस येऊन त्यांजमध्यें लवकरच युद्ध जुंपणार असा रंग दिसूं लागला.

+ —नानानें कोट्यावधि रुपये सरकारी खजिन्यांतले महाडचे प्रयाणांत लांबविले असें टोन लिहितो, त्यास यानें बळकटी येते.

टिपूच्या विरुद्ध स. १७९० त त्रिवर्गांचा तह झाला तो अद्यापि बंधनकारक होता; आणि युद्ध झाल्यास त्यांत निजामानें व मराठ्यांनीं इंग्रजांबरोबर आपल्या फौजा पाठविणें अवश्य होतें. निजामाची व इंग्रजांची गट्टी जमून त्यांच्या फौजा तयार होऊं लागल्या व तुम्ही आपल्या फौजा तयार करा अशी सूचना इंग्रजांकडून पेशव्यांस आली. नानास याची माहिती आगाऊच होती, आणि निजामास तर फौजेच्या खर्चा-करितां नानानें पैशाचा पुरवठा केला होता. सिंद्याशीं आपला बिघाड झाल्यास निजाम इंग्रजांच्या या फौजा आपल्या मदतीस आणाव्या अशी ही नानाची योजना होती. हे प्रयोग अगदीं गुप्तपणें चालले असले तरी त्यांची वदंता बाजीराव व सिंदे यांस थोडी बहुत कळतच होतीच. अर्थात् नानाविषयीं त्यांचा विशेष बेबनाव होण्यास हें आणखी एक कारण झालें.

टिपूच्या मदतीस मराठी फौज जाणें झाल्यास तिचें आधिपत्य स्वीकारण्यास परशुराम-भाऊ शिवाय अनुभवी सरदार दुसरा कोणी नव्हता. परंतु भाऊवर बाजीरावाचा अत्यंत रोष असून त्याजला कैदेंतून सोडूं नये अशीच त्याची इच्छा होती. तथापि सोडणेंच झाल्यास पुनः त्यास वर डोकें काढतां येऊं नये असा जबरदस्त दंड त्याजपासून घेऊन त्यापायीं सर्व घरदार भरीस घालण्याची पाळी त्याजवर आणणें हें तरी बाजीरावाचे हातचें होतें. भाऊ मांडवगणास रास्त्यांचे कैदेंत असून, त्याची सुटका करण्याविषयीं माधवराव रास्ते, समस्त पटवर्धन मंडळी व दुसरे पुष्कळ हितचिंतक यांची खटपट बाजी-राव, सिंदे व नाना या सर्वांकडे चालू होती. नानाचा भाऊवर मोठा राग असूनही त्याची सुटका करण्यास आपण साह्य करण्याचें त्यानें कबूल केलें. कारण अडीअडचणीस भाऊ इतका दुसरा गृहस्थ नानाचे उपयोगी पडणारा दुसरा नव्हता. स. १७९७ आगस्ट अखेरीस 'सिंदे सरकार वाड्यांत आले. तेथें संपत शनिवारीं तैलाभ्यंग होऊन भोजन झालें. परशुराम भाऊंच्या सुटकेविषयीं सिंद्यांनीं श्रीमंतांस विनंति केली. हरामखोर मी आहें; प्रथम संमत ( चिमाजी आपास नेण्यास ) न देतों तर भाऊंच्या हातून हें कृत्य होतें कीं काय ? मी हिंदुस्थानास गेल्यावर शत्रूवर जाण्यास येथें सरदार कोण आहे ? अंतर पडलें असतां, क्षमेंत आणोन सरकार कामावर पाडावें.' ऐसीं बोलणीं पडलीं, तेव्हां राज्यांतील दंगा वारला म्हणजे त्यांची सुटका होईल, असें श्रीमंत बोलले. त्यावरून पुढील सालीं सातारकर छत्रपतीवर स्वारी झाली, त्या संधींत म्हणजे ता. १६-६-१७९८ रोजीं दहा लक्ष दंड घेऊन बाजीरावानें भाऊची सुटका केली, तो प्रकार पुढें येईल.

सिंद्याच्या वर्मी लागणारी दुसरी एक गोष्ट याच वेळीं घडली ती अशी. महादजीच्या मृत्युसमयीं त्याच्या तीन बायका लक्ष्मीबाई, यमुनाबाई व भागीरथीबाई व रक्षा केशरी हयात होत्या. पैकीं भागीरथीबाई दौलतरावाचे लक्षांत मिळाली, यामुळें दुसऱ्या दोघींच्या मनांत वांकडेपणा आला. त्यांनीं दौलतरावास काढून दुसरा इसम सिंद्यांचें दौलतीवर आणण्याची खटपट चालविली, त्यावरून या बायांचें प्रकरण फारच विकोपास जाऊन पुढें चार वर्षे पावेतों लढायांनीं व बंडांनीं दक्षिणोत्तर प्रदेश व्यापून गेला, तो प्रकार पुढें यावयाचा आहे. या बायांस व महादजीच्या रक्षांस नानानें फूस देऊन आपल्या विरुद्ध उठविलें अशी दौलतरावास बातमी लागली. त्या उज्जन सोडून स. १७९७ च्या उन्हाळ्यांत थोडीबहुत फौज जमवून पुण्याजवळ येऊन ठेपल्या. सिंद्याचे फौजेंत शेणवी सरदारांचें प्राबल्य असून बाळोबा तात्या कैद झाल्यापासून ते दौलतरावावर रुष्ट होते, म्हणून त्यांचा पाठिंबा बायांस मिळाला. रक्षा केशरी इच्यामार्फत नानानें कारस्थान केलें त्याचा उल्लेख मागें आला आहे. बायांस नानांचा पाठिंबा मिळूं नये म्हणून हर उपायानें त्यास कारभारांतून काढण्याचा निश्चय दौलतरावानें केला.

स. १७९७ च्या पावसाळ्यांत सिंद्याच्या फौजेची विशेष हलाकी सुरू झाली. लोकांस फार दिवस पगार न मिळाल्यानें ते अत्यंत बेदील व बेफाम झाले. त्यांजपुढें पदर पसरून एक एक दिवस निभावतांना दौलतराव हैराण झाला. पगारांत लोकांनीं कितीहि सूट पत्करली तरी निदान साठ लक्ष त्यास फौज जगविण्यास तूर्तातूर्त हवे होते. या संबंधानें त्यानें बाजीरावाकडे तगादा केला. पैशाचें कूळ म्हणजे नाना व त्याचे अनेक साथीदार. त्यांस ठिकाणीं बसविल्याशिवाय पैसा मिळणें शक्य नाहीं, ही गोष्ट सर्जेराव घाटग्यानें दौलतरावास पटवून दिली. दुसरा कोणी वजनदार कारभारी या वेळीं सिंद्याजवळ नव्हताच. याच वेळीं दौलतरावाचें लग्न ठरत असून सर्जेराव घाटग्याचे मुलीस कोल्हापुराहून आणण्यास मंडळी गेली होती. अर्थात् सर्जेराव म्हणजे सिंद्याचा गळ्यांतला ताईत बनत चालला होता. असें म्हणतात कीं अफू मद्य अशांपैकीं सुद्धां कांहीं व्यसन दौलतरावास लावून त्या गुंगींत कसलेंही दुष्ट कृत्य करण्याची परवानगी सर्जेराव दौलतरावाकडून मिळवी. कदाचित् हा प्रकार बराच पुढचा असावा. निदान प्रस्तुत प्रसंगीं सर्जेरावाच्या सल्ल्यानें बाजीरावास तगादा करून दौलतरावानें त्याजकडून लेख करून घेतला कीं, 'तुम्ही वाटेल ती हिकमत करून नानास कैद करावें आणि त्याचें व त्याच्या पक्षांतील मंडळीचें द्रव्य घेऊन फौजेचें व सरकारचें देणें फेडावें.' बाजीरावाकडून असा लेखी हुकूम असल्याशिवाय एकट्या सिंद्याची नानास

पकडण्याची ताकद नव्हती. कारण निजाम, टिपू, इंग्रज व समस्त मराठमंडळ यांस पाहिजे तेव्हां हालविण्याची ताकद एका नानास होती. शिवाय वीस वर्षें जवळ राहून नानाचे सर्व व्यवहार सर्जेरावानें चांगले ओळखले होते. अर्थात् त्यास खालीं ओढण्याची मसलत एकटा घाटगेच करूं शकला. इत उत्तर चार दोन वर्षें त्यानें सर्व राज्यांत पाहिजे तसा धुमाकूळ घातला. त्यांतलें पहिलेंच कृत्य नानाची कैद होय.

एकंदरींत सवाई माधवरावाच्या मृत्युनंतर नानाच्या कारभाराची घडी बिलकूल बसली नाहीं. बाजीरावास वस्त्रें झाल्यावर २७ दिवसांनीं त्याजकडून नानानें आपल्या दत्तक पुत्राच्या संबंधात ता. ३१-१२-१७९६ रोजीं करार* लिहून घेतला, तो सुद्धां जुलमाचा रामराम दिसतो. स. १७९७ साल अखेर नानानें मोठ्या शिकस्तीनें काळ काढिला. त्यांत उत्तरोत्तर उभयतांचा बेबनाव वाढतच गेला. ३० सेप्टेंबरचा उल्लेख पहा. 'नाना श्रीमंतांस म्हणतात, आपला कारभार आपण करावा. मी वृद्ध जाहलों. स्नानसंध्या करीन.' पुढील दसऱ्याचे प्रसंगीं तर ही फूट वाढतच चालली. 'नानास प्रातःकाळीं वाड्यांतून श्रीमंतांचें बोलावणें गेलें. पुनः सीमोल्लंघनास स्वारी निघतांना बोलावणें गेलें. पुढें शमीपूजन करून स्वारी माघारी फिरली, तेव्हां नानाची स्वारी घासीरामाचे बागेनजीक गेली. बरोबर फडके, शेलूकर, शिरवळकर, दादा गद्रे व तीन हजार फौज होती. नाना अंबारींतच होते. तेथून अंबारीजवळ अंबारी लावून नजराणा सोनें अंबारींत बसूनच देऊन दोन घटका रात्रीस नाना आपले वाड्यांत आले, सरकार वाड्यांत गेले नाहींत. सिंदे स्वारी बरोबर गेले होते.' नानाच्या राहत्या बाजूस सिंदे शिकारीस वगैरे जाऊं लागले म्हणजे नाना आपला गोठ तयार करून बंदोबस्तानें राहत असे. 'गांवांत लोक नानाप्रकारें बोलतात. कोणे समयीं काय होईल न कळे. दसऱ्यानंतर पंधरा दिवसांनीं सिंद्याची स्वारी वाड्यांत आली. बरोबर फौज पांच सात हजार होती. नानाही वाड्यांत गेले. चार घटका खलबत जाहलें. नानांनीं सर्व कारभार करावा, सिंद्यानें हिंदुस्थानांत जावें असें ठरलें.' 'लगेच दुसरे दिवशीं नानांचें वैमनस्य यजमानांचे ठिकाणीं पक्कें झालें.' त्यापुढें १८ नोव्हेंबर रोजीं रात्रौ पर्वतीवर आतषबाजी जाहली. त्रिवर्ग श्रीमंत व बाईसाहेब गेले होते. नानाही गेले होते. तमाशा शिरा जाहला. अर्धरात्रीस स्वारी परत आली. सरकार वाड्यांत पहिल्यापेक्षां चौक्या पाहरा भारी तोडे शिलकावून उभे असतात, हें पाहून आठ दहा रोज वाड्यांत जातनासे जाहले. श्रीमंतांस म्हणों लागले, पलटणें उठवावीं, तो आणीक बंदोबस्त करतात. विचार

*पे. द. पृ. १७२; ख. ४०८१; पे. अ.

ठीक दिसत नाहीं. इकडे नानाचे पाहऱ्यावरही बंदोबस्त जास्त कडक जाहला. लोकांचें म्हणणें आठ चार रोजांत सिंदे नानास कैदेंत बसवितात. त्यांचे लोक यांणीं फितविले असें म्हणणें. सिंद्यांस नानांनीं ऐवज द्यावयाचा करार होता. त्यांतला थोडाबहुत ऐवज घेत गेले. बाकी छपन्न लक्ष राहिले, त्याची निकड सिंद्यांनीं भारी लाविली. नानांचें म्हणणें कूच झाल्याशिवाय ऐवज मिळत नाहीं. जांबगांवास गेल्यानंतर निंमे व गंगापार जाल्यानंतर निंमे याप्रमाणें देऊं. सिंदे म्हणतात, वोढीमुळें ऐवज हातीं आल्याशिवाय लोक कूच करीत नाहींत. शिवाय श्रीमंतांस तुम्हांकडून कांहीं वांकडें होऊं नये म्हणून गद्रे, शेलूकर, पिंगळे व बजाबा शिरोळकर या चौघांपैकीं दोन ओलीस द्यावे, एक संवत्सर यथास्थित चाललें म्हणजे सोडून देऊं, ऐवज आल्यावरोबर कूच करितों, पण नानास त्यांचा भरंवसा बिलकूल नाहीं. उभयतांचें बहुत वांकडें आलें आहे. अमृतरावाशीं नानाचें खलबत जाहलें.' असा प्रकार नोव्हेंबर अखेर चालला. ता. २३ डिसेंबरचें वर्तमान. 'तूर्त सिंद्यांचा व लेखकाचा ( नानांचा ) तह होत आहे. काय ठरतें पाहवें. सिंदे यांजकडील मोकील ( Michael Philose ) म्हणून पलटणचा सरदार आहे, त्यास नाना दरम्यान घेऊन सिंदे दक्षिणेंतून जावे अशी खटपट करीत आहेत. आजपर्यंत पांच सहादां समजी जाहली तशीच ही. सिंदे जातील तेव्हां देशाचा भोग संपेल.'

दसऱ्याचे सुमारास पूर्वीचा नूर पालटला. नानानें वाड्यांत जाण्याचें टाकलें. पेशव्याच्या वाड्याचे सभोंवार सिंद्याचे सक्तीचे पाहरे बसले. शहरांत चोहोंकडे गडबड उडाली. सरदार लोक व खुद्द नाना फडणीस आपापल्या फौजा रात्रंदिवस सज्ज ठेवून बंदोबस्तानें राहूं लागले. नाना हातचा निसटून जाणार; एकदां पुणें सोडून बाहेर गेल्यावर ठिकठिकाणची मंडळी येऊन सामील झाली, कीं त्यास पकडणें अशक्य होईल असें सिंद्यानें जाणून, सर्जेरावाच्या सल्ल्यानें त्याजवर कपटविद्येचा प्रयोग चालविला. बाहेरून नरमाईचीं बोलणीं बोलून सिंद्यानें नानास बेसावध ठेविलें. तरी नाना सहसा फसणारा नव्हे, परंतु युरोपियनांच्या भलेपणावर त्याचा विश्वास विशेष असल्यामुळें तो फसला. बाणाजी शेटे वगैरे आपले कारभारी सिंद्यानें प्रथम मध्यस्थीस घातले, कीं आम्ही आतां निघून जातों, एकवार तुम्ही आमचे येथें भोजनास यावें. ती गोष्ट नाना पत्करीना. तेव्हां मिकेल फिलोज म्हणून सिंद्यांच्या कंपूचा इटालियन सरदार होता, ज्यास आपले लोक मुकीर म्हणत, त्यास सिंद्यानें नानाकडे पाठविलें. सर्व घाट सर्जेरावानें या मुकीरास शिकवून ठेविला होता. मुकीरानें बायबलावर हात ठेवून

नानास शपथ दिली कीं सिंद्यांनीं आपला करार मोडल्यास मी तुम्हांस सर्व कंपूनिशीं सामील होईन. अशा प्रकारें मुकीर जामीन होऊन सिंद्यानें तळ हालविण्याची तयारी केली आणि त्यास निरोप देण्याकरितां नानानें त्याजकडे रविवार ता.३१ डिसेंबर रोजीं जाण्याचा ठराव झाला. या राजकारणांत नानाचे भरंवशाचा सरदार यशवंतराव घोरपडे (मुराररावाचा चुलतबंधु) हा सर्जेरावास सामील झाला आणि त्यानें सिंद्याचे मनांत कपट नाहीं अशी नानाची खातरजमा केली. त्या दिवशीं आपला आरबांचा रिसाला व कांहीं साथीदार बरोबर घेऊन नाना सिंद्याचे भेटीस गेला. थोडें औपचारिक बोलणें झाल्यावर नाना, सिंदे व मुकीर खलबतासाठीं निराळे जागेंत गेले. तेथें जातांच मुकीरानें नानास कैद केलें. नानाच्या लोकांनीं बराच दंगा केला, पण त्यांस सिंद्याचे फौजेनें उधळून लाविलें. त्या प्रसंगीं पुष्कळ आरब वगैरे मारले गेले. या बनावानें पुण्यांत मोठा हाहाकार उडाला. लोकांचीं तोंडें काळीं ठिक्कर पडलीं. पेशवाईचा लय होऊन आजच बेबंदशाहीस सुरवात झाली असें लोकांस वाटलें. मुकीराच्या या दगाबाजीबद्दल युरोपियन लोकांत त्याची भारी नाचक्की झाली. पुढें नानाची सुटका झाल्यावर सुडाच्या भीतीनें तो पळून मुंबईस गेला आणि त्याचा मुलगा फिडेल दौलतरावापाशीं राहिला. प्रस्तुत याचें कुटुंब ग्वालेरीस नांदत आहे. आबा शेलूकर, नारोपंत वैद्य, बजाबा शिरोळकर वगैरे जे नानाबरोबर गेले होते त्यांसही सर्जेरावानें पकडून दुसरे दिवशीं नाना व त्याचे सर्व साथीदार यांचे घरादारांची जप्ती केली, तो प्रकार पुढें येईल. केवळ द्रव्याच्या अभिलाषास्तव सिंद्यानें हा अतिप्रसंग आणिला. आरंभींच नाना उजळ माथ्यानें नेट देऊन पुण्यांत राहता तर दुष्टांस दाबांत ठेवून राज्य संभाळण्याची शक्ति त्यास आली असती असें वाटल्याशिवाय राहत नाहीं पैसा थोर कीं दानत थोर याची परीक्षा यांत होते.

वरील प्रकार खुद्द बाजीरावानें सिंद्याकडून करविला, आणि खालील आशयाची पत्रें मालिट, सातारचे व करवीरचे छत्रपति, रघूजी भोसले, गोविंदराव गायकवाड, गोवेकर फिरंगी, जंजिरेकर हबशी व टिपू वगैरेंस पाठविलीं. 'बाळाजी जनार्दन यांचे निष्ठेंत अंतर दिसलें; सबब अलिजाबहादर यांसी आज्ञा करून मशारनिल्हेस नजरबंद केलें. तुम्हांस कळावें. आपले स्नेहाचे सिलसिले सरकाराशीं पूर्वीप्रमाणें असावे.' नानास चार महिने सिंद्यानें आपले लष्करांत ठेवून पुढें नगरचे किल्ल्यावर पाठविलें. नगर सिंद्याचे ताब्यांत आल्यावर स. १७९८ च्या जुलई मासांत बाळोबासही तेथेंच त्यानें नेऊन ठेविलें. तेव्हां नाना तेथें गेल्यावर उभयतांची बोलणीं होऊं लागलीं.

नाना कैदेंत पडण्यापूर्वी बाजीरावाबद्दल लोकांत पुष्कळ आदर होता, तो आतां सर्व मावळला. इंग्रज रेसिडेंट यूटाफ पुण्यास होता, त्यानें तर बाजीरावाचा दुष्ट स्वभाव पूर्णपणें ओळखून त्याची हकीकत पूर्वींच वरिष्ठांकडे लिहून कळविली होती. मनुष्य कितीही जहांबाज असला तरी तो नेहमींच लोकांस कसा फसविणार ! कोणावरही विश्वास ठेवायचा नाहीं आणि सर्वांसच फसवायचें, हा बाजीरावाचा खेळ अव्याहत चालू राहिला, आणि हा खेळ खेळणारे लोक अंतीं स्वतःचाच सर्वस्वी घात करून घेतात, तशीच गत बाजीरावाची झाली. नानास अडकवण्याचे बेतांत अमृतराव, गोविंदराव काळे वगैरे कित्येक इसम बाजीरावास सामील होते, परंतु त्या सर्वांचा गुरु एक सर्जेराव मुख्य होता. नानाचा अडथळा दूर होतांच बाजीराव आपला कारभार स्वतःच पाहूं लागला. उगाच नांवापुरतें त्यानें अमृतरावास पुढें केलें. सर्व जमाखर्च बाजीराव आपले आपण लिहूं लागला. असे कित्येक जमाखर्च त्याच्या हातचे उपलब्ध असून त्यांत कित्येक रकमा सांकेतिक तपशिलानें लिहिलेल्या आतां समजत नाहींत.

नानास कैदेंत घालणें म्हणजे पार्यायानें राज्यनाश करणें हें पाप बाजीरावानें जोडिलें. त्यांतून नानाच्या पेक्षां जास्त चांगला कारभार चालविण्याची व्यवस्था त्यानें ठरविली असती तर ती गोष्ट वेगळी. पण केवळ नानाच्या पैशाच्या लोभास्तव दोघां तरुणांनीं हा निंद्य प्रकार केला. त्या योगें पुण्यांत व बाहेर लगेच दंगल मात्र सुरू झाली, तिचें स्वरूप पुढील वाक्यांत दिसतें. " नानास कैदेंत घालण्याचा विधि समाप्तीस गेला. या उपरी श्रीमंतांचे राज्याचा आळा गेला. आतां जो जबरदस्त त्याचें पागोटें वांचेल. " वस्तुतः येथपासून सर्जेराव हा एक नवीनच शनि राज्यास उत्पन्न झाला. नानाचे चार हजार आरब शहरांत होते, त्यांच्या पगाराची बाकी न चुकवितां त्यांस पलटणांकडून उधळून लावावें किंवा मारून टाकावें असा बाजीरावाचा बेत होता. पण आरबांनीं शहराची नाकेबंदी केली, आणि ' आपण लढून, मरून जाऊं, पण तलब भागल्याखेरीज निघून जाणार नाहीं, ' असा निरोप बाजीरावास पाठवितांच, त्यास कळून चुकलें कीं, आपल्या वाड्याजवळ या आरबांची व सिंद्यांच्या पलटणांची लढाई जुंपणार, तेव्हां घाबरून त्यानें आरबांचा पगार चुकवून त्यांस मार्गस्थ केलें. त्यानंतर सिंद्यांची पलटणें वाड्याच्या बंदोबस्तास होतीं तीं परत पाठवून त्यानें तेथें आपलीं नवीन तयार केलेलीं पलटणें आणलीं आणि त्यांवर मुख्य अंमलदार आबा काळे यास नेमिलें. अमृतरावानें बॉयड ऊर्फ बैट यास स. १७९६ त नोकरीस ठेविलें, तो अगोदरच स. १७९७ त परत गेला होता.

सिंद्याचा कारभार सर्जेरावाकडे येऊन फकीरजी गाढवे, बाणाजी शेटे व यादवराव भास्कर हे त्याचे मदतनीस होते. ही मंडळी वारंवार स्वतः शहरांत फिरून पटवर्धन, फडणीस, सावकार मंडळी वगैरेंचे वाडे टेहळून पुढील उपक्रमाचे बेत ठरवीत. ' सरकारांत पैसा नाहीं. सिंद्यांच्या जबरदस्तीपुढें कांहीं एक चालत नाहीं. दौलतीमध्यें हाक मारावयास माणूस नाहीं, तूर्त प्रबलता सिंद्यांची, आमचा धनीपणा त्यांच्या स्वाधीन, असें श्रीमंत म्हणतात. पुण्यांत लोक बहुत तजावजा जाले आहेत. सरकारवाड्यांत पांचशें पात्र भोजनास होतें. पण कोणाची कोणास दाद नाहीं. राज्य बुडतें ही काळजी कोणास आहे ! कारभारी घाटगे तेव्हां परिणाम ईश्वर लावील. मोरोबादादांस आणावें असें श्रीमंतांनीं म्हणतांच सिंदे त्यांजपाशीं तीस लाख मागतात; पण त्यांजपाशीं विषभक्षणास पैसा नाहीं. बाळोबातात्यांकडे सिंद्यांनीं पत्रें पाठविलीं कीं तुम्ही येऊन कारभार सांभाळावा. त्यांनीं साफ सांगितलें, ' बहुत दिवस सेवा केली, त्याचें सार्थक जालें. याउपर कारभारांत पडावें असा अर्थ नाहीं.' सर्व राज्य डुलावयाचा समय आहे. बळवंतराव नागनाथास श्रीमंतांनीं वामोरीहून आणून वस्त्रें दिलीं. ' अशा रीतीनें नाना कैद झाल्यामुळें राज्यास घसरपट्टी लागली तिचें वर्णन आतां पुढच्या प्रकरणीं करूं.

---

# प्रकरण तिसरें

## सिंदे बायांची चढाई, पटवर्धनांचा नाश.

**आज भाऊला मारिला सुभा बुडाला ।**
**आज बाजू मोडली चिरा ढांसळला ॥**
**कोण सावरून धीर देतो अवघ्याला ।**

प्रभाकर–

१ सर्जेराव घाटगे. २ महादजीच्या बायकांचें दौलतरावांशीं युद्ध.
३ छत्रपतींची चढाई. ४ करवीरकरांशीं नानाचा करार, भाऊची कुचंबणा.
५ पट्टणकुडीची लढाई, भाऊचा मृत्यु व योग्यता. ६ कोल्हापुरावर मोहीम, अपुरा सूड.

**१ सर्जेराव घाटगे.**—पुढील हकीकत समजण्यासाठीं सर्जेरावाचें आदिवृत्त समजून घेणें अवश्य आहे. बाजीरावाच्या अमदानींत मराठी राज्याचा नांवलौकिक

जाऊन त्याचा त्वरित नाश होण्यास ज्या कित्येक व्यक्ती कारण झाल्या, त्यांत सखाराम घाटगे सर्जेराव याचें नांव प्रमुख आहे. अडचणींनीं घेरून गेलेल्या बाजीरावानें बुद्धिपुरःसर असली व्यक्ति हाताशीं धरली, यांतच बाजीरावाचा अधःपात दिसून येतो.

कागलकर सखाराम घाटगे याचें मूळचें नांव तुळजोजीराव. तो आपल्या भाऊबंदांशीं भांडून एका घोड्यानिशीं घराबाहेर पडला आणि त्यानें परशुरामभाऊच्या पदरीं शिलेदारीची नोकरी धरिली. पुढें स. १७७८ त मोरोबा दादाच्या बंडखोरीच्या प्रसंगीं नाना फडणिसानें भाऊच्या मार्फत चार पांचशें निवडक आणि विश्वासु माणसें आपले चाकरीस ठेविलीं, त्यांत हा सर्जेराव भाऊच्या शिफारसीनें नानाच्या नोकरींत आला. स. १७९६ च्या फाल्गुनांत नाना पुण्याहून पळून साताऱ्यास गेला, तेव्हां सर्जेरावानें नानास सोडून दौलतरावाची नोकरी पत्करिली. म्हणजे अठरा वर्षें तो नानाच्या नोकरींत होता. तेवढ्या दीर्घ कालांत नानाच्या अनेक नाजूक व भल्याबुऱ्या कामगिऱ्या उठवून पुण्याच्या ऱ्हासकालीन राजनीतींत तो पूर्ण तरबेज झाला. एवढ्या दीर्घ कालांत नानाला त्याची खरी किंमत अलबत कळली असली पाहिजे. एकदम नानाची नोकरी सोडून दौलतरावाची पत्करण्यांत नानाचीच शक्कल कारण झाली असावी. कारण दौलतरावास आपल्या तंत्रानें चालविण्याचा नानाचा प्रयत्न फार दिवस चालू होता. सर्जेरावानें सिंद्याकडे गेल्याबरोबर दौलतरावाचा व बाळोबा तात्याचा विश्वास चांगलाच संपादन केला. बाजीरावास सिंद्यानें अटक केली, तेव्हां बाळोबानें जीं आपलीं विश्वासु माणसें त्याच्या बंदोबस्तास नेमिलीं त्यांत सर्जेरावाची नेमणूक होती. 'नाना जिवंत असे पर्यंत सिंद्यानें बाजीरावाचे रक्षणाकरितां दक्षिणेंत राहवें, आणि सिंद्याच्या फौजेचा खर्च बाजीरावानें चालवावा,' असा त्या दोघांचा गुप्त करार सर्जेरावाचेच मार्फत ठरला होता.

सर्जेरावाची मुलगी बायजाबाई इचा जन्म स. १७८४ त झाला. तिच्या आईचें नांव सुंदराबाई ऊर्फ नानीसाहेब, ही सातरजवळच्या बाजीराव पाटणकराची मुलगी. बायजाबाई तत्कालीन स्त्रियांत फार सुस्वरूप म्हणून नांवाजलेली होती. ती गौरवर्ण, सुदृढ, सशक्त, धाडशी व घोड्यावर बसण्यांत पटाईत होती. तिच्या स्वाभाविक सौंदर्यास वरील गुणांची जोड मिळाल्यामुळें, लहानपणींच तिची कीर्ति महाराष्ट्रांतील थोर सरदारांत पसरली. कित्येक इतिहासकारांनीं तिला ' दक्षिणची सौंदर्यलतिका '* अशी संज्ञा दिली आहे. दौलतरावासारखा तरुण, ऐश्वर्यवान व रंगेल सरदार तिच्या

---

* Beauty of the Deccan. पारसनीस कृत बायजाबाई; खरे; पे. अ.

सौंदर्यावर लोलुप होऊन तिला वरण्यास अत्यंत उत्कंठित झाला. खरे लिहितात, ‘ बायजाबाई ही फार सुंदर असून उपवर होती. दौलतरावाच्या मनांतून तिच्याशीं लग्न करावयाचें होतें. परंतु सिंद्यांची जातकुळी हीन असल्यामुळें आपण त्यांस मुलगी देणार नाहीं असें सर्जेराव म्हणत होता. हें त्याचें म्हणणें बाह्यात्कारीं होतें. आंतून इच्छा अशी होती कीं पुष्कळ दौलत व अधिकार मिळाल्यास सिंद्यांस मुलगी द्यावयाची; व तसें त्यानें केल्यावर श्रीमंतांनीं सिंद्यांची दिवाणगिरी सर्जेरावास द्यावी व त्याच्या द्वारें सिंद्यांस दोन कोट रुपये द्यावे. या देणगीबद्दल सिंद्यांनीं बाजीरावास गादीवर बसविण्याविषयीं नानास मदत करावी; इतकेंच नाहीं, तर पुढें ते नानाच्या कह्यांत न सांपडतील व नानापासून त्यांचें रक्षण होईल असा बंदोबस्तही करावा.’ हा गुप्तरूपें झालेला करार नानास कळला नाहीं हें सांगावयास नकोच.

स. १७९७ च्या पावसाळ्यापासून लग्नाची बाटाघाट चालू झाली. घाटग्याचीं मुलेंमाणसें कागलास होतीं, त्यांस आणावयास सिंद्याचे दोनशें स्वार व लवाजमा जुलई १७९७ त करवीरास गेला. घाटग्याची मुल सिंद्यांस द्यावयास केली तिला नेणार, अशी बातमी ते लोक सांगूं लागले. कोल्हापुरमहाराजांचे कारभारी रत्नाकरपंत यांनीं महाराजांस मसलत दिली कीं मूल देऊं नये. तिला सामानगडाकडे पळविली, ( सेप्टेंबर ). त्यावरून दौलतरावानें जबरदस्तीचा धाक दाखवून व निकडीचीं माणसें पाठवून मुलगी पुण्यास आणिली.

पुढें हें लग्न नाना सिंद्याचे कैदेंत पडल्यावर फाल्गुन शु. ११ ता. २६-२-१७९८ रोजीं झालें. ‘ लग्नसोहळा फारच थाटाचा झाला. रुप्याचें बोहलें व सोनेरी चांदवा त्यास मोत्यांच्या झालरी याप्रमाणें भारी काम जाहलें. हा आप्त संबंध घडून येतांच सर्जेरावाच्या शिलेदारीचें एका बलाढ्य सरदारच्या दिवाणगिरींत रूपांतर झालें; आणि त्याचें खरें कर्तृत्व पूर्णपणें झळकूं लागलें.’ मात्र दौलतरावाशीं झालेलें बायजाबाईचें लग्न करवीरकरांस बिलकूल पसंत पडलें नाहीं. ‘ घाटगे यांनीं छत्रपतींस लग्नचिठी पाठविली होती, त्या कारकुनास करवीरकर महाराज अधिक उणें बोलले. त्याजवरून छत्रपतींचे वकील पुण्यांत होते त्यांस २३-३-१७९८ रोजीं सिंद्यांनीं कैद करून लष्करांत नेलें.’ रा. खरे लिहितात, स. १७९६ पासूनच्या सहा सात वर्षांत सर्जेरावानें धरपकड, खून, लूट व जाळपोळ यांचा कहर उडवून दिला आणि रणधुमाळींत प्रांतचे प्रांत उद्ध्वस्त केले. यावरून घाटगे हा पाषाणहृदयी, आगलाव्या, आणि आडमुठा शिलेदार होता, असें मात्र समजूं नये. केवळ लष्करी सामर्थ्यावरच त्यानें हें सर्व घड-

वून आणिलें नाहीं, त्याचें बुद्धिसामर्थ्यही अलोट होतें. बाजी–दौलत सर्जेराव या त्रुकुटापैकीं पाहिल्याला नुसतें डोकें तर दुसऱ्याला नुसते हातच होते. पण तिसरा दोहोंनींही संपन्न होता. त्याच्या धूर्तपणापुढें मोठमोठ्या मुत्सद्यांनीं हात टेकले. त्याच्या चाणाक्षपणापुढें सर्वांचीं कारस्थानें लटपटलीं. त्याच्या धाडसापुढें मोठमोठे वीर हतवीर्य झाले. त्यानें शेंकडों कारस्थानें केलीं, परंतु एकांतही त्याचा डाव फसला नाहीं. मग सर्जेरावाच्या गुणसंपन्नतेचा राज्याच्या नाशाकडेच उपयोग कां झाला? याचें उत्तर आमचें व्यक्तिप्रधान राजकारण होय. बाजीराव व दौलतराव या दोन धन्यांशिवाय इतर मराठी राज्य तो जाणतच नव्हता.' ता. २५-८-१७९८ रोजीं दौलतरावानें त्यास अटकेंत ठेविलें, त्यांतून त्याची सुटका बायजाबाईनें उपासतापास करून ता. ४-१-१८०० रोजीं करविली, तो प्रकार यथावकाश कळून येईल. सर्जेरावाचें उत्तर चरित्रही मराठशाहीशीं पहिल्या इतकेंच संलग्न असून तें पुढें प्रकरण १८ त दिलें आहे.

**२ महादजीच्या बायकांचें दौलतरावाशीं युद्ध** * (१७९८–१८००).— महादजीच्या पश्चात् त्याच्या तीन बायका लक्ष्मीबाई, भागीरथीबाई व यमुनाबाई व रक्षा केशरी यांचा दौलतरावाशीं बेबनाव झाल्याचा उल्लेख मागें आला आहे. दौलतरावाचें दत्तविधान झालें त्या वेळीं लक्ष्मीबाईनें त्यास हरकत घेतली; पण बाकीच्यांनीं त्यास संमति दिल्यावर आणि दौलतरावानें सर्वांचे बंदोबस्त यथायोग्य करून देऊं असें वचन दिल्यावर त्याचें दत्तविधान झालें. पुढें दौलतरावास पैशाची अडचण उद्भवली, त्यामुळें बायकांची उज्जनीस आबाळ होऊं लागली, तेव्हां आपली व्यवस्था लावून घेण्याकरितां त्या स. १७९७ त पुण्यास आल्या. तेथें भागीरथीबाई व दौलतराव यांची सलगी जमली ती बाकीच्यांस खपेना. संतापाचे भरांत त्या अद्वातद्वा बोलूं लागल्या. नानाचा त्यांस पाठिंबा होता. त्यांत लक्ष्मीबाई पूर्वींच विरुद्ध होती तिनें विशेष पुढाकार घेतला. सर्जेरावानें त्यांस भेटून समजूत घालून जांबगांवास नेण्याचा प्रयत्न केला. पण त्या दोघींनीं सर्जेरावाचें तोंड सुद्धां पाहयचें नाहीं असें ठरविलें. त्या सर्जेरावाची भेट घेईनात, तेव्हां त्यानें जबरदस्तीनें त्यांस तंबू बाहेर ओढून चाबकांनीं बेदम मारिलें. हा प्रकार सर्वांसच अयोग्य वाटला. विशेषतः महादजीच्या वेळचें या बायांचें वैभव पाहिलेल्या शेणवी सरदारांस तो फार झोंबला. त्यांनीं बायांच्या तर्फेनें दौलतरावाशीं रदबदल चालविली. त्यांची समजूत काढण्याचें निमित्त करून दौलत-

* ग्वा. गॅझेटियर; Macdonald; पे. अ; खरे; जी. च. २४५, २५४, २५५, २५८, २५९; त. क. पृ. १५७.

रावानें त्यांस बऱ्हाणपुरास ठेवण्याचें ठरविलें. परंतु सर्जेरावाची खात्री झाली कीं शेणवी सरदारांचा बंदोबस्त केल्याशिवाय आपला कारभार निर्विघ्न चालणार नाहीं. बायांस नानाचें पाठबळ मिळूं नये म्हणून त्यास अगोदरच अडकविण्यांत आलें होतें. बायजाबाईचें लग्न उरकतांच मार्चच्या पहिल्या आठवड्यांत नारायणराव जिवाजी बक्षी व देवजी गौळी यांस नगरचे किल्ल्यांत कैदेंत ठेविलें. पुढें लवकरच रायाजी व रामजी पाटील हेही दूर झाले.

बायांची चीजवस्त व जडजवाहीर दौलतरावाजवळ होतें तें घेतल्याशिवाय त्या बाहेर निघत ना, म्हणून वैशाख व॥ ३० चे दिवशीं त्यांस सर्जेरावानें मारहाण करून जबरदस्तीनें पालख्यांत बसविलें. त्यांनीं अतिशय आक्रांत केला, तो पाहून सर्वांचीं अंतःकरणें विव्हळ झालीं. आपणास बऱ्हाणपुरास ठेवण्याचें नुसतें निमित्त आहे, उलट नगरासच कैदेंत ठेवण्याचा गुप्त हुकूम सिंद्यानें दिला आहे, अशी गुणगूण बायांस लागली. बायांच्या मारझोडीचें वर्तमान ताबडतोब बाहेर पसरलें, आणि दौलतरावाची जिकडे तिकडे नाचक्की होऊं लागली. तेव्हां लोकांची समजूत काढण्याच्या उद्देशानें त्यानें नारायणराव बक्षी व देवजी गौळी यांस नगराहून आपले जवळ आणून पूर्वीचे कारभार करण्यास सांगितलें. नारायणराव म्हणाला, मला तुमचा कारभार नको, मर्जीस आलें तर पोटास द्या. आणखी बहुत आर्जवें केलीं, तेव्हां तो पुनः काम करूं लागला. एकदम सोडून गेल्यास बायांचें काम बिघडेल तेव्हां त्यांच्याच आज्ञेवरून तो कामावर राहिला. उत्तर हिंदुस्थानांतही लखबादादा व जगोबा बापू ह्यांची व इंग्रजांची लढाई जुंपली. नारायणरावानें कारभार हातीं येतांच सारी फौज एकत्र जमविली. त्याची ही तयारी पाहून सर्जेरावानें दौलतरावास समजाविलें, नारायणराव बक्षीचे डोकें मारावें. हें वर्तमान बक्षीस कळतांच बक्षी उघडपणें फौजेसह निघून बायांकडे गेला. त्याजबरोबर देवजी गौवळी व मुजफरखान पठाण हेही जाऊन बायांस मिळाले. त्या वेळीं बायांचा मुक्काम कोरेगांवीं होता ( ता. ७-६-१७९८ ). इतकी तयारी झाल्यावर बाया उघडपणें दौलतरावावर चाल करून थेऊरावर आल्या, आणि घाटग्यास पकडून त्याचें पारिपत्य करण्याच्या उद्योगास लागल्या. खुद्द लक्ष्मीबाई हत्तीवर बसून लढाईचा पुढाकार घेत होती. इकडे यापूर्वीच अमृतराव बाजीरावास सोडून बाहेर पडला, तोही जाऊन बायांस मिळाला; आणि दौलतराव तुम्हांस कसे पकडतात पाहूं या, अशा इरेनें तो बायांचें साहित्य करूं लागला.

बायांस पकडणें बाजूस राहून उलट त्याच आपणांवर चालू आल्या; तेव्हां आपणही

कोणीच लढाईचा सल्ला देईनात. ते म्हणूं लागले 'तुम्हीं लढतां कोणाशीं? मातुःश्रींची समजूत काढा.' इकडे याच वेळीं चिमाजी आप्पाचें लग्न झालें त्याची वरात उत्तर रात्रीं शनिवारवाड्यांत येऊन दाखल होते न होते, तोंच तिकडे वानवडीवर सिंद्यांच्या पलटणांची व बायांची लढाई जुंपली. मध्यरात्रीपासून उभयतांची तोफांची मारामारी चालू झाली. उजाडल्यावर बायांनीं सिंद्याच्या छावणीस वेढा घातल्याचें दिसून आलें. तेव्हां त्यांस हाकून लावण्यासाठीं सिंद्यानें डु-प्रॅट यास पलटणें व तोफा देऊन पाठविलें. परंतु त्यास बायांनीं दाद दिली नाहीं. उलट त्याजवरच त्यांनीं अशी लगट केली कीं, मोठ्या शिकस्तीनें पलटणांनीं आपली छावणी गांठली. तेव्हां मात्र दौलतराव अत्यंत घाबरून गेला. बायांस मुख्य आधार अमृतरावाचा होता. त्याला बाजीरावानेंच चिथविलें असावें अशी दौलतरावाची खात्री झाली. दौलतरावास काढून आम्हीं दुसरा इसम दौलतीवर बसविणार अशी घोषणा बायांनीं चालविली. दौलतरावाच्या पलटणांत त्यांनीं फितूर केला. तेव्हां नाइलाज होऊन, दौलतरावानें रायाजी व रामजी पाटील आणि आबा चिटणीस यांस बायांकडे मध्यस्थीस पाठवून, तुम्ही सांगाल तें मी कबूल करतों, अशा प्रकारचें समेटाचें बोलणें अत्यंत नम्रपणानें सुरू केलें. वास्तविक हा सर्व घाट बायांस फसवून त्यांस कबजांत आणण्यासाठीं सर्जेरावाचे शिकवणीनें दौलतरावानें रचिला होता. 'मातुःश्रींचा आग्रह कीं, हल्लीं सर्जेराव वगैरे पांच असामी कारभारांत आहेत, त्यांस आमचे हवालीं करा; आणि महादजीच्या वेळच्या माणसांस कामावर परत घ्या; नाहीं तर काय घडेल तें घडो.' सर्जेरावास बायांचे हातीं देण्याचें दौलतरावानें कबूल केलें नाहीं. तेव्हां समेट फिसकटून पुनः उभय पक्ष वरदळीवर आले. अमृतराव व बाया कूच करून खडकीवर गेल्या. ते थोडेसे बेसावध असतां दौलतरावाचे पलटणांनीं ता. २५-६-१७९८ रोजीं अमृतरावाचे गोटावर अचानक तोफांचा मारा चालू केला. ताबूत थंडे करण्याचे निमित्तानें खडकीचे पुलानजीक ताबूत पोंचविल्यावर तशींच पलटणें अमृतरावांवर चालून गेलीं. त्या चकमकींत अमृतरावाची अत्यंत वाताहत झाली. त्याचे डेरे, जामदारखाना, भांडीं सुद्धां सर्व सामान लुटलें गेलें. बाजीराव दुरून मुग्धतेनें गंमत पाहत होता. गर्दींत अमृतरावाची स्त्री व पुत्र विनायकराव पळून पाषाणास गेलीं; आणि स्वतः अमृतराव मागें हटून विठ्ठलवाडीवर गेला. तेथें बायांची फौज, शेणवी आणि मराठे सरदार त्यास येऊन मिळाले. दुसऱ्या दिवशींही लढाईचा लाग साधला नाहीं. ता० २७ च्या रात्रीं अंधारांतून पलटणांची व बायांच्या फौजेची सारखी मारामारी चालू होती. पुढें सिंद्याची

फौज बहुतेक बायांस मिळाली. शिकेकटार, जरी पटका देखील बायांकडे गेला. पलटणें तेवढीं दौलतरावाजवळ राहिलीं. तेव्हां तो अगदीं काकुळतीस आला. अमृतराव म्हणजे तरी पर्यायानें यजमानच. त्याच्यावर सेवकानें शस्त्र धरिल्यामुळें सिंद्यास बाहेर तोंड काढतां येईनासें झालें. तेव्हां रायाजी व रामजी पाटील यांस बाजीरावाकडे पाठवून सिंद्यानें गुन्ह्याची माफी मागितली; आणि विनंति केली कीं आपणच अमृतरावाची व बायांची समजूत काढा. तुम्हीं ठरवाल त्याप्रमाणें मी बायांचा सरंजाम निराळा तोडून देतों असें बोलून जवाहीर व सामान दौलतरावानें अडकवून ठेविलें होतें तें सर्व व बायांस देण्याकरतां पोषाख त्यानें बाजीरावाकडे पाठविले. त्यावरून बाजीरावानें जाऊन बायांची भेट घेतली. जवाहीर व पोषाख त्यांनीं घेतलेच नाहींत. उत्तर केलें कीं, आपण धनी, आज्ञा करतां उत्तम आहे, पण सखाराम घाटगे वगैरे सहा असामी आमचे स्वाधीन करा आणि मग काय तें बोला. सिंद्यास हें बोलणें पटलें नाहीं. तेव्हां बायांनीं मारूं किंवा मरूं अशा निश्चयानें पुनः युद्धास कंबर बांधली. अशा अडचणींत बाजीरावाचें वर्म नाना, हें ओळखून दौलतरावानें त्यास नगराच्या बंदींतून आपल्याजवळ आणण्याचा निश्चय केला. पण चाललेली भयंकर परिस्थिति पाहून नानानें नगराहून पुण्यास येण्याचें नाकारलें.

बाजीरावाकडून बायांची तोड पडेना, तेव्हां त्यांनीं जुलैच्या आरंभीं दक्षिणेस मोर्चा वळवून शिवापुरावर मुक्काम केला, आणि अमृतराव वगैरे मंडळी सभोंवारचा प्रदेश उद्ध्वस्त करीत राहिली. यामुळें दौलतराव बाजीराव दोघेही चिंताक्रांत झाले. एवढा विकोप होण्याचें आदिकरण सर्जेराव हें आतां सर्वांसच कळून चुकलें होतें; आणि सिंद्याचा पगडा आपल्यावर एवढा बसला हें बाजीरावास दुःसह होत होतें. उलट सिंद्यास वाटूं लागलें कीं बाजीरावानेंच बायांस व अमृतरावास आपल्यावर उठविलें. तेव्हां नानास बाहेर आणलें कीं बाजीराव नरम पडला ही युक्ति त्यानें योजिली. नानाकडून चांगला पैसा उपटावा आणि त्याजकडून बायांची समजूत घालावी असें ठरवून, फकीरजी गाढवे यास फौज देऊन नानास आणण्यास त्यानें नगरास पाठविलें. दोन कोट रुपये द्या म्हणजे तुम्हांस सोडतों असें फकीरजीनें नानाशीं बोलणें लाविलें. पण नानाही त्यास वस्तादच भेटला. तो म्हणाला, मी कोठेंही असलों तरी एकच. तरी तो दहा लक्ष देण्यास तयार झाला. तेवढ्यांतच संतुष्ट राहणें सिंद्यास भाग पडलें. करार ठरला कीं नानास पुण्यास नेऊन त्याचे हातीं कारभार दिला म्हणजे आणखी पंधरा लक्ष रुपये द्यावे. असा ठराव होऊन ता. १५–७–१७९८ रोजीं नाना नगराहून निघाला तो

दुसरे दिवशीं गारदौंडावर आला. 'पुण्यांतील प्रकार म्हणावा तर कोणाचा पायपोस कोणाचे पायांत नाहीं. कोणांत कोणी मिळत नाहीं. दौलतरावाचा पाय कंपूंतून बाहेर पडत नाहीं. इंग्रज बळावले. इंग्रजमय होतें यांत संशय नाहीं,' अशी लोकवार्ता या वेळीं चालू होती. नाना आल्याचें वर्तमान पलटणांस कळतांच त्यांनीं नानावर चाल केली. सिंद्याची हुकमत कंपूवर चालेना. तथापि बाजीरावाचे आग्रहावरून सिंद्यानें नानास १७ जुलई रोजीं आपले गोटांत आणिलें. बजाबा शिरवळकर पिंगळे वगैरे त्यास जाऊन भेटूं लागले. 'बाजीराव द्वामुष आहेत. कोणीकडे कल देतील नकळे.' नानावर तोडगा म्हणून त्यानें मोरोबास सोडून शिवनेरीस आणिलें. हा सर्व खटाटोप बायांची समजूत काढण्यासाठीं होता. परंतु तो सिद्धीस जाण्याचा संभव दिसेना. दुर्जन* वगैरे कंपूचे अधिकारी फितले होते ते केव्हां काय दगा करतील याचा दौलतरावास विश्वास येईना. नानाही वाटेल त्या शकला काढून आपली वाट लावील अशी त्यास भीति पडली. तेव्हां सर्व कलहाचें मूळ सर्जेराव त्यास नाइलाजास्तव दूर करण्याचें दौलतरावानें मनांत आणिलें. त्यास एक कारणही घडलें. फकीरजी गाढव्यानें पलटणांतील पाहेरेकऱ्यांस जखमी केलें, त्यावरून ता. २५ जुलै रोजीं 'घाटगे, गाढवे, यादो भास्कर व त्याचा बंधु असे चौघे कैद केले. मुकेल फिरंगीच्या मुलानें धरले. सर्जेरावाच्या मुसक्या बांधून बाजारांतून बंदुकीच्या कुपणानें मारीत पलटणांत घेऊन गेले. तेथें एक दिवस शेतखान्यांत कोंडून ठेविलें होतें. दुसऱ्या दिवशीं बाहेर काढून पाहऱ्यांत ठेविलें. त्याचा गोट लुटला. घाटग्यास जखम जाहली.' कंपूचें व इंग्रज वकील पामर यांचें एक चित्त होतें. नानास साह्य करण्याविषयीं इंग्रज उत्सुक होते. परंतु

---

* **दुर्जन**—(Drugen)-सिंद्याच्या पहिल्या कंपूचा अंमलदार. स. १७९८ त त्याचे जागीं डु प्रॅट (Duprat) ची नेमणूक झाली. दुर्जननें एक वर्ष काम केलें. तो सव्हॉय परगण्यांतला राहणारा हिंदुस्थानांत फ्रेंच लष्करांत नोकरीस राहून पुढें १७९४त डी बॉयनचे हाताखालीं राहिला. स. १७९५त तो पेरॉनचे हाताखालीं दक्षिणेंत आला. नंतर डी बॉयनचे जागीं पेरॉनची नेमणूक झाली, तेव्हां पेरॉनचे जागीं दक्षिणेंत दुर्जन कायम झाला. स. १८०० त त्याची नेमणूक दिल्लीस होऊन बादशहाचा सांभाळ त्याजकडे आला. त्या वेळीं त्याचा पगार दरमहा रु. ८०० होता. स. १८०३ त बूर्क्विननें पेरॉनचे विरुद्ध बंडावा केला तेव्हां त्यास दुर्जननें दिल्लींतून काढून दिलें. इंग्रजांनीं दिल्ली हस्तगत केल्यावर दुर्जनास कैद करून कलकत्त्यास पाठविलें. तेथून तो युरोपास जाऊन पुढें स. १८२४ त नीस येथें मृत्यु पावला.

नाना कारभार अंगावर घेण्यास कबूल नव्हता. त्यानें दहा लक्ष रक्कम सिंद्यास दिली. मध्यंतरी बायांनीं उत्तरहिंदुस्थानांत आपला पगडा बसविला. लखबा लाड त्यांस सामील झाला. त्याजकडून बायांस खर्चास येऊं लागलें; आणि तो स्वतः फौज घेऊन दक्षि- णेंत येतो अशी बातमी आली. भोसले निजामांच्या फौजा पुण्याकडे चाल करून येऊं लागल्या. तेव्हां पुण्यास रणकंदन माजणार अशी स्थिति प्राप्त झाली. लोकांनीं शहर सोडून बाहेर वाटेल त्या रीतीनें आपला बचाव करावा अशी ताकीदही बाजीरावानें लोकांस दिली. त्यावरून शहर गडबडलें. ता. १९ सेप्टेंबर रोजीं बाजीराव, अमृतराव, सिंदे व नाना यांनीं गुलटेकडीनजीक मोरोबा दादाचे बागेंत गुप्तपणें भेटून अरिष्ट- निरसनाचा विचार केला. नंतर दोन दिवसांनीं सिंदे व नाना बाजीरावाकडे भोजनास आले. बोलणीं होऊन बायांस आणण्यासाठीं बजाबा शिरोळकरास रवाना केलें. पण जम बसला नाहीं. पुढें बाजीरावाचे मार्फत सिंद्यानें अमृतरावास ता. १-१०-१७९८ रोजीं स्वतंत्र जहागीर सात लक्षांची करार करून दिली, तेव्हां त्यानें बायांचा पक्ष सोडिला. तेणेंकरून बाया उघड्या पडल्या. त्यांचा पुरस्कर्ता मुज्फरखान पठाण ता. १७-१२-९८ रोजीं मरण पावला. लखबादादा इकडे येत असतां त्याजवर उज्जन नजीक अंबूजी इंगळ्यानें चाल केली, त्या प्रसंगांत लखबाचा मोड झाला. या कारणांनीं बायांची बाजू पुष्कळ खचली. तरी त्यांची समजूत न होतां त्यांनीं आपला धुमाकूळ चालूच ठेविला स. १७९८ च्या डिसेंबरांत दौलतराव एक दिवस शिकारीस गेला असतां त्यास बायांच्या फौजेनें गांठलें. कंपूनीं कुमक केली म्हणून तो बचावला. यानंतर स. १७९९ च्या आरंभीं बायांनीं आपला मोर्चा दक्षिणेस वाई, कोल्हापुरकडे वळविला त्याचें वर्णन आतां दिलें पाहिजे.

बायांचे सरदार यशवंतराव शिवाजी वागळे यानें खानदेश नासिक प्रांतीं मोठा धुमाकूळ उडवून दिला. नासिक क्षेत्रास त्यांच्या पठाणांनीं भारी उपद्रव केला. बायकांची अब्रू घेतली; शेंदोनशें बायकांनीं प्राणत्याग केले. पुण्याहून बाया जांबगांवास गेल्या. त्या दोघी मोठ्या धीट व घोड्यावर बसण्यांत पटाईत होत्या. केव्हां निराळ्या राहून मुलुखगिरी करीत तर केव्हां एकत्र राहत. दौलतरावाच्या बोलण्यावर व कृतीवर त्यांचा बिलकुल विश्वास नव्हता. रामजी पाटलास दौलतरावानें त्यांजकडे बोलावयास पाठविलें. ' पण घडी बिघडोन माघारे आले. बायांचें म्हणणें जुने कारभारी आणून त्यांनीं आमचा जम बसवून द्यावा. ' तेव्हां जानेवारी १७९९ चे आरंभीं दौलतरावानें आबा चिटणिसास कैदेंतून सोडवून जवळ आणिलें. सिंद्यानें सामोरें जाऊन त्याचा

सत्कार केला. आबा सरकारवाड्यांत जाऊन बाजीरावास भेटला. नानांचीही भेट घेतली. अशीं सर्वांशीं खलबतें करून आबानें सिंद्याचा कारभार हातीं घेतला. ' आबा आल्यापासून लुच्चांचा कारभार कमी झाला. ' दौलतरावानें हिंदुस्थानास जाण्याची सिद्धता केली, परंतु बायांची समजूत पडली नव्हती. त्या कूच करून श्रीगोंद्याचे सुमारें गेल्या. लक्ष्मीबाईवर दौलतरावाचा कटाक्ष विशेष होता. ता. १५-१-१७९९ रोजीं त्यांचा मुक्काम कासेगांवावर झाला. तेथून परशुराम भाऊचे आश्रयास जाण्याचें ठरवून त्यांनीं आपला मोर्चा मिरजेकडे फिरविला. फेब्रुवारींत त्यांचा मुक्काम इंदापुरावरून नीरेवर व पुढें शंभुमहादेवापर्यंत आला. ' इंदापुरास मनस्वी खंडणी घेतली. सांगोलें ओस झालें. पुढें बाया माळवणीस आल्या. तेथें निंबाळकराशीं त्यांची लढाई झाली. गांवोगांव रोखे करून पैसे घेतले. मुलखांत भारी दहशत पडली. यवन लोक अनिवार, त्यांनीं ४०-५० गोवध केले. पटवर्धनांना आपला मुलख संभाळण्याची धास्ती पडली, पुढें बाया औंधास आल्या. तेथून त्यांनीं परशुरामभाऊस निरोप पाठविले व कोल्हापुरास शिव छत्रपतीकडे भेटीसाठीं माणसें पाठविलीं. नारायणराव बक्षी त्यांजबरोबर राहून दौलतरावास पेंचांत आणण्यासाठीं अपरिमित कष्ट करीत होता. फेब्रुवारी अखेर त्या जतचे जवळ आल्या. त्या ठिकाणीं त्यांचा मुक्काम दोन महिने झाला. या वेळीं त्यांच्या मनांतील हेतु असा होता, कीं परशुरामभाऊस सामील करून घ्यावें आणि त्याचे मार्फत नाना व बाळोबा यांस वळवून दौलतरावास नरम करावें. पटवर्धनांचें व करवीरकरांचें उघड वैमनस्य होतें हें जाणून प्रथम बायांनीं पटवर्धनाशींच बोलणें केलें पण परशुरामभाऊ तेव्हां धारवाडाकडे वसुलीस गेला होता, म्हणून त्याची व बायांची भेट झाली नाहीं. तेव्हां त्यांनीं छत्रपतीकडे माणसें पाठविलीं. छत्रपतीनें बायांस आदर दाखवून खर्चास दिलें. ता. १३-३-१७९९ रोजीं भेटीचा समारंभ झाला. बायांजवळ या समयीं देवजी गौळी मुख्य होता. " तिसरे प्रहरीं महाराज बायांचे डेऱ्यास आले, भेटी व पोशाख झाले. नंतर दीड महिना पावेतों उभयतांचा मुक्काम जवळ जवळच होता. ता. २८-३-१७९९ रोजीं बाजीरावानें परशुरामभाऊस लिहिलें, बायांचा समेट झाल्याशिवाय सिंदे हिंदुस्थानास जात नाहींत, सरकारांतून समेटाचीं बोलणीं चाललीं आहेत. तुम्हीं बायांस करवीरकरांशीं मिळूं देऊं नये. ते एक झाल्यास जमाव भारी पडून मसलत लांबेल. ता. ८-४-१७९९ रोजीं लक्ष्मीबाईनें महाराजांची भेट घेतली, तेव्हां महाराजांनीं पांच हजार फौज कुमकेस देण्याचें वचन दिलें. महादजीच्या रक्षेची मुलगी लग्नाची होती ती महाराजांच्या दासीपुत्रास दिली.

ता. १४-५-१७९९ रोजीं हें लग्न कृष्णातीरीं अकीवाट येथें मोठ्या समारंभानें झालें. या पलीकडे करवीरकरांचा उपयोग बायांस बिलकूल झाला नाहीं. लग्न होतांच त्या परत पुण्याकडे वळल्या.

आबा चिटणिसाकडे दौलतरावाचा कारभार आला, पण त्याच्या हातून पैशाचा पुरवठा होईना व त्याच्या दारांत फौजेचीं धरणीं बसलीं. एकदां पठाणांनीं त्यास पाहाऱ्यांत बसविलें. तेव्हां आबाचा भाऊ कृष्णोबा यानें पठाणांवर लगट केली. त्या प्रसंगीं कृष्णोबास वार लागून तो घायाळ झाला. ऐन वेळीं दौलतराव तेथें आला म्हणून त्याचे प्राण वांचले, ( ता. १--३-१७९९ ). चिटणिसाचे हातून जम बसेना, तेव्हां बाळोबा व सर्जेराव यांस सोडण्याचा विचार दौलतरावानें मनांत आणिला. सर्जेरावास सोडावें तर नाना, बाया व शेणवी सरदार विरोधी होणार. बाळोबास सोडावें तर बाजीरावास वैषम्य वाटणार. तथापि बाजीरावाची समजूत काढतां येईल असें मनांत योजून बाळोबा, त्यांचा पुतण्या धोंडीबा व बाजीबा मोदी या तिघांस मुक्त करून दौलतरावानें ता. २२-४-१७९९ रोजीं आपले जवळ आणिलें. ' तात्या पागनीस आले. सर्व बंदोबस्त बायांचा सुद्धां करतीलसें दिसतें. पेरूचें हिंदुस्थानांतून लिहून आलें कीं हिंदुस्थान लखबानें घेतलें. तात्या पागनीस सुटून आले नाहींत तर सिंद्यांची दौलत राहत नाहीं,' असा हा पेच होता. परत येतांच बाळोबानें नानास व आबा चिटणीसास भेटून त्यांची चित्तशुद्धि केली; आणि इतःपर सर्वांनीं नानाचे विचारें वागावें असें ठरविलें.

या पूर्वीच दौलतरावानें बाबूराव आंग्रे व गोपाळराव चिटणीस यांस बायांचे पिच्छावर रवाना केलें होतें. ते रस्त्यानें खंडण्या वसूल करीत मिरजेकडे येऊं लागले , तेव्हां बायांनीं भाऊस मध्यस्थी करण्यास बोलाविलें. या संबंधांत भाऊनें बाजीरावास व नानास अगत्यवादाचीं पुष्कळ पत्रें लिहिलीं. बाळोबानेंही बायांस पत्रें लिहून पुण्यास बोलाविलें. त्याप्रमाणें बाया व सरदार सर्व परत फिरले, ते ता. १५-६-१७९९ रोजीं रहिमतपुरचे आसपास आले. इकडून बाळोबा तात्या व आबा चिटणीस त्यांचे भेटीस गेले. मौजे साप येथें भेटी होऊन महिनाभर वाटाघाटी झाल्या. नगरच्या किल्ल्यांत आमची वस्त आहे ती आधीं आमची आम्हांस द्यावी असा सवाल बायांनीं बाळोबास टाकला. ही वस्त म्हणजे दौलतरावाचे लक्षांत वागणारी भागीरथीबाई. ही गोष्ट बाळोबानें मान्य केली नाहीं. परंतु पुढें अल्पावकाशांत ता. १५–८-१७९९ रोजीं ' पाटीलबावांची स्त्री ' दौलतराव यांनीं विटाळली होती ती नगरांत देवाधीन झाली. सिंदे

यास सुतक आहे. समेटाची याद घेऊन बाळोबा, आबा व आंग्रे पुण्यास आले आहेत. सुतक संपल्यावर समजाविशीचा विचार होईल.' असा प्रकार घडून भागीरथीबाईच्या मृत्यूनें एक मोठी अडचण नाहींशी झाली. नारायणराव बक्षी व यशवंतराव शिवाजी यांचा विचार समेटास अनुकूल नव्हता. परंतु बाळोबा व आबा चिटणीस यांच्या वजनानें तूर्त हा समेट घडून आला. ता. १२-७-१७९९ रोजीं याद ठरली ती अशीः—(१) अशेरच्या किल्ला बायांस द्यावा. (२) खर्चास दहा लक्षांचा सरंजाम तोडून द्यावा. (३) बायांची फौज दौलतरावानें आपल्या नोकरींत घ्यावी. (४) सर्जेरावास दौलतरावानें आपल्याजवळ ठेवून घेऊं नये. (५) बायांचें कर्ज तपास करून वारावें. (६) बायांच्या पक्षानें लढणारे नारायणराव बक्षी वगैरे सरदार यांस कोणताही उपसर्ग करूं नये. (७) करवीरकरांचें व परशुराम भाऊंचें ऐक्य करून द्यावें. अशीं सात कलमें कैक दिवसांच्या वाटाघाटीनें ठरून तीं अमलांत आणण्याची जामीनगिरी बाळोबा व आबा चिटणीस यांनीं पत्करिली, तेव्हां दोनही लष्करें पुण्याकडे आलीं. ' बाळोबा व आबा यांनीं सिंद्यांच्या घरचा कलह मोडला. बायांचें म्हणणें आम्हीं दौलतरावाची भेट न घेतां परभारें बऱ्हाणपुरास जाऊं. नारायणराव बक्षी व यशवंतराव शिवाजी वागळे यांस दौलतरावाचा भरंवसा पुरेना. सिंद्यांचा मानस बायांची भेट घ्यावी असा फार आहे. बाया म्हणतात भेटीचें प्रयोजन काय?' शेवटीं एकदांचा समेट घडून आला व सन १७९९ च्या गणेश चतुर्थीचा समारंभ पुण्यास थाटाचा झाला. तेवढ्यापुरती तरी गणेशानें सर्वांस सुबुद्धि दिली. बाळोबा, धोंडीबा, आबा व गोपाळराव चिटणीस, परशुरामभाऊ, बाबूराव आंगरे, बाजीबा मोदी, बाणाजी शेटे वगैरे सर्व प्रमुख मंडळी वाड्यांत श्रीमंतांकडे व बायांच्या गणपति उत्सवास जाऊन नानाची भेट घेऊन गेले. बायांच्या समेटांतील कलमें अमलांत येण्यास थोडा अवधि लागला. तोंपर्यंत त्या परभारें जांबगांवास जाऊन राहिल्या. दौलतरावाचें मुखावलोकन त्यांनीं केलें नाहीं.

प्रमुख मुत्सद्यांचा हा समेट केवळ क्षणभंगुर ठरला. दौलतरावानें बायांस अतिशय भीड घातली कीं, आपला आमचा तंटा तुटला आहे, त्याअर्थीं आपण आतां आमचे जवळच राहवें आणि कारभार सुधारावा. आम्ही आपले हुकमाबाहेर वागणार नाहीं. हें वचन मान्य करून त्या पुण्याकडे येऊं लागल्या आणि त्यांचा एक सरदार बाळाजी कृष्ण मुलखांत लुटालूट करीत होता तो बायांच्या मुक्कामाजवळ येऊन उतरला. त्याच वेळीं सिंद्यांचीं कांहीं पलटणें पारनेराकडे जात होतीं तीं बाळाजी कृष्णाच्या शेजारीं येऊन उतरलीं. त्या पलटणांची व बाळाजीची पूर्वीची चुरस होती. दसऱ्याच्या दिवशीं पहांटे

( ८–१०–१७९९ ) पलटणवाल्यांनीं बाळाजीच्या लष्करावर तोफा मारून त्याचा सर्व गोट लुटला. त्यावरून दुसऱ्या दिवशीं बायांच्या सर्व सरदारांनीं पलटणांवर चाल केली. त्या समयीं लढाई होऊन उभय पक्षीं चारपांचशें माणूस ठार झालें. या बनावामुळें पुनः बायांचा विश्वास नाहींसा होऊन त्या परत वाघोलीकडे गेल्या. तेथें दौलतरावानें त्यांची समजूत घालण्यास धोंडीबा दादा व सदाशिव मल्हार यांस पाठविलें; आणि अशी विनंति केली कीं, आपण धनीच आहां, गुन्हेगारांस काय शिक्षा करणें ती करा. असें सांगून पलटणांतील गोऱ्या अंमलदारांस बायांपुढें नेऊन उभे केलें. त्यांनीं टोप्या काढून क्षमा मागितली; आणि बाळोबा तात्या, आबा चिटणीस व ते गोरे अंमलदार यांनीं बायांशीं इमानानें वागण्याची लेखी हमी लिहून दिली. अशा प्रकारें बायांची समजूत होऊन त्या भिमेच्या काठीं तुळापुरास येऊन राहिल्या. नारायणराव बक्षीनें सिंद्यास भेटून आपली निखालसता केली. तदनंतर सुमारें दोन महिने पावेतों बाया व दौलतराव यांच्यांत विशेष कांहीं तफावत पडली नाहीं. पण तितक्यांत विघ्नसंतोषी सर्जेरावास कैदेंतून सोडवून दौलतरावानें आपल्याजवळ आणिलें. सुटल्यानंतर दहाव्याच दिवशीं त्यानें बायांवर मारेकरी घालून आपल्या दुष्टपणाचा प्रभाव त्यांस दाखविला. ता. १४–१–१८०० रोजीं पहांटेचे प्रहररात्रीस धाकटी यमुनाबाई* हिजवर निजली असतां कुणी हत्यार चालविलें. पाठीवर तरवारीचा एकवार भारी लागला. गलबल झाली तेव्हां एक मारेकरी ठार, एक जखमी झाला व एक शाबूत सांपडला. चौकशी करतां त्यांनीं सर्जेरावाचें नांव लिहून दिलें; आणि बायांस जिवें मारावें असा बेत सांगितला. त्यावरून जामीन राहिलेले बाळोबा, आबा चिटणीस व पलटणवाले सर्वच शरमिंदे झाले. बाया बिथरून पुनरपि पूर्व पदावर आल्या. येथून त्यांच्या आख्यानाचा आतां उत्तरार्ध सुरू व्हावयाचा आहे.

**३ छत्रपतींची चढाई**+ (स. १७९८).–दौलतराव व बाजीराव यांचा कारभार मराठशाहीस आतां कसा ग्रासणार याची कल्पना मागील भागावरून सहज होण्याजोगी आहे. सातारा व कोल्हापुर येथील छत्रपतींशीं तर बाजीरावास युद्धच करावें लागलें. या प्रकारास सातारकर महाराजांचा दंगा अगर छत्रपतींची बंडखोरी अशीं नांवें इतिहासांत

* या यमुनाबाईचें वर्ष श्राद्ध ९ सफर ( २१–१–१८१५ ) रोजीं झाल्याचा उल्लेख आहे, त्यावरून तिचा मृत्यु ता. १–२–१८१४ रोजीं झाला असें ठरतें. लक्ष्मीबाई स. १८०६ पर्यंत जिवंत होती.

+ धा. शा. च; मोडक क्र. को. इ.; खरे.

प्रचलित झाल्याचें पाहून उद्वेग वाटल्याशिवाय राहात नाहीं. वास्तविक छत्रपति हे राज्याचे चालक व मालक, परंतु पेशवे स्वपराक्रमानें राज्याचें हित पाहत होते तोंपर्यंत छत्रपतीची लायकी नालायकी पाहण्याचा प्रसंग आला नव्हता. सवाई माधवरावाच्या मृत्यूनंतर पेशव्यांचे घरांत लायक इसम राहिला नाहीं, तेव्हां दत्तविधानांनीं लायक पेशवा उत्पन्न करणें शक्य नाहीं ही गोष्ट उघड होऊन बाजीरावास वस्त्रें मिळालीं, तेव्हां नानाचें महत्त्व कमी करण्यासाठीं बाजीरावानें महाराजांस वचन दिलें होतें, कीं 'आपणांस थोरल्या शाहू महाराजांप्रमाणें सर्व अधिकार देऊन मी थोरल्या बाजीरावाप्रमाणें पराक्रम व सेवा करून आपलें वैभव वाढवीन.' पुढें नानास अधिकारावरून काढल्याचें वर्तमान बाजीरावानेंच छत्रपतीस कळविलें त्या वेळीं सातारा, प्रतापगड, रायगड, लोहगड वगैरे किल्ल्यांवर नानाची हुकमत होती ती दूर करून नानाचे हुकूम कोणी मानूं नयेत अशी ताकीद बाजीरावानें दिली. सातारा किल्ला व शाहूनगर आणि छत्रपति व त्याचें कुटुंब यांजवर नानाची नजर सक्त असून तेथें बंदोबस्तासाठीं त्याच्याच विश्वासाचे बाबूराव कृष्ण आपटे व सदाशिवपंत अभ्यंकर हे होते. या दोघांस कैद करून आपणच किल्ल्याचा बंदोबस्त ठेवावा अशीं पत्रें बाजीरावानें छत्रपतींस पाठविलीं. त्यास तरी हेंच पाहिजे होतें. छत्रपतींनें लगेच सोयरे व मानकरी असे शंभर प्रमुख लोक भोजनासाठीं म्हणून किल्ल्यावर बोलाविले; आणि त्यांस बरोबर घेऊन शहरांत बाबूराव आपट्याचे वाड्यावर चाल केली, त्या वेळीं बाबूरावाचा पुतण्या वामनराव यानें तलवारीनें लढून शिपाईगिरीची शर्थ केली. जखमा लागल्या. एक तलवार पडली असतां आंतून दुसरी आणून चालविली, तेव्हां महाराज त्यास बोलले, 'तुझी शिपाईगिरीची शर्थ झाली, याउपर मारला जाशील तेव्हां त्यानें पायांवर डोई ठेविली, महाराजांनीं बाबूराव व सदाशिवपंत यांस कैद करून किल्ला व शहर ताब्यांत घेतलें; आणि दोन हजार जमाव व्यंकोजी मोहिते याच्या हाताखालीं बंदोबस्तास ठेविला. तथापि पैशावांचून त्यांची फार हैराणगत झाली. महाराजाचा बंधु चतुरसिंग यानेंच या कामीं मुख्य पुढाकार घेतला. बापूजी महाडिक, भवानजी शिर्के व व्यंकोजी मोहिते यांचे साह्यानें सातारचे लहान थोर भट भिक्षुकसुध्दां छत्रपतींनीं अनुकूल करून घेतले. त्यांचा हा उद्योग बळावत चाललेला पाहून दौलतरावास शंका आली कीं, छत्रपतीस नानाकडून प्रोत्साहन मिळत असावें. यास्तव त्यानें नानास ता. ६-४-१७९८ रोजीं वानवडीवरील आपल्या गोटांतून काढून नगरचे किल्ल्यावर नेऊन ठेविलें.

सातारकर व कोल्हापुरकर छत्रपति पेशव्यांवर कधींच संतुष्ट नव्हते. अलीकडील तीस वर्षांत नानानें दोघांसही दाबून टाकलें होतें. पुढें महाड येथें गेल्यावर त्यानें जीं

अनेक कारस्थानें उभीं केलीं त्यांत त्यानें कोल्हापुरकर व निजाम यांस ऐवजाचा भरणा करून त्यांकडून फौजा उभ्या केल्या. परशुरामभाऊ व त्याची मंडळी पुण्यास गुंतल्या-मुळें करवीरकरांस कर्नाटक मोकळें सांपडलें. रत्नाकरपंत राजाज्ञा हा त्यांचा हुशार व एकनिष्ठ सेवक सामना करण्यास ठासून उभा राहिला. त्यानें कर्नाटकांत स्वारी करून तिकडील प्रदेश हस्तगत केला. पुढें इकडे सातारकरांनीं पेशव्यावर चढाई सुरू केली, त्या कामीं कोल्हापुरची मदत आणण्यासाठीं सातारकरांनीं चतुरसिंगास कोल्हापुरास पाठविलें. तो तेथें मोहिमेचा बेत ठरवून परत आला. तदनंतर कोल्हापुरकर छत्रपति फौज घेऊन सदलगें येथें आले. तेथें चतुरसिंग जाऊन त्यांस भेटला. चतुर-सिंगाचे डेऱ्यास येऊन महाराजांनीं त्याची गांठ घेतली. उभयतां कूच करून शिरोळा-वरून साताऱ्याकडे निघाले. कऱ्हाडच्या दक्षिणेस पांच मैलांवर काळें येथें त्यांनीं तळ दिला. इतक्यांत पावसाळा सुरू झाला. कऱ्हाड हें प्रतिनिधीचें मुख्य ठिकाण असून तेथें कृष्णा व कोयना उतरल्याशिवाय पुढें जाण्यास मार्ग मिळेना. कऱ्हाडांत भवानराव प्रतिनिधीची स्त्री काशीबाई व कारभारी कात्रे पेशव्यांचे लक्षांत वागत होते. काशीबाई हिम्मतवान व पराक्रमी होती. तिनें करवीरकरांस कोयनेवर अडवून धरलें. परोपरी विनवणी केली असतां ती करवीरच्या फौजेस आपल्या मुलखांतून पुढें जाऊं देईना. नाना फडणिसाचा पुतण्या अंताजी कृष्ण हा तेथें प्रतिनिधीस या प्रसंगीं सल्लामसलत देत होता. तेव्हां खुद्द कऱ्हाडावरच ता. २१–७–१७९८ रोजी छत्रपतीनें चाल केली, पण त्यांत त्याचा मोड झाला. यामुळें सातारची कुमक कोल्हापुरकरां-कडून झाली नाहीं.

छत्रपतींनीं साताऱ्यास आपला अम्मल बसविला, त्यामुळें बाजीराव अत्यंत चिन्ता-क्रान्त झाला. त्यानें शिवराम नारायण थत्ते यास साताऱ्यास पाठवून याचे स्वाधीन किल्ला करावा असें छत्रपतीस लिहिलें. पण छत्रपतींनीं थत्ते यास जुमानलें नाहीं, तेव्हां बाजीरावानें माधवराव रास्ते याची रवानगी साताऱ्यावर केली. स. १७९८ च्या एप्रिलांत रास्ते साताऱ्यास पोंचला. वेण्णेच्या पलीकडे मुख्य फौज ठेवून स्वतः रास्ते कांहीं थोडे लोकांनिशीं शाहूनगरांत पेशव्यांचे वाड्यांत जाऊन उतरला. छत्रपतीनें त्याच्याशीं वाटाघाटींत कालहरण चालवून दौलतराव व सर्जेराव यांजकडून फौजेची मदत मागितली. सर्जेरावानें फौज पाठविण्याचें कबूल केलें, आणि छत्रपतीस नेटानें लढण्यास सांगितलें. या कारणावरून बाजीरावाचें व सिंद्याचें अतिशय वांकडें आलें, आणि घाटग्यास कारभारांतून काढा असा तगादा त्यानें लाविला. घाटग्याकडून फूस मिळ-

तांच छत्रपतींनें रास्त्यास लिहून कळविलें कीं, तुम्हीं बऱ्या बोलानें सातारा सोडून निघून जा; नाहीं तर लढून तुमचा पाडाव करूं. त्यावरून शिवरामपंत थत्ते पुण्यास परत निघून गेला. तेव्हां बाजीरावानें छत्रपतीशीं तडजोड करण्यास कृष्णराव तात्या जोशी यास पाठविलें. ता. १६-६-१७९८ रोजीं महाराजांच्या लोकांनीं किल्ल्यावरून उतरून रास्त्यास शहरांतून हाकून दिलें. रास्ते चीजवस्त टाकून जीव बचावून निघून गेला. शहरांतून महाराजांनीं आपल्या चौक्या बसविल्या. रास्त्यानें तोफाही चालविल्या, पण इलाज चालला नाहीं. उलट वेण्णेच्या कांठचा आपला तळ उठवून त्यानें तो मागें कृष्णेच्या अलीकडे आणिला; आणि परशुरामभाऊस सोडून फौजेसह मदतीस पाठवाल तर हें अरिष्ट टळेल असें बाजीरावास जोरानें लिहून कळविलें.

इतका प्रकार झाला तेव्हां बाजीराव अगदींच घाबरून गेला. याच वेळीं तिकडे बायांचें युद्ध रंगांत येऊन सिंद्यानें अमृतरावाचा पाडाव केला हें मागें सांगितलेंच आहे. अशा अडचणींत परशुरामभाऊची सुटका करणें त्यास भाग पडलें. सिंदे, अमृतराव वगैरे सर्वच भाऊस सोडण्यास अनुकूल होते. बाजीरावाचाच त्याजवर काय तो मोठा दांत. भाऊची प्रकृतिही मांडवगणास अतिशय खालावली म्हणून त्यास वाई प्रान्तीं हवाफेर करण्यास नेण्याची सूचना रास्त्यांनीं बाजीरावाकडे केली. पण पैसे उकळल्याशिवाय त्यास सर्जेराव कसा बाहेर जाऊं देणार ? नाहीं होय करतां भाऊनें वीस लक्ष रुपये गुन्हेगारीबद्दल भरावे, रकमेचा भरणा होईपर्यंत कैदेंतच आहों असें समजावें, तूर्त साताऱ्यास जाऊन रास्त्यांना मदत करावी, आणि साताऱ्चें काम आटोपल्यावर दंड न भरल्यास रास्त्यांनीं पुनः त्यास आणून हजर करावें, असा करार ठरवून ता. १६-६-१७९८ रोजीं परशुरामभाऊ साताऱ्याकडे निघाला. ता. २५ जून रोजीं त्याची व रास्त्याची भेट वंदन किल्ल्याखालीं झाली. त्या वेळीं उभयपक्षीं मोठी खुशाली झाली. भाऊ सुटून आल्याचीं पत्रें मुलखांत जातांच लगोलग त्याची फौज गोळा झाली. मध्यंतरीं महाराजांनीं बेरड लोक नोकरीस ठेवून त्यांजकडून पेशव्यांच्या फौजेचा उच्छेद चालविला होता, तरी सिंद्याची अगर कोल्हापुरची मदत छत्रपतीस न आल्यानें त्याची बाजू लंगडी पडली. खर्चास पैसा नाहीं, जवळ कसलेलें मनुष्य नाहीं, अशा फिकिरींत ते जेरीस आले. त्यांनीं निर्वाणीचीं पत्रें कोल्हापुरास पाठविलीं, परंतु कोल्हापुरची फौज कऱ्हाडावर अडकून पडल्यामुळें ती साताऱ्यास येऊं शकली नाहीं. पुढें सर्जेराव घाटगेही कैद झाला, तेव्हां सिंद्याकडील मदतीची आशा होती ती साफ खुंटली. जुलई महिन्यांत रास्तेभाऊंनीं सर्व जमवाजमव

करून ऑगस्टच्या आरंभीं साताऱ्यावर चाल केली. ता. ४ ऑगस्ट रोजीं लढाईस तोंड लागलें. छत्रपतीच्या लोकांस मागें हटवून शहरांत घातलें. त्या कामीं छत्रपतींची पुष्कळ वाताहत होऊन त्यांनीं सलूखाचें बोलणें चालू केलें. बोलण्याचे नादांत कालहरण-करून कोल्हापुरची फौज येईतों निभवावें असा त्यांचा घाट होता. भाऊनें ता. ९ ऑगस्ट रोजीं तीन टोळ्या करून शहराच्या चौक्या बसविल्या. महाराज निघून किल्ल्यावर गेले. व्यंकोजी मोहिते व चतुरसिंग चालून आले तेव्हां लढाई झाली त्यांत मोहिते पडले. चतुरसिंग व भवानजी शिर्के पळून कोल्हापुरकडे जाऊं लागले त्यांचा पाठलाग हरि परशुरामानें करून वसन्तगडाखालीं त्यांचे पुष्कळ लोक पाडाव केले. तरी ते दोघे जीव वचावून कोल्हापुरास पळून गेले. परशुरामभाऊनें शाहूनगर लुटलें, तक्ताची वगैरे अमर्यादा बहुत केली. त्यांनीं किल्ल्याखालीं तळ दिला; आणि महा-राजाशीं बोलणें लाविलें. इतकें होई तों नाना फडणिसाची सुटका नगराहून झाली, आणि पुनः सातारचा बंदोबस्त बाजीरावानें त्याजकडे दिला. रास्त्यांनीं किल्ला घेण्याचा सिद्धान्त केला तों रामराजाची स्त्री आईसाहेब हिनें महाराजांस न कळवितां खालीं येऊन रास्त्याशीं ठराव करून त्याचे लोक किल्ल्यांत घेतले. बरेच दिवस उभयतांच्या बोलाचालींत गेले. ता. ३१-८-१७९८ रोजीं आईसाहेब भाऊचे भेटीस आलीं. बोलणें होऊन करार ठरला. महाराजांचे माणूस खालीं उतरून रास्त्यांनीं आपले वर चढविले. महाराजांनीं कोल्हापुरास पळून जाण्याचा बेत केला होता, परंतु भाऊनें तो सिद्धीस जाऊं दिला नाहीं. त्यानें सातारची व्यवस्था रास्त्याकडे सोंपवून आणि बाजी-रावाकडे दहा लक्ष दंड भरून आपली मोकळीक करून घेतली. नंतर लगेच गणेश चतुर्थीच्या उत्सवासाठीं ( ता. ११-९-१७९८ ) तो स्वगृहीं तासगांवास गेला. हाच त्याच्या आयुष्यांतला शेवटला उत्सव होय. ( इ. स. सरंजामयादी नं. १८ ).

**४ करवीरकरांशीं नानाचा करार व परशुराम भाऊची कुचंबणा** ( स. १७९८-९९ ).—सातारकडील प्रकरणाची निरवानिरव होते तोंच कोल्हापुरचें प्रकरण धसास लागलें. चतुरसिंग भोसले व व सिंदे बाया कोल्हापुरचे आश्रयास गेल्या. रास्ते पटवर्धनांशीं लढून चतुरसिंग आणि भवानजी शिर्के बाहेर पडले ते ऑगस्टांत कोयनापार होऊन करवीरचे फौजेंत मिळाले. तेथें त्यांनीं सातारची खट-पट पुढें सारखी चालू ठेवली. मात्र करवीरकरांस आतां साताऱ्याकडे लक्ष देण्यास अवकाश राहिला नाहीं. रत्नाकरपंत राजाज्ञा सावनूर पर्यंत अंमल बसवीत गेला होता, त्याजवर पेशव्यांचा सरदार धोंडोपंत गोखले चालून गेला. त्यांच्या अनेक

लढाया झाल्या, त्यांत रत्नाकर पंताचा पराजय होऊन तो माघारा आला. विशेषतः ता. ३-१०-१७९८ रोजीं जी लढाई झाली तींत करवीरचे पुष्कळ सरदार पडून नुकसानी झाली. इकडून साताराची कामगिरी उरकून परशुराम भाऊही मोठी फौज जमवून लगबगीनें प्रथम सुरापुर प्रांतांत खंडणी वसूल करण्यास गेला. तिकडून गोखल्याचे मदतीस जाण्याचा त्याचा विचार होता. रत्नाकरपंत परत येऊन मनोळीवर आपला जमाव करून बंदोबस्तानें राहिला. खुद्द शिवाजी महाराज नोव्हेंबरचे अखेरीस रत्नाकर पंताचा पाठ पुरावा करण्यास तिकडे गेला, तेव्हां पटवर्धनांचा व करवीरकरांचा वैरभाव विकोपास जाऊं लागला. सन १७९८ चे दसऱ्यानंतर नानास कारभारावर घेणें बाजीरावास भाग पडलें. इकडे सिंद्याचा सर्व कारभार त्या वेळीं सर्जेरावाकडे असून त्याचा कायमचा संबंध कागल जहागिरीमुळें करवीरकरांशींच होता. शिवाजी महाराजानें नाना, सर्जेराव व दौलतराव यांस पत्रें पाठवून पटवर्धनाशीं लढण्यास फौजेची मदत मागितली. त्यानंतर लवकरच सिंदे बाया कोल्हापुराकडे वळल्यामुळें यांस मदत न करण्याबद्दल उलट दौलतरावासच छत्रपतींचीं आर्जवें करणें भाग पडलें. दुसरें असें कीं छत्रपतींचा हा सर्व उठावा मूळ नाना फडणिसानें केला होता. परशुराम भाऊच्या मुलखावर स्वारी करण्यास प्रथम नानानेंच महाडाहून करवीरकरांस पैसे पुरवून व करार करून चिथविलें. परंतु करवीरकरही जाणून होते कीं, नाना आपला करार मोडून प्रसंग आला तर भाऊची तरफदारी करण्यास चुकणार नाहीं. तथापि परशुरामभाऊ तुमचेवर चालून येतील तर आम्ही तुमचा निभाव करून देऊं, असा करार नानानें छत्रपतीशीं केला होता, सबब भाऊनें करवीरकरांचे मुलखास उपद्रव देऊं नये अशी त्यास नानानें पराकाष्ठेची भीड घातली आणि सांगितलें, ' टिपूवर इंग्रजांची मोहीम होत आहे, तींत तुम्हीं पेशव्यांचे तर्फे सामील व्हा. करवीरकडील हलक्या मोहिमेस गुंतूं नका. ' हें नानाचें सांगणें भाऊस बिलकूल मान्य झालें नाहीं. त्यानें करवीरकरांवरच शस्त्र धरिलें. तेव्हां नानासही इकडे आड व तिकडे विहीर असें होऊन गेलें. नानाचें बोलण्यांत बोलणें नाहीं, असें जो पटवर्धनांचा कारकून मोरो आप्पाजी ले. १७९७ त लिहितो त्याचें इंगित हें असें आहे. या वेळीं नानानें पटवर्धनांस मनापासून मदत केली नाहीं. भेट घेऊन समक्ष विचारिलें असतां उत्तर न देऊन तो वेळ मारून नेऊं लागला, त्याबद्दल हें लिहिणें आहे. तो कारकून लिहितो " नानाचें वचन महाडास असतां करवीरवासी यांनीं घेतलें आहे. त्यांजकडून इतका अपराध झाला तरी नानास राग येत नाहीं याचें कारण त्यांचें वचन.

छत्रपतींनीं पटवर्धनांचे वकिलास कळविलें कीं नानांनीं महाडचे मुक्कामीं करार केला आहे त्याप्रमाणें तुम्हीं आम्हीं असावें. " पटवर्धनांनीं नानांस परोपरी सांगितलें कीं 'तुम्हीं छत्रपतींचा कैवार घेऊं नये. महाराजांची वर्तणूक कशी आहे हें आपण सर्व जाणतां. आपण नगरास गेलां तेव्हां यांनीं साखरा वांटल्या. फिरून पुण्यास येणें झालें, तेव्हां पेढे वांटले. या तऱ्हेची वर्तणूक असतां सरकारांतून त्यांच्याशीं सल्ला होतो हें काय? भाऊसाहेबांस तासगांव येथें सरकारांतून वाडा बांधून दिला तो छत्रपतींनीं दग्ध केला. वाड्यानें महाराजांचें काय केलें होतें? सर्व प्रकारें सरंजामाची खराबी मांडली.' हें ऐकून नाना बोलले, 'वाडा जाळला हें वर्तमान महाडास ऐकून आम्ही त्यांस फार बोललों.' एवंच या शेवटच्या अपेशी कारभारांत नानाच्या जिवाची त्रेधा उडून राहिली होती. 'भाऊसारखे जिवाचे सोबती तुटले, सर्जेरावासारखे घातकी इसम पैदा झाले,' असे त्या वेळचे उल्लेख आहेत.

चतुरसिंग साताऱ्यास पराभव पावून बत्तीस शिराळ्यास करवीरकरांकडे गेला म्हणून मागें सांगितलें आहे. तेथून त्यानें दीड हजार सडे स्वारांसह परत साताऱ्यास येऊन ता. ६–१–१७९९ रोजीं रास्त्यांचे फौजेवर छापा घातला; आणि लूट वगैरे करून त्यांचा फार नाश केला. त्या वेळीं माधवराव रास्ते वाईस होता. चतुरसिंगाचें सडकून पारिपत्य करावें असें त्यानें मनांत आणिलें. परंतु चतुरसिंगाच्या चपलतेपुढें रास्त्याचें कांहीं चाललें नाहीं. ता. २–४–१७९९ रोजीं रास्त्यांनीं त्यास वाटार येथें गांठून साफ लुटलें. त्या वेळीं सिंदेबाया मिरजेच्या बाजूस आल्या होत्या, त्यांस चतुरसिंग भेटला. परंतु त्यांजकडून त्यास साह्य झालें नाहीं. तेव्हां तो पुढें कांहीं दिवस कोल्हापुरकर छत्रपतींच्याच पदरीं राहिला.

पटवर्धनांचें व कोल्हापुरकरांचें वैर कसें वाढत गेलें हें खऱ्यांनीं छापलेल्या हकीकतीवरून समजून घेणें अवश्य आहे. सावंतवाडीकरांचें व कोल्हापुरकरांचें फार दिवस युद्ध चालू होतें. त्यांत आप्त संबंधामुळें सावंतवाडीकरांस महादजीनें साह्य केलें. सावंतवाडीकरांचा मुलूख करवीरकरांनीं घेतला होता, तो सोडवून त्यास परत द्यावा म्हणून महादजीनें स. १७९३ त पेशव्याकडून करवीरवर मोहीम करविली. परशुरामभाऊ व त्याचे मुलगे त्या सालचा दसरा झाल्यावर करवीरच्या मुलखावर चालून गेले. ता. २७–१२–१७९३ रोजीं आळतें येथें निकराची लढाई होऊन पटवर्धनांचा नाश झाला; आणि रामचंद्र परशराम जखमी होऊन छत्रपतीचे हातीं सांपडला. तेव्हां त्यास योग्य औषधोपचार करून छत्रपतींनीं

सन्मानानें घरीं परत पाठविलें. त्यानंतर परशुरामभाऊनें कोल्हापुरास वेढा घालून छत्रपतीस नरम केलें आणि याजकडून भला मोठा दंड घेतला. याबद्दल छत्रपतीस मोठा खेद वाटूं लागला. पटवर्धनांची जमियत भारी. त्यांस पेशव्यांचा पाठिंबा, शिंद्याच्या लष्कराचें त्यास संपूर्ण साह्य, या गोष्टींनीं छत्रपतीस अत्यंत खेद वाटून संधि सांपडतांच या वैराचें परिमार्जन करण्याचा बेत शिवाजी महाराज व त्याचा मुख्य साह्यकर्ता रत्नाकरपंत राजाज्ञा यांनीं ठरविला. हें पुढील लढाईचें आद्य कारण लक्षांत बाळगिलें पाहिजे.

**५ पट्टणकुडीची लढाई, परशुरामभाऊचा मृत्यु व योग्यता,** (ता. १७–९–१७९९ ).—पुण्यास पेशव्याचें पद कोणास मिळावें यासंबंधानें खटपटी चालू असतां रत्नाकरपंतानें कृष्णेपासून तुंगभद्रेपर्यंतच्या प्रदेशांत कोल्हापुरची सत्ता स्थापन केली. त्याच्याच प्रोत्साहनानें सातारकरांनीं सुद्धां पेशव्यावर उठाव केला. या चढाईचें निर्मूलन करण्याचें काम बाजीरावास हातीं घेणें भाग पडलें आणि तें त्यानें परशुरामभाऊस सांगितलें. स. १७९८ चा गणपति उत्सव तासगांवास उरकून भाऊ आपल्या तीन पराक्रमी पुत्रांसह मोहिमेवर निघाला तो सर्व बाजूंकडून छत्रपतीस चेंपीत चालला. कोल्हापुराशीं नानाचें वचन गुंतलें असल्यामुळें त्याला ही भाऊची चढाई बिलकूल पसंत पडली नाहीं. याच संधीस टिपूवर इंग्रजांनीं शस्त्र धरून स. १७९० च्या तहानुसार निजाम पेशव्यांना साह्यास बोलाविलें. त्यावरून निजामाची फौज इंग्रजांस सामील झाली, परंतु पुण्यास घरगुती भानगडींत पेशव्याचा गोंधळ उडून गेल्यामुळें इंग्रजांचे मदतीस फौज पाठविण्याचा निश्चय झाला नाहीं. याच वेळीं टिपूचे वकील पेशव्याचें साह्य मागण्यासाठीं पुण्यास आले होते. टिपू नाहींसा होऊन बंगालप्रमाणें मद्रास प्रान्तही इंग्रजांच्या कबजांत गेला, कीं त्यांचा मोहरा लगेच मराठ्यांवर चालून येणार असें महादजीनें नानास वारंवार बजाविलें होतें. तेव्हां या प्रसंगीं इंग्रजांस मदत करण्याचा उत्साह पुणें दरबारास वाटला नाहीं. परंतु त्याजबरोबर टिपूलाही पेशव्यानें साह्य केलें नाहीं. बाह्य राजकारणाचे धागेदोरे बाजीरावास आधीं मुळीं कळतच नव्हते, आणि ते कळले तरी मनाचा निश्चय करून दमदार पाऊल टाकण्याची कुवतही त्यास नव्हती.

पटवर्धन छत्रपतींचा सामना कसा जुंपला हें वर सांगितलेंच आहे. या वेळीं भारी फौज अशी कोणाचीच नव्हती. प्रत्येकाचा जमाव पांच सात हजारांचे अंदाजांत होता. भाऊचा मुक्काम चिकोडीस असून त्याचे पाठीवर कोल्हापुरकर होते. अशा वेळीं

मागून कुरुंदवाडकर रघुनाथराव किंवा मिरजकर बाळासाहेब कोल्हापुरकरांस शह देते तर दोहोंच्या मध्यें त्यांचा चुराडाच उडाला असता. परंतु भाऊबंदकीमुळें या मंडळींनीं भाऊचें साह्य केलें नाहीं. फक्त सांगलीकर चिंतामणरावानें पावसाळ्यांतच हिंमतीनें कृष्णा उतरून कोल्हापुरकरांच्या अळत्याच्या ठाण्यावर चाल केली, पण त्याचा जमाव अगदीं लहान असल्यामुळें विशेष परिणाम झाला नाहीं. भाऊ व राजाज्ञा यांचीं दळें बरेच दिवस लढाईचे सामन्यानें समोरासमोर होतीं, परंतु प्रथम कुरापत कोणीच काढीना. सबब निपाणीस तोफा लावून भाऊचा जोर अजमावून पाहवा असें कोल्हापुरकरांनीं योजिलें: आणि छत्रपतींची फौज निपाणीवर जात असतांच वाटेंत ता. १७–९–१७९९ रोजीं पट्टणकुडीचा संग्राम घडून आला. त्या प्रसंगाची सविस्तर हकीकत पटवर्धनाचा कारकून नारो हरि करंदीकर छत्रपतींचे छावणींत असे, त्यानें प्रत्यक्ष पाहून लिहिलेली आहे ती अशी:—

'करवीरची फौज वेदगंगा व दूधगंगा ह्या नद्या उतरून हमीदवाड्यावर मुक्काम आला. उभयतांस चार कोसांची तफावत राहिली. दरम्यान नदी नाहीं. भाऊंच्या फौजेंत खर्चाचा गवगवा पडून शिलेदारांचा फितूर होता हें जाणून करवीरकरांनीं दोन वेळां छाप्याचा उद्योग केला तो सिद्धीस गेला नाहीं. नंतर भाद्रपद वद्य तृतीया शके १७२१ इंदुवारीं अस्तमानीं भोजन करून महाराज कचेरीचे डेऱ्यांत येऊन बसले. रत्नाकरपंत वगैरे तमाम मंडळीस बोलावून उदईक मंगळवारीं चालून जावें अशी मसलत ठरून ताकीद दिली. या संबंधाचा इशारा मीं भाऊंस लिहून पाठविला. मंगळवारीं सूर्योदयास भोजन करून फौजेनिशीं निघाले. मीहि बरोबर निघालों. माझी चिठ्ठी भाऊंस प्रहर दिवसास जाऊन पोंचली तोंपर्यंत त्यांची तयारी नव्हती! तोफखान्याचे बैल चराऊस गेले होते, ते आणून गडबडीनें तयारी केली. करवीरची फौज दोनप्रहराचे सुमारें निपाणीच्या पुढें पावकोस जाऊन उभे राहिले, भाऊंची तयारी होऊन त्यांचे चिरंजीव रामचंद्र आप्पा व माधवराव दाजी दोन बाजूंनीं करवीरकरांवर चालून गेले. पुढें एक ओढा होता त्यांत कांहीं गारदी व पायदळ ठेवून तेथून तोफा चालविल्या, तेव्हां करवीरकरांनींही ओढ्यावर चालून घेतलें. त्यांत करवीरकरांचा मोड होऊन शंभर माणूस जायां जखमी झालें. बाकीचे पळून गेले. आप्पांच्या अंगावर रत्नाकरपंत व हैबतराव गायकवाड चालून आले. लढाईचें तोंड लागलें. पाव घटका झटपट चांगली झाली. करवीरकरांचे धुळोजी पांढरे ठार होऊन रायाजी जाधव घोड्याखालीं आले. तेव्हां फौजेंत गलबल होऊन निशाणाचा हत्ती मागें




पट्टणकुडीची लढाई.

पृ. ८६.

फिरला. महाराज पाठीमागें जवळच होते त्यांस हें वर्तमान कळलें. ते स्वतः आपले तीनशें लोक घेऊन नेटानें सावरून पुढें आले. लढाई होतच होती. त्यांत अप्पासाहेबांच्या डाव्या हातास गोळी लागून घायाळ झाले, व जाग्यावर उभे राहिले. दाजीसाहेबांवर खुद्द कोल्हापुरचे महाराज चालून आले. फौजेंत फितूर होता त्यामुळें दाजींची फौज उधळली. इकडे रत्नाकरपंत व हैबतराव यांनीं आप्पावर चाल केली. ते मागें हटत हटत अमलझरी गांवचे आश्रयानें उभे राहिले, असें पाहून रत्नाकरपंतानीं एकदम आप्पांचा रोख सोडून भाऊसाहेबांच्या गोटावर चाल केली. त्या वेळीं सायंकाळचा दिवस तीन चार घटका होता. उभयतां चिरंजिवांचे मनांत भाऊसाहेब गोट सोडून अगोदरच निघून गेले असतील, म्हणून कोणीही गोटाकडे परत आले नाहींत. गोटाकडे करवीरची फौज आली हें पाहून भाऊंजवळचे लोक निघून जाऊं लागले. जाग्यावर एक हत्ती दोन तोफा व निशाण होतें. जवळचे लोक निघाले ते भाऊसाहेबांस घेऊन जाते तर निभावून जाण्यास वेळ होता. परंतु कोणास धीर झाला नाहीं. आपापला जीव घेऊन पळून गेले. इतक्यांत करवीरचे फौजेनें वेढा घातला. भाऊसाहेब घोड्यावर बसून एकटेच निघोन चालले, त्यांस हैबतराव गायकवाडानें ओळखलें. जाऊन गांठ घातली. मानेवर वार टाकला. घायाळ झाले. तितक्यांत हातांतील पट्यानें चारपांच असामींस वार करून जखमी केलें. त्यावरून दुसरे दहावीस चालून आले. त्यांनीं दोहों बाजूंस कानानजीक वार केले. घायाळ व निर्जीव होऊन घोड्याखालीं पडले. जीव होता नव्हता ही भ्रांत. गायकवाडांनीं भाऊंचे हातांतील पट्टा आपणांजवळ घेऊन त्यांस एका बारगिराचे घोड्यावर पुढें देऊन महाराजांकडे पाठविलें, आणि हैबतरावानें मागें येऊन भाऊंचा गोट लुटला. इतक्यांत यशवंतराव घाटगे यास महाराजांनीं भाऊंस आणावयास पाठविलें होतें, त्यांनीं त्यांस बारगिराचे घोड्यावरून आपले घोड्यावर घेतलें आणि महाराजांकडे आले. महाराजांनीं भाऊस पाहिलें, जीव होता किंवा नाहीं ही चित्तांत अंदेशा न आणतां वैरत्वाचा भाव चित्तांत आणून, त्यांत फत्ते झाली हा हर्ष मोठा, देहभान राहिलें नाहीं, घाटग्यांस आज्ञा केली कीं, मुर्दा घोड्यावरून खालीं ढकलून देणें. त्यांनीं आज्ञेप्रमाणें केलें. जवळ खासबारदार होते त्यांस आज्ञा झाली, कीं मारून टाकणें. त्याजवरून खासबारदारांनीं जवळ जाऊन पाहिलें तों जीव नाहीं, म्हणून वार टाकला नाहीं. सायंकाळचा अर्ध घटका दिवस राहिला. मी तेथें जवळच होतों. महाराज प्रेत सोडून पुढें पाव कोस जाऊन बैठक केली. तोफांचे बार करविले. साखरा वांटल्या. खुशाली जहाली. चहूंकडे फत्ते झाल्याचीं पत्रें रवाना केलीं. मी प्रेताजवळच होतों. तों

रात्र जहाली. तेव्हां दहनाचा विचार भाऊराव जोशी यांस सांगितला. त्यांनीं आज्ञा घेऊन कळवितों म्हणून गेले. त्यांची वाट दोन तीन घटका पाहिली. त्यांनीं विचारलेंच नाहीं. नंतर मी घाटग्यांस सांगितलें. त्यांनींही विचारलें नाहीं. नंतर प्रीतीराव चव्हाण यांस कांहीं दरबारखर्च कबूल करून मजकूर सांगितला. त्यांनीं जाऊन महाराजांस विनंति केली. त्याजवर महाराजांनीं दोन घटका खलबत केलें. चव्हाणांचा नेट पडला. त्यावरून मी पुढें जाऊन महाराजांस विनंति केली कीं आपणांकडे पाडाव आले, त्यांस अग्निसंस्कार करणें हें महाराजांचे लौकिकास चांगलें. त्याजवरून दहन करावें म्हणून आज्ञा जाहली. महाराजांनीं जोशीरावांस सांगितलें, साहित्य लागेल तें देणें. इतकें होईपर्यंत अडीच प्रहर रात्र झाली. नंतर प्रेताजवळ आलों. घोडीवर पासोडी होती ती काढून त्यांत प्रेत घालून घोडीवर घेतलें. वाट अवघड, त्यांत पाऊस थोडा पडत होता. पहांटेच्या तीन घटका रात्रीस हमीदवाड्यावर आलों. साऱ्या गावांत दोन मोटा गोवऱ्या सांपडल्या. इतक्यांत सूर्योदय झाला. रत्नाकरपंताचे गोटांत लाकडें तीस चाळीस भारे मिळालीं. गांवानजीक तळें आहे तेथें जागा नेमिली. गावांतील पांच सात असामी भिक्षुक आणून प्रेत तळ्यावर नेलें. मंत्राग्निसाठीं चांगला ब्राह्मण मिळाला नाहीं. मग भडाग्नि देऊन दहन केलें. दुसरे दिवशीं रक्षा व अस्थी काढिल्या. मिरजेस किंवा कृष्णेस नेणेस ब्राह्मण मिळेना. दूधगंगेंत रक्षा विसर्जन केली. अस्थी मिरजेस पोंचविल्या. चौघे पुत्र शिवाय कुटुंबिक मंडळी, शिवाय आप्त थोर थोर असतां समयास जवळ कोणीच नाहीं. नारो हरि करंदीकराचा जन्मांतरींचा योग उभा राहिला, म्हणून अशा पुण्यश्लोकाचे देहास हात लागून अंतकाळची सेवा जी पुत्राचे हातून व्हावयाची ती माझे हातून घडली. भाऊंचा काल उत्तम प्रकारें जाहला. आमरणान्त क्षात्रधर्मानें पेशव्यांची सेवा करून, धारातीर्थी शूरास मरण यावें तसें आलें. असा प्राणी सूर्यमंडळ भेदून उत्तम लोकास जातो. श्रीगणपति आराध्य दैवत त्याची निस्सीम भक्ति, अंगारकी चतुर्थी व्रताचा दिवस, एक पत्निव्रत, दिगन्त कीर्ति प्रदोषसमय त्या कालीं देह विसर्जन जाहलें. *

या प्रसंगाच्या पुष्कळ हकीकती उपलब्ध आहेत. पाडाव सांपडलेल्या एवढ्या नामांकित पुरुषास छत्रपतींनीं क्रूरपणानें वागविल्यामुळें हा बनाव लोकांच्या मनांत अद्याप ताजा आहे. भाऊंचा मुलगा रामचंद्रपंत लिहितो, 'सायंकाळचे सहा घटका दिवसास लढाई झाली. आमची फौज नामोहरम होऊन मागें फिरली. वडील मागें लष्करापुढें तयार होऊन उभे होते. जवळ सामान थोडें होतें. तों करवीरकरांचे फौजेची

* का. सं. प. या. ४६७; खरे; पटवर्धनी वाका; जु. ऐ. गो. २५; भा. व. श.

गांठ पडली ते समयीं जातीनिशीं तट खाऊन जागा धरून उभे राहिले. मागें फिरा म्हटलें असतां फिरेनात, त्यामुळें जाग्यावरच हस्तगत झाले. दोन जखमा आहेत. झाडून दौलत गारद झाली. आम्हीं मात्र पड खाऊन मध्यरात्रीस अंकलीस आलों. मला दोन जखमा आहेत. बहुत माणूस कामास आलें. वडील पाडाव गेले नाहींत. डोईवर समोरच्या दोनतीन जखमा लागोन कैलासवास केला. सूड घेतला पाहिजे, तरच या दिवशीं राहावें, नाहीं तर देशांतर करावें हा इरादा आहे. '

या हकीकती वाचून असें दिसतें, कीं थोड्याशा गाफिलपणामुळें भाऊचा शेवट विपरीत झाला. अलीकडे भाऊची मानसिक शक्ति व युद्ध तारतम्य बहुतेक नष्ट झालें होतें. छत्रपतींच्या अंगीं एकदम एवढें वारें उत्पन्न होईल ही कल्पना त्यास नव्हती. तशांत दोघां मुलांची वाताहत होत असलेली पाहून आपला गोट आवळून बाजूस सरण्याचा विचार पाहवा तें न करितां एकटाच भाऊ अनेक शस्त्रप्रवीण मंडळींशीं लढूं लागला, त्यामुळें त्यास मरण आलें. बाकी स्वाधीन होण्यापेक्षां लढून मेला हें त्यास भूषणच आहे. त्याचे मुलगे चार रामचंद्रपत आपा, हरिपंत बाबा, महादाजीपंत दाजी हे तीन लढाईंत होते. चवथा गणपतराव बापू घरीं होता.

भाऊला महाराजांसमोर आणिलें, त्या वेळेस त्यास जीव नव्हता. शवच महाराजा-पुढें आणिलें, आणि महाराजांनीं तें घोड्यावरून ढकलून देऊन त्याचा शिरच्छेद करविला. जिवंत हस्तगत झाल्यावर मुद्दाम त्याचा प्राण घेतला, असें जरी नसलें, तरी शत्रूलाही मेल्यानंतर अपमानानें वागविणें हें थोरपणास लांछनकारक आहे. या संबंधाच्या पुष्कळ हकीकती प्रसिद्ध आहेत. कोल्हापुरच्या इतिहासांत मोडकांनीं दिलेली हकीगत नाटकी थाटाची मागाहून रचलेली दिसते. खुद्द लढाईंत असलेल्या गृहस्थांनीं लिहिलेल्या वरील हकीकतीपुढें इतर लेखांची मातब्बरी बिलकूल नाहीं. लढाईनंतर रत्नाकरपंतानें रामचंद्र आपाचा पाठलाग केला, तेव्हां तो पळून जम-खिंडीच्या ठाण्यांत गेला. पुढें करवीरकरांनीं चिकोडी, मनोळी वगैरे भाऊंकडे गेलेले प्रदेश आपले परत घेतले.

परशरामभाऊच्या मृत्यूनें सर्व महाराष्ट्र हळहळलें. बाजीराव, दौलतराव, बाळोबा तात्या, नाना फडणीस यांनीं त्याच्या मुलांस सांत्वनपत्रें लिहून कृतज्ञता व्यक्त केली. ' सरकारच्या दौलतींत भाऊसाहेब स्तंभ होते. नानांनीं तों बहुतच खेद केला. त्यांची एक बाजूच खचली. भाऊंचा या लोकीं व परलोकीं विजयच झाला. मागें आहेत त्यांनीं सूड घेतल्यास उत्तम. यावत्प्राण भाऊंनीं आपला नक्षच करून स्वामीसेवेवरही

कामास आले. त्रिवर्ग पुत्रांनींही जखमा लागल्या असतां जवांमर्दी बहुत केली. भाऊसारखीं मनुष्यें सरकारच्या पदरचीं गेल्याचा खेद कोणास नाहीं ?' बाळोबा तात्या लिहितो, ' आम्हांस आज तीन वर्षे त्यांच्या भेटीची उत्कंठा होती, पण ईश्वराचे चित्तास गोष्ट न आली. क्षात्रधर्म सेवन केल्याचा भाऊंनीं शेवट केला. सूर्यमंडळ भेदून गणपतिस्मरण झालें. ' नाना म्हणाले, ' आम्हांस हाक मारावयास आतां कोणी नाहीं. त्यांजकडेच चित्तवृत्ति लावलेली आहे. आमचे निदानीचे सोबती होते. '

या वर्षी परशुरामभाऊची प्रकृति किती खालावलेली होती तें खालील उताऱ्यांवरून दिसतें. ता. १६–१–१७९९ चा लेख पहा. ' भाऊसाहेबांची प्रकृति बहुतच निःशक्त झाली. सामर्थ्य नाहीं. वाईकडील वैद्य व लक्ष्मीधर यांचे हातें प्रकृतीस गुण पडत नाहीं. वडिलांची प्रकृति नाजूक झाली आहे.' त्यापुढील ता. ९–४–१७९९ चा उल्लेख–'भाऊसाहेबांचे शरीरीं बहुतच स्वस्थ नाहीं. वडिलांचें सामर्थ्य अगदींच राहिलें. स्नान संध्या निजूनच करितात' परकृत पीडा आहे. चिदंबर बाबांचा पूर्ण आशीर्वाद आहे. ता. २ मे रोजीं गोकाकचे मुक्कामास आले. प्रदोष होता. गंजीफा खेळत बसले ते सायंकाळ जाला तरी स्नानास उठेनात. उत्तर जालें, अद्याप बारा घटका दिवस आहे. दोन ताम रात्रपर्यंत खेळ चालला. मग मनस्वी भाषण करूं लागले. प्रकृतीस वायूचा विकार जाला. भ्रांत पडली आहे. उठवत बसवत नाहीं, पण कूच करून जावें हा ध्यास. ' १४ जून. ' बुद्धीस संशय झाला होता तो श्रीकृपेंकरून कमी जाला ' २० जुलई. ' शरीर प्रकृत चांगली जाली. अंगांत रक्त आलें. म्हातारपण आहे. समग्र विशेषें एखादे गोष्टीचा विसर पडतो. ' या प्रकृतिमानावरून वाटतें कीं कोल्हापुरकरांचा हल्ला अंगावर आला, त्या वेळीं पूर्ण विचारानें वागण्याचें सामर्थ्य त्याचें शाबूत नसावें.

मराठशाहीचे व विशेषतः पेशव्याचे कारभाराचें हृद्गत ओळखून आत्मिक भावनेनें तिचा पुरस्कार करणारा भाऊसारखा दुसरा इसम झाला नाहीं. हरिपंत फडक्याहून जास्त धोरणी व धाडसी आणि घरची जमियत सदैव बळकट, या बाबतींत भाऊ विशेष होता. पटवर्धनांचे घरांत गोपाळराव व परशुराम भाऊ हे दोनच पुरुष मोठे म्हणतां येतील. त्या दोघांतही शिपाईगिरी व मुत्सद्देगिरी या दोनही गोष्टी भाऊच्या वरचढ होत्या. नारायणरावाच्या मृत्यूनंतर नाना फडणिसाचा कारभार यशस्वी होण्यास भाऊ व हरिपंत तात्या हे दोन पुरुष कारण झाले. बाळोबा तात्याच्या पुरस्कारानें चिमाजी आपास पेशवाई देऊन जी घटना भाऊनें रचली तिलाच नानानें पाठिंबा

दिला असता तर मराठी राज्याचें भवितव्य कांहीं अंशानें तरी निराळें झालें असतें. आपला अधिकार कायम राखण्यासाठीं नानानें भाऊस विरोध केला. त्या विरोधाचे भरांत त्यानें कोल्हापुरकर छत्रपतीस भाऊवर उठविलें, त्याचें निरसन करण्यांत नानाची मदत भाऊला झाली नाहीं. यामुळें त्याचा शेवट दुःखद झाला. मरणसमयीं त्याचें वय साठीच्या अंदाजांत असावें. म्हणजे नाना व भाऊ जवळ जवळ समवयस्क होते. ता. १५-४-१७९९ च्या पत्रांत भाऊनें चहा, बुंद व चहादाणी मागविली व चहाचा प्याला आणि बुंद पाठविले ते पावले असा उल्लेख आहे, त्यांवरून चहा-काफीचा प्रघात पटवर्धन मंडळीस टिपूच्या स्वारीपासून इंग्रजांच्या सहवासानें लागलेला दिसतो. त्याची मुलगी बयाबाई बहुतेक माहेरींच असे. ती बरेच दिवस जिवंत होती. स. १८०३ मध्यें ती जिवंत असल्याचा उल्लेख आहे.

पटवर्धनांचें घराणें हळू हळू फुटत आलें होतें, त्याची परशुरामभाऊचे पश्चात् वाताहतच झाली. चिमाजी आपाचा पक्ष घेतल्यामुळें भाऊवर बाजीरावाची अत्यंत गैरमर्जी झाली. त्यांत इतर पटवर्धन मंडळीसही बाजीरावाशीं कसें वागावें याचा पेंच पडूं लागला. कुरुंदवाडकर रघुनाथराव व मिरजकर बाळासाहेब यांनीं भाऊकडे आपलें अंग न दाखवितां बाजीरावाकडे संधान ठेवून आपला बचाव केला. सरदारांत शक्य तितकी फूट पाडून आपला बोज राखण्याची हातोटी बाजीरावांत विशेष होती. पण सरदार जितके कमकुवत तितकी आपलीच शक्ति कमी, हें तत्त्व त्यास कधींच उमगलें नाहीं. तासगांवकर भाऊशीं मिरज कुरुंदवाड शाखांची कौटुंबिक धुसपूस बरेच दिवस होती. त्यांतूनही छत्रपतीकडून भाऊवर प्राणांतिक घाला येईल अशी त्यांची अटकळ नसल्यामुळें ते थोडेसे उदासीन राहिले. मुद्दाम त्यांनीं भाऊची उपेक्षा केली असें दिसत नाहीं. त्यांनीं पुढें रामचंद्र आपाचें साह्य केलेंच.

६ **परशुरामभाऊचा अपुरा सूड, कोल्हापुरवर मोहीम** (डिसेंबर १७९९ ते जून १८००).—परशुरामभाऊस लढतांना मृत्यु आला कीं हस्तगत झाल्यावर त्यास मुद्दाम छत्रपतीनें मारविलें, यांपैकीं कोणताही भाग खरा असला, तरी त्या कृत्याचा प्रत्युपकार करण्याची तजवीज पटवर्धनांनीं लगेच हिंमतीनें अंगावर घेतली. त्यामुळें करवीरकरांस मोठी दहशत पडली कीं, पेशवे, सिंदे वगैरे सर्वच आपणांवर तुटून पडणार, म्हणून ते आपल्या बचावाची तयारी करूं लागले. रत्नाकरपंत व चतुरसिंग कोल्हापुरची बाजू संभाळण्यांत शिकस्त करीत होते. याच वेळीं धोंडजी वाघ म्हणून जो एक बंडखोर श्रीरंगपट्टणपासून कृष्णेपर्यंतच्या प्रदेशांत

धुमाकूळ मांडून राहिला होता, त्यासही कोल्हापुरकरांनीं मदतीस आणिलें. रत्नाकर-पंतानें चिकोडी, मनोळी, गोकाक वगैरे प्रदेश लगोलग हस्तगत केला. इकडे छत्र-पतीनें आपले वकील बळवंतराव खांडेकर व जानराव जाधव यांस समेटासाठीं पुण्यास पाठविलें. परंतु तेथें बाळोबा तात्या प्रमुख असून त्यानें समेटाच्या जबर अटी घातल्या, त्या छत्रपतीस मान्य झाल्या नाहींत. सर्जेराव सुटण्याचाही संभव होता, तेव्हां बायजाबाईच्या लग्नाचा रोष विसरून खुद्द शिवाजी सुद्धां सर्जेरावाचे मुलास आपली कन्या देण्याचें बोलूं लागला. राजकारणांत धार्मिक भावना लटपटतात. आपणांस यश मिळावें म्हणून ब्राह्मणांचीं अनुष्ठानें व साधूंचे परामर्ष वगैरे संबंधानेंही छत्रपतीनें कसर ठेविली नाहीं.

पुण्याहून पटवर्धनांचे मदतीस फौज रवाना झाली, तींत तीन हजार स्वार, सिंद्यांचीं पांच पलटणें व २७ तोफा इतका सरंजाम असून त्यावर ब्राऊनरिग हा मुख्य युरोपियन अंमलदार होता. पेशव्याचे तर्फेनें मानाजी फाकडे, मालोजी घोरपडे, तोफखान्यासह गणपतराव पानसे, विंचूरकर, पेठे, जाधव, पवार व खुद्द नाना फडणीस इतक्यांचीं पथकें होतीं. पेशव्यांचा सरदार धोंडोपंत गोखले कर्नाटकांत होता, त्यासही कोल्हापुरावर जाण्याचा हुकूम झाला. शिवाय बाजीरावानें स्वतः पटवर्धनांस पत्रें लिहून दिलासा दिला. ( ख. ले. ५,१९५ ). डिसेंबरांत पुण्याहून फौजा निघाल्या, त्या तारीख ७–१–१८०० रोजीं कृष्णेवर आल्या. तेथें पटवर्धनांच्या गांठी पडून ता. १५ जानेवारीस मुक्काम शिराळ्यावर झाला. तिकडून छत्रपतींची फौजही सामन्यास आली. ब्राऊनरिगनें हल्ला करून १६ जानेवारीस शिराळ्याचें ठाणें घेतलें. आंत माणूस हजार पावेतों होतें तें सर्व जायां व जखमी झालें. तेथून फौजा वारणा उतरून पारगांव नजीक आल्या. त्या वेळीं छत्रपतींचा मुक्काम पन्हाळ्या खालीं होता, त्यांजवर रामचंद्र आपाच्या देखरेखीखालीं पुण्याच्या फौजांनीं जोरानें तोफांचा मारा केला. तेव्हां सामना न करतां करवीरची फौज पळून किल्ल्यावर गेली. पन्हा-ळ्याखालील या लढाईंत चतुरसिंगाचे दोन मातबर सरदार मारले गेले. छत्रपतींची फौज खालीं मैदानांत असती तर तिचा संहारच झाला असता, परंतु किल्ल्यावर पुणेकरांचा इलाज चालला नाहीं. तेव्हां करवीर राजधानीच काबीज करण्याचें ठरवून रामचंद्र आपा सर्व जमावासह टेंब्लाईवर येऊन उतरला. तेथून त्यानें ता. २–२–१८०० रोजीं शहरावर तोफांचा मारा केला. तेणें करून कोल्हापुरांत मोठी गडबड उडून गेली. पुष्कळ मोठे लोक चीजवस्त घेऊन पन्हाळ्याच्या आश्रयास गेले. खुद्द

महाराजही कुटुंब सुद्धां पन्हाळ्यावरच जाऊन राहिले. नरसिंहपुरकर भटजीबावा व भट भिक्षुक ब्राह्मण तेवढे शहरांत राहिले. हिंमतबहाद्दर प्रीतिराव चव्हाण हा करवीरचे तर्फेनें कसून मेहनत करीत होता. पहिल्याच लढाईत नारायणराव घोरपडे कापशीकर पाडाव सांपडला त्याची निगा पटवर्धनांनीं चांगली ठेविली. पुढें करविरास मोर्चे बसवून शहर काबीज करण्याचें काम रामचंद्र आपानें सुरू केलें. पण दारू गोळा संपला व नवीन येण्यास अवकाश होता. म्हणून ब्राऊनरिग्ग* व रामचंद्र आप्पा यांनीं शिवरात्रीच्या दिवशीं ( २२-२-१८०० ) छत्रपतींची फौज पन्हाळ्याखालीं होती, तिजवर पहाटे अचानक छापा घातला, आणि करवीरचा गोट लुटला. त्या प्रसंगांत पुष्कळ लोक मारले गेले, शेंकडों पाडाव सांपडले आणि बरेच जीव घेऊन किल्ल्यांत पळून गेले. महाराजांच्या मर्जींतला एक सरदार विश्वासराव गायकवाड जिवंत हस्तगत झाला असतां, त्यास रामचंद्र आप्पानें लगेच ठार मारविलें. यासंबंधानें चिंतामणराव पटवर्धन आपल्या वाक्यांत लिहितो, ' ही गोष्ट अपकीर्तीची, आमचे घराण्याचे लौकिकास योग्य नाहीं. ' पुढें दारू गोळा येऊन ता. २७-२-१८०० रोजीं करवीरास मोर्चे बसले. कुरुंदवाडकरांनीं आपल्या पथकांत स्मिथ साहेब म्हणून एक युरोपियन नेमून त्याचे हाताखालीं दोन इंग्रजी पलटणें व दोन तोफा तयार करविल्या होत्या, त्या या लढाईत हजर होत्या.

फेब्रुआरी अखेर पावेतों पटवर्धनांचा उद्योग सुरळीत चालला. रामचंद्रपंत आप्पास अनेक पथक्यांचीं व सरदरांचीं तंत्रें सांभाळून त्यांजकडून कामें घेतांना अतोनात कष्ट पडत. शिवाय कुरुंदवाड व मिरज येथील भाऊबंदकीची बाधाही त्यास होतच होती. सिंद्याचा ब्राऊनरिग्ग म्हणे, ' मी जातां जातां तरी पटवर्धनांची मिरज हस्तगत करून

---

* ब्राऊन रिग्ग ( Brownrigg ) हा ऐरिश गृहस्थ सिंद्याच्या एका कंपूचा अंमलदार, स. १७९९ त कोल्हापुर मोहिमेवर होता. स. १८०० त नर्मदेवर त्यानें यशवंतराव होळकरास अडवून धरलें आणि सदलँडला मदत करून इंदूरची लढाई जिंकली. स. १८०२ त पेरानचें व त्याचें वांकडें येऊन त्यास पेराननें नोकरीवरून दूर केलें. इंग्रजांनीं आग्रा घेतल्यावर ब्राउनरिग्ग यास आपल्या नोकरींत घेतलें. यावरून हा गृहस्थ केवळ पैशाचा गुलाम बनून पाहिजे तें करण्यास कसा तयार होता तें दिसून येईल. हा ता. १९-२-१८०४ रोजीं हर्यांना जिल्ह्यांत शिर्सो येथील लढाईत मारला गेला. तो आपल्या कामांत अत्यंत निपुण व गोड बोलून मतलब साधण्यांत प्रवीण होता.

जाईन. ' यामुळें मिरजकर गंगाधरराव याचें युद्धांत बिलकुल मन लागत नव्हतें. करवीरास वेढा बसतो, इतक्यांत पुण्याहून बाळोबा तात्याचा इशारा रामचंद्र आप्पास आला कीं, इकडील कारभारांत सर्जेरावी सुरू झाली आहे, तेव्हां आतां मोहिमे-संबंधीं काय भानगडी होतील तें सांगवत नाहीं, तुम्ही सावध राहवें. मोर्चे बसविल्या-नंतर दहाबारा दिवसांत तटास खिंडारें पडलीं. तेव्हां करवीरकर मंडळी तह करून प्रकरण मिटविण्यास तयार झाली, परंतु रामचंद्र आप्पानें लढूनच शहर काबीज करण्याचा हट्ट धरिला. ता. १३ मार्च रोजीं ब्राऊनरिग्गनें उतावळेपणानें एकदम हल्ला केला तो लागू न होतां त्यास गोळीची जखम लागली, आणि उपचारासाठीं तो पुण्यास निघून गेला. त्याचे जागीं दुसरा इसम डॉस म्हणून आला. इकडे ब्राऊन-रिग्गचा हल्ला फसला त्याच दिवशीं पुण्यास नाना फडणिसाचा अंत झाला; बाळोबा तात्याचें तेज मावळलें; आणि सर्जेरावाचा पूर्ण पगडा सिंद्यावर बसला. इतउत्तर सत्पक्षाचा अपकर्ष आणि असत्पक्षाचा उत्कर्ष पुण्याचे दरबारांत झपाट्यानें होऊं लागला. करवीरकरांनीं पुण्यास सर्जेरावाशीं संधान बांधिलें, त्यामुळें डॉस कोल्हापुर-करांविरुद्ध कांहींच काम करीना. तरी थोडा वेळ रामचंद्र आप्पानें लढाईचा नेट धरून कोल्हापुरकरांस हैराण केलें. एप्रिल २५ व २६ या दोन दिवशीं धुमश्चक्रीची लढाई झाली. त्याच दिवशीं बातमी आली कीं पुण्यास बाळोबातात्या कैद झाले; आणि खुद्द रामचंद्रआप्पास पकडून कैद करावें असा हुकूम पलटणांस आला. त्याबरोबर तो एकदम जमखिंडीस जाऊन राहिला; आणि तेथेंच तो स. १८१४ च्या जानेवारींत मरण पावला. रामचंद्र आपा निघून जातांच इतर सर्व मंडळी करवीरचा वेढा उठवून चालती झाली. ता. ३० एप्रिल रोजीं खुद्द डॉस पलटणें घेऊन करवीराहून परत फिरला. ता. १ मे रोजीं कोल्हापुरांत इतकें सामसूम झालें कीं, आदल्या दिवशीं तेथें लढाई होती असें कोणासही वाटूं नये. या प्रमाणें करवीरच्या युद्धाचा अकस्मात् शेवट झाला, तरी पटवर्धन छत्रपतींचे हर्षामर्ष पुढें कांहीं काळ चालूच राहिले. प्रत्यक्ष इंग्रजी अंमलांत ते पुढें स्थिरावले. अव्वल मराठशाहींत जसा रामचंद्रपंत अमात्य त्याच धर्तीचा रत्नाकरपंत राजाज्ञा करवीरचे राज्यांत निर्माण झाला, म्हणूनच या युद्धांत पटवर्धनांस यश आलें नाहीं. इतिहासास या पुरुषाचें ऋण अद्यापि फेडावयाचें आहे. या पुढील पटवर्धनांच्या वाताहतीची हकीकत मराठशाहीच्या अन्तांत समाविष्ट झालेली आढळून येईल. रामचंद्र आपा जमखिंडीकरांचा पूर्वज होय.

सिधोजीराव निंबाळकर ऊर्फ **आपा देसाई निपाणकर** याचें नांव या वेळेपासून इतिहासांत वारंवार येत असल्यामुळें त्याचा अल्प परिचय येथेंच करून देणें जरूर

आहे. याचे पूर्वज हुकेरीचे देशमुख करवीरकरांचे पदरीं होते. आपास सर्जेरावानेंच पुढें आणिलें आणि त्याचेंच अनुकरण त्यानें पुष्कळसें केलें. ते दोघेही समवयस्क होते. आपा देसाई हा करवीर राज्यांतील जुना इनामदार असून छत्रपतीचा आप्त होता. त्याचें मूळचें नांव सिधोजी नाईक निंबाळकर. त्याचें इनाम छत्रपतीनें काढून घेतलें म्हणून रागानें तो परशुरामभाऊस मिळाला. तेव्हां भाऊनें मध्यस्थी करून छत्रपतीकडून त्याचें इनाम त्यास परत देवविलें. करवीरच्या वेढ्यांत तो रामचंद्र आपास मदत करीत असतां सर्जेरावानें त्यास फितूर करून आपणाकडे घेतलें; आणि त्याचे स्वाधीन पुढें सिंद्यांचीं पलटणें केलीं. तीं पलटणें घेऊन त्यानें कर्नाटकांत फारच धामधूम केली. पुढें सर्जेराव हिंदुस्थानांत निघाला, तेव्हां त्यानें देसायास आपल्या विश्वासाचा म्हणून पुण्यास बाजीरावाजवळ ठेवून दिलें. परंतु बाजीरावानें त्याची भेट सुद्धां घेतली नाहीं; आणि पुण्यास आपला निभाव लागत नाहीं असें पाहून तो व सर्जेरावाचा मुलगा हिंदुराव पुणें सोडून परत कर्नाटकाकडे गेले. तिकडे पुनः करवीरकरांचें व आपाचें वांकडें आलें. बाळोजी कुंजरचा भाऊ पांडोजी कुंजर यानें त्याचा कृष्णातीरीं पराभव केला. चिंतामणराव पटवर्धनानेंही त्याचा समाचार घेतला. तेव्हां निराधार होऊन तो कांहीं दिवस भटकत राहिला. स. १८०३ च्या युद्धांत तो बाजीरावाचे तर्फेनें वेल्स्लीच्या मदतीस होता. चिकोडी व मनोळी हे परगणे त्यानें बळकावले होते ते स. १८१७ त त्यास सोडून द्यावे लागले. इंग्रजांनीं त्याजकडे निपाणीची जहागीर ठेविली होती ती स. १८३९ त खालसा झाली.

---

# प्रकरण चवथें.

## नाना फडणिसाचा मृत्यु व योग्यता

**सूत्रधारी जो पुरुष ज्याच्या गुणास जग भुलत ।**
**हातांत सगळे दोर पतंगापरी फौजा हालत ॥** प्रभाकर—

१ मृत्यु व कौटुंबिक. २ दत्तक पुत्राची तजवीज, जिऊबाई.
३ लोकोपयोगीं कामें. ४ कारभाराचा व्याप.
५ कर्तबगारी व लोकमत.

**१ मृत्यु व कौटुंबिक** (ता. १३-३-१८००).—सवाई माधवरावाच्या मृत्यूनंतर पेशवाई संबंधानें नानानें ज्या गोष्टी केल्या, त्यांचें भरपूर विवेचन मागें येऊन

गेलें आहे. आतां राष्ट्रव्यक्ति या दृष्टीनें नानाच्या एकंदर आयुष्याचें संकलित विवेचन या प्रकरणांत करावयाचें आहे. कैद व हाल अपेष्टा टाळण्याकरितां जेवढे म्हणून इलाज त्यानें केले ते सर्व व्यर्थ होऊन शेवटीं थोडेच महिने कां होईना, पण कैदेचे सोहळे त्यास भोगावे लागले. त्यांत शारिरिक हाल असे जरी त्यास बिलकूल काढावे लागले नाहींत, तरी त्यामुळें त्याच्या मनास जो जबरदस्त धक्का बसला, त्यांतून त्याची प्रकृति पुनः कधींच वर आली नाहीं. कैदेंतून सुटल्यानंतरच्या दीड वर्षांत त्याचा पहिला हुरूप लेश मात्र नव्हता. त्या काळांत त्याची प्रकृति दिवसेंदिवस खंगत चालली. मधून मधून ताप येई. नानांस जरी बाजीरावानें कारभारावर घेतलें, तरी त्यांचा एक विचार तिलप्राय नव्हता. 'श्रीमंतांचे चित्तांत जें कर्तव्य नाहीं तें हरयेक पर्याय लावून सिद्धीस जाऊं देत नाहींत. नाना बहुत संकटांत आहेत. त्यांचे शरीरीं सीतज्वराची पीडा जाहली आहे. औषधी व दैवी उपाय करीत आहेत. एक दिवसा आड पाळी आहे' (ता. ११-३-१७९९). नानांची प्रकृति निखालस अशी बरी जाली नाहीं. हल्लीं चार रोज कान दुखत आहे. त्रिवर्ग श्रीमंतांस नानांनीं ता. ७–४–१७९९ रोजीं भेजवानी केली. भोजनोत्तर चार घटका बसून खलबत झालें. ता. १५–४–९९, नानांची प्रकृति बरीच आहे. स्नान करूं लागले. श्रीविष्णूस जाऊं लागले. ता. २४ जुलई, प्रकृति तूर्त चांगली आहे. अमृतराव कारभारांत आहेत. नारोपंत चक्रदेव अखत्यारी, त्यांखेरीज कारभार होत नाहीं.' डिसेंबर स. १७९९ त शक्ति अगदीं नाहीं असा उल्लेख आहे. तेव्हांपासून पुढें त्यास शनिवार वाड्यांत सुद्धां जाण्याची ताकद राहिली नाहीं. माघ वद्यांत त्यास सारखाच ज्वर येऊं लागला. प्रकृति अधिकाधिक विघडत चाललेली ऐकून फाल्गुन शु॥ ८ स बाजीराव समाचारास येऊन गेला. फाल्गुन व॥ ३ गुरुवारीं मार्च ता. १३ मध्यरात्रीस काळ जाहला. समस्त मुत्सद्दी आले होते. अमृतराव साहेबही आले, परंतु भाषण नाहीं. शव माजघरांतून जाळीपुढें आणिलें. गंगेवर न्यावयाची सिद्धता झाली, तों आरबांनीं आपले फडशाकरितां अडथळा घातला. दुलभदास यांनीं हवाला घेतला, तेव्हां शव जाऊं दिलें. नानाकरितां ते दिवशीं हाहाकार झाला तो काय वर्णावा! दोघी स्त्रिया सिद्धटेकास होत्या. नागोजी गुंड म्हणून नानाचा अत्यंत विश्वासु नोकर होता त्यास घेऊन त्या तुळजापुरचे निमित्तानें गेल्या होत्या त्या वर्तमान समजल्यावर निघून चवथे दिवशीं आल्या. ब्राऊनरिग चिंतामणराव आपास बोलला, 'नाना गेले, ब्राह्मण्य बुडालें. तुमचे राज्यांतील दाब गेला. बाळोबा तात्या सुद्ध दाबाचे पुरुष

आहेत, परंतु ते फार तर सिंद्याचे घरची काळजी पाहतील. परंतु पुण्याची दौलत पोटीं पडलीं.' उत्तरकार्य प्रभाकरपंत भानु अंबेगांवकर यांनीं केलें. पंधरावे दिवशीं थोरले स्त्रीस देवाज्ञा झाली.

नानास तपकीर ओढण्याची संवय होती असें दिसतें. तपकिरीकरितां तंबाखू मागविल्याचे उल्लेख पटवर्धनी दप्तरांत आहेत.

नानाच्या मृत्यूनें बाजीरावास दुःख झाल्याचा उल्लेख एकही उपलब्ध नाहीं. उलट आपण आतां पूर्ण स्वतंत्र झालों असेंच त्यास वाटून समाधान झालें असावें. पुण्याहून कर्नल पामरनें वरिष्ठांस कळविलें कीं 'नाना बरोबर मराठी राज्याचें शहाणपण आणि समतोलपणा सर्व लयास गेला.* कलकत्त्याहून वेल्स्लीनेंही नानाचें गुणवर्णन करून बाजीरावास सांत्वनाचें पत्र लिहिलें.

नानाचा जन्म सातारा येथें ता. १२-२-१७४२ रोजीं† व मृत्यु पुणें येथें ता.१३-३-१८०० रोजीं झाला. म्हणजे त्याची हयात ५८ वर्षें १ महिना. त्याचा बाप बाबा फडणीस यास पोटशुळाची व्यथा होती. सन १७५६ च्या दसऱ्यानंतर रघुनाथराव हिंदुस्थानच्या स्वारीस गेला, त्याजबरोबर बाबा फडणीस होता. नर्मदापार झाल्यावर स्वारींतच बाबाचा काळ झाला, तेव्हां त्याचा पुत्र नाना यास पुणें येथें ता. २९-११-१७५६ रोजीं फडणिशीचीं वस्त्रें मिळालीं, नंतर तो भाऊसाहेबाबरोबर कर्नाटकचे स्वारीस गेला. विश्वासराव नानाहून पांच महिन्यांनीं लहान. हे दोघे आरंभापासून एकत्रच वाढले. त्यांचें संगोपन बहुधा सदाशिवरावभाऊच्या देखरेखी-खालीं होऊन त्याचेंच वळण त्यांनीं उचलिलें. रघुनाथरावाकडे त्यांचा ओढा मूळचाच नव्हता. तडफ, वचक, रेखीव वर्तन, कामाचा उरक इत्यादि गुणांत नानावर सदाशिव-रावाचीच छाप दिसेल. नानाचा चुलत भाऊ मोरोबा त्याहून थोडा लहान, पण दोघांचें आरंभापासूनच पटनासें झाल्यामुळें बाबूरावानें संसाराच्या दोन वांटण्या दोघांस

---

* "With him has departed all the wisdom and moderation of the Maratha Goverment." डफ: फॉरेस्ट; खरे; Macdonald's ना. फ. च.

† जन्म श. १६६३ दुर्मति माघ कृ॥ ४ भृगुवासरे घ. ४३ प. ३० चित्रा जन्म नक्षत्रे घ. ६० प. ० तृतीय चरणे राक्षसगणे शूद्रवर्णे, गंडयोग घ. १९ प. १४, बालव करणे रखमाबाई नाम्नी प्रथमं सुपुत्रमजीजनत्.

करून दिल्या, तेव्हांपासून नाना स्वतंत्रच राहत असे. त्याचें पहिलें लग्न लहानपणींच झालें असावें. त्यास एकंदर नऊ स्त्रिया असल्याचा दाखला मिळतो, त्यांचीं नांवें:—

१ यशोदाबाई ( सदाशिव रघुनाथ गद्रे सावकाराची मुलगी. खुन्या मुरलीधराचे मालक दादा गद्रे याची बहीण )

२ लक्ष्मीबाई ( सुवर्णदुर्गचे धारप )

३ अन्नपूर्णाबाई ( वाईचे सावकार गाडगीळ ) ( ख. ले. २०३८ ता. २२-२-१७७७ )

४ राधाबाई ( पुण्याचे सावकार बिडार ? )

५ आनंदीबाई ( वैद्य ) ख. ले. ३३०८ त जानेवारी १७९१ त स्त्रीस रजोदर्शन झाल्याचा उल्लेख आहे. तिचें लग्न ता. १७-२–१७९० रोजीं झालें, तेव्हां दहा वर्षांची होती. ( रु. ले. १३५ )

६ यशोदाबाई ( पेंडसे )

७ अन्नपूर्णा ( विजयदुर्गचे परांजपे ) लग्न ता. २८-२-१७८८ ( ख. ले.३१४१ )

८ बगाबाई ( रत्नागिरींचे सुतार ) ही बाई नानाचे मृत्युनंतर १४ वे दिवशीं वारली. लग्नांत बगाबाईचे गळ्यांत सोन्याचे सहा ठमे बांधले होते.

९ जिऊबाई ( मुरुडचे गोपाळभट वैशंपायन याची मुलगी ) नानाचे मृत्युसमयीं नऊ वर्षांची असून ती स. १८५४ त वारली.

ता. ३–९–१७९७ चा एक उल्लेख आहे तो असा. ‘ नानांचे स्त्रीस रजोदर्शन प्राप्त जाहलें. सालगुदस्तां लग्न झालें तिला नहाण आलें. गर्भाधान करावयाकरितां सुताराची मूल तिगस्तां लग्न जाहलें तिला मेणवलीहून आणविली आहे. तिला अद्याप नहाण आलें नाहीं. ’ या लेखावरून स.१७९५ व १७९६ या सालीं नानानें दोन लग्नें केलीं असें होतें. कोणतीचें केव्हां लग्न झालें याचा बिनचूक निर्णय करण्यास साधन नाहीं. जिऊबाई खेरीज सर्व बायका नानाचे हयातींत वारल्या. नानास दोन मुली व एक मुलगा अशीं तीन अपत्यें झालीं, तीं सर्व लहानपणींच वारलीं. मुलगी सवाईमाधवरावास द्यावी असा विचार होता. मुलगा जन्मल्याचा उल्लेख ता. १-१०-१७७८ चा आहे. तत्कालीन प्रघातानुरूप नानाच्या रक्षाही होत्या. नानाच्या कोणीं वडील स्त्री नातेवाइकानें खालील पत्र त्यास लिहिलेलें आढळतें. ‘ तुम्हांकडील अप्रिय वर्तमान तुमचे बायकोचें ऐकिलें. तेणेंकरून चित्तास असंतोष जाला कीं तुमचे जन्मास पन्नास वर्षें होऊन पुढें बायको किंवा मुलें यांस थांग नाहीं. दैवयोगें करून होणें तें होतच असतें. परंतु मनुष्यप्रयत्न आहेत ते करावे. आतां दोन लग्नें करावीं आणि पूर्वीच्या बायकोचे

टांक करून गळ्यांत घालावे. कोणी जाणते असतात त्यांचा शोध करून अंगारे करावे हें तुम्हां पुरुषांस नीट करतां येत नाहीं आणि सर्व लटकेंच वाटत असतें. परंतु आम्हांस या गोष्टींचे अनुभव आहेत. तुमच्या घरांत कोणी वडील बायको नाहीं. तुम्ही तालेवार. तुम्हांस करावयाचा उद्योग होणार नाहीं. यास्तव तीο सौο च्मिमाबाई तुमची मामी यांस हे गोष्टी सांगितल्यानें ती अंगारा औषध करील. तुमचे चित्तांत आल्यास लेक घ्यावयाचा उद्योग कराल तर बरें आहे. तुम्ही सुज्ञ आहां. जे गोष्टींत जें चांगलें दिसेल तें कराल.' (ता. ६-१०-१७९२).

नानाची स्त्री निवर्तली तेव्हां एका गृहस्थाचें सांत्वनपत्र आलें तें असें. 'कार्तिक शुद्ध ११ स सौο तीस कैलासवास जाहला त्यामुळें बहुतच उदासीन वृत्ति जाहली म्हणोन ऐकिलें, त्यास ही गोष्ट ईश्वराधीन आहे, मी आपणांस त्याहावें हे योग्यता नाहीं, परंतु प्राकृत श्लोक आहे कीं 'संसारीं असतां अलिप्त नलिनीपत्रापरी राहणें इο'

नानाची प्रकृति नाजूक व अशक्त असे. त्याचा बांधा उभार व सडपातळ होता. वर्ण किंचित् काळसर व मुद्रा गंभीर होती. डोळे पाणीदार, तीक्ष्ण व चंचळ होते. राहणी अत्यंत नियमित असल्यामुळें त्याची प्रकृति निरोगी राहिली. उतारवयांत बापाचा पोटशूळ त्यासही जडला होता. विद्वान लोकांच्या संसर्गानें त्याच्या ठिकाणीं बहुश्रुतपणा चांगला आला होता. थट्टेंत देखील खोटें बोलणें त्यास खपत नसे. हंसणें किंवा थट्टामस्करी त्यास आवडत नसे अशी प्रसिद्धि आहे. त्याच्या अनेक आख्या-यिका खऱ्यांनीं त्यांच्या चरित्रांत, हरिवंशाचे बखरींत व लोकहितवादींच्या ऐ. गोष्टींत दिलेल्या जिज्ञासूंनीं पाहव्या. गंगे संदर्शन दे श्रीविष्णु स्वामिभक्त नानातें। या पद्यार्धांत मोरोपंत कवीनें नानाची आठवण केली आहे.

'नानाचा आजा बाळाजी महादेव, त्याचा बाप जनार्दनबाबा मुक्कामची फडणिशी-करीत होते, आणि बाबूराव स्वारीची करीत. पुढें नानांनीं मुक्कामची फडणिशी पानि-पत स्वारीपासून नारायणरावाचे अखेरपर्यंत पंधरा वर्षें केली. बाबूरावाचे पुत्र रामचंद्र हल्लीं चित्रकोटास विनायक अमृतराव पेशवे यांजपाशीं आहेत.'*

**२ दत्तक पुत्राची तजवीज, जिऊबाई.**—परस्त्रीसंबंधानें बाजीरावाची बदनजर प्रसिद्धच होती. त्यांतून थोरांमोठ्यांच्या अल्पवयी किंवा तरुणबायकांस वैधव्य प्राप्त झाल्यावर केवढी दुर्धर अवस्था प्राप्त होई, त्याची कल्पनाच केली पाहिजे. मयत

---

* समारो. ३०१: ऐ. टि. २.३६, १.२८; भा. व. २–म. मं. ब. पृ. ३८

इसमाच्या वतनाची किंवा दत्तकाची वगैरे व्यवस्था बाजीरावाचे मर्जीवर असल्यामुळें अशा गतभर्तृक अबलांना दुहेरी तिहेरी कचाट्यांत पकडणें बाजीरावच्या अगदीं हातांतलें होतें. सवाईमाधवरावाची बायको यशोदाबाई, नानाफडणिसाची जिऊबाई, मल्हारराव होळकराची रखमाबाई, इत्यादिकांची उदाहरणें इतकीं सुप्रसिद्ध आहेत कीं, त्यांचीं चरित्रें वर्णन करण्यास स्वतंत्रच ग्रंथ पाहिजे. जिऊबाई तर नऊ वर्षांची अर्भक, पण कशी झाली तरी नानाच्या मिळकतीची मालकीण, आणि नानाची प्रचंड दौलत हस्तगत करण्याची बाजीरावास मोठी ईर्षा, म्हणून त्यानें जिऊबाईचा डाव आपल्या हातांतून न जाऊं देण्याची पराकाष्ठा केली. पण नानाचे सहायक व खुद्द जिऊबाई त्यास वस्ताद भेटली. आधीं नानाचें शव बाहेर काढण्यापूर्वी वाड्यांतल्या आरबांनीं तलबे-करितां हंगामा केला. आरब बाहेर निघेनात, तेव्हां पेशव्यानें वाड्यावर तोफांचा मारा केला. त्यामुळें आरब बाहेर निघाले. पेशव्यानें त्यांचा पगार चुकवून त्यांस वाटेस लाविलें आणि वाडे, जहागीर, इनामी गांव वगैरे सर्व जप्त करून जिऊबाईस शनिवार वाड्यांत नेऊन ठेविलें. नानाच्या संपत्तीचा लोभ दौलतरावासही होताच. त्यानें पेशव्यास कळविलें कीं नानाकडे आपलें एक कोट कर्ज घेणें आहे, तें फिटेपर्यंत नानाचें कुटुंब, व मालियत सर्व आपल्या ताब्यांत ठेवावी; आणि नानाच्या बायकोस दत्तक देऊन त्याजकडून फडणिशीचा कारभार घ्यावा. पण सिंद्याचें वर्म बाजीराव ओळखून होता. त्यानें सांगितलें, महादजीच्या बायका आपल्याकडे दुसरा दत्तक घेण्याची परवानगी मागत आहेत, ती आपण त्यांस देतों. हा जबाब मिळतांच दौलतराव कुंठित झाला. नानाच्या पक्षाची मंडळी बाबा फडके, नारोपंत चक्रदेव. बाबूराव वैद्य, आबा शेलूकर इत्यादिकांस दत्तकाचा विचार करण्याचे निमित्तानें बाजीरावानें वाड्यांत बोलाविलें आणि तेथें त्यांस कैद करून त्यांचे हाल चालविले, नानाचा मुख्य खजिना लोहगड किल्ल्यावर होता. तेथील किल्लेदार धोंडो बल्लाळ निज्सुरे नानाच्या विश्वासांतला होता. त्यानें नानाच्या स्त्रियेस प्रतिबंधांत ठेवलेलें ऐकतांच बंडावा सुरू केला. तो मोडण्याचें सामर्थ्य बाजीरावास नव्हतें. पुढें होळ-करानें स. १८०२ सालीं पुण्यावर चाल केली तेव्हां बाजीराव पळून वसईस गेला. शनिवारवाड्यांत जिऊबाई होती तिला होळकरानें तेथून काढून लोहगडास निज्सुरे याजकडे पाठविलें. तेथें ती दोन वर्षें होती. पुढें जनरल वेल्स्लीच्या मार्फत बाजीरावास पेशवाईपद मिळाल्यावर त्यानें पुनः लोहगड किल्ला व जिऊबाई यांस आपल्या ताब्यांत देण्याची वेल्स्लीस निकड लाविली. इकडे जिऊबाईच्या मंडळींनीं ही आपला वशिला

वेल्स्लीकडे पोंचविला. त्यानें मध्यस्थी करून या प्रकरणाचा निकाल लाविला, त्याचा पत्रव्यवहार छापलेला आहे. धोंडोपंतास वेल्स्लीनें कळविलें कीं तुम्ही बाजीरावाचे लक्षांत वागावें हें तुमच्या हिताचें आहे. तुम्ही तसें कराल तरच मातुश्रीबाईची व्यवस्था योग्य प्रकारची लावून देण्याची जबाबदारी आम्ही स्वीकारूं. त्यावरून पुढें वेल्स्लीच्या सल्ल्यानें वागून निज्सुरे व जिऊबाईचा भाऊ परशुराम गोपाळ वैशंपायन व राघो भास्कर गोडबोले यांनीं मोठ्या खटपटीनें क्लोझ, वेल्स्ली, एल्फिन्स्टन वगैरे इंग्रजांकडे बाईची दाद लावून त्यांच्या मार्फत तिची व्यवस्था लावून घेतली. निज्सुरे व वेल्स्ली यांजमध्यें ता. २५.३.१८०४ रोजीं करार झाला तो असाः—

१ लोहगड व केळंजा हे किल्ले बाजीरावास द्यावे; २ धोंडोपंतानें कंपनीच्या आश्रयाखालीं राहवें. पेशवे किंवा इंग्रज यांच्या विरुद्ध आचरण करूं नये. केल्यास इंग्रजांचा आश्रय मिळणार नाहीं. ३ जिऊबाईला जप्त झालेल्या उत्पन्नांतून कंपनी सरकार मार्फत सालाचा बारा हजार रुपये तनखा मिळेल, तो घेऊन तिनें इंग्रजांच्या आश्रयाखालीं पाहिजे तेथें आपल्या नोकरांसह राहावें.*

याच मजकुराचें वेल्स्लीचें जिऊबाईस पत्र आहे. कर्नल क्लोझनेंही बाईस ता. १.४.१८०४ चें पत्र लिहिलेलें आहे. त्यांत तो कळवितो. 'काशींत फडणिसांचा वाडा आहे तो अमृतरावांनीं बळकाविला आहे, तरी त्या वाड्याचा बंदोबस्त तुमचे मर्जीनुरूप होईल. दुसरें कल्याणास राहवें असा आपला इरादा आहे त्यास पनवेल येथें पाहऱ्याचा वगैरे बंदोबस्त चांगला राहील, सबब पनवेलीस आपलें राहणें मुनासब आहे. परशुराम गोपाळ तुमचे बंधु सिंहगडावर कैदेंत होते, त्यांस बाजीरावांस सांगून कैदेंतून सोडवून आपणाकडे पाठविलें असे.'

वरील मतलबास अनुसरून बाजीरावानेंही ता. १.४.१८०४ चा करारनामा बाईस लिहून दिला कीं तिनें पुण्यास येऊन आपल्या मालकीच्या वाड्यांत राहवें, तिचे खर्चास सालीना बारा हजार रुपये देण्यांत येतील. परंतु बाजीरावाचे अमदानींत बाई पुण्यास आली नाहीं. तिची नेमणूक सालाची २५ हजार व पूर्वीची नानाची सर्व मालमत्ता तिला देण्याचेंही बाजीरावानें कबूल केलें, पण तिनें तें मानलें नाहीं. बाजीराव ब्रह्मावर्तास रवाना झाल्यावर एल्फिन्स्टननें जिऊबाईस पनवेलीहून पुण्यास बोलवून आणिलें, आणि पेशव्याकडून मिळत असलेली नेमणूक कायम करून शिवाय

---

* भा. व. प. या. १. ३०,२५,२०,२९,२०; वंशावळ म. रि. उ. वि. १

मेणवली गांव जप्तींत होता तो मोकळा करून तिच्या हवालीं केला. पुढें ती मेणवलीच्या वाड्यांत जाऊन राहिली.

नानानें आपल्या हयातींत ता. १–१२–१७९४ रोजीं दामोदर बळवंत यास दत्तक घेतलें होतें, परंतु तो दत्तक पुत्र पुढें लवकरच वारला. त्यानंतर पुनः दत्तक पुत्र घेण्याची त्याची इच्छा होती, पण ती हयातींत सिद्धीस गेली नाहीं. पश्चात् बाजीरावाचें राज्य असेपर्यंत जिऊबाईचा जीव ठिकाणीं नव्हता. मराठी राज्य गेल्यावर बाईकडे नक्त नेमणूक १२ हजार रु, मेणवली गांव, निजामाकडील जहागीर पांच हजारांची, एवढें उत्पन्न चालू असून शिवाय पुण्यांतील बेलबागेच्या खर्चाकरितां ५ हजारांची नेमणूक मिळे. हें सर्व उत्पन्न वंशपरंपरा चालू राहण्याची जिऊबाईनें पुष्कळ खटपट केली; आणि त्या उद्देशानें तिनें थोरले बाळासाहेब मिरजकरांचा जांवई रामकृष्णपंत भानु याचा मुलगा गंगाधरपंत यास दत्तक घेऊन त्याचें नांव महादाजीपंत रावसाहेब असें ठेविलें. हें दत्तविधान शके १७४९, १८२७ त झालें असें खरे लिहितात तर स. १८३५ सालीं झालें असें प्रो. भानु कळवितात. एकंदरींत जिऊबाई ही आपल्या नवऱ्याप्रमाणेंच किंवा बाजीरावाची मुलगी वयाबाई आपटे इच्याप्रमाणें प्रचंड घडामोडी व अवस्थान्तरें पाहून शके १७७५ फाल्गुनांत ( मार्च १८५४ ) मरण पावली. बाई शहाणी व सदाचरणी असून तिनें आपल्या जगद्विख्यात पतीचें नांव निष्कलंक राखिलें. जिऊबाईच्या पश्चात तिची नेमणूक बंद होऊन मेणवली गांव जप्त झाला, तो पुढें गव्हर्नर सर बार्टल् फ्रियरनें माधवराव बल्लाळास वंशपरंपरा इनाम करून दिला. माधवराव बल्लाळ स. १८७७ त वारला. त्यासही संतान नव्हतें. त्याच्या बायकोनें पुढें मुलगा दत्तक घेऊन नांव बाळाजी माधव ऊर्फ नानासाहेब असें ठेविलें. हे गृहस्थ हल्लीं विद्यमान आहेत ( स. १९३१ ).

कोणत्याही पुरुषाच्या किंवा घराण्याच्या राष्ट्रसेवेची किंमत इतिहासकार पाहिजे ती ठरवोत, परंतु कोंकणांतील भट घराण्यानें देशावर येऊन मराठी राज्याची जी कांहीं कामगिरी केली तींत भानूंच्या घराण्याचाही बराच भाग आहे. दोनही घराणीं एकदमच प्रवासास निघालीं, आणि बाजीरावाच्या अल्पकालीन पोरकटपणापलीकडे उभयतांचा ऋणानुबंध अव्याहत चालला यांत संशय नाहीं. पेशव्यांचे घराण्याचा अस्त झालेला आज दिसतो तसाच जवळ जवळ भानूंचाही अस्तच आहे. वरील रामकृष्ण गंगाधराचा भाऊ भास्कर गंगाधर याचा उल्लेख स. १८५५ सालच्या एका इंग्रजी पत्रांत आलेला स्मरणीय आहे. ( खं. १०–३२७ ).

मराठशाहींतील राजकारणाच्या भानगडी, घडामोडी, बंडें, फितूर, वगैरे एकंदर स्थित्यंतरें जितकीं नानाफडणिसानें पाहिलीं, तितकीं, निदान तशा स्वरूपाचीं दुसऱ्या कोणत्याही पुरुषानें पाहिलीं नसतील. जहागिरी व उत्पन्नें कशीं लगोलग नाहींशीं होतात व अधिकारी वर्ग विरोधकांशीं कसें वर्तन करितो, याचा अनुभव नानास परिपूर्ण होता. सखाराम बापूनें नानाच्या विनवण्या करून आपलीं उत्पन्नें पुढें चालवावीं व दत्तक मुलास कारभारावर घ्यावें असा लेखी करार करून घेतला असतांही, त्याची स्थिति खुद्द नानानेंच पुढें कशी केली, एवढा महादजी सिंदे पराक्रमी, त्याच्या बायकांची पुढें कशी स्थिति झाली, या गोष्टी स्वतः डोळ्यांनीं पाहत असतांही नानानें बाजीपुढें नांक घांसून ता. ३१·१२·१७९६ रोजीं खालील विनवण्या केल्या. 'सेवेसीं बाळाजी जनार्दन फडणीस विज्ञापना ऐसीजे. स्वामींची कृपा मजवर, माझें लक्ष स्वामींपाशीं. हें कितेकांस असह्य होऊन, या राज्यांत बखेडा करून, आचरूं नयेत तीं कर्में स्वामींशीं अमर्यादेचीं आचरले, कीं महाडास राहून, राजकारणें वगैरे प्रयत्न दौलतराव सिंदे व सेवकानें करावयाचे ते करून, व स्वामींचें पुण्य मदत होऊन सर्व गोष्टी मनोदयानुरूप घडल्या. येणें करून सेवकास कृतकृत्यता जाहली. पुढें सेवा करावी अशी शरिरांत ताकद व शक्ति राहिली नाहीं. यास्तव मागणें हेंच कीं, कृपा करून स्वस्थ स्नान संध्या करून स्वामींस अभीष्ट चिंतून राहण्याविशीं आज्ञा व येविशीं करार करून देण्याचीं कलमें:—

१ 'दत्तपुत्र घेण्याची आज्ञा आहे त्याप्रमाणें घेण्यांत येईल. त्याचे हातून पूर्ववत् प्रमाणें फडणिशीचें दरकाचें वगैरे काम घेऊन लोभानें सरंजाम वगैरे चालत आल्याप्रमाणें चालवावा. लोहगड व केळंजा किल्ले असावे. माझेविशीं चित्तांत संशय नसावा, कोणी घालूं लागल्यास येऊं नये. २ पूर्वीं स्वारांचा सरंजाम आहे त्याहून हजार गाडद्यांचा जास्त द्यावा ३ सरकारांतून पंचवीस हजारांचें सोयीचें इनाम करून द्यावें. ४ श्रीकाशीस जाण्याचा बेत आहे, त्यास संतोषानें निरोप दिला अशीं पत्रें इंग्रजांस व सिंद्यांस द्यावीं. ५ राजकारणांत आमचे करार गुंतले असतील ते पार पाडावे. ६ सरकारकामीं आम्हीं खर्च केला असेल तो उगवून द्यावा. ७ हरिपंत फडक्यांनीं राज्यांत सेवा चांगली केली, त्यांचे पुत्रांचें चालवावें.' यापुढें सात इसम सरकारचे खास उपयोगीं पडले, त्यांचें चालविण्याविशीं विनंतीचीं आणखी पांच कलमें आहेत. एकूण कलमें बारा. या सर्व कलमांवर बाजीरावानें स्वहस्तानें कबुलीचा करार लिहून

दिलेला आहे. [ पे. द. पृ. ७२–२१ ] रा. खऱ्यांनीं नाना फडणिसाचे चरित्रांत ही याद छापली असून तींतील करार न पाळल्याबद्दल बाजीरावास सडकून दोष दिला आहे.

या लेखांतील प्रत्येक वाक्य मनन करण्याजोगें आहे. ज्या बाजीरावाच्या बापास नानानें पुण्यांतून हाकून दिलें, ज्यास वयांत येईपर्यंत कैदेंत ठेवून कठोरपणानें वागविलें, ज्यास सवाईमाधवरावानंतर पेशवाई पद मिळू नये अशी नानाची प्रचंड खटपट, त्याच बाजीरावापुढें पदर पसरून, त्याच्या पुण्याची व कृपेची नाना तारीफ करतो, यावरून नानाच्या अंगचा कोणता गुण दिसून येतो ? वरील यादीच्या मथळ्यांतील एकही शब्द खरा नाहीं. बरें इतकें सर्व कशाकरितां, तर पुढें व्हावयाच्या दत्तकास फडणिसी हक्क मिळावा म्हणून. त्या फडणिशीचा तरी कारभार करण्यास दत्तक पुत्र लायक असेल कीं नाहीं याची मात्र भ्रान्त. प्रत्यक्ष पेशवाई राहते कीं नाहीं हाच जेथें वानवा, तेथें फडणिशीची काय कथा ! नुमत्या काशीस राहण्यास सुद्धां इंग्रजांकडे बाजीरावाची शिफारस घेणें नानास जरूर वाटलें, इतका त्या वेळीं इंग्रजांचा जोर हिंदुस्थानांत झाला होता. नाना फडणिसाच्या हातचा वरील कागद आपणांस वाचण्यास मिळण्यापेक्षां, रावबाजीचें मुखावलोकन न करितां रामशास्त्र्याप्रमाणें त्यास स्पष्ट शब्दांनीं बजावून मग नाना कारभारांतून निवृत्त झाल्याचें किंबहुना बाजीरावाकडून छळ झाल्याचें वर्णन वाचण्यास मिळतें तर नानाची तपश्चर्या बहुमोल झाली असती. द्रव्यलोभ व अधिकार मोह शेवटच्या क्षणापर्यंत न सुटल्यामुळें नानाच्या कर्तबगारीस फारच कमीपणा आला. ता. ३१·१२·१७९६ रोजीं ज्या नानानें बाजीरावास राज्य कारभाराचीं सणसणीत कलमें लिहून दिलीं, त्याच नानाचा त्याच तारखेचा वरील विनंति अर्ज वाचून अत्यंत उद्वेग वाटतो. रामशास्त्र्याची योग्यता पदरांत पडत असतां, प्रत्यक्ष त्याच्या सहवासांत रुळलेला नाना त्या योग्यतेस सर्वथा मुकला. ‘ वचस्येकं मनस्येकं ’ याचा हा उत्कृष्ट मासला आहे. मोठमोठ्या शहाण्यांच्या अकला अशाच गुंग होतात. ‘ दत्तपुत्र घेण्याची आज्ञा आहे, त्याप्रमाणें घेण्यांत येईल, ’ असें वाक्य वरील अर्जांत आहे, त्यावरून नानानें पूर्वीं दत्तक घेतलेला मुलगा मेला असावा. कारण ता. १·१२·१७९४ रोजीं दामोदर बल्लाळ भानू यास नानानें दत्तक घेऊन त्याचे नांवानें सवाईमाधवरावाकडून करून घेतलेली सनद छापली आहे, तींत खालील वाक्यें आहेत. ‘ तुम्हांस फडणिसांनीं आमचे रूबरू मांडीवर घेऊन घृत मधु शर्करा प्राशन करविलें. सरकारचें फडणिसीचा दरक तुमचा, दरकाचें काम वंशपरंपरा करून तुम्ही सुखरूप राहणें. पुढें दौलतीची वहिवाट करणा-

रांनीं लिहिल्या मजकुरास दिक्कत घातल्यास स्वजनित मातोश्रीशीं रतिसंभोग केल्याचा दोष प्राप्त होईल.'*

**३ लोकोपयोगी कामें.**—इतिहाससंग्रहांत व खऱ्यांनीं लिहिलेल्या चरित्रांत नानासंबंधीं अनेक किरकोळ तपशील सांपडतात ते एकत्र करण्यासारखे आहेत. पानपतावरूनच विरक्तावस्थेंत कायमचा काशीवास करण्याचा नानाचा विचार होता. पण त्याला ती यात्रा एकदांही घडण्याचा योग आला नाहीं. मात्र महादजी सिंदे पुण्यास आल्यापासून व पुढें बाजीरावाच्या अंमदानींत, मी कारभार सोडून काशीस जाऊन राहतों, असे बेत त्यानें अनेकवार जाहीर केले. परंतु त्यांपैकीं नुसते बाहणे किती व खऱ्या विरक्तीचे किती, हें ठरविण्यास मार्ग नाहीं. ता. ११–६–१७९२ रोजीं त्यानें खालील पत्र बहुधा तुकोजी होळकरास लिहिलेलें आढळतें. ' काशीयात्रा घडावी, असा बहुत दिवस मनांतून हेत होता. ईश्वरी कृपेंकडून दक्षिण हिंदुस्थानचा बंदोबस्त, सर्वांशीं तह सरकारचे, व रा. पाटीलबावांचें येणें याच समयीं होतें व भाऊंचेंही येणें. यांच्या संमतीनें श्रीमंतांचा संतोषें करून निरोप होणें यास प्रथम अनुकूलता, व हें मला घडणें व मागें संभाळावयास हरिपंत तात्या यांची अंतःकरण-पूर्वक खात्री करून घेऊन जावयाचा विचार केला आहे. ' महादजी पुण्यास आला, त्याच दिवशीं हें पत्र लिहिलेलें आहे. शेवटीं काशीयात्रा प्रत्यक्ष घडेना, तेव्हां नानानें त्या क्षेत्रांतील देवालयांचा एक रेशमी नकाशा तयार करून आणिला, त्याचें दर्शन घेऊन नाना समाधान मानी. हा नकाशा मावजींच्या संग्रहांत आहे. अनेक अभीष्ट चिंतकांस काशीयात्रेस पाठवून शक्य तितकी आपली मनीषा तृप्त करण्याचा नानाचा उद्योग नेहमींच चालू होता. तसेंच काशी येथें कांहीं पुण्यकृत्य करावें या हेतूनें त्यानें तेथील कर्मनाशी नदीवर पूल बांधविला. हें काम सुरू करितांना वाळू व पाणी यांमुळें पाया टिकेना, तेव्हां तेथें ब्राह्मणां करवीं ता. ६·९·१७९५ रोजीं अनुष्ठानास प्रारंभ झाला. ही गोष्ट नानास कळल्यावर त्यानें अनुष्ठान बंद करवून इंग्रजांचे मार्फत बेकर नामक एंजिनियर आणवून, त्याजकडून कलकत्याहून कळीचे बंब आणविले, तेव्हां काम पुरें झालें. पुण्यांत किंवा महाराष्ट्रांत इंग्रजी एंजिनियर आणून ती कला सुरू केली असती, तर कर्मनाशीच्या पुलापेक्षां नानास अधिक पुण्य खचित लागलें असतें.

---

* ऐ. टि. १–४ पे. द. पृ. १७५; खरे-ना. फ. च.

खुशालचंद म्हणून एक हिंदु व्यापारी कलकत्त्यास इंग्रजांचे हद्दींत पेढीचा व्यापार करीत असे. त्यानें पुण्यास एक पेढी काढण्याची परवानगी नानाफडणिसाजवळ मागितली. नानानें त्यास कळविलें, कीं ' मराठा यात्रेकरूंस इंग्रजांनीं काशीस जशी यात्रेच्या कराची माफी दिली आहे, तशीच त्यांनीं प्रयाग व गया येथील यात्रेची द्यावी म्हणजे तुम्हांस येथें पेढी घालण्याची परवानगी देऊं. '

नाना फडणिसास उत्तरेंतून व इतर ठिकाणांहून अनेक चिजा मागविण्याचा मोठा शोक होता. द्राक्षें, डाळिंबें, तसबिरा वगैरे वारंवार अलीबहादरानें पुण्यास पाठविल्या. ' सोन्याचें तबक व पानदान, व गुलाबदाणी, व अत्तरदान यांजवर मिना, जमिनीवर हिरवा व वर बूट चांगले खुलत अशा तऱ्हेचे करून पाठवावे: व तंबुरे चांगले दोन उंच सुराचे व दोन चौकीचे गाण्याचे ताफीदार पाठवावे ', म्हणून नानानें अली-बहादराकडे मागणी केली. हें तंबुऱ्याचें काम करणारा कारागीर एकच चेतसिंगाचा होता, त्याजकडून काम करविण्यांत आलें. ( स. १७८९ ).

उत्तरेंत रंगीत चित्रांची व कारागिरीची विशेष प्रसिद्धि होती. ' जयपुरचे राजांनीं श्रीभागवताचे चित्रांची पोथी तयार केली आहे ती पोथी पाटीलबावांमार्फत राजाकडून मागवून आम्हांकरितां पाठवावी, ' असें नानानें आपाजी रामास लिहिलें, त्याप्रमाणें तो अप्रतिम सचित्रग्रंथ पाटीलबावांनीं मिळवून नानास पाठवून दिला. जयपुरास भोजराज नांवाचा उत्कृष्ट मीनेगार होता, त्यास दक्षिणेंत आणून मीन्याचें काम आपल्या लोकांस शिकवावें असा नानाचा हेतु फार दिवस होता. परंतु पुण्यास जाण्याविषयीं राजानें त्यास परवानगी दिली नाहीं. ' मीनेगार दागिने करावयाचे नकाशे कमलाचे वगैरे पाठवावे. तसेंच मेवा नासपाती, द्राक्षें वगैरे चांगला माल पाठवून द्यावा ' अशी नानाची आज्ञा हिंगणे वकिलांस होती. त्याप्रमाणें हे जिन्नस व बेदाणा, दाळिंब, बिहीचा व सेफचा मुरंबा, मधांतील वगैरे जिन्नस नानाकडे वारंवार येत. दिल्लीच्या बादशाहीची निकृष्टावस्था होत चालली त्याबरोबर तेथील कारागिरीही विपन्नावस्थेस गेली. नानानें हिंगण्यास लिहिलें. ' आम्हांस श्रीच्या चित्रांचे + मुरक्याची गरज आहे. याकरितां दिल्लींत निधामल वगैरे जुने कारागिरांचे हातच्या तसबिरा श्रीकृष्णाच्या बहुत चांगल्या नारीफलायक मिळवून त्यांस सोनेरी हासिया * करून बहुत मायजतीनें पाठवाव्या. ' त्याजवर हिंगणे लिहितो. 'अब्दालीच्या

---

+ मुरका=Album. * हासिया=किनारी, border.

गर्दीत निधामल दिल्लीहून उठून लखनौस गेला, तेथें मृत्यु पावला. आतां या दिवसांत येथें कोणी जुने हिंदु मातबर चित्रकार राहिले नाहींत. उपासामुळें व बेरोजगारीमुळें कसबी लोक कूल उठोन गेले. पहिली दिल्ली आतां राहिली नाहीं.' पुरंदऱ्यांनीं सासवडास उत्तरेंतील चित्रांचा फार चांगला संग्रह केला होता, तोही अनास्थेमुळें निरनिराळ्या लोकांनीं लांबविला. त्यांपैकीं कांहीं चित्रें आपणास मिळावीं असा प्रयत्न नानानें केला होता. बाजीरावाचे वेळेपासून सालोसाल मराठ्यांच्या स्वाऱ्या उत्तरेंत होत गेल्या, त्यांच्या योगानें महराष्ट्राचें जीवन कसकसें पुष्ट होत गेलें हा विषय चौकशीनें स्पष्ट करण्यासारखा आहे. विशेषतः नानाफडणिसाची दृष्टि संसाराच्या नानाविध बाबतींत विशेष व्यापक होती हें ध्यानांत ठेविलें पाहिजे. नानाचें वेलबागेचें मंदिर, मेणवलीची बाग वगैरे गोष्टी त्या वेळीं अत्यंत नांवाजलेल्या होत्या. नानाप्रकारचीं फळझाडें व फुलझाडें परिश्रमानें पैदा करून आपल्या बागेंत नानानें लाविलीं. 'मुंबईकर सावकार मेस्त्र मिंगेल याजकडून लीचीसचीं कलमें पुण्यास आलीं' असा उल्लेख १६-१०-१७९९ चा आहे

नवीन बाजार पेठा वसवून, पूल, तलाव, धरणें, गढया वगैरे बांधून लोकस्थिति सुधारण्याकडे नानाचें लक्ष विशेष होतें. नानाचेंचसें काय, पण सामान्यतः सर्व लहान मोठ्या मराठे सरदारांचा हा एक मोठा अंगचाच शोक होता असें म्हटलें तरी चालेल. वाडीस जाधव, सासवडास पुरंदरे, सोनोरीस पानसे, वाईस रास्ते अशा सर्व सरदारांच्या दोनशें वर्षांतील कृत्यांची हकीकत लिहिण्यास स्वतंत्रच उद्योग करावा लागेल. एकंदरींत त्या वेळच्या मानानें सर्व मराठ्यांचें लक्ष सुखसोयी वाढविण्याकडे विशेष होतें. 'रायाजी पाटलांनीं मौजे बारींत बाजारपेठ घालून वसविला. पेठेस व व बाजारास पैका लावून आबादी केली. नवे लोक वस्तीस बाजारास आले, येतात. आतांशीं बाजार बरा भरूं लागला आहे, त्याचे संरक्षणास शिबंदी खर्च होतो. इतर खर्चही लागतो.' असें पत्र रायाजी पाटलाकडून नानास गेलेलें नमूद आहे. रस्ते व दळणवळणाचीं साधनें नव्हतीं, तेव्हां या बाजार पेठांवरच सर्व रयतांची गुजराण होई. हल्लीं मुंबई, पुणें, अमदाबाद सारख्या शहरांतील बाजार पेठांचें काम पूर्वी हे आठवड्याचे गांवबाजार व जत्रा वगैरे करीत आणि त्यांस मोठी किफायत असे.

वऱ्हाड खानदेश गुजरात वगैरे कडील कापसाचा व्यापार सुरत भडोच वगैरे बंदरांतून परदेशांशीं चाले, त्यांत येथील व्यापाऱ्यांस मोठी किफायत होई. रॅली ब्रदर्सचे पूर्वगामी हिंदी व्यापारी होते. इंग्रज ईस्टइंडिया कंपनीनें हिंदी व्यापाऱ्यांना

कसें लुबाडलें त्याचे अल्पस्वल्प उल्लेख क्वचित् आढळतात. त्यांतून गुजरातेवर ताबा पेशवे व गायकवाडांचा, भडोच बंदर शिंद्याचें, सुरत इंग्रजांचें, अशा अनेक सत्ताधीशांच्या कचाट्यांत एतद्देशीय व्यापाऱ्यांची मोठी कुचंबणा होई. भडोच येथें आसाराम विनायक नांवाचा एक मातबर सावकार होता, त्यानें अंकलेश्वर बंदरांत नवीन व्यवस्था करण्याची परवानगी स. १७९० त नानाकडे मागितली. त्याचें पुढें निराकरण काय झालें तें आढळत नाहीं.

अव्वल इंग्रजींत दृष्टीस पडणाऱ्या पुण्याची रचना बहुतेक नाना फडणिसाच्या हातची आहे. अनेक पेठा वसवून व पाण्याचे हौद करून शहराची भरभराट नानानें पुष्कळ केली. बाजीरावानें पुढें वाडे मात्र कांहीं नवीन बांधले. शनिवार वाड्यांतही नानानें पुष्कळ नवीन फेरफार केले. पुण्यांतील पेठवार मंडळींची यादी अकारविल्हेनें छापलेली आहे, तींत बहुधा ब्राह्मणांचाच निर्देश आहे. तरी इतरांचेही मोठे वाडे तेथें होते यांत संशय नाहीं. बेलबागेच्या व्यवस्थेचे नियम नानानेंच ठरवून दिलेले आहेत. पेशव्यांचे वाड्यास लागून नानाचा मोठा वाडा होता, त्यांत हल्लीं न्यू इंग्लिश स्कूलची वसती आहे. काळेवावरांत नानाची विस्तीर्ण बाग आहे. स. १७८९ सालीं नानानें गणेश पेठ वसविली. कोंकणांत वेळास येथें नानानें काळभैरवाचें देवालय बांधिलें. खोपवलीस तलाव, देवालय व धर्मशाळा बांधिल्या, व तेथें अन्नवस्त्र ठेविलें. भिमाशंकरचें मंदिर बांधण्यास नानानें सुरवात केली, तें काम पुढें जिऊबाईनें पुरें केलें. गोदावरीवर घाट, वाडे वगैरे नानानें पुष्कळ बांधिले. मेणवलीचा घाट व वाडा अद्यापि प्रेक्षणीय स्थितींत आहे. अशा नानाविध लोकोपयोगी कामांत नानाचे निदान एककोट रुपये खर्च झाले असावे असा अंदाज बांधतां येईल. *

**४ कारभाराचा व्याप**§—सरकारी कामाचा नाना फडणिसाचा व्याप अतिशय प्रचंड होता. त्यांतूनही नानाचा प्रघात समक्ष बोलाचालीनें व्यवहार उलगडण्याचा नसून सर्वांचें म्हणणें लिहून घेऊन मग त्या कागदांवरून योग्यायोग्य पाहून निकाल करण्याचा असल्यामुळें, नानाची गांठ पडत नाहीं, भेटीची मुष्कील पडते, असे शेंकडों उल्लेख ठिकठिकाणच्या कागदांत आहेत. भेटीच्या वेळा ठरलेल्या होत्या. परंतु सर्वां-

---

* आधार-ऐ. टि. १.२०, ११, २४, २५, ४८; २.२५२, ३४०, ४१; ६.२, १८; खं. १०.३३४; ऐ. जु. गो. २.२०; ऐ. कि. प्र. ले. ५५.

§ भा. व २–प. या. तील उतारे; ऐ. टि. २-५३; ६-१२, २१ वगैरे.

ज्याचा भेटी होत नसून हाताखालच्या कामदारांमार्फत लोकांस आपापल्या कामापुरतें मोजकें बोलवावें लागे. शिवाय खलबतें, स्वाऱ्या, समारंभ, नित्यनैमित्तिक वगैरे कारणांनीं कैक दिवस चालू कामास नानाचा हातच लागत नसे. खरें पाहतां आसेतुहिमाचलपर्यंतच्या हिंदुस्थानचा कारभार पुण्यास चाले. स. १७७४ पासून स. १७९१–९२ पर्यंत नानाच्याच हातांत कारभाराचीं सर्व सूत्रें होतीं. पैकीं पहिलीं चार दोन वर्षें सखारामबापू, मोरोबा वगैरे कित्येक बारभाईचा त्यांत भाग होता. स. १७९०–९१ त सवाई माधवराव सोळा सतरा वयाचा झाल्यावर कांहीं थोडें लक्ष कामांत घालूं लागला, पण तें सुद्धां या कारभाऱ्यांच्या जवळ बसूनच. स्वतःच्या मुखत्यारीनें त्या पेशव्यानें कामांचे निकाल केल्याचा दाखला नाहीं. तशींच विशेष गाऱ्हाणीं लोकांचीं आलीं तर तेवढ्यापुरतें कांहीं काम त्यानें केलेलें दिसतें. महादजीच्या मृत्यूनंतर सिंदे घराण्याची व्यवस्था व खर्ड्याची स्वारी हीं कामें नानानेंच उरकलीं. एकंदरींत या उत्तर मराठशाहीवर नानाचीच छाप मुख्यतः होती. त्याच्या भेटीसाठीं लोकांस कैक दिवस अनेक प्रयत्न करीत बसावें लागे. सामान्यतः हल्लींच्या संस्थानिकांकडे दाद लागण्यास जी अडचण पडते, तशाच प्रकारची नानाकडेही होती. चालू कारभारांतील बाबतींशिवाय नाना प्रकारच्या किरकोळ विषयांत नानास कसें मन घालावें लागे याचे दाखले तत्कालीन कागदांत भरपूर आहेत. नोकरीसाठीं धडपडणाऱ्यांचे किंवा पगार न पावल्याचे अर्ज नानाकडे कसे येत त्याचीं उदाहरणें पहा.

'सेवेसीं माधवराव वासुदेव साष्टांग दंडवत विज्ञापना. सेवकास सात आठ वर्षें रोजमरा पावत नाहीं, यामुळें मोठे फिकिरींत आहे. अन्नवस्त्राचें संकट व देणेंदारांचे तगादे, रोजमारा बंद व्हावयाचें कारण काय नकळे. बाबूराव केशवांकडून स्वामीस दोनतीन वेळां विनंति करविली. ते वक्तीं आज्ञा जाली कीं चिटणीस सांगतील तशी वर्तणूक करणें. त्यावरून चिटणिसापाशीं राहून लिहिणें करीं. सेवकाकडे दोष नाहीं. इतरांवर स्वामींची कृपा आणि मजवर अवकृपा. तस्मात् माझाच दैवयोग. बहुतांस स्वामींनीं हुद्दे, गांव, जमिनी, असाम्या वगैरे देऊन ऊर्जित केलें. मी सेवक मात्र कोरा राहिलों. माझेविशीं रदबदल कोण करितो? मर्जीस पडेल न पडेल या अर्थे सेवकानें भिऊन विनंति करविली नाहीं. परंतु स्वामींनीं कृपाळू होऊन सांगून शिकवून पर्वेदा केली. गरिबी व खालसीची वगैरे स्तुति होत गेली. यावरून लाखों बक्षीस एकीकडे व धन्यापासून तारीफ होते हें एकीकडे, ऐसें समजून स्वामीच्या पायांचे आसऱ्यास आनंदांत होतों. पुरंदराहून पुण्यास राहूं लागल्यावर दिवटीचें तेलही बंद जालें.

सनइहिदेंत स्वामीस करुणा येऊन स्मरण झालें, तेव्हां पायांजवळ हजीर झालों. वर्षभर रोजमरा चालला. पुढें कोणीं काय स्वामींस समजावून विपर्यास आणून माझे अन्नांत मत्तिका घालोन अन्नान्न गत केली आहे. स्वारी निघून यादगिरीस गेली, तेव्हां समागमें होतों. स्वारींत शेंपन्नास रुपये कर्ज जालें, परंतु रोजमरा पावला नाहीं. विसाजीपंत बापूंस चिटणिसांनीं सांगून विनंति करविली, परंतु मर्जीस न पडली. मग केली न केली किंवा माझे वाद्याची त्यांस भीड पडली न कळे. समक्ष विनंति चिटणिसांनीं करावी तर गांठ पडत नाहीं. मी गरीब जाहलों. अन्नावांचून मारला जातों. दाद लागत नाहीं. वस्त्रप्रावर्णाचे हाल, अहर्निशीं दर्शनाचा योग घडत नाहीं. कदाचित् मजपासून अंतरही पडलें असेल तर पहिली पूर्ण कृपा होती, त्या अर्थें एक अन्याय तर बक्षिस करावयाचा होता. अगर समक्ष नेऊन कान उपटून शिक्षा शिकवावयाची होती. मी शागीर्दांतील अल्प बुद्धीचा, हलके वयाचा व पदरचा. अशा क्षुल्लकावर इतका रोष नसावा, मोठ्यांवर असावा. त्यांतील मी नव्हें. यंदा दोन मुंजी मुलांच्या कर्तव्य. मुलें थोर आठ नऊ नऊ वर्षांची झालीं. स्वामींचें समागमें लष्करांत यावें तर घोडें माणूस व खर्चास नाहीं. घोड्यावर विशेष बसतां न ये. चाकरीस उजूर नाहीं, परंतु अनवस्त्र देऊन चालविलें पाहिजे. पोटावर मारूं नये. ' हें पत्र माघ शुद्ध त्रयोदशीचें, बदामी स्वारीच्या वेळचें म्हणजे स. १७८७ च्या आरंभाचें असावें.

दुसरा एक अर्जदार लिहितो. ' आठ नऊ वर्षें उमेदवारीखालीं गुदरलीं, हा कालवर कांहीं सोय होत नाहीं. पारसी व संस्कृत विद्येचा अभ्यास केला. परंतु स्वामी गुणग्राहक असतां दैवयोगें करून लाभाची प्राप्ति होत नाहीं. साडेपांचशें रुपयांची असामी चालत नाहीं. ते साडेपांचशें व जाजती पन्नास मिळोन सहाशें, दरमाही ( म्हणजे दुमाही ) शंभर प्रमाणें रोजमरा करार करून द्यावा. पन्नास रुपयांची जाजती रदबदली आहे. कृपा करून करार केली पाहिजे. किती वर्षें झालीं. असेंच किती राहवें. मर्जीस न ये तर चार दिवस निरोप द्यावा. कोंकणांतून जाऊन येईन. उत्तराची आज्ञा केली पाहिजे.'

आणखी एक पत्र. ' सेवेशीं अंताजी दादाजी आचवल यांची विनंति. लष्करांत जाण्याविशीं विनंति लिहिली होती, त्यावरून राघोपंत पेंडसे यांजवळ आज्ञा झाली कीं स्वारी कोठें केली आहे कां ? त्यास ओढेकराकडील फडणिसी लिहिणें दोन वर्षें आकारिलें. वरकड कायदेकानू समजावयाचे ते मार्गांत पडल्यावर अन्नघड नाहीं. येविशीं खातरजमा पेंडसे करतील. आज दिनशुद्धि चांगली आहे सबब विनंति लिहिली

आहे.' या आचवलांस हल्लीं बिना येथें जहागिर आहे, त्यावरून ज्योतिषाची दिनशुद्धि फळास आली असावी असें दिसतें.

बळवंतराव हरि डिंगणकर लिहितो. 'श्रीमंत कै. माधवरावसाहेबांबरोबर पांच स्वाऱ्या पदरचा खर्च खाऊन केल्या. तेव्हां रोजमरा दुमाही तीनशें रुपये करून दिला. त्याजवर स्वामीबरोबर बऱ्हाणपुर, तळेगांव, यादगीर ऐशा स्वाऱ्या पदरचा खर्च खाऊन केल्या. तात्या स्वामींस विनंति करून पागा देऊं ऐसें बोलले. परंतु योग घडला नाहीं. आजपर्यंत पदरचें व कर्ज दहा हजार खाऊन स्वामींचे पायांजवळ राहिलों. पुढें कालक्षेप चालतां कठिण. स्वामींचे राज्यांत पूर्वार्जित सेवक आहेत, त्या सर्वांचें स्वामी चालवितात. वडिलांनीं श्री. कै. बाजीरावसाहेबांपासून नानासाहेबांपर्यंत सेवाचाकरी केली. त्यास स्वामी कृपाळु होऊन सेवा घेणार समर्थ आहेत. समक्ष विनंति करावी तर गांठ पडत नाहीं. कचें वृत्त विदित व्हावें म्हणोन विनंति लिहिली आहे.'

दौलतराव हिंदुराव घोरपडे लिहितो. 'चिरंजीव बहीरजीबावास आपलेजवळ पाठविलें. भेटी जाल्यास सहा महिने गुदरले. सेवा करावी ही इच्छा धरून आज्ञेची प्रतीक्षा करीत आहेत. आमचें सारें वृत्त पूर्वार्जित आपणांस विदित. घरोब्यांतील प्रकार. पूर्वीपासून आमचा प्रवर्त एकनिष्ठेचा, तशीच आपलीही ममता, त्यास भवितव्यानुसार सुखदुःख अनुभवणें प्राप्त. कोठवर श्रम सोसावे! या अर्थें आपले चिरंजीव आपणांस पावले. नांवलौकिक आपला. आमचा अभिमान पूर्तेपणीं असावा. एक मनाची इच्छा आहे तो मान आपला असें जाणोन कृपा करावी.'

बाबूराव कृष्ण आपटे साताऱ्यास छत्रपतीच्या व्यवस्थेस होता, तो सेवेस करद्वय जोडून साताऱ्याहून विनंति करतो. 'मातोश्री बायजाबाई मोहिते यांचे भ्रतार हरिश्चंद्र मोहिते पाणिपतचे स्वारींत सरकार कामावर पडले. येविशीं वृत्त सर्व स्वामींस विदित आहे. पोटीं संतान नाहीं सबब दत्तक पुत्र घेतला. त्यास भ्रतारांचा सरंजाम चिरंजिवांचे नांव करून द्यावा म्हणोन बायजाबाईनीं कमलबंदी लिहून दिल्ही. त्यावर शेरा बंदोबस्त पुढें होईल असा सरकारांतून जाहला. ऐशास बायजाबाई छत्रपति व मातुश्री आईसाहेब यांचे दर्शनास पुत्रास घेऊन आली. त्यांहीं सेवकास आज्ञा केली कीं यांचे नांवें बंदोबस्त करून द्यावा म्हणोन पत्र पुण्यास लिहावें. त्यावरून ही विनंति लिहिली आहे. मोहिते महाराजांचे आप्त अगत्यांतील, यांचा बंदोबस्त करून देणार स्वामी समर्थ आहेत. बायजाबाई पुण्यांत खर्च खात बसली

आहे. महाराजांनीं अगत्यवाद धरिला आहे तो सिद्धीस जावा.' पुढें मोहित्यांची असामी चालू झाली कीं नाहीं तें कळत नाहीं.

कृष्णाजी रणसिंगाचें पत्र. 'आपली स्वारी बाहेर निघाली. सर्वांस पत्रें आलीं. आम्हांस अद्यापि पत्र आलें नाहीं. आमची मंडळी चाळीस पन्नास खासा व शेंपन्नास घोडीं घरींच बसलों व कर्जाच्या पेंचांत आलों. हें ध्यानास आणून पंदोबस्त करून देणार आपण धनी आहेत.'

केसो महादेव दादांचे पक्षांतला नानास लिहितो. 'श्रीमंत दादासाहेब व मातुश्री (आनंदीबाई) यांस कैलासवास झाला, तेव्हां आम्ही लहान होतों. पूर्वी काय झालें, कशामुळें वांकडें पडलें आम्हांस ठाऊक नाहीं. वांकडेपणाचा अर्थ मातुश्रींबरोबर गेला. अंतकाळीं त्यांहीं आज्ञा केली कीं आतां तुम्हांस वडील नाना. यास्तव आम्ही आपलें लक्ष धरून आहों. आमचे योग्यतेनुसार सोय होऊन रहस्यानें कालक्षेप होईल तें करावें. आज्ञा होईल त्याप्रमाणें वर्तणूक करीन.'

हिरोजीराव पाटणकर लिहितो. 'तीर्थरूपास देवाज्ञा जाहलीया अर्थें कितीएक प्रकारें विवेक करून चित्ताचें समाधान करावें म्हणोन लिहिलें, ऐशास ईश्वरसत्तेस उपाय नाहीं. आमचा प्रकार नेणता आहे. आपण पूर्वीपासून आमचा अभिमान धरून सांभाळ करीत आलां. पुढेंही आपणच आहेत, तेव्हां लिहून कळवावेंसें नाहीं. सुज्ञाप्रती विशेष काय ल्याहावें. आपण खावंद आहेत, आम्ही पदरीं आहों.'

गणेश विश्वनाथ बेहरे लिहितो. 'हणमंतराव ढमढेरे पथकसुद्धां चाकरीस होते. सरकार चाकरी एकनिष्ठेनें केली. लढाईंत जखमा लागल्या, तेव्हां स्वामींनीं कृपाळू होऊन सरंजाम मोकळा केला. पुढें शरीरीं असमाधान होऊन मृत्यु पावले. पथक चाकरीस आहे. स्त्री अगोदरच मृत्यु पावली होती. मातुश्री आहे. तिजला दत्तपुत्र घ्यावयाची आज्ञा व्हावी. साहेबचाकरी चांगली केली, सबब सरदारीचें नांव चालून बंदोबस्त झाला पाहिजे. अनमान कदापि नसावा.'

कल्याणराव कवडे लिहितो. 'आम्हांकडील कामकाजाचा बंदोबस्त आपण करून देववितील. आमचें अगत्य व या दौलतीचा अभिमान सर्व प्रकारें पूर्वीपासून आपल्यास आहे. आम्ही आपले आहोंत. सदैव ममतायुक्त समाचार घेत असावा.'

मुलूखगिरीचा धंदा त्या वेळीं किती जोखमीचा होता, आणि त्यांत अडचणी व नुकसान कसें असे, याचा निर्देश वर प्रसंगोपात आला आहे. खालील पत्रांत रंगराव

महादेव ओढेकर लिहितो तो मजकूर या बाबतींतला सामान्य नमुना म्हणून समजण्यास हरकत नाहीं. ' सांप्रत पत्रीं परामर्ष होत नाहीं, यास्तव चित्त सचिंत असे. तरी निरंतर पत्रीं परामर्षास अविस्मर असावें. इकडील वृत्त वारंवार सेवेशीं विनंति लिहित असतों. सालगुदस्तां नजराणा विशेष पडला, त्याचा तोड पुण्यास साहुकाराकडून करविला. प्रांतीं येऊन तीन सालां ऐवज घेऊन पाठविला, तरी बाकी विशेष राहिली. सरदारीखर्च परभारें करावा असा साहुकाराशीं करार, त्यामुळें नूतन कर्ज जाहलें. जुन्या देणेदारांस दोन वर्षे पैसा न पावला, यास्तव त्यांची निकड भारी. पुढें खर्च चालण्याचें संकट, तेव्हां चार दिवस कालक्षेप करावयानिमित्त देशींहून दीड हजार पावेतों लोक आणवून रतलामपावेतों आलों. फौजेचा खर्च बहुत. संस्थानें लहान व जोरतलबी, थोडक्या जमियतीस दाद नाहीं. विशेष जाहल्यास पार पडण्याचें कठिण. तत्राप न करितां दबाव नाहींसा होतो, या अर्थे मजल दरमजल जात असों. रांगडेही फौजसुद्धां जमाव करून आले आहेत. मुकाबला थोडकाच उरला. श्रीमंतांचे प्रतापें होईल तें लेखन करूं. सालगुदस्तां महालांत आफत मातबर पडली. सालमजकुरीं खरीब दरोबस्त गेलें. कमावीसदारांचे भरणे तीन सालां अधिकच जाले. साहुकार तसेच राहिले. ऐसे सर्व प्रकारें संकटांत आहों. इतक्याचा परिहार स्वामीखेरीज कोण करितो ! आमची तों निष्ठा एकच. दुसरा प्रकार किमपि जाणत नाहीं. सरदारी केवळ बसली. यास्तव कृपाळु होऊन सर्व प्रकारें अभिमान धरून कर्जापासून मुक्त करून कल्याणास्पद करणार स्वामी समर्थ आहेत. वडीलपणें हर एक विशीं पार पाडिलें पाहिजे.'

ता. ३०·१·१७९३ रोजीं खंडोबा गोसावी नानास लिहितो. ' सर्व अधिकारासही स्वामींनीं हें संस्थान स्वाधीन केलें, यास्तव गुजरास येथें राहवयास कौल दिल्हा. त्यास जयरामबावा बापट कोण आहेत त्यांनीं गुजर घरास नेवोन मिर्चीचा धूर देतात. याचा अपराध काय हा विचार स्वामींनीं ध्यानास आणावा. स्वामींनीं पदरांत घेतलें त्यापक्षीं प्रतिपालन करावें, नाहीं तरी आज्ञा द्यावी, देशत्याग करितों. कारण कीं मी फडणिसांचा असतां माझी अवस्था ऐसी. ' हा खंडोबा गोसावी चैतन्यसंप्रदायी ओतुर मठाचा असावा.

दुसरा एक अर्ज हरि जिवाजी बर्वे याचा आहे. तो ता. १३·११·१७८४ रोजीं लिहितो. ' आज साठ वर्षे श्रीमंतांचे घरीं थोरली राधाबाई, थोरले बाजीराव यांची मातुश्री, यांचे वेळेपासून शागीर्दीची चाकरी करीत आलों. चाकरी लहान,

अन्न थोडकें, इतक्यांत गुजराणी करून पायास माती लागावयाचा दोष लावून घेतला नाहीं. स. १७४१ चे बंगालचे स्वारीस हुजूरच्या शागीर्दपेशाची सबनिशी श्रीमंतांनीं सांगितली. हल्लीं माझें वय सात दशक होऊन पांच संवत्सर झाले. मी आहें तों माझें अन्नाच्छादन आपण नेमिलें आहे तें माझें चालवावें.'

पुण्यांत दुल्लभशेट म्हणून प्रसिद्ध सावकार होता. त्याजकडे टांकसाळांतून नाणें पाडण्याचें काम होतें. तें काम त्याजकडून काढण्याबद्दल कोणी मत्सरी लोकांनीं खटपट चालविली, तेव्हां दुल्लभशेट नानास लिहितो. 'स्वामींनीं सेवकाची प्रतिष्ठा वाढवून लौकिकास आणिलें. तेणेंकरून रामेश्वरापासून लाहोर पावेतों सावकारेयांत जाणतात कीं पुण्यांत नगरशेट दुल्लभशेट आहे. नाशीक, मोल्हेर, चाकण व पुणे येथील टांकसाळा माझे निसबतीस आहेत त्या प्राप्तीमध्यें प्रतिष्ठा खर्च मात्र निर्वाह होतो. संसारकृत्यास उदीम धंदा करून कालक्षेप करितों. त्यास हानि करणार लोक मतलबावर बोलणीं बोलतात. स्वामी सर्वजाण आहेत, मी विस्तार काय लिहूं ?'

प्रेमसुख जोहरी नांवाचा जयपुरचा एक इसम हैदराबादेस निजामाच्या पदरीं होता, तो कांहीं कारस्थानासाठीं जयपुरास परत जात असतां, हालचालींची बातमी ठेवून त्यास नानाच्या हुकमानें बऱ्हाणपुर नजीक पकडण्यांत आलें. त्यास तेथेंच अटकेंत ठेवून त्याजवळचे कागद नानाकडे पाठविण्यांत आले. हा प्रकार खर्ड्याचे संग्राम-प्रसंगींचा म्हणजे ता ९-२-१७९५ चा आहे.

चिंचवडच्या देवांची खालील अर्जी त्या वेळच्या नानाविध भानगडी दाखविण्यास समर्थ होईल. 'कै. विनायकाचे पोटीं पुत्रसंतान नव्हतें. त्याचा काल पुढें महिन्या दोन महिन्यांत होणार त्यापूर्वीच त्यानें आपले बंधूचा पुत्र कमलाकार दीड वर्षांचा दत्तविधान करून घेतला. पुढें कलह न व्हावा एविशीं कागदपत्र करून दिल्हा. त्याप्रमाणें त्याचे बंधुवर्ग वर्तत असतां त्याची स्त्री सईबाई ऐकत नाहीं. तिनें आपला भाऊ आणून कलह करून देव घेऊन चिंचवडाहून थेउरास गेली आहे. मूल आजीपाशीं चिंचवडीं आहे. मुंजही यांनींच केली. थेउरीं महादेव भटजी सारंगपाणि यांचे घरीं राहिली आहे आपण महादेव भटजीस सांगून सईबाई देव घेऊन चिंचवडास येत व तिचे भ्रताराचे पत्राप्रमाणें चालत तें केलें पाहिजे.'

प्रत्यक्ष महादजी सिंद्याचे पश्चात् त्याची मुलगी बाळाबाई सितोळे हिला खालील विनंति घेऊन नानाचे पायांशीं यावें लागलें. 'बाळाजीपंत धडफळे यांसीं तीर्थरूपांनीं जांबगांवीं कैदेंत घातलें असतां त्यास सोडावें म्हणून सरकारचा कारकून व हुजऱ्या

येत असतो. त्यास बाळाजीपंताचे वर्तणुकीची माहितगारी वडिलांस ( नानांस ) असतां लिहून कळवावें असें नाहीं. वडिलांनीं ( महादजीनें ) चौकशीसमयीं आपल्याकडे सांगून पाठविलें होतें. आपला निरोप आला कीं तुम्ही कराल तें समजूनच कराल. त्यास याजला सोडल्यानें माझी नांदणूक वतनावर होणार नाहीं. आपण वडील, मुलें आपलीं नातवंडें. वतनाचें व आमचें संरक्षण पूर्वीपासून श्रीमंत करीत आले, व पुढेंही त्यांसच करणें. याजकरितां आपण नातवंडें वतनावर नांदलीं पाहिजेत हें जाणून श्रीमंतांस विनंति करावी जे, पाटीलबावांची कन्या बाळाबाई, तिचा कारकून हरामखोर असतां त्याची भीड पडावी आणि बाळाबाईची न पडावी असें नसावें. श्रीमंतांचीच मर्जी सोडावे अशी असल्यास त्यांनी पक्केपणें जामीन देऊन काशीवास करावा. मजला सर्व भरंवसा वडिलांचा आहे. ' अशाच प्रकारच्या कारभारी व मालक यांच्या हिशेबाच्या व इतर तक्रारी विपुल आहेत. तसेंच अष्टप्रधानांच्या मोबदल्याचे हुकूमही पुण्याहून सुटत असून त्यांस छत्रपतींची दरम्यानगिरी नव्हती, असें जयवंत रघुनाथ मंत्री यास पदाचीं वस्त्रें पुण्याहून आलीं त्यावरून उघड होतें. ' वस्त्रें पाठविलीं तीं सुमुहूर्तें ग्रहण केलीं, ' असें त्यानें नानास लिहून कळविलें.

जमिनीची मशागत करून सरकारी वसूल वाढविण्याविषयीं नानाची दक्षता विशेष होती असें खालील पत्रावरून कळून येतें. ' साळशी तालुका चिमणाजी रामचंद्र यांजकडे हुजरून जाहला. तेथील ऐवज खर्चापुरता नाहीं. यास्तव मुलखांत अधिकोत्तर ऐवज जमा होण्याचा अर्थ पाहतां, पुढील आबादीसाठीं नवीन लावणी होऊन बागाईत नारळ लावावे, याविशीं सढळ कौल तेथील लोक विचारतात. लावणीची योजना पाहतां नारळ झाडें, खारीचीं खाजणें व नवे मिठागर चालते करावे. त्यास कांहीं वर्षें ज्यास्ती कौल व नारळीस चौथाई इनाम द्यावयाचें केल्यानें, उमेदवार होऊन दहा वर्षांनीं आबादी होऊं लागेल, व पांच सात हजार आकार ज्याजती व्हावयाचा डौल भासतो. नवेच जागां लावणी होईल. तर आज्ञा होईल तसें करूं. नवी लावणी हर-तरतुदेनें करावी हें मामलेदाराचे प्रत्ययास आलें. '

हसोट[1] गांवची वहिवाट करणारा मामलेदार नानास लिहितो. ' गांव रबीचा मातबर, परंतु गव्हावर गेरव्याची आफत जाहली, त्यामुळें पंधराविसा गांवचे पाटील गैरहजर झाले. ते म्हणतात, वीस हजार सूट दिल्यास गांवीं आबाद होऊं. तरी हासेबंदीची वरात न होय ती आज्ञा झाली पाहिजे. '

---

१ अंकलेश्वर परगणा, जि. भडोच.

अशाच संबंधांत वसईचा मामलेदार आनंदराव भिकाजी फडके लिहितो. ' वसई प्रांताची घालमेल स्वामी करणार म्हणून ऐकतों. ऐशास सेवकाचा हेत स्वामीस विदित आहेच. मी समक्ष विनंति करावी तर संकोच वाटतो. ( स. १७८३ त ) प्रांत सरकारांत आल्यावर धणी मजकडेच काम सांगतील ही सर्वांस आशा. म्हणोन मुंबईकर रयत व सावकारांस भेटून कौल घेतले कीं आम्ही उठोन वसईस येतों. नंतर मजकडून काम दूर झालें, तेव्हां तो विचार राहिला. हल्लीं सेवकाकडे गुजरात प्रांतांतील महाल आहे. तेथील आबादी धन्याचे पुण्यें कशी आहे, नवी रयत येऊन आबाद झाली न झाली हें सर्व विदित असेलच. वसई प्रांताची देशमुखी सेवकाकडे आहे, कालानुरूप बंदोबस्त होईल तितका करितों. मी प्रतिवर्षी पुण्यास येतां ते समयीं मनांतील विचार करितों कीं धन्याशीं भांडावें. परंतु भेट झाल्यावर संकोच बहुत पडतो. स्वामींचे ध्यानांतच असेल. मजसारखे सेवक स्वामींचे पदरीं बहुतच आहेत. हेत हाच कीं स्वामींजवळ सेवा आयुर्दाय आहे तोंपर्यंत एकनिष्ठपणेंच करावी. पतिव्रताधर्म तर जन्म अन्य गृहीं होतो, परंतु कुलीन जी असते, ती भ्रताराबरोबरच गत घेते, तसें स्वामीविना दैवत मला दुसरें नाहीं. आपण बाहे धरिली आहे तों सर्व यथास्थित आहे. या समयीं अमर्यादा करून विनंति लिहिली कीं स्वामींनीं रोषयुक्त व्हावें आणि सेवकाचें शासन करावें. मी शासनायोग्यच आहें. विस्तारें काय लिहूं. विनंतीचें अवलोकन यथास्थित होऊन स्वामीचे हातचें पत्र सेवकास येईल तेव्हां सेवकाचे चित्ताची स्थिरता पडेल. हेत हाच कीं स्वामींनीं कामकाज सांगावें आणि मजपासून एकनिष्ठपणें घडावें. हा हेत पूर्ण करणार स्वामी समर्थ आहेत. '

दुसरा एक निराळा मासला पहा. ' वरातेची मुदत होऊन सहा दिवस अधिक झाले, त्यास ऐवज पावला पाहिजे. मी गरीब. धनी शब्द लावतील यास्तव विनंति. गांवची लावणी होत नाहीं. दासाचें संरक्षण आजपर्यंत धन्यांनीं केलें. पुढेंही तारक धन्याचे पाय आहेत. '

दक्षिणेंतील होळकरांचें मुख्य ठाणें वाफगांव. श्रावण मासांत पुण्याप्रमाणेंच निरनिराळ्या सरदारांच्या राजधानींत ब्राह्मण जमत: आणि त्यांस दानधर्म करण्याचा रिवाज होता. तुकोजी होळकराचा मुक्काम स. १७७९ च्या पावसाळ्यांत वाफगांवास असतां ब्राह्मणांच्या दानधर्मासंबंधानें खालील हकीकत आनंदराव गंगाधर चंद्रचूड यानें नानास कळविली. ' आवंदां श्रावण मासाकरितां येथें ब्राह्मण पंधराशें जमा झाले. अनुष्ठानास लावावयाविशीं एकदोघांनीं सुभेदारांस विनंति केली कीं, ब्राह्मणांस

सालाबादप्रमाणें नेमणूक करून कामें सांगावीं. सुभेदारानें उत्तर केलें, आवंदां ब्राह्मण कोणी श्रावण मासास लावावयाचे नाहींत. ब्राह्मणांची शिफारस करूं नये. गांवांत पेठेंत ताकीद करून ब्राह्मण पुण्यास लावून दिल्हे. कांहीं गेले. कांहीं राहिले, त्यांस आज प्रातःकाळीं दर असामीस रुपया एक प्रमाणें भूयसी देऊन ताकीद करून बाहेर घालविले. त्यांतही कांहीं जातील, कांहीं राहतील असें आहे. पंचमी जाल्यावर कांहीं थोडे बहुत लिंग करावयास लावले तर लावतील.'

गोठगस्ती वर्दीचे कित्येक मासले मजेदार आहेत, परंतु त्यांचा विस्तार येथें करण्याचें प्रयोजन नाहीं. गोठगस्त म्हणजे लष्कराचा गोठ पडला असेल त्या सभोंवार रात्रींची गस्त घालणारे लोक नेमलेले असत. त्यांनीं रात्रीं व दिवसा आपल्या पहाऱ्यांत काय कमीजास्त पाहिलें त्याची वर्दी दुसऱ्या दिवशीं लिहून द्यावी लागे. या वर्दीतील एक उल्लेख पहा. 'शामा कलावंतीण सरंजामसुद्धां दाजीबा फडके यांजबरोबर लष्करांत आली.' अशा प्रकारच्या अनेक वर्द्या या टांचणांतून उपलब्ध होतात. सर्व कागद एकत्रित मनांत आणिले म्हणजे लेखी कारभाराचे बाबतींत औरंगजेबासारख्यांतच नाना फडणिसाची गणना करावी लागेल. मराठशाहींत तर लेखनाच्या बाबतींत नानाची बरोबरी करणारा दुसरा पुरुष दिसत नाहीं रामचंद्र नीळकंठ अमात्य किंवा नानासाहेब पेशवे यांचाहि लेखनव्याप प्रचंड होता, तरी पण पानपत्रावळीची किंवा तेलातुपापर्यंतची बारीक तपशिलाची नजर व जिथच्या तिथें ज्या त्या वेळीं नियमित कारभाराची रेखीव पद्धति नाना फडणिसाइतकी दुसऱ्या कोणांतहि आढळत नाहीं. देशभर माणसें पेरलेलीं होतीं: त्या सर्वांस धाकांत व उद्योगांत ठेवणें, सर्वांचीं पत्रें वाचून एकाचें दुसऱ्यास समजूं न देतां त्यांस जबाब पाठवून राज्याचीं कामें उरकणें, सर्वांचे गुंते उलगडणें इत्यादि प्रकारचा प्रचंड व्याप नाना कसा उरकी, हें उपलब्ध कागद वाचल्यावर मनांत भरून मोठें कौतुक वाटतें.

**५ कर्तबगारी व लोकमत.**—नाना फडणिसाच्या कारभाराचें, कर्तबगारीचें व योग्यतेचें भरपूर विवेचन पूर्वी ज्या त्या बावतींत येऊन गेलें असल्यामुळें, त्यासंबंधानें स्वतंत्र विचार करण्याचें कारण राहत नाहीं. शिवाय तत्कालीन लेखकांचे अभिप्रायही ठिकठिकाणीं नमूद केलेलेच आहेत. नारायणरावांचे वधानंतर रघुनाथरावाविरुद्ध कारस्थान रचून त्या प्रकरणीं इंग्रजांशीं युद्ध सुरू झालें, त्यांत नानानें शिकस्तीचे प्रयत्न करून केवळ बुद्धीच्या जोरावर इंग्रजांचा पाडाव केला, हीच त्याची महनीय राष्ट्रीय कामगिरी होय. जयपुरच्या राजानें हाच अभिप्राय व्यक्त केला आहे. 'नारा-

यणराव गेल्यावर मागें घरचा व बाहेरचा बखेडा असा पडला कीं, राज्य राहत नाहीं असें सर्वत्रांस दिसोन आलें. परंतु ऐसे समर्थ प्रतापी प्रसंगीं होते कीं बिघडलें राज्य ठिकाणास आणिलें. श्रीमंत बाल्यावस्थेंत आणि रघुनाथराव स्वतः धनी, केलेले पुरुष, त्यांसीं विरुद्ध करून प्रथम त्यांचें उत्थापन करून निदानीं आपले कावूंत आणून ठेविलें, व इंग्रज इत्यादींचें पारिपत्य करणें, राज्यांतील सरदारांच्या चित्तांतील शुद्धता व ऐक्यता करून त्यांस लावून घेणें व प्रजेचें पालन उत्तम प्रकारें करणें हें काम त्यांचेंच आहे. दक्षिण हिंदुस्थानांत दुसरे कोणी नाहींत. ऐशा समर्थास कोणतीही गोष्ट अगाध नाहीं.' एकंदरींत बारभाईचें कारस्थान, मोरोबाचा पाडाव, चौकडीची जूट, सालबाईचा तह व सवाई माधवरावाचा लग्नसमारभ हे मुख्य प्रसंग नानाच्या कर्तबगारीचे निदर्शक होत.

परंतु इंग्रजांचें युद्ध संपल्यानंतरच्या अठरा वर्षांत पहिल्या इतका निःस्वार्थ राष्ट्रोद्योग नानाचे हातून झाला नाहीं. मराठमंडळाची विसकटत चाललेली जूट दृढ करण्याचा प्रयत्न करण्याऐवजीं, त्यानें उत्तरोत्तर राज्याची सत्ता स्वतःचेच हातीं ठेवण्याचा उपक्रम केल्यामुळें पुष्कळांचीं मनें दुखावलीं जाऊन त्याचा परिणाम मराठी राज्यास बाधक झाला.

हिंदुस्थानचे सत्ताधीश एकजुटीनें वागतील तर इंग्रजांचा पाय हिंदुस्थानांतून साफ निघेल, असे उद्गार खुद्द वेल्स्लीनें वारंवार काढिले आहेत. इंग्रज येथें कोणासच नको होते. खर्ड्यांच्या प्रसंगीं जमलेली मराठ्यांची जूट बळकट करणें शक्य होतें. विशेषतः सवाई माधवरावाच्या मृत्युनंतर प्रत्येकानें वैयक्तिक राजकारणें सुरू केलीं, त्याऐवजीं बारभाई प्रमाणें नानानें सरदार व मुत्सद्दी यांस एकत्र जमवून राज्याचा बंदोबस्त ठरविणें हितावह झालें असतें. मग त्या प्रयत्नांत त्याचा स्वतःचा अधिकार गेला असता तरी चिंता नव्हती. परंतु चिरकाल संचित केलेल्या द्रव्याचे बळावर त्यानें नानाविध कारस्थानें खेळविलीं, यामध्यें त्याची कारस्थान-चतुराई दिसत असली तरी त्यामुळें मराठी राज्याचा लाभ झालेला दिसत नाहीं. शिवाय यांत त्याचा बहुतेक पैसा जाऊन शेवटीं अधिकारही गेला आणि मराठमंडळ अगदींच दुर्बल बनलें. अनेकांकडून राष्ट्रसेवा घेण्याचें थोरपुरुषांचें कसब नानास विशेष साधलेलें दिसत नाहीं. हरिपंत फडके निवर्तल्यावर खास विश्वासाचा असा एकही इसम नानाचे भजनीं असलेला आढळत नाहीं. परशुरामभाऊ, गोविंदराव काळे वगैरे त्याचे अभिमानी गृहस्थ सुद्धां विरोधक बनले. यावरून स. १७९५ नंतरच्या नानाच्या सर्व उलाढाली घसरपट्टीच्या

निदर्शक आहेत. यावरून नाना मराठी राजकारणांत पुष्कळ दिवस अनुभवलेला मनुष्य असूनही त्यास सखाराम बापूच्या अष्टपैलू व दमखाऊ राजकारणाची सर येत नाहीं. नानाच्या लष्करी सामर्थ्याच्या लंगडेपणामध्यें अधिकार लालसेच्या कारस्थानांची भर पडून त्याच्या अंगच्या मुत्सद्दीपणास उणेपणा आलेला आहे. हाच अभिप्राय एका समकालीन लेखकानें मार्मिक रीतीनें प्रगट केला आहे. 'पेशवाईची अखेर' या नांवाची बखर लिहिणार म्हणतो:—

'नाना फडणिसांनीं मुखत्यारीनें काम चालविलें. त्यांची काम करण्याची मेहेनत, अक्कल व स्मरण, व लिहिणें व बंदोबस्त, व अप्रमाण बोलण्याविषयीं मनांत भय हे गुण चांगले होते. मनोधारण रक्षणें व धैर्य कमी. त्यांस साह्य हरिबल्लाळ फडके होते म्हणून नानांचे तेजांत न्यूनता दिसली नाहीं. दुसऱ्याचें मनोधारण ठेवून आपला मतलब साधणें हा गुण हरिपंतांचा. महादजी सिंदे देशीं आल्यावर त्यांचें नानाशीं वैमनस्य आलें, तेव्हां हरिपंतानें उभयतांचें सख्य करून दिलें. नानांनीं खर्ड्याची मसलत केली, त्यांत हुजरात वगैरे फौजांकडून कमती होऊन सिंद्यांचे फौजेची फत्ते जाली, यामुळें नानाचा दाब कमी पडला.' राज्यचालकांना स्वतःच्या भजनीं लागलेले अनुयायी अवश्य पाहिजेत, तसे साहाय्यक नानाला पैदा झाले नाहींत. उत्तरोत्तर तो अगदींच एकटा पडला. नानासाहेब, माधवराव वगैरेंनीं जिवास जीव देणारीं माणसें तयार केलीं, तशीं माणसें नानानें तयार केलीं नाहींत. तो स्वभावाचा एकलकोंडा असल्यामुळें बाहेर समाजांत समरस होऊन मनुष्यस्वभाव ओळखण्याचें कठिण कसब त्यास उत्पन्न झालें नाहीं. मात्र तो वचनाचा दृढ व बोलल्याप्रमाणें वागणारा अत्यंत व्यवस्थित होता, असे त्याजबद्दलचे उल्लेख शत्रुमित्रांचे भरपूर आढळतात. त्रिंबक महिपत पुरंदरे लिहितो, 'नानाचें वचन पक्कें घ्यावें. ते वचनास बहुत प्रामाणिक, अभिमान धरावा तो शेवटास न्यावा, असें आहे.' तथापि या संबंधानें सुद्धां कित्येक प्रसंगीं नानाची हेटाळणी केलेली पाहवयास सांपडते. परशुरामभाऊस पुण्याहून पत्र गेलें, त्यांत खालील मजकूर आहे.

'मुख्य गोष्ट श्री० नानाचें बोलणें कोणते समयीं कसें होईल याचा भरंवसा धरावयाचा नाहीं. सारा दिवस बोलत असतां दस्तऐवज बोलण्यांत सांपडावयाचा नाहीं, या चाली बोलावयाच्या आहेत काम लागलें असतां साखरेपेक्षां गोड बोलावयास उशीर नाहीं. काम जहाल्यानंतर त्या गांवचे देखील नव्हत. असा येथील विचार आहे.' हा अभिप्राय अर्थात् अधिकृत पुरुषाचा नाहीं. महाडास राहून नानानें

छत्रपति कोल्हापुरकर यांस पटवर्धनांवर उठविलें, त्या बाबतींतल्या अडचणी यांत दाखल आहेत. मात्र नानाची गांठ पडण्यास प्रयास कसे पडत तें पहा. ' नानांकडे कामकाजामुळें नेहमीं जावें लागतें. दरबारचीं माणसें म्हणजे केवळ श्वान. जवळ उभे राहवयाचे प्याद्यांचे नाईक आहेत ते नानांकडे परवानगी लावितात. परवानगी खेरीज पालखीपदस्थाची देखील गांठ पडत नाहीं.'

विशेषतः आडमार्गी उपायांनीं नानानें सरदारांवर थोडाबहुत धाक बसविला. परंतु सर्वांनीं एकत्र जमून समस्त कारभाराची नवीन घडी बसविण्याचा उघड मार्ग स्वीकारण्याचें धैर्य त्यास झालें नाहीं. दिव्याखालीं अंधार अशी प्रत्येकाची छपवाछपवी असल्यामुळें उघड चर्चेस सर्वच नाखूष असत. म्हणून बंडखोर सरदारांस आळा घालण्यास नानास सामर्थ्य राहिलें नाहीं. उदाहरणार्थ वसईवर इंग्रजांनीं हल्ला केला असतां, विसाजी केशवाची मदत करण्याविषयीं रघूजी आंगऱ्यास सरकारचा हुकूम गेला. रघूजीनें साफ कळविलें, कीं ' विसाजीपंत सरसुभेदार यांचें आमचें परिच्छिन्न बनत नाहीं त्यांनीं बोलाविल्यास आम्ही जाणार नाहीं व त्यांचे कह्यांत वर्तणार नाहीं,' ( स. १७७६ ). तुकोजी होळकरास कर्नाटकांत, गुजरातेंत वगैरे ठिकाणीं जाण्याचा हुकूम केला असतां, तो त्यानें बिलकूल मानला नाहीं.

अशा या कारभारांतील अंदाधुंदी नानास ढळढळीत दिसत असतां तिचा प्रतिकार त्यानें काय केला, तें कागदांत दिसत नाहीं. चालढकल करून आजचें मरण उद्यांवर लोटणें म्हणजे मुत्सद्दीपणा नव्हे. असलीं हीं व्यंगें सांचत सांचत शेवटीं अनावर होऊन राज्यनाश करतील ही गोष्ट नानास समजली पाहिजे होती. बारा वर्षांचा अवधि ( १७८३–९५ ) थोडा नव्हता. सिंदे होळकरांस आपल्याजवळ बोलावून किंवा आपण त्यांजकडे जाऊन अथवा राज्यांतील प्रमुख कर्तबगार मंडळी एकत्र जमवून राज्यकारभाराचे नियम व व्यवस्था सर्वांस पटेल अशी बांधून देणें त्याचें मुख्य कर्तव्य होतें, तें त्यानें केलें नाहीं. पुढें तरुण पेशव्यास सोयीनें काम करितां येण्यासाठीं, सरदारांच्या श्रेणी व अधिकार नियमानें ठरवून दिले पाहिजे होते. महादजी कारभारांत ढवळाढवळ करी तें नानास खपत नसे. वरील नानातऱ्हेच्या अडचणी महादजी दाखवी, त्यांचें निरसन नानानें केलें नाहीं. राज्याची मालकी पेशव्याच्या तर्फेनें आपल्याकडे, आपण ठरवूं तें सर्वांनीं मान्य करावें, अशा प्रकारची नानाच्या कारभाराची भावना होती, ती अर्थात् पुष्कळांना पटली नाहीं. नानास तेवढी राज्याची काळजी, इतर सर्व स्वार्थी व मतलबी, अशी जी नानाची

समजूत पदोपदीं व्यक्त होई, तीच लोकांस दुःसह होई. तुम्ही राज्याचें कल्याण पाहतां, तसेंच आम्हीही आपल्या परी पाहतों, असें महादजी, पटवर्धन वगैरे अनेक सरदार समजत. महादजीनें या गोष्टी धसास लावण्याचा प्रयत्न केला, इतरांस तें सामर्थ्य नव्हतें, एवढाच फरक. बाकी नानाच्या कारभाराबद्दल महादजी सारखीच इतरांची भावना होती. मुख्यतः सवाईमाधवरावाचे मृत्युनंतर छत्रपतींस बाहेर आणून राज्याची नवीन घडी बसविण्याची उत्कृष्ट संधि होती ती नानानें फुकट घालविली.

कोल्ब्रुक म्हणतो, ' राज्यकारभार चालविण्याचें शहाणपण नानास चांगलें होतें. तसेंच छत्रपति व पेशवे या दोन पदांची संपूर्ण सत्ता त्याचे हातीं होती. परंतु लष्करी कामांत तो सर्वथैव लंगडा असल्यामुळें त्याच्या कारभारास यश आलें नाहीं. लष्करी कौशल्य त्याचे अंगीं असतें तर तो आपलाच स्वतंत्र राजवंश स्थापूं शकला असता.' नानाच्या बातमीदारांचीं खालील प्रकारचीं लिहिणीं वारंवार आढळतात. ' स्वामींची कृपा माझे ठायीं आहे, त्यास विक्षेप पडावा, मी स्वामींच्या पायांपासून दूर व्हावें, ही कवायत पुष्कळांची आहे. सर्व स्वामींच्या ध्यानांत असों द्यावें. मी बहुत सावधगिरीनें वर्तणूक करितों. स्वामींचें बोलणें किंवा लेख प्राणही गेल्यास इतरांचे दृष्टीस किंवा कर्णांस स्पर्श होणार नाहीं, ही खातरजमा असावी. याचें निदर्शन दिवसेंदिवस कार्यावर समजत जाईल. हें पत्र आपण मनन करून विसर्जन करावें. वरीप बारा झाल्यासही लेख किंवा उच्चारांत गोष्टी येणार नाहींत. आदिपश्चात् सर्व ध्यानांत धरून कोण्या रीतीनें आज्ञा कमकशी जाहली आहे, त्याच बेतानें कार्यास प्रवर्तलों आहें.'

नाना फडणीस ज्योतिषांचे सल्याशिवाय कांहीं करीत नसे. दरबारी वकिलांप्रमाणें त्याचे ज्योतिषी सुद्धां ठिकठिकाणीं पेरलेले होते असें दिसतें. जोधपुरचा मुरलीधर ज्योतिषी दिल्लीस पातशहाजवळ राहून तेथील राजकारणांचीं भविष्यें पुण्यास नानास लिहून पाठवी. ऐ. टि. १-२७ व खं. १०-२९३, ३०० वगैरे मुरलीधराचे कागद जिज्ञासूंनीं अवश्य वाचावे. ' पेशव्यांचें रुप्याचें तुलादान करावें, गजदान, अश्वदान वगैरे करावें, परदेशांत विख्यात कीर्ति होईल. दुष्ट चहाडखोर लबाडांचा नाश होईल. आम्हांस दक्षणा न पाठविली, कन्येचा विवाह आहे. कासीद पाठविला असे, याजबराबर हुंडी पाठवावी,' इत्यादि वाक्यें वाचून मुरलीधराच्या सल्लेची व नानाच्या मनोरचनेची कल्पना होईल. दुसऱ्या एका पत्रांत तो लिहितो. ' आम्ही आपले शुभचिंतक आहों. हल्लीं शास्त्राज्ञेवरून कांहीं विचार आपणांस लिहितों तो ध्यानांत आणावा. श्रीमंतांचा प्रताप वाढेल. अस्त उदय होय तों राज्य होईल.' महादजीनें आपली

सूचना न मानतां जयपुरकरांशीं लढाई केली, त्यामुळें त्याजवर अरिष्ट कोसळलें असें हा सांगतो, आणि 'याच कासिदाबरोबर हुंडी पाठवावी' असे शब्द लिहितो, त्यावरून या ज्योतिषाची किंमत ठरते. ऐ. टि. ६·२२ यांत ता. ८–६–१७८१ रोजीं कांहीं प्रश्न लिहून त्यांचीं उत्तरें ज्योतिषाकडून नानानें मागविलेलीं दाखल आहेत, तीं सर्व पुढील परिणामांवरून फोलच ठरतात. ज्योतिषांप्रमाणेंच ठिकठिकाणचे सिद्धांकरवीं पुढील घडमोडींचीं भविष्यें विचारून घेण्याचा नाद नानास विशेष होता. प्रयागचे एका सिद्धानें ' दक्षिणचे राज्यांत दुसरी नवीन मोहोर होईल यास मुदत महिने ७२॥ ' असें भविष्य स. १७९५ च्या फेब्रुवारींत सांगितलें. त्या संबंधाची सविस्तर हकीकत लिहिलेली वाचण्यालायक आहे. तसेंच एका दरिद्री ज्योतिषाचें नाना फडणीसास आलेलें एक गद्यपद्यात्मक पत्र छापलें आहे तेंही जिज्ञासूंनीं पाहवें.

जुन्या वळणाचीं भिक्षुकी माणसें नानाची स्तुति ओतप्रोत करीत, परंतु खर पराक्रमी पुरुष त्याची हेटाळणी करीत. सदाशिव दीक्षित ठकार वाजपेयी याचा नानाशीं भिक्षुकी थाटाचाच घरोबा होता. अपशकुनांवर नानाचा भरंवसा अतोनात होता. या व त्याच्या इतर उल्लेखांवरून नाना परंपरागत वळणाचा धर्मनिष्ठ मनुष्य होता, त्याची मनोभावना विस्तृत व प्रगतिपर नव्हती असें म्हणावें लागतें. ज्योतिष, शकुन, जपजाप्य इत्यादिकांचा उपयोग नाना आपल्या इष्टकार्याकडे करून घेत असे. ' श्री हरिहरात्मक ब्रह्म उभयतां देव मजवर कृपा करितात, ती वर्णितां बुद्धि चालत नाहीं; व शास्त्र विषय धर्मशास्त्र आदिकरून कांहीं नसतां कृपासमुद्र दीन दयाळ, भक्तानुकंपी, शरण्य या मानाचें सार्थक माझे ठायीं केलें. ' असे त्याचे उद्गार आहेत. ऐ. टि. १·३७ यांत नानानें आपले संकट–प्रसंग लिहिलेले आहेत ते स्मरणीय आहेत. अनेकांनीं दंगे केले व अपघात झाले, पण त्या सर्वांतून त्याचा बचाव झाला. मुशीरुन्मुल्कानें त्याजवर मारेकरी घातल्याचा उल्लेख ता. २०–७–१७९४ चा आहे.

' नाना फडणीस यांस तोंडलीं फार आवडतात, सबब सदरहू जिन्नस व कोंवळी कोंथिबीर व गुलाबाचीं फुलें मिळवून दररोज भोयांचे डाकेबरोबर नानाकडे लष्करांत पोंचतीं करीत जावीं, ' असा एक उल्लेख नमूद आहे. ता. २०–४–१७९० रोजीं नानाची पेठ वसविण्याची सुरवात होऊन दोन वर्षांत काम संपलें. नानाचे सहायकांत बहुतेक ब्राह्मणच आढळतात. तथापि माधवराव जाधवराई हा गृहस्थ त्याचे भरंवशाचा मॉस्टिन अप्टन वगैरे इंग्रज वकिलांकडे बोलणें करण्यास नेमलेला असून तो विश्वासु व हुशार म्हणून प्रसिद्ध होता. तो पूर्वी चंद्रसेन जाधवाचे पदरचा असून पुढें

निजामशाहींतून पेशव्यांकडे आला. तो स. १७८६ त मरण पावल्यावर त्याचे जागीं बहिरोपंत मेहेंदळे याची नेमणूक झाली. मॅलेट पुण्यास आला तेव्हां हा मेहेंदळे त्याजकडे रुजू झाला.

' मोगल निजाम वगैरे दरबारांतून नानास व सखाराम बापूस ' मदारुल–महाम ' हा किताब लावण्यांत येत असे. म्हणजे केव्हां तरी मुसलमान दरबारांतून तो यांस देण्यांत आला असावा. केव्हां कोणीं दिला त्याचा दाखला आढळत नाहीं. मदार–उल्–महाम म्हणजे राजकारणाचा आंस ( pivot or axle of politics ) असा अर्थ होतो.

हिंदुस्थानांत अठराव्या शतकांत कर्तबगार माणसें सर्व रियासतींत कमीजास्त प्रमाणांत वावरत होतीं, परंतु त्यांचे उद्योग अंतीं अयशस्वी ठरल्यामुळें त्यांचीं नांवें सुद्धां मागें राहिलीं नाहींत. मुख्य लष्करी पेशाबरोबरच अनेक उद्योगधंदे, कारागिरी, राजकारण वगैरे लयास गेलें. ब्राह्मणांचा पेशा बहुधा राजकारणाचा असे; आणि त्यांत नाना फडणिसाशीं तुलना करितां येईल असा एक पुरुष त्याचाच समकालीन पुर्णय्या हा नजरेपुढें येतो. पैकीं नाना अगोदर दिवंगत झाला. पूर्णय्यानें परिस्थिति ओळखून नवीन रासवटींतही आपल्या बुद्धीचा उपयोग करून दाखावला. या तुलनेसाठीं त्याचें अल्पचरित्र येथें लक्षांत आणणें जरूर आहे.*

पूर्णय्या हा माध्वसंप्रदायी वैष्णव ब्राह्मण कोइमतुर जिल्ह्यांत सन १७३० सालीं जन्मला. त्यानें हैदराचे पदरीं नोकरी पत्करून आपल्या हुशारीची व प्रामाणिकपणाची छाप त्याजवर एवढी बसविली कीं, सर्व खजिन्याचें व देवघेवीचें काम त्यानें पूर्णय्याकडे सोपविलें. नव्वद हजार फौजेच्या सरबराईचा कारभार एकट्या पूर्णय्याचे हातांत होता. ह्या कामांत त्याचा जोडीदार कृष्णराव नांवाचा एक स्मार्त ब्राह्मण होता. इंग्रजांशीं युद्ध सुरू असतांच हैदर एकाएकीं मरण पावला, तो प्रकार गुप्त ठेवून टिपू दूर होता तो येऊन हजर होईपर्यंत पूर्णय्यानें सर्व कारभार बेमालूम चालविला, त्यावरून टिपूचीही त्याजवर मर्जी बसली. पुढें स. १७९९ त इंग्रजांशीं लढत असतां

* या कलमाचे आधार. इ. सं. पूर्णय्या च.; ऐ. जु. गो. २·१८; प. द. म. व.; ऐ. टि. १·२७; २·२७, ४८; ४·३२; ५·९; ६·२२; पे. द. पृ. १५४; पु. द. २·१०; वा. इ. १८३४·२६; खं. १०·२९३, ३००, ३५७, ३६०; का. सं प. या. २५४; खरे; विं. ज्ञा. वि. सेप्टेंबर १९२२; ना. भो. का. ११; एल्फिन्स्टन चरित्र इंग्रजी भाग. १ पृ. ३८; भा. व. २ प. या.

टिपू रणांगणीं मारला गेला, आणि त्याचें राज्य इंग्रजांनीं कृष्णराज वोडियार यास दिलें, व दिवाणगिरीवर पूर्णय्याचीच नेमणूक केली. यावरून सर्व पक्षांचा त्याजवर केवढा इतबार होता तें दिसून येतें. म्हैसूरची दिवाणगिरी अकरा वर्षे करून पूर्णय्यानें राज्याची व्यवस्था चोख ठेवून अडीच कोट रुपये शिल्लक टाकली. पूर्णय्या पुढें स. १८१५ सालीं मरण पावला. त्याचा नातू सर कृष्णमूर्ति हा अलीकडे म्हैसूरच्या दिवाणगिरीवर होता हें पुष्कळांस माहीत असेल. नाना व पूर्णय्या या दोन समकालीन व्यक्तींचे राष्ट्रीय उद्योग अनेक बाबतींत तुल्यगुण आहेत.

कोणत्याही राज्याची मुख्य शक्ति म्हणजे द्रव्यसंचय होय. मराठी राज्याचा मुख्य लंगडेपणा सांपत्तिक होता आणि इंग्रजांना येथें त्वरित विजय मिळण्याचें कारण त्यांचें द्रव्यबळ होय, ही गोष्ट केव्हांही कबूल करावी लागेल. इंग्रज मराठ्यांच्या राजनीतींतला हा फरक कोणत्याही व्यवहारांत स्पष्ट दिसून येणार आहे. तशीच वेळ आली तर मानापमानाच्या बाबती सर्व बाजूस सारून इंग्रज गृहस्थ आर्थिक मतलबावर आपला कार्यक्रम ठरवील. पण मराठे लोक मानापमानाच्या नादास लागून आपला स्वार्थ गमावतील. खर्ड्याच्या तहांत चार दोन कोटींचा भला मोटा दंड तात्काळ हबकण्या ऐवजीं मश्रुन्मुल्कास ताब्यांत घेण्यांत नानानें कृतकृत्यता मानली, हें एकच उदाहरण ही बाबत स्पष्ट करण्यास पुरे आहे. तथापि नानाच्या कारभारांत प्रशंसनीय भाग कोणता असेल तर तो द्रव्योत्पादनाचाच आहे. हें फडणिसी कसब त्याचे अंगीं भरपूर होतें, इतकेंच नव्हे, एकंदर पेशवाईंत हिशेबाची तोंडमिळवणी जर कोणास उत्कृष्ट साधली असें म्हणावयाचें असेल तर ती नानासच होय. अत्यंत संकटावस्थेंतून नानाउपायांनीं द्रव्यार्जन करून त्यानें राज्य राखिलें. वसूल व हिशेब यांची व्यवस्था अत्यंत दक्षतेनें पाहून, असलेल्या स्थितींत रयतेच्या आबादानीकडे शक्य तितकें लक्ष पुरवून, पैशाची अडचण कारभारास भासूं दिली नाहीं. त्यानें नाना युक्त्या करून पैसा जमविला. पेशव्याचें लग्न, राघोबाचें कर्ज, विशिष्ट युद्धांचे खर्च वगैरे प्रासंगिक निमित्तांनीं नवीन वगण्या, पट्ट्या अगर कर त्यानें सरकाराकडून बसविले. लोकांवर व सरदारांच्या प्राप्ती-वरही सरकारचा डोळा असेच. अर्थात् याचा परिणाम शेवटच्या पायरीस रयतेला भोगावा लागे. यामुळें सरदार व रयत नानावर सदा नाखूष असत; आणि शक्य तितक्या उलट अडचणी त्याचे मार्गांत उपस्थित करीत. जिन्हाळ्याचे पटवर्धन सुद्धां पुढें पुढें या कारभारास कंटाळले, आणि खुद्द परशुरामभाऊही विरुद्ध झाला.

पुष्कळदां अनन्यगतिक होऊनच नानास चिकटून राहणें त्यास भाग पडे. एक हरिपंत मात्र मुकाट्यानें नानाचे हुकूम उठवी. सरदारांस अडचणींत गांठून पैसा काढण्याचें कसब नानास चांगलें होतें. कोणी सरदार मयत होऊन त्याच्या घराण्यांत गृहकलह उद्भवले म्हणजे वारस मंजूर करण्यांत मोठमोठ्या रकमा नजराण्या दाखल घेण्याचा प्रघात जारी होता. गायकवाडांचे गृहकलहांत दरखेपेस अर्धकोट, पाऊणकोट वगैरे रकमा घेण्याचे ठराव वारंवार होऊन रकमा सांचत गेल्या, त्यांचाच निकाल करण्यास गंगाधरशास्त्री यास पुढें पुण्यास जावें लागलें. अशीच थोडीबहुत तऱ्हा नागपुरकर भोसल्यांची व आंगऱ्यांची. एकंदरींत आयव्ययावर सक्त नजर ठेवून नानानें आपलें द्रव्यबल वाढविलें.

परंतु द्रव्योत्पादनाचे बाबतींत अनेकांनीं नानास दोष दिला आहे तो असा, कीं त्यानें आपली खाजगी संपत्ति वाढविली. दौलतीस कर्ज दाखवून स्वतःचा धनसंचय करण्याची पद्धत मराठशाहींत चांगली रूढ होती. गंगाधर यशवंतावर किंवा त्याचा यजमान मल्हारराव होळकर याजवर माधवराव पेशव्याची इतराजी होण्याचें मुख्य कारण हें आहे. या बाबतीचा सूक्ष्म विचार पूर्वी विविध-ज्ञान-विस्तारांत कै. बा. ना. देव यांनीं नाना फडणिसाचेंच उदाहरण घेऊन स्पष्ट केला होता. नानाचा खाजगी द्रव्य-संचय किती होता हें आतां नक्की ठरविण्यास मार्ग नाहीं; पण तो कित्येक कोटींनीं मोजण्याजोगा होता यांत संशय नाहीं. सवाई माधवरावाच्या मृत्युनंतर त्यानें जीं राजकारणें खेळविलीं तीं सर्व या संचयाचे बळावर, आणि त्या भानगडींत तो संचय बहुतेक खलासही झाला असावा. वुइल्यम टोन त्या वेळीं बाजीरावाजवळ असून त्यानें स. १७९६ त लिहिलेलीं कांहीं पत्रें छापलीं आहेत, त्यांतल्या हकीकती आपण स्वतः पाहिलेल्या अगर स्वतः तपास करून खऱ्या वाटल्या तेवढ्याच दाखल आहेत असें सांगून तो लिहितो, ( पहा मागें पृ. ५३ ), 'बाजीरावानें नानास सामील करून घेऊन आपल्या नांवें पेशवाईचीं वस्त्रें आणण्यासाठीं साताऱ्यास छत्रपतींकडे पाठविलें. मध्यंतरींच्या भानगडी चार पांच महिने चालू असतांच नानानें सरकारी खजिन्यांतील सर्व मत्ता युक्तीनें लांबविली होती. निदान वीस कोट तरी रोख रक्कम खजिन्यांत असावी असा त्या वेळीं जाणत्या मंडळीचा तर्क होता. एवढा ऐवज कोठें व कसा गडप झाला हें अद्याप पर्यंत एक गूढच आहे. बाजीरावानें तपास केला तेव्हां खजिन्यांत त्यास कपर्दिकही मिळाली नाहीं.' दुसरा एक उल्लेख धा. शा. च. पृ. ६५ वर आहे तो असा. 'नाना फडणीस यांनीं माधवराव वारतांच आपलें सर्व द्रव्य

लांबविलें. बाजीराव यांचे हातीं कांहीं एक लागूं नये, समुद्रांत बुडवावें परंतु त्यास न द्यावें ऐसा संकल्प करून दस्तैवज कागद पत्र सर्व विसर्जन केले, जाळून टाकले. आपले खजिने व वाड्यांतीलही सर्व चीजवस्त कार्याकारण ठेवून वाताहत केली. आपण मेणवलीस स्नानसंध्या करून राहतों ऐसें बोलणें घातलें.' या बाबतींत खऱ्यांनीं केलेलीं विधानें चौकस व साधार समजलीं पाहिजेत. ते लिहितात. 'नानांनीं पैशाचा संचय मोठ्या आस्थेनें केला होता. त्यांस 'नवकोट नारायण म्हणत, तरी त्यांची दौलत नऊ कोटींचीच असेल असें आम्हांस वाटत नाहीं. तथापि कोट्यधीशांमध्यें त्यांची गणना करण्यास हरकत नाहीं. त्यांनीं हिंदुस्थानच्या बहुतेक भागांत विश्वासू सावकारांच्या हातीं गुप्त ठेवी ठेविल्या होत्या. इतक्या पैशाची व्यवस्था ते केव्हां कशी ठेवीत याबद्दल लोकांस अजूनही आश्चर्य वाटतें. शेवटच्या चारपांच वर्षांत आपली अब्रू व महत्त्व राखून राज्याच्या बचावासाठीं त्यांनीं सुमारें दीडकोट रुपये उधळले. इतकें द्रव्य नानांनीं कसें मिळविलें हा एक प्रश्न आहे. ते लांच खात असत असें उत्तर हल्लींचे पुष्कळ लोक देतात. याविषयीं शोध करितां असें दिसतें कीं थोरल्या माधवरावाचे आरंभींही नानाजवळ फार मोठी संपत्ति वडिलोपार्जितच होती. नजराणा, दरबारखर्च, गुन्हेगारी वगैरे स्वरूपांनीं त्या वेळीं कारभाऱ्यांस लाखों रुपये मिळत. हैदराशीं गुप्त तह ठरविल्याबद्दल एकट्या नानास एकलाख होन मिळाले, हें एक उदाहरण आहे. याप्रमाणें चाळीस वर्षांच्या उलाढालींत नानांनीं कोट्यावधि रुपये मिळविले असल्यास आश्चर्य नाहीं. त्यांस पेशवेसरकाराकडून सालीना उत्पन्न एकंदर लवाजम्यासुद्धां तीन लक्षांचें होतें. ह्याबद्दल नगर खानदेश जिल्ह्यांत व इतरत्र सरंजामी गांव दिलेले होते. शिवाय पेशव्यांचे राज्यांत फडणिशीच्या कामावर कारकून नेमण्याचा हक्क नानाचा होता, त्यांत स्वामित्वाबद्दल सालाचे सुमारें दीडलाख रुपये त्यांस मिळत. इतर दरबारांतून त्यांस जहागिरी होत्या, त्यांची प्राप्ति पंचावन हजार रुपये होती. मिळून त्यांचें सालाचें उत्पन्न पांच लाख तरी होतें; आणि खर्च सुमारें साडेतीन लाखांचा होता. निरनिराळ्या मराठी जहागीरदारांकडून नानास सालोसाल ठरीव रकमा मिळत त्यांची गणती दोन लक्ष तेवीस हजारांची मॅक्डोनल्डनें दिली आहे. याप्रमाणें पेशवाईच्या आरंभापासून पैदा केलेली वडिलार्जित संपत्ति व खुद्द नानानें चाळीस वर्षांत अत्यंत दक्षतेनें मिळविलेली संपत्ति सर्व ध्यानांत घेतली तर 'नवकोट नारायण' हें अभिधान सार्थ समजण्यास हरकत नाहीं. मात्र ही संपत्ति बहुतेक शेवटच्या चार पांच वर्षांत खलास झाली; किंवा उरली सुरली

बाजीरावानें घेतली. मिळून त्याचे बायकोस किंवा वंशजांस या संपत्तिपैकीं कांहीं मिळालें नाहीं. जिऊबाईस इंग्रजांनीं बाराहजार तनखा सालाचा बांधून दिला व निजामानें पूर्वोपकार जाणून तिजकडे पांच हजार रुपये चालू ठेविले, एवढेंच उत्पन्न त्या बाईच्या हयातीपर्यंत चालू राहिलें.'

संपत्ति मिळविण्याचें एक तत्कालीन साधन पुढील उदाहरणांत दिसून येतें. 'नारोशंकर मयत झाले त्यांच्या मुलापासून नजरेचा ऐवज घेतला, त्यामध्यें पक्कें पावणेदोणमण सोनें आलें. त्यांपैकीं चौरंग एक, कमल एक, संपुष्ट एक, येणें प्रमाणें चारशें तोळे वजन व पुतळीचें सोनें दर तोळेस रुपये सवा पंधरा प्रमाणें रघुनाथराव पटवर्धनानें घेतलें. समया, तबकें ताम्हनें वगैरे कोणीं कोणीं घेतलीं, बाकीचे दागिने सरकारांतून मोडून शिलेदारांस दिले. दहालक्ष रुपयांस जिन्नस पडले.' गायकवाड वगैरे सरदार अशाच पैशाच्या पेंचास त्रासून इंग्रजांच्या पदरीं पडले.

लोकांवर धाक व वचक बसविण्यांत नाना इतका करारी व निष्ठुर मनुष्य मराठशाहींत बहुधा झालाच नाहीं असें म्हणावें लागेल. नोकर तर त्यास चळचळां कांपतच. नानाची इतराजी होणें म्हणजे मोठेंच अरिष्ट असें सर्व लहान मोठ्यांस वाटे, म्हणून शक्य त्या रीतीनें त्याचा सतोष राखण्याची ते पराकाष्ठा करीत. दिनकर बाबूराव (खेर, गुलसराईकर) याचें पुढील पत्र एक मासला म्हणून अवश्य वाचावें. 'स्वामींचें तेज असें आहे कीं रोष केला तर मोठमोठे अमित्रांचे अंडत्रास होऊन प्राण सुटणार. इतराजी होतांच प्राण जावा अगर देशांतरास जावें. स्वामींचे चरणांचें चिंतन एकनिष्ठपणें करीत कुडींत प्राण धरून तीन वर्षें आहें. सर्व मुत्सद्दी वगेरेंचें आर्जव आज दोन वर्षें केलें, परंतु कोणी अंगीकार न करीत. तेव्हां घासीराम कोतवाल यास शरण गेलों. त्यांनीं विष्णुबागेंत चरणांचें दर्शन करविलें, परंतु पावघटका समक्ष विनंति करावी हा हेत आहे. अवकृपा केल्यास परलोक साध्य होईल. कृपा केल्यास उभयलोक साध्य होतील. यास्तव अवकृपेची व कृपेची जे आज्ञा करावयाची ते कोतवाल यांस करावी. स्त्री व मी एका ब्राह्मणाचे घरीं आहों. खासगत तापत्रय काय आहे आणि उदयापासून अस्तमानपर्यंत काळ कसा लोटतो, याचा परिहार श्री जाणे. स्वामिकार्यास हा देह तृणप्राय खर्च करीन. स्वामी सर्वज्ञ ते पक्षीं आणीक काय विनंति करूं'

ठिकठिकाणच्या दरबारांत आपले वकील ठेवून राजकारण खेळविण्यांत नानाची दक्षता विशेष नांवाजण्यासारखी होती. वकिलांचा व राजकारणाचा हा फैलाव

पूर्वींच्याहून नानाचे वेळेस पुष्कळच जास्त वाढला. सर्व वकिलांची यादी व कामगिरी यांचा वृत्तान्त इतिहासांत स्वतंत्रच नमूद होण्यासारखा आहे. मुंबईच्या इंग्रजांकडून कैक युरोपीय व्यापारी चिजा नाना आपल्या वकिलांमार्फत पुण्यास मागवी. हे वकील रणछोड कृष्ण संजगिरी ( मृ. १७८७ ) व त्याचा मुलगा रघुनाथ रणछोड आपलीं कामें दक्षतेनें करीत. या वकिलांकरितां नानानें सांकेतिक भाषा ठरविलेली होती, तिचा संबोध इतिहास संग्रहांत दिलेला आहे. नानानें मुंबईहून आरसे लहान मोटे, तोफा, बंदुका, घड्याळें, सुऱ्या, कातऱ्या वगैरे चिजा मागविलेल्या दिसतात. ' बागे-करितां झाडें कापण्याची थोरली कातर अडीच रुपयांस खरीद करून पाठविली आहे,' असें रघुनाथ रणछोड लिहितो. या वेळीं गोव्यास पोर्तुगीझांकडे धुमे नारायण विठ्ठल हा नानाचा वकील होता. पण पोर्तुगीजांचें राष्ट्रीय वजन पूर्वीच संपलें होतें.

नानाफडणिसास सर्वत्र भीतीचा संचार वाटत असे. दगा होऊं नये म्हणून तो अत्यंत सावधगिरीनें वागे. त्यासाठीं पुढें पुढें त्यानें आरबांची पलटण तयार केली. पूर्वींच्या पेशव्यांस किंवा कारभाऱ्यांस स्वकीयांची भीति अशी कधीं वाटली नाहीं. ते निःशंकपणें पाहिजे तेथें जात व पाहिजे त्यास भेटत. नारायणरावाचे प्रकरणानंतर हा प्रकार बदलला. राज्यकर्त्यांस आपल्या लोकांची भीति वाटूं लागली म्हणजे विनाशकाल जवळ आला म्हणून समजावें, असें एक राजनीतींतलें सूत्र आहे तें येथें लागू पडतें.

ज्या मराठ्यांनीं परावलंबन फेकून देऊन शंभर वर्षें पावेतों इतरांस आपला हात देण्याची धमक बांधिली, त्यांचेंच पुढें दुसऱ्यांच्या साह्याशिवाय चालत नाहीं असा प्रकार उत्तरोत्तर प्राप्त झाला. नानाच्या कारभारांत तर पुणें दरबार सदैव दुसऱ्यांवर अवलंबून राहूं लागलें. नागपुरकर भोसले अंतर्बाह्य शत्रूंनीं ग्रासले होते. होळकर तर उघडच दुर्बल. गायकवाडांची तीच कथा. अशी स्थिति बहुतेक मराठे सरदारांची झाली. अर्थात् या पृथक घटकांना मध्यवर्ती सत्तेचा पाठिंबा नाहींसा झाल्यामुळें, केवळ स्वसंरक्षणार्थ बाह्य मदतगारांचा अवलंब करणें त्यांस अपरिहार्य झालें. हा प्रकार ओळखून कांहीं तरी नवीन योजना अगर जूट नानानें बनविली पाहिजे होती. या मुख्य मुद्याकडे लक्ष देण्याऐवजीं पुढचे मुत्सद्दी एकमेकांचा पाडाव करण्यांतच दंग झाले मोठ्या सरदारांची जर ही स्थिति तर कोल्हापुरकर छत्रपति, तंजावरकर, व कांहीं अंशीं सातारकर वगैरे झाडून सारे इंग्रजांच्या आश्रयार्थ धडपडूं लागले, यांत त्यांचा किती दोष ? दगलबाजीनें अंगचोरपणानें वगैरे शक्य तितका निभाव प्रत्येकानें केला आणि अगदींच जिवावर आलें तेव्हां हे मराठशाहीचे फुटकळ घटक इंग्रजांच्या

आहारीं गेले. खुद्द नानाचें तर दुसऱ्याची मदत घेतल्याशिवाय कधींच भागलें नाहीं. त्यांतूनही त्याची स्वार्थाकडे दृष्टि अनिवार. ब्राह्मण कारभार बिघडवितात, विस्तृत राष्ट्रीय विचार त्यांचे मनांत उद्भवत नाहींत, असा बोभाटा इतर जातींच्या मनांत दृढ झालेला अद्याप दृग्गोचर होतो. हा बोभाटा खरा कीं खोटा हें इतिहासच सांगतो आहे. परंतु हा समज होण्यास कांहीं अंशी नाना फडणीस व बाजीराव कारण झाले असावेत.

कै. ना. बा. देव यांनीं नानासंबंधीं खालील उद्गार काढले आहेत. ' समकालीन पुरुषांमध्यें जो गृहस्थ विचारानें व आचारानें शेंपन्नास वर्षें पुढें असतो, तोच खरा शाहणा होय, ही व्याख्या मान्य केली तर नाना फडणीस लोक समजतात तितका शहाणा ठरणार नाहीं. तो कारस्थानी होता, धूर्त होता, दूरदर्शी होता हें जरी खरें आहे तरी तो अत्यंत लोभी, स्वार्थपरायण, परोत्कर्षासहिष्णु सत्ताप्रिय जुल्मी व दीर्घद्वेषी होता, हेंही कांहीं खोटें नाहीं. राजकीय व्यवहारांत नाना लांच घेत असे व इतरत्र ही मनस्वी वर्तन करून अनाचार करी, याबद्दलही दुमत होईलसें वाटत नाहीं. त्याच्या भित्रेपणाचें कारणही हेंच. निस्पृह मनुष्याला भीति शिवतच नाहीं. नाना अधिकारावर होता, तोंपर्यंत मोरोबा वगैरेंचे व्यूह गुप्त बातम्यांच्या पैदासीवर त्यानें हाणून पाडिले. पण नाना अधिकारच्युत झाल्यानंतर त्याचा एकही व्यूह सिद्धीस गेला नाहीं, कीं एकही बातमी गुप्त राहिली नाहीं. जीं जीं कारस्थानें केलीं तीं सगळीं गळ्याशीं आलीं. नानानें मुद्दाम राज्य बिघडविलें, असें कोणी म्हणत नाहीं. परंतु त्यानें लायक माणसें जवळ ठेविलीं नाहींत, पुष्कळांशीं दीर्घ द्वेष केला, स्वतःच्याच हातीं सर्व सत्ता ठेविली, स्वतःच्या फायद्याकरितां दुसऱ्याचा कितीही तोटा झाला, तरी त्यास क्षिति नसे, सवाईमाधवरावाचे मृत्युनंतर तर घटके घटकेस निराळें कारस्थान करून अत्यंत अस्थिरपणा मात्र दाखविला आणि शेवटीं इंग्रजांचा आश्रय जवळ केला, यांत नानाची नालायकी स्पष्ट दिसते. खरे व भानु यांनीं नानास अवास्तव महत्त्व दिलें आहे. ' महादजीचे साह्यकारी व नानाचे साह्यकारी यांची तुलना केल्यानेंही त्या दोघांचें राजकारणी कसब लक्षांत येण्या जोगें आहे. महादजीचे अनुयायी स्वतःच्या जबाबदारीवर वागणारे व अंगीकारिलेल्या कार्यास जपणारे होते. त्यांची महादजीवर पूर्ण भक्ति होती. नानास असे अष्टपैलू साह्यकारी तयार करीतां आले नाहींत. गंधरांगोळ्यांची, द्रोण पत्रावळींची, चटण्याकोशिंबरीची टापटीप नाना उत्कृष्ट ठेवी, पण राज्यकारभाराच्या किंवा युद्धनीतीच्या

विषयांत मनुष्यस्वभावास टापटीप लावण्याचें कसब त्यास साधलें नाहीं हें पाहून उद्वेग वाटतो. व्यवहारांतली ही रेखीव पद्धत सैन्याच्या हालचालींत किंवा मुत्सद्देगिरीच्या विविध अंगांत दिसती तर मराठी राज्य इतक्या लवकर बुडालें नसतें. तेलातुपाचे हिशब पाहणारास दारूगोळ्यांचा हिशेब काय होय ! नानाचा समकालीन कवि देवनाथ यानें नानासंबंधानें अभिप्राय व्यक्त केला आहे, त्यांतही वरच्या सारखाच मतलब आहे, तो असा.

**अनन्तफन्दीनें नानाफडणवीसके अक्कलकी तारीफ किई।**
**क्या है उसकी अक्कल ? दौलत पेशवेंकी डुबा दिई ॥**
**‘ जो मैं करूं गा, सोहि होय गा, ’ ऐसी मनमें मगरुरी भई।**
**माल खजीना आपने हात, खावंदके घर कछु न रही ॥**
**सवाई माधवराव मुवा, जद अक्कल सारी भूल गई।**
**बाजीरावकू गादी देता सोबी जानत हतासही ॥**
**फिरा नसीबा चुकी किरीया कहां ठिकाना अक्कलका ? ।**
**नमक हरामी करे खावंदसो किने बजाया है डंका ? ॥**
**छोटे छोटे आदमी बढाये, उसी पासमे आन खडे।**
**आपने आगे कछु गत नहीं जो होय सो आप लडे ॥**
**ना खावंदका घरही राखा, ना फौजो साबूत खडे।**
**मनमे मगरुरी करके गाफल ना बेरीसो जरा अडे ॥**
**कंबक्तीका पेहरा यारो बदमस्तीसो बहोत चढे ।**
**करमगंडिया आखर नाना जा सिंदेके कैद पडे ॥**
**मिलई सोही खोई यारो, लिया ठिकरा अपजसका ।**
**देवनाथ कहे मुझे गरज नहिं, राज्य डुबाया बम्मनका ॥**

एक हातीं किंवा एका कुटुंबांत सर्वसत्ता कायम असण्याचा किंवा आनुवंशिक कारभाराचा एक अनिष्ट परिणाम नेहमींच दिसून येतो तो असा, कीं त्या कुटुंबांत एकामागून एक लायक इसम सारखे निपजतील अशी खात्री नसते. कमाई करणारा पहिला पुरुष योग्य असतो, पण त्याचे पश्चात् लायक इसम पुढें येण्याची तजवीज नसल्यानें केलेल्या कमाईचा नाश होतो.

ठोकळ मानानें नानाच्या गुणदोषांचें कोष्टकच मांडूं लागल्यास खालील जमाखर्च आकारावा लागेल:—

१ मराठी राज्याचा अभिमान.
२ इंग्रजांना दूर ठेवण्याची शैली.
३ राज्यकारभाराची दक्षता.
४ आयव्ययावर दाब.
५ कामाचा उरक व टापटीप.
६ धर्माभिमान.
७ बातमी काढण्याचें कौशल्य.

१ या अभिमानाचा स्वार्थाकडे उपयोग.
२ रघुनाथरावाचे कुटुंबाचा छळ.
३ औदार्य बुद्धीचा अभाव, अधिकारलालसा.
४ कंजूषपणा व द्रव्यलोभ.
५ तपशिलांत मोठ्या राजकारणाची हेळसांड.
६ आकुंचित जात्यभिमान व पुराणप्रियता.
७ भीति व अविश्वास यांचा संचार.

नाना फडणिसाची योग्यता ठरवितांना मुद्राराक्षसांतील राक्षस व चाणक्य यांचें स्मरण मनांत येतें. नंदाचा प्रधान राक्षस होता, त्या दोघांचा पाडाव चाणक्यानें करून चंद्रगुप्तास राज्यप्राप्ति करून दिली, आणि लगेच आपण अरण्यवास पत्करिला. तोच कित्ता पुढें ठेवून बाजीरावास स्थानापन्न केल्यावर नाना निवृत्त झाला असता तर त्याची पुढील अपेष्टा टळली असती. रामचंद्र अमात्यानें जेव्हां ओळखलें कीं ताराबाईशीं आपलें पटत नाहीं, तेव्हां तो थोर पुरुष असाच कारभारांतून अंग काढून अगदीं अज्ञातवासांत राहिला. अधिकारन्यास करण्यासही धैर्य लागतेंच. निदान चिमाजी आपाची स्थापना पुण्यास झाल्यावर त्यासच साताऱ्याहून आपण वस्त्रें आणून नानानें पुष्टि दिली असती, तर बाळोबा व भाऊ यांच्या साह्यानें दोन तीन वर्षांत राज्याची सुव्यवस्था लावतां आली असती असें वाटतें. कारभारांत पडण्याचा इरादा नव्हता तर निग्रहानें निवृत्त होऊन दूर कोठें काशीसारख्या ठिकाणीं त्यानें जाऊन राहवयाचें होतें. परंतु पैशाचे जोरावर राजकारणें सिद्धीस नेण्याच्या प्रयत्नांत त्यास अपयश सहन करावें लागलें. सातारकर व कोल्हापुरकर छत्रपतींस बाहेर काढून नवीन व्यवस्था तो मनापासून करिता तरी बाजीराव ठिकाणीं बसता. बाजीरावाचा स्वभाव तो ओळखूं शकला नाहीं यांतच सर्व नाश झाला. नाना एवढा हिशेबी, पण त्याच्या कमाईचा व संचयाचा हिशेब कोठेंच उपलब्ध नाहीं.

नाना फडणिसाचें अखेरचें वर्ष महाराष्ट्रांत अत्यंत धामधुमीचें गेलें. त्याच्या मृत्यूनें चालू भानगडींत आणखी भरच पडली. अर्थात् मृत्यूचें प्रकरण येथें संपविलें असलें तरी स. १७९९ सालच्या घडामोडींत बाहेरच्या राजकारणांचाच मुख्यतः संबंध येत असल्यामुळें, विषयसंगतीसाठीं या वर्षांतील नानाच्या कारभाराचा पुनः उल्लेख पुढें करावा लागणार आहे.

---

# प्रकरण पांचवें

## अंतर्बाह्य संकटपरंपरा

### स. १७९९–१८००

१ लॉर्ड वेल्स्लीचें नवीन धोरण. २ टिपूचा पाडाव, बाजीरावास वेल्स्लीचा शह. ३ मुत्सद्यांचा छळ व बाजीरावाची घसरपट्टी. ४ बाळोबा तात्या व शेणवी वीर यांचा हृदयद्रावक शेवट.

**१ लॉर्ड वेल्स्लीचें नवीन धोरण.**—रिचर्ड वेल्स्ली, प्रथम लॉर्ड मॉर्निंग्टन् व पुढें अर्ल वेल्स्ली, या गृहस्थाची नेमणूक गव्हर्नर जनरलचे जागीं ता. ४-१०-१७९७ रोजीं झाली; आणि ता. ७-११ रोजीं तो इकडे येण्यास निघाला. पुढील सालच्या फेब्रुवारींत त्याचा मुक्काम थोडे दिवस केप ऑफ् गुड् होप येथें होऊन तेथून ता. २६-४-१७९८ रोजीं तो मद्रासेस उतरला. तेथें कांहीं दिवस मुक्काम करून ता. १७-५-९८ रोजीं तो कलकत्त्यास पोंचला, आणि त्याच दिवशीं अधिकारावर रुजू झाला. हा अधिकार ता. ३०-७-१८०५ रोजीं सोडून तो परत स्वदेशीं गेला आणि तेथें पुष्कळ वर्षें जगून व ब्रिटिश साम्राज्याची अत्यंत भरभराट झाल्याबद्दल धन्यता मानून वयाचीं ७५ वर्षें झाल्यावर ता. २९-६-१८४२ रोजीं मरण पावला. त्याचे अगोदर ग० ज० चा कारभार सर जॉन शोअर पाहत होता, तो ता. ६-४-१७९८ रोजीं कलकत्त्यास आपल्या कामाचा हवाला श्रेयान् अम्मलदाराकडे सोपवून स्वदेशीं गेला.

एखाद्या देशाच्या किंवा राष्ट्राच्या राजकारणास नवीन व स्थायिक वळण देण्यास लोकांवर छाप बसविणाऱ्या जोरदार व्यक्तीची जरूर असते. अशी व्यक्ति अलीकडच्या दहापांच वर्षांत हिंदुस्थानांत निपजली नाहीं. महादजी सिंद्यानें कांहीं वर्षें हिंदुस्थानचें राजकारण खेळविलें. हैदर किंवा टिपु हे व्यक्तिशः कितीही सामर्थ्यवान् असले तरी ते आपापल्या टापूंतच मग्न राहिले. महादजीच्या मृत्यूनंतर अशी कोणी तरी आळा घालणारी थोर व्यक्ति राष्ट्रांत निपजावी अशी पुष्कळांची अपेक्षा होती. परंतु महादजी व सवाई माधवराव यांचे पश्चात् जें अराजक वातावरण महाराष्ट्रांत फैलावलें, त्याचा उपसर्ग हिंदुस्थानच्या इतर भागांसही थोडाबहुत झाला. कोण कोणाचें ऐकत

नाहीं अशी स्थिति अटकपासून कामोरीन पावेतों होती. म्हणूनच उत्तरेकडून जमानशहा आपण हिंदुस्थान जिंकणार अशी बढाई मारूं लागला; टिपूनें नेपोलियनकडे धाव घेतली. दौलतराव सिंदे व बाजीराव हे तरुणपणाच्या अधिकारमदांत इतके चूर झाले, कीं त्यांस बाह्य राजकारणाची बिलकूल जाणीव नव्हती. सर जॉन शोअर जात्या उपद्यापी स्वभावाचा नसून त्यांतून कारभाराची मुदत भरल्यानें नवीन चढाऊ धोरण स्वीकारण्याचे फंदांत पडला नाहीं. योगायोग असा होता, कीं असें नवीन वळण हिंदुस्थानास लावणारा पुरुष इंग्लंडांत जन्मास येऊन तो स. १७९७ च्या अखेरीस हिंदुस्थानची वाट चालूं लागला. त्याचें अंतःकरण नखशिखान्त नेपोलियनच्या द्वेषानें ओथंबून गेलें होतें. त्याला एकच तळमळ सारखी लागलेली होती, ती ही कीं नेपोलियन सगळें युरोप गिळंकृत करणार, त्यांतून इंग्लंडची धडगत कशी लागायची ! लॉर्ड वेल्स्ली हिंदुस्थानची वाट चालत होता त्याच वेळीं नेपोलियनही इजिप्तची वाट चालूं लागला असून, हिंदुस्थान जिंकण्याचीं सुख स्वप्नें तो आपल्या विजयी राष्ट्रास जाहीर करीत होता. ता. ३०-१-१७९८ रोजीं आफ्रिके जवळचें फ्रेंचांचें ठिकाण आइल्-ऑफ्-फ्रान्स ऊर्फ मॉरिशस येथील ग०ज०नें एक जाहीरनामा काढला. त्याचें प्रयोजन असें कीं टिपूचे दोन वकील मंगलोराहून फ्रेंचांची मदत आणण्यासाठीं मॉरिशस्‌ला गेले. त्यांच्या विनंतीवरून या जाहीरनाम्यांतील कलमें प्रसिद्ध करण्यांत आलीं. त्यांचें तात्पर्य असें. ' आमच्याकडे टिपू सुलतानाचे वकील पत्र घेऊन आले आहेत. इंग्रजांशीं निकरानें युद्ध करून त्यांस हिंदुस्थानांतून साफ काढून देण्यासाठीं टिपू सुलतान फ्रेंच फौज आपल्या मदतीस मागतात. त्याचा खर्च ते देण्यास तयार आहेत. फ्रेंच फौज हिंदुस्थानांत पोंचल्यावर त्यांची सर्व प्रकारची बरदास्त ठेवण्याची जबाबदारी ते घेत आहेत. त्यासाठीं आम्ही येथील सर्व प्रजाजनांस जाहीर विनंति करून कळवितों, कीं तुम्हीं या नवीन फौजेंत दाखल व्हावें. ही नोकरी करण्यांत आपल्या राष्ट्राचा फायदा असून त्यांत सर्वांचेंच हित आहे. ' या जाहीरनाम्यावर त्या वकिलांनीं सुमारें दोनशें फ्रेंच लोक मॉरिशस् येथें जमविले, आणि त्यांना बरोबर घेऊन ता. ७ मार्च रोजीं वकील परत निघाले ते ता. २६ एप्रिल रोजीं मंगलोरच्या बंदरांत उतरले. त्याच दिवशीं वेल्स्ली मद्रासेस उतरला. या दोनशें लोकांच्या प्रचंड फौजेनें टिपू सुलतान आतां इंग्रजांना चीत करणार अशी वेल्स्लीची खात्री होऊन चुकली आणि तो प्रतिकाराचे उद्योगास लागला.

हा त्याचा उद्योग वेल्स्ली मद्रासेस उतरण्यापूर्वीच केप् ऑफ् गुड् होप येथें असतांना सुरू झाला. हैदराबादचा इंग्रज रेसिडेंट मेजर डब्ल्यु कर्कपॅट्रिक प्रकृतीच्या कारणानें स्वदेशीं परत जात असतां केप येथें वेल्स्लीस भेटला. हाच इसम पूर्वी महादजी जवळही असल्यामुळें त्यास हिंदुस्थानांतील एकंदर परिस्थितीची पूर्ण माहिती होती. वेल्स्लीनें त्यांस कांहीं लेखी प्रश्न देऊन त्यांचीं उत्तरें त्याजकडून लिहवून घेतलीं, आणि त्या माहितीवर त्यानें आपल्या पुढील धोरणाचा अंदाज ब्रिटिश सरकारास लिहून पाठविला. वेल्स्लीच्या पुढील कारभारांत फ्रेंच द्वेषाचें हें भूत त्याच्या डोळ्यांपुढें सारखें नाचत होतें. इंग्रज अधिकारी एखादें काम हातीं घेतात तेव्हां ते तें किती निष्ठेनें व चौकसपणें सिद्धीस नेतात याचें वेल्स्लीच्या इतकें चांगलें उदाहरण दुसरें सहसा मिळणार नाहीं. मेजर कर्कपॅट्रिक हैदराबादहून गेला तेव्हां त्याचे जागीं त्याचाच भाऊ कॅप्टिन जे. ए. कर्कपॅट्रिकची नेमणूक झाली. याचा संदर्भ पुढें कळून येईल.

फ्रेंच सेनापति नेपोलियन यानें स. १७९७ सालीं इटली ऑस्ट्रिया वगैरे देशांत प्रचंड विजय संपादून आपल्या नांवाचा दरारा एवढा बसविला, कीं इंग्लंडांत तर त्याच्या पराक्रमांनीं लोकांस कांपरेंच भरलें. स. १७९७ च्या अखेरीस फ्रेंच सरकारानें इंग्लंडचा पाडाव करण्याचा उद्योग हातीं घेऊन नेपोलियन यास इजिप्त सिरिया वगैरे देश जिंकण्याचा हुकूम केला. इंग्लंडचें सारें ऐश्वर्य हिंदुस्थानामुळें प्राप्त झालें असून त्यांस येथून काढून लावल्याशिवाय इंग्लंडचा पाडाव होणार नाहीं अशी फ्रेंच सरकाराची समजूत असल्यामुळें, फ्रेंचांची सत्ता हिंदुस्थानांतून साफ काढून लावण्याचा उद्योग वेल्स्लीनें हातीं घेतला. वेल्स्ली हिंदुस्थानांत दाखल झाला, त्याच सुमारास नेपोलियनची फौज इजिप्तचे किनाऱ्यावर उतरली. स. १७९८ च्या जुलई महिन्यांत कैरो राजधानींत नेपोलियननें प्रवेश केला. मागें अबूकीरच्या आखातांत त्याचें आरमार होतें त्याचा नेल्सननें पाडाव केला, तरी स. १७९९ च्या उन्हाळ्यांत नेपोलियननें सिरिया प्रान्तांत प्रवेश करून एकर शहर जिंकिलें आणि हिंदुस्थानाकडे मोर्चा वळविला. त्या वेळीं त्यानें टिपूस पत्र लिहिलें कीं, ' आम्ही तुमचे मदतीस येण्यास निघालों आहों. तुम्हीं आपले भरंवशाचे वकील आम्हांस तिकडील संपूर्ण माहिती देण्यासाठीं मस्कत व मोचा येथें पाठवावे. ' यावरून दिसून येईल कीं हिंदुस्थानांतून फ्रेंचांचा उठाव ताबडतोब केला नाहीं, तर आपल्या राष्ट्राची धडगत नाहीं अशी ब्रिटिश प्रधानमंडळाची व वेल्स्लीची खात्री झाली. म्हणून हिंदुस्थानास येतांच वेल्स्लीनें तो उद्योग हातीं घेतला; आणि लगेच टिपूशीं युद्ध करून ता. ४-५-१७९९

रोजीं श्रीरंगपट्टणचे लढाईत त्यास ठार मारिलें. त्या वेळीं नेपोलियन सिरियांतून पुढें येण्याच्या बेतांत होता. वेल्स्लीच्या तडफदार स्वभावाची यावरून खात्री होईल.

इंग्रज फ्रेंचांचे वर सांगितलेले उद्योग चालू असतां त्याच वेळीं मराठ्यांच्या राजधानींत बाजीराव व दौलतराव हे कसले खेळ खेळत होते हें मागें सांगितलेंच आहे. वेल्स्लीला फ्रेंचांची धास्ती वाटत होती ती मुख्यतः टिपू, निजाम व सिंदे या तिघांच्या संबंधानें होती. टिपूनें उघडपणें फ्रेंच राष्ट्राकडे आपले वकील पाठवून त्यांची मदत आणिली. दुसरी मोठी फौज दौलतराव सिंद्याची पेरॉनचे हाताखालीं होती: आणि तींत पुष्कळसे इंग्रज अम्मलदारही होते. तिसरी फौज निजामाची. तिचा मुख्य मुसा रेमू होता. यांपैकीं इंग्रजांशीं प्रत्यक्ष शत्रुभाव असेल तर तो फक्त टिपूचा होता. सिंद्याची किंवा निजामाची फौज फ्रेंचांची होती हें म्हणण्यांत कांहींच हांशील नाहीं. त्यांत कांहीं अम्मलदार फ्रेंच असले म्हणजे तेवढ्यावरून तीं सर्व फौज फ्रेंच होती असें म्हणतां येत नाहीं. सिंदे किंवा निजाम यांचे मनांत इंग्रजांसंबंधानें द्वेषभाव नव्हता. किंबहुना स्नेह किंवा द्वेषभाव ठरविण्याइतकी सुद्धां त्यांस देशांतील राजकारणाची ओळख नव्हती. सिंद्यास तर इंग्रज व फ्रेंच यांजमधील फरकच समजत नव्हता. त्यांतून सिंद्याच्या पलटणांस इंग्रज वकील पामर यानें आंतून आपल्याशीं एकचित्त करून घेतलें होतें. दौलतरावास लढण्याची उत्सुकता असेल तर ती फक्त निजामाशीं दोन हात करून खर्ड्यांचा तह उगवून घ्यावा एवढीच होती. निजामाची स्थिति तर अगदींच वेगळी होती. निजाम अलीच्या मुलानें बंड केलें तें रेमंडच्या साह्यानें मोडलें, तेव्हांपासून निजामाला रेमंडच्या या फौजेचें महत्त्व विशेष वाटूं लागलें. ता. २५-२ १७९६ रोजीं निजामअली अर्धांगवायूनें आजारी होऊन तो उत्तरोत्तर अगदींच दुर्बल होत गेला, त्यामुळें राजकीय विचार अगर धोरण ठरविण्याचें सामर्थ्य त्यास राहिलें नाहीं. परंतु मुशीरुन्मुल्क पुण्यांतून सुटून स. १७९७त हैदराबादेस दाखल झाला, हा केवळ त्याच्या अक्कलेचा प्रभाव होय, असेंच निजामअलीस वाटलें. मुशीरुन्मुल्काच्या अकलेनें खर्ड्यांचा तह रद्द होऊन सर्व दंड माफ झाला आणि पूर्वींचा मुलूख कायम राहिला, यावरून निजामअलीनें राज्याची सर्व जबाबदारी या दिवाणावर टाकली. हा दिवाण मात्र सर्वथा इंग्रजांचाच हस्तक होता. त्याचे मनांत फ्रेंचांबद्दल मुळींच आदर वागत नव्हता. निजामास नेहमींच मराठ्यांची दहशत वाटत असल्यामुळें प्रसंग पडल्यास दूरच्या अदृश्य फ्रेंच मदतीपेक्षां शेजारीं आपली मर्जी झेलत राहिलेल्या इंग्रजांचेच हातीं आपली मान देणें श्रेयस्कर अशी मुशीरुन्मुल्काची भावना

होती. रेमंडच्या कंपूंतील सैनिकांची संख्या दहा हजारांवर नव्हतीच, आणि तोफा सगळ्या तीस होत्या. खुद्द रेमंड मात्र स्वराष्ट्राचा विशेष अभिमानी असून टिपूशींही त्याचा पत्रव्यवहार होता. यास्तव हिंदुस्थानांत पाय ठेवतांच वेल्स्लीनें आपल्या मनाशीं त्रिविध पद्धति निश्चित केली. ( १ ) टिपूशीं एकदम युद्ध करून त्यास जमीनदोस्त करावें; ( २ ) निजामास वळवून त्याजकडून फ्रेंच फौजेस रजा देववून त्या ठिकाणीं आपली इंग्रज फौज ठेवून द्यावी; (३) सिंद्यास पुण्यांतून हिंदुस्थानांत रवाना करून दिल्लीचें राजकारणांत त्याची अफगाण जमानशहाशीं झोंबी लावून द्यावी. ही योजना त्यानें मंजुरीकरितां युरोपांत पाठवून दिली आणि आपण इकडे त्याची सिद्धता करूं लागला. बोर्ड ऑफ कंट्रोलचा प्रेसिडेंट डंडास याची त्यास ताकीद होती, कीं ‘ प्रस्तुतच्या हिंदी राजकारणांत फार अनवस्था माजून राहिली आहे. सर्वांस धाकांत ठेवणारा असा एक सत्ताधीश तेथें कोणी नाहीं. यामुळें लहानमोठ्या दौलतदारांत एक प्रकारची अराजक स्थिति उत्पन्न होऊन शांतता बिघडण्याचा संभव उत्पन्न झाला आहे. अनेकांस आपल्या बचावाची फिकीर पडली असून त्यासाठीं त्यांस सामर्थ्याबाहेर फौजा बाळगाव्या लागत आहेत. जुन्या गनिमी काव्यानें लढणाऱ्या फौजा निरुपयोगी ठरून कवाइती फौजेची वाढ होत आहे. अशा फौजा मदतीस देण्याविषयीं अनेकांच्या मागण्या इंग्रजांकडे येत आहेत. खर्ड्याचे प्रसंगीं निजामास इंग्रजांनीं मदत न केल्यामुळें इंग्रजांविषयीं लोकांचा आदर कमी झाला आहे. अशा स्थितींत कांहीं तरी एक व्यवस्थित लष्करी धोरण ठरवून त्या धोरणांत सर्व हिंदी सत्ताधीश गुंतवून घ्यावे, म्हणजे फ्रेंचांचा बंदोबस्त होऊन इंग्रजांचा निभाव हिंदुस्थानांत ठीक लागेल.’ ही नवीन योजना ठरविण्याचें काम ब्रिटिश सरकारानें वस्लीस बजावून सांगितलें. त्यावरून त्यानें तैनाती फौजेची पद्धत नियमबद्ध ठरवून तिचा पहिला अंमल हैदराबादच्या निजामावर केला, आणि बाजीरावास वळविण्याचें काम त्यानें क. पामर यास सांगितलें.

कर्नल पामर पूर्वी उत्तर हिंदुस्थानांत महादजीजवळ रेसिडेंट होता. महादजी पुण्यास मृत्यु पावला तेव्हां तेथें मॅलेट होता, त्यास ता. ७-४-१७९४ रोजीं शोअरनें लिहिलें, ‘ महादजीच्या मृत्युबरोबर पामरची वकिलात संपली. आतां दौलतराव उत्तरेंत जाईल, तेव्हां पामरनें त्याच्या दरबारीं हजर व्हावें. ’ म्हणजे पामर लगेच पुण्यास आला नाहीं. मॅलेटच तेथें सर्व काम पाहत होता. स. १७९६ अखेर मॅलेट पुणें सोडून गेला, तेव्हां पामर तेथें गेला. पामर हा पूर्वी वॉरन्हेस्टिंग्सचा सेक्रेटरी असून महादजीजवळ पुष्कळ वर्षें राहिल्यामुळें उत्तरेंतील राजकारणाची त्यास चांगली वाकबगारी होती.

वेल्स्ली आला तेव्हां पामर पुण्यास असल्यानें, सिंद्यास उत्तरेंत रवाना करण्याची कामगिरी त्यानें पामरास सांगितली, आणि त्यास वारंवार पत्रें लिहून बाजीरावाचे मनांत बिंबविलें, कीं ' सिंद्याचा जाच तुम्हांस अतिशय होत आहे, त्यास तेवढा तुम्हीं दूर करा म्हणजे अडीअडचणींत आम्हींच तुमचें साह्य उत्कृष्ट करूं. आमची तैनाती फौज जवळ बाळगा म्हणजे तुम्हांस धास्ती नाहीं. ' ता. २१·५·१७९८ रोजीं लॉर्ड वेल्स्लीनें पेशव्यास पत्र लिहिलें तें असें. ' आम्हीं कंपनीच्या कारभारावर येऊन दाखल झालों हें पूर्वी कळविलेंच आहे. हिंदुस्थानांतील दौलतदारांशीं झालेले करार यथा-योग्य पाळून त्यांच्याशीं निरंतर दोस्ती ठेवावी अशी आमची मनापासून इच्छा आहे. ' अशाच आशयाचीं पत्रें त्यानें सिंदे होळकरांसही लिहिलीं, आणि कर्नेल पामर यास कळविलें कीं, ' पुण्यास नाना फडणिसानें आमच्या मदतीची अपेक्षा दाखविली आणि आपल्या हितास बाध न येतां ती त्यास देतां आली तर तशी संधि फुकट घालवूं नका. ' त्यावर पामरनें ता. १·६·१७९८ च्या पत्रांत लिहून कळविलें कीं, ' या समयीं पुण्यास थोडी इंग्रज फौज येईल तर बाजीरावास आमचें पाठबळ मिळून त्याचा अंमल सुरळीत होऊन सिंद्याचा जोर कमी पडेल. ' त्यावर पुनः वेल्स्लीनें लिहिलें, ' सिंदे पुण्यांतून जितका लवकर निघून उत्तरेंत जाईल तितका चांगला, म्हणजे बाजीरावाशीं आमचा व्यवहार मोकळा होऊन सिंद्याला आमचेविरुद्ध चीड येण्याचें कारण राहणार नाहीं. अफगाणिस्तानच्या जमानशहाचें पत्र आलें आहे कीं, ' आम्हीं बादशहास मराठ्यांचे कैचींतून सोडविण्यासाठीं दिल्लीवर चालून येत आहों, तरी या कामीं इंग्रजांनीं आम्हांस साह्य करावें. ' जमानशहाचे स्वारीचा हा मजकूर मी सिंद्यास कळविला असून बादशहाचे संरक्षणासाठीं तुम्हीं लगोलग निघून उत्तरेंत जावें असें सुचविलें आहे. त्यावरून जर बाजीराव आमच्या मदतीची अपेक्षा दर्शवील तर ताबडतोब तुम्ही (पामर) मुंबईची फौज पुण्यास बोलवून घ्यावी. मुंबईचे गव्हर्नरास तशी ताकीद आम्हीं देऊन ठेविली आहे. या फौजेचा खर्च बाजीरावानें वेळच्या वेळीं दिला पाहिजे. मात्र फौज आणतांना सिंद्याशीं किंवा निजामाशीं आपला वैरभाव उत्पन्न होणार नाहीं एवढीच खबरदारी तुम्हीं ठेवावी. ' बाजीरावाचा आपल्यावर विश्वास बसावा म्हणून त्याच्या बापानें इंग्रजांकडे गहाण ठेवलेलें जवाहीर याचवेळीं लॉर्ड वेल्स्लीनें त्याचें त्यास मुद्दाम आपण होऊन परत दिलें. ( पत्र ता. १३·१२·१७९८ ). या वरून इतउत्तर मराठ्यांच्या व्यवहारांत इंग्रजांचा प्रवेश कसा होऊं लागला हें कळून येईल.

दौलतराव निष्कारण घोळ घालून पुण्यांत बसल्यानें बाजीरावाचा फायदा न होतां राज्याचें मात्र नुकसान झालें. बाजीराव निव्वळ आली वेळ निभावणारा होता. त्यानें पामरकडे गुप्त बोलणें करून इंग्रजांचीं दोन पल्टणें आपल्या खास बचावाकरितां चाकरीस ठेवण्याचें ठरविलें. ' मुंबईस पलटणें असावीं, बोलावूं तेव्हां यावीं, असा करार होता. दरमहा चालू केला. परंतु नानांस हा प्रकार कळतांच त्यांनीं पलटणें महकूफ करून झाल्या दिवसांचा आकार दीड लक्ष देऊन करारनामा परत घेतला. ' मिळून नानानें यावेळीं इंग्रजांचा कावा साधूं दिला नाहीं.

स. १७९८ च्या जुलईंत वेल्स्लीनें प्रेसिडेंट डंडास यास पत्र लिहून कळविलें कीं 'स. १७९२ त टिपूशीं तह झाला, त्या वेळेपासून आतांपर्यंत समस्त हिंदी संस्थानिकांचे पूर्वींचे संबंध पार बदलून गेले आहेत. त्यामुळें इंग्रजांच्या हितसंबंधांसही अगदींच वेगळें स्वरूप प्राप्त झालें आहे. पुण्यास पेशवाई संबंधानें फेरफार होऊन पेशव्याचा अधिकार संपुष्टांत आला आहे. मराठे सरदारांस धाकांत ठेवून त्यांजकडून कामें घेण्याचें सामर्थ्य त्याच्या अंगीं राहिलेलें नाहीं. समस्त राज्यांत बेबंदशाही सुरू झाली असून तिचा संपर्क ब्रिटिशांस पोंचण्याची मोठी धास्ती आहे.'

हिंदुस्थानांत येऊन आपल्या नवीन योजनेस कसा आरंभ करावा याची विवंचना करीत वेल्स्ली हिंदच्या किनाऱ्यावर पाय ठेवतो तोंच त्यास वर्तमान कळलें, कीं ता. २५-३-१७९८ रोजीं रेमंड अकस्मात् मृत्यु पावला. निजामाकडील फ्रेंच भीतीचा हा मुख्य आधारस्तंभ नाहींसा झाल्यानें वेल्स्लीचें काम अगदींच सुकर झालें. त्यानें लगेच हैदराबादसे लिहून नवीन तह ठराविला, त्यावर ता. १-९-१७९८ रोजीं निजामाची सही होऊन तो कायम झाला. रेमंडच्या हाताखालीं फौज होती तीच बहुतेक या नवीन तहानें इंग्रजांची तैनाती फौज बनली. फौजेंत फ्रेंच अम्मलदार होते त्यांस रजा देऊन त्यांचे जागीं नवीन इंग्रज अम्मलदार नेमण्यांत आले. या प्रमाणें वेल्स्लीच्या त्रिविध संकल्पापैकीं त्याचा एक भाग केवळ सुदैवानें लगेच सिद्धीस गेला. दुसरा मराठ्यांचा भागही असाच अनायासें उरकावा आणि बाजीरावाचे गळ्यांत आपली तैनाती फौज बांधावी, असा घाट मुंबईचा गव्हर्नर जोनाथन डंकन व पुण्याचा रेसिडेंट पामर यांचे मार्फत वेल्स्लीनें सुरू केला. बाजीराव हें आमिष घेण्याच्या अगदीं बेतांत आला होता. उंदरास तारेचें सुंदर घर राहण्यास मिळाल्याबद्दल झालेला आनंद त्यानें आपल्या आईस कळविला, पण तिला त्या गोष्टीचा अनुभव असल्यानें तिनें वेळींच आपल्या मुलास सावध केलें. तशीच गोष्ट नाना कैदेंतून सुटतांच या

तैनाती फौजेची होऊन तूर्त तरी बाजीरावानें दोन महिन्यांचा पगार चुकवून इंग्रज फौजेस रजा दिली, ही गोष्ट वर सांगितलीच आहे. सोनेरी पिंजऱ्यांत पडण्याची बाजीरावाची हौस पुढें चार वर्षांनीं फिटली.*

**२ टिपूचा पाडाव, बाजीरावास वेल्स्लीचा शह** (स. १७९९).— टिपूचें इंग्रजांशीं युद्ध झालें तो भाग ब्रिटिश इतिहासांत येतो. मराठी राजकारणावर त्याचा परिणाम काय घडला तें दाखविण्यापुरताच येथें त्याचा संदर्भ घ्यावयाचा आहे. टिपूच्या प्रकरणासंबंधानें पुणें दरबाराशीं इंग्रजांची वाटाघाट झाली, त्याची साद्यंत हकीकत अस्सल कागदांच्या आधारानें पे. अ. बखरींत पृष्ठ ५४ ते ७७ यांत दिली आहे. ती वांचकांनीं अवश्य वाचावी.

'आश्विन वद्य ५ ( ता. २८·१०·१७९८ ) रोजीं कर्नल पामरनें नानाकडे येऊन सवाल केले व त्यांचे जाब झाले ते असे. ( १ ) टिपूच्या मसलत प्रकरणीं तीन महिने श्रीमंतांशीं बोलत आहों. घरचे गोंधळामुळें आपणांकडून निर्णय होत नाहीं. टिपूस फरासीस सामील झाल्यावर मसलत भारी पडेल याचा विचार काय ? नानांनीं उत्तर केलें, तिन्हीं सरकारांनीं मिळून टिपूस पत्र लिहून उत्तर काय येतें त्याची वाट पाहवी. कर्नेल बोलले, टिपूस जनरलांनीं लिहिलें, उत्तर येत नाहीं; तेव्हां सर्वांनीं तयारीस लागावें हें उत्तम. उत्तर समर्पक न आल्यास मग तयारीस लागणें ठीक नाहीं. ( २ ) सिंदे यांचे पलटणांत फरासीस बहुत आहेत, त्यांस ते हिंदुस्थानांत दूर असते तर चिंता नव्हती, याच कारणास्तव निजामांनींही आपले फ्रेंच अधिकारी जवळ असलेले काढून टाकले. टिपूशीं लढाई झाल्यास हे फ्रेंच अधिकारी कामाचे नाहींत. नानांनीं उत्तर केलें, सिंदे उत्तरेंत जाण्याच्या तयारींतच आहेत. कर्नेल बोललेबाजीराव अंतस्थ रीतीनें टिपूशीं पत्रें पाठवून सिलसिला ठेवितात हें आम्हांस ठीक वाटत नाहीं. नाना बोलले श्रीमंतांस विचारून सांगूं. ( ३ ) यानंतर ता. १·११·१७९८ रोजीं कलकत्तेकरांचें पत्र पेशव्यास आलें, कीं टिपू पूर्व करारा-प्रमाणें वागत नाहीं; त्याच्याशीं युद्धाचा प्रसंग येणार, त्यास पूर्वीचा त्रिवर्गाचा तह आहे त्याप्रमाणें पेशवे सरकारांची फौज आम्हांस सामील होणार कीं नाहीं. दुसरेच दिवशीं निजामाचेंही पत्र याच आशयाचें पेशव्यास आलें; आणि त्याच बरोबर तैनाती फौजेचा नवा तह निजामानें इंग्रजांशीं केला त्याची नक्कलही आली. त्यावर पामरनें बाजीरावाची गांठ घेतली. बाजीरावानें कळविलें, 'टिपूवर आम्हीं

* खरे; पे. अ.; वेल्स्लीचे खलिते भा. १ पृ. १११–१२४ व ६९५; फॉरेस्ट पृ. ६११.

२५ हजार फौज रवाना करितों. माधवराव रामचंद्र कानडे यांची नेमणूक केली आहे. दोन महिन्यांत तयारी होईल.'

याच समयास टिपूचे वकील पुण्यास आले. त्यांची बरदास्त पेशव्यानें चांगली ठेवली. ता. १०-१-१७९९ रोजीं पेशव्यानें त्यांच्या भेटी सन्मानपूर्वक घेतल्या. त्यांचें बोलणें कीं, तुमचा आमचा स्नेह असावा. इंग्रजांशीं युद्धप्रसंग पडल्यास तुम्हीं आम्हांस साह्य करावें. नानाकडेही ते वकील दोन तीन वेळां भेटीस गेले. परंतु हें राजकारण स्वतःचे शिरावर घेण्यास नाना समर्थ नव्हता. कारण त्या वकिलांनीं बाजीराव व सिंदे या दोन बुभुक्षितांस अंतस्थ पैसे चारून मिंधे बनविलें होतें. तेरा लाख रुपये त्यांनीं पेशव्यास दिले असें डफ सांगतो. तरी इंग्रजांविरुद्ध टिपूस उघड मदत करण्याची छाती बाजीरावास किंवा सिंद्यास झाली नाहीं. तसेंच लिटलीच्या हाताखालीं मुंबईचीं दोन पलटणें टिपूवर रवाना झालीं तीं संगमेश्वरास उतरून आंबा घाटानें कऱ्हाडावरून पुढें गेलीं, त्यांस पेशव्यानें प्रतिबंध केला नाहीं. परशुराम भाऊनें इंग्रजांचे मदतीस जावें असा नानाचा अभिप्राय होता. परंतु भाऊ करवीरकरांशीं झुंजत होता. बाजीराव व दौलतराव यानींही भाऊस तशी निकड केली नाहीं; आणि तितक्यांत इंग्रजांनीं टिपूशीं युद्ध पुकारून निजामाची फौज घेऊन तडकाफडकी टिपूस मारिलें, ( ता. ४-५-१७९९ ), तेव्हां पुण्यास एकदम सर्वांचे डोळे उघडले. इतक्या लवकर टिपूचा निकाल लागेल अशी कोणाचीच अटकळ नव्हती. वर्ष दोन वर्षें तरी युद्ध चालेल; आणि आपण तानमान पाहून हलके हलके त्यांत सामील होऊं अशा घमेंडींत बाजीराव होता. नानास तर ही दिरंगाई बिलकूल खपली नाहीं. इंग्रजांस मदत न केल्यानें आपले काय तोटे आहेत त्याची एक याद त्यानें स्वदस्तुरची लिहून बाजीरावास समजाविली. तेव्हां बाजीरावानें नानाचे सूचनेस अनुमोदन देऊन, रामचंद्र परशुरामानें टिपूवर जावें असा हुकूम दिला; आणि ता. १०·४·१७९९ च्या पत्रानें ती गोष्ट इंग्रजांस कळविली. तथापि टिपूचे वकील पुण्यांत होते त्यांजबद्दल पामरनें पेशव्याची पुष्कळ कानउघाडणी केली, तेव्हां ते वकील पुणें सोडून गेले. तोंच इंग्रजांचीं पत्रें पेशव्यांस आलीं कीं टिपूचा पाडाव होऊन त्याचें राज्य संपलें. जिंकलेल्या मुलखाची इंग्रजांनीं वांटणी केली त्यांत,—

४४००००० लक्षांचा मुलूख म्हैसूरच्या पहिल्या राजाचा वंशज कृष्णराज वोडियार यास देऊन त्याची स्थापना केली;

७७७००० चा मुलूख इंग्रजांनीं घेतला;

६००००० चा मुलूख निजामास दिला; आणि
२६३००० चा मुलूख पेशव्याचे वांटणीचा म्हणून काढला; पण त्याच्या अटी बाजीरावानें मान्य न केल्यामुळें तो पुढें इंग्रज निजामांनीं निंमे निंम वांटून घेतला. त्या अटी अशा होत्या कीं, (१) निजामानें इंग्रजांची तैनाती फौज आपले संरक्षणास घेतली तशीच बाजीरावानेंही घ्यावी, (२) फ्रेंचांनीं इंग्रजांवर स्वारी केल्यास तिचे निराकरणास बाजीरावानें इंग्रजांस मदत करावी; (३) पेशवे व निजाम यांचा कलह उद्भवल्यास त्याचा निर्णय इंग्रज तिऱ्हाईतपणें करतील तो पेशव्यानें मान्य करावा; आणि (४) पूर्वी टिपूचे राज्यावर मराठ्यांची चौथाई बसलेली असल्यामुळें त्या आधारावर आतां कृष्णराज वोडियार याचे राज्यास पेशव्यांनीं चौथाईचा वगैरे उपसर्ग करूं नये. वस्तुतः या अटींवर मुलूख घेणें म्हणजे बाजीरावानें आपलें स्वातंत्र्य घालविण्यासारखेंच होतें. अर्थात् त्या बाजीरावानें मान्य केल्या नाहींत; त्यावरून बाजीरावासंबंधानें इंग्रजांचें मन हळू हळू कलुषित होत गेलें. या व्यवहाराची फलश्रुति नानानें बोलून दाखविली ती अशी. 'पट्टणाकडील जाबसाल उरकला. इंग्रज प्रबळ झाले. कलकत्त्या पावेतों त्यांचा प्रांत झाला. सरकारांत तूर्त हीच चिंता पडली आहे. टिपूचें संस्थान गारद झालें हें सरकारचे दौलतीस चांगलें नाहीं. होणार चुकत नाहीं.'

टिपूच्या प्रकरणांत गमावलेला डाव भरून काढण्यासाठीं बाजीराव व दौलतराव यांनीं नेहमींच्या उच्छृंखलपणानें निजामावर स्वारी करण्याचा बेत जाहीर केला. लगेच ती बातमी पामरनें लॉर्ड वेल्स्लीस कळविली. त्याबरोबर तिकडून असें झणझणीत अंजन बाजीरावाचे डोळ्यांत घातलें गेलें कीं, त्याचा त्यास पुढें कधीं विसर पडूं नये.. इकडे वेल्स्लीनें निजामासही भरपूर आश्वासनाचें पत्र पाठवून कळविलें कीं, "तुम्हीं जोंपर्यंत इंग्रजांशीं प्रेमानें वागत आहां तोंपर्यंत तुमचेवर कोणीही शत्रु चालून आला तरी आम्हीं सर्व फौजेनिशीं तुमचे संरक्षणास धावून येऊं. शिंद्याची फिकीर तुम्हीं यत्किंचित् मनांत बाळगूं नये." याच पत्राची नक्कल पामरचे मार्फत ता. १४-५-१७९९ रोजीं पेशव्यास मिळाली, त्यानें पुढील सर्व काम भागलें.

बाजीराव जन्मापासून अंधारांत वाढलेला त्यास इंग्रजांचा तडाखा काय ठाऊक ! येथें ज्याप्रमाणें जवळच्या मंडळीस आपण सहज चकवितों तसेच आपण पामर वेल्स्ली वगैरे जहांबाजांस चकवूं शकूं अशी त्याची समजूत होती. खरोखर बाजीरावाच्या अव्वल अंमदानींतील हिंदी परिस्थिति ओळखण्यास वेल्स्लीचे राजकारणी कागद भरपूर छापलेले आहेत ते वाचले पाहिजेत. सर्व कोनाकोपऱ्यांतल्या बऱ्या वाईट

बातम्या वेल्स्लीस कशा पोंचत होत्या आणि त्या सर्वांचा विचार करून तो लगोलग आपले हस्तकांस कसे हुकूम सोडीत होता हें समजून घेणें म्हणजे एका स्वतंत्र विषयाचा अभ्यासच आहे. जो पुरुष इंग्लंडाहून निघतांच आपले पुढचे बेत ठरवितो, केप येथील आठ चार दिवसांच्या फुरसतींत इत्थंभूत हिंदी राजकारणाचे धागे जमवून तयारी करितो, त्याची हुशारी काय सांगावी ! आणि त्याजपुढें मराठ्यांचें लंगडें लुलें राजकारण काय टिकणार ? टिपूच्या युद्धांत इंग्रजांस सामील न होतां दोघांसही फसवून आपण आयत्या वेळीं शिष्टाई करण्यास पुढें येऊं असा बाजीरावाचा मनोदय होता. मनांतून टिपूवेंच साह्य करावें असें होतें: आणि निजामानें इंग्रजांशीं स्नेह जोडल्याचें ऐकतांच प्रथम त्याचाच उच्छेद केला म्हणजे इंग्रज निजामाचे संरक्षणास धावून येतील तेव्हां मग आपण व टिपू मिळून इंग्रजांचा धुव्वा उडवूं अशा कल्पनेंत बाजीराव स्वस्थ बसला होता. या आपल्या योजनेंत नागपुरकर रघूजीनें सामील व्हावें अशी खटपट त्यानें चालविली होती. पण याची खडानखडा बातमी वेल्स्लीस अगोदरच मिळून त्यानें रघूजीला मराठमंडळांतून फोडण्याचा प्रयत्न सुरू केला होता. रघूजीला मात्र इंग्रजांचा विश्वास बिलकूल वाटला नाहीं. टिपूचा पाडाव केल्याबद्दल दौलतरावानेंही वेल्स्लीचें बाहेरून अभिनंदन केलें: पण आंतून श्रीरंगपट्टणास गुप्त हेर पाठवून टिपूचे मंडळीस इंग्रजांविरुद्ध चेतविलें. ही बातमी वेल्स्लीस कळून त्यानें दौलतरावाचा डाव हाणून पाडिला. टिपूच्या कुटुंबाचा व त्याच्या राज्याचा बंदोबस्त इतक्या त्वरेनें त्यानें लाविला कीं, बाहेरच्या खटपटीस अवकाशसच राहिला नाहीं. टिपू मेला तरी त्याचे मुलगे पुनः आपला जम बसवतील असा संभव पुष्कळ दिवस लोकांस वाटत होता. टिपूचा नातू, करीम-साहेबाचा मुलगा श्रीरंगपट्टणाहून पळून कर्नाटकांतील पेशव्यांचे मुलखांत दंगा करूं लागला. तसेंच टिपूचा एक पुत्र गुप्त वेशानें पुण्यास येऊन राहिला. नानानें त्यास आश्रय देऊन जवळ ठेविलें, व म्हैसूरचें राज्य इंग्रजांकडून परत घेण्याचा उद्योग चालू केला. तसेंच नानानें पूर्णय्यास अनुकूल करून घेऊन म्हैसूरची फौज फितविली, अशा बातम्या पुण्यास फार दिवस पसरल्या होत्या. त्या संबंधानें पामरनें क्रुद्ध होऊन बाजीरावास जाबही विचारला. तथापि बाजीरावाचे संबंधांत वेल्स्लीनें आगळिकीचे घडे पूर्ण भरेपर्यंत दम खाल्ला; आणि टिपूचें राज्य घेतल्यानंतर निजाम, अर्काटचा नबाब, तंजावरचा राजा, अयोध्येचा वजीर, वगैरेंस प्रथम पचनीं पाडून मग तो मराठ्यांचे पाठीस लागला, हा प्रकार यथावकाश लक्षांत येईल. ( फॉरेस्ट, खरे इ० ).

**३ मुत्सद्यांचा छळ व बाजीरावाची घसरपट्टी** (१७९८–१८००).—नाना फडणीस कैद झाला त्याच वेळीं त्याजबरोबर दादा गद्रे, आबा शेल्कर, बजाबा शिरोळकर व राघोपंत गोडबोले वगैरे गृहस्थ होते त्यांसही दौलतरावानें कैद केलें; आणि महिना पंधरा दिवस त्यांस अटक करून प्रत्येकापासून लायकीप्रमाणें दहावीस लाख दंड घेऊन सोडून दिलें. नानाचे दुसरे साथीदार त्रिंबकराव परचुरे, नारोपंत चक्रदेव, नारायण बाबूराव वैद्य, गोविंदराव पिंगळे, बाबा फडके, आपा बळवंत, राघोपंत निजसुरे वगैरे शहरांत होते त्यांस बाजीरावानें नाना कैद झाल्याबरोबर वाड्यांत बोलावून सर्वांस तेथें अटकेंत ठेविलें आणि प्रत्येकाचा जो कांहीं द्रव्यसंचय असेल तो त्यांजपासून लुबाडून घेण्याचा क्रूर उद्योग सारखा दोन चार महिने चालविला. या उद्योगांत बाजीरावाजवळ मुख्य सल्लागार अमृतराव व बाळोजी कुंजर होते; आणि सर्वांचा सूत्रचालक सर्जेराव प्रत्येक गोष्टींत त्यांस प्रोत्साहन देत होता. त्रिंबकराव परचुऱ्यानें बाळोजी कुंजराशीं बोलणें करून त्यानें आपलें सारें द्रव्य सरकारांत समजावून तीन लक्ष निघालें तें सिंद्याकडे भरलें आणि काशीयात्रेस कायम जाण्यासाठीं निरोप घेतला, (ता. ८-३-१७९८). कांहीं अंतर गेल्यावर त्यास बाजीरावानें फिरून पकडून परत आणिलें. ' सर्जेराव बापूची स्वारी वाड्यांत आली. परचुरे यांजवर अनेक तऱ्हेचा निकर्ष करण्यांत आला. नारायणराव वैद्य यांस कोरड्यांचा मार दिला. तीच अवस्था अनेकांची. अशा रीतीनें सर्वांवर प्रसंग कठिणच. प्राणाशीं गांठ. वस्त्र विरहित तोफेवर बसवितात. कपाळी संस्कार असतात ते चुकत नाहींत ! छड्यांचे मार, उपासमार वगैरेनीं त्यांस अत्यंत हैराण करून प्रत्येकापासून शक्य तितका पैसा उकळण्यांत आला. बाबूराव केशवचा पुत्र व चिंतोपंत देशमुख यांस मारिलें.' या प्रकारानें शहरांतील लोक अत्यंत हवालदील झाले. सतत सहा महिने हा कहर चालला. नानाचा चुलत पुतण्या गंगाधर गोविंद भानु याजपासून जबरदस्त पैका सर्जेराव मागूं लागला. तो गंगाधरपंत देईना, तेव्हां अंगाला चाप लाविले. ता. १०-४-१७९८ रोजीं त्यास तापलेल्या तोफेवर बसविलें; पायांस धोंडे बांधिले. विस्तव करून दोन प्रहरां उष्ण तोफेवर बसविलें. नाजूक जाग्यास झळ लागून ताडनही झालें. शेवट काळ झाला. उभयतां स्त्रिया सती जाऊं लागल्या, तेव्हां घाटग्यानें पांच लक्ष रुपये मागितले. काय भोक्तृत्व आहे नकळे. शेवटीं पुण्याहून परवानगी आणून वाई येथें त्यांनीं सहगमन केलें. गंगाधरपंत भानूचा बध होण्यापूर्वी दोन दिवस त्याचा बाप वारला म्हणून त्याचा पुत्रशोकाचा प्रसंग टळला. नानाची बरीच जिंदगी लोह-

गडावर असून तो किल्ला धोंडोपंत निजसुरे याचे ताब्यांत होता. त्यानें ता.९-४-१७९८ रोजीं सरकारांत लिहून कळविलें कीं, येथें काय जिंदगी असेल ती सर्व पाहून ताब्यांत घ्या व माझे अब्रूस धक्का लागणार नाहीं असा बंदोबस्त करून द्या. परंतु सर्जेरावाचे लोक गेले असतां धोंडोपंतानें किल्ला हवालीं केला नाहीं. निजसुरे यानें मोठ्या हिंमतीनें वागून हल्ला करणाऱ्यांस दाद दिली नाहीं.

जुना कारभार सर्वस्वी मोडून व त्यांतील माहितगार मंडळीची पांगापांग करून द्रव्य मिळेल तितकें उपटावें, एवढाच विचार आतां बाजीराव व दौलतराव यांचा होता. कारभाराची नवीन घडी बसविण्याचा त्यांनीं विचारच केला नाहीं, शिवाय हा कारभार म्हणजे दोन मोठे प्रपंच होते. बाजीरावाकडे सर्व जबाबदारी दक्षिणची व सिंद्याकडे उत्तरेची व फौजेची. बाजीरावानें नाना व त्याचे साथीदार पकडले, तसेच दौलतरावानें बाळोबा व सर्व शेणवी मंडळ यांस जेरीस आणिलें. बाळोबा तात्यास कांहीं दिवस जांबगांवास कैदेंत ठेवून पुढें नगरास नेलें. इकडे गोपाळराव चिटणीस हिंदुस्थानांतून नुकताच आला होता. लाखेरीच्या लढाईपासून हा गोपाळराव तीन वर्षेपर्यंत नजरबंदींत होता. ' साल गुदस्त ( १७९७ ) कृष्णोबा चिटणीस यांनीं दहा लक्ष खंड देऊन चिटणिसी करून घेतली, त्या समयीं गोपाळराव भाऊंस सोडविलें. ते सन १७९८ चे आरंभीं पुण्यास आले. तेथें फकीरजी गाढवे चिटणिसांचे हितैषी यांचे सम्मतीनें सर्जेरावानें आपली मुलगी दौलतरावास दिली: आणि पुढें या त्रिवर्गांनीं सिंद्यास समजाविलें, कीं नारायणराव बक्षीनें फौजेचा कारभार बिघडविला. शेणवी मंडळ भारी, सबब आम्ही पासष्ट लाख देतों, त्यावरून बक्षीस कैद झाली. गृहच्छिद्र जनान्यांतील होतें, तें जाहिराण्यांत आलें, सबब नानाकडील फितव्यांत होते असा बहाणा करून किल्ल्यास रवाना केलें. एक द्रव्याचें कुळ नाना त्यांचे हातींच आहे, त्यांस खाणार. नानाकडील सर्व माहितगार मंडळी लष्करांत नेऊन धाकदपटशा दाखवून ऐवज काढिला. गांवांतील सावकारांचे घरीं सरकारचीं माणसें बसलीं.' खुद्द सर्जेराव बायजाबाईचे लग्नाचे दहावे दिवशीं येऊन नानाचे वाड्यांतच राहिला. ' नानाच्या देवघरांत नित्य अजापुत्राचा वध चालला आहे. पुण्यांतील गृहस्थांस दक्षिण दिशेच्या स्वामीप्रमाणें घाटग्याचें भय झालें आहे. श्रीमंतांसमक्ष सर्जेराव शिवीगाळ करितात. बाळोजी कुंजर त्यांचे मसलतींत. श्रीमंतांचे चित्तांत कांहींच गैर येत नाहीं. नाना सिंद्याचे गोटांत होते, त्यांस ता. ६-४-१७९८ रोजीं रात्रीं चंद्रोदयानंतर दोन घटकांनीं अहंमदनगरास कैदेस नेलें. ईश्वराचे चित्तीं या उपरी ब्राह्मणांचा हुकूम चालूं नयेसें झालें. श्रीमंतांपासीं मुखत्यार नारोपंत चक्रदेव,

पिंगळे व कुंजर हे आहेत. काळ फारच कठिण आला आहे. राज्य बिघडतेंसें भासतें.' बाजीराव वाटेल तसे पैसे लोकांकडून मागूं लागला, तेव्हांची हकीकत नारायण वैद्य पुण्याहून आपल्या भावास लिहितो ती खासगी असल्यामुळें भरंवसे लायक आहे, ती अशी (१-३-१७९८): 'आम्हास सरकारवाड्यांत बोलावून आणून आजपर्यंत ठेविलें. आम्हीं त्यांस म्हणतों,—आम्हापासून पैका काय म्हणोन घेतां ? जर अपराधी आहों तर मर्जीस येईल तें पारिपत्य करा. सरकारांत ओढ आहे, तुम्हीं सरकारचे चाकर, जें मिळविलें तें द्यावें, असें म्हणूं लागल्यास, शपथपूर्वक आम्हीही देणार. श्रम मोठाले म्हणून अधिक उणें मागूं लागल्यास आमचे जवळ द्यावयास नाहीं. कोणाचें कर्ज करावयाचें नाहीं व मिळतही नाहीं. तेव्हां ईश्वरसत्तेनें दैवीं असेल तें घडो. श्रीमंत पुण्यवान् दयाळु आहेत. जो जसी निष्ठा ठेवील त्यास तसें फळ येईल.'

ता. १५-४-९८ रोजीं मराठी राज्यांतील चाळीस वर्षांच्या घडामोडी पाहिलेला पुरुष आपाबळवंत मेहेंदळे एकाएकीं आत्महत्या करून मरण पावला. 'आपासारखा पुरुष होणें नाहीं. त्यांजपाशीं पैका मागों लागले, तेव्हां अब्रूसाठीं अमृतप्राशन केलें, आणि देवाधीन झाले.' या किळसवाण्या कामांत पडण्याची ज्यांनीं तत्परता दाखविली नाहीं, त्यांवरही सिंद्याची इतराजी लगोलग झाली. 'रायाजी व रामजी पाटील आणि फकीरजी गाढवे यांस घरास जातों म्हणोन निरोप दिला.' इकडे मोरोबास सोडवून पुण्यास आणलें, पण अमृतरावाचें व बाजीरावाचें पटलें नाहीं. नानास कैद झाल्यावर सेनापति, आंगरे, छत्रपति वगैरे सर्वांचे कारभार सिंदे वाटेल तसा उलगडूं लागला. बाजीरावाचे हातीं काडीइतकाही अधिकार राहिला नाहीं. सिंद्यापुढें माझा इलाज चालत नाहीं असें तो बोलूं लागला. तेव्हां सिंद्यासच भेटीस बोलावून कैद करावें आणि आपला अम्मल जोरानें सर्वत्र बसवावा असें अमृतरावानें बाजीरावास परोपरीनें सांगितलें. एकदां सिंदे बाजीरावाचे भेटीस वाड्यांत आला असतां, त्यास पकडण्याची संधिही चांगली आली होती. अमृतरावानें बाजीरावास तसा इशाराही दिला, परंतु बाजीरावास एवढें धारिष्ट कोठचें होणार ? हा प्रकार पाहून अमृतराव हताश झाला आणि आपण बाहेर पडून एकट्यानेंच काय होईल तें करावें अशा विचारानें पुणें सोडून जुन्नरकडे म्हणून निघून गेला. इतउत्तरचा त्याचा उद्योग बंडखोरींतच गणला पाहिजे, (एप्रिल १७९८).

सिंद्याचें व बाजीरावाचें वैमनस्य फार वाढलें. बाजीरावानें सर्जेरावापासून आपल्या लोकांचा बचाव करण्यासाठीं मोरोबा दादा, फडके वगैरे आपल्या आप्त

मंडळीस पुणें सोडून जाण्याची भर दिली. त्यावरून बाजीरावाजवळ आपला पाहरा बसविण्याची खटपट सिंदे करूं लागला. तसें झाल्यास आपणही पुणें सोडून जाण्याचा बेत बाजीरावानें केला. मे महिन्याच्या आरंभीं एक दिवस सिंद्याची स्वारी बाजीरावाचे भेटीस वाड्यांत आली. त्या प्रसंगीं सर्जेरावाचा बंदोबस्त करा असें बाजीरावानें त्यास सांगितलें. दोन घटका खलबत झालें. सिंद्यांनीं चार मुद्दे घातले ते बाजीरावानें कबूल केले नाहींत. त्या प्रसंगीं चिमाजी आपानें सिंद्यास साफ कळविलें, कीं 'आम्ही धनी नाहीं' तुम्हींच सर्व मालक, कराल ती पूर्वदिशा.' शहरांत लोकांस धीर पुरेना. फार करून कुटुंबें कोंकणांत निघून जाऊं लागलीं. तेव्हां सर्जेरावानें शहराची नाकेबंदी करून लोकांस बाहेर जाण्याची बंदी केली. श्रीमंताचें व सिंद्याचें रहस्य राहिलें नाहीं. अगदीं हातघाईवर प्रसंग येऊं लागला. उभयतां श्रीमंत पुण्याहून पळाले, अशी सुद्धां बातमी शहरांत पसरली. सर्जेराव न्याय पंचायती देखील करूं लागला. बाजीरावाचे हातीं काडी इतकी सत्ता राहिली नाहीं, त्यामुळें बाजीरावाची चोहोंकडे छी थू झाली. पूर्वीं न घडलेले अनन्वित प्रकार आतां आपल्या डोळ्यांदेखत खुद्द पुण्यांत आपल्या सम्मतीनें घडूं लागले ही गोष्ट बाजीरावाचे मनास झोंबली. निदान दोन कोट रुपये तरी सर्जेरावानें पुण्यांतून उकळले. ते बहुधा नानाच्या पक्षांतील मंडळीकडचे होते. यावरून सिंदे बाजीरावांचा विरोध वाढला, आणि सिंदे भेटीस आला असतां बाजीरावानें त्यास फौज बाहेर ठेवून एकट्यासच आंत घेतलें आणि त्याची पुष्कळ अप्रतिष्ठा केली. तेव्हां सिंद्यानें सर्जेरावाचा थोडासा निग्रह केला. मालोजी घोरपडे व मानाजी फाकडे वगैरे सरदारांस बाजीरावानें सर्जेरावास पकडण्यास पाठविलें. त्यांनीं जाऊन नानाचे वाड्यास गराडा घातला व तोफा रोंखल्या, तेव्हां सर्जेराव व फकीरजी गाढवे भयभीत होऊन बाजीरावाचे भेटीस वाड्यांत गेले. त्यांची पालखी व फौज बाहेर उतरवून त्यांस पायउतारा बाजीरावानें रुबरू बोलाविलें, आणि त्यांस फार फजित केलें. तेव्हां सर्जेरावानें लोकांचे घरीं बसविलेल्या चौक्या उठवून आणिल्या. नारायणराव बक्षी व देवजी गौळी यांस या संधींत दौलतरावानें कैदेंतून मोकळें करून त्यांचा बहुमान केला. त्या वेळीं नारायणराव बक्षीनें दौलतरावाची पुष्कळ कानउघाडणी केली. त्यांच्या हकीकती ऐकून सिंद्यास सर्जेरावाचा अत्यंत राग आला. प्रकरण असें निकरा-वर आलें तेव्हां जावयाची समजूत काढण्याचें शेवटचें हत्यार सर्जेरावानें उपयोगांत आणिलें. 'त्यानें आपली स्त्री व कन्या व कलावंतीण अशा तिघींस एका खोलींत

घालून तेथें दौलतरावास नेलें. चार प्रहर त्रिवर्ग स्त्रिया व सिंदे एकत्र होते. ' याचा अर्थ काय असेल तो असो.

या दुष्कृत्यांचा परिणाम लौकरच बाजीराव दौलतराव यांस इतका जाचक झाला, कीं सर्जेरावास कैदेंत घालून नानास व बाळोबास सोडून आणणें त्यांस कसें भाग पडलें तो प्रकार अन्यत्र सांगितला आहे. त्यानंतर पुढें बाजीरावाचे व्यवहार नानाशीं कसे घडले ते आतां पाहूं. जुलई महिन्यांत नाना सिंद्याचे गोटांत येऊन राहिल्यावर त्याचा बाहेर लोकांशीं व्यवहार सुरू झाला. सिंद्यास आणखी पंधरालक्ष रुपये त्याजकडून मिळाव-वाचे, ते हातीं कारभार आल्यावर त्यानें द्यावयाचे होते. यास्तव नानास कारभार देण्याचा तगादा सिंद्यानें बाजीरावास लाविला. परंतु बाजीरावाकडून विशिष्ट करार करून घेतल्याशिवाय नाना कांहीं केल्या कारभार पत्करीना. त्यानें निक्षून सांगितलें कीं, ' माझ्या अब्रूस किंवा जीवितास तुमचेकडून धक्का बसणार नाहीं अशी हमी इंग्रज व निजामअली देतील तरच मी कारभार पत्करीन. परंतु ही हमी बाजीरावास मिळणें शक्यशच नव्हतें. तथापि आपणांस कांहीं तरी लष्करी पाठबळ खात्रीचें हाताशीं असावें, यास्तव परशुराम भाऊशीं नानानें आपला मिलाफ करून घेतला. त्याच प्रमाणें नाना-शींही भाऊनें गोडी करून घेतली; आणि आर्जवाचीं पत्रें लिहून शपथक्रिया केल्या. पुढें सिंद्यानें बाजीरावास निकड लाविली कीं, नानास कारभार सोपून द्या म्हणजे मी निघून हिंदुस्थानांत जातों. त्यावरून बाजीरावानें नानाची पायधरणी चालविली.

नानाचे वाड्यांत पशुवध वगैरे झाल्यानें शांति व शुद्धि करण्यास अवकाश होता, म्हणून सिंद्याचे लष्करांतून निघाल्यावर नाना आपल्या पेठेंत वानवळे याचे वाड्यांत कांहीं दिवस येऊन राहिला असतां ता. १४·११·१७९८ रोजीं अवशीच्या ११ घटका रात्रीस एक भिवजी कोलते मात्र खिदमतदार बरोबर घेऊन बाजीराव अकस्मात् नानाचे भेटीस गेला आणि त्याचे घट्ट पाय धरून व डोळ्यांत आसवें आणून राज्य संभाळण्या विषयीं त्यानें नानाची प्रार्थना केली. तो म्हणाला, ' आजपावेतों जें कांहीं मीं केलें तें सर्व घाटग्याच्या जुलमामुळें करणें मला भाग पडलें. माझी तशी इच्छा बिलकूल नव्हती. तुमचे पक्षाची मंडळी वाड्यांत आणली ती त्यांचें संरक्षण करण्या-कारितां आणली, पण घाटग्यानें त्यांचा भलताच परिणाम केला. मी सर्वथैव निरपराधी व असहाय आहें. ' असें म्हणून त्यानें गहींवरून नानाचे पायावर मस्तक ठेविलें, आणि शपथ घेऊन बोलला, ' मी आपणांस वडिलांच्या ठायीं लेखतों. आपण माझे मायबाप आहां, तारणार मारणार सर्व आपण. इंग्रज राज्य घेण्यास टपले

आहेत, अशा प्रसंगीं ह्या ब्राह्मणी राज्याचा सर्व भरंवसा आपल्यावर आहे. आजपर्यंत राज्य वांचविलेंत तसेंच पुढेंही वांचवा.' भट पेशव्यांच्या वंशजानें भानूंच्या वंशजास केलेली ही असामान्य विनवणी नाकबूल करणें नानाचे जिवावर आलें. त्यानें निमूटपणें कारभार करण्याचें मान्य केलें. फरक इतकाच सांगितला कीं, 'श्रीमंता-जवळ नारोपंत चक्रदेव येऊन सर्व कारभार संपवितील. मी घरीं बसूनच हरएक प्रकरणाची व्यवस्था नारोपंतास सांगत जाईन.' अशा प्रकारें लीनतेचें मिष्ट व मायावी भाषण आणि आर्जव स्तुतिपाठांचें भरपूर प्रदर्शन करून त्या प्रसंगीं बाजीरावानें नानाचें मन वळवून घेतलें. यानंतर लवकरच ता. ३-१-१७९९ रोजीं नानाचा अगत्यवादी गोविंदराव पिंगळे मरण पावला.

बाजीरावाच्या नादानपणामुळें राज्याचें वातावरण अविश्वासानें भरून गेलें, आणि जन्माचे स्नेही पक्के वैरी बनले अशीं उदाहरणें वारंवार घडूं लागलीं. गोविंदराव काळे व नाना फडणीस यांचें असेंच या वेळीं वांकडें आलें. हे काळे व शिवराम नारायण थत्ते यांनीं अमृतरावाचे शिकवणीवरून दौलतराव सिंद्यास एकांतीं कळविलें, कीं नाना फडणीस व नारोपंत चक्रदेव यांस आपण कैद करावें म्हणजे आम्ही आपणांस चाळीस लक्ष रुपये देतों. सिंद्यानें ती गोष्ट नानास कळविली. नानानें बाजीरावास त्याजबद्दल जाब विचारला. बाजीरावानें कानावर हात ठेविले आणि कळविलें, तुम्हीं त्या मंडळीस वाटेल ती शिक्षा करा. त्यावरून नानानें त्यांस विश्रामबाग वाड्यांत कैद करून काळ्याची सिंहगडावर व थत्त्याची कर्नाळ्यावर रवानगी केली. 'दोघेही गृहस्थ संभावित. ईश्वरें यांजवर अरिष्ट आणिलें,' असा यांजबद्दल उल्लेख आहे. अमृतरावासही कळून चुकलें कीं बाजीरावाचे हातून कोणताही जम बसणें शक्य नाहीं. नानाच कांहीं तरी व्यवस्था करूं शकेल. अशी उभयपक्षीं खात्री झाल्यावर त्यांनीं निष्कृत्रिमपणें वागण्याचे करार करून मागचें सर्व विसरून जाऊन एकमेकांनीं अंतः-करणपूर्वक साह्य करावें, संशय सोडावे, असे करार १७९९ चे आरंभीं झाले.

बाजीरावानें नानाची पायधरणी करून त्याचे गळ्यांत कारभाराचें ओझें बाह्यतः अडकविलें, परंतु नानाबद्दल त्याचे मनांतील भीति गेली नव्हती. केवळ बायांचा तंटा मिटविण्यापुरता हा देखावा होता. जमानशहा दिल्लीवर स्वारी करणार त्याचे बंदोबस्तास सिंद्यानें उत्तर हिंदुस्तानांत जावें असें पामरनें बाजीरावास नानाचे मार्फत कळविलें. तेव्हां सिंद्यानें बाजीरावाशीं एक करार ठरवून निघून जाण्याची तयारी केली. हा करार ५-१२-१७९८ चा आहे. ता. १७-१-१७९९ रोजीं बाजीरावाकडून वस्त्रें व

निरोप घेऊन सिंदे मांजरीचे तळापर्यंत निघूनही गेला. परंतु बाजीरावास नाना, बाळोबा व परशुरामभाऊ हे तिघे कृतांतवत् वाटत असल्यामुळें त्यानें दौलतरावाची पुनः गुप्तपणें प्रार्थना केली, कीं नाना जिवंत असेपर्यंत तुम्ही मला सोडून जाऊं नये. याचे उलट नानानें दौलतरावास निघून जाण्याचा तगादा केला, तेव्हां दौलतरावानें फौजेच्या देण्याची हरकत पुनः दाखविली. त्यावरून कायमचे निघून गेल्यास ३५ लाख देण्याचें नानानें कबूल केलें, पुण्यांतून निघतांना सात लाख, जाबगांवास पोंचल्यावर चार लाख, बऱ्हाणपुरास बारा लाख आणि बाकीचे बारा लाख बुंदेलखंडांत. असा ठराव झाला खरा, पण नानावर तरी सिंद्याचा विश्वास कोठें होता ? त्यानें नानाकडून जामीन मागितले. तेव्हां नानानें हरिभक्तीचा भाचा दुर्लभदास व अन्याबा अभ्यंकर यांस जामीन म्हणून सिंद्याचे हवालीं केलें. इतकें झालें तरी बाजीरावानें सिंद्यास पुण्यांतून जाऊं दिलें नाहीं.

नाना फडणीस दृष्टीसमोर नको आणि त्याच्या शिवाय तर कारभार चालत नाहीं, अशी बाजीरावाच्या मनाची सारखी तारांबळ चालू झाली. सन १७९८ च्या पावसाळ्यांत नाना कैदेंतून मुक्त झाला आणि सर्जेरावास कैद झाली, त्यानंतर दसऱ्यास त्यास नांवाचा कारभार प्राप्त झाला. परंतु यजमानाचा आपल्यावर भरंवसा नाहीं असें पाहून तो कारभारांत लक्ष बिलकूल घालीना. त्यानंतर नोव्हेंबरांत बाजीरावानें येऊन नानाचे पाय धरले, तेव्हां तो कांहीं थोडें काम करूं लागला. त्यांतही मुख्यतः सन १७९९ च्या आरंभीं टिपूचें प्रकरण व बायांचा बंडावा या दोन कारणांची उस्तवारी करण्यासाठीं नानाच बाजीरावास पाहिजे होता. पुढें बाळोबा-शिवाय बायांचें प्रकरण जमेना, म्हणून सन १७९९ च्या एप्रिल महिन्यांत बाळोबाची मुक्तता होऊन त्यानें बायांचें प्रकरण मिटविलें, तेव्हां सन १७९९ च्या पावसाचे सरासरी तीन महिने राज्यांतील तिघे कर्तबगार पुरुष नाना, तात्या व भाऊ असे एक-मतानें राज्यास आळा घालूं लागले, तोंच परशुराम भाऊचा शेवट झाल्यामुळें नानास विश्वासाचा आधार राहिला नाही. तथापि बाळोबाचे द्वारें सिंद्याचें बल हातांत ठेवून त्यानें थोडी बहुत धडपड चालविली. त्याची प्रकृति खालावली होतीच, आणि बाजीरावानें या दोघांचा उपयोग करून घेतला असता तर त्याचा जम बसण्याचा पुष्कळ संभव होता. परशुराम भाऊ पडल्याचें वृत्त बाळोबास कळतांच त्यानें बाजी-रावाकडे जाऊन चौघडा बंद करविला आणि करवीरकरांचें पारिपत्य करण्यासाठीं फौजेची रवानगी ताबडतोब करविली. पटवर्धनांचें साह्य करण्याचें बाजीरावाचे मनांत

नसतांही, रत्नाकरपंत व चतुरसिंग यांच्या धाकानें पुष्कळ प्रकरणांत मुठींत नाक घेऊन बाळोबाचे म्हणण्यास अनुमोदन देणें बाजीरावास भाग पडूं लागलें. बाबूराव आंग्रे याची सरखेलीवर स्थापना झाल्यापासून, तो आतां दौलतरावाजवळ राहून कारभारांत वावरूं लागला होता. म्हणजे आबा चिटणीस, बाबूराव व बाळोबा हे तिघे तीन जातींचे गृहस्थ सिंद्याचे कारभारांत कायम असते तर राज्याचें वांकडें करण्याची कोणासही ताकद झाली नसती. विजयादशमीचे पूर्वी पांच सात दिवस या तिघांनीं श्रीमंतांकडे येऊन बोलणें लाविलें, कीं 'सरकारचे दौलतीमध्यें बखेडा झाला. हरएक विषयीं बंदोबस्त नाहीं. सिंद्याचे घरचा कलह मिटत आला आहे. पण इंग्रज प्रबल झाले त्यांचा रेंच मोडला पाहिजे. हिंदुस्थानांत दंगा झाला आहे. अमृतरावाचें तुमचें जमत नाहीं. सर्वांचें छत्र सरकारची दौलत. पुढें विचार काय?' त्यावरून बाजीरावानें उत्तर केलें कीं, नाना कारभारांत मन घालीत नाहींत त्यास आम्हीं काय करावें? त्यावर बाळोबानें उत्तर केलें, 'त्यांनीं चित्त घातलें तर बंदोबस्त होईल, नाहीं तर आम्हांस विचार पाहवा लागेल.' त्यावर विचार करून सांगतों असें उत्तर झालें. पुढें नानासही बाळोबांनीं तेंच सांगितलें. त्यावर नाना म्हणाले, 'आम्हांस कारभार नलगे. तुम्ही करावा म्हणतां, त्यास माझे शरिराची प्रकृति कळतच आहे. आतां श्रीमंतांनीं कृपा करून आम्हांस भागीरथीवर जाण्यास निरोप द्यावा, हेंच उत्तम.' विजया दशमीस नानांस कारभार सांगावा असा श्रीमंतांचा विचार होता, परंतु तें घडलें नाहीं, तेव्हां मोरोबा दादास बाजीरावानें पुण्यास आणविलें. नानानें त्यास हरकत घेतली नाहीं. उलट मोरोबाचा मुलगा नाना यास आपले जवळ बसवून मखलासी करवूं लागले.

डिसेंबरांत एक नवीनच हूल उठली. 'आंगठीवरील हिरा आहे तो काढून दुसरा बसवावयाचा आहे. अमृतराव व दौलतराव यांचा परिणाम अस्ताव्यस्त बोलतात. कोणे समयीं काय होईल नकळे.' अशा अंधुक बातम्या सर्व ठिकाणीं पसरल्या होत्या. आंगठीवरचा हिरा म्हणजे बाजीराव त्यास काढून अमृतरावाचा मुलगा विनायकराव यास यशोदा बाईंचे मांडीवर दत्तक द्यावयाचा असा घाट कर्णोपकर्णी प्रसृत झाला होता. या घाटांत खुद्द नानाचें अंग होतें असें बिलकूल वाटत नाहीं. कैदेंतून सुटल्या पासूनच्या वर्षांतील त्याचे जे विचार ठिकठिकाणीं नमुद झालेले दिसतात त्यांवरून तो प्रकृतीनें व मनानें अगदींच हताश व दुर्बल झालेला दिसतो. कोणतीही सुव्यवस्था आपले हातून सिद्धीस जाण्याचा योग नाहीं, अशीच त्याची खात्री झाली; तेव्हां य

संकटमय वातावरणांतून कोठें तरी निवांत जागीं जाऊन बसावें आणि ईश्वरचिंतनांत कालक्षेप करावा या पलीकडे कसलीही उलाढाल तो अंगावर घेत नव्हता. वरील उताऱ्यांत ' याचा विचार आम्हांस पाहवा लागेल, ' असे शब्द बाळोबाचे आहेत त्यांचा अर्थ बाजीरावानें घेतला कीं, बाळोबा व सर्व शेणवी मंडळ आणि खुद्द अमृतराव हे सर्व आपल्या विरुद्ध ठरले असून त्यांचा पुरा सूड घेतल्याशिवाय निभाव लागणार नाहीं. या संशयानें नानाचा, बाळोबाचा व प्रत्यक्ष जाणत्या भावाचा आधार बाजीरावानें सर्वस्वी घालविला आणि पुनः सर्जेरावाकडे धाव घेतली.

पण नानाचा खरा उपयोग एकाद्या बिकट प्रसंगीं कसा होतो याचें एक ठळक उदाहरण सन १८०० च्या जानेवारींत सहज रीतीनें बाजीरावाचे प्रत्ययास आलें. नानाच्या हयातींतील ही शेवटची व महत्त्वाची गोष्ट होय. वेल्स्लीनें श्रीरंगपट्टणचें राज्य जिंकल्यापासून त्याचें मन मराठ्यां संबंधानें अधीर होऊं लागलें. निजाम व टिपू कबजांत आले. आतां मराठ्यांस कसें नरम करावें याची शक्कल त्यास सुचेना. ' बाजीरावानें इंग्रज फौज मदतीस बोलाविल्या बरोबर पाठवा, तसी फौज बोलावण्याची त्यास बुद्धि होईल असा प्रयत्न करा, असें पामरास सांगतां सांगतां वेल्स्लीचे दिवस जात चालले. पण बाजीराव कसला मठ्ठ तो कांहीं पामरास दाद देईना. इतक्यांत मराठ्यांचे अंतःकरणाचा ठाव घेण्याचा एक प्रसंग सहज उद्भवला. मॅलेट युरोपास गेला, तेव्हां त्याजबरोबर बाजीरावानें इंग्लंडच्या राजास कांहीं नजराणे व एक पत्र पाठविलें होतें. त्याचें उत्तर राजाकडून आलें ते घेऊन चार टोपीकर मुंबईहून पुण्यास आले. त्यांचें बोलणें सरकारांत पडलें जे, ' पातशाही पत्रें आलीं आहेत, तीं घेण्याचा समारंभ करून पेशव्यानें समोरे जाऊन सरकारी डेऱ्यांत तीं उभ्यानें स्वीकारावीं, आणि खुशालीच्या शंभर तोफा सोडाव्या. ' याचें उत्तर काय सांगावें तें बाजीरावास सुचेना. तेव्हां बाजीरावानें नानाचा सल्ला विचारला. नानानें कळविलें, ' दिल्लीपतीशिवाय सामोरें जाणें किंवा फर्मानबाडीचा समारंभ करणें, ही आमची चाल नाहीं. थोरल्या माधवरावास असें पत्र आलें होतें तें त्यांस इंग्रजांनीं कचेरींत आणून दिलें, तसें आतां करावें. उभ्यांनीं पत्रें स्वीकारावयाचीं त्यास श्रीमंत दरबारांत येत असतांच त्यांचे हवालीं करावीं. नंतर श्रीमंतांकडून वीस तोफा सोडण्यांत येतील. याप्रमाणें आठ चार दिवस वाटाघाट चालून अखेर नानाच्या सल्ल्याप्रमाणें ता. ७·१·१८००रोजीं समारंभ पार पडला.

बाळोबा तात्यानें बायांची समजूत करून शिंद्याचे घरचा तंटा मिटविला, त्याबद्दल

बाजीरावास संतोष न वाटतां उलट बाळोबाची भीति वाटूं लागली. नाना व तात्या यांनीं कोल्हापुर छत्रपतीवर फौजा पाठविण्याची सिद्धता केली; पैसा मिळत नसतां तोही स्वतःचे पदरचा देवविला. अशा रीतीनें जर मुत्सद्दी आपल्या अकलेच्या बळावर एक एक कारभार उरकूं लागले, तर मग आपण धनी निर्माल्यवत् होणार. त्यांतून सिंद्याजवळ शेणवी मंडळीचें प्राबल्य मोठें होतें. ते एक जुटीनें मोठमोठीं कामें तेव्हांच सिद्धीस नेत. या गोष्टी बाजीरावास व कांहीं अंशीं खुद्द सिंद्यास सुद्धां दुःसह झाल्या. या शेणवी मंडळीची खोड मोडणारा एक सर्जेराव होता, त्यास कैदेंतून सोडण्याविषयीं बाजीरावानें दौलतरावास सूचना केली. बाळोबाशीं तंटा न करितां दौलतरावानें हें काम मोठ्या युक्तीनें पार पाडिलें. बायजाबाईनें त्यास कैदेंतून सोडण्याबद्दल नवऱ्याजवळ हट्ट धरिला व अन्न सोडून त्रागा केला. तिच्या बरोबर दौलतरावानेंही उपोषणें चालविलीं. कारभारी घाटग्यास सोडूं देत नाहींत, म्हणून यजमान व यजमानीण उपास करतात, अशी चर्चा बाहेर सुरू झाली. तेव्हां आपल्यावर आरोप नको, म्हणून सर्जेरावास कारभारांत कांहीं एक करूं देऊं नये, त्यांनीं खाऊन स्वस्थ असावें, अशा अटींवर बाळोबानें त्यास सोडण्याविषयीं दौलतरावास संमति दिली. तात्याचें अनुमोदन मिळतांच दौलतरावानें तारीख ४·१·१८०० रोजीं सर्जेरावास नगर येथें बंधमुक्त करून आपल्या डेऱ्यास आणिलें; आणि वस्त्रें व खर्चास रोख रक्कम देऊन त्याचा बहुमान केला. घाटगे म्हणजे महापराक्रमी पुरुष, कोणत्याही असत्कृत्यास सदैव तत्पर. करवीरकर छत्रपतींस तर त्याच्या सुटकेनें अति आनंद होऊन आतां आपल्यावर होणारी जोराची मोहीम परत फिरवितां येईल अशी त्यास मोठी आशा उत्पन्न झाली. सर्जेराव मोकळा होतांच त्यानें पहिला पराक्रम सिंदे बायांवर मारेकरी घालून कसा प्रगट केला हें मागें सांगितलेंच आहे. त्यामुळें बाया पुनरपि बिथरून रानोमाळ दंगा करूं लागल्या. इकडे बाळोबानें साफ सांगितलें, मला कारभार होत नाहीं. वाटेल तर मला बिडी घालून किल्ल्यावर टाका, किंवा यात्रेस जावयास निरोप द्या. त्यास सर्जेरावाची अत्यंत दहशत बसली. दरबारास जाण्याचेंही बाळोबानें सोडिलें. यशवंतराव शिवाजीस धरणें बसविण्याच्या निमित्तानें बाळोबानें आपले जवळ ठेवून घेतलें. असा आठ चार दिवस सगळाच घोळ पडला. तेव्हां चार लोक मध्यस्थीस घालून दौलतरावानें बाळोबास बोलणें करण्यासाठीं जवळ आणिलें. एक प्रहर पर्यंत तात्या, धोंडीबा, आबा चिटणीस, यशवंतराव शिवाजी, बाजीबा मोदी, यादवराव भास्कर, नारायणराव बक्षी, बाणाजी शेट व कंपूवाले तिघे यांच्याशीं दौलतरावचों

बोलणें होऊन ठरलें कीं, सखाराम घाटगे यास पोटापुरतें देऊन बाहेर काढून द्यावें, निदान चांगल्या नजरबंदींत ठेवावें; आणि सर्वांनीं तात्यांचे आज्ञेंत चालावें; त्यांस नको असतील तीं माणसें त्यांनीं दूर करावीं. असा ठराव सर्वांचे विद्यमानें झाला. तथापि घाटगे सुटल्यापासून बाळोबाचें बस्तान डळमळलें तें पुनः कधीं बसलें नाहीं; आणि नाना व बाळोबा दोघेही लवकरच दिवंगत झाल्यानें राज्यांतील धरबंद सुटला.*

**४ बाळोबातात्या व शेणवीवीर यांचा हृदयद्रावक शेवट** (१८००).– नाना फडणिसाच्या मृत्यूनें बाजीरावाचा अर्धा घोर गेला पण बाकीचा अर्धा घोर बाळोबा पागनिसाचा अद्याप शिल्लक होता, तो काढून टाकिला कीं आपण निर्भय झालों अशा विचारानें बाजीरावानें सर्जेराव व बाबाजी पाटणकर यांजबरोबर दौलतरावास सांगून पाठविलें कीं, " बाळोबा पागनिस तुम्हांस व आम्हांस दगा करून दोहोंकडे दत्तक घ्यावयाचें करीत आहेत, याजकरितां सदरहूची चौकशी न करितां त्यांस कैद करा. हें तुम्ही न कराल तर आम्ही प्राण देतों. " त्यावरून दौलतरावास संकट पडून बाळोबा पागनीस, धोंडीबा व नारायणराव बक्षी यांस त्यानें कैद करून नगरास पाठविलें. तेथें पुढें कांहीं दिवसानीं, त्यांचा शेवट मोठा खेदजनक झाला. हा एकंदर प्रकार कसा घडला तें आतां तपशीलवार सांगितलें पाहिजे.

सन १८०० च्या मार्चांत नाना दिवंगत होतांच बाजीरावाभोंवतीं त्याची चांडाळ-चौकडी जमा झाली. त्यांनीं मसलत सांगितली कीं, अमृतराव व नारोपंत चक्रदेव कारभारांत नसावे, मोरोबादादांस आणावें. परंतु बाजीराव व दौलतराव यांस कोणा-चाच विश्वास पटत नव्हता. ' सिंद्यांचा प्रकार म्हणावा तर सर्जेराव, बाणाजी शेटे व यादो भास्कर यांचें एकचित्त असून ते बाळोबाचे विरुद्ध वागत. नानाचे घरावर वांकडी नजर ठेवून पाहारा बसविला तो धोंडीबानें उठवून दिला. ' वर्षप्रतिपदेस ( २३·४·१८०० ) बाजीरावानें दिवाणगिरीचीं वस्त्रें अमृतरावास दिलीं. इतक्यांत सिंद्याचे कारभारी बाळोबा व आबा चिटणीस दोघेही आजारी झाले, आणि सर्जेरावाची चाल पाहून त्यांनीं कारभारांतून आपलें अंग काढिलें. हा रुसवा काढून ता. २५.४.१८०० रोजीं बाळोबा, धोंडीबा व सदाशिव मल्हार यांस दौलतरावानें कैद केलें. तेव्हां बाजीबा मोदीचा पुत्र कृष्णोबा व देवजी गौळी यांसही दौलतरावानें पकडून नगरचे किल्ल्यांत नेऊन ठेविलें. नगरास निघतांना बाळोबाच्या कुटुंबाचे दौलतरावानें अत्यंत हाल केले, तेव्हां 'त्याच्या बायकोनें कपाळ फोडून घेतलें. दोन घटका तिचा प्राण कासावीस झाला.'

*खरे; पे. अ; खं. १०–४७७; खरे ना. फ. च.; त. क. पृ. १५९.

नाना फडणिसाची पायधरणी करण्याचें नाटक जसें बाजीरावानें केलें त्याचीच हुबेहूब नक्कल दौलतरावानें बाळोबा तात्यास कैद करण्यापूर्वी केली. ' ता. २२.५.१८०० रोजीं रात्रीं बाळोबाचे घरास दौलतराव सिंदे यांनीं एकट्यांनीं जाऊन पायांवर डोई ठेविली. त्यांनीं उत्तर केलें, ' तुझें तूं आटोपून घेऊन बंदोबस्त करावा. मला अगत्य नाहीं. माझा वृद्धापकाल झाला. महायात्रेस मार्गस्थ करावें. किंवा तुम्हां-जवळच आहे. ' त्यानंतर पांचवेच दिवशीं बाळोबा त्याची स्त्री व धोंडीबा यांची रवानगी दौलतरावानें नगरास केली, तेव्हांपासून सर्जेरावी कारभार जोरांत चालू झाला. ता. ३१.५.१८०० रोजीं तुळजाजी शिंदे, मानाजी वाबळे व सुभानजी मोरे याचा लेक धुळोजी या तीन असामींस अस्तमान जाहल्यावर डेऱ्यास बोलावून आणून कैद करून सर्वांस तोफेच्या तोंडीं दिलें. त्यांजवर आरोप एवढाच कीं ते बायांच्या पक्षास मिळाले होते. नारायणराव बक्षी व देवजी गौळी वगैरे आणखी कित्येकांस त्याच वेळीं कैदेंत बसविलें. ता. ८.७.१८०० रोजीं यशवंतराव शिवाजी वागळे व काळा बहिरू लेकावळा याम पांच पाट काढून डोकीवर शेंदूर घालून नाक कान छेदन करून लष्करांतून फिरवून तास रात्रीस मेखसूंखालीं मारून टाकिलें. तेच दिवशीं नारायणराव बक्षी यास कैद करून किल्ले नगरास रवाना केलें. ' धोंडीबा दादा पूर्वीच तेथें होते त्यांनीं फितूर केला. दस्त ऐवजही सांपडले. त्यांस तेथेंच तोफेच्या तोंडी दिलें, ( १८.५.१८०० ). ईश्वर कृपा करून अब्रू राखील तो निभावला. तूर्त सर्जेरावी झाली आहे. बाण अंगास बांधून बक्षीस उडवून मारिलें. बाण अंगास बांधण्याची ही शक्कल खुद्द सर्जेरावानें काढली होती. बाणांनीं उडविलें असतांही प्राण न गेला. सबब डोचकें मारिलें. 'या गोष्टी अतिरिक्त होतात असें जग बोलतें. परिणाम काय होतो पाहवें. पुण्यांत घाटगे हत्या पाडावयास ईश्वरें निर्माण केला. ब्राह्मण मारावयास ईश्वरें प्रारंभ केला. बाळोबा तात्या व सदाशिव मल्हार जिवंत आहेत असें कळतें. आयुष्यमर्यादा असल्यास ईश्वर बुद्धि देईल तरी देऊ. बाळोबातात्या नगरास होते ते १४ जमादिलाखर * मंदवारीं अकस्मात् मृत्यु पावले. अगोदर ५–६ दिवस त्यांचे स्त्रीस जांबगांवास बलात्कारें करून आणिली. नंतर बाळोबांचा काळ जाहला. अंतसमयीं जवळ

**बाळाजी अनंत पिंगे**
**|**
**भास्करराव**

---

* मोडक जंत्रींत १४ जमादिलाखरास रविवार आहे, शनिवार नाहीं. रात्रीचा समय असल्यास वाराचा हा फरक असणें शक्य आहे. कार्तिक शु. १५ शके १७२२ ( ता. १-११-१८०० ) रोजीं बाळोबा तात्या नगरास आजारानें मृत्यु पावला असें यांत ठरतें. खरे; पे. अ.

कोणी नाहीं. या तऱ्हेचा समय ईश्वरें दाखविला. त्या आधीं सदाशिव मल्हार याप्रमाणें १५ दिवसांचे अंतरानें उभयतांनीं कैलासवास केला. शेणव्यांचा ग्रंथ समाप्तीस गेला.'

बाजीरावानें व दौलतरावानें इतका क्रूरपणा धारण करण्याचें प्रयोजन जरा खोल गेल्याशिवाय समजणार नाहीं. त्या वेळचे राज्यांतील पुष्कळ इसम नानाच्या तालमेंत तयार झालेले होते. राज्यकारभार सुधारण्याचे त्यांचे विचार अहर्निश चालत असत. त्यांच्या बोलण्यांत अशी एक शक्कल निघाली, कीं बाळोबा तात्यानें सर्जेरावास कैदेंत घालून दौलतरावास घेऊन हिंदुस्थानांत जावें. सिंदे निघून गेल्यावर अमृतरावानें बाजीरावास जरबेंत ठेवून सर्व कारभार मुखत्यारीनें करावा. नानाचे मृत्यूनंतर मोरोबास आणून कारभार करण्याचा बाजीरावाचा बेत होता, तो सिद्धीस जाऊं देऊं नये. या योजनेचा मुख्य आधार बाळोबा असून तो सुद्धां आपण अमृतरावाचे हुकमानें वागतों असें दाखवीत होता. बाळोबाची मुख्य भिस्त लखबादादावर होती. जरूर पडल्यास मी तुमच्या मदतीस पुण्यास येतों असें लखबानें बाळोबास कळविलें होतें. लखबा लाड हा शूर सरदार आग्र्याचा सुभेदार फौजबंद असून बायांशीं संधान ठेवून दौलतरावाशीं फटकून वागत असे. त्यानें जयपुरचे राज्यावर स्वारी करून खंडणी वसूल केली ती हकीकत दौलतरावास दक्षिणेंत कळतांच, खुशाली दाखविण्याकरतां त्यानें वानवडीस जो दरबार भरविला, त्यांतच त्यानें बाळोबास कैद केलें; आणि तिकडे लखबासही कैद करावें, असे हुकूम त्यानें अंबाजी इंगळे व पेरॉन यांस पाठविले. परंतु लखबा सावध असल्यामुळें त्याजपुढें पेरॉनचा लाग साधला नाहीं. बुंदेलखंडांत पेशव्यांचा सरदार अलीबहाद्दर होता तो व लखबादादा एक विचारानें बायांचे पक्षांत लक्ष ठेवून वागत. सर्जेरावास कारभारांत घेऊं नये असें कलम बायांचा समेट झाला त्यांत ठरलें होतें. त्याविरुद्ध दौलतरावानें सर्जेरावास कैदेंतून सोडवून कारभारांत घेतलें, त्यामुळें बायांचा समेट बिघडून त्या जांबगांव सोडून दंगा करीत बऱ्हाणपुराकडे जाऊं लागल्या, (जून १८००). या वेळीं यशवंतराव होळकर स्वतंत्र फौजा जमवून उज्जन-नजीक सिंद्याचे मुलखांत दंगल माजवूं लागला होता. दौलतरावाचा पाडाव करणें हाच त्याचा मुख्य उद्देश असून बाळोबाच्या मसलतींत होळकरही सामील होण्याचा संभव उत्पन्न झाला. दक्षिणेंतील सरदार पटवर्धन, गोखले, पानसे व पुण्यांतील नारोपंत चक्रदेव वगैरे मंडळी अमृतरावास पुढाकार देऊन राज्याची नवीन घडी बसविण्यास उत्सुक झाली होती. सर्वांची आतां पूर्ण खात्री झाली, कीं बाजीराव व दौलतराव हे

राज्य बुडविणार. म्हणून त्यांचे हातीं यत्किंचित् सत्ता ठेवणें त्या दोघांस अनिष्ट वाटलें. सिंद्यांचे पलटणांत सुद्धां या विषयाची चर्चा चालून त्यांना फितूर करण्याचे प्रयत्न सुरू झाले. अशा प्रचंड क्रान्तीची भाषा लोक उघडपणें बोलत होते, ती अर्थात् त्यांच्या कानांवर गेली. हातांत अधिकार आणि सर्जेरावसारखा कल्पक डोक्याचा साह्यकर्ता असल्यावर मग या बंडाचा प्रतिकार करण्यास त्यांस विलंब लागला नाहीं. याच कारणास्तव ता. ३१ मे रोजीं फितुरीच्या आरोपावरून त्यांनीं तुळसाजी सिंदे वगैरे तीन असामींस तोफेच्या तोंडीं देऊन बाळोबा व धोंडीबा यांस नगरचे किल्ल्यावर रवाना केलें. बाळोबा दूर होतांच दौलतराव निरंकुश झाला आणि बाजीराव-ही आपला कारभार मर्जीप्रमाणें करूं लागला. सर्जेरावाचा डाव आतां असा होता कीं छत्रपतीकडून जशी कागलची जहागीर त्यानें हक्क नसतां आपल्या नांवानें करून घेतली, तशीच पटवर्धनांची सर्व जहागीर व मुख्यतः मिरजेचें ठाणें आपलें करून घ्यावें असा मनांत बेत ठरवून तशी मागणी त्यानें बाजीरावाकडे आग्रहानें केली. बाजीरावास पटवर्धन नको होते, पण सर्जेरावानेंही शिरजोर होणें त्यास मानवत नव्हतें. तथापि सिंद्याचीं पलटणें कोल्हापुरावर गेलीं होतीं त्यांस बाजीरावानें हुकूम पाठविला, कीं मिरजेवर चाल करून तें ठिकाण हस्तगत करावें. पटवर्धनांस ही गोष्ट कळतांच त्यांनीं शिकस्तीनें लढून मिरजेचा बचाव केला, त्यामुळें बाजीराव व सर्जेराव यांचे बेत सिद्धीस गेले नाहींत.

नाना मरण पावतांच त्याच्या पक्षांतले जेवढे म्हणून प्रमुख लोक होते, त्यांचा नायनाट करण्याचें काम बाजीरावानें आरंभिलें, त्यास निमित्तही लगेच मिळालें. फडणिशी संबंधानें तंटा उपस्थित झाला. नानाचे स्त्रीचे मांडीवर दत्तक देऊन त्यास फडणिशी द्यावी, किंवा मोरोबा दादास आणून त्यास द्यावी, असे दोन तट उत्पन्न झाले. या दोनही पक्षांतील मंडळींस सिंद्यानें बरेच दिवस नादास लावून त्यांजकडून पैसे उपटण्याचा उद्योग चालविला. नानास दत्तक देण्याच्या पक्षांत अमृतराव मुख्य होता, तरी त्या संबंधानें कलमबंदीच्या यादी तयार झाल्या त्यांत अमृतरावाचें नांव प्रत्यक्ष दाखल नव्हतें. दौलतरावानें हा सर्व बेत आगाऊच बाजीरावास कळवून ठेविला होता. दत्तविधानाचा मुहूर्तनिश्चय ज्येष्ठ शु॥ १० ( ता. १६-६-१८०० ) चा झाला. त्यापूर्वी दोन दिवस बाजीरावानें कटाच्या पुढारी मंडळीस वाटाघाटीसाठीं म्हणून वाड्यांत बोलावून अकस्मात् सिंद्याकडून कैद करवून पायांत शृंखळा घालून निरनिराळ्या किल्ल्यांवर रवाना केलें. या कृत्यांत बळवंतराव नागनाथ व बाळोजी कुंजर हे बाजी-

रावाचे मुख्य साहाय्यक असून ता. २४-६-१८०० रोजीं त्यांस त्यानें उघडपणें कारभारावर घेतलें. तरी सिंद्यानें त्याचे आदलेच रोजीं मोरोबादादास पुण्यास आणिलें, पण त्याचे हातीं बाजीरावानें कारभार दिला नाहीं तो नाहींच. बाजीराव मोरोबाकडून भली मोठी रक्कम मागूं लागला. त्यावर मोरोबा म्हणाला, 'मला तुमचा कारभार नको व मजपाशीं पैसाही नाहीं. कृपा करून घरीं राहूं द्याल तर राहूं, अथवा मर्जी असेल तेथें ठेवा.' श्रीमंतांच्या कृपेची अशी तऱ्हा आहे असें लेखक लिहितो. गोविंदराव काळे यास पूर्वी कैदेंत घातलें होतें, तो मात्र या वेळीं मोठ्या शिकस्तीनें दंड भरून सुटला. एक लेखक लिहितो 'जाला रंग हा थोडा. आणखी कांहीं व्हावें असा प्रसंग आहे. परंतु आतां कोणी दौलतीमध्यें राहिलेंच नाहीं. जे दिवस जातील ते खरे. श्रीमंतांस व नवे कारभाऱ्यांस कशाचीही दरकार नाहीं. सिंदे यांचे लष्करांतून जाऊन आलें म्हणजे पुनर्जन्म होतो. लखबा लाड उज्जनी नजीक आले. होळकर इंदुराजवळ आहेत. बाया दरकूच तिकडे जातात. मल्हारराव होळकराचा पुत्र व स्त्री यांस श्रीमंतांनीं कुंटे यांचे वाड्यांतून काढून आपले वाड्यांत स्थळ देऊन ठेविली. कारण काशीबा होळकर केव्हां दगा करतील, त्याचा धीर बाईस न पुरे.' एकंदरींत चांगल्यांचा पाडाव होऊन राज्यनाश जवळ आला, एवढें खरें.

पुण्यांतील कारभाराची ही हवाल पाहून अमृतरावास इतका वीट आला कीं, तो सात लक्षांचा सरंजाम तोडून घेऊन आषाढ शुद्ध प्रतिपदा ( २२-७-१८०० ) रोजीं पुणे सोडून कोंकणांत भिवंडी येथें जाऊन राहिला. सिंदे बायाशीं त्याचें अनुसंधान असून त्यांजला जाऊन सामील होण्याचा त्याचा मनोदय होता.

नाना फडणिसानें आपल्या संरक्षणासाठीं आरबांचीं पलटणें तयार करून जवळ बाळगिलीं होतीं, त्यांचें एक प्रकरण बाजीरावास याच वेळीं जाचक झालें. त्यांचा अंमलदार शहामीरखान म्हणून होता. तो जातीचा रोहिला पठाण नानाचे भरंवशाचा, शूर व बाणेदार होता. सन १७८१ त खंडाळ्याचे घाटाखालीं इंग्रज सेनापति गॉडर्ड याजबरोबर पेशव्यांच्या लढाया झाल्या, त्या वेळीं इंग्रजांच्या धर्तीवर नानानें हें सातशें लोकांचें देशी पलटण मुद्दाम इर्षेनें तयार केलें. या पलटणांतील माणसें कशीं कणखर व कजाख होतीं याचा अनुभव शहामीरखानाचे प्रकरणांत चांगला आला. ती हकीकत म्हणजे एक स्वतंत्र भारूडच आहे. नाना फडणीस मरण पावतांच आपली तलब पोंचल्याशिवाय आरबांनीं प्रेत उचलूं दिलें नाहीं. पुढें नारोपंत चक्रदेव वगैरे मंडळींनीं हे पठाण थोडे थोडे वांटून आपल्या निसबतीस घेतले. नानाच्या जोरावर

बाजीरावास ते बिलकूल जुमानीत नसत, आणि प्रसंगोपात शहरांत वाटेल तसा धिंगाणा घालीत. नारोपंत चक्रदेवास बाजीरावानें पकडलें, तेव्हां त्याजबरोबर शहामीर व त्याचे तीनशें लोक शनिवार वाड्यांत गेले होते. चक्रदेवास पकडल्यावर ते पगारासाठीं अडून बसले आणि पुढें नाइलाज होऊन वाड्यांतून बाहेर पडले, ते नानाच्या वाड्यांत जाऊन बंदोबस्तानें राहिले. आरबांची ही ब्याद शहरांतून काढून दिल्या खेरीज बाजीराव दौलतरावांस निर्धास्त वाटेना: आणि पगार हातीं पडल्याशिवाय ते निघून जातना. त्यांस जबरदस्तीनें काढून देण्यासाठीं नानाचे वाड्यास तोफा लावण्यांत आल्या. त्या प्रसंगांत आरबांचे दहा व सिंद्याचे वीस लोक ठार झाले. शहामीर-खानाचें घर भवानीपेठेंत होतें, त्याजवरही तोफांचा मारा झाला. पांच घटका लढाई होऊन दोहोंकडचें मिळून चारशें माणूस जखमी झालें. शहामीरखानाचा लेक मरून पडला, तेव्हां तो खुद्द आपल्या बायकांस ठार मारून लढाई करीत वाड्याबाहेर निघाला, त्या वेळीं नरसिंगराव विंचूरकरानें जामीन राहून शहामीरखानास सोडविलें. हा बनाव ता. १७ ते २० जून सन १८०० रोजीं झाला. अशा प्रकारें घरांतील भानगडी वाढत असतां बाहेरचें राजकारण कसें बनत गेलें तें पुढील प्रकरणीं सांगूं.

---

# प्रकरण सहावें.

## दक्षिणेंत वाघ, उत्तरेंत होळकर.

### स. १८००-०१

**सुभेदार यशवंत कन्हैया सदा फत्ते करी तलवारी ।**
**सवाई यशवंतराव होळकर प्रसन्न मल्हारी हस्त शिरीं ॥**
**दोन लाख फौजेचा जमाव दों वर्षांमधिं घ्या गणती ।**
**बनकस कंपू पठाण कडिये फौजेमधिं नित्य झडती ॥**
**मान भिडावुन देति लढावुन टोपीवाले नाहीं गणती ।**

अनंद फंदी।—

१ धोंडजी वाघाचा पाठलाग व मृत्यु. २ बाजीरावानें पामरास तोंडघशीं पाडिलें.
३ यशवंतराव होळकर, पूर्वायुःक्रम. ४ सिंदे बायांची बुंदेलखंडांतील मोहीम.
५ सिंद्याचें प्रयाण, विठोजी होळकराचा अमानुष वध. ६ नर्मदेच्या प्रचंड लढाया.
७ प्रतिनिधीचा छळ. ८ बाजीरावाची तारांबळ.

**१ धोंडजी वाघाचा पाठलाग व मृत्यु** ( १०. ९. १८०० ).—वाघाचें आडनांव पवार. सिधोजी व बहिरजी पवार हे दोघे बंधू वाघझरीकर पाटील आदिलशाहीचे

लष्करांत नोकरी करून होते. अनागोंदीनजीक कृष्णातीरचे रानांतून वाघिणीचें दूध आणून दिल्यावरून सुलतानानें त्यांस ' वाघ ' हा किताब दिला. धोंडजीचे बापाचें नांव गंगाजी. कोणी सांगतात पिराजी. धोंडजी हा प्रथम कांहीं वर्षें पटवर्धनांच्या व करवीरकर महाराजांच्या फौजेंत चाकरीस होता. पुढें तो लक्ष्मेश्वरचा देसाई कांचनगौडा याच्या पदरीं राहिला. हा देसाई मुलखांत दंगे करून प्रबल झाला, त्या कामीं वाघासारख्या धाडसी सोबत्याचें त्यास पुष्कळ साह्य झालें. सन १७७७ त सावसीच्या लढाईत या दोघांनीं हैदरअलीची फौज आणून पटवर्धनांचा चकाचूर उडविला. त्या पुढील सालीं परशुराम भाऊ व हरिपंत तात्या हैदरावर चालून गेले, तेव्हां देसाई पळून श्रीरंगपट्टणास गेला. त्याचीं मुलें माणसें श्रीरंगपट्टणच्या किल्ल्यांत होतीं, तीं परशुरामभाऊनें हस्तगत करून मिरजेस नेऊन कैदेंत ठेविलीं; आणि श्रीरंगपट्टणचा किल्ला जमीनदोस्त केला तिकडे टिपूनें कांचनगौडा देसाई यास श्रीरंगपट्टणांत कैदेंत ठेविलें, तेव्हां त्याची रक्षा केंचव्वा म्हणून बाणेदार होती, तिला धोंडजी वाघानें साह्य करून शिरहट्टीचा किल्ला पुनः बांधला, आणि टिपूच्या मुलखांत दंगा आरंभिला. सन १७८६ त टिपूनें त्याजवर फौज पाठवून केंचव्वा व धोंडजी वाघ या दोघांसही पकडून श्रीरंगपट्टणास ठेविलें. सन १७९० त परशुरामभाऊचें लष्कर धारवाडावर चालून आलें, तेव्हां मला सोडाल तर तिकडे जाऊन परशुरामभाऊस अडवून धरतों असें टिपूस सांगून वाघानें आपली सुटका करून घेतली; आणि फौज घेऊन निघाला तो उलट परशुरामभाऊसच सामील झाला. पुढें त्या लष्करांत त्यानें मराठ्यांची चाकरी केली. भाऊच्या मदतीनें लक्ष्मेश्वर येथील कांचनगौडाचें वतन सोडवून घ्यावें असा त्याचा उद्देश होता. परंतु तो उद्देश पूर्ण न करितां परशुराम भाऊ पुण्यास निघून गेला, त्यामुळें वाघाची निराशा होऊन, त्यानें पटवर्धनांचे मुलखांत दंगा आरंभिला. हा त्याचा दंगा परशुराम भाऊचा मुलगा रामचंद्रपंत आपा यानें मोडून वाघास पिटाळून टिपूच्या मुलखांत घालविलें. पण तिकडेही त्यानें टिपूच्या बेदनूर प्रांतांत धामधूम सुरू केली. तेव्हां टिपूनें त्यास पुनः पकडून कैदेंत घातलें. टिपू मरे पर्यंत तो कैदेंतच होता. तेथें असतां त्यानें इस्लामाची दीक्षा घेतली. टिपूचें राज्य इंग्रजांनीं घेतलें, तेव्हां श्रीरंगपट्टणांत बंदीवान होते त्या सर्वांस त्यांनीं सोडिलें, त्यांतच धोंडजी वाघही सुटला. त्याबरोबर पुनः त्यानें जमाव करून इंग्रजांचे मुलखांत उपद्रव चालवून पैका मिळविला. त्याजवर इंग्रजांचीं पलटणें चालून आलीं, त्यांजपुढें निभाव न लागून सन १७९९ च्या पावसाळ्यांत धोंडजी वाघ तुंगभद्रेच्या उत्तरेस पटवर्धनांचे मुलखांत

लक्ष्मेश्वरास आला. तेथें बाळकृष्णपंत लागू म्हणून पटवर्धनांचा किल्लेदार होता, त्यानें त्यास निरुपायानें आश्रय दिला. त्याचे पाठीवर पेशव्यांचा सरदार धोंडोपंत गोखले हा तुंगभद्रेकडून लक्ष्मेश्वराकडे चालून येत होता, त्याजसीं बाळकृष्णपंत लागूनें आगाऊ संगनमत करून दोघांनीं मिळून दोहोंकडून त्याजवर एकदम छापा घातला. त्यांत वाघाची फौज नाश पावली: आणि तो स्वतः दहाबारा स्वारांनिशीं पळून कोल्हापुर हद्दींत आला. मनोळीच्या ठाण्यांत खंडेराव भोसले म्हणून कोल्हापुरचा अंमलदार होता, त्यानें वाघास आश्रय दिला. तेथें राहून वाघानें पुनः आपली जमवाजमव केली, आणि परशुराम भाऊ मारला गेला त्या संधीचा फायदा घेऊन त्यानें पटवर्धनांचे मुलखांत लुटालूट करून पैका मिळविला. पुढें करवीरास जाऊन तो महाराजांस भेटला. तेथें कांहीं काळपावेतों रत्नाकरपंत राजाज्ञा यास सामील होऊन त्यानें पटवर्धनांचा उच्छेद चालविला. नंतर धोंडोपंत गोखले पटवर्धनांच्या मदतीस करवीरचे बाजूस आल्यामुळें कर्नाटकांतील मुलूख मोकळा पाहून वाघ परत त्यांचे मुलखांत जाऊन दंगा करूं लागला. असा हा वाघाचा वृत्तान्त सन १७९९ अखेरचा आहे.

या वेळीं जनरल आर्थर वेल्स्ली+ टिपूचे राज्याचे बंदोबस्तास राहिला होता. वाघ आतां तुंगभद्रेच्या दक्षिणेस जाऊन दंगा करूं लागेल या भीतीस्तव पटवर्धनांच्या मदतीनें त्याचा बंदोबस्त करावा असा ग० ज० चा हुकूम से० वस्लीस झाला. तदनुसार वस्लीची फौज सन १८०० च्या उन्हाळ्यांत तुंगभद्रेच्या उत्तरेस वाघाचे बंदोबस्तास आली. तुंगभद्रा नदी म्हैसूर व मराठी राज्यांची हद्द होती. असें असतां नाना फडणिसाच्या मृत्यूबरोबर इंग्रजांच्या फौजा बेलाशक मराठी हद्दींत घुसलेल्या पाहून लोकांत नानाप्रकारचे तर्क चालू झाले. धारवाडचें मजबूद ठाणें ताब्यांत घेऊन तेथें आपला जम बसविल्यावर मग वाघाचे पाठीस लागावें असा वस्लीचा आशय होता. याचा अर्थ लोकवार्तेत असा झाला कीं, पटवर्धनांनीं करवीरकरांचा सूड घेण्याकरितां ही इंग्रजांची मदत आणिली. इंग्रजांची व पटवर्धनांची जानपछान सन १७९२ सालापासून होतीच. पटवर्धनांचा मामलेदार बाळकृष्णपंत लागू व त्याचा हस्तक आप्पाजी भगवंत रानडे* हे वस्लीस आणण्यास हरिहरावर सामोरे गेले. 'इंग्रजांचीं आठ पलटणें तुंगापार होऊन हावनूर येथें आलीं. विष्टाप्पा बदामीकर याच्या विद्यमानें बाळकृष्णपंतानें दोन लाख रुपये वस्लीस देण्याचें कबूल करून त्याच्या मदतीनें सावनूर प्रांत सोडवून घेण्याचा करार केला. हरिपंत बाबास वस्लीचें पत्र

\+ ग० ज० चा भाऊ. * न्यायमूर्ति महादेव गोविंद रानडे यांचे पणजे.

आलें कीं, तुम्हीं कृष्णापार न होतां इकडे यावें, आपण उभयतांनीं वाघाचें पारिपत्य करूं; आपलीं ठाणीं बसवून मग थोरलें राजकारण कोल्हापुरचें आहे त्यास मदत करूं,” (२९-६-१८००). या पत्रा वरून पटवर्धन करवीरकरांची वाट लावणार अशी आफवा उठली आणि त्या योगें पुण्यास पेशवे व सर्जेराव यांस चिंता उत्पन्न झाली. हिंदुस्थानच्या राजकारणांतील ही अगदीं आणीबाणीची वेळ असून वेल्स्ली बंधू एकमेकांच्या विचारानें मराठ्यांवर आपली सत्ता स्थापण्याचें संधान करीत होते. कोल्हापुरास गेलेलीं सिंद्यांचीं पलटणें अजून पटवर्धनांचे हद्दींत सर्जेरावानें ठेविलीं होतीं, त्यामुळें पटवर्धनांचें लक्ष वाघाच्या शिकारीपेक्षां पुण्याच्या घडामोडींकडे जास्त होतें. मे महिन्याचे अखेरीस वाघानें मोर्चे लावून डंबळचें ठाणें काबीज केलें. तेथून तो सावनुरास गेला. त्या ठिकाणीं वासुदेव काका पटवर्धन शीळकर बंदोबस्तास होता. त्याचा व वाघाचा पूर्वीचा स्नेह असून वाघानें गोडगोड थापा मारून वासुदेव काकाचा विश्वास संपादन केला; आणि काकानें त्यास पिराचा नवस फेडण्याच्या निमित्तानें चार माणसांनिशीं सावनुरांत घेतलें. आंत प्रवेश मिळतांच वाघानें आपलें खरें स्वरूप प्रगट केलें. वासुदेव काकास कैद करून त्यानें सावनूर व त्याखालील अकरा महाल आपल्या ताब्यांत घेतले, ( ता. ११-६-१८०० ). तेथून तो धोंडोपंत गोखल्यावर हुबळीपावेतों चालून गेला. इंग्रजांच्या हालचालींची इत्थंभूत बातमी त्यास कळत होती. पटवर्धन, इंग्रज व गोखले यांच्या फौजा एकत्र होण्यापूर्वी एक एकास वेगळे गांठण्याचे इराद्यानें वाघ हुबळी सोडून एकदम कित्तुरावर आला. कित्तूर येथें गोखल्याचा मुक्काम होता. हुबळीच्या पश्चिमेस हल्याळ येथें इंग्रजांचीं पलटणें आलीं होतीं. त्यांस जाऊन मिळण्यासाठीं प्रथम चिंतामणराव पटवर्धन तिकडे निघाला, आणि मागाहून धोंडोपंत गोखलेही ता० २८ जून शनिवारीं मध्यरात्रीस कित्तूर सोडून हल्याळकडे चालूं लागला, तो रविवारीं दोन प्रहरचे सुमारास एका ओढ्यावर आला. मागाहून तोफा येत होत्या, त्या येईपर्यंत ओढ्याचे कांठींच विश्रांति घेण्याचें त्यानें ठरविलें. वाघ त्याचे पाळतीवर होता. त्यानें दहा हजार फौजेनिशीं तिसरे प्रहरीं एकदम येऊन गोखल्यावर झडप घातली. त्या वेळीं थोडीच पण निकराची चकमक उडून तींत आप्पा गोखले ठार झाला, आणि धोंडोपंत व बापू जखमा लागून जीव बचावून पळून गेले. गोखल्याची सर्व तुकडी वाघानें कापून काढिली. या प्रसंगाची बातमी इंग्रजांस पोंचून ते मदतीस निघाले, पण ते येण्यापूर्वीच अस्तमान झाला, आणि वाघ लगेच आल्या वाटेनें पळून गेला. गोखल्यांच्या व इतरांच्या जखमांस

इंग्रजांनीं औषधोपचार केले. चिंतामणराव पटवर्धन अगोदरच जाऊन इंग्रजांस मिळाला होता, तो ही बातमी कळतांच गोखल्यांचे मदतीस धावून आला, पण वाघ त्यांस सांपडला नाहीं. गोखल्याची अशी राळ वाघानें उडविली त्यावरून त्याची प्रतिष्ठा लोकांत अतोनात वाढली. त्या प्रदेशांतले लहान मोठे लोक वाघास सामील होते. विरुद्ध पक्षाच्या हालचालींवर पूर्ण लक्ष ठेवून त्या बातम्या वाघास ते बिनचूक पोंचवीत असत. पाळत राखण्याच्या या सावधगिरीनेंच वाघ इतकीं वर्षें मोठ मोठ्या फौजांस चकवूं शकला. बातमी म्हणजे अर्धे युद्ध होय, असें से० वस्ली वारंवार म्हणे त्याचें उत्कृष्ट उदाहरण हें वाघाचेंच आहे. वाघानें लगोलग हुबळी पावेतों आपलीं ठाणीं घालून पुढें बेळगांवकडे रोख धरला.

से० वस्लीस घेऊन बाळकृष्णपंत ता. १४ जुलई रोजीं कुंदगोळावर आला, आणि तें ठाणें घेऊन त्यानें बाळकृष्णपंताच्या स्वाधीन केलें. तेथून फौजेचा बंदोबस्त करून, तो हुबळीच्या बाजूस वाघाचे पाठलागास निघाला. निघतांना त्यानें असा जाहीरनामा प्रसिद्ध केला कीं, वाघाचें शीर जो कोणी कापून हजर करील त्यास हजार रुपये बक्षीस देऊं.

चिंतामणरावाच्या पत्रांत व त्यानें लिहिलेल्या वाक्यांत वाघाच्या स्वारीची हकीकत संपूर्ण व सुसंगत असून, तिच्या आधारानें ही वाघाची मोहीम अभ्यासकांनीं नकाशा पुढें ठेवून ध्यानांत आणली पाहिजे. ता. २·८·१८०० रोजीं चिंतामणराव लिहितो. “ पंधरा दिवस हल्ल्याळांत होतों. जखमा शेजेस आल्यावर तेथोन निघोन बापू गोखले सुद्धां प्रथम धारवाडास व तेथून हुबळीस आलों. तेथें चार दिवस पर्जन्यास्तव मुक्काम करून शिरहट्टीस जाऊन इंग्रजांस सामील झालों. तेथून इंग्रज सुद्धां डंबळास गेलों. इंग्रजांनीं हल्ला करून डंबळ घेतलें व तीन चारशें माणूस कापून काढले. ठाण्याचा बंदोबस्त करून गदगास आलों. तेथील बंदोबस्त केला, तों वाघ सौंदत्तीवर असून मनोळीवर मलप्रभा नदी उतरून उत्तरेस जाणार अशी बातमी आल्यावरून आम्ही मनोळी नजीक आलों. इतक्यांत धोंडजी कांहीं जमावानिशीं बदामीच्या सुमारें गेला; आणि कांहीं फौज व पेंढार कित्तूरचे रोखें गेले. त्याचे बुणगे थोडे पलीकडे उतरून गेले. दोन तीन हजार अलीकडे सांपडले ते लुटले. तेथून कूच करून आज आम्ही दोदवाड येथें आलों. नदींत नाव भरून येत होती तिजवर तोफा लागू करून नाव बुडविली. मनोळीस नदी पलीकडून इंग्रजांनीं तोफा लाविल्या आहेत. पुढें इंग्रजांचा मुक्काम सौंदत्तीवर झाला. वाघ बदामीकडे गेला होता, त्यानें हरिपंत-

बाबाकडील बुणगे नदीअलीकडे येणार होते, त्यांजवर तोंड टाकून काल या मार्गे येऊन कित्तुराकडे गेला.* त्याचे पाठीवर जायचें तों निजामाची फौज सौंदत्तीचे मुक्कामीं इंग्रजांचे मदतीस आली, त्यांच्या भेटीसाठीं आज मुक्काम झाला. उद्ईक वाघाचे पिच्छावर जाणार. वस्लीचें सामान फक्त चाळीस तोफा व पन्नास हत्ती असें आहे. तोफांस घोडे जुंपतात व आघाडीस ठेवून शिस्तीनें चालतात. हल्लेस अथवा ल्ढाईस वस्ली आघाडीस चालतो. एक होनगल ठाणें मात्र इकडे स्वाधीन नाहीं. ”

ता. ६ ऑगस्ट रोजीं वाघ खानापुराजवळ मलप्रभा उतरून अलीकडे येणार होता, परंतु तेथून मलप्रभेच्या उगमास नदी उतरून सामानगडच्या रोखें शहापुर नजीक गेला. बरोबर फौज दहा हजार पर्यंत आहे. पाठीवर इंग्रज व आपल्या मिळून २५ हजार फौजा आहेत. करवीरकरांनीं घाबरून इंग्रजांकडे वकील पाठविला, तो इंग्रजांस बोलतोः ‘ आम्ही वाघास आश्रय देत नाहीं. पटवर्धनांचा आपला सल्ला करून द्यावा. ’ गनिमी काव्याचे दौडीनें वाघ पाठलाग करणारांच्या हातावर तुरी देऊन धुमाकूळ मांडीत चालला. तेणें करून मसलत लांबून पाठलाग करणारे टेकीस आले. तेव्हां वस्लीनें सर्वांचे विचारानें पाठलागाची भरपूर योजना नक्की केली. एकंदर फौजेचे तीन भाग बनवून तिघांनीं समांतर रेषेनें एकमेकांशीं पांच कोसाचे अंतरानें संधान ठेवून पश्चिमेकडून पूर्वेकडे वाघास चेपीत न्यावयाचें. मधली टोळी वस्लीनें आपल्या हाताखालीं घेऊन घटप्रभा व मलप्रभा या नद्यांचे मधून जावें; दुसरी टोळी केपर ( Skipper ) व पटवर्धन यांची. यांनीं मलप्रभेच्या दक्षिण तीरानें जालीहाळचे रोखें जावें; आणि तिसरी टोळी इष्टेवेसण ( stevenson ) याचे हाताखालीं निजामाचीं पलटणें घेऊन कृष्णेच्या कांठानें जावयाची. तीन्ही टोळ्यांचे मुख्य अंमलदार इंग्रज होते. ते धरून एकंदर इंग्रज अंमलदार अकरा असामी होते. श्रीरंगपट्टण कडील साहित्य घेऊन विष्टाप्पा बदामीकर बरोबर होता. ‘ इंग्रज सर्व मसलत सायंकाळचे मेजावर करतात. सर्वांभ्य कारभारी आग ( Hog ) साहेब आहे. ’ ( खरे–ले. ५७५५ व ५७५९ ). वस्लीची ही व्यवस्था ओळखून वाघ मलप्रभेचा कांठ सोडून पूर्वेकडे कृष्णा तुंगभद्रेच्या दरम्यान रायचूर दुआबांत शिरला. मागून त्याचा पाठलाग व्यवस्थित प्रकारें झाल्यानें, झुकांडी देऊन भलतीकडे निघून

*ही सर्व मोहीम मलप्रभा नदीचे कांठची आहे. भर पावसाळ्यांत वाघ ही नदी पाहिजे तशी बिनहरकत उतरून जात होता. सौंदत्ती मलप्रभेच्या दक्षिणेस व मनोळी उत्तरेस आहे.

जाण्यास त्यास अटकाव होतांच ता. १०·९·१८०० रोजीं याची इतिश्री झाली· तो प्रकार असा.

' मलप्रभा नदीचे उगमाकडून वाघ गोकाक परगण्यांत येऊन दहा हजार फौजे-निशीं नदीपार होण्याकरितां कौतालभनूरकडे गेला. त्याचे पिच्छावर इंग्रज व पटवर्धन जालीहालजवळ नदीपार झाले. तेथून स्टिव्हन्सन्‌ची टोळी कृष्णातीरानें पूर्वेकडे पाठलागास गेली. दुसरी पटवर्धन व गोखले यांची टोळी आठ दहा कोसांचे अंतरानें निघाली; आणि दक्षिणेकडून कनकगिरीच्या सुमारें वस्ली स्वतः गेला. फौजांची दाटी पाहून, वाघ सहा हजार फौजेनिशीं सडा होऊन, पटवर्धन व गोखले यांचे टोळीवर छापा घालण्याचे बेतानें भनूर येथें आला. सर्व टोळ्यांची बातमी त्यानें चांगली राखली होती. केपरचें पायदळ मागें टाकून मराठे व निजाम पुढें वाहून आले आहेत, हें वर्तमान त्यास समजतांच त्यांचा फन्ना पाडण्यासाठीं वाघ उलटून एक मजल मागें आला. ता. ९ रोजीं त्याचा मुक्काम भनूर जवळ नंदीहाल येथें पडला. त्या ठिकाणीं त्याच्या लष्करांत दंगा झाल्यामुळें त्यास हालतां आलें नाहीं. ही त्याची स्थिति वस्लीस बिनचूक कळत होती. ७ तारखेस वस्ली कनकगिरीस होता. तेथून पायदळ पलटणांस मागें टाकून फक्त दोन हजार घोडेस्वार व आठ तोफा बरोबर घेऊन झपाट्यानें चाल करीत वस्ली बसवापुर येथें आला. नवव्या तारखेस आणखी बारा कोसांची मजल मारून सायंकाळीं वाघाच्या मुक्कामापासून सहा मैलांवर यापलपरवी येथें राहिला. वाघ रात्रीसच पळून जातो कीं काय या धसक्यामुळें वस्लीस रात्रभर चैन नव्हतें. वाघाच्या लोकांनीं पैशाकरितां धरणें धरलें, याचें कारण त्याच्या फौजेंतल्या सर्व पुढाऱ्यांस इंग्रजांनीं व मराठ्यांनीं पैसे भरून फितविलें होतें. शेवटच्या प्रसंगांत त्याजजवळ हजार पांचशेंच लोक राहिले. बाकीचे अगोदरच त्यास सोडून गेले होते. वस्ली जवळ आल्याची बातमी त्यास कळली नाहीं. पहाटेसच कूच करून सूर्योदयास वस्लीनें भन्नूर* येथें वाघास गाठलें. तो लगेच तयार होऊन लढाईस उभा राहिला. लढाईत तीन गोळ्या लागून वाघ ठार पडला. फौज उधळून गेली. बाळकृष्णपंत लागू, वासुदेवपंत काका व विठोपंत बदामीकर यांनीं वाघाचा मुर्दा ओळखून घोड्यावर घातला. मुर्दा पाहून वस्लीस बहुत खुशी झाली. रायचूरच्या सरहद्देंत नंदीहाळनजीक २० रबिलाखरीं वाघ ठार झाला. ६०० पर्यंत त्याचे लोक कत्तल जाहले. मरणसमयीं त्याचें वय साठीच्या आंत बाहेर होतें. पाठलागांत त्याची कलावंतीण व भाची दोघी सांपडल्या.

* रायचूरचे थेट दक्षिणेस तुंगभद्रेच्या उत्तर कांठापासून थोड्याच मैलांवर.

त्यांचा वस्लीनें बंदोबस्त करून दिला. धोंडजी वाघाचा पुढें एक तोतया उत्पन्न झाला तो रायचूर दुआबांत धुमाकूळ करीत असतां सन १८०३ च्या डिसेंबरांत जनरल कँबेलकडून मारला गेला. वाघाचा चार वर्षांचा मुलगा सलाबतखान वस्लीस सांपडला, त्याची व्यवस्था त्यानें श्रीरंगपट्टणास करून दिली. हा मुलगा सन १८२२ सालीं महामारीनें मरण पावला.

वाघाच्या मोहिमेचें निमित्त करून से० वस्लीनें मराठी राज्याचा दक्षिण भाग बारकाईनें पाहून घेतला. याचा त्यास पुढें पुष्कळ उपयोग झाला. म्हैसूरचा दिवाण पूर्णय्या हा हरएक प्रकारें वस्लीचें साह्य करीत हरिहर येथें येऊन राहिला होता. प्रचंड फौजा घेऊन मराठी राज्यांत इंग्रज घुसले, त्यास त्या वेळीं वाघाचें निमित्त फारसें कोणास पटलें नाहीं. त्या संबंधानें कैक दिवस अनेक तर्कवितर्क लोकांत चालू होते; आणि त्यांत लॉर्ड वेल्स्लीच्या चढाऊ धोरणाचें पूर्ण प्रतिबिंब उठलें होतें. पुणें येथें दौलतरावास इंग्रज फौजांची ही स्वारी अत्यंत असह्य वाटली. बाजीरावास तर दुहेरी पेंच पडला. वाघास उघड आश्रय देण्याचें धाडस त्यास नव्हतेंच, परंतु इंग्रजांचें साह्य करणेंही त्यास पसंत नव्हतें. तथापि भित्रेपणानें गोखले पटवर्धनांस इंग्रजांचें साह्य करण्याचे हुकूम त्यानें दिले होते. इंग्रजांसंबंधानें खालील प्रकारची टीका त्या वेळीं सर्वतो मुखीं ऐकूं येत होती. ‘इंग्रजांचीं पलटणें व सामान मलापहारी दक्षिणतीरास येऊन करणेलास मिळालें. दिवसेंदिवस सामान भारी येत चाललें. वाघाचा पाठलाग करितात, परंतु सहा कोसांजवळ आला म्हणजे दोन चार मुक्काम करितात. वाघ पुढें गेला म्हणजे फिरोन पाठलाग करितात. जांबोटीच्या जवळ वाघ होता तेव्हां इंग्रजांनीं कित्तुरावर नऊ मुक्काम केले. वाघ गोकाकहून यादवाडाकडे गेल्यावर हे मलापहारी नदी उतरले. पोटांतून बुद्धि दुष्ट दिसते; पल्ला दूरचा भासतो. वाघानें पुढें चालावें हाच त्यांचा बेत आहे. पुढें पुण्यापावेतों जातात काय पहावें. दिवसेंदिवस नवीन जागा साधित चालले आहेत.’

वाघाची मोहीम हें से० वस्लीच्या स्वतंत्र पराक्रमाचें पहिलें कृत्य होय. तें स्वीकारतांना इंग्रजांस मोठी दहशत अशी पडिली होती कीं, जर वाघास पेशव्यांचे राज्यांत आश्रय मिळाला आणि पेशव्यानें त्यास काढून दिलें नाहीं, तर आपणांवर कठिण प्रसंग येणार, आणि कदाचित् पेशव्यांशीं व मराठमंडळाशीं एकदम युद्ध प्रसंग उद्भवणार. उलट पक्षीं वाघाच्या दंग्यामुळें त्यांचें नवीन जिंकलेलें म्हैसूरचें राज्य सुव्यवस्थित चालेना. ह्या मोठ्या पेचाचें निराकरण करून वाघाची मोहीम यशस्वी

करून दाखविल्यामुळें वस्लीची प्रतिष्ठा अतोनात वाढली. लोकांच्या मनांत त्याच्या युद्धनैपुण्याबद्दल व नेकीच्या वर्तनाबद्दल अत्यंत आदर उत्पन्न झाला. दक्षिणेंतील प्रदेशाची त्यास चांगली माहिती झाली. पटवर्धन, गोखले तसेच ठिकठिकाणचे देसाई व पाळेगार यांच्यांशीं त्याचा स्नेह जमला. हा गृहस्थ मनांत आणील तें सिद्धीस नेईल अशी भावना देशांत उत्पन्न होऊन पुढें त्याच्याशीं सामना देण्यास मोठमोठे सरदार कचरूं लागले. वाघाची शिकार करणें सुलभ नाहीं, त्यास तशाच तऱ्हेची जंगी तयारी पाहिजे, ही गोष्ट मनाशीं पूर्ण ठरवून भरपावसाळ्यांत नदीनाल्यांच्या व जंगलांच्या दुर्गम प्रदेशांत शेंकडों मैल पावेतों कमालीचे कष्ट करून से० वस्लीनें ही वाघाची मोहीम सिद्धीस नेली. हा त्याचा पराक्रम हिंदुस्थानच्या इंग्रजी इतिहासांत अत्यंत संस्मरणीय गणला जातो. याच यशाच्या जोरावर या पुरुषानें वसईच्या तहानंतर मराठ्यांस जिंकून इंग्रजांची सार्वभौम सत्ता या देशावर प्रस्थापित केली. वाघाच्या मोहिमेचें तपशीलवार ' वर्णन चिंतामणरावाचा वाका ' यांत पहावें.

**२ बाजीरावानें पामरास तोंडघशीं पाडिलें.**—( आगस्ट-ऑक्टोबर सन १८०० ). बाजीरावानें सिंद्यास पुण्यांतून घालवून आपल्याकडे मदतीची याचना करावी अशी टोंचणी त्यास लॉर्ड वेल्स्लीनें पामराचे मार्फत लाविली; आणि पामरानें त्या बाबतींत शिकस्तीचे प्रयत्न सुरू केले. परंतु बाजीराव त्यास दाद देईना. सिंद्याच्या पल्टणांनीं बाळोबातात्यास विश्वासघातानें पकडिलें, तेव्हां पलटणांच्या युरोपियन अम्मलदारांस पामरानें सडकून दोष दिला. सर्जेरावास दिवाणगिरी न देतां ती अमृतरावास द्यावी अशी खटपट पामरानें बाजीरावाकडे सारखी चालू ठेविली होती. बाळोबातात्यास मुक्त करण्याबद्दल सुद्धां पामराचा आग्रह होता. कोणीकडून मराठी राजकारणांत आपलें बोट शिरकविण्याची तो शिकस्त करीत होता; आणि ही त्याची खटपट बाजीराव चांगली ओळखून होता. पामराच्या डोळ्यांत सिंद्याचीं पल्टणें खुपत होतीं. परशुरामभाऊच्या मृत्यूनंतर सर्जेरावाचे आग्रहावरून तुंगभद्रा नदी पावेतोंचा कर्नाटकांतील सर्वच पटवर्धनी प्रदेश आपल्या खर्चासाठीं सिंदे मागूं लागला. इतकेंच नव्हे तर तुम्हीं हा मुलूख बऱ्या बोलानें न दिल्यास आम्ही तो जबरदस्तीनें घेणार अशी सर्जेरावाची भाषा स. १८०० च्या पावसाळ्यांत बाजीरावाकडे चालू झाली. त्यावरून बाजीराव इतका संतापून गेला, कीं हा कदाचित् कोठें पळून जाईल म्हणून त्याला अटकाव करण्याच्या इराद्यानें सिंद्याच्या फौजांचा सक्त पाहारा शनिवारवाड्या सभोंवार कैक महिने खडा होता. यावर तोडगा म्हणून वाघावर चालून आलेल्या से० वस्लीच्या

फौजेचा उपयोग करावा, असा विचार बाजीरावानें मनांत आणिला. प्रत्यक्ष लेखांत न गुंततां त्यानें वकिलामार्फत पामरास अशी सूचना केली कीं, 'हाल्लीं राज्यांत चोहोंकडे सिंद्याचें वर्चस्व झालें असून त्यांचा जाच आतां आम्हांस सहन होत नाहीं. कदाचित् आम्हांस कैदेंत बसवून दुसरा नवीन पेशवा येथें बसविण्याचा त्यांचा इरादा दिसतो. अशा रीतीनें आमचे सर्वांचेच प्राण धोक्यांत आहेत. तर यास कांहीं उपाय सांगा.' या सूचनेनें पामरास अत्यंत खुशाली झाली. त्यानें लगेच बाजीरावास कळविलें, कीं आम्हीं लॉर्ड वेल्स्लीस लिहून ताबडतोब सिंद्याचा बदोबस्त करितों. त्याच बैठकींत पामराच्या सल्लयानें बाजीरावाच्या बचावासाठीं एक गुप्त मंडळ बनविण्यांत आलें. या मंडळाचें प्रमुख पद अमृतरावाकडे असून, बाळोजी कुंजर, सदाशिव माणकेश्वर, गोपाळराव मुनशी, सैयद बडेखान वगैरे कित्येक गृहस्थ त्यांत होते. यांनीं फौज चाकरीस ठेवून इंग्रजांची कुमक करावी, आणि इंग्रजांची फौज वाघावर बेळगांवपर्यंत चालून आली होती, तिलाच पुढें बोलवावी, असा विचार ठरला. फक्त या संबंधानें कलकत्त्याचा हुकूम आला पाहिजे तो ताबडतोब आणविण्याची जबाबदारी पामरानें स्वीकारली. तदनुसार से० वस्लीस कलकत्त्याचा हुकूम आला, कीं वाघाची मोहीम पुरी झाल्यावर तुम्हीं परत न जातां जवळच सोईच्या जागीं युद्धासाठीं तयार राहवें, आणि बाजीरावास सिंद्यानें प्रत्यक्ष कैदेंत बसविलें अगर तो होऊन पुण्यांतून पळून गेला, म्हणजे या दोहोंपैकीं कोणतीही एक गोष्ट घडली तरी तुम्हीं एकदम पुण्यावर चाल करून जावें. असा हुकूम कलकत्त्याहून ता. २८.८.१८०० रोजीं वस्लीस पोंचला; आणि त्यानंतर लगेच १० सेप्टेंबरास वाघाची इतिश्री झाली. वस्लीनें हा हुकूम अगदीं गुप्त ठेविला होता. मनांतील उद्देशाचा थांग त्यानें कोणासही लागूं दिला नाहीं. जरूर पडल्यास पटवर्धनांची मदत आपणास असावी म्हणून त्यांस तो विशेष गोंजारूं लागला. कनकगिरीहून वस्ली कोपळास आला, त्या ठिकाणीं बापू गोखले व चिंतामणरावआपा यांनीं परत जाण्यास त्याचा निरोप घेतला, त्या वेळीं जवळच कोठेंतरी असा, फारसे दूर जाऊं नका, असा कानमंत्र त्यानें त्यांस कळविला. हरि परशराम तर वस्लीबरोबरच राहिला. पुढें ३ ऑक्टोबर रोजीं परत जाण्याचें ढोंग करून वस्ली हुबळीस आला. पटवर्धनांचा कारकून रामचंद्रपंत आप्पास लिहितो, 'इंग्रजांचे मसलतीचा उद्योग दीर्घ दिसतो. वरचेवर जमियत मिळतच आहे. माघारी जाण्याचा रंगच नाहीं. उमेद पुढेंच आहे. मसलत समजूं देत नाहींत. करवीरचें पारिपत्य करतील, पुढें सरकारचे दौलतीवर तोंड टाकतील, या अपेशास आपण कारण होऊं नये. श्रीमंतांचे

राज्यास इंग्रजांनीं अपाय केला तर आपण राज्य बुडविलें, आणि इंग्रजांचे घरांत घातलें असें होईल. आपलें तरी त्यांत कल्याण इंग्रज करतील असें होणार नाहीं. तर वडिलीं या खटपटींत अगदीं पडूं नये.' निजामअलीचा दिवाण सिंद्याची खोड मोडण्यास टपला होता, त्यास गव्हर्नर जनरलाची सूचना जाऊन निजामाची फौज परिंडा व राक्षसभुवन येथें जमा झाली. इतकें हें बुजगावणें कोठेंही शब्दांत न गुंततां केवळ कपटजालाच्या सामर्थ्यावर बाजीरावानें सिंद्यास भिवविण्यासाटीं परभारें उभें केलें. आपण अगदीं नामानिराळा राहिला.

सिंदेबाजीरावांच्या कलहाचा देखावा बाहेरून कितीही दिसला, तरी दोघांचें अंतर्याम सर्वथा एक होतें. 'श्रीमंतांचा लोभ दौलतराववावांचे जागां फार. २२ जमादिलावलीं ( १२.१०.१८०० ) श्रीमंतांची स्वारी सिंद्याचे गोटास गेली. शहराबाहेर जातांच सर्व लवाजमा मागें ठेवून फक्त पाच असामींनिशीं भेटीस गेले. सिंदे निजले होते. त्या ठिकाणीं बाजीराव दाखल होतांच जलदीनें उठोन मुजरा केला. घटकाभर खावंद व सेवक यांचे हास्यविनोद झाले. नंतर दौलतरावांस मेजवानीस बोलावून त्यांस आपले बरोबरच घेऊन गेले. एका अंबारींत उभयतां श्रीमंत व मागें दौलतराव चवरी ढाळीत सूर्यास्तीं स्वारी पुण्यास आली. रात्रीं मेजवानी होऊन सिंदे आपल्या गोटास गेले.' हा देखावा पाहून पामर किती थिजून गेला असेल याची कल्पना करावी ! नाहीं झाला बाजीराव कैद, कीं नाहीं गेला तो पळून. तिकडे हुबळी येथें वस्लीची मात्र फार ओशाळगत झाली. सिंद्याचीं कांहीं पलटणें कृष्णेच्या दक्षिणेस पटवर्धनांचे मुलखांत आलीं होतीं, त्यांचा चक्काचूर उडविण्याकरतां से० वस्लीचे हात वळवळत असतां त्यास बाजीरावाकडून अवचित सूचना आली कीं, 'वाघाची स्वारी संपली, आतां तुम्हांस आमचे मुलखांत राहण्याची गरज नाहीं.' तेव्हां वस्लीस तोंडांत मारल्यासारखें होऊन परत फिरावें लागलें. इकडे सिंद्याची खात्री झाली कीं, आपण पटवर्धनांचा मुलूख मागितला, म्हणून त्यांनींच इंग्रजांस आपणाशीं सामन्यास आणिलें; आपण मागतों तो मुलूख इंग्रजांच्या व म्हैसूरकरांच्या हद्दीस लागून आहे, त्यांस आपला शेजार बिलकूल खपत नाहीं; पटवर्धन आपल्याशीं वांकडे, त्यांस इंग्रजांचें पाठबळ, तेव्हां त्यांचा मुलूख बाजीरावानें आपणास कागदावर लिहून दिला, तरी पटवर्धन आपणांस त्यांत नादूं देणार नाहींत. कदाचित् त्या कामासाटीं आपण थोडीं पलटणें मागें ठेवून दिलीं तरी त्यांस आपण दूर गेल्यावर इकडे त्राता कोण ? त्यांतून बाजीरावाची या गोष्टीस

मनापासून अनुकूलता नाहीं. असा पोक्त विचार करून सिंद्यानें आपले हात आवरले, आणि कर्नाटकांतील मुलखाची मागणी सोडून दिली. नर्मदेच्या उत्तरेकडील त्याचें राज्य बहुतेक नष्टप्राय झालेंच होतें. सिंद्याचे दौलतीस दुसरा धनि करण्याचे विचारांत बाया होत्या. यशवंतराव होळकरानें सिंदेशाहीस ग्रासलें होतें. अशा स्थितींत बाजीरावापाशीं गट्टी जमवून ता. २९.१०.१८०० रोजीं सिंद्यानें बाजीरावाचा निरोप घेऊन पुण्यांतून पाय काढिला.

बाजीरावाची बतावणी मात्र सोळा आणे वठली. पामरानें से० वस्लीस कळविलें, 'बाजीराव फार लबाड आहे. त्यानें आम्हांस फसविलें. तो जन्मभर असाच सर्वांस फसविणार.' अशीं पत्रें येतांच ता. ३१.१०.१८०० रोजीं से० वस्ली हुबळी सोडून परत निघाला, तो तुंगभद्रा पार होऊन आणि जमलेली सर्व फौज दूर करून श्रीरंगपट्टणास जाऊन राहिला. केवढी ही चतुराई बाजीरावाची कीं त्यानें एका डावांत इकडे सिंद्यास व तिकडे इंग्रजांस साफ चकविलें. एवढ्या अकलेचा उपयोग राज्य बचावण्याकडे होता तर! पुढें दोन वर्षांनीं बाजीरावाचे हे खेळ त्याचेच गळ्यांत आले. *

**३ यशवन्तराव होळकर, पूर्वायुःक्रम.**—यशवन्तरावाचें एकंदर चरित्र साहसानें इतकें भरलें आहे कीं त्यास एक प्रकारची कादंबरीच म्हणतां येईल; आणि त्याच्या आयुष्यांतील नानाविध प्रसंगांची व आख्यायिकांची हकीकत एकत्र केल्यास त्यापासून मराठ्यांच्या कर्तबगारींत बहुमोल भर पडेल. मात्र हें प्रयासाचें काम आस्थेनें करणारे संशोधक पाहिजेत. 'ठगाची जबानी'सारखे ग्रंथ जर इतके प्रिय झाले आहेत तर त्याच्यापेक्षां जास्त अद्भुत प्रसंगांचे खरे घडलेले वृत्तान्त तत्कालीन स्थितीचे विशेष निदर्शक होतील यांत शंका नाहीं. यशवन्तरावाबरोबर होळकराच्या घराण्यांतले कित्येक लेकावळेही त्याच्याच तोडीनें पराक्रम गाजवितांना आढळतात. कुवर हरनाथसिंग, अचबेसिंग, भारमलदादा इत्यादि मंडळींचा उल्लेख यशवन्तरावाच्या हकीकतींत येतो, आणि त्यांस तो चिरंजीव असें लिहितो. यांचीं सुद्धां चरित्रें पुष्कळ अंशीं मनोरम वाटतील.+

* खरे; वेलिंग्टन खलिते, ओवेनकृत. + असे लेकावळे बहुधा त्या कालीं सर्व लहानथोर घराण्यांत होते. रक्षा ठेवण्याचा प्रघात सार्वजनिक असून त्यांची संतति कुटुंबांतल्याप्रमाणेंच वागे. इंदुरास या लेकावळ्यांची कुवर-आळी म्हणून एक स्वतंत्र भाग असून, पुण्यास सुद्धां सिंदे-आळी म्हणून पेशव्यांचे रक्षापुत्रांचा भाग काळेवावरांत अगदीं अलीकडेपर्यंत होता.

ता. १४.९.१७९७ रोजीं भांबुर्ड्याच्या मैदानावर मल्हारराव मारला गेल्यानंतर विठोजी व यशवंतराव जिवाच्या भीतीनें रानोमाळ भटकत गेले. मल्हाररावास पकडण्याबद्दल पांच लाख रुपये दौलतरावास देण्याचें काशीरावानें कबूल केलें होतें. ती रकम काशीरावाकडून येईना; तेव्हां शेख करीम फौजदार म्हणून दौलतरावाच्या कृपेंतला एक गृहस्थ होता, त्याजला दौलतरावानें काशीरावाजवळ धरणें धरण्यास ठेवून अतोनात जाच केला. तेव्हां बाळोबा तात्यानें दौलतरावाची समजूत घातली कीं, होळकरांस बुडविण्याचा हा प्रयत्न चांगला नाहीं. त्यांची दौलत बुडाल्यास आपली तरी कशी टिकेल? असा बुद्धिवाद करून शेखकरीम यास बाळोबानें तोफेच्या तोंडीं देवविलें; आणि दौलतरावासह काशीरावाचे गोटांत जाऊन उभयतांचें सौरस्य करून यशवंतरावाची समजूत काढण्याचा प्रयत्न मनापासून चालविला असतांच, त्याचें बस्तान बिघडून सर्जेरावाचा पगडा कारभारांत होऊन होळकरांचें प्रकरण पुनः विकोपास गेलें. यशवंतराव जो पुण्याहून निघाला, तो बापू विठ्ठल परभू नांवाच्या एका हुशार गृहस्थास हाताखालीं घेऊन जेजुरीस गेला. तेथें कुलस्वामीची पूजा वगैरे यथास्थित करून आणि तेथील पुजारी व गुरव यांच्या कडून कांहीं द्रव्य मिळवून तो नागपुरच्या रघूजी भोसल्याकडे आश्रयार्थ गेला. * तेथें इंग्रज रेसिडेंट कोल्ब्रुक होता, त्यानें यशवंतरावास सिंद्याचे विरुद्ध चिथविण्यास कमी केलें नाहीं. रघूजीनें त्यास आपले पदरीं ठेविलें. हें वर्तमान बाजीराव व दौलतराव यांस कळतांच त्यांनीं रघूजीस धमकीचीं पत्रें लिहिलीं, कीं यशवंतरावास कैद करून पुण्यास पाठवावें. त्याप्रमाणें रघूजीनें ता. ३०-१-१८०० रोजीं यशवंतरावास कैदेंत ठेविलें. यावरून मल्हाररावाच्या मृत्यूनंतर दोन वर्षें पावेतों यशवंतराव निराश्रित स्थितींत भटकत होता, हें उघड आहे. तो भोसल्यांच्या कैदेंतून मोठ्या कौशल्यानें सुटून नागपुरांतून निसटला; आणि गूरगांव येथें गुरु चिमणभाऊ याची गांठ व आशीर्वाद घेऊन चालल्यावर पुढें त्यास त्याच्याच सारखा धाडसी सहायक लाला भवानीशंकर कायस्थ हा गृहस्थ भेटला, आणि त्याच्यासह खानदेशांत येऊन सुलतानपुर नंदुरबार परगण्यांत कुंकरमुंडा येथें झुंजारनाईक भिल्ल याचे आश्रयानें थोडी जमियत तयार करून मुलखांत लुटालूट करीत हिंडत राहिला. त्याच्या पाठीवर इंदुराहून काशीरावाची फौज चालून गेली; तेव्हां नर्मदापार होऊन तो बडवाणी वरून धार येथें जाऊन आनंदराव पवार याज-

* खरे; हो. प. १-७०, ७१; भ. शं. रो.; मार्तंड,—देवास, भालेराव; खंड १०. ४९५—४९७.

पाशीं तीनशें स्वारांनिशीं चाकरीस राहिला. पण पवाराचा दिवाण रंगराव ओढेकर दौलतरावाचे पक्षांत होता, त्यानें यशवंतरावाचा जम बसूं दिला नाहीं. तथापि दोन वर्षांच्या आयुःक्रमांत त्याचें धाडस, शौर्य वगैरे सेनानायकाचे गुण लोकांत प्रसिद्ध होऊन त्याचा जमाव वाढत गेला. गनिमी काव्यानें मुलुखांत लुटालूट करून त्यानें द्रव्य संपादिलें, आणि त्यांतून जास्त फौज चाकरीस ठेविली. दौलतरावाचा सूड घेऊन सिंद्या-च्या बरोबरीनें होळकरांची दौलत पुनः उभी करावयाची, हा त्याचा कृतसंकल्प होता. अघटित घटना घडवून आणण्यांत यशवंतरावाचें कौशल्य अप्रतिम दिसून येऊं लागलें. धार येथें त्यास फार वेळ राहतां आलें नाहीं. दौलतरावानें पवारास धाक घातल्याबरोबर यशवंतरावास त्यानें आपल्या जवळून दूर केलें. तेव्हां तो माळव्यांतील सिंद्याचे मुलखांत लुटालूट करूं लागला. मल्हाररावाचा अल्पवयी मुलगा खंडेराव हा दौलतीचा मालक असून आपण त्याचा कारभार करणार, असें जाहीर करून त्यानें काशीरावावर युद्ध पुकारलें. होळकरांचे कित्येक जुने सरदार शामराव महा-डिक पिंपळे, बाळाजी कमळाकर वगैरे त्यास सामील झाले. पहिल्या मल्हाररावाची रक्षा हरकूबाई व लेकावळा भारमल्लदादा हे यशवंतरावाच्या आश्रयास आले. याच सुमारास बडगोदा गांवीं शिकारींत अपघातानें बंदूक सुटून त्याचा उजवा डोळा गेला. नंतर महेश्वरास येऊन त्यानें अहिल्याबाईचें द्रव्यभांडार फोडिलें, आणि तेथील द्रव्य घेऊन आपली एकंदर व्यवस्था थाटली. पैशाची व्यवस्था पाहण्यासाठीं विठ्ठल महादेव ऊर्फ तात्या जोग इंदूर येथील सरदार कीबे यांचा पूर्वज यास यशवंत-रावानें फडणिशीच्या कामावर नेमिलें. अशा रीतीनें यशवंतराव हा अल्पावकाशांत दौलतरावास नवीन प्रतिस्पर्धी उत्पन्न झाला.

ता.२२-३-१८०० चें वर्तमान. "यशवंतरावानें जाठाचा एक किल्ला हस्तगत केला. द्रव्य बहुत सांपडलें. फौजही हुशार. दीडशें दोनशें पर्यंत तोफा, पायदळ व स्वार मिळून पन्नास हजार. पुण्याकडे येण्याचा रोख आहे. भोसल्यांचीही कांहीं फौज बरोबर आहे. नानाच्या सूत्रेंकरून येत आहेत. बुंदेलखंडच्या सरदपर्यंत आल्याची बोलवा आहे." यावरून दक्षिणेंत नाना फडणीस मरण पावला, तेव्हां यशवंतराव चंबळच्या पलीकडे जाठांच्या मुलुखांत असून त्याचें तोंड दक्षिणेकडे वळलें होतें. "गोविंदराव बुळे येऊन भेटले. मीरखां पठाण यांजलाही पत्रें जलद यावयास गेलीं आहेत." पुढें दोन तीन महिन्यांत दौलतरावानें आपलीं कांहीं पलटणें यशवंत-रावावर रवाना केलीं. कारण 'सिंदे बाया दरकूच उज्जनीकडे जातात, त्यांच्या

मदतीसाठीं लखबा लाड उज्जनीनजीक आले. यशवंतराव इंदुराजवळ आहे. त्रिवर्ग एकजामां होणार. मसलत जड दिसते. यशवंतरावांनीं सिंद्यांच्या महालांत झाडून अम्मल बसाविला. मिळेल त्या रीतीनें मारून पैका घेतात. हिंदुस्थानांत मोठा बैदा झाला आहे. लखबा दादा, अलीबहादर, यशवंतराव व बाया सर्व एक विचारें होऊन दौलतरावास ठिकाण ठेविलें नाहीं." अशी स्थिति जून सन १८०० ची होती. पुढें त्या सालच्या दसऱ्यास बायांचा मुक्काम उज्जनीवर जाऊन त्यांचें संधान दिल्ली-पावेतों पोहोंचलें.

**४ सिंदे बायांची बुंदेलखंडांतील मोहीम, लखबा दादाचा शेवट** ( स. १७९९–१८०१ ).—लखबा लाड व उत्तरेंतील शेणवी सरदार यांच्या या पूर्वीच्या हालचाली दर्शविल्या पाहिजेत. उत्तरेंत उज्जन, मंदोसर, मेवाड, अजमीर, आग्रा, मथुरा, दिल्ली, ग्वाल्हेर हे सिंद्याचे मुख्य प्रांत असून त्यांचा बंदोबस्त लखबादादा आग्रयाचे किल्ल्यांत राहून पाहत असे. कवाइती फौजेचा मुख्य पेरॉन ऊर्फ पेरू साहेब होता. फौजेच्या खर्चाकरितां त्यास कांहीं प्रदेश तोडून दिलेला होता. त्याशिवाय बाहेरील व्यवस्था लखबादादाकडेच होती. दुसरा सरदार अंबूजी इंगळे हा मेवाड अजमीरचे कारभारावर होता, आणि जीवबादादाचा धाकटा चुलत-भाऊ जगंनाथ रामकृष्ण केरकर ऊर्फ जगोबा बापू हाही कांहीं फौज बाळगून लखबाचे जोडीस असे. खुद्द दक्षिणेंत जेव्हां बायांच्या भांडणानें व सर्जेरावाच्या कारभारानें दौलतरावाचे दरबारांत अव्यवस्था माजली, तेव्हां तिचा संपर्क उत्तरेंतही पोंचला. बायांनीं तिकडे आपला पेश चालविला; आणि खरें म्हटलें तर दौलतराव सर्जेरावांचे नवे नवे थेर जुन्या मंडळीस पसंत न पडून त्यांना बायांची होत असलेली आबाळ बिलकूल खपली नाहीं. पेरान वगैरे युरोपियन अधिकारी शिस्तींत जास्त मुरलेले असल्यामुळें ते दौलतरावासच ओळखीत. तथापि दौलतरावाचे हुकूमही वेळेनुसार वाटेल तसे सुटत, त्यामुळें कशाचा कशास मेळ नसे. सन १७९९ च्या आरंभीं लखबादादा व जगोबाबापू राघवगडाकडे फौज व पलटणें घेऊन गेले. तिकडे त्यांचें व इंगळ्यांचें वांकडें आलें. बाळोजी इंगळे व जगोबाबापू यांची लढाई होऊन इंगळ्याचा पराभव झाला व तो ग्वाल्हेरकडे मागें हटला. त्याचे पाठीस जगोबाची फौज लागली ( जानेवारी सन १७९९ ). ता ७-५-१७९९ रोजीं जगोबाबापू चितोडाहून लिहितो, 'आज पांच सहा महिने इंगळे व आम्हांशीं लढाई होत आहे. दोन चार लढायांत आमचीच फत्ते झाली. आतां सर्व मराठे एकत्र होऊन आम्हाशीं

लढतात. बेवीस रोज तोफांची लढाई होत आहे. तोफा सोडून बाहेर निघत नाहींत. बाहेर निघतील ते वक्तीं घोडे चालवून लुटून घेऊं. त्यांजकडे पलटणें पायदळ फार, स्वार थोडके. आम्हांकडे घोड्यावरील स्वार फार आहेत. आज दोन अडीच वर्षें बायांचे घोरामुळें दुसरें कांहीं सुचतच नाहीं. जीव जगतील कसे हीच अडचण.' ता. २३-७-१७९९ चें वर्तमान. 'जगोबा बापू व लखबा दादा यांचा मुक्काम उदेपुरानजीक आहे. वानवडीहून पागनीस यांनीं पिरू व अंबोजी इंगळे यांस पत्रें पाठवून पूर्ववत् प्रमाणें बापू व दादा यांजकडे हिंदुस्थानचे मुखत्यारींचें काम सांगितलें आहे. अंबोजी इंगळ्याचें पत्र लखबास आलें आहे कीं, 'आपसांत लढावें हें ठीक नाहीं. मी एका स्वारानिशीं आपले भेटीस येतों.' पुढें ता. २५-११-१७९९ चें पत्र. 'जगोबा दादा व लखबा दादा उज्जनीस आहेत. माळव्याचा बंदोबस्त झाल्यावर बापू उज्जनीस राहून दादा कोट्याकडे जातील. मथुरेकडे अंबोजी इंगळा व पिरू एक होऊन रान फिरलें आहे. चाळीस वर्षांच्या आम्हांकडील मामलती दूर कराव्या, आम्हांस गिरफदारींत आणावें, आमचा टिकाव न व्हावा, हें त्यांच्या मनापासून आहे. इंगळे व पिरूसाहेब दौलतरावबाबाकडून सनदा आणवून आग्रयाचा किल्ला खालीं करीत होते. हें वर्तमान कळतांच बापू व दादा फौज घेऊन गेले.'

काशीराव होळकर दौलतरावचे तंत्रानें वागे हें यशवंतरावास अत्यंत दुःसह झालें. म्हणून त्यानें दौलतरावाचे जागीं दुसरा मालक सिंद्याचे दौलतीस करण्याचा विचार बायांचे मार्फत चालविला. बाया ब्ऱ्हाणपुराहून नर्मदेवर आल्या, तेव्हां यशवंतरावानें शामराव महाडिक यास त्यांच्या भेटीस पाठविलें. बोलणें होऊन दरकूच इंदुराजवळ घेऊन आले. तेथें यशवंतरावाच्या व त्यांच्या भेटी झाल्या. बायांनीं बोलणें केलें कीं, तुम्ही आम्हांस अनुकूल असावें, उज्जयनीस पोहोंचतांच दरमहा खर्चास देऊं. परस्परें बेलभंडार होऊन स्वाऱ्या उज्जयनीस आल्या. तेथून बायांनीं लखबा दादास पत्रें पाठवून बोलाविला. त्यांचीं पत्रें आलीं कीं, आम्ही येईपर्यंत होळकरांशीं कायम करार करूं नये. ही बातमी यशवंतरावास कळतांच त्यानें बायांची भेट घेऊन विचारिलें, त्यांत त्यांचीं बोलणीं चढाचीं पडलीं. त्यावरून 'तुम्हांस कळेल तें तुम्हीं करावें, आम्हांस कळेल तें आम्हीं करूं', असें बोलून यशवंतराव पानसुपारी न घेतां निघून गेले. बायांनीं आपला तळ बाहेर दिला. लखबादादा आल्यावर जड पडेल असें वाटून होळकरानें पहांटेच बायांच्या तळावर छापा घालून फौज लुटून घेतली. बाया सड्या निघून लखबाकडे गेल्या. "कार्तिक

शुद्ध पौर्णिमेचे दिवशीं ( तां. १.११.१८०० ) होळकरांनीं विश्वास दाखवून छापा घालून लष्कर लुटून घेतलें. त्या दिवशीं लखबा वागळे तोफेचा गोळा लागून ठार झाला. आम्ही ( बाळकृष्ण विठ्ठल ? ) मातोश्री बाईस हजार दोन हजार जमेतीनिशीं घेऊन वीस कोस आलों. ”

बायांचें व यशवंतरावांचें सूत्र बिघडण्यास दौलतरावच कारण झाला. ता. २६.११.१८०० रोजीं एक तत्रस्थ लेखक लिहितो. ‘ यशवंतराव बायांस मिळून होते. त्यास सिंदे यांजकडून पत्रें गेलीं कीं, तुम्ही बायांस मिळोन आमच्या दौलतींत बखेडा करूं नये. त्यांस पकडून आमचे स्वाधीन कराल तर खंडेरावास वस्त्रें देऊन तुम्हांकडे रवाना करितों.’ याप्रमाणें पत्रें बेलभंडार शपथपूर्वक आलीं. त्या मोहास गुंतून बायांस दगा करावयाच्या मनसुब्यानें चालोन आले. लढाई होऊन बायांस लुटलें. बायांस इशारा मिळून त्या उज्जनी पलीकडे दोन मजला गेल्या. तेथें लखबा-कडून फौज येऊन मिळाली, म्हणून निभाव झाला.’ पुढें लवकरच लखबादादा व यशवंतराव यांच्या भेटी होऊन बोलणीं झालीं. त्यानें यशवंतरावाची समजूत करून बायांशीं मिलाफ केला. नंतर दौलतरावाच्या फौजा चालून येऊं लागल्या, म्हणून यशवंतराव त्यांचे मुकाबल्यास परत वळला, आणि दौलतरावास निर्धास्त ठेवण्या-साठीं त्यानें ता. ११-११-८०० रोजीं बाजीरावास पत्र पाठविलें, कीं ‘ सिंदे-बायांनीं पुण्यापासून उज्जनपर्यंत मुलखाची धूळ केली. पुढेंही येथून बहकून जाण्याची चाल पाहून त्यांची खातरजमा करून जवळ आणून घेतलें असतां, मुलखांत धूम आरंभून उज्जनीचा विध्वंस करावा ही रीत पाहिली. मार्गाची चाल एकही दिसेना. निरुपाय होऊन स्वाधीन करणें प्राप्त होऊन, आसमंतांत घेरा घालून ध्यावा, तों ज्वारीचे शेतांतून निघोन उज्जनींत गेल्या. सभोंवतीं नाकेबंदी ठेविली आहे. कदा-चित् निघोन गेल्यास त्यांचे मागें फौजेची रवानगी करून जास्त बंदोबस्त तेंच घडेल. घरचे कलहामुळें परराष्ट्रांचा जोर होऊन कांहीं ठिकाण राहिला नाहीं. याउपर इकडील व सिंद्याकडील बंदोबस्त होऊन ऐक्यता राहून पूर्व रीतीनें सरकारचाकरी घडे तें केलें पाहिजे.’ याचें उत्तर बाजीरावाकडून होळकरास गेलें, कीं ‘ लक्ष्मीबाई उज्जनींत न जातां, मेवाडचा रोख धरून निघोन गेल्या; त्यांचे पिच्छास तुम्हीं फौज पाठविलीच असेल. येथोन दौलतराव सिंदे यांनींही इंगळे व पेरू यांजला पत्रें पाठ-विलीं आहेत, तेही पाठलाग करतील. पण तुम्हीं वाट न पाहतां शोध लावून त्यांस हस्तगत करणें.’ या लेखांत सत्य किंवा कृत्रिम किती हें ठरविणें कठिण आहे.

उज्जनीवरून बाया व लाड ग्वाल्हेरीकडे गेले. त्यांस आंतून इंग्रजांची फूस असून, जेणेंकरून सिंद्याच्या अडचणी वाढतील असा इंग्रजांचा प्रयत्न सारखा चालू होता.*

**५ सिंद्याचें प्रयाण, विठोजी होळकराचा अमानुष वध** (स.१८०१).
खुद्द दौलतरावानें स्वतः उत्तरेंत जाण्याचे उपक्रम अनेकवार केले. पण बाजीरावाच्या आग्रहावरून नाना फडणीस जिवंत असे पर्यंत त्यानें पुणें सोडिलें नाहीं. त्यानंतर यशवंतरावाचा उद्योग बळावत चाललेला पाहून, इतउत्तर उपेक्षा केल्यास आपणांस दौलतीस मुकावें लागेल अशी दौलतरावाची खात्री झाली; आणि लगोलग यशवंतरावावर पुढें फौजा रवाना करून पावसाच्या सुरवातीस त्यानें फौजेचा मुक्काम हालविला. ता. २५-६-१८०० या रोजचे बाजीराव दौलतराव यांजमध्यें सवाल जबाब झाले त्यांची याद छापलेली आहे, ती बारकाईनें वाचली म्हणजे त्या दोघांतील मैत्री व अविश्वास यासंबंधाचे मुद्दे स्पष्ट होतात. दोन चार महिने सारख्या वाटाघाटी चालून नोव्हेंबरच्या आरंभीं दौलतरावाचे पाय एकदांचे सुटले ते पुनः पुण्यनगरीस लागले नाहींत. बायजाबाई आठ महिन्यांची गरोदर होती, तिची प्रसूति जांबगांवास होऊन मग पुढें जावें असा बेत ठरला. बाजीरावाचे संरक्षणासाठीं त्यानें एक पलटण मागें सर्जेरावाचे ताब्यांत ठेवून दिली. आपल्या पाठीमागची सर्जेरावाची ही ब्याद टाळण्याचा बाजीरावानें आटोकाट प्रयत्न केला. पण बाजीरावास आपल्या कबजांतून जाऊं दिल्यास तो आपल्या विरुद्ध उठून वाटेल तें कारस्थान रचील, यासाठींच दौलतरावानें सर्जेरावास मागें पुण्यास ठेवण्याचा आग्रह धरला. शिवाय बाजीरावानें कबूल केलेली सत्तेचाळीस लाखांची रक्कम वसूल करण्याची कामगिरी त्यास सांगितली. त्याजबद्दल बाजीरावानें खूप त्रागाही केला; मी एकटाच वाटेल तिकडे निघून जाईन असा धाक घातला, प्रस्थानें ठेविलीं; आणि शनिवारच्या वाड्यांतून कोथरूडचा वाडा, तेथून फडक्यांचा वाडा, नंतर पेठ्यांचा, नंतर रास्त्यांचा, अशा प्रकारें दरएक ठिकाणीं त्रिरात्र राहण्या पलीकडे बाजीरावाचा प्रवास झाला नाहीं. ता. २३-११-१८०० रोजीं रात्रीं सिंद्यानें परत येऊन बाजीरावाची भेट घेतली, त्या वेळीं घाटग्यास काढण्याबद्दल बाजीरावानें त्यास अत्यंत गळ घातली. तेव्हां हळूहळू मी त्यास परत बोलावून घेईन असें बाजीरावास मोघम वचन देऊन सिंदे वाट चालूं लागला. परंतु तेव्हांपासून बाजीरावास जी धास्ती पडली ती वसईस इंग्रजांचा आश्रय मिळे पर्यंत कमीजास्त प्रमाणांत कायम होती. सिंदे गेल्यावर पुण्यास

* आधार. खरे; पे. अ.; हो. कै.; जी. च. २७३–२९९.

बाजीरावाची सारखी तारांबळ चालू झाली. 'श्रीमंत पुण्याहून सासवडचे मुक्कामीं गेले. तेथें यशोदाबाई व नाना फडणिसाची बायको व प्रतिनिधि यांस पुरंदरीं ठेवून मागती सासवडचे मुक्कामीं आले, ( ता. ८-१२-१८०० ). जाण्यापूर्वी त्यानीं बाळोजी कुंजर यास कारभारावर नेमिलें आणि चिमाजी आप्पा, यशोदाबाई, जिऊबाई भानु, परशुरामपंत प्रतिनिधि आणि मोरोबादादा फडणीस हीं राजकारणी माणसें नजर-कैदेदाखल त्यानें आपल्याबरोबर चालविलीं. यशोदाबाईस भीति पडली कीं, हे आपणांस कोठें तरी किल्ल्यावर अडकवून ठेवतील. या भीतीनें ती बाहेर पडेना, तेव्हां नानासाहेब पेशव्याचे नाटकशाळांकडून तिला जबरदस्तीनें बाहेर आणून पालखींत घातलें. चिमाजी आप्पाचें दत्तविधान बाजीरावानें रद्द करविलें होतें, तरी तीं दोघें एक होऊन आपणांस दगा देतील अशी भीति बाजीरावास नेहमींच होती.

मल्हारराव होळकराची स्त्री जयाबाई आपल्या मुलासह कुंट्याच्या वाड्यांत बंदोबस्तानें राहत होती, तिच्या मुलास मारण्याकरितां काशीरावानें दोन तीनशें मारेकरी पाठविले. त्यांस बाईच्या लोकांनीं पराजित करून हुसकून दिलें. पुढें तिला बाजीरावानें शनिवारवाड्यांत आपल्याजवळ आणून ठेविलें. प्रसंग पडेल त्याप्रमाणें दौलतरावावर शह ठेवण्यासाठीं होळकराचा हा मोहरा हातांतून जाऊं देऊं नये असा बाजीरावाचा घाट होता. परंतु दौलतरावानें त्यांस आपल्याबरोबरच उत्तरेस नेलें. काशीराव मागें कांहीं दिवस पुण्यास राहिला.

सन १८०० च्या डिसेंबरांत दौलतराव उत्तरेची वाट चालूं लागला, तो जांबगांवास मुक्काम करून फेब्रुआरी अखेर ब्र्हाणपुरास दाखल झाला. अंगीं तडफ असती तर तो लगोलग पुढें जाऊन तिकडील बंदोबस्त वेळींच करूं शकला असता. पण ब्र्हाणपुरास चार पांच महिने त्यानें फुकट घालविले. शौर्य, तडफ, धाडस इत्यादि गुणांचा त्याच्या अंगीं अत्यंत अभाव असून, हलक्या लोकांच्या नादीं लागल्यानें त्याच्या कारभारांत हुकमत व व्यवस्था बिलकूल राहिली नाहीं. ब्र्हाणपुराहून काशीराव होळकरास त्यानें आपल्या जवळ बोलावून घेतलें. काशीरावाबरोबर फ्रेंच सैनिक दूद्रनेक होता, त्यास दौलतरावानें ब्र्हाणपुराहून यशवंतरावावर रवाना केलें. पण यशवंतरावानें त्याचा पराभव करून त्यास आपल्या बाजूस वळवून घेतलें, आणि महेश्वराजवळचे नर्मदेचे घाटांचा बंदोबत केला.

बुंदेलखडांत लखबाची सलाबत मोठी असून दतिया वगैरे ठिकाणच्या राजांनीं त्यांस चांगली मदत केली, त्यामुळें ग्वाल्हेरच्या या स्वगृहांत बाया मालक होऊनच

वागूं लागल्या. त्यांनीं प्रान्तांत आपल्या तर्फेचे कामगार नेमून कारभार चालविला. सिंद्यांचा फ्रेंच सेनापति पेरू दिल्लीस बादशहाजवळ असून, बाहेरील प्रदेशाची व्यवस्था अंबूजी इंगळे याजकडे होती. 'बायांनीं दिल्लीस संधान लाविलें. झाज फिरंगी ( George Thomas ) व समरू बेगम हीं बायांस मिळालीं.' बायांच्या चढाईनें आतां कोणाचे हुकूम मानावे या संबंधानें पेरूचें मन द्विधा झालें. दौलतरावाचे निक्षून हुकूम आले कीं, बायांवर चालून त्यांचा बंदोबस्त करावा. त्याप्रमाणें इंगळे व पेरू आपली जमवाजमव करून बुंदेलखंडांत बायांवर चालून गेले. बरोबर बाळोजी इंगळेही होता. त्याच्याशीं लखबादादानें गनिमी काव्यानें लढून दोन तीन महिने त्यांचा इलाज चालूं दिला नाहीं. उभय पक्षांच्या फौजांनीं मुलूख मात्र बेचिराख केला. बरेच दिवस त्यांचा प्रत्यक्ष मुकाबला झाला नाहीं. दतियाचा राजा छत्राजित व भरतपुरचा सरदार दुर्जनसाल हे बायांस मिळाले. शेवटीं झांसी नजीक ता.२-६-१८०१ रोजीं उभय पक्षांची लढाई झाली. 'दतियेकर राजे यांनीं चालोन घेतलें. ते रणास आले. लखबास छऱ्याची जखम किंचित् लागली. पेरूसही छऱ्याची जखम बहुतकारी लागल्यामुळें तो इंगळ्यांस न पुसतां कोलारस येथें निघोन गेला. त्याचे मागून पलटणें निघालीं. त्यांचा पाठलाग करीत लखबा, दुर्जनसाल व छत्राजिताचा पुत्र इंद्राजित वगैरे गेले. दोहोंकडील बहुत मनुष्य जायां व जखमी झालें. जगन्नाथ राम ऊर्फ जगोबा बापू हाही या लढाईंत लखबाबरोबर होता. लढाईनंतर इंगळ्यांनीं बायांशीं बोलणें करून त्यांस आपल्या पक्षांत मिळवून घेतलें. बाया इंगळ्यांचे स्वाधीन झाल्या. त्यावरून लखबादादा उघडा पडला. छऱ्याची जखम लागल्यापासून तो आजारीच होता. पुढें मेवाडांत जावदेस गेले. तेथें बरेच दिवस आजारी राहून साळुंब्रा येथें वसंत पंचमीस ( ता. ७-२-१८०२ ) या शूर व पराक्रमी पुरुषाचा अंत झाला. जगोबा बापू मागें अलीबहादूराजवळ राहिला. दतियाचे राजानें बायांचा पक्ष घेऊन जें वर्तन केलें त्याबद्दल दौलतरावाचा त्याजवर अत्यंत कोप होऊन, पुढें पुष्कळ वर्षांनीं त्यानें त्या राज्यावर चांगलाच सूड घेतला.

यशवंतरावाची चढती कळा पाहून काशीरावाचा दम सुटून त्यानें आपलीं माणसें समेटासाठीं यशवंतरावाकडे पाठविलीं. 'आपण जमविलें नीटच, परंतु शिक्का आमचे नांवाचा चालवून कारभार सर्व तुम्हीं मुखत्यारीनें करावा,' असें बोलणें सुरू करून मागाहून खुद्द काशीराव यशवंतरावास मिळण्यासाठीं महेश्वरास दाखल झाला. हें वर्तमान पुण्यास बाजीरावास समजतांच त्यानें काशीरावास हुकूम पाठविला, कीं तुम्ही

परत सिंद्याकडे जावें. हा हुकूम काशीरावानें मानला नाहीं, म्हणून बाजीरावानें होळकराचा सर्वच सरंजाम काढून घेतला. काशीराव हातचा गेलेला पाहून दौलतरावाचा आधार पुष्कळ तुटला, आणि यशवंतरावास जोर चढून त्यानें सिंद्याचें उज्जनी शहर जाळून बेचिराख केलें. त्याच्या पेंढाऱ्यांनीं नर्मदेअलीकडे येऊन बऱ्हाणपुरपर्यंतचा प्रदेश मारून ताराज केला. तेव्हां दौलतरावानें यशवंतरावाशीं तडजोडीचें बोलणें चालू केलें. तें असें कीं, खंडेरावास तुमचे हवालीं करतों; आणि पेशव्याकडून तुमचे सरदारीचा बंदोबस्त करून देववितों. हा समेटाचा प्रयत्न कदाचित् सिद्धीस गेला असता, परंतु याच वेळीं पुण्यास बाजीरावानें विठोजी होळकरास क्रूरपणानें हत्तीचे पायांखालीं बांधून ठार मारल्यामुळें प्रकरण विकोपास गेलें. तो प्रकार प्रथम सांगितला पाहिजे.

पुण्यास मल्हारराव होळकर पडल्यावर विठोजी व यशवंतराव दोघे बंधु एकदमच बाहेर पडले. दोघांचाही उद्देश वाटेल त्या रीतीनें होळकरशाहीचें वजन सिंद्यानें नाहीसें केलेलें पुनः प्रस्थापित करावें असा होता. होळकराच्या फौजेंत नेहमींच बेकैद असे; आणि आतां तर जास्तच घोटाळे सुरू झाले. सिंदे आणि पेशवे यांच्या फौजांतील बेकार लोक लुटीच्या आशेनें विठोजीस सामील झाले. अशा रीतीनें फौज जमवून तो मंगळवेढें, करकंब, पंढरपुर, या प्रांतांत लूट करूं लागला. काशीराव होळकराचे सरदार मोत्याजी काळू गावडा व जिवाजी यशवन्त हे सुद्धां खानदेशांत व गोदावरीच्या तीरानें वाटेल तशी लूट व जाळपोळ करूं लागले. पेशव्यानें बाळकृष्ण गंगाधर बावनपागे * यास त्याजवर पाठविलें. परंतु तोच उलटा विठोजीस सामील होऊन त्याजबरोबरच मुलखांत अत्याचार करूं लागला. त्याशिवाय यशवन्तराव रामकृष्ण बाजीबा व कृष्णराव मोदी हे सिंद्यांचे सरदारही विठोजीस मिळून बहुत दिवस पगार वगैरे न मिळाल्यामुळें अशा अत्याचारांनींच निर्वाह करूं लागले.+ त्या वेळच्या या दंगलीचे अनेक कागद ठिकठिकाणीं छापलेले आहेत ते समजण्यास वरील नांवें

---

* याचें आडनांव कानडे. पहा. विं: घ. इ. पृ. १३४. + येसाजी रामकृष्ण, जिवाजी यशवन्त बावनपागे वगैरे शेणवी सरदार मूळचे सिंद्यांच्या पदरचे बायांच्या तर्फेनें झगडत होते. पुढें शेणवी सरदारांचा दौलतरावानें नायनाट केल्यावर बाया उत्तरेंत गेल्यामुळें ते उघडे पडले आणि आतां अमृतरावाचे नांवानें लुटालूट करूं लागले.

+ **आधार.** खरे; पे. अ ; हो. कै; जी. च. ले. ३२९. खं. १०-५०५-५२४, ५५१ व. पु. द. भा. २ यांत वरील अत्याचार वर्णिलेले आढळतात.

उपयोगी पडतील. हे सरदार अमृतरावाचें नांव पुढें करून आपली पुंडाई चालवीत. मग त्यांस खरोखर अमृतरावाचें प्रोत्साहन किती होतें किंवा तेच होऊन कांहीं बनावट सबब पुढें करीत होते हें समजणें कठिण आहे. बाजीराव नालायक आहे, त्याचा पाडाव करून आपण पेशवाई सांभाळणार, अशा आशयाच्या सनदा अमृतरावानें आपणांस दिल्या आहेत, असा पुकारा विठोजी होळकर व वरील सरदार यानीं सर्वत्र चालू केला. रयतेचे बोभाटे बाजीराव व काशीराव होळकर यांजकडे गेले, तेव्हां त्यांस त्यांनीं मनाई हुकूम पाठविले. पण या कागदी हुकमांस विचारतो कोण ? यांनीं देवांचे दागिने सुद्धां लुटून घेतले, आणि रयतेस इतका उपद्रव दिला कीं त्याचीं वर्णनें वाचून अंगावर कांटे उभे राहतात. विठोजी होळकर तर किल्लेकोट किंवा ठाणीं घेई त्यांजवर तो अमृतरावाचें निशाण लावी. स. १७९९ त ही दंगल सुरू झाली ती पुढील सालीं विशेषच वाढली. नोव्हेंबर १८०० चें वर्तमान. 'होळकर व यशवन्तराव रामकृष्ण मिळून वीस हजार फौज करकंबच्या शिवेस आली, तेव्हां तेथील मालक पटवर्धन यांनीं तेवीस हजार रुपये खंडणी करार केली. फौज अमृतराव यांची आहे म्हणतात. पुढें बाळकृष्ण-गंगाधराकडील सामान सोलापुरावर चालून आलें. पानशांचे फौजेचा पाडाव करून पेठ लुटली, वेशी मोडल्या, आतां परिणाम काय ? बाजीरावाचे सरदार बाळाजीपंत पटवर्धन पाडाव गेले. पानशानें मोठी नादानी केली. तोफा सोडून पळाले. जिवाजी यशवन्तानें गंगथडीस मोठा प्रळय उडविला.' मोत्याजी काळू गावडे पैठणाकडे जाऊन मुलखास उपद्रव देऊं लागला, त्याचे बोभाटे ब्राह्मणांकडून व विशेषतः कायगांवकर दीक्षितांकडून बाजीराव, सिंदे होळकर वगैरेंकडे सारखे चालू झाले. त्यावरून यांनीं त्यांस मनाई हुकूम पाठविले. त्यानंतर जिवाजी यशवंत बावनपागे, फत्तेसिंग माने, शहामीरखां वगैरे यशवंतरावाच्या सरदारांनीं व त्यांच्या पेंढाऱ्यांनीं तापीपासून कृष्णेपर्यंतच्या प्रदेशांत कहर उसळून दिला. बाजीरावाचें जिणेंच सर्व शून्यवत् बनलें.

अशी ही दंगल अमृतरावाचे नांवावर चाललेली पाहून बाजीरावास आपल्या भावाचा अत्यंत संताप आला. त्यास वाटलें आपली पेशवाई आतां जाते. विठोजीवरही तो तसाच चिडून गेला. त्रिंबक महीपत ऊर्फ नाना पुरंदरे, बापू गोखले, गणपतराव पानसे वगैरे सरदारांस बाजीरावानें बंदोबस्तास पाठविलें व जिवाजी यशवंताचें पारिपत्य केल्याखेरीज तोंड दाखवूं नये अशी आज्ञा केली. 'विठोजी होळकर व बाळकृष्ण गंगाधर यांनीं महालोमहालीं खंडण्या घेऊन मनस्वी उपद्रव केला आहे, त्यास

सरकारांतून पुरंदरे यांस सरंजाम देऊन रवाना केले आहेत. यांस सामील होऊन पारिपत्य करणें ? ' अशीं पत्रें बाजीरावानें तमाम सरदारांस पाठविलीं. बाळोजी कुंजर बाजीरावाचा मुख्य कारभारी पुरंदऱ्यांचे घरीं लहानाचा मोठा झाला असल्यामुळें नाना पुरंदऱ्यावर त्याचा लोभ होता. स. १८०१ च्या मार्चांत पुरंदऱ्यानें बाळकृष्ण गंगाधर व जिवाजी यशवन्त यांचें पारिपत्य केलें. ' विठोजी होळकर निराळा फुटून मुलखांत दंगा करतो. बहुत लोक व गांवचे गांव उजाड पाडले. त्यास बापू गोखले यांनीं कैद करून पुण्यास पाठविला. त्यास हत्तीचे पायाशीं बांधून ठार मारिला. सरकार वाड्यांत पोंचतांच वेडी तोडून मार मार मारिला. दोनशें कमचा मारून लागलाच हत्तीच्या पायास बांधून वोढविला. दुसरे दिवशीं आज त्यांचे कारभारी वाड्यांत येऊन बोलले, दहावीस लाख दंड घ्यावयाचा होता. मूठमाती द्यावयास परवानगी द्यावी. त्यावरून तसें करण्यास आज्ञा दिली. बायको सहगमन करणार होती तिला आज्ञा झाली नाहीं. ती व पुत्र कैदेंत आहेत. जिवाजी यशवन्त भेटीस येऊन गेले, तों बाळकृष्ण गंगाधर यांजवर सरकारचे फौजेनें छापा घातला. ते पुण्यांत येऊन बळवंतराव नागनाथाचे बहादरीनें भेटले. कैदेंत आहेत. ' विठोजीचा हा प्रकार छ २ जिल्हेजीं म्हणजे ता. १६-४-१८०१ रोजीं घडला.

बाजीरावानें हा प्रकार अत्यंत अविचाराचा केला; आणि त्यामुळेंच त्याचा व राज्याचा अखेर नाश झाला. विठोजीनें कितीही बंडखोरी केली असली तरी अशी बंडखोरी त्या वेळीं शेकडों सरदार करीत होते. खुद्द सिंदे व सर्जेराव घाटगे यांचा तर तो रोजचा क्रमच होता. अशा शिक्षेनें यशवन्तरावास व अमृतरावास दहशत बसविण्याचा बाजीरावाचा उद्देश असावा. शनिवार वाड्याच्या पुढील चौकांत हा प्रकार घडला. शिक्षेचा अम्मल होत असतां वरच्या दिवाणखान्यांत बाजीराव, बाळोजी कुंजर वगैरे मंडळी मजा पाहत बसली होती. विठोजीचा मुडदा तसाच चोवीस तास केवळ दृष्टिसुखासाठीं खालीं चौकांत ठेवविला. ' अत्यंत नीच दर्जाचा खुनशी सूड ' असें याचें वर्णन कै. खऱ्यांनीं केलें आहे तें योग्य आहे. त्यांतून विठोजी हा कसा झाला तरी मराठशाहीच्या दोन मुख्य आधारस्तंभांतला एक सरदार. त्यास अशा रीतीनें वागवून बाजीरावानें आपल्याच पायावर कुऱ्हाड मारून घेतली. सिंदे आप्त आणि होळकर शत्रु असा भेद दर्शविण्यास बाजीरावास वस्तुतः कांहीं एक प्रयोजन नव्हतें. त्या वेळीं सुद्धां पुण्यांतील पुष्कळांची अशीच भावना होती. विठोजीस क्रूर शिक्षा करण्याचा विचार नरसिंह खंडेराव विंचूरकर याला कळतांच


नर्मदेवरील
घाट.
महिदपुर
नागदा
रतलाम
उज्जैन
कायथा
देवास
गौनमपुर
देपालपुर
नोधा
सरदारपुर
धार
इंदूर (करेल)
महू
मानपुर
माडवगड
कुसलगड
मंडलेश्वर
महेश्वर
धरमपुरी
चिखलदा
बही
कुक्षी
राजपुर
अली मोहन
बडोदे
भडोच
राजपिपळा
बाबापिराचा घाट
राजघाट
बरवाणी
आंजेर
सुनासा
कसरावद
महमदपुर
भीकणगाव
रबरगोण
जलालाबाद
सेंधवा
चैनपुर
गाळणघाट
तळोदा
शहादा
असीरगड
बऱ्हाणपुर
भुसावळ
तापीनदी
न र्म दा न दी
रावेरखेडी
मोरटक्का
ओंकारनाथ
सनावद
खंडवा
हरदा
इटारसी
हुशंगाबाद
हंडया
काटाफार
सत्वास
फत्तेगड
बागली घाट
मा ळ वा
नि मा ड
ने मा ड
आ मा रो ड
भ मा मोरे

पृ. १८०

तो धावत बाजीरावाकडे गेला, आणि विठोजीला मारूं नये अशी परोपरीनें त्यानें बाजीरावाची विनवणी केली. परंतु व्यसनान्ध मनुष्याप्रमाणें बाजीरावानें विंचूरकराचें म्हणणें झिडकारलें. बाजीरावाला ही सल्ला बाळोजी कुंजरानें दिली. बाळोजी कुंजर दिवाण होता; आणि दिवाणगिरीवर खरा हक्क अमृतरावाचा होता. या भयंकर प्रकारानें यशवंतरावासारख्या मानी व उद्दाम पुरुषाचें पित्त भडकून त्यानें त्याचा पुरेपूर वचपा भरून काढला. विठोजी आपल्या कनिष्ठ भावासारखाच शूर व कर्तृत्ववान् आणि कदाचित् जास्त समंजस होता. तुकोजी होळकराचे तिघेही मुलगे पराक्रमी असतां त्यांचा उपयोग बाजीरावानें राष्ट्रकार्याकडे केला नाहीं हें पाहून मोठा उद्वेग वाटतो.

**६ नर्मदेवरच्या प्रचंड लढाया***(जून-ऑगस्ट,१८०१).—स.१८०१ च्या मे अखेरीस दौलतराव सिंदे नर्मदातीराकडे धूळकोटावर दाखल झाला, तों तिकडून यशवन्तराव उत्तरेकडील घांट अडवून युद्धास उभा राहिला. सिंद्याचे जुने अनुभवी सरदार सर्व नाहींसे होऊन सर्जेरावाशिवाय त्यास दुसऱ्या कोणाचा आधार या प्रसंगीं राहिला नव्हता. त्याची भिस्त कायती तोफा व पलटणें यांजवर होती. पण यशवन्तरावाच्या गनिमी काव्यास तोंड कसें द्यावयाचें हें त्यास सुचेना. म्हणून सर्जेरावास निकडीनें निघून येण्याविषयीं पुण्याकडे त्यानें आपली डांक सारखी चालविली. तोफा व पलटणें नर्मदा पार करण्यास मोठीच अडचण येऊन पडली.

स. १८०१ च्या जून महिन्यांत दोघांचा खरा सामना नर्मदेवर सुरू झाला. तेव्हांपासून कित्येक महिने उभयतांच्या लढाया सारख्या चालू होत्या. मोठी फौज असो, लहान टोळी असो, कोणी एकटा सरदार असो, त्यांजवर एकमेकांनीं बेलाशक तुटून पडून नर्मदेपासून इंदूर उज्जैन पावेतों असा कांहीं बेसुमार धुमाकूळ उडवून दिला, कीं अमुक दिवशीं अमुक लढाई होऊन त्याचा अमुक परिणाम झाला असें निश्चितपणें ठरविणें सुद्धां कठिण झालें आहे. विवेचनाच्या सोईसाठीं असें सांगतां येईल, कीं या झटापटींत तीन मोठ्या लढाया जुलई व ऑगस्ट महिन्यांत झाल्या. या तीन लढायांत पुष्कळ हानि झाल्यावर दौलतराव स्वतः नर्मदेपार गेला. इंदूर जवळच्या लढाया असेंच यांचें वर्णन बहुतेकांनीं केलेलें आहे. जूनच्या आरंभीं कर्नल जॉन हेसिंग, ज्यास जोर अथवा जुरूस फिरंगी असें नांव त्या वेळीं पडलें होतें, त्यास दौलतरावानें उज्जनच्या संरक्षणासाठीं आगाऊ पुढें पाठविलें. हेसिंगच्या बरोबर चार

* **कलमास आधार.** खरे; हो. प; खं. १०. ५२८–५३१; पु. द. भा. २. ११६, १८७, १८८; भ. रो.

हजार स्वार व चार पायदळ पलटणें नदीपार गेलीं. त्याजबरोबर चिंतो आत्माराम तांबोळी, रामचंद्र भास्कर बक्षी व सदाशिव महादेव हे हिंदी सरदार होते. यांची वाट अडविण्यास यशवन्तराव नदीपलीकडे तयार होता. त्याजवर हेसिंगनें एकदम चाल केली. पण त्याजशीं सामना न करतां होळकर उज्जनीकडे मागें हटला. इकडून दौलतरावानें मॅकिन्टायर हा युरोपियन अम्मलदार आणि फकीरजी गाढवे व निंबाळकर यांस मागून हेसिंगचे मदतीस पाठविलें. त्यांचे मागून आणखी दोन पलटणें मुसा सतरंज ( Southerland ) याचे हाताखालीं नदीपार गेलीं आणि तीं हेसिंगचे पाठोपाठ पुढें उज्जनीकडे वाट चालूं लागलीं. त्यांचे मागून मेजर ब्राऊन-रिग्ग हा तोफखाना घेऊन पलीकडे सुरक्षित गेल्यावर सरते शेवटीं देवजी गौळी व गोपाळराव चिटणीस हे सरदार दहा हजार फौज घेऊन नर्मदेच्या पलीकडे गेले. याप्रमाणें सिंद्याची बहुतेक फौज व्यवस्थितपणें नदी उतरून पलीकडे गेली. नर्मदेच्या उतारांत रघूजी भोसल्यानें आपली फौज व माणसें पाठवून दौलतरावाचें साह्य केलें. म्हणूनच नर्मदा उतरतांना सिंद्याचें नुकसान झालें नाहीं.

होळकरानें गनिमी कावा स्वीकारला. हेसिंग यास उज्जनीकडे पुढें ओढीत नेऊन त्यानें त्याचे सामन्यास देखाव्यापुरती थोडी फौज उज्जनीजवळ ठेविली, आणि बाकीची मोठी फौज स्वतः आपल्याबरोबर घेऊन तो अचानक हंड्याच्या घाटांत नेवरीजवळ मुसा सतरंज व मॅकिन्टायर यांजवर विजेसारखा येऊन कोसळला. त्यानें त्या दोघांच्या सर्व तुकड्या कापल्या. थोडे उरले ते बिनशर्त हत्यारें खालीं ठेवून होळकराचे स्वाधीन झाले. हें कृत्य करून यशवंतराव तसाच परत फिरून उज्जनी-जवळ हेसिंगचे समाचारास गेला. तेव्हां एक अहोरात्र निकराची लढाई होऊन सिंद्याचीं चार पैकीं तीन पलटणें गारद झालीं. चिंतो आत्माराम भाल्याच्या जखमेनें ठार झाला, सात इंग्रज ऑफिसर मेले: आणि खुद्द हेसिंग पराकाष्ठा करून लढला, पण जखमी होऊन बहिरवगडच्या आश्रयास गेला म्हणून बचावला. हे दोन पराक्रम करून लगेच यशवंतराव महेश्वरनजीक नर्मदेवर ब्राउनरिग्गच्या तोफखान्यावर चालून आला. परंतु तोफा सज्ज असल्यामुळें यशवन्तरावाचे हल्ल्यांचा त्यांजवर कांहीं एक परिणाम न होतां त्यास नाइलाजानें परत फिरावें लागलें. देवजी गौळी यानें होळकरावर चालून घेतलें, व पांच सहा तोफा पाडाव केल्या. ' त्याउपर होळकरांनीं जोरबजोर चालोन येऊन भारी लढाई केली. देवजी गौळी व आणखी दोन तीन मोठे सरदार व पांच सहा जमादार ठार झाले. बुणग्यांत गलबल बहुत झाली.

सिंद्यास वर्तमान समजल्यापासून बहुत अंदेशांत आहेत. दौलतराव बाबा हंड्यावर आहेत. यशवन्तरावाची १५ हजार फौज इंदुरावर आली. दौलतरावाची सांप्रत कमतीच आहे. लखबा लाड निकडीनें इंदुरास आल्यावर तो व होळकर अलीकडे यावयाचा रंग आहे. यशवन्तरावाचे फौजेशीं दोडकीवर युद्धप्रसंग झाला. सतरंजसाहेब+ शिकस्त झाले. काशीराव होळकर सेंधव्यास दोन प्रहरच्या खातरजमेवर दुलगनीर होऊन म्ह० दोनही बाजूंस लक्ष ठेवून आहेत.

वरील तीन लढायांस ( १ ) हंड्याचा घाट म्हणजे नूरी अगर नेवरी ( २ ) उज्जेन व ( ३ ) महेश्वर अगर इंदूर अशीं नांवें सोईसाठीं देतां येतील. या लढायांच्या नक्की तारखा व तपशील संशोधनानें बिनचूक ठरविणें जरूर आहे.

आपसांतील या यादवीनें दौलतराव अगदीं हैराण झाला. यशवन्तरावाचा सहज बंदोबस्त करूं अशी त्यास आतां उमेद राहिली नाहीं. सर्जेरावास त्यानें ताबडतोब आपल्याकडे बोलाविलें. त्यालाही इकडच्या सर्व बातम्या कळतच होत्या, परंतु बाजीरावापासून सत्तेचाळीस लाख वसूल करण्याची त्याची कामगिरी पुरी झाली नव्हती. आपण जवळ असतां जर द्रव्य निघत नाहीं तर दूर गेल्यावर तो काय देणार हें त्यास कळतच होतें. बरें पैशाशिवाय दौलतरावाच्या अडचणी तरी कशा निभावणार होत्या ? तेव्हां बाजीरावास पेंचांत पकडून पैसे उकळण्याची त्यानें शिकस्त केली. उलट पक्षीं ही ब्याद आतां लवकरच जाणार असें पाहून बाजीराव जास्तच भिगरगट्ट बनला. तरी तितक्यांत घाटग्याचा जाच असह्य होऊन त्यास मारेकरी घालून ठार मारावें असा बेत बाळोजी कुंजरामार्फत बाजीरावानें इतक्या शिताफीनें रचिला, कीं एवढा जहांबाज घाटगे पण तो सुद्धां फसला, आणि केवळ दैवयोगानें बचावला. परत जाण्यासाठीं सर्जेरावानें आपली सर्व फौज पुण्यास गोळा केली. चतुरसिंग भोसले व आपा देसाई निपाणकर यांस त्यानें पुण्यास बोलावून आपल्याजवळ आणिलें.

---

+ रॉबर्ट सदर्लंड ऊ० सतलंज साहेब हा पूर्वी इंग्लंडच्या फौजेंत नोकर होता. तेथें शिक्षा पावून हिंदुस्थानास आला. स. १७९०त त्याला डीबॉयननें सिंद्याच्या नोकरींत ठेविलें. लखबादादावर सिंद्याची फौज चितोडगडाजवळ गेली तिजवर हा मुख्य होता. पुढें स. १८०१ त त्यानें इंदूरजवळ यशवंतराव होळकराचा पराभव केला. स. १८०२ त पेरॉननें त्यास नोकरींतून काढिलें. स. १८०३ त हेसिंग व सदरलंड यांनीं लेकशीं बोलणें करून आग्रा त्याचे ताब्यांत दिला. हा सदर्लंड हेसिंगचा जांवई होता. पुढें तो इंग्रज फौजेंत नोकर होऊन कांहीं वर्षांनीं मथुरेजवळ मरण पावला.

ता. २१-६-१८०१ रोजीं घाटगे दोनशें लोकांनिशीं पुण्यांत येऊन पाटणकराचे वाड्यांत राहिला. तेथून बाजीरावाकडे जाऊन त्यानें त्याच्याशीं खलबतें चालविलीं. बाजीराव व कुंजर यांनीं अत्यंत दीनवाणीचें बोलणें सुरू केलें. कुंजरानें घाटग्याची प्रत्येक मागणी तोंडानें कबूल केली आणि प्रेमानें त्यास आपल्या घरीं भोजनास बोलाविलें. ता. २६ जून रोजीं घाटगे कुंजराकडे गेला, तों त्याच्या घरीं हुजरातीच्या लोकांनीं धरणें धरलेलें त्यास दिसलें. भोजनोत्तर घाटग्यानें पैशाचें बोलणें काढतांच कुंजर त्यास म्हणाला, ' आपण या गोष्टी सर्व लोकांसमक्ष न बोलतां बाजूस जाऊन बोलूं. ' त्यावरून चार निवडक माणसें घेऊन उभयतां आंतल्या दिवाणखान्यांत गेले. थोडें बोलणें झाल्यावर कुंजर उठून कांहीं कामानिमित्त बाहेर जाऊं लागतांच घाटग्यानें तात्काल कपट ओळखून एका हातानें कुंजराचा गळा पकडून दुसऱ्यानें तलवार बाहेर काढली. त्या वेळीं यत्किंचित् हालचाल कुंजर करता तर त्यास तेथल्या तेथेंच कंठस्नान मिळालें असतें. कुंजर बाहेर गेल्याबरोबर मारेकऱ्यांनीं आंत येऊन घाटग्यास ठार करावें असा संकेत होता, तो घाटग्याच्या प्रसंगावधानानें टळला. सर्जेरावानें कुंजरास ओढीत रस्त्यावर आणिलें आणि लगेच आपण घोड्यावर बसून चालता झाला. मात्र या कृत्यानें त्याच्या बेफामपणास आतां ताल राहिला नाहीं. शनिवार वाडा व पुणें शहर सर्व जाळून राख रांगोळी करतों अशी वल्गना करून त्यानें आपल्या फौजा दोन दिवस लढाईच्या तयारीनें उभ्या ठेविल्या. तेणेंकरून शहरांत हाहाकार उडाला. बाजीरावाचा धीर सुटून तो घाटग्याचीं आर्जवें करूं लागला. त्या कामीं रेसिडेंट पामराची शिफारस सुद्धां बाजीरावानें घाटग्यास आणिली. तितक्यांत सिंद्याची भयंकर परिस्थिति कळून पुण्यांत जास्त दिवस काढण्याची त्यास सोय राहिली नाहीं. त्यानें आपला मुलगा हिंदुराव व आपा देसाई निपाणकर यांस पैसे काढण्यासाठीं बाजीरावाजवळ ठेवून ता. १२-७-१८०१ रोजीं पुण्याहून प्रयाण केलें. जातांना त्यानें मुलखांत एवढा अनर्थ केला कीं त्याच्या वर्णनाचे लेख वाचतांना गहिंवर येतो. 'दोन प्रहरां सर्जेरावाजी स्वारी प्रवरासगमीं प्राप्त झाली. अगोदर कंपू पुढें आला, त्याची कही संगमांत गेली. त्यांनीं लांकूड फांट्याकरतां ५-४ घरें झोंबडलीं. दो चौ घरचीं पांघुरणें वस्तभाव हातीं लागेल तें नेलें. त्यावर खासा आल्यावर बाळंभट आपाचे भेटीस गेले. भेट घेऊन हात जोडून उभा राहिला कीं तुमची आज्ञा होईल तर बसेन. मग आपा बसा म्हणाले तेव्हां बसला, गांवास उपद्रव न करण्याचें कबूल केलें.' अत्याचारांत सुद्धां सर्जेराव मनुष्य पाहून वर्तन करणारा होता. प्रवरेवरून पुढें जाऊन ऑगस्टअखेर

घाटगे ब्ऱ्हाणपुरास पोंचला; आणि तेथून लगेच कूच करून सप्टेंबरांत नर्मदापार होऊन दौलतरावास मिळाला.

**दुसरी मोहीम.**—ऑक्टोबरच्या आरंभीं सर्जेराव घाटगे नर्मदा उत्तर-तीरीं गेल्यावर दौलतरावास पुष्कळ धीर आला. त्या वेळीं सिंद्याचा मुक्काम नर्मदा दक्षिण तीरीं हंडिया येथें व यशवंतरावाचा उज्जनी अलीकडे चार मैलांवर होता. लखबादादाची कांहीं फौज होळकराचे साह्यास आली होती. होळकरानें उज्जनीचा विध्वंस केला, त्याचा वचपा इंदुरावर काढावा अशी उत्कंठा सर्जेरावास लागली होती. उभय फौजांच्या लहान मोठ्या चकमकी नेहमीं झडूं लागल्या. ता. ९-१०-१८०१ रोजीं दोघांच्या आघाडींची गोळागोळी झाली. ता. ११ रोजीं लढाई मातबर होऊन तींत होळकरांचे तीन हजार माणूस जायां होऊन त्याच्या शंभर तोफा आणि इंदूर व उज्जनी दोन्ही ठाणीं सिंद्यांनीं हस्तगत केलीं. 'विजया दशमीस ( १७ आक्टोबर ) खासा शिंदे रेवापार झाले. सिंद्यांची छबी तात्पुरती होळकरावर पडली. इंदूर शहरांत लूट, जाळपोळ व कत्तल करून सर्जेरावानें उज्जनीचा सूड पुरेपूर उगविला. इंदूरच्या लोकांनीं १५ लक्ष रुपये दंड देण्याचें कबूल केलें, तरी तें न जुमानतां इंदूरची लूट करून वाडे जाळून खोदून काढिले. परंतु यशवंतराव बिलकूल डगमगला नाहीं. त्याचा सरदार शामराव महाडीक कंपू घेऊन बाहेर होता त्यास यजमानाचीं पत्रें गेलीं कीं, 'प्रसंग अडचणीचा, तुम्हीं रात्रीचा दिवस करून यावें.' परंतु तो येण्यापूर्वीच लढाई शिकस्त झाली.

यशवंतरावानें कपटनीतीचा उपयोग करून सिंद्याचे फौजेंत फितूर केला. उलट पक्षीं सिंद्यानें दूद्रनेक यास पुनः फितविलें. तो होळकरास सोडून सिंद्याकडे येत असतां हाताखालच्या लोकांस सुगावा लागून ते दुद्रनेकास सोडून होळकरास जाऊन मिळाले. ता. ३०-१०-१८०१ रोजीं पुनः मोठी लढाई झाली तींत सर्जेराव पराभव पावून मागें हटला. त्या प्रसंगांत सिंद्याचें एक पलटण व दीड हजार स्वार ठार झाले. नंतर त्यांनीं आपला सर्व तळ उज्जनीस जमा केला. यशवन्तरावानें सभोंवार घिरट्या घालून त्यांचा उच्छेद चालविला. आणखी कांहीं चकमकी झाल्या, त्यांत दौलतरावाचाच मोड होत गेला, आणि अगदीं टेंकीस येऊन त्यानें यशवंतरावाशीं समेटाचें बोलणें सुरू केलें. यशवंतरावानें जबाब कळविला कीं, 'पूर्वी तुकोजीरावाशीं जे करारमदार झाले आहेत ते सर्व तुम्हीं बरोबर पाळण्यास कबूल असाल तर तुमची आमची गोडी होणें शक्य आहे.' परंतु दौलतरावास ती गोष्ट पटली नाहीं.

उभयतांच्या फौजा कायम असून समेटास नरमाई लागते ती अजून कोणाच्याच अंगीं उत्पन्न झाली नव्हती. बाजीरावानेंही पुण्याहून आपल्या सत्तेच्या हुकमाची बजावणी करून पाहिली, ती अशी कीं ' सिंदे होळकरांनीं एकदम असतील तेथें युद्ध थांबवावें, आपसांत विरुद्ध वागून महाला.निहाय उपद्रव करतात तो करूं नये. उभयतांच्या समजुतीचा तह सरकारांतून ठरून आज्ञा होय तोंपर्यंत सिंद्यांनीं आपले सरदारांसह आशेरी ब्र्हाणपुरचे मैदानांत राहवें, व होळकरांनीं आपले सरदार मुद्धां तापी उत्तर तीरीं थाल्नेरास राहवें. दरम्यान लढाई करूं नये. ' असे हुकूम बाजीरावानें स. १८०२ च्या आरंभीं उभयतांकडे पाठविले. पण ते मान्य होण्याइतकी तपश्चर्या बाजीरावाची उरली नव्हती. अर्थात् त्याच्या हुकमास कोणींच भीक घातली नाहीं. अशाच मतलबाचें बाजीरावाचें एक पत्र दौलतराव सिंद्यास गेलें तें असें. ' यशवन्तराव होळकर व सर्जेराव घाटगे यांची लढाई होऊन इंदूर शहर तुम्हीं व उज्जन होळकरांनीं लुटलें हें नीट नाहीं. सर्जेरावांनीं सौ. आनंदीबाई होळकर यांचा खासगी तालुका लुटला. तरी सर्जेरावास लिहून ताकीद करून घेतलेला वसूल माघारी देणें. ' या हुकमाचाही उपयोग झाला नाहीं हें सांगणें नकोच.

यशवन्तरावाचा मोठा साथीदार शामराव महाडीक या वेळीं आजारी पडून मरण पावला, त्यामुळें त्याची मोठी हानि झाली. यशवन्तराव विजेसारखा चहूंकडे चमकत होता. राजपुतान्यांत व चंबळच्या कांठानें सिंद्याचे मुलखांत त्यानें प्रळय उडवून दिला. फत्तेसिंग माने म्हणून एक शूर व साहसी सरदार यशवंतरावाचेच वृत्तीचा पूर्वी अहल्याबाईजवळ असे. तो हल्लीं यशवंतरावाचे नोकरीस येऊन राहिला. यशवंत-रावानें त्यास मोठ्या गौरवानें आपल्याजवळ ठेवून घेतलें. त्याचप्रमाणें लाला भवानी-शंकर, हरनाथसिंग, अमीरखान वगैरे सरदार यशवन्तरावाचे हुकूम बिनतक्रार उठविणारे त्यास लाभल्यामुळें त्याची चलती होऊन सिंद्याचा जोर ढिला पडत चालला. एका लढाईंत तर सिंद्याची बहुत खराबी झाली. एक कंपू होळकरानें बुडविला. त्या बाबतींत दौलतरावानें मुकीर साहेबावर फितुरीचा आरोप केला. तो सहन न होऊन मुकीरनें तलवारीनें आपली मान कापून घेतली ( डिसेंबर १८०१ ). पाराशर दादाजी नांवाचा एक हुशार गृहस्थ यशवंतरावाचा मुख्य कारभारी होता, त्याचे विद्यमानें सिंद्याचा सरदार जिवाजी यशवंत यास यशवंतरावानें आपल्या नोकरींत घेतलें.

स. १८०२ चें साल उजाडलें. यशवंतरावाच्या चढत्या कमानीनें सर्व दक्षिणोत्तर देश हवालदील झाला. पुढें महेश्वरास काशीरावाची व्यवस्था लावून यशवन्तरावानें

पुण्यावर चालून जाण्याची सिद्धता केली. मागें काशीरावानें सेंधव्याच्या किल्ल्यांत वास्तव्य केलें. थालनेरास पोंचल्यावर यशवन्तरावानें बाजीरावाकडे वकील पाठवून बोलणें सुरू केलें. कीं आपण मालक आमची समजूत घालून व्यवस्था लावून द्यावी. ता. २७-२-१८०२चें वर्तमान 'होळकराकडील पाराशर दादाजी वगैरे सरदार अजिंठ्याचा घांट चढून पुढें आले. पाराशरजीपंत सडेच श्रीमंताकडे बोलणें करण्याकरितां येतील. होळकरांनीं आपली डांक पुण्यापावेतों बसविली. पुण्याचे अधिकारी चिंताक्रान्त झाले आहेत.' होळकराची समजूत न झाली तर मराठी राज्य बुडालें अशी वेळ येऊन ठेपली. त्या संबंधानें बाजीरावाकडे बोलणें करण्यास रघूजी भोसल्यानेंही आपले वकील पुण्यास पाठविले, तेव्हां बाजीरावानें घाबरून ज्या वाटाघाटी चालविल्या, त्यांचा इत्यर्थ असा.

'हिंदुस्थानांत सिंदे होळकरांचा युद्धप्रसंग चालला असतां, पुण्यास विठोजी होळकरास हत्तीचे पायीं बांधून मारिलें व खंडेराव होळकरास सिंद्याचे हवालीं केलें, त्यावरून श्रीमंतांशीं वांकडेपणा जाला तेव्हां होळकरांनीं फत्तेसिंग माने व शहामतखान वगैरे सरदारांबरोबर फौज देऊन पुण्याचे रोखें पाठविलें, व आपणही मागाहून येऊं लागले. हें वर्तमान श्रीमंतांस समजल्यावरून त्यांनीं होळकराकडे आबाजी शंकर, राघोपंत भागवत, सदाशिवपंत उगले, संताजी जासूद व चिमाजी वाघचवरे वगैरे बोलण्यास पाठविले, त्यांत हांशील, श्रीमंतांशीं वांकडेपणा करूं नये, सिंद्याची व तुमची गोडी करून देतों. त्यावरून होळरांचें बोलणें पडलें कीं, विठोजी मारले गेले ते येत नाहींत, परंतु खंडेरावास सिंद्याकडून आमचे हवालीं करावें, आणि उभयतांकडून सांप्रदायाप्रमाणें सेवा घ्यावी. होळकरांनीं बोलण्यास पाराशर दादाजी, गोविंदपंत गानु, व शामराव जिवाजी यांस श्रीमंतांकडे पाठविलें. त्यांची श्रीमंताकडून व श्रीमंतांची त्यांजकडून आणशपथही जाली, परंतु खंडेरावास सिंदे हवालीं न करीत, त्यांचा समेट करावयाचा विचार न दिसे. समेटाचें बोलणें चालू असतांच सर्जेरावांनीं खंडेराव व जिजीबाई यांस अशेरीस पाठविलें व मल्हार शामजी यास बेडी घातली, तेव्हां यशवंतराव जवळ येतातसें पाहून श्रीमंतांनीं सिंद्यांस लिहून त्यांची फौज जवळ आणविली. सिंद्यांचे सरदार सदाशिव महादेव पलटणें सुद्धां पुण्यास आले.'

'होळकराच्या आवईनें पुण्यास बहुत अंदेश उत्पन्न होत आहेत. तजवीज न होतां कारभारी सुद्धां बेफिकीर स्वस्थ आहेत. कोथरूडच्या बागेचा सहल नित्य होत आहे. चहूंकडून शत्रूंच्या फौजा हुशार होऊन नजीक येत चालल्या आहेत. परंतु श्रीमंतांचा

प्रताप मोठा आहे, त्यामुळें कोणी जलदी करून येत नाहीं व श्रीमंतही स्वस्थ आहेत. कोणेविशीं तरतूद तिलमात्र नाहीं. बागाचें सहल होत आहे, यामुळें दरबार व कारभारी यांच्या भेटी व दर्शन बहुधा होत नाहीं.' बाजीरावाचे हे ढंग चालून सिंदे होळकरांचें भांडण विकोपास जात असतां, इकडे पुण्याच्या कारभारांत जे कांहीं प्रकार घडले ते प्रथम सांगणें जरूर आहे.

७ **प्रतिनिधीचा छळ.**—बाजीरावाच्या कारभारांत प्रतिनिधीचें प्रकरण निष्कारण चिडीस गेलें. परशुराम पंत प्रतिनिधि हा भवानरावचा मुलगा बाप वारला त्याच दिवशीं ता. ३०-८-१७७७ रोजीं जन्मला. नाना फडणिसानें त्यास धाकांत ठेवून त्याचा कारभार व्यवस्थित चालविला होता. सवाई माधवरावाच्या लग्नांत तो पुण्यास आला होता. त्या उपरांत पेशवे व नाना फडणीस वगैरे कित्येक वेळां कऱ्हाडास जाऊन त्याचा पाहुणचार घेत. परशुरामपंताचा स्वभाव आडदांड व स्वच्छंदी होता. त्याची कुसंगत सुटून वळण लागावें म्हणून नानानें त्यास पुण्यास आणून आपल्या देखरेखीखालीं ठेविलें, आणि परवानगीशिवाय पुणें सोडून जाऊं नये अशी त्यास ताकीद केली. बाजीराव पेशवाईवर आल्यावर प्रतिनिधीची हीच व्यवस्था पुढें चालू राहिली. प्रतिनिधि लव्याजम्यानिशीं नजर कैदेदाखल पुण्यास राहत होता. उत्तरोत्तर त्याचा पेशव्याशीं व बाळोजी कुंजर, आबा काळे वगैरे कारभाऱ्यांशीं बेबनाव होऊं लागला. नानाच्या चाकरींतले आरब मोकळे झाले त्यांतले पांचशें स्वार प्रतिनिधीनें आपल्या नोकरीस टेविले. पुढें सर्वच आरब पुण्यांतून काढून लावण्याचा बाजीरावानें हुकूम केला, त्यांत प्रतिनिधीचेही आरब काढून लावणें ओघास आलें. परंतु त्यांच्या पगाराची रक्कम चाळीस हजार चढली होती ती देण्यास प्रतिनिधीला सवड नव्हती. म्हणून आरबांनीं वाड्यांत धरणें धरून पंतास व त्याच्या ४०–५० मंडळीस तीन दिवस पावेतों उपाशीं बसविलें, ( ता. २४–६–१८०० ). 'ते समयीं प्रतिनिधींच्या पदरच्या गृहस्थांनीं शक्त्यनुसार ऐवज उभारून तीस हजार पावेतों भरणा केला. बाकीचा भरणा न होय तेव्हां कित्येकांच्या अब्रू पंतानें घेतल्या. आठ चार दिवस दंगा चालला. सरकारांतून ताकीद वारंवार होऊं लागली कीं, आरब लवकर दूर करणें. पंत कारभाऱ्यांचें ऐकत नाहींत हें कामास येणार नाहीं. महात, खिजमतगार, पखाली यांनीं सांगावें तेंच करावें. सारा दिवस आरबांचे जमातदारांशीं बोलणें खलबतें वगैरे मनस्वी वर्तणूक करावी. दोघी बायका टाकल्या. नाटकशाळा ठेवली, ते जात तेली, लौकिकांत बहुत निंद्य, हें कामाचें नाहीं, अशी ताकीद त्यांस श्रीमंतांची झाली. त्यावरून

पंतानें रागानें चार दिवस अगोदर सर्व मंडळी कऱ्हाडास लावून दिली आणि आपण स्वार गारदी घेऊन निघणार, असें वर्तमान सरकारांत विदित झाल्यानंतर, ' तुम्हीं जाऊं नये. जाऊं लागल्यास पुनः अटकाव होईल, ' असा त्यास हुकूम झाला. तत्राप आग्रहें निघोन जाणार, हा विचार कळतांच, सिद्यांची पलटणें घेऊन सर्जेराव व आत्माराम तांबोळी पंताचे वाड्यास घेरा घालून राहिले. घाटग्यांनीं वाड्यांत जाऊन चार गोष्टी सांगितल्या. आपले लोक आंत घातले. पंत भोजन करीत नव्हते त्यांस भोजन करविलें. पंतांनीं नाटकशाळेचा आग्रह बहुत धरला. इची गत तीच माझी गत म्हणतात. हे गोष्ट विथरास जाईल, खासा बायकोचें दर्शन नाहीं, हा मोठा अविवेक. झाडून लोक वाड्यांत सहाशेंचा जमाव आहे. पंत अडून बसले आहेत,' ( ५-७-१८०० ).

पुढें पंतानें दौलतरावास व सर्जेरावास पत्रें लिहून विनंति केली, ' आमची अब्रू-बेअब्रू सारी तुम्हांपासीं. नाहीं तर काशीयात्रेस जाण्यास निरोप द्यावा. आम्ही अब्रू-साठी मरतों. आबा काळे आम्हांस राहूं देत नाहींत, सारें बुडवितात. आमची अखेर झाली. ' त्यावरून दौलतराव व सर्जेराव यांनीं पेशव्यांजवळ रदबदल केली आणि 'तेलिणीची पोर टाकीन, कारभाऱ्यांच्या सल्ल्याप्रमाणें वागेन, पुण्यांतून जाणार नाहीं,' असें पंताकडून अळेंबळें कबूल करवून पेशव्याचा राग शांत केला, आणि तेवढ्यापुरतें प्रकरण मिटविलें. परंतु पुनः पहिल्यासारखी वर्तणूक व्हावयास लागली, तेव्हां पांचशें स्वार वाड्यांत चढाई करून गेले. झटपट जाली. उभयतांकडील कांहीं लोक मेले. चीजवस्त लुटली. पंत हातीं हत्यारें घेऊन बसले. तेव्हां बाळोजी कुंजरानें जाऊन पंतास सरकार वाड्यांत आणिलें. नाटकशाळा लांबविली. वाडा झाडून लुटला. लाखों रुपयांची नुकसानी झाली. वाड्यांत दीप देखील लावण्यास संकट जालें. पुढें प्रतिनिधीस गोविंदराव काळ्याचे वाड्यांत ठेविलें' त्याचा सरंजाम काढून बाजीरावानें सर्जेरावास दिला. खरें म्हटलें तर वाटेल त्याचा सरंजाम काढून आपण आपल्या मर्जीतल्या इसमास देऊं शकतों, असें सर्वांस जाहीर करण्याचाच बाजीरावाचा हा प्रयत्न होता. परंपरेच्या दृष्टीनें पाहतां सर्वांचेच सरंजाम छत्रपतीकडून पिढीजाद चालत आले होते. ते काढून घेण्याचा हक्क बाजीरावास नव्हता. बदफैली वर्तनाचें कुभांड मुद्दाम बाजीरावानें उभारलें होतें. पण हैराण होऊन पंत नरम आला. पांच लक्षांचा मुलूख सोडून देतों आणि बाळोजी कुंजरामर्फत स्वारीस जाऊन सरकारकामावर हजर राहतों, अशी कबुली लिहून देऊन त्यानें आपली सुटका करून घेतली, ( ऑगस्ट १८०१ ). प्रतिनिधीचें हें प्रकरण पुढें पुष्कळ वर्षें सारखें चालूच राहिलें. बाजीरावानें त्याजवर लढाई केली,

तींत पंताचा हात तुटला, त्यावरून या पंतास पुढें थोटेपंत असें नांव पडलें. ताई तेलिणीनें बापू गोखल्यास हैराण केलें, तोही प्रकार पुढें यथावकाश येईल. नीतिमत्ते-संबंधानें पाहतां बाजीराव व प्रतिनिधि या दोघांत कोणास कोणी हंसण्याचें कारण नव्हतें. प्रतिनिधीच्या अंगीं बाजीरावाचा नेभळटपणा तरी नव्हता; आणि अल्प सामर्थ्यानें त्यानें बाजीरावास सारखें १०–१५ वर्षें हैराण केलें हें कांहीं थोडें नव्हे.

**८ बाजीरावाची तारांबळ** ( १८०१ ).–होळकरानें सिंद्यास हैराण केल्याचें वर्तमान ऐकून बाजीरावानें खुद्द आपण सिंद्याचे मदतीस उत्तरेंत जाण्याचा कांहीं काळ मोठा आव आणिला. खरोखरच जाता तर पुढच्या भानगडी मिटल्या असत्या. स. १८०१ च्या पावसाळ्यांत वारंवार प्रस्थानें वगैरे काढून त्यानें मोठी धामधूम केली. ता. १७-८-१८०१ रोजीं पुण्याहून निघून पंधरा दिवसांनीं तो कोपरगांवास पोंचला. काशीराव होळकराचा सरंजाम त्यानें जप्त केला होता तो ता. १५-६-१८०१ रोजीं मोकळा केला, परंतु पुढील लढायांत काशीरावानें यशवन्तरावास साह्य केल्याचें कळल्यावर पुनः त्यानें ता. २९–१०–१८०१ रोजीं होळकराचा सर्वच सरंजाम जप्त केला. याचा अर्थ असा कीं मराठी राज्यांत होळकरास उभें राहण्यास सुद्धां जागा राहिली नाहीं. मात्र या कृत्याचा परिणाम अगदीं उलट झाला बंधु विठोजीच्या मृत्यूनें यशवंतराव चिडून गेला होता, तो आतां सर्वच होळकरशाही नष्ट झालेली पाहून सिंदे, पेशवे वगैरे सगळ्यांनाच तिलांजलि देण्याच्या उद्योगास लागला. बाजीराव स्वारीस निघालेला ऐकून यशवन्तराव बिलकूल डगमगला नाहीं. उलट सिंद्याचा फन्ना उडविण्याचा प्रयत्न त्यानें नेटानें चालविला. दुसरी मोठी भीति बाजीरावास होती ती अमृतरावाची. होळकर येऊन अमृतरावास पेशवाईवर बसवील आणि आपली दुर्दशा करील या धास्तीनें बाजीराव गांगरून गेला. सिंदे व सर्जेराव निघून गेल्यापासून पुण्यांतील बाजीरावाचा वचक साफ नाहींसा झाला, आणि त्याचा विरोधी पक्ष दिवसेंदिवस बलवान होत चालला. कोपरगांव येथें असतां बाजीरावानें अमृतरावास भिंवडीहून भेटीस आणिलें. ता. २–९–१८०१ रोजीं कचेश्वरीं भेटी झाल्या. पुढें यशवन्तरावावर चालून जाण्याची तर बाजीरावास छातीच झाली नाहीं. अमृतरावास मात्र आपल्या कबजांत ठेवण्याचें योजून त्यासह तो परत पुण्यास आला. तथापि अमृतरावाची व त्याची गोडी झाली नाहीं; किंवा त्यास कैदेंत ठेवण्याचीही बाजीरावास छाती झाली नाहीं. पुढें आठ चार दिवस पुण्यास राहून अमृतराव पुणें

सोडून जुन्नरास जाऊन राहिला, तो पुढील सालच्या अखेरीस यशवन्तराव होळकरानें बोलावल्यावरून पुनः पुण्यास परत आला.

यशोदाबाई व नानाची स्त्री यांस बाजीरावानें पुरंदरच्या किल्ल्यावर ठेविलें होतें. नानाच्या स्त्रीस तेथेंच ठेवून यशोदाबाईस त्यानें फिरून पुण्यांत आणिलें. तेथें सन १८०१ च्या ऑगस्टांत तिचे सर्व नोकरचाकर त्यानें जबरदस्तीनें दूर केले. पुढें अमृतरावाशीं जेव्हां बाजीरावाचा मेळ बसला नाहीं तेव्हां तिला जबरदस्तीनें नेऊन त्यानें रायगडच्या किल्ल्यांत बंदोबस्तानें ठेविलें. जातांना तिजवर बहुत निकर्ष केला ती न जात तेव्हां बाजीरावानीं आपली स्त्री ताईसाहेब, आपांची स्त्री सीताबाई अशा समागमें देऊन स. १८०२ च्या आरंभीं रायगडास पाठविलीं. यशोदाबाईस तेथें कैदेंत ठेवून ताईसाहेब व सीताबाई परत आल्या. रायगडावरच ही अभागी बाई दहा वर्षें कैदेंत झिजून ता. १४-१-१८११ रोजीं दिवंगत झाली. हिचें हृदयद्रावक चरित्र उपलब्ध तपशिलानें स्वतंत्र लिहिलें जाईल, तर त्याजवरून तत्कालीन सामाजिक व राजकीय स्थितीचें चांगलें दिग्दर्शन होईल.

यशवंतराव होळकरानें उत्तरेंत जो मोठा उठाव केला, त्याचा प्रतिध्वनि दक्षिणेंतही उठला. खानदेशांत जिवाजी यशवंत बावनपागे, गंगथडीपासून सोलापुरपर्यंत बाळकृष्ण गंगाधर, विजापुर बागलकोटकडे येसाजी रामकृष्ण, आणि मिरजकडे बाजीबा मोदी यांनीं लुटालूट व जाळपोळ करून दक्षिणेंतील प्रदेश उद्ध्वस्त करून टाकिला. हे सर्व सरदार अमृतरावाचे नांवानें दंगा चालवीत होते, त्यावरून बाजीरावानें करवीरकर छत्रपति व पटवर्धन सरदार यांस निकडीचीं पत्रें लिहून या बंडखोरांचें पारिपत्य करण्याविषयीं हुकूम काढिले. तेव्हां पटवर्धनांनीं आपल्या फौजा आणून ता. २९ व ३०-१२-१८०१ या दोन दिवशीं कृष्णाकांठीं बाजीबा मोदीचा धुव्वा उडवून दिला. त्याच वेळीं बाळकृष्ण गंगाधर पराभव पावून निजामशाहींत पळून गेला. गोपिकाबाईचें माहेरघर म्हणून रास्त्यांचे कुटुंबावर बाजीरावाची मर्जी कधींच नव्हती. रास्त्यांचा द्रव्यसंचय हस्तगत करण्याची बाजीरावाची मोठी इच्छा असून त्यासाठीं माधवराव अनंत रास्ते यास रंगाचे निमित्तानें वाड्यांत बोलावून त्यानें ता. २-४-१८०१ रोजीं कैद केलें. द्रव्य मिळेना म्हणून त्यास ता. ३-१०-१८०१ रोजीं रायगडावर कैदेंत पाठवून रास्त्यांची सर्व जिंदगी वाई पुणें येथील वाडे सुद्धां जप्त करून सरकारांत घेतली. कोरीगड, पांडवगड वगैरे रास्त्यांचे किल्ले बाजीरावानें फौजा

पाठवून हस्तगत केले. रास्त्यांनींही आपले बचावासाठीं लढण्याची शिकस्त केली. माधवराव रास्त्यांचे चार मुलगे होते त्यांस पकडून ठिकठिकाणीं कैदेंत ठेविलें. पैकीं एक मुलगा शनिवार वाड्यांत अटकेंत होता तो पळून तालिकोटाकडे गेला. पुढें जेव्हां होळकरानें येऊन पुणें हस्तगत केलें आणि बाजीरावावर कठिण प्रसंग आला तेव्हां महाडास जातांना बाजीरावानें माधवराव रास्त्यास रायगडावरून मोकळें करून सन्मानानें भेट घेऊन त्याची जहागीर मोकळी केली.

खुद्द रास्त्यांना कैद करणें सोपें होतें, परंतु त्यांच्या ताब्यांत जे किल्ले कोट होते ते कांहीं बाजीरावाच्या हस्तगत झाले नाहींत. बदामी, बागलकोट, तालिकोट, अथणी या दरम्यानचा विस्तृत प्रदेश रास्त्यांच्या ताब्यांत होता; आणि तो मामलेदारांस तारण देऊन त्यांनीं त्यांजकडून कर्जें काढलीं होतीं. त्या सर्व मामलेदारांनीं जूट करून श्रीमंतांवर हत्यार उपसलें. तसेंच पांडवगड, कुवारी वगैरे रास्त्यांचे किल्ले हस्तगत करण्यास बाजीरावास फार प्रयास पडले. कुवारीचा वेढा चार महिने चालला होता व त्यासाठीं बाजीरावास सहा लक्ष रुपये खर्च आला.

रास्त्यांनंतर बाजीरावानें आपला मोर्चा पटवर्धनांवर वळविला. तुमचा सावनूर तालुका बाळोजी कुंजराचे हवालीं करा, असा हुकूम बाजीरावानें पटवर्धनांस केला; आणि तो ताब्यांत घेण्यासाठीं कुंजरमंडळी व बापू गोखले यांस रवाना केलें. तेव्हां चतुरसिंग भोसले वगैरे बाजीरावाचे हुकमानें गोखल्यांस सामील झाले. ह्या सर्व फौजांशीं लढण्याचा प्रसंग एकट्या रामचंद्र आप्पावर आला. बापू गोखल्यानें फार नेट धरून काम केलें, तरी वर्षभर मोहीम लांबल्यानें पटवर्धन अगदीं टेकीस आले. इतक्यांत यशवंतराव होळकर पुण्याकडे चालून येऊं लागला त्याची दहशत पडून, बाजीरावास तूर्त आपलें लक्ष जवळच्या व्यवहारांतून काढावें लागलें, तो प्रकार पुढील प्रकरणीं सांगण्यांत येईल. *

---

* बा. रो. ३६, ७५–७६; खरे; पे. अ.; खंड १०. ५२१–५२७.

# प्रकरण सातवें
## मराठशाहींत इंग्रजांचा प्रवेश
### सन. १८०२

**झाला बंदोबस्त सर्वही पहिल्यासारखा ।**
**परि घरांत शिरला शत्रु सबळ पारखा ।**
**लाल शरीर टोपी अंगीं आठ प्रहर अंगरखा ॥**
**धर्म कर्म ना जात पात स्थल नाहीं बसायाला ।**
**असें अमुन संपूर्ण व्यापला प्राण हरायाला ॥**

प्रभाकर—

१ यशवंतरावाची पुण्यावर चाल. २ यशवंतरावाकडून समेटाचा प्रयत्न. ३ हडपसरची लढाई, बाजीरावाचें पलायन. ४ इंग्रजांची कारवाई. ५ अमृतरावाचा चार महिन्यांचा कारभार. ६ वसईचा तह, मराठमंडळाच्या जुटीची वाटाघाट.

**१ यशवन्तरावाची पुण्यावर चाल,** (मार्च-ऑगस्ट १८०२).— नर्मदोत्तर प्रदेशांत सिंदे होळकरांची वांटणी समसमान होती, ती महादजीच्या वेळेपासून हळू हळू सिंद्याकडेच भोगूं लागली. कोणतेही हक्क सामर्थ्यानें रक्षावे लागतात. होळकर घराण्याचें सामर्थ्य कमकुवत होतांच सिंद्यांनीं त्यास चेपलें. तुकोजीच्या मरणानें आपण निरंकुश झालों असें दौलतरावास क्षणभर वाटलें. थोडी बहुत दहशत मल्हाररावाची होती तोही नाहींसा झाला. विठोजी आणि यशवन्तराव कर्तृत्ववान निघतील अशी त्या वेळीं कोणाचीच अटकळ नव्हती. परंतु आतां तें संकट नुसत्या दौलतरावासच नव्हे तर सर्व मराठी राज्य ग्रासण्यास समर्थ झालें.

यशवन्तराव दक्षिणेकडे चढाई करून येऊं लागला, तसे बाजीरावाचे पंचप्राण कासावीस होऊं लागले. सिंदे दूर गेल्यामुळें रघूजी भोसल्यास जवळ बोलावून आणण्यासाठीं त्यानें नारायण बाबूराव वैद्य यास पूर्वीच नागपुरास रवाना केलें होतें. त्यावर रघूजी भोसल्यानें ता. २६-२-१८०२ रोजीं कळविलें, 'नारायण बाबूराव यांसमागमें खास दस्तुरचें पत्र आलें तें प्रविष्ट होऊन लेखनाभिप्राय अवगत झाला.

त्यासी श्रीधर लक्ष्मण व कृष्णराव माधव यांची बिदा केली आहे. सल्ला मसलतीचे प्रकार यांसीं बोलण्यांत आले आहेत ते सर्व बोलतील.' त्यानंतर ता. २५–८–१८०२ चें रघूजीचें पत्र आलें, कीं 'आपण अन्तःकरणापासून लोभ ममता ठेवून आहेत हें समजोन खातरजमा अधिकोत्तर झाली. येथीलही निस्सीम भाव खचितच आहे. जो बेत उभयतां वकिलांनीं आपल्याशीं केला आहे तो फार चांगला व पोक्त आहे. त्यांत येथून दुसरें व्हावयाचें नाहीं.' या भाषेंत एक बाजूस बाजीरावाचीं आर्जवें तर दुसऱ्या बाजूस भोसल्याचा दुटप्पी डाव व्यक्त होतो.

स. १८०२ च्या मार्च महिन्यापासून यशवन्तरावाच्या स्वारीची पुण्यांत मोठी खळबळ उडूं लागली. वकिलांच्या व मुत्सद्यांच्या वाटाघाटी सुरू झाल्या. 'भोसल्यांचे वकील पुण्यास आले. पाराजीपंतही होळकराकडून आले. वकिलांचे बोलण्यांत बेत बसला नाहीं तर मग भोसले येतील. बोलणीं होतात परंतु मळमळीत. इंग्रजांकडील वकील सिंद्याकडे आले आहेत. दिल्लीचा बंदोबस्त करतों म्हणतात. इंग्रज दिल्लीकडे दंगा करणार.' एप्रिलांत होळकर तापीचे दक्षिण तीरीं आला. सिंद्यांचीं चार पलटणें व फौज बऱ्हाणपुरास गोपाळराव भाऊजवळ आली. ते जमाव करून होळकरावर येणार. होळकरांनीं पुढें न यावें म्हणून त्यांजकडे पाराजीपंताचे विद्यमानें सरकारांतून केशव जनार्दन पाठविले. होळकराचे फौजांनीं मुलखाची बाकी ठेविली नाहीं. यशवन्तराव होळकर महेश्वराहून निघून सेंधव्यास काशीरावास ठेवून भीकणगांवास आला; तेथून थालनेरास तापी उतरून अलीकडे बेटावद येथें मुकाम करून मे महिन्यांत कासारबारीखालीं चाळिसगांव येथें येऊन राहिला. त्याचे पाठोपाठ सिंद्याची फौज चालून येऊं लागली. त्यास अटकाविण्यासाठीं होळकरानें जिवाजी यशवन्त, मीरखान पठाण व फत्तेसिंग माने यांस थालनेरास ठेवून शहामतखान, नागो जिवाजी, गणपतराव नारायण ( शौचे ), आबाजी लक्ष्मण लाड वगैरे सरदारांस पैसा मिळविण्यासाठीं गंगथडीकडे रवाना केलें, तसेंच त्यानें बाजीरावास नम्रतेचीं पत्रें व हत्तीघोडे वगैरे नजराणा पाठविला. बाजीरावानें त्यास उत्तर पाठविलें कीं, 'तुम्ही पुढें येऊं नये. तुमचा व सिंद्यांचा समेट करून देण्यासाठीं बाळोजी कुंजर यांस रवाना केलें आहे.' परंतु बाजीरावानें होळकराबरोबर लढण्याची तयारी अशी कांहींच केली नाहीं. केवळ बोलाचालीच्या टोलवाटोलवीनें त्याचें आपण निवारण करूं आणि कदाचित् निकरावर येऊन तो पुण्यास दाखल झालाच तर कांहीं तरी हिकमत लढवून आपण त्यास घुडावून देऊं, अशी त्यास खात्री वाटत होती. परंतु होळकराची

मजल पुण्याजवळ आली, तेव्हां बाजीराव अगदीं घाबरून गेला. पाराजीपंतास बोलावून त्याजपाशीं त्यानें समजुतीच्या गोड गोष्टी चालविल्या आणि त्याचे मार्फत होळकरास पत्रें पाठविलीं कीं, ' तुम्ही पुढें न येतां मागें तापीवर जावें. म्हणजे तुमच्या तक्रारींचा निकाल तुमचे मनाप्रमाणें करून देऊं, आणि तुमचा सरंजामही मोकळा करूं. ' हें उडवा-उडवीचें बोलणें न समजण्याइतका होळकर मंदबुद्धि नव्हता. सिंद्याची फौज दाखल होई पावेतों कसा तरी त्यास थांबवून धरावा येवढीच बाजीरावाची धडपड होती. वास्तविक पाहतां यशवन्तरावाची खरी करामत बाजीरावास अखेरपर्यंत कळलीच नाहीं. उलट होळकर मात्र बाजीरावास पूर्ण ओळखून होता; आणि त्यास नरम करण्याचा विडा उचलूनच तो दक्षिणेंत आला. पाराजीपंतानें बाजीरावास निक्षून कळविलें कीं, ' सेवेसीं येऊन चार महिने झाले. अद्यापपर्यंत कांहीं एक बंदोबस्त नाहीं. उलट आमच्या नाशाचेच इलाज चालू आहेत तर आम्हांस रजा द्यावी. आम्ही यजमानांकडे परत जातों. ' भोसल्याचे वकील पुण्यास होते त्यांनींही पाराजीपंताचे म्हणण्यास दुजोरा दिला; आणि होळकराशीं सख्य करण्याविषयीं भारी गळ घातली. परंतु बाळोजी कुंजरानें होळकराशीं तेढ धरून प्रकरण समेटावर येऊं दिलें नाहीं. इकडे जे जे म्हणून होळकराचा पक्ष घेऊन बोलूं लागले, त्या सर्वांस बाजीरावानें कैद करून त्यांजवर कहर चालविला. मोरोबादादा व त्याचा मुलगा नाना, समस्त फडके मंडळी, गोपाळराव व कृष्णराव मुनशी वगैरे मंडळीस त्यानें कैदेंत घातलें. कित्येकांस अवघड किल्ल्यांवर रवाना केलें, आणि सरंजामी सरदारांस पुण्यास येण्याविषयीं निकडीचीं पत्रें पाठविलीं. त्याप्रमाणें यशवंतराव पाटणकर, प्रतिनिधींचे कारभारी, विंचूरकर, बाबूराव आंग्रे, धोंडोपंत गोडबोले वगैरे पुण्यास आले. पुरंदरे, पानसे, आबा काळे, रूपराम चौधरी, मनोहरगीर गोसावी वगैरे पुण्याचे आसपास अगोदरच होते. पण ही सर्व मंडळी खोगिर-भरतीची असून त्या सर्वांची संख्या पांच सात हजारांहून जास्त नव्हती, आणि त्यांतही युद्धकला जाणणारा अनुभवी सेनानायक कोणी नव्हता. बापू गोखले थोडा बहुत लायक होता, पण तो सावनूर प्रांतात गुंतल्यामुळें पुण्यास येऊं शकला नाहीं. पटवर्धन तर कोणीच आले नाहींत. त्यांस बाजीरावाचा विशेष तगादा लागला, तेव्हां उभ्याउभ्या येऊन सबबी सांगून निघून गेले. जुन्या सरदारांस दुखविण्याचा जो उद्योग बाजी-रावानें केला तोच आतां त्यास जाचक झाला. त्यानें अनेक नवीन सरदार बनविले, परंतु युद्धकौशल्य नुसत्या हुकमानें थोडेंच तयार होणार ? नगरचा कसाई कादरखान पूर्वी बारगीर होता तो आतां सरदार बनला. अशीं किती तरी नवीन नांवें आहेत तीं

येथें देण्याचें प्रयोजन नाहीं. चतुरसिंग भोसल्यास जवळ बोलावून त्यास पांच हजार फौज ठेवण्याचा बाजीरावानें हुकूम केला. या नवीन सरदारांस खर्चासाठीं सरंजाम नेमून दिले, ते सर्व कागदावर राहिले. सरंजामाचा पैसा उगवून लोकांच्या पदरांत पडेल तेव्हां लोक घरांतून बाहेर पडणार ! सिंद्यानें आपला भरंवशाचा इसम निंबाजी भास्कर यास बाजीरावाजवळ मुद्दाम ठेविलें होतें, तो व बाळोजी कुंजर हेच बाजीरावाची सर्व व्यवस्था लावीत होते. 'बाजीरावाचा मावसभाऊ गोविंदराव परांजपे यास नव्या तोफा पाडण्याची आज्ञा झाली. त्यावरून परांजपे यांनीं पर्वतीखालीं रमण्यांत तोफा ढाळण्याचा कारखाना जारी केला आहे.' जणूं काय तोफांचा कारखाना म्हणजे फुलांच्या माळाच होत. या तजाविजी चालू असतांच कोंकणांत पळून जाण्याची तजवीजही बाजीरावानें भरपूर ठेविली होती. जी कांहीं थोडी फौज पुण्यास जमली ती पांडोजी कुंजर याच्या हाताखालीं देऊन फत्तेसिंग मान्याच्या पारिपत्याकरतां त्यानें रवाना केली.

बाजीराव सर्वथैव बाळोजी कुंजराच्या तंत्रानें चालत होता. बाळोजी व त्याचे साथीदार होळकराचे पक्के द्वेष्टे होते. म्हणून होळकराच्या बोलण्याकडे त्यानीं बिलकूल लक्ष दिलें नाहीं. उलट पदोपदीं ते त्याचा अपमान करीत गेले. होळकराचा वकील पाराजीपंत पुण्यास आला त्याच्याशीं सामान्य शिष्टाचार सुद्धां बाजीरावानें पाळला नाहीं. जून, जुलई व ऑगस्ट हे तीन महिने होळकराचा मुक्काम खानदेशांत होता. तेवढ्या अवधींत त्याच्या सरदारांनीं सर्व मुलूख वैराण करून सोडला. पारोळ्यांतून दोन लाख वसूल केले. एरंडोल जाळून लुटून नाहींसें केलें. यशवन्तरावाच्या सरदारांत फत्तेसिंग माने हा मोठा धाडसी, खाष्ट व दक्षिणचा पूर्ण माहितगार होता. त्यानें आघाडीचा मान पत्करिला. गणपतराव नारायण व शहामतखान हे नासिक प्रान्तीं आले. माने व आबाजी लक्ष्मण लाड ( लखबा दादाचा मुलगा ) यांनीं अहमदनगर प्रान्तांत लुटालूट केली. नगरचा किल्ला व दहा लक्षांचा मुलूख बाजीरावानें सिंद्यास दिलेला असल्यामुळें तो लुटण्यांत होळकरास विशेष अभिमान वाटला. जांबगाव, चांभारगोंदें, सिद्धटेक पर्यंतचा सर्व मुलूख मान्यानें जाळून लुटून फस्त केला. बळवन्तराव नागनाथ, रायाजी व रामजी पाटील, मानाजी शेटे व निंबाजीपंत इत्यादिकांचे वाडे वामोरी वगैरे ठिकाणीं होते ते सर्व अग्नीच्या भक्ष्यस्थानीं पडले. महादजीनें बांधलेला जांबगांवचा सुंदर वाडा आबाजी लक्ष्मणानें खणून काढिला. पुणें प्रान्तांत येऊन मान्यानें गार दौंडावर तळ दिला.

हे प्रकार पाहून बाजीरावाचे मनाची अत्यंत तारांबळ उडाली. 'पाराजीपंतास बोलावून त्याजबरोबर यशवन्तरावास वस्त्रें देऊन समेट ठरविण्यासाठीं कुंजरानें रवाना केलें. हें वर्तमान निंबाजीपंत व दाजी देशमुख यांस समजल्यावर त्यांनीं बाळोजी कुंजरास निकर्ष केला कीं, आमची पंचवीस हजार फौज जालनापुराजवळ जमली असतां तुम्हीं यशवन्तरावाशीं समेट करतां हें काय! असें बोलून वस्त्रें जात होतीं तीं मना करविलीं. दिवसभर वाड्यांत वाटाघाट चालू होती. एक प्रहर रात्रीं श्रीमंत खालीं संध्येस गेले. काल चतुर्थी तृतीय प्रहरीं ( सेप्टेंबर १८०२ ) श्रीमंत बाहेर निघोन दहा पांचांचे घरीं गेले, त्यांत फडक्यांचे व मोरोबादादांचे वाड्यांत गेले. मोरोबाची स्त्री मातुश्री चिमाबाईशीं चार घटका खलबत करून नंतर त्यांचे पुत्र नाना यांस बोलून प्रसन्नमुख करून परत वाड्यांत येऊन कथेस बसले; आणि तेथून मोरोबादादाचे पुत्रास कथेस बोलाविलें.' खुद्द मोरोबादादा या वेळीं धनगड किल्ल्यावर अटकेंत होता. *

**२ यशवन्तरावाकडून समेटाचा प्रयत्न** (सेप्टेंबर, ऑक्टोबर १८०२).—फत्तेसिंग मान्यानें मुलखांत कशी नागवण चालविली त्याचें प्रत्यंतर खालील पत्रांत मिळतें. हें पत्र वेल्हाळाबाई भोसले जिंतीकर इनें नाना पुरंदरे यास ऑक्टोबर १८०२ त लिहिलें आहे. 'दंडवत विनंति. हल्लीं माने यांचें लष्कर आलें, त्यांनीं गांवाची खराबी बहुत केली. आमचा वाडा लुटून नेला, तें ल्याहावयास योग्य नाहीं. सरकारचें म्हणणें पडतें कीं सरंजामी आहेत त्यांस खर्चास काय द्यावयाचें आहे, तर सरंजामाची अवस्था या प्रकारची आहे. इकडे तरी वस्त्रहरण केलें. तिळप्राय चीजवस्त घरांतील निघाली नाहीं. मुलांलेकरांचा योग्यक्षेम चालणें कठिण आहे. आमचा अभिमान सर्वस्वी आपणाकडे आहे.' पैठण, कायगांव, टोकें वगैरे ठिकाणीं होळकराच्या स्वारीनें जे अनर्थ गुदरले त्यांचीं वर्णनें या वेळच्या कागदांत भरपूर आहेत. +

बाजीराव तर सर्वस्वी बाळोजी कुंजराच्या सल्ल्यानें वागत असल्यामुळें यशवन्तरावाचें प्रकरण विकोपास गेलें. विठोजीस क्रूर शिक्षा करण्यांत बाळोजीच अग्रेसर होता, म्हणून त्यास बाजीरावाकडून आपले ताब्यांत घेऊन त्याचे हाल करावे

* खं. १०. ५३४, ५४६, ५८३, ५९२; खरे; पु. द. २. ६०, १२७, १४५, १४९.

+ पु. द. २. १६७; पे. अ.; खरे; खं. १०. ले. ५७०–६१२.

अशी इच्छा कदाचित् यशवन्तरावाची असेल, हें ओळखून बाळोजीनें अखेरपर्यंत यशवन्तरावाची समजूत म्हणून कधीं पाडली नाहीं. बाजीराव व बाळोजी दोघेही चंचल व भित्रे होते. यशवन्तरावाची समजूत काढण्याचा मार्गच त्यांनीं पत्करिला नाहीं. शिवाय सिंदे आपल्या मदतीस धावून येईल अशी त्यांस आशा होती. 'प्राण-सख्या मित्राची भेट कधीं होईल' अशी उत्कंठा बाजीरावास लागून राहिली होती. स. १८०२ च्या पावसाळ्याचे आरंभीं दौलतराव उज्जनीवर असून अंबूजी इंगळे व बाया झांशीकडे होत्या. गोपाळराव चिटणीस मात्र बऱ्हाणपुरास होता. बायांस खूष करण्यासाठीं तेव्हां सर्जेरावास कारभारांतून दूर करण्यांत आलें होतें, आणि यादवराव भास्कर बक्षी हा सर्व कारभार पाहत होता. बायांच्या व यशवन्त-रावाच्या उच्छेदानें दौलतरावाची दौलत संपुष्टांत येऊन गांठी द्रव्य बिलकूल नव्हतें. तथापि बाजीरावाची निकड पाहून त्यानें कर्जवाम काढून सदाशिव भास्कर बक्षी याजला फौज देऊन दक्षिणेकडे रवाना केलें. त्याची व गोपाळरावाची भेट बऱ्हाणपुरास झाली. तेथून बक्षी जालनापुरावरून ऑगस्ट अखेर पैठणास आला. त्याच्या तोंडावर मीरखान पठाणास ठेवून यशवन्तराव होळकर नाशकास आला. सदाशिव भास्कर बक्षी मीरखानाशीं लढत ता. ८ सेप्टेंबर रोजीं नगरास आला. तेथें बाजीराव व कुंजर यांचीं निकडीचीं बोलावणीं त्यास पोंचल्यावरून तो लगेच पुढें पुण्याकडे चालला. इकडे होळकरानें नासिक व सभोंवारचा प्रदेश लुटून फस्त केला. फत्तेसिंग माने बार्शी पानगांवाकडे गेला होता, तिकडून पंढरपुरावरून तो गारदौंडकडे बाजी-रावाच्या फौजेस सामना देण्यासाठीं त्वरेनें आला. पंढरपुर क्षेत्रास त्यानें बिलकूल उपद्रव केला नाहीं. त्या संबंधानें एक लेखक लिहितो, 'बाबा पाध्ये व विठ्ठल पाध्ये गोळवलकर यांनीं देवळांत ब्राह्मण अनुष्ठानास बसवून इतर जनांसह रात्रंदिवस भजन घोष, नामघोष व टाळघोष, नाना वाद्यें, दिंडी पताका, क्षेत्रप्रदक्षिणा व उत्सव करून होते. माने यांनीं मर्यादा उल्लंघन केली नाहीं. एक गज व घोडा अर्पण करून व पूजासंतर्पण करून गेले. श्रीस्वामींचें कौतुक, क्षेत्रसंरक्षण झालें.' इकडे बाजी-रावाच्या फौजा आपले शहावर बारामतीकडे येत आहेत असें पाहून माने त्यांजवर चालून गेला. 'आश्विन शु. १२ (ता. ८–१०–१८०२) रोजीं नाना पुरंदरे व माने यांची लढाई प्रातःकालच्या प्रहर दिवसास * मेडदें येथें झाली. पुरंदरे गोट

* हा गांव बारामतीपासून २ मैलांवर आहे. मेडतकर शाखा बारामतीकर जोशांची प्रसिद्ध आहे.

सोडून चार कोस पुढें चालून गेले. माने यांनीं सांगून पाठविलें, आम्ही जेजुरीस दर्शनास जातों. सरकारचे फौजेशीं अवज्ञा करावयाची नाहीं. तें इकडील सरदारांचे विश्वास न येतां यांनीं तोफांची सुरवात केली. पन्नास गोळे उडत तावत् माने यांनीं आगळिक केली नाहीं. नंतर बेजरब जरीपटक्यावर चालून घेतलें. दोन घटका लढाई झाली. मान्यानें झाडून तोफा नेल्या. गणपतराव पानसे यास जखमा लागल्या. नाना पुरंदरे जरीपटका युक्तीनें काढून सासवडच्या सुमारें आले. पांडोजी कुंजर प्रथमच पळाले ते दोन दिवसांनीं पुरंदऱ्यास मिळाले. मालोजी घोरपडे जखमा लागून पाडाव गेले. पांडुरंगराव बारामतीकर लढाईंत होते ते जखमा लागून एका घोड्यानिशीं औरंगबादेस पळून गेले.' हा पांडुरंगराव पुढें हालअपेष्टेंत स. १८१० सालीं वारला. लढाईनंतर मान्यानें आपला मुक्काम बारामतीस केला. पुढें सहा दिवसांनीं यशवन्तराव होळकर बारामतीवर मान्याची भेट घेऊन तेथून जेजुरीस देवाचें दर्शन घेऊन गारदौंडावर जाऊन राहिला. मान्यानें बारामतीची राखरांगोळी उडविली. बाबूजी नायकाचें तें सुप्रसिद्ध ठिकाण एकवार गजबजलेलें होतें, तें आतां भिकेस लागलें. बारामतीच्या लाढाईंत पडले व जखमी झाले त्यांची यादी पु. द. २ ले. १६४ यांत आहे. मान्यानें जरीपटक्याचें निशाण हस्तगत केलें होतें तें सन्मानपूर्वक पुरंदऱ्याकडे परत पाठविलें; आणि आम्ही तुमचेच आहों, बंडखोर नव्हों, असें यांत दर्शित केलें. आश्विन शु. १२ ची ही अपेशी लढाई पुढें होणाऱ्या युद्धाचा पूर्वरंगच होय. बाजीराव अगदीं भांबावून गेला. पुण्याचे लोक भयभीत होऊन वित्त व प्राण रक्षण्यासाठीं वाट फुटेल तिकडे जाऊं लागले. खुद्द सरकारचा जामदारखाना सिंहगडास गेला. बंदोबस्तासाठीं बाजीरावानें शहरासभोंवार तोफा ठेविल्या. ' पुणें फुटलें. तट्टें व डोल्या मिळत नाहींत. श्रीमंतांनीं रायगडास जाण्याची तयारी केली. तेव्हां ' श्रीमंत होळकराच्या दहशतीनें गेले असा बाहेर बदलौकिक होईल,' असें सांगून बाळोजी कुंजरानें स्वारी तहकूब करविली. बारामतीची लढाई झाली त्याच दिवशीं बाजीरावानें आपलें व बंधूचें कुटुंब रायगडावर पोंचविलें; आणि यशोदाबाईचा बंदोबस्त पक्का केला. रायगड व यशोदाबाई हीं होळकराचे हातीं पडलीं नाहींत, म्हणूनच पुढें अमृतरावाचा मुलगा विनायकराव बापू यास दत्तक देऊन पेशवाईवर आणण्याचा होळकराचा घाट फसला. नाना फडणिसाच्या स्त्रीस सुद्धां तो या वेळीं रायगडावर पोंचविणार होता, पण निघतांना ती अस्पर्श झाल्यामुळें संकटांतून बचावली. सदाशिवराव बक्षी यास शहामतखान पठाणानें नगरावर अडकवून धरल्यामुळें तो लगोलग

पुण्यास येऊं शकला नाहीं. त्यांतून बारामतीच्या लढाईनें सर्वांसच दहशत बसली. यशवंतराव व त्याचे सरदार पुण्याचे रस्ते रोंखून आणि सभोंवारचा प्रान्त लुटून आपला निर्वाह करीत होते. त्यांतून मार्ग काढीत बक्षी ता. २२-१०-१८०२ रोजीं वानवडीच्या तळावर येऊन उतरला. तेथें बाजीरावाचे कांहीं सरदार येऊन त्यास सामील झाले. बक्षीनें बाजीरावास भेटून त्यास पुष्कळ धीर दिला. तो म्हणाला 'आम्ही होळकरास तोफांनीं उडवून देतों, आपण फक्त लढाईचा तमाशा पाहवा. पण तत्पूर्वी थोडें खर्चास मात्र द्या.' त्यावरून बाळाजी कुंजरानें त्यास दोन तीन लाख खर्चास देऊन होळकराशीं लढण्याची तयारी केली. बाजीरावानेंही आपल्या सरदारांस निक्षून ताकिदी केल्या कीं सर्वांनीं झटून बक्षीचें साह्य करावें. विरुद्ध पक्षांच्या या हालचालींवर यशवंतरावाची पूर्ण नजर होती. युद्धकलेंत त्याची बरोबरी करणारा दुसरा इसम त्या वेळीं मराठी राज्यांत नव्हता. हाताखालचे सरदार सुद्धां आजपर्यंतच्या अनुभवानें चांगले तयार झाले होते. शिवाय त्यांच्या अंगीं निकराचा व संतापाचा आवेश संचारला होता. बाजीराव व दौलतराव दोघेही बडे बापके बेटे, स्वतः कर्तृत्व-शून्य, हरेक गोष्टींत दुसऱ्यावर अवलंबून राहणारे, आणि केवळ कपटनीतीनें वेळ मारून नेणारे होते. होळकरास आपल्या दौलतीची दुर्दशा पाहून त्वेष चढला होता, आणि आनुवंशिक करामत दाखविण्याची धमक उत्पन्न झाली होती. एकवार बाजी-रावावर चांगला शह बसवावा, आणि अमृतरावाची कारभारावर स्थापना करून होळकरशाहीची व्यवस्था त्याजकडून लावून घ्यावी, येवढेच त्याचे उद्देश असून त्या संबंधानें अमृतरावाशीं त्याच्या सारख्या वाटाघाटी चालू होत्या. बाजीरावास पदावरून काढण्याचा किंवा त्यास नाहींसा करण्याचा यत्किंचित् विचार यशवन्तरावाचे मनांत नव्हता. कसा झाला तरी तो शिपाईगडी होता. भ्याडपणा धारण करून आयत्या वेळीं दगा देण्याचा त्याचा स्वभाव असता तर त्यानें बाजीरावास पुण्यांतून पळून इंग्रजांचे आश्रयास जाऊं दिलें नसतें. यशवन्तरावाच्या स्वभावाची पारख बाजीरावास कधींच झाली नाहीं. पाराजीपंतास होळकराकडे पाठवून पोकळ बोलाचालींत तो वेळ मारून नेत होता. यशवन्तरावानें बारामतीच्या तळावरूनच निर्वाणीचा निरोप कळविला कीं, 'आपण धनी, आपणाशीं विरोध करण्याची माझी इच्छा नाहीं. सिंद्यांचा व माझा समेट करून द्या. असा समेट झाला तरच इंग्रजांवर दाब बसून राज्याचा बचाव होईल; म्हणून शुष्क वाटाघाटींत कालहरण न करतां आमच्याशीं बोलणें करण्यास तुमच्याकडील बाळोजी कुंजर व दाजीबा देशमुख आणि सिंद्यांकडील निंबाजी भास्कर

व बाबूराव आंग्रे या चौघांस आमचेकडे पाठवावें. उगाच हलक्या माणसास पाठवून मेळ बसणार नाहीं. हे चौघे गृहस्थ आमच्याकडे आल्याशिवाय मी समेटाचें बोलणें करण्यास बिलकूल तयार नाहीं. इतकेंही करून समेट न घडतां लढाईचाच प्रसंग आला तर तींत तुम्हीं स्वतः कोणताही भाग घेऊं नये. सिंदे व आम्ही उभयतां पाहून घेऊं. त्यांतून तुमची लढाई बिघडली तर तुम्हीं पुणें सोडून जाऊं नये. तुम्हांस किंवा तुमचे माणसांस आमचेकडून तिलमात्र इजा पोंचणार नाहीं. सिंद्यांप्रमाणेंच आम्हीही तुमचे एकनिष्ठ सेवक आहों. माझें भांडण सिंद्यांशीं आहे, तुमच्याशीं नाहीं. म्हणून तुम्हीं कोणत्याही पक्षाला मदत करूं नये. सारांश गोष्ट एकच कीं, तुम्हीं सर्व सिंद्यांचे नादानें चालल्यामुळें राज्याचें नुकसान होऊन शत्रु बळावले आहेत, सिंद्यांचें हें दडपण दूर करण्यास मी समर्थ आहें. तुम्हीं फक्त धनीपणाचें नातें संभाळावें म्हणजे आम्हीं सेवकाचें कार्य करून दाखवितों.'

होळकराचें हें निर्वाणीचें बोलणें ता. २३-१०-१८०२ रोजीं सकाळीं बाजीरावास पोंचून त्याची अत्यंत त्रेधा उडाली. कठिण प्रसंगांतच मनुष्याची पारख होत असते. तशी या वेळीं बाजीरावाची होऊन तो कुचकामी ठरला. धनीपणाचा बोज कायम राखून होळकराची समजूत पाडण्याचें धैर्य त्यास झालें नाहीं. उलट होळकराचा निरोप म्हणजे केवळ सुडाची भाषा अशी त्याची समजूत झाली. आजपावेतों होळकर दूर होता तोंपर्यंत त्यास सहज चिरडून टाकूं, अशा ज्या तोंडाच्या वल्गना त्याच्या सारख्या चालू होत्या, त्या सर्व आतां जिरून गेल्या. भीतीनें त्याचे छातींत धडकी भरली. कोणत्या तरी युक्तीनें होळकराशीं मिटतें घेऊन आपण निसटून बाजूस सरावें हा विचार त्याच्या मनांत घोळूं लागला. पण होळकराची समजूत करावयाची म्हणजे बाळोजी कुंजर व निंबाजी भास्कर यांस त्याचे हवालीं करावयाचें. हे तर बाजीरावाहूनही जास्त भित्रे. त्यांस वाटे कीं होळकरानें बाजीरावास जरी अपाय केला नाहीं, तरी तो आपली दुर्दशा केल्याशिवाय खचित राहणार नाहीं. विठोजी होळकरास मारल्याचें पाप त्यास खात होतें. या कठिण समयांत बाजीरावाचे सर्वच सल्लागार त्याच्या तोडीचे त्याच्याच सारखे अंगचोर बनले होते. आपलें व्यक्तीचें काय पाहिजे तें होवो, परंतु पुण्यांत मराठशाहीच्या राजधानींत आपसांतील लढाईचा तमाशा जगास दाखवूं नये आणि राज्याचा बचाव करावा ही भावना एकाच्याही मनांत उद्भवली नाहीं. उलट स्वतःच्या बचावासाठीं राज्याचा नाश करण्यास ते कचरले नाहींत. ते बाजीरावास म्हणाले, ' आपण इतके घाबरतां कां ? आपण स्वस्थ बसा.

आम्ही होळकराचा फन्ना उडवितों.' अशी या मंडळीची वाटाघाट भरपूर एक दिवस बाजीरावाशीं चालू होती. ता. २४ ऑक्टोबर रोजीं बाजीरावानें आपला मेहुणा रघुनाथ धोंडदेव भागवत, कुंजराचा कारभारी आबाजी शंकर, पुण्यांतील सावकार भिवजी नाईक कोल्ते व भोसल्याकडील नारायणराव वैद्य या चौघांस समेटाचें बोलणें करण्यास पाराशर दादाजी बरोबर होळकराकडे रवाना केलें. बोलणें करण्यास गेलेली ही मंडळी दुय्यम तिय्यम प्रतीची सुद्धां नव्हती. होळकरानें त्यांची भेटही घेतली नाहीं. त्यानें एवढाच जबाब कळविला कीं, 'कुंजर वगैरे मंडळीस मजकडे येण्यास भीति कां वाटते ? त्यांस माझा विश्वास पटत नसेल तर मी माने वगैरे पाहिजे ते सरदार ओलीस म्हणून पेशव्यांचे ताब्यांत पाठविण्यास सिद्ध आहें. समेटास मुख्य विरोध बाळोजी व निंबाजी यांचाच आहे. ते मजकडे आल्याशिवाय समेट होत नाहीं. त्याअर्थी आतां हा समेटाचा खेळ पुरे झाला. उद्यां रणांगणावरच काय निकाल लागावयाचा तो लागेल. श्रीमंतांनीं मात्र सर्वथैव स्वस्थ असावें. त्यांची बेअदबी मजकडून तिळप्राय होणार नाहीं. फक्त त्यांची बुद्धि सिंद्यांचे जादूनें भारली आहे ती जादू मी उद्यां तलवारीनें तोडून दाखवितों.' शिष्टाईस गेलेल्या मंडळींनीं परत येऊन हा मजकूर बाजीरावास कळविला. तेव्हां त्यानें बाळोजीची पुष्कळ मनधरणी केली कीं, तुम्हींच जाऊन यशवन्तरावास भेटा. पण या विनवणीचा उपयोग झाला नाहीं. लढाईत होळकरास उडवून देतों, ही आपली घमेंडखोर भाषा कुंजरानें सारखी चालू ठेवली. हे दोन तीन दिवस शनिवार वाड्यांत खलबतांची सारखी धामधूम उडून राहिली होती. त्यांत सदाशिवराव बक्षीही मोठ्या हिमतीचें बोलणें करीत होता, आणि इतर सर्वच त्यास दुजोरा देत होते. 'होळकर चढून गेला आहे. तो अत्यंत बंडखोर आहे. धन्याचे हुकूम सारखे धाब्यावर बसवून तो प्रतिक्षणीं आपला अपमान करीत आहे. श्रीमंतांनीं त्यास बिलकूल भीक घालूं नये. आम्ही हा कांटा साफ काढून टाकितों,' अशी या सिंदे पक्षाची भाषा होती तर उलट होळकराकडील पाराजी-पंत, गोपाळराव गानू वगैरे मंडळी पेशव्याशीं विनवणी करीत होती, कीं 'आपण न्याय करावा. खरा राजद्रोही व बंडखोर कोण याचा निवाडा करा. उगाच आतताई मार्ग स्वीकारण्यांत कोणाचाच फायदा नाहीं.' भोसल्याकडील मंडळी सुद्धां होळकराचे बाजूनेंच बोलत होती.

स. १७९६ पासून सिंद्याच्या लष्करी सामर्थ्यावर अवलंबून बाजीरावानें आज-पावेतों कसाबसा आपला निभाव केला. पण सिंद्याचें हें सामर्थ्य उडवून देण्यास

होळकर पुढें येतांच बाजीराव गांगरून गेला. स्वतःची अक्कल चालविण्याचा प्रसंग जेव्हां मनुष्यावर येतो तेव्हां त्याची योग्यता कळते. या आणीबाणीच्या प्रसंगीं पुण्यांत नुसतें ठांसून बसण्याचें सुद्धां धाष्टर्य बाजीरावाचे अंगीं दिसून आलें नाहीं. त्यानें निंबाजी भास्कर व कुंजर यांस इतकेंच कळविलें, कीं ' तुमचे चित्तास उत्तम वाटेल तें तुम्हीं करावें. माझे चित्तास येईल तसें मी करीन.' या वेळीं बाळोजी कुंजर* आपण होऊन धाडसानें यशवंतरावाकडे जाता तर त्याचा परिणाम कांहीं अंशीं इष्ट झाला असता, असें वाटल्याशिवाय राहत नाहीं.*

**३ हडपसरची लढाई व बाजीरावाचें पलायन** ( २५-१०-१८०२ ).– अशा अनिश्चित स्थितींत शके १८२४ च्या दिवाळींतील अभ्यंगस्नानाचा दिवस

---

* कुंजरांचें घराणें पुणें जिल्ह्यांत ३६० गावांची पाटीलकी करून राहत होतें. त्याचें उत्पन्न सालाचें दोन हजार रुपये होतें. त्या घराण्यांतील बाळोजी हा आबा पुरंदरे याच्या घरांत मित्रभावानें लहानाचा मोठा झाला, आणि त्यांच्या तर्फेनें स. १७६४ च्या सुमारास कारकुनी कामावर रुजू होऊन पुढें खानदेशांत नासिराबाद परगण्याची कमाविसी त्यास मिळाली. परशुरामभाऊ बाजीरावास घेऊन जुन्नराहून पुण्यास येण्यास निघाला, तेव्हां बाळोजीस भाऊनें बाजीरावाच्या तैनातीस आपल्या तर्फेचा नोकर म्हणून नेमून दिलें. पुण्यास आल्यावर बाजीरावास पैशाची जरूर लागली असतां बाळोजीनें आठ हजार रुपये लगेच त्यास कर्जाऊ दिले. तेव्हां पासून त्याजवर बाजीरावाची मर्जी बसली, आणि पुढें त्यास त्यानें आपला दिवाण नेमिलें. या दिवाणगिरीचा पगार दरसाल तीस हजार रुपये होता. इंग्रजांचा आश्रय न करितां दौलतरावाचेच साह्यानें आपला निभाव करावा असें त्यानें बाजीरावास सांगितलें; पण तें बाजीरावानें मानलें नाहीं. तेव्हां पासून तो सिंद्याचे पदरीं जाऊन राहिला. पुण्याची सरपाटीलकी त्याजला बाजीरावानें करून दिली. फत्तेसिंग माने व बाळकृष्ण गंगाधर यशवंतरावाचे बाजूस होते, त्यांस पुढें बाळोजीनें युक्तीनें बाजीरावाचे पक्षांत आणिलें; आणि जिवाजी यशवंताचा पाडाव करून त्यास निजामाचे हद्दींत घालवून दिलें. यामुळें बाजीरावाची त्याजवर मर्जी विशेष बसली. बाळोजी धोरणी व पेशव्याचा अभिमानी होता. ( खरे, Forrest वगैरे. )

सुभानजी कुंजर
- बाळोजी
  - पांडुरंग
  - सदाशिवराव
  - नारायण
- काळोजी

उजाडला. या दिवसाच्या रुधिरस्नानांत मराठशाही अंतर्धान पावणार होती. धन-त्रयोदशीच्या रात्रीं उभय फौजांनीं आपापल्या बाजूची शिस्त कसोशीनें ठरवून संग्रामाची सिद्धता केली. त्यापूर्वीं वकिलांकरवीं होळकराचा निरोप पुनः आला होता कीं, ' उदईक सहा घटका वाट पाहीन नंतर लढाई. ' वाड्यांत आज प्रातःकालपासून अन्नपाण्याची गडबड भारी झाली. बाळोजी कुंजर व निंबाजी भास्कर यांनीं श्रीमंतांस विनंति करून सहा घटका दिवसास वाड्यांतून काढून पलटणांत नेलें. प्रहर दिवसास होळकरांनीं आपले तोफखान्यास आज्ञा केली कीं, जरीपटका आमचा खावंद. त्यांजकडून २५ बार निघत तोंवर तुम्हीं स्वस्थ असावें. त्याप्रमाणें घडलें. जरी पटक्याजवळ कुंजर होता. त्यानें प्रहर दिवसास तोफा सुरू करून लढाईस प्रारंभ केला. दोन प्रहरपर्यंत एकसारखा मार मारिला. बारा घटका दिवसास श्रीमंत उभयतां बंधु वानवडीस जरी पटक्याजवळ गेले. चार घटका तेथें होते. तों सिंद्याकडील पलटणें कचकरलीं. धीर न धरतां सरकारचा जरीपटका निघाला तेव्हां श्रीमंत सुद्धां सिंद्यांची फौज पश्चिमेकडे पर्वतीचे अंगाम आली. दोन घटका श्रीमंत पर्वतीस होते. होळकराचे फौजेच्या टोळ्या अंगावर येतांना दिसूं लागतांच श्रीमंत वडगांवचे बागेंत व तेथून डोणजास गेले.'

फतेसिंग माने, भवानीशंकर व नागो पंडित यांस यशवंतरावानें निरनिराळ्या कंपूंच्या मदतीसाठीं नेमिलें होतें. शिवाय शहामतखान, मीरखान व जिवाजी यशवन्त बावनपागे हे त्याचे पाठीराखे होते. प्रथम सिंदे पेशव्यांच्या साठ हजार स्वारांनीं जरी-पटक्यासह लढाईच्या मैदानावर घोड्याच्या अनीना उचलून एकदम मुकाबल्यास येऊन हल्ला केला. तेव्हां होळकरानें आपल्या पलटणांच्या जमेतींत येऊन जिनसी तोफखाना घेऊन खुद्द सिंद्याचे कंपूवर चालून घेतलें. त्याबरोबर नबाब मूर्तजाखां, बाजदअलीखां, शहामतखां व नजीबखां वगैरे पठाणांनीं व इंग्रज व्हिकर्स ( Vickers ) यानें बंदुकींच्या व तोफांच्या गोळ्यांचा असा वर्षाव केला, कीं विरुद्ध पक्षाचा व्यूह पार ढांसळून त्यांच्यांत गोंधळ माजून गेला. चार घटका तलवार चालली. निदानीं खुद्द यशवन्तरावांनीं पायउतारा होऊन दोन गोलंदाज ठार केले. यशवन्तरावास उजव्या हाताच्या चवड्यावर भाल्याची व उजवे गालावर तलवारीची अशा जखमा लागल्या. सिंद्याकडील दहा पलटणांपैकीं पांच साडेपांच, हजार मनुष्य ठार. शिवाय जखमी तीन चार हजार, शिवाय घोडेराऊत जखमी याप्रमाणें लढाईंत कामास आले. होळकराकडील तीन हजार घोडे व स्वार मिळोन

ठार व कंपूंतील दोन तीन हजार ठार शिवाय जखमी याप्रमाणें झाले. सिंद्याकडील दोन ताम्रमुख सरदार एक डॉझ ( Daws ) व दुसरा असे व होळकराकडील एक इंग्रज अंमलदार हार्डिंग असे ठार झाले. सिंद्याचा सेनापति सदाशिवराव बक्षी जखमी होऊन ठार झाला. मालोजी घोरपडे यांस जबर जखमा लागल्या. बाबूराव आंग्रे जखमा लागून कुलाब्याकडे पळून गेले. यशवन्तरावाचे शिपाईगिरीची व खंबीरीची शर्थ झाली. सर्व रणांगणावर त्याची नजर सारखी होती. प्रत्येकाची हालचाल केवळ त्याच्याच हुकमानें होत असे. प्रत्येक हल्ला तो स्वतः पुढें होऊन चढवी. कोठेंही आणीबाणीच्या प्रसंगीं तो सर्वांच्या आघाडीस जाऊन छातीठोक उभा असे. श्रीमंतांचे अनेक सरदार व मुत्सद्दी लढाईंत हजर होते, ते सर्व त्या प्रसंगांतून यजमानाचें अनुकरण करून सुरक्षित बचावले. कारण त्यांजवर होळकरानें लगटच केली नाहीं. बाजीरावाचा पाडाव करावा अशी त्याची इच्छा नव्हती. त्याचा सर्व रोख सिंद्याचे फौजेवर होता. त्यास मात्र त्यानें केव्हांही दया दाखविली नाहीं. या भयंकर प्रसंगांत सिंद्याकडील मनुष्यांस कोणी त्राता राहिला नाहीं, अशी अवस्था झाली. स. १८०२ सालची ही दिवाळी अस्तमानपर्यंत अन्न देखील नाहीं अशी महाराष्ट्रांत प्रत्येकास आठवण राहाण्याजोगी गेली. कवाइती पलटणांचा मोठा भ्रम लोकांस वाटत होता तो यशवंतरावानें या लढाईंत साफ नाहींसा केला. सरकारच्या व सिंद्याचा पलटणांस होळकरांचा वेढा पडून त्यांच्या सर्व तोफा होळकराकडे पाडाव आल्या. बुणगेंही झाडून लुटलें गेलें. मुख्य लढाई कंपू कंपूंचीच झाली. अल्पावकाशांत दहा हजार माणसांचा संहार झाला ही गोष्ट ध्यानांत घेतां एवढा रक्तपात फारच थोड्या लढायांत झाला असेल. लढाईचा प्रारंभ हडपसरापाशीं होऊन कवडीच्या व वानवडीच्या दरम्यान मुख्य संग्राम झाला. यावरून या लढाईस हडपसर, घोरपडी, वानवडी, अशीं भिन्न नांवें पडलीं आहेत.

होळकर पुण्याकडे चालून येऊं लागला तेव्हांच बाजीरावानें कोंकणांत पळून जाण्याची तयारी अगोदरपासून करून ठेविली होती. परंतु सल्लागारांच्या आग्रहावरून होळकराचा पाडाव होईल या आशेनें तो भीतभीतच लढाईचे दिवसापर्यंत पुण्यांत राहिला. शिवाय त्यास पळून जाऊं देऊं नये असा बंदोबस्त खुद्द बाळोजी कुंजरानें ठेविला होता. लढाईच्या दिवशीं भल्या पहांटे वाड्यांत दिपवाळीच्या स्वयंपाकाची गर्दी उडून सकाळींच भोजन उरकून तो लढाईचा तमाशा पहावयास बाहेर पडला. भवानी पेठेंत येतांच वर्तमान समजलें कीं लढाई बिघडली. तेव्हां परत न येतां तो

तसाच पर्वतीचे माळावर गेला. तेथें कुंजर वगैरे मंडळी पळून येऊन त्यास मिळाली. इतक्यांत हरनाथ होळकर आपणांस अडविण्यास येत आहे असें कळतांच बाजीराव त्या रात्रीं वडगांवचे बागांत राहिला आणि मंगळवारीं सिंहगडचे पायथ्याशीं डोणजास पोंचला. तेथें त्यास उपास न पडावा म्हणून होळकरानें भोजनाचें साहित्य पुण्याहून पाठविलें. डोणजास पुष्कळ वाटाघाट करून शेवटीं बाळाजीपंत पटवर्धन व बापूजी विठ्ठल चापेकर यांनीं इंग्रजांचा आश्रय करावा असा आग्रह धरल्यामुळें पलायनाचाच मार्ग बाजीरावानें निश्चित केला. आईच्या पोटांत असतांच जी विद्या तो पढला तीच या वेळीं त्यास फळास आली.

श्रीमंतांनीं परत यावें म्हणून यशवंतरावाचें बोलणें लागलें. परंतु कार्तिक शु. १ बुधवार दिपवाळीचे मध्यरात्रीं उभयतां श्रीमंत, कारभारी व सिंद्याकडील लहान मोठी मंडळी मिघोन डोणजाहून मढेघाटानें कोंकणांत उतरून रायगडास गेली. पिच्छावर होळकराची, फौज बारा पंधरा हजार पठाण वगैरे सडे गेले. बिरवाडी, रायगड, व महाड यांचे दरम्यान श्रीमंतांचा मुकाम एक महिना झाला. तेवढ्या मुदतींत इंग्रजांचा आश्रय मिळविण्याचें ठरवून बाजीरावानें त्यांच्याशीं कराराचें बोलणें चालविलें; आणि पुढें यशवन्तराव आपणांस पकडणार असें खाचित दिसतांच आणि २८ नोव्हेंबर रोजीं कर्नल क्लोज पुणें सोडून मुंबईस गेला असें कळतांच, बाजीराव महाडाहून हर्णैस व तेथून सुवर्णदुर्गास गेला. सुवर्णदुर्गाच्या बंदरांत ता. १ डिसेंबर रोजीं तो गलबतांत बसून तसाच तेथें दोन दिवस राहिला. तेथून पुढें रेवदंड्यास उतरून तेथें १२ डिसेंबरपर्यंत त्यानें मुक्काम केला. ता. १३ डिसेंबरास पुनः गलबतांत बसून तो ता. १५ रोजीं ठाण्यास व ता. १६ रोजीं वसईस पोंचला. मध्यंतरीं १० डिसेंबर रोजीं त्यानें प्रथम मुंबईस जाऊन गव्हर्नराची भेट घेतली.

कोंकणांत बाजीरावाबरोबर बरेंच मोठें लटांबर गेलें. दादासाहेबांचे लेकावळे कृष्णसिंग, हैबतसिंग व लक्ष्मणसिंग बरोबर होते त्यांस बाजीरावानें परत पाठविलें. राज्यांत व शहरांत आबा काळे कारभार करूं लागला. त्याचे मदतीस विश्वनाथ भट मामा व चिंतोपंत देशमुख होते. जुन्नराहून अमृतरावास आणण्यास यशवन्तरावानें माणसें पाठविलीं. 'श्रीमंत गेल्यामुळें होळकरासही मनसबा पडला आहे. बाळोजी कुंजर व निंबाजी भास्कर यांनीं सल्ला दिला कीं, जलचराशीं मैत्री जोडावी. यांच्याशिवाय होळकराचें पारिपत्य करील असा दुसरा कोणी नाहीं. कोणत्याही अटी इंग्रजांनीं घातल्या तरीं त्या कबूल कराव्यात.' सर्व राज्य इंग्रजांकडे गेलें

तरी चालेल, पण होळकराचें पारिपत्य केलें पाहिजे ही या मंडळीची घोषणा बंद पडली नाहीं. यजमान गैरमार्गास लागेल तर त्यास ठिकाणावर ठेवण्याचें काम कारभाऱ्यांनीं करावयाचें असतें. पण येथील प्रकार अगदीं उलट झाला. बाजीरावाचा थोडा बहुत कल समेटाकडे दिसतांच तो त्यांनीं खोडून काढिला. होळकर आपले हाल करील येवढ्या भीतीस्तव त्यांनीं बाजीरावास बदसल्ला दिली. वसईचा तह घडून येण्यास बाजीरावापेक्षां हे त्याचे दोन सल्लागार जास्त जबाबदार आहेत. बाजीराव इंग्रजांचा आश्रय घेण्यास अत्यंत नाखुष होता. शक्य तोंवर त्यानें आपलें राज्य सोडून बाहेर पाऊल ठेविलें नाहीं. वसईस सुद्धां तो आपल्या हद्दींतच होता, मात्र अशा तयारीनें होता, कीं जरूर लागतांच इंग्रजांचा आधार सांपडावा. त्याची पडती कळा पाहून आपल्या फायद्याचे करार त्याजकडून कबूल करविण्यांत इंग्रजांनीं शिकस्त केली. कर्नल क्लोजशीं ता. १६ डिसेंबर रोजीं त्यानें तहाचें बोलणें सुरू केलें. एकेका कलमाची विचक्षणा कैक दिवस सारखी अहोरात्र चालली. इकडून होळकरानेंही बाजीरावाचें मन वळविण्यांत कसूर ठेविली नाहीं. पुण्यांतील सर्व जाणत्या मंडळींचें असेंच म्हणणें होतें कीं, राज्याची घडी पुनः नीट बसविण्यास ही संधि फार उत्कृष्ट आहे. विनाकारण होळकराचें भय बाळगून श्रीमंतांनीं स्वार्थी लोकांच्या नादीं लागून राज्यनाश करूं नये. पानसे, पुरंदरे वगैरेंचा या गोष्टीस पाठिंबा होता. बाजीराव पर्वती सोडून चालू लागतांच या मंडळींनीं त्यास सारखी टोंचणी लाविली कीं, अमृतरावास आणून होळकराची समजूत काढा. या मंडळींच्या भिडेखातर सदाशिवपंत ओगल्यास बाजीरावानें अमृतरावाकडे पाठविलें सुद्धां. पण कुंजराची* अंतस्थ सल्ला त्यास जास्त पटून डोणजाहून परत पुण्यास येण्याऐवजीं त्यानें घांटाखालीं कोंकणांत प्रयाण केलें. त्यामुळें पुण्यांत कारभाराची व जमलेल्या फौजांची पांगापांग झाली. बाजीराव कोंकणांत उतरतांच बाळोजी कुंजर व निंबाजी भास्कर हे बाजीरावाच्या संरक्षणासाठीं घांटाच्या तोंडावर फौज घेऊन सज्ज राहिले. त्यांस हुसकून देऊन बाजीरावास हस्तगत करण्याचा प्रयत्न

* ही सल्ला बाळोजी कुंजराची नसावी. उलट पक्षीं यशवन्तरावास भेटून त्याची समजूत काढा, पण इंग्रजांचा आश्रय करूं नका, असें बाळोजी कुंजर अखेरपर्यंत बाजीरावास पढवीत सांगत होता, असें वर्णन आहे; आणि वसईस बाजीरावानें इंग्रजांचा आश्रय करतांच बाळोजी तेथून लगेच सिंद्याकडे निघून गेला. यापुढील त्याचा आयुःक्रम अहर्निश राज्यरक्षणाचा होता हें पाहतां वरील प्रकार जास्त संभवनीय दिसतो.

मीरखानानें करतांच बाजीराव दक्षिणेकडे सुवर्णदुर्गाजवळ कुर्णीच्या ( हर्णै ? ) किल्ल्यावर गेला, म्हणून मीरखानाचा प्रयत्न साध्य झाला नाहीं. गलबतांत बसल्यावर इंग्रजांनीं त्यास वसई जवळ घोडबंदर येथें राहण्यास सांगितलें. दरएक ठिकाणीं बाजीरावास तोफांची सलामी देऊन खूष ठेवावें अशा ताकिदी इंग्रजांनीं आपल्या ठिकठिकाणच्या अधिकाऱ्यांस व जहाजांस दिल्या होत्या. महाडास गेल्यावर बाजीरावाचा मुक्काम बहुतेक बिरवाडीसच झाला. गोपिकाबाईचा चुलत बंधु खंडेराव रास्ते कोंकणचा सरसुभेदार हा आपली फौज घेऊन बाजीरावाचे संरक्षणास राहिला.

यशवन्तरावाचे सर्व डाव आजपावेतों बरोबर पडत गेले. पण बाजीरावास त्यानें हस्तगत न केल्यामुळें त्याची बाजू अखेरपावेतों लगंडी राहिली. बलात्कारानें त्यास हस्तगत करण्याची मुबलक संधि यशवन्तरावास नोव्हेंबर अखेर पावेतों होती. परंतु धन्याशीं दांडगाई अगर बेइमान करावयाचें नाहीं ह्या होळकराच्या उच्च भावनेचा फायदा बाजीरावानें घेतला. सामोपचारानें त्यास वळविण्याची यशवन्तरावानें शिकस्त केली. पुण्यास परत येण्याचें बाजीरावानें योजिलेंही होतें. पण कुंजर व निंबाजी भास्कर या दोघांपुढें त्याचें कांहीं चाललें नाहीं. बाजीराव पुण्यास येता तर पुढील राजकारणाचें स्वरूप वेगळें झालें असतें यांत शंका नाहीं.

यशवंतरावानें वानवडीस सिंद्याचे वाड्यांत मुक्काम ठेविला, आणि त्यानें आपले सरदार पुण्याभोंवतीं तळ देऊन ठेविले. प्रथम त्यानें शहरास बिलकूल उपद्रव केला नाहीं. हरनाथसिंग, नागो जिवाजी व शेखजी या तिघांस त्यानें पुण्याचे बंदोबस्तास नेमिलें. सिंद्याचे लोकांस पळून जाण्यास संधि मिळूं नये म्हणून होळकरानें शहराची नाकेबंदी केली, आणि त्यांचा माग काढून नाश केला. अंबूजी इंगळ्याचा वाडा महाळुंग्यास होता, तो लुटून जाळला. बाजीरावाच्या सल्लागाराचीं घरें लुटलीं, आणि अनेकांस कोरड्याच्या माराखालीं झोडपून काढिलें. चिंतोपंत देशमुख व वैजनाथभट मामा भागवत यांचे इतके हाल केले कीं, ते वाचून अंगावर रोमांच उभे राहतात. पूर्वी सिंद्यानें पुण्यांतील जुन्या मंडळीचा विध्वंस केला तर आतां होळकरानें नव्यांचा फन्ना उडविला. मिळून जुने नवे सर्वच भरडले जाऊन भिकेस लागले. नंतर पुढील कारभाराचा विचार होळकरानें चालविला. यशोदाबाई रायगडावर कैदेंत होती, तिला आणण्याचा त्यानें प्रयत्न केला, पण बाजीरावाच्या सक्त बंदोबस्तांतून ती बाहेर पडूं शकली नाहीं. मात्र नाना फडणिसाचे पक्षांतली जी मंडळी ठिकठिकाणीं कैदेंत पडली होती त्या सर्वांस होळकरानें सोडून पुण्यास आणिलें. मोरोबादादा, फडके बंधु, नारोपंत चक्रदेव, बजाबा










# सह्याद्रींतील रहदारीचे घाट.

शिरोळकर वगैरेंस एकत्र जमवून होळकरानें त्यांच्याशीं पुढील व्यवस्थेच्या मसलती चालविल्या. त्यासाठीं अमृतरावास आणण्यास मंडळी गेली होती, परंतु बाजीरावाच्या दहशतीमुळें पुण्यास येऊन राज्यकारभाराचा कोणताही कार्यभाग अंगावर घेण्यास तो अत्यंत नाखूष होता. तथापि मोरोबादादा, बाबा फडके वगैरे मंडळींनीं विशेष आग्रह केल्यावरून तो जुन्नराहून ता. ७·११·१८०२ रोजीं पुण्यास आला. यशवन्तराव वीस हजार फौज व तोफखाना घेऊन त्यास सामोरा गेला. भेटीचा समारंभ उत्तम प्रकारचा होऊन व अत्यंत सलगीचीं भाषणें होऊन खुषीच्या तोफांचे शंभर आवाज केल्यावर मुकामास आले. जुने अम्मलदार जितके होते त्यांस हुडकून काढून त्यांजकडे पहिलीं कामें सांगितलीं. अमृतरावाकडून सर्व सरदारांस पत्रें गेलीं. या संधींत होळकराचा सरदार पाराशर दादाजी वाघ* पुण्यांत बाजीरावाशीं बोलणें करण्यांत होता तो दोन दिवस ज्वर येऊन कार्तिक वद्य ८ गुरुवारीं ता. १८·११·१८०२ रोजीं मरण पावला. नाशकास खंडोपंत वर्तक होता त्याचाही काल झाला.

**४ इंग्रजांची कारवाई.**–पुण्यास या वेळीं कर्नल क्लोज इंग्रज रेसिडेंट होता. तो सरळ व भला मनुष्य असून त्याजवर लॉर्ड वेल्स्लीचें दडपण नसतें तर त्यानें सिंदे-होळकरांची समजूत पाडून पुण्याचा कारभार सुरळीत करून दिला असता. परंतु लॉर्ड वेल्स्लीनें त्याला वर्तनस्वातंत्र्य बिलकूल ठेविलें नाहीं. यशवंतरावास कोणत्याही प्रकारें

* भवानी शंकर म्हणतो, '**पाराशर दादाजी** वकिलीच्या कामाला लायक, सुज्ञ आणि उत्तम भाषण करणारा होता. होळकर दरबारांत तो वागलेला असून त्यानें पेशव्यापाशीं आपली कामगिरी चातुर्यानें व लीनतेनें केली. परंतु बाजीरावानें त्याचा उपयोग करून घेतला नाहीं.' यांचे उपनांव गोहलकर, राहणार साकुरें. मुलाचें नांव दादो पाराशर. वंशज इंदुरास आहेत. नारो गणेशाच्या हाताखालीं रावजी महादेव व्यास फडणीस होता. त्याचे मार्फत पाराशर दादाजी होळकराचे नोकरींत आला. लाखेरी व पाटण येथील लढायांत तो तुकोजीरावाबरोबर हजर होता. त्याचें व दुसऱ्या मल्हाररावाचें वांकडें होतें. अर्थात् हा काशीराव होळकराचे तर्फेनें पुण्यास राहत असे. मल्हाररावाचे मृत्यूनंतर तो यशवंतरावाकडे आला. त्याचा बाप दादाजी महादेव हा चिमाजी आपाबरोबर वसईच्या स्वारींत होता. पाराशर दादाजीच्या स्त्रिया दोन, त्यांनीं दोन निराळे पुत्र दत्तक घेतले. पैकीं एक साकुरीकर इनामदार व दुसरे वाघ असे दोन वंश आज इंदुरांत नांदत आहेत. पानिपतावरील मोहिमेंत खजिना घेऊन चुकून अब्दालीचे छावणींत जाणारा पाराजीपंत तो हाच असावा.

दुखवूं नये अशी त्यास ताकीद होती. स. १८१४त क्लोज मरण पावला तेव्हां एलफिन्स्टननें त्याजबद्दल खालील अभिप्राय व्यक्त केला आहे. 'क्लोजच्या एवढा गुणसमुच्चय सहसा एकत्र आढळत नाहीं. धिप्पाड व सुदृढ शरीर, शान्त डोकें, चलाख बुद्धि, अढळ धैर्य, अचल नीतिमत्ता, अप्रतिम कर्तव्यनिष्ठा आणि डामडौलाचा तिरस्कार इत्यादि गुणांत साध्या व सच्छील वर्तनाची भर पडलेली असा याच्यासारखा गृहस्थ अलीकडच्या काळांत क्वचित्च आढळतो.' हडपसरची लढाई होऊन बाजीराव पुणें सोडून गेला तेव्हां क्लोज तेथें होता. यशवन्तरावास लढाईत जखमा झालेल्या ऐकून त्याचे समाचारास क्लोजनें माणसें पाठविलीं, आणि मोठ्या स्नेहभावानें त्यास मेजवानीचें आमंत्रण दिलें. यशवन्तरावासही इंग्रजांशीं स्नेहभाव ठेवण्याची इच्छा होतीच. तेव्हां क्लोजचें आमंत्रण स्वीकारून तो मेजवानीस गेला. त्या प्रसंगीं साहेबानें त्याचा उत्तम पाहुणचार करून सर्वांस पोशाख व जिन्नस नजर करून आदरानें निरोप दिला.*

बाजीरावानें संकटांत येऊन आपल्याकडे धाव घ्यावी म्हणून लॉर्ड वेल्स्लीचे आज चार वर्षें सारखे प्रयत्न सुरू होते, ती संधि एकदांची आली, तेव्हां तिचा पुरेपूर उपयोग करून घेण्याचा वेल्स्लीनें निश्चय केला. मराठी राज्य पुढें नांदावें असा एकही प्रयत्न त्यानें केला नाहीं, ही गोष्ट त्या वेळच्या इंग्रजी कागदांत स्पष्ट होते.

बाळोजी कुंजर व निंबाजी भास्कर लढाईत होते ते निभावून पुढें बाजीरावास मिळाले. नंतर बाजीरावानें बीरवाडीहून आपले दोन वकील नारोपंत व बापूजीराव यांस मुंबईस गव्हर्नराकडे बोलणें करण्याकरितां पाठविलें. त्यांजबरोबर बाजीरावानें स्वदस्तुरचें पत्र दिलें होतें तें असें:—'ता. ३०-१०-१८०२. आमचा चाकर होळकर व दुसरे कित्येक इसम आमचे विरुद्ध ऊठउठून बंडखोरी करूं लागले, त्यामुळें आम्हांस पुणें सोडून महाडास येणें भाग पडलें. पण येथेंही हे बंडखोर आम्हांस गांठून भलताच प्रकार करण्यास चुकणार नाहींत, या कारणास्तव आपला आश्रय करण्याचा इरादा धरून आम्ही आपणांस असें कळवितों, कीं या बंडखोरांपैकीं कोणी आम्हांस आपले ताब्यांत मागतील तर तुम्हीं तें बिलकूल मान्य करूं नये; किंवा तुम्हीं आम्हांस आपलेजवळून निघून जाण्यास सांगूं नये; किंवा आमचे मनांत निघून जाण्याचें आल्यास त्यास तुम्हीं अटकाव करूं नये. या अटी तुम्हांस मान्य असतील तर तुम्हीं आमचे खर्चाची तजवीज करावी, म्हणजे आम्ही तुमच्या आश्रयास येऊन राहतों. तुमचें उत्तर आल्यावर आम्हीं येथून निघण्याचें करूं. मात्र या अडचणीच्या प्रसंगांतून निभावून जाण्यासाठीं तुम्हीं आपलीं

*भ. शं. रो. पृ. ९२; Forrest; खरे; पे. अ.; धा. रा. च; भा. व. श.

मोठीं लढाऊ जहाजें भरपूर दारू गोळा देऊन महाडचे बंदरांत पाठवावीं. त्यांजबरोबर एक सज्जन व शूर इंग्रज गृहस्थ आमच्या मर्जीनुसार वागेल असा पाठवावा. जास्त खुलासा हें पत्र घेऊन जाणार नारो गोविंद अनवटी ( आवटी ? ) हे करतील. यांचेच बरोबर महाडास गलबतें पाठवावीं, म्हणजे जरूर पडल्यास आम्ही त्यांचा उपयोग करून आपल्याकडे निघून येऊं'. यानंतर ता. ४-११-१८०२ रोजीं पुण्याहून क. क्लोजनें बाजीरावास पत्र पाठविलें तें असें. 'आपण घांट उतरून सावधगिरीनें समुद्रतीरीं जावें. मी देखील लवकरच पुणें सोडून मुंबईस जाण्याचे विचारांत आहें. कोणत्या वेळेस काय होईल याचा नेम नाहीं, सबब आपण अहोरात्र सावध राहिलें पाहिजे हें सांगणें नकोच.' या वेळीं मेजर माल्कम् हा लॉर्ड वेल्स्लीचा सेक्रेटरी असून कांहीं कामानिमित्त मुंबईस आला होता. तेथें गव्हर्नर डंकननें त्यास बाजीरावाचें पत्र दाखवून त्या बाबतींत माल्कम्चा लेखी सल्ला विचारला, तो त्यानें विचारपूर्वक व विस्तृत लिहून दिला तो सर्वच वाचण्याजोगा आहे. त्याचा सारांश असाः—ता. ५-११-१८०२. 'अत्यंत मतलबाच्या व भित्रेपणाच्या वर्तनामुळें बाजीरावाच्या हातीं आज काडीची सत्ता राहिलेली नाहीं. त्यानें आजपावेतों कंपनी सरकाराचें शत्रुत्वच संपादन केलें आहे. आजपर्यंत त्याला सिंद्याचे जाचांतून सोडविण्याचे जेवढे म्हणून उपाय आपण योजिले त्यांजकडे त्यानें मुद्दाम दुर्लक्ष केलें. हल्लीं सुद्धां एकदम इंग्रजांकडे आश्रयार्थ येण्याऐवजीं त्यानें सिंद्यासच सर्व फौजेसह तांतडीनें दक्षिणेंत बोलाविलें आहे. या सर्व गोष्टींचा विचार करितां माझी अशी खात्री आहे कीं बाहेरचा आधार साफ तुटल्याशिवाय बाजीराव आपले रक्षणास आमची फौज केव्हांही ठेवणार नाहीं. प्रत्यक्ष जिवावर बेतेल किंवा कैदेंत पडण्याची पाळी येईल तरच तो आमची पायधरणी करूं लागेल. त्याच्या छातीवर आमच्या फौजेचें दडपण कायम बसल्याशिवाय दक्षिणेंत शांतता नांदेल किंवा इंग्रजी अम्मल निर्बाध राहील असें मला वाटत नाहीं. म्हणून बाजीरावाचा हा सर्व कावा ओळखून बाजीरावाशीं तैनाती फौजेचा तह अशा कुशलतेनें करून घ्यावा, कीं तो सर्व तऱ्हेनें चांगला बांधला जाईल. मात्र असें करितांना सर्व गोष्टी त्याच्या कलानें घ्याव्या, त्यास रुष्ट किंवा नाराज यत्किंचित् करूं नये.'

बाणकोट येथें कॅप्टिन केनडी म्हणून इंग्रजांचा एक अम्मलदार होता. त्याजकडे गव्हर्नरानें बाजीरावास आणण्यासाठीं ता. ५-११-१८०२ रोजीं हरक्यूलिअन जहाज रवाना केलें. जरूर पडल्यास बाजीरावास कर्ज देण्यासाठीं बरोबर दोन लाख रुपयांची

रकम दिली होती. यापूर्वीच कॅप्टिन केनडीनें ता. १–११ रोजीं मुंबईस असें लिहून कळविलें होतें कीं, ' पेशवा, चिमाजी आपा व बाळोजी कुंजर हे काल महाडास येऊन दाखल झाले. सुवर्णदुर्गचा किल्लेदार बाजीरावास आंत घेईना. त्यानें असा जबाब दिला कीं हल्लींच्या अंदाधुंदींत धनी कोण व कोणाचे हुकूम मानावे हें मला कळत नाहीं. सिंहगड व रायगड येथील किल्लेदारांनीं सुद्धां बाजीरावास वर घेतलें नाहीं. कारण यशोदाबाईस नेण्याकरितां होळकराचे सरदार मीरखान व शहामतखान चालून येत होते, त्यांची या किल्लेदारास मोठी दहशत पडली.'

पुण्यांत क. क्लोजचें वर्तन मोठ्या खुबीचें होतें. होळकर व अमृतराव यांस त्यानें बिलकूल दुखविलें नाहीं. त्यांनीं क्लोज यास पुष्कळ आग्रह केला, कीं तुम्ही पुणें सोडून जाऊं नये. त्यांस क्लोजनें असा जबाब दिला कीं, ' तुम्हीं एकदम पुणें सोडून निघून या, तेथें राहूं नका, ' असा मला वरिष्ठांचा हुकूम आला आहे, तेव्हां मला येथून गेल्याशिवाय गत्यंतरच नाहीं. माझा निरुपाय आहे. ' असें सांगून तो पुण्याहून निघून गेला. क्लोज पुण्यास राहता तर अमृतरावास इंग्रजांचा पाठिंबा मिळून मराठ्यांचें राज्य पुण्यास आहे असा देखावा दिसला असता. हा समज नाहींसा करण्यासाठीं तो आग्रहानें पुण्याहून निघून गेला. जबरदस्तीनें त्यास पुण्यांत ठेवून घेणें होळकरास शक्य वाटलें नाहीं. बाजीरावानें पुणें सोडतांच होळकरानें शहराचा बंदोबस्त यथायोग्य केला. अमृतराव पुण्यास येण्यास खुषी नसतां होळकरानें त्यास आग्रह करून आणिलें. मागें रघुनाथराव पुण्यांतून निघून गेल्यावर बारभाईच्या वेळेस जी परिस्थिति उत्पन्न झाली, तशीच ती पुनः तेथें या प्रसंगीं उद्भवली, मात्र बारभाईप्रमाणें आतां इंग्रजांस दूर ठेवण्यास पुण्यास नानाफडणीस नव्हता. होळकर व अमृतराव यांस हातांशीं धरण्यापेक्षां खुळचट बाजीरावच आपल्या जास्त उपयोगी पडेल असें ताडून त्यालाच क्लोजनें आश्रय दिला. असें करितांना होळकरास त्यानें यत्किंचित् दुखविलें नाहीं. यामुळें पुढें सिंदे व भोसले यांची स्थिति बावरल्या-सारखी झाली. आपल्या बातम्या बाहेर फुटूं नयेत म्हणून क्लोजनें सर्व ठिकाणच्या इंग्रजांस सांकेतिक भाषांत पत्रें लिहिण्याचा गुप्त इशारा दिला होता. बाजीरावासही त्यानें शक्य तोंपर्यंत आपली हद्द सोडून जाऊं नका असें बजाविलें, आणि खुबीनें त्यास इंग्रजांच्या आश्रयास येण्याची भर दिली.

होळकरानें आपला खास वकील भास्करराव बाजीरावाकडे महाडास पाठविला, कीं आपण निर्धास्तपणें पुण्यास परत यावें. परंतु हा प्रकार श्रीमंतांस पटला नाहीं.

त्यांनीं सांगितलें, 'सिंद्याशीं व तुमच्याशीं आम्हांस कांहीं कर्तव्य नाहीं. इंग्रज बहादुर आमच्या स्नेहभावाच्या शरती स्वच्छ अंतःकरणानें पाळीत आहेत, लवमात्र फरक करीत नाहींत. तुम्हीं मात्र आतां आपले संरक्षणाची काळजी बाळगावी.'

इंग्रजांकडेच बाजीरावानें धाव कशी व कां घेतली हें समजून घेणें जरूर आहे. इंग्रजांचा आश्रय केला कीं आपलें स्वतंत्र राज्य संपलें ही गोष्ट बाजीरावही ओळखून होता, म्हणून महाडाहून निघण्याचें त्यानें शक्य तितकें लांबणीवर टाकिलें. यशवंतराव व अमृतराव आपणास निर्माल्यवत् करून जबरदस्तीनें पाहिजे तसा कारभार चालवितील अशी बाजीरावास मोठी भीति वाटत होती. स्वतःची नालायकी ओळखणारें त्याचें मन त्यास सारखें खात होतें; आणि शेवटीं इंग्रजांकडे गेला तेव्हां सुद्धां त्यास अशी आशा वाटत होती, कीं एकदां हा प्रसंग निभावला म्हणजे कोणत्या तरी युक्तीनें आपण इंग्रजांचे कचाट्यांतून पार पडूं. सुवर्णदुर्ग अगर विजयदुर्ग येथें जाऊन किल्ल्यांचे आश्रयानें कांहीं काल ढकलावा, असा त्याचा विचार नोव्हेंबरच्या आरंभीं होता. 'श्रीमंत महाडास आहेत. चार महागिऱ्या आणिल्या आहेत. चार रोजांनीं अमृतराव श्रीमंतांकडे बोलण्यास जाणार, यशोदाबाईस रायगडाहून पुण्यास आणावयाची योजना आहे. श्रीमंतांस हा बेत कळतांच स्वतः रायगडास जाऊन बाईसाहेबांचा बंदोबस्त करून माधवराव रास्ते यांस बरोबर घेऊन परत आले. रास्ते यांस सोडून वस्त्रें दिलीं आणि फौज जमा करून आपले लक्षांत वागावें असें ठरविलें.'

'कप्तान केनडी इंग्रज बाणकोटास होता तो महाडास येऊन श्रीमंतांस भेटला. होळकरांनीं पठाणाची फौज महाडास रवाना केली ही बातमी जातांच, कार्तिक वद्य ३० तारीख २५-११-१८०२ रोजीं श्रीमंत महाडाहून पायवाटेनें सुवर्णदुर्गास गेले. खंडेराव रास्ते खर्चाची पुरवणी करीत बरोबर होते. बाणकोटवाले इंग्रजांचा विश्वास न ये, यास्तव एक कोस जलमार्गें जाऊन तेथून पायमार्गें किल्ले हर्णैस गेले. जातांना पानसे, विंचूरकर, पुरंदरे, बिनीवाले व अलीबहादराचा लेक वगैरे मंडळीस तुम्हांस जिकडे समजेल तिकडे जावें असें सांगून महाडाहून परत पाठविलें.' बाजीराव सुवर्णदुर्गास गेल्यावर होळकराची फौज मढ्या घांटानें महाडास उतरली, हें वर्तमान कळतांच उभयतां श्रीमंत रास्त्यांकडील वसईचे तरांड्यांत बसोन रेवदंड्यास गेले. तारवांत बसल्यामुळें आपासाहेबाचा वाखा झाला. वाऱ्यानें तारूं हाटलें म्हणून मंडळी सुद्धां रेवदंड्यास आले. इंग्रजांचा आश्रय करूं नये, मी सिंद्यास घेऊन येतों असें सांगून बाळोजी कुंजर सुवर्णदुर्गाहून निघून गेला. रेवदंड्यास बाबूराव आंग्रे येऊन

भेटले. त्यांनीं होळकरांचें राजकारण आणिलें, परंतु तें सोडून श्रीमंतांनीं इंग्रजांचें राजकारण पत्करिलें.'

आपणांवर होळकराची पठाणी फौज येते ही बातमी ऐकतांच बाजीरावानें महाडाहून इंग्रजाकडे जाण्याची निकड चालविली ती कोणासच पसंत पडली नाहीं. चीमाजीआपानें तर या गोष्टीचा साफ निषेध केला. त्यानें हट्टच धरला कीं आम्हीं एक तर इंग्रजांच्या नाहीं तर अमृतरावाच्या कैदेंत पडावें असा समय प्राप्त झाला आहे. त्यास अमृतरावाची कैद काय वाईट? इंग्रजांच्या कैदेनें स्वातंत्र्य व अब्रू दोनही जातील. उलट पक्षीं अमृतराव व होळकर आपलेच आहेत. त्यांचे कैदेंत गेल्यानें स्वातंत्र्य जाईल पण अब्रू तरी बचावेल. हा सल्ला बाजीरावास बहुतेक पसंत पडला होता. पण त्याची स्थिति या वेळीं सर्वथा भुतानें पछाडल्यासारखी झाली होती. 'शहामतखान पठाण जवळ आल्याचें कळतांच धीर सुटून श्रीमंत सुवर्णदुर्गास गेले. तेथेंही पठाण निकड करून येतात असें कळतांच बायकामुलें सुवर्णदुर्गावर ठेवून दोघे बंधु जहाजांत बसून रेवदंड्यास गेले, आणि तेथून पुढें कांहीं दिवसांनीं वसईस पोंचले. उभयतां श्रीमंत रेवदंड्याहून मुंबईस जाऊन तेथें मेजवानी घेऊन वसईस आले. तेथें क० क्लोजनें त्यांची गांठ घेतली, आणि मार्गशीर्ष वद्य ९ शके १७२४ ता. १८.१२.१८०२ च्या सुमुहूर्तावर बाजीरावानें तहाची वाटाघाट सुरू केली, ती १०-१२ दिवस क्लोजचे मार्फत गव्हर्नराशीं चालली; आणि इंग्रजांची फौज मदतीस घेण्याचा वसईचा तह त्या सालच्या शेवटल्या दिवशीं बाजीरावानें पुरा करून दिला.'

यशवन्तराव होळकरास दारूचा नाद जडलेला असून निशेंत असला म्हणजे तो आपले गुप्त बेत वाटेल त्यास सांगत सुटतो असें इंग्रजांनीं लिहून ठेविलें आहे. या वेळीं जंजिऱ्यास सीदी जमरूड अधिकारी होता, तो यशवन्तरावाचे बाजूनें वागून महाडाहून बाजीरावास पकडून आणण्याच्या बेतांत होता. बाजीरावाचा दुसरा एक वकील रघुनाथराव नांवाचा कर्नल क्लोजजवळ राहत असे, त्यास इंग्रजी चांगलें येत असून तहाच्या वाटाघाटींत बाजीरावानें त्याचा चांगला उपयोग करून घेतला.

बाजीराव पुण्यास परत न येईल तर निदान त्यानें आपली हद्द सोडून इंग्रजांचे हद्दींत जाणें होळकर व अमृतराव यांस इष्ट वाटत होतें. कारण जोंपर्यंत जरीपटका घेऊन तो आपल्या हद्दींत फिरत होता तोंपर्यंत त्याचा पेशवाईवरील हक्क नष्ट होत नव्हता. परहद्दींत गेल्याबरोबर पेशवाईस धनी नाहीं असें मानून दुसरा मालक करण्यास अमृतराव व होळकर मोकळे होते. ही गोष्ट बाजीरावही जाणून होता,.

म्हणून शक्य तोंवर आपली हद्द सोडून न जातां वसईस राहूनच त्यानें पुढील सर्व व्यवस्था ठरविली.

अमृतरावाचाही वकील मुंबईस होताच, त्याचें नांव रामचंद्र असें इंग्रजी लेखांत आहे. वसईचा तह ठरत असतां इंग्रजांस मोठी भीति वाटत होती ती अशी, कीं सिंदे होळकर व भोसले हे सर्व एक जूट करून दुसरा पेशवा राज्यावर बसवतील आणि सर्व मिळून आपल्याशीं सामना करण्यास येतील. असा प्रयत्न सिद्धीस न जाऊं देण्याची त्यांनीं विशेष खबरदारी घेतली.

**५ पुण्यास अमृतरावाचा चार महिन्यांचा कारभार** ( नोव्हेंबर— मार्च १८०३ ).–स. १७९६ च्या अखेरीस बाजीरावास पेशवाईपद मिळालें. तोंपर्यंत अमृतराव सुद्धां त्रिवर्ग बंधु एक विचारानें एकत्र राहत होते. वडील बंधूचा मान बाजीराव अतोनात राखीत असे. पूर्व वहिवाटीस अनुसरून आपण कारभार करून राज्याची वृद्धि करावी अशी धमक अमृतरावास वाटत होती. पण बाजीरावास पेशवे पद मिळाल्यावर स्वेच्छाचारापलीकडे त्यास कशाचीही पर्वा वाटत नाहीं असा अनुभव येऊन, त्याच्या या राज्यबुडव्या वर्तनाचा अमृतरावास अत्यंत वीट आला; आणि तेव्हांपासून बाजीरावास आळा घालण्याची संधि आली असतां ती त्यानें वायां जाऊं दिली नाहीं. यामुळें दोघां बंधूंचें अत्यंत वितुष्ट आलें. यशवंतराव पुण्यास आल्यावर तर त्याचा कळस झाला. चिमाजी आप्पा स्वतः कर्तृत्वशून्य असून त्यास बाजीरावानें वर्तन स्वातंत्र्य दिलेंच नाहीं. चिमाजीची एक सुद्धां स्वतंत्र हालचाल त्या दहावीस वर्षांतील नजरेस येत नाहीं. बाजीराव महाडाकडे गेल्यावर अमृतरावानें त्यास परत येण्याविषयीं पत्रें व निरोप वारंवार पाठविले, आणि भावी अनर्थाची सूचना दिली. त्यास उत्तर म्हणून बाजीरावानें अमृतरावास कोंकणांत आपल्याजवळ भेटीस बोलाविलें. त्यास जवळ आणून कोठें तरी कायम अटकेंत ठेवावा असा बाजीरावाचा मानस होता. पण भावाचा हा डाव ओळखून अमृतराव त्याचे भेटीस गेला नाहीं. पुण्यास बसून यशवंतरावाच्या व जुन्या मुत्सद्यांच्या साह्यानें तो राज्याची व्यवस्था करूं लागला. अमृतरावाच्या हातीं मराठी राज्याचीं सूत्रें जातील तर हिंदुस्थानांत आपला निभाव लागणार नाहीं, असा स्पष्ट अभिप्राय खुद्द से. क्लोजनेंच लिहिलेला आहे. म्हणून बाजीरावानें इंग्रजांचा आश्रय केला, त्या ऐवजीं तो पुण्यास येऊन अमृतराव व यशवंतराव यांस जवळ घेऊन राज्याचा उद्योग करता, तर त्याला इंग्रजांचे पदरांत जाण्याची कांहीं जरूर नव्हती. खुद्द दौलतरावानें सुद्धां

बाजीरावास धीर दिला कीं, 'तुम्ही भिऊं नका. थोडे दिवस निभाऊन घ्या. तों मी येऊन पोंचतों आणि यशवंतरावाचा बंदोबस्त करतों.' इंग्रजांचे कबजांत जाण्यापेक्षां बाजीरावानें यशवन्तरावाचे कबजांत जाणें तितकें वाईट नाहीं, असाच दौलतरावाचा समज होता. अनेक अडचणींमुळें दौलतरावाचें येणें लवकर घडलें नाहीं आणि बाजीरावानें उतावळ करून वसईचा तह पुरा करून दिला. या तहानें बाजीरावानें इंग्रजांची मदत घेतली ती फक्त अमृतराव, यशवंतराव, पटवर्धन सरदार वगैरे आपल्या बंडखोरांचा बंदोबस्त करण्याकरितां घेतली; सिंदे व भोसले या आपल्या दोस्तांचा पाडाव करण्याकरितां घेतली नाहीं, ही गोष्ट पुढें व्यक्त होईल.

ता. १२ नोव्हेंबर रोजीं अमृतरावानें पुण्यास येऊन होळकराच्या तंत्रानें कारभार हातांत घेतला. त्यानंतर बरोबर चार महिन्यांनीं ता. १३-३-१८०३ रोजीं यशवंतरावानें पुणें सोडून उत्तरेकडे कूच केलें. मध्यंतरीं डिसेंबर अखेरीस वसईचा तह पूर्ण होऊन नवीनच परिस्थिति उत्पन्न झाली. तो प्रकार ध्यानांत येण्यासाठीं या चार महिन्यांच्या अवधींत पुण्यास काय प्रकार घडले तें प्रथम सांगितलें पाहिजे.

अमृतराव व यशवंतराव जरी एकमतानें वागत होते, तरी उभयतांसही अनेक उपाधि जाचीत असून त्यांमुळें प्रसंगानुसार त्यांचे खटकेही वारंवार उडत. कारभाऱ्यांच्या व होळकरांच्या शनिवारवाड्यांत दररोज बैठकी होऊन नानाप्रकारची चर्चा सुरू झाली. होळकरास मोठी अडचण पैशाची. प्रचंड भुकेबंगाल फौज पदरीं बाळगून तो पैशाच्या अडचणींत आला. त्यानें अमृतरावास कळविलें, 'मीं येऊन तुमचा बंदोबस्त करून दिला, सिंद्यांचा पाडाव केला, आतां माझे खर्चाची वाट काय ती लावा. एक कोट रुपये तुम्हीं कबूल केले आहेत ते ताबडतोब द्या'. यावरून पुण्यांत लोकांवर पट्ट्या बसवून पंचवीस लाख वसूल करण्याचा ठराव कारभाऱ्यांनीं केला. वसुलीचें काम हरिपंत भावे यास सांगितलें. त्याच्या मदतीस होळकरानें आपले सरदार नागो जिवाजी, हरनाथसिंग व शेखजी असे दिले. या सरदारांच्या पठाणांनीं पुणें शहरांत मारझोड करून अशी कांहीं दंगल उडवून दिली, कीं पुण्याच्या लोकांस आपण यमपुरींत वास करीत असल्याचा अनुभव आला. 'गांवांत एकच हाक झाली. कोणी तांब्या ठेवून पैसा देत नाहीं. पैसा न मिळाल्यास पठाणांचे हवालीं करितात. प्राणांशीं गांठ आहे, ब्राह्मण म्हणजे तुच्छ, श्रीहरीचा कोप प्रजेवर झाला. होळकराचे लोकांनीं तमाम शहर लुटून घरोघर खणत्या लावून द्रव्य, भांडें, सोनें, रुपें, जवाहिर, कापड यांची लूट केली. तोफखाना लुटला. सोन्याची अंबारी अमृतरावांनीं होळकरास

दिली. पुढें राजकारण सिद्ध होत नाहीं असें अमृतरावास दिसों लागलें, तेव्हां त्यांनींही रात्रीस लोक व कारकून पाठवून लोकांच्या घरांत शिरून घरें खणून चीजवस्त जें सांपडलें तें आपल्या डेऱ्यास नेत गेले. पुण्यांत कोणी गृहस्थ नामांकित पाहून त्याजवर पठाणांस वरात देऊन पाठवावें, पठाणांनीं त्यांस धरून मारहाण मनस्वी करावी. वीरेश्वरभट कर्वे व जिवाजीपंत नेने मारतां मारतां मेले. याप्रमाणें शहर बेजार झालें. पौषासून चैत्र वद्य १४ पावेतों चार महिने अमृतरावाचे दरवडे पुण्यास चालू होते. हरि भाव्यानें लोकांचें सामान लुटून ब्राह्मणभोजनें घातलीं. चिंचवडास बहुत उपद्रव लागला. ब्राह्मण विष खाऊन मरतात. दर असामी एक तोळा अफू पदरीं बांधून आले होते. होळकरांनीं आज्ञा वंदन करून तेच बैठकेस मना चिठ्ठी देऊन चिंचवडास हुजरे पाठविले.' पैसे उकळण्याची ही गलिच्छ कहाणी वाचकांच्या कायम परिचयाची असल्यामुळें शेंकडों पानांपैकीं वरील अल्प उतारे दिलेले पुरे आहेत. तीन महिने अनर्थ करून होळकरानें पन्नास लाख रुपये वसूल केले. परंतु आणखी पन्नास लाखांची भर पाहिजे होती, त्यासाठीं त्याची नजर कर्नाटकाकडे वळली. प्रतिनिधीपासून दहा लक्ष वसूल करण्यास मान्यास पाठविलें, तेव्हां त्याचा व मान्याचा संग्राम कैक दिवस चालला. परंतु लवकरच यशवंतरावास पुणें सोडून जावें लागल्यामुळें तो विषय संपला.

पेशवाईचा शिक्का कोणाचे नांवें करावा, म्हणजे पर्यायानें पेशवाईचा मालक कोणास करावें, हा दुसरा महत्त्वाचा प्रश्न उपस्थित झाला. होळकराचें म्हणणें पडलें, कीं आम्हीं शिकस्त करूनही बाजीराव पळून इंग्रजांच्या आश्रयास गेले, तर आपण आतां त्यांचा नाद सोडून अमृतरावाचा मुलगा विनायकराव बापू यास यशोदाबाईचे मांडीवर देऊन, त्यास बाळाजी माधवराव या नांवानें पेशवाईचीं वस्त्रें द्यावीत. हा विचार अमृतरावास पसंत पडला नाहीं. त्याचें म्हणणें कीं बाजीरावानें पदत्याग केला नाहीं तोंपर्यंत परत येऊन व्यवस्था करण्याची संधि त्यास द्यावी; आणि तशी व्यवस्था घडण्यापूर्वी मराठे सरदारांचें एक मंडळ तयार करावें. सिंदे, होळकर, गायकवाड, भोसले, पटवर्धन व रास्ते एवढेच महत्त्वाचे सरदार मराठी राज्यांत या वेळीं होते. पैकीं गायकवाडानें अगोदरच इंग्रजांचा आश्रय केला होता. पटवर्धन व रास्ते अमृतरावास अनुकूल होते. भोसल्याची अनुकूलता होळकरानें मिळविली होती; आणि सिंद्याशीं गोडी करण्याचा प्रयत्न त्यानें आतां चालू केला. त्यानें सिंद्यास लिहिलें कीं, 'पेशवे इंग्रजांचा आश्रय करणार, एणेंकरून प्रसंग

आणीबाणीचा आहे. तुमचा आमचा समेट या समयीं झाला तरच तरणोपाय आहे. तरी पेशव्यास परत आणून एकीचा प्रयत्न करावा.' परंतु होळकराशीं स्नेह करण्याची बुद्धि दौलतरावास या वेळीं झाली नाहीं. होळकरानें पुण्यास सिंद्याचे फौजेचा पाडाव केल्यापासून कारभारी यादवराव भास्कर बक्षी याजवर दौलतरावाची इतराजी होऊन सर्जेरावाकडे कारभार आला. त्यानें होळकरास तुच्छ समजून बाजीरावास भर दिली कीं, 'तुम्हीं महाडास जाऊन बचाव केला हें ठीक झालें. पण आतां पुढें इंग्रजांकडे जाऊं नये. महाडासच राहावें. आम्ही लवकरच येऊन होळकराचा बंदोबस्त करतों.' असें बाजीरावास कळवून दौलतरावानें सैन्यभरतीचा उद्योग झपाट्यानें चालविला. मुसा पीरूस त्यानें दिल्लीहून ताबडतोब उज्जनीस बोलाविलें; रामचंद्र भास्कर बक्षी व बेगम समरूचीं पलटणें बऱ्हाणपुरास रवाना केलीं; आणि आपण स्वतः १८०२ च्या डिसेंबरांत उज्जनी सोडून दक्षिणेकडे येण्यास निघाला. बऱ्हाणपुरास त्याचा सरदार गोपाळराव चिटणीस होता त्यानें खानदेशांतील होळकराचा मुलूख मारून ताराज केला.

श्रीमंत तर हातचे गेलेच, पण रायगडावर यशोदाबाई होती तिला तरी सोडवून पुण्यास आणण्याविषयीं होळकरानें शिकस्त केली. शहामतखानानें सुवर्णदुर्गाहून पेशव्यांच्या स्त्रियांना आणि त्यांचे बंदोबस्तास बाळाजीपंत पटवर्धन व धुळोजी कुंजर होते त्यांसही ताब्यांत घेऊन महाडास आणविलें. तेथून खानानें रायगडचे किल्लेदारास धमकी देऊन यशोदाबाईस सोडविण्याचा उद्योग केला. परंतु किल्लेदार होळकराचा हुकूम मानीना. उलट त्यानें यशोदाबाईची कैद जास्त सक्त केली. पुढें रायगडास वेढा घालावा तर इंग्रजांचीं लढाऊ जहाजें बाणकोटच्या खाडींत येऊन राहिलीं होतीं, त्यांतील लोक किल्लेदाराच्या मदतीस येणार असा रंग दिसतांच, लढाईचा प्रसंग टाळून व यशोदाबाईस न घेतां शहामतखान ता० २०-१-१८०३ रोजीं बाजीराव व चिमाजी यांच्या स्त्रियांस घेऊन पुण्यास परत आला. अमृतरावानें आपल्या भावजयांस सामोरें जाऊन वाड्यांत आणिलें; आणि तेथें त्यांची व्यवस्था उत्तम ठेविली. यापूर्वीच विनायकरावाचे नांवानें वस्त्रें आणण्यासाठीं माणसें साताऱ्यास गेलीं. बरोबर होळकरानें फत्तेसिंग माने यास दिलें होतें. साताऱ्यास बाजीरावाचा हस्तक बाळाजी माणकेश्वर बंदोबस्तास होता. तो अंतस्थपणें छत्रपतीस बिथरवूं लागला. कारण, 'अंगठी वरील हिरा नवीन बसवावयाचा' म्हणजे बाजीरावास काढण्याची आवई उठल्याचें मागें सांगितलें आहे. बाळाजी माणकेश्वरानें विनायकरावाचे नांवें वस्त्रें देण्यास छत्रपतीकडून हरकत घातली. तेव्हां मान्यानें तोफखाना घेऊन साताऱ्यावर चाल केली. त्याबरोबर

छत्रपतीनें मार्गशीर्ष व॥ १३ ( ता. २२-१२-१८०२ ) रोजीं वस्त्रें दिलीं. बाजीराव वसईस तहाची वाटाघाट करीत असतां इकडे हीं वस्त्रें पुण्यास दाखल झालीं. परंतु यशोदाबाई पुण्यास हजर नसल्यामुळें दत्तविधान होईना, आणि दत्तविधान नाहीं म्हणून बाळाजी माधवराव हें नांव धारण करतां येईना. त्यामुळें आलेलीं वस्त्रें तशींच पर्वतीवर ठेवण्यांत आलीं. या अपमानामुळेंच कीं काय छत्रपतीवर वस्त्रदानाचा प्रसंग इतउत्तर पुनः कधीं आला नाहीं.

बाजीरावानें पुणें सोडिलें आणि अमृतराव पुण्यास आला, त्या वेळेपासून मराठी राजकारणाचे दोन भिन्न ओघ दोन दिशांनीं वाहूं लागले. एक बाजीरावाचा इंग्रजांस धरूं कीं सोडूं अशा द्विधावृत्तीचा; आणि दुसरा अमृतरावाचा, सर्व मराठ मंडळाची जूट बनवून मराठी राज्य सांवरण्याचा. यापुढील प्रत्येक बाबतींत ह्या दोन प्रयत्नांचें अनुसंधान दृष्टीसमोर ठेविलें पाहिजे. बाजीराव अमृतरावाचे तंत्रानें वागता, तर सिंदे-होळकरांचा समेट होऊन एकाची फौज व दुसऱ्याचें सेनानीत्व या दोहोंच्या मिलाफानें मराठशाहीचा टिकाव खचित लागला असता. परंतु बाजीरावाच्या नादानपणामुळें हा योग फसला.

' वसईचे मुक्कामीं तहनामा जाला, तो बाजीरावानें मनापासून केला नाहीं. त्याचा पर्याय असा कीं, सिंदे-भोसल्यांचा विचार घेऊन मग तह करावा. त्यावरून क. कलुष यांनीं धाक घातला, कीं होळकर व अमृतराव यांच्याशीं इंग्रज सरकाराचा तहनामा झाल्यास मग आम्हांकडे शब्द नाहीं. असें बोलल्यावरून बाजीरावांनीं तहनामा पुरा केला; आणि सिंद्यांस लिहिलें, कीं तुमचा पल्ला दूर पडल्यामुळें वखत सक्त पाहून तहनामा केला. तहनाम्याची नक्कल पाहून भोसल्यांस चांगलें वाटलें नाहीं. '

**६ वसईचा तह, मराठमंडळाच्या जुटीची वाटाघाट.**— वसईच्या तहाचीं कलमें सुप्रसिद्ध व पुष्कळ ठिकाणीं नमूद आहेत. बाजीरावानें महाडाहून गव्हर्नरास जें पत्र पाठविलें, त्या आधारावरच तहाची रचना झाली. बाजीरावाचें तें पत्र क्लोजनें ताबडतोब कलकत्त्यास पाठविलें. इंग्रजांनीं आपलीं सहा पलटणें बाजीरावाचे मदतीस द्यावीं आणि त्यांचे खर्चास त्यानें सव्वीस लक्षांचा मुलूख कायमचा इंग्रजांस द्यावा, असा त्या चिठ्ठीचा मतलब होता. त्यानें कळविलें, आम्हांवर संकट आलें आहे तें निवारण होईपर्यंत इंग्रजांनीं आमच्या जिवाचें संरक्षण करावें. यापूर्वी अनेकवार लॉर्ड वेल्स्लीनें त्यास कळविलें होतें कीं, 'आम्ही केव्हांही मित्रत्वाचे नात्यानें तुमचें साह्य करण्यास तयार आहों. ' तदनुसार बाजीरावानें ही मागणी केली. परंतु पुढें वसईस

वाटाघाट होऊन प्रत्येक बाबतींत इंग्रज त्यास बांधून घेऊं लागले, त्यामुळें आपण इंग्रजांच्या जाळ्यांत अधिकाधिक गुंतत चाललों असें दिसतांच, त्याचें अंतःकरण कचरूं लागलें. तहाची वाटाघाट वसईस न होतां पुण्यास होती तर असा बंधनकारक तह बनलाच नसता. परंतु वसईच्या कोंपऱ्यांत इंग्रजांनीं त्यास पोकळ शब्दांनीं खूष ठेवून तहावर कायमपणाची सही घेतली. तेव्हांपासून बाजीराव त्यांतून सुटण्याची व इंग्रज त्यास जास्त गुंतविण्याची धडपड करूं लागले. बाजीरावाचा लेखी आधार इंग्रजांना पाहिजे होता, तो या तहानें त्यांस मिळून त्यांनीं धूर्तपणानें त्याचा भरपूर उपयोग करून घेतला. तहाच्या वाटाघाटींत बाजीरावास दोन घरभेदे सहायक मिळाले. एक रघुनाथराव चिनापट्टणकर व दुसरा बळवंतराव नागनाथ. दुसऱ्याची ओळख वाचकांस आहेच. रघुनाथराव हा लहानपणापासून मद्रासेंत इंग्रजांच्या संगतींत वाढलेला व त्यांस दैवत मानणारा होता. मात्र त्यास इंग्रजी भाषा लिहितां बोलतां चांगली येत होती. बाजीरावास न दुखवितां तो म्हणेल त्यास निमूटपणें अनुमोदन देणारे स्वार्थी व अदूरदर्शी असे हे दोन गृहस्थ होते. तिसरा इसम खंडेराव नीळकंठ रास्ते बाजीरावाचे तैनातीस होता. तहाचा मुख्य मतलब असाः—

( १ ) एकाचे शत्रुमित्र तेच दुसऱ्याचे शत्रुमित्र मानणें; ( २ ) इंग्रजांनीं स्वतःचे मुलखाप्रमाणेंच बाजीरावाचे मुलखाचें संरक्षण करणें; ( ३ ) त्यासाठीं सहा पलटणें व तोफा युद्धोपयोगी सामानासह बाजीरावाचे मुलखांत ठेवणें; ( ४ ) खर्चासाठीं सव्वीस लक्ष नख्त उत्पन्नाचा मुलूख इंग्रजांस कायम देणें.; ( ५ ) इंग्रजांशीं बिघाड करणाऱ्या दुसऱ्या टोपकरांस पेशव्यानें आपले राज्यांत न ठेवणें; ( ६ ) निजाम वगैरे हरकोणाशीं बाजीरावाचा तंटा असल्यास त्याचा निकाल इंग्रज बहादुर करतील तो त्यानें मान्य करणें; ( ७ ) गायकवाडानें इंग्रजाशीं दोस्तीचा तह केला होता, त्यास बाजीरावानें मान्यता देऊन, त्याचा गायकवाडाशीं दावा असेल तर त्यांत इंग्रज बहादुरांचा निकाल त्यानें मान्य करणें; ( ८ ) कारणपरत्वें सहांपेक्षां जास्त पलटणें इंग्रजांनीं बाजीरावास व बाजीरावानें इंग्रजांस आपली फौज देऊन एकमेकांचें साह्य करणें; आणि ( ९ ) एकमेकांनीं आगाऊ कळविल्याशिवाय परदरबाराशीं सवाल जबाब न करणें. अशा प्रकारचें या तहाचें स्वरूप होतें. सुरत शहर व तेथील आपले सर्व हक्क तहांत बाजीरावानें इंग्रजांस लिहून दिले. 'हा तहनामा चंद्रसूर्य आहे तों पावेतों बहाल व बरकरार ( कायम ) राहील, मिति. पोष शु. ७ शके १७२४.' ( ता.३१-१२-१८०२ ). क्लोज व बाजीराव यांच्या सह्या होऊन तह ग० ज० कडे

मंजुरीसाठीं गेला; आणि त्याची सही होऊन तहाचा कागद ता. १८-३-१८०३ रोजीं बाजीरावाचे हातीं आला.

बाजीरावानें इंग्रजांस लेख करून दिला ही बातमी वसईहून पुण्यास लगेच पोंचली. ता. २-१-१८०३ रोजीं अमृतराव, होळकर व त्याचा दिवाण गणपतराव, मीरखान, बाबा फडके, मोरोबा फडणीस वगैरे मंडळी एकत्र जमून पुढील विचार करूं लागली. होळकर बोलला, 'बाजीरावानें राज्य बुडविलें. इंग्रज आतां म्हैसूरचा प्रकार पुण्यास करणार. आपण प्रथम सिंद्यास विचारावें, कीं 'तुमच्या सल्ल्यानें हा प्रकार झाला कीं काय ? सिंद्यांनीं त्यास कबुली दिलेली नसेल तर आपण सर्वांनीं एक होऊन इंग्रजांशीं सामना करावा.' हा विचार पसंत पडून त्याप्रमाणें अमृतरावानें इंग्रजांस व सिंद्यांस पत्रें लिहून रवाना केलीं; आणि रायगडावर फौज पाठवून दत्तविधानासाठीं यशोदाबाईस आणण्याचा प्रयत्न सुरू झाला.

ता. १२-१-१८०३ रोजीं बाजीरावानें अमृतरावास लिहिलें कीं, 'यशवंतराव होळकर वगैरे कित्येकांनीं गैरमार्गांत पडून बंडखोरी आरंभिली आहे. त्यांची संगत तुम्हीं ताबडतोब सोडून पंधरा दिवसांत आम्हांस येऊन भेटा. कोणतीही सबब सांगूं नका. बरोबर विनायकबापूस आणा.' त्याच तारखेस यशवंतरावानें बाजीरावास पत्र पाठवून कळविलें कीं, 'सिंद्याच्या बरोबरीनें होळकराची सरदारी आपण कायम ठेवावी. खंडेराव होळकरास सरंजामाचीं वस्त्रें द्यावीं, आणि त्यास आमच्या हवालीं करावें. आपणास माझा विश्वास नसेल तर मी एकटाच आपले भेटीस वसईस येतों.' इकडे क. क्लोजनें याच वेळीं यशवंतरावास लिहून कळविलें कीं, 'बाजीरावानें आमच्याशीं रीतसर करार करून आमची लष्करी मदत स्वीकारली आहे. हा करार पार पाडणें आमचें कर्तव्य आहे. तें करितांना तुमची व बाजीरावाची गोडी करून द्यावी अशी ग० ज० साहेबांची फार फार इच्छा आहे. बाजीरावाचा लोभ संपादन करण्यास आम्ही तत्पर आहों असें तुम्हीं अनेकवार बोलून व लिहून कळविलें आहे, ती गोष्ट खरी करून दाखविण्याचा एकच मार्ग आहे, तो हा कीं, 'तुम्ही पुणें सोडून फौजेसह आपले हद्दींत निघून जावें. असें तुम्ही कराल तर इंग्रज सरकार बाजीरावाशीं तुमचीं गोडी करून देतील; आणि उभयतांमध्यें जो करार ठरेल त्यास बाजीरावाकडून व्यत्यय न येण्याची खबरदारी लॉर्ड साहेब घेतील. तरी इंग्रज सरकाराशीं तुमचा पूर्वापार स्नेह आहे तो कायम ठेवून आपली फौज घेऊन तुम्हीं ताबडतोब पुण्यांतून

निघून जावें. तुम्ही पुण्यांत राहिल्यास तुमचा आमचा बिघाड होण्याचा प्रसंग येईल. याचा नीट विचार करून काय करणें तें करावें.'

इंग्रजांची ही धमकावणी कळल्यावर पुण्याच्या मंडळीपुढें मुख्य प्रश्न आला तो असा, कीं 'सिंद्यास मिळवून घेऊन सर्वांची एकी करून इंग्रजांशीं सामना करावा, कीं इंग्रज म्हणतात त्यास रुकार देऊन बाजीरावाशीं सल्ला करावा. दुसरा मार्ग पत्करण्यांत इंग्रजांनीं राज्य घेतलें असें सिद्ध जालें. हा योग टाळावा म्हणून अमृतराव, यशवंतराव, मोरोबा फडणीस इत्यादींनीं मराठमंडळाची जूट जमविण्याचा आटोकाट प्रयत्न केला. त्यांनीं निजामास सामील करून घेण्यासाठीं बाबा फडके यास लगोलग हैदराबादेस पाठविलें. भोसल्यांचे कारभारी पुण्यांत होते त्यांची भेट होळकरांनीं घेऊन बोलण्यांत आणिलें कीं, ' सिंद्यांशीं आमचा बेबनाव; त्यांचा शह आमचे मागें आहेच. पंतप्रधानांशीं तर लढाईच होऊन ते वसईस गेले. ते व इंग्रज आणि सेनासाहेब एक झाले असतां अवघड. शिवाय खंडेराव होळकर सिंद्यांचे कैदेंत बऱ्हाणपुरीं आहेत ते सुटोन यावेत, याजकरितां झालें तें समर्थ, परंतु आतां तरी तुम्ही मध्यंतरीं येऊन आपसांतील घरची खलल मिटवावी, सफाई होऊन एकवाक्यता करावी. त्या समयीं उभयतां कारभारी यांणीं प्रसंगोपात प्रेमाचीं भाषणें करून स्नेहाचा विचार ठरवून, होळकराचा, मनोदय रक्षून त्वरा करून चैत्र मासीं नागपुरास आले. ' याच उद्देशानें सिंद्याचा वकील यादवराव भास्करही या वेळीं नागपुरास येऊन इंग्रजांचे पारिपत्याचा मजकूर बोलूं लागला. अशा रीतीनें ऐक्याचीं बोलणीं पुष्कळ झालीं, पण अखेरीस घडलें नाहीं एक सुद्धां. या वेळेपासून माउंट स्टुअर्ट **एल्फिन्स्टनचा** संबंध मराठ्यांशीं येतो. सबब त्याचा अल्प वृत्तान्त येथेंच दर्शविणें जरूर आहे.

ता. ६·१०·१७७९रोजीं जन्म होऊन तो ता. २६·२·१७९६रोजीं कंपनींत नोकरी मिळून कलकत्त्यास दाखल झाला. त्याची नेमणूक प्रथम बनारस येथें मॅजिस्ट्रेट डेव्हिसच्या हाताखालीं झाली. रे. चेरीचा खून झाला तेव्हां डेव्हिसबरोबर हा तेथील नदेसर बंगल्यांत हजर होता. स. १८०० सालीं कलकत्त्याच्या फोर्ट विल्यम कॉलेजांत तो परीक्षेसाठीं दाखल झाला. स. १८०१ सालीं पामरची बदली पुण्याहून होऊन त्याचे जागीं कर्कपॅट्रिकची नेमणूक झाली, त्याचा सेक्रेटरी स्ट्रॅके याचा असिस्टंट म्हणून एल्फिन्स्टनची नेमणूक पुण्याच्या रेसिडेन्सींत झाली. ता. ६·३·१८०१ रोजीं एल्फिन्स्टन व स्ट्रॅके कलकत्त्याहून प्रथम मद्रासेस जाऊन तेथून जुलई महिन्यांत श्रीरंगपट्टणाला से० वस्लीची भेट घेऊन सेप्टेंबरांत हैदराबादेस गेले. तेथचा रेसिडंट

मेजर जे. ए. कर्कपट्रिक हा दिवाण मश्रून्मुल्क याचा जांवई अर्धा हिंदीच होता. स. १८०२ सालीं क्लोज पुण्यास आला, त्या वेळीं एल्फिन्स्टनही हैदराबादेहून तेथें दाखल होऊन पुढें दोन वर्षें तो पुण्यास होता. स. १८०३ च्या अखेरीस त्याची नेमणूक नागपुर रेसिडेन्सीवर झाली. तें काम त्यानें १८०८ पर्यंत केलें. नंतर सिंद्याचे दरबारीं थोडे दिवस काम करून जुलई १८०८ पासून तो काबूलचे वकिलातीवर होता. तेथून १८१० च्या जून महिन्यांत त्याची नेमणूक पुण्याचे रेसिडेन्सीवर झाली, तेव्हांपासून अखेरपर्यंत त्याचें वास्तव्य पश्चिम हिंदुस्थानांतच झालें.

वसईच्या तहाचे समयीं पोटांतले उद्देश कांहीं असले तरी इंग्रजांची भाषा मात्र अत्यंत नरमाईची व दिसण्यांत निःस्वार्थी होती. तह पुरा होतांच लॉर्ड वेल्स्लीनें मराठ्यांस कबजांत आणण्याकरतां ठिकठिकाणीं आपल्या फौजा तयार करण्याचा उद्योग चालविला. याचे उलट पुण्यांतील मराठमंडळ शुष्क वाटाघाटींत कालापव्यय करीत होतें. होळकर व अमृतराव, भोसल्यांचे वकील, निजामाचा आनंदराव, मोरोबा फडणीस इत्यादि मंडळी पुण्यास रोज रोज खलबतें करून दत्तविधानाचा शास्त्रार्थ ठरवून नवीन पेशव्याचा शिक्का कसा सुरू करावा या विचारांत होते. इतक्यांत वसईच्या तहाची बातमी येऊन थडकतांच विचारवंतांस पुढील दुःश्चिन्हें पडूं लागलीं. राज्यांत सर्वत्र बेबंदशाही, संपूर्ण हुकमत कोणाच्याही हातांत नाहीं, एक दुसऱ्याचा पाडाव करण्यांत निमग्न, सर्व राज्यांत बेरड, रामोशी, भिल्ल, कोळी, पेंढारी व बेकार शिलेदार यांच्या झुंडी पसरलेल्या, अशा स्थितींत कोणी तरी जबरदस्त पुरुष निर्माण होऊन व्यवस्था लावील तर बरें, असें प्रत्येकास वाटूं लागलें होतें. ही परिस्थिति इंग्रजांनीं ओळखून देशांत राज्यव्यवस्था स्थापन करण्याचा उद्योग सुरू केला, आणि मराठमंडळाची जूट आपले विरुद्ध सिद्ध होऊं नये अशी खटपट चालविली.

विनायकरावाच्या नांवानें वस्त्रें आणिल्याचा पुकारा होतांच अमृतरावावर बाजीराव अतिशय चिडून गेला. भिवंडीचा त्याचा वाडा बाजीरावानें लुटून त्यांतील वित्तविषय हरण केलें. तसेंच रामचंद्र आपा पटवर्धनास त्यानें लिहिलें कीं, 'इंग्रजांचीं पलटणें बंडवाल्यांचें पारिपत्य करण्यास सरकारांतून आणिलीं आहेत, तरी तुम्हीं आपले सरंजामानिशीं त्यांस सामील होऊन बंडवाल्यांचें पारिपत्य करणें.' अमृतरावासही त्यानें लिहिलें कीं, 'आजपर्यंत झाला कारभार तो बराच जाला. इतःपर होळकराची संगत धरूं नये. तुम्हीं व विनायकाराव उभयतां निघोन सत्वर आम्हांजवळ यावें.' इकडे या वेळीं दौलतरावानें आपल्या फौजा जमवून उज्जनीहून दक्षिणेकडे प्रयाण केलें.

तॉ. १४·२·१८०३रोजीं त्यानें कोल्हापुरकर छत्रपतीस कळविलें, ' श्रीमंतांचे दौलतींत बेदा होऊन नवीन प्रकरणें उपस्थित जहालियाचें स्वामींच्या श्रवणांत आलेंच असेल. ऐशियास पोक्त जमावानिशीं हरएक सरदारास रवानगी करून बऱ्हाणपुरचे रोखे पाठविलें पाहिजे. ' होळकरानें पटवर्धनास कळविलें कीं, ' आम्ही एवढी फौज घेऊन आलों, लढाई मारली, तुम्हीं जवानमर्द, दौलतीचे शरीक आहां, इंग्रजांची दरम्यानगत आहे, त्यापक्षीं श्रीमंत तुमचें चालवितील. तुमची खातरजमा नसल्यास अमृतराव व विनायकराव बापू आम्हांबरोबर हिंदुस्थानांत जात आहेत, त्याप्रमाणें तुम्हींही यावें.' त्याजवर पटवर्धनांनीं उत्तर केलें, 'आम्ही श्रीमंतांच्या पदरचे गादीचे चाकर खरे. स्वदेशीं कुटुंब थोर. महाल मुलखाचा पसारा. तेव्हां आपली जागा सोडून गादीचा अनादर करून कोणाचे म्हणून हिंदुस्थानांत यावें ! ' होळकरानें पटवर्धनांची सबब ऐकून कळविलें, ' श्रीमंतांकडून विपर्यास पडल्यास चिंतामणराव आपांस आम्हीं वडील बंधु म्हणवितों. जरूर पडेल तेव्हां बिनदिक्कत आमचे जवळ यावें.'

सिंदे व बाजीराव खेरीज करून बाकी सर्व मंडळीची जूट इंग्रजांविरुद्ध सिद्ध झाली. फाल्गुन शु. ४ ( ता. २५·२·१८०३ ) रोजीं यशवंतराव होळकर शनिवारवाड्यांत येऊन बाजीरावाचें कुटुंब मातुश्री ताईसाहेब व अमृतरावाचें कुटुंब काकूसाहेब यांचे पायावर डोकें ठेवून वस्त्रें व निरोप घेऊन पुण्यांतून निघाले. त्या वेळच्या या उपक्रमासंबंधानें हैदराबादेहून बाबा फडके मिरजेस गंगाधरराव पटवर्धनास लिहितो. ' उभयतां श्रीमंतांचा बेत इंग्रजी पलटणें बरोबर घेऊन त्यांच्या जोरानें पुण्यास येऊन गादीवर बसावें असा आहे. सारांश ब्राह्मणी राज्यांत इंग्रजांची पैरवी झाली. दौलतींत टोपीकरांचा पाय शिरला. ऐशियास आम्ही हैदराबादेस जाऊन नबाबांची भेट होऊन बोलणीं झालीं. दौलतींत इंग्रजांचा पाय शिरावा हा सिद्धान्त समजला. तेव्हां येथून निजामाचीं सिंदे, होळकर व भोसले यांस पत्रें गेलीं, कीं लवकर सर्वांचा समेट करून पुढील मसलतीची पैरवी करावी. त्यास सिंदे यांचा इशारा पक्केपणें आहे कीं, इंग्रजांचा दखल स्वराज्यांत न होऊं देण्याविषयीं आपण सर्व प्रकारें अनुकूल आहों. होळकराचा समेट लवकर करून येऊन पोंचतों. भोसल्यांचाही इशारा याचप्रमाणें आहे. होळकर तों येविशीं नमूदच आहेत. इंग्रजांचा कदम दौलतींत पोंचला असतां कोणाचेंच माहात्म्य राहत नाहीं. याजकरतां सर्व सरदारांनीं एकत्र होऊन बंदोबस्त केला असतां अवघड नाहीं. कर्नाटकांतील इंग्रजांचा सरंजाम धारवाडास येणार. श्रीमंतांस घेऊन इंग्रज पुण्यास येणार हें खचित आहे. त्यास तुम्ही सर्व पटवर्धन

मंडळी, रास्ते, विंचुरकर एकत्र होऊन धारवाडाकडे इंग्रज येत आहे त्याचा बंदोबस्त करावा. आतां पूर्व सांप्रदायास माहीत आपणच आहेत. वडीलपणें सर्वांस सांगोन याचा उद्योग व्हावा. सिंदे होळकर व भोसले हे लवकरच एक होतात. आपलें सारें मंडळ एक झालें म्हणजे नबाबही अनुकूल आहे. आपली सर्वांची खबिरी पाहिजे.' निजामास मिळवून घेण्यासाठीं बाबा फडके हैदराबादेस गेला तेथून त्यानें हें पत्र लिहिलें आहे. मराठमंडळाची एकजूट करण्यास हा फडके किती खटपट करीत होता, हें यावरून व्यक्त होतें. मात्र याबद्दल त्याजवर बाजीरावाचा रोष होऊन त्यास पुढें सर्वस्वास मुकावें लागलें. वरच्याची उलट बाजू खालील संवादांत दिसून येते. चिंतामणराव पटवर्धनाचे प्रश्नास दिलेलीं तीं उत्तरें आहेत. सिंदे आपल्याकडे बोलावतात, पण बाजीरावाची आज्ञा इंग्रजांस जाऊन सामील होण्याची, ते पक्षीं याचा विचार कसा करावा ?' पंतांनीं उत्तर केलें, 'सरकारचे पदरीं सरदार बहुत आहेत. सर्वांचा एक विचार व्हावा; आणि सरकार दौलतीचा बंदोबस्त करावा.'

प्र.—इंग्रज जवळ आले याचा विचार सिंद्यांनीं काय केला आहे ?

उ.—इंग्रजांस दौलतींत शिरूं देऊं नये.

प्र.—सिंदे बऱ्हाणपुरास. भोसले नागपुरास. नबाब हैदराबादेस. लहान किरकोळ सरदारांत त्राण नाहीं. तेपक्षीं आपण म्हणतां ही गोष्ट कशी घडावी ? इंग्रज तर लगत आले. इकडील चार लहान मोठे मिळून इंग्रजांचें तोंड सांभाळणें कठिण. तत्रापि सिंदे व भोसलेही लांब. तेपक्षीं विचार कळतच आहे. शिवाय होळकर व सिंदे यांत द्वंद्व. ज्या पेशव्यांचे चाकर म्हणवितों त्यांची आज्ञा उल्लंघन करून राज्यकारभार कसा चालतो ?

उ.—धन्यांनीं जें करणें तें पदरच्यांचे हातून न होतें तर इंग्रजांस बोलवावयाचें होतें. धन्यांनीं विचार न केला आणि दौलत दुसऱ्याचे घरांत घातली, तेपक्षीं सर्वांनीं एकविचारें होऊन पूर्वीं फडणीस नानांनीं कारभार चालविला त्याप्रमाणें चालवावें, आणि इंग्रजांस दौलतींत येऊं देऊं नये.

प्र.—तुम्हीं विचार मोठे बोलतां. इंग्रज येऊन दाखल झाले.

या संवादावरून लोकांची तत्कालीन मनोभावना कळेल.

वसईचा तह होतांच इंग्रज बाजीरावास पुण्यास नेऊन पेशवाईवर स्थापण्याच्या उद्योगास लागले; आणि त्यांनीं फौजेची सिद्धता केली. पुण्यावर मोहीम करण्याची तयारी इंग्रजांनीं आज दोन वर्षें चालविली होती. वाघावर आलेली वीस हजार फौज त्यांनीं हरिहर येथें ठेवून तिची तयारी कडेकोट केली. या फौजेवर मद्रासचा सेनापति स्टुअर्ट हा मुख्य होता. दुसरी इंग्रजांची फौज निजामाचे हद्दीवर परिंडा येथें जमली.

यांत खुद्द निजामाचा व त्याच्या तैनातीस असलेल्या इंग्रजांचा मिळून एकंदर तेवीस हजार जमाव होता. यांचा अम्मलदार कर्नल स्टीव्हन्सन् होता. तिसरी फौज मुंबईस जमा झाली, ती सुमारें तीन हजार क. मरेच्या हाताखालीं होती. त्यांतील बहुतेक लोक ता. ७.२.१८०३ रोजीं कलकत्त्यास जहाजांत बसून ता. ५-४-१८०३ रोजीं मुंबईस दाखल झाले. ही फौज कलकत्त्याहून येण्यास अवकाश लागला, म्हणूनच बाजीरावाचें प्रयाण यापूर्वींच पुण्याकडे होऊं शकलें नाहीं चवथी फौज से० लेक याच्या हाताखालीं कानपुरास सिद्ध झाली, तिचा उल्लेख पुढें उत्तरेकडील मोहिमेंत येईल. मिळून एकंदर इंग्रज फौज साठ हजारांवर होती. फेब्रुवारी महिन्याच्या आरंभीं लॉर्ड वेल्स्लीनें धाकटा बंधु से. वस्ली यास सर्वाधिकाराची सनद लिहून दिली. हा से. वस्ली म्हणजे आर्थर वेल्स्ली पुढें युरोपांत नेपोलियनशीं लढण्यांत प्रसिद्धीस येऊन डयूक ऑफ वेलिंग्टन् झाला, तो होय. स. १७९७ त प्रथम याची नेमणूक हिंदुस्थानच्या लष्करावर होऊन तो फेब्रुवारी १७९६ त कलकत्त्यास दाखल झाला, आणि लगेच त्यानें मलाया द्वीपकल्पांत एक मोहीम केली. त्यानंतर त्याचा वडील बंधु लॉर्ड वेल्स्ली ग. ज. होऊन आला, त्यानें यास मद्रासच्या फौजेंत नेमिलें. स. १७९९ त टिपूचा पाडाव झाल्यावर त्याची नेमणूक म्हैसूरच्या राज्याची व्यवस्था पाहण्याकडे झाली. या दोघां बंधूंनीं मराठ्यांचें राज्य जिंकण्याचा जणूं काय गुप्त कटच केला होता, आणि त्यासाठीं वडील बंधूनें धाकट्यास आपले संपूर्ण सर्वाधिकार दिले. दुसरे कर्तबगार व श्रेयान् अधिकारी असतां आपल्या भावास हलक्या जागेवरून एकदम वरिष्ठ जागीं नेमल्याबद्दल हिंदुस्थानांतून लंडनचे सरकाराकडे पुष्कळ तक्रारी गेल्या. पण व्यवहारांत जो बार एकदां उडून गेला तो कांहीं फिरूं शकत नसतो. तसेंच यशासारखा दुसरा पुरस्कर्ता जगांत कोणी नाहीं, या नियमास अनुसरून से. वस्लीस एकामागून एक विजय मिळून इंग्रजी राज्याची हिंदुस्थानांत व बाहेर भरभराट होत गेली, त्यामुळें वरील तक्रारींस पुढें महत्त्व राहिलें नाहीं, आणि अतुल पराक्रमी पुरुष अशी से. वस्लीची कायम ख्याति इतिहासांत झाली.

ता. ९-३-१८०३ रोजीं से. वस्ली हरिहर सोडून ता. १२ रोजीं तुंगभद्रापार झाला. पुढें ता. १५-४-१८०३ रोजीं वस्ली व स्टीव्हन्सन् यांच्या फौजांची अकलूज येथें भेट होऊन तेथून ते गारदौंडावर आले; आणि २० एप्रिल रोजीं सेनापति वस्ली पुण्यास दाखल झाला. तेथें सर्व शांतता आहे आणि बाजीरावानें आतां वसईहून निघण्यास हरकत नाहीं अशी वस्लीची सूचना जातांच, २७ एप्रिल रोजीं बाजीराव व क्लोज वसईहून निघाले ते ता. ६-५-१८०३ रोजीं चिंचवड येथें दाखल झाले. त्यानंतर

एक आठवड्यानें ता. १३·५·१८०३ रोजीं बाजीरावानें पुण्यांत प्रवेश करून शनिवार-वाड्यांत पेशवेपद धारण केलें. से. वस्लीनें हा प्रकार कशा धोरणानें पार पाडिला तें आतां सांगावयाचें आहे. वस्लीबरोबर चिंतामणराव पटवर्धन, बापू गोखले, विंचूरकर, आपा देसाई निपाणकर वगैरे गृहस्थ सडेच पुण्यास आले.

पुण्याकडे येतांना मराठी हद्दींत प्रवेश करतांच से. वस्लीनें सर्व लोकांस कळण्यासाठीं खालील जाहीरनामा काढिला. ‘ ता. ९·३·१८०३. सर्व लोकांस जाहीर व्हावें, कीं बाजीराव पेशवे यांनीं आपले दोस्त कंपनी बहादूर यांस आपले कुमकेस्तव बोलावून पाठविलें. त्यावरून वरील बहादूर मराठ्यांचे मुलखांत दाखल होत आहेत. यांत ते कोणाच्याही दुष्मानगिरीस किंवा मुलुखगिरीस येत नाहींत. दोस्तासारखे येत असों. या कारणें तमाम लोकांनीं आपापले ठिकाणीं बेफिकीर असावें. मामलेदार, पाटील, कुळकर्णी, देशमूख, देशपांडे वगैरेनीं वस्लीसाहेबाजवळ येऊन रुजू व्हावें. गांवाजवळ लष्कर उतरल्यास रखवालीस अदमी देत असों. मागें तीन वर्षांखालीं वस्लीसाहेब आले, तेव्हां लष्करांत चहूंकडे कैशी ताकीद होती त्याची याद मराठीयांस असेल. आतांही तैसाच बंदोबस्त राहील. लष्करास धान्य, लकडी वगैरे जिन्नस लागेल तो किंमत घेऊन देणें जरूर आहे. कंपनीचे दस्तुरमाफक मालास पुरी किंमत मिळेल. हर-कोणासही इजा न होईल. जाणिजे. ’ या जाहीरनाम्यावरून लोकांचें प्रेम संपादन करण्याचा प्रयत्न वस्लीनें कसा केला तें दिसून येतें.

बाजीरावानें वसईस तह पुरा केल्याची बातमी पुण्यास येतांच, पुढें काय या विवंचनेंत सरदारांचे दोन महिने गेले. पुण्यांत होळकर व अमृतराव पेशवाईची नवीन व्यवस्था करीत होते, तर वसई येथें बाजीराव इंग्रजांस निकड करूं लागला कीं, मला पुण्यास नेऊन पोंचवा. त्यास एकदम वसईहून घेऊन जाण्याची इंग्रजांची तयारी नव्हती. म्हैसूरच्या व कलकत्त्याच्या फौजा पुण्याकडे येण्यास पुष्कळ विलंब लागला. निकरानें युद्ध केल्याशिवाय बाजीरावाची स्थापना पुण्यास होणार नाहीं हें इंग्रज जाणून होते. तेव्हां नुसत्या कागदाच्या जोरावर पुण्यास जाण्यापूर्वी बाह्य धाक-दपटशानें त्यांनीं आपले उद्योग चालविले, आणि फौजांची तयारी केली. इकडे बाजीराव सिंद्यास सारखें लिहीतच होता, कीं नाइलाज होऊन आम्हीं इंग्रजाशीं करार केला आहे. तरी तुम्हीं सत्वर येऊन शत्रूचें निवारण करावें. त्याप्रमाणें दौलतराव फौज घेऊन ता. ४–२–१८०३ रोजीं नर्मदापार झाला, आणि ता. २३ फेब्रुवारीस बऱ्हाणपुरास दाखल झाला. तेथून त्यानें भोसल्याकडे माणसें पाठवून त्यास पुढील मोहिमेंत सामील करून घेतलें. पांच महिनेपर्यंत सिंद्याचा मुकाम बऱ्हाणपुरावर होता. सिंद्याचे

मागोमाग इंग्रज वकील कॉलिन्स ता २७–२–१८०३ रोजीं बऱ्हाणपुर येथें सिंद्याचे छावणींत दाखल झाला. त्यानंतर पुष्कळ दिवसांनीं सिंद्याशीं त्याची पहिली भेट झाली.

सिंदे बऱ्हाणपुरावरून एकदम पुढें पुण्यास येता तर यशवंतराव व अमृतराव यांची त्याची भेट व एकवाक्यता झाली असती. पुण्यांतील मंडळीचा विचार इंग्रजांविरुद्ध मराठ्यांची जूट बनविण्याचा ठरलाच होता. बाजीराव नादान, त्याच्या हातून राज्य संभाळणें होणार नाहीं अशी सर्व मंडळीची खात्री होती; आणि पळून जाऊन इंग्रजांचा त्यानें आश्रय केला, यामुळें सर्वच नाखूष झाले होते. पण सिंद्यास यशवंतरावाची भीति मोठी होती. सिंद्याची फौज सर्व तयार नव्हती, आणि थोड्या फौजेनिशीं पुण्यास येऊन यशवंतरावाचे तावडींत सांपडल्यास आपला सर्वच घात होणार अशी त्याची भावना होऊन तो बऱ्हाणपुरासच थबकून राहिला. दौलतरावास स्वतःचा पोंच नव्हताच, आणि जवळ सल्लागार सर्जेराव, तो त्यास बोटावर खेळवीत होता. मोठें काम करण्यास साहस व स्वार्थत्यागही मोठाच लागतो. प्रत्येकाचे पोटांत दुसरा आपणास पकडील ही भीति. बाजीराव जसा यशवंतरावास भेटेना, तसाच दौलतरावही त्यास भेटेना. अद्यापि दौलतरावाचे मनांत सर्जेरावामुळें यशवंतरावाची मोठी चीड कायम होती. तशांत बाळोजी कुंजर या वेळीं सिंद्यास भेटून यशवंतरावाचे नाशाचा उद्योग करीत होता. आपण आपल्या पलटणांच्या जोरावर यशवंतराव व इंग्रज दोघांसही सडकून काढूं अशी सिंद्यास उमेद होती, म्हणूनच तो युद्धाची तयारी करीत बऱ्हाणपुरास थांबला. बरें ती तयारी जरी सिद्धीस जाती, तरी पुढील युद्धांत इंग्रजांपुढें त्याचा निभाव लागला असता. मिळून त्यानें दोन मोठ्या वैकल्पिक चुका केल्या. लगोलग पुण्यास येऊन मराठामंडळाची जूट झाली होती, त्यांत सामील होऊन इंग्रजांस दूर ठेवायचें, किंवा बाजीरावाची समजूत काढून आपणच त्यास पुण्यास आणावयाचें. यांपैकीं कांहीं एक न करितां तो भोसल्यास मिळवून घेण्यासाठीं वऱ्हाडांतच थबकून राहिला. कलकत्ता मद्रास वगैरे ठिकाणांहून इंग्रजांच्या फौजा पुण्यास येऊं शकल्या, पण नागपुर उज्जनच्या फौजा मात्र वेळेवर येऊं शकल्या नाहींत. भोसले व दौलतराव यांच्या भेटी पुढें सहा महिन्यांनीं ऑगस्टांत झाल्या. अशा ढिलाईनें राज्य कसें टिकावें? सारांश फेब्रुवारींत बऱ्हाणपुरास येऊन सिंद्यानें पुढील चार महिन्यांचा सोन्यासारखा काळ फुकट घालविला. तेवढ्यांत इंग्रजांनीं आपला डाव साधला.

ता. २० एप्रिल रोजीं से. वस्ली पुण्यास आला, ‘ त्या दिवशीं होळकर चांदवडास व सिंदे बऱ्हाणपुरास होते. अंबूजी इंगळ्यानें पुढें येऊन भेट घेऊन समजूत काढली.

यादवराव भास्कर भोसल्यांस आणावयास गेले. वस्लीनें आपला मुक्काम संगमाजवळ ठेवून तेथें दारू गोळ्याचें दास्तान केलें. उभयतां श्रीमंत वसईहून ता. २७·४·१८०३ रोजीं निघून वज्रयोगिणीस जाऊन कल्याणास पोंचले. बरोबर क. मरे फौज घेऊन होता. विठ्ठपा बदामीकर व वस्ली श्रीमंतांस आणण्यास चिंचवडावर जात आहेत. ता.२२·४·१८०३ रोजीं खासा वस्ली शनिवारवाड्यांत सायंकाळचे येऊन दिवाणखान्यांत बैठक जाली. ता. ३१ मार्च रोजीं संजीवनी ( अमृतराव ) सर्व अजबाब घेऊन जुन्नरजवळ जोरवें येथें गेले, त्यामुळें वस्लीस पर्वतासारखें हास्य झालें. पुढें बाजीराव तळेगांवा-वरून चिंचवडास आला. तेथें से० वस्लीनें त्याची भेट घेऊन सन्मानानें पुण्यास आणून ता. १३·५·१८०३ रोजीं शनिवारवाड्यांत ' हिज हायनेस बाजीराव पंडित प्रधान बहादूर ' यांस पेशवाई पदावर प्रविष्ट केलें; आणि अधिकार धारण केल्याचा जाहीरनामा काढिला. या प्रसंगानिमित्त वाड्यांत वस्लीच्या मुकामावर व मुंबई, सुरत, कलकत्ता, मद्रास, श्रीरंगपट्टण इत्यादि ठिकाणीं खुशालीच्या तोफांची प्रचंड सरबत्ती झडून एकंदर सर्व हिंदुस्थानास तो प्रकार जाहीर करण्यांत आला. ' ( खरे; पे. अ. ).

---

# प्रकरण आठवें

## बाजीराव विरुद्ध लॉर्ड वेल्स्ली

**पुरुष पंधांतुन पराक्रमी गत झाले अकरा ।**
**तदनंतर चौघांनीं दिल्या आल्या शत्रुसवें टकरा ॥**
**उपाय हरले ह्याच प्रसंगीं गोष्ट गेलि निकरा ।**
**जो रक्षणा आणिला तोच करी दौलतिचा विकरा ॥**

प्रभाकर—

१ लॉर्ड वेल्स्लीची जहांबाजी. २ इंग्रज मराठ्यांचा स्नेहभंग.
३ युद्धाच्या वणव्यांतील बाजीरावाचे ढंग. ४ यशवंतराव होळकराची फूट.
५ अमृतराव रघुनाथाचा विश्वास घात. ६ बाजीरावाची आत्मवंचना.

**१ ग० ज० लॉर्ड वेल्स्लीची जहांबाजी.**—लॉर्ड मॉर्निंग्टन ऊर्फ वेल्स्ली याची विचारसरणी व कृति बरोबर लक्षांत घेतल्याशिवाय त्या वेळच्या राजकारणाचा

उमज आपणास बरोबर पडणार नाहीं. एवढा जबरदस्त पुरुष ग० ज० चे जागयावर दुसरा कोणी आलाच नाहीं असें म्हटलें तरी चालेल. स्वराष्ट्राच्या बडेजावाची निःसीम हाव, लांबपल्याची पेंचदार दृष्टि, नानाविध साधनांची यथायोग्य जुळणी करण्याचें चातुर्य, कामाचा उरक, पराकाष्ठेचा आत्मविश्वास, जबाबदारी अंगावर घेण्याची उत्सुकता, दरक्षणीं बदलणाऱ्या परिस्थितीस तोंड देण्याची धमक, अकुंठित कल्पकता, विरोधकांस नमविणारी लेखनशैली, अशा अनेक गुणानीं युक्त होत्साती ही स्वारी खरोखरच हिंदुस्थानाच्या भवितव्यांत कांहीं तरी प्रचंड उलाढाली केल्याशिवाय राहणारी नव्हे, असें भाकित कोणींही केलें असतें. टिपू व निजाम यांचीं प्रकरणें अल्पावकाशांत मिटवून त्यानें मराठ्यांचें प्रकरण हातीं घेतलें. हिंदुस्थानांत शांतता नांदण्यास काय करावें हा प्रश्न इंग्रज मुत्सद्यांपुढें मुख्यतः असून, कोणी तरी वरचढ सामर्थ्याचा सत्ताधीश परिस्थितीस आळा घालणारा पाहिजे होता. नाना फडणिसाच्या हयातीपर्यंत मराठ्यांचे अंगीं असें सामर्थ्य होतें. नाना दिवंगत होतांच तें सामर्थ्य आपल्या हातांत आणण्याचा उपक्रम लॉर्ड वेल्स्लीनें चालवून त्यासाठीं तैनाती फौजांची युक्ति त्यानें सिद्ध केली. होळकरापुढें पराभव पावून बाजीरावानें इंग्रजांचे कक्षेचा आश्रय करितांच लॉ. वेल्स्लीनें दौलतराव सिंद्यास पत्र पाठवून तैनाती फौजेच्या सामान्य तहांत तुम्ही सामील व्हा असें पाचारण केलें, आणि त्याची समक्ष वाटाघाट करण्याकरितां आपला वकील कॉलिन्स यास फत्तेगडाहून दौलतरावाकडे रवाना केलें. इतक्यांत बाजीरावानें वसईस तैनाती फौजेचा करार रेसिडेंट क० क्लोज यास पुरा करून दिला, त्याची नक्कल क्लोजनें ता.९–१–१८०३ रोजीं दौलतरावाकडे पाठविली, आणि बाजीरावास पेशवाईवर स्थापून बंडखोरांचें पारिपत्य करण्यासाठीं इंग्रज फौज पुण्यास जाईल तिजबरोबर तुम्हींही आपली फौज मदतीस देऊन हा एकंदर कार्यभाग सिद्धीस न्यावा अशी सिंद्यास विनंति केली. या विनंतीस दौलतरावाकडून जबाब आला, त्याचा आशय असा होता कीं, ' इंग्रज सरकाराशीं आमची दोस्ती पूर्वापार कायम आहे, आणि आम्ही आपली फौज घेऊन लवकरच तिकडे येऊन दाखल होतों. तों क० कॉलिन्सहि येऊन भेटतील; मग आपण बंडखोरांचे पारिपत्याचा विचार करूं. ' या पत्रावरून बाजीरावास पेशवाईवर स्थापण्याचा आपला उद्योग सिंद्यास मान्य असून त्या गोष्टीस त्याचा विरोध नाहीं असें इंग्रज अधिकाऱ्यांनीं ताडिलें. परंतु आज पावेतों बाजीरावाचा सर्व कारभार म्हणजे पर्यायानें संपूर्ण मराठी राज्याचा आपल्या हातीं होता, तो आतां इंग्रजांकडे जाणार, हा प्रकार मात्र सिंद्यास रुचणारा

नव्हता. पुढें सिंदे बऱ्हाणपुरास दाखल झाल्यावर मागून क० कॉलिन्सही तेथें तारीख २७-२-१८०३ रोजीं पोंचला. यापूर्वी तो उत्तरेंत पेरॉनचे हालचालींवर नजर ठेवीत लष्करच्या फोडाफोडीचें काम करीत होता. परंतु दौलतरावानें त्याची भेट लगोलग घेतली नाहीं. पहिली भेट ता.१-३-१८०३ रोजीं नुसती दरबारी थाटाची झाली. नंतर दुसरी भेट ता. ११ मार्च रोजीं होऊन थोडें बोलणें झालें, त्यांत कॉलिन्सनें त्यास कळविलें,—' होळकरांचा तुमचा लढा पडला आहे, तो आम्ही तोडून तुमचा समेट करून देतों; आणि तुम्हींही वसईच्या तहास मान्यता देऊन तसा निराळा तह आमच्याशीं करावा. '

उत्तर—याचा विचार करण्यास आम्हांस थोडा अवधि पाहिजे. विचार करून मागाहून उत्तर देऊं. *

यानंतर १६ मार्च रोजीं सिंद्याचा वकील कॉलिन्सला भेटून म्हणाला:— ' दक्षिणेंत शांतता राखणें सिंद्यांसही इष्टच आहे; आणि इंग्रज सरकाराशीं सिंद्यांचा जो स्नेहभाव चालू आहे, तोच मजबूद ठेवल्यानें शांतताही कायम राहील. होळकरांशीं आमचा कलह आहे, तो आमचा आम्ही पाहून घेऊं. त्यासाठीं इंग्रजांच्या मध्यस्थीची आम्हांस जरूर नाहीं. ' इंग्रजांशीं तैनाती फौजेचा तह सिंदे मान्य करितात कीं नाहीं, यासंबंधानें वकिलानें कांहींच खुलासा केला नाहीं. वसईच्या तहास मान्यता देण्यासंबंधानें सिंद्यानें कळविलें, कीं वस्तुतः सालबाईचा तह अद्यापि कायम आहे. त्यांत इंग्रज पेशव्यांचे दरम्यान सिंद्यांनीं जामीनगिरी पत्करिलेली आहे. असें असतां सिंद्यांस कळविल्याशिवाय परभारें पेशव्याशीं इंग्रजांनीं तह केला हें गैर होय. यावर कॉलिन्सनें विचारिलें,—

प्र.—पेशवे मालक व सिंदे नोकर असें असतां मालकानें नोकराची परवानगी घेणें हा न्याय कोठचा ! सालबाईच्या तहांतलें एखादें कलम मोडलें असलें तर त्याबद्दल सिंद्यांची जामिनगिरी आहे. पण इंग्रजांनीं पेशव्यांशीं नवीनच एखादा करार करण्यास सालबाईच्या तहांत बंधन नाहीं. असा करार करण्यास ते सर्वथा मुखत्यार आहेत. शिवाय वसईच्या तहांत सिंद्यांचा समावेश करण्याची किंवा त्यांच्याशीं नवीन करार करण्याची अद्यापि सवड आहेच. या संबंधांत पेशव्यांची गांठ घेऊन मग काय तो निकाल सांगूं असें तुम्ही म्हणतां, यांत तुमचा असा भाव व्यक्त होतो कीं, आम्ही

* Wellesley Disp. Vol 5,–Report to Secret Committee.

सांगतों हें खोटें व आमचे बोलण्यावर तुमचा विश्वास नाहीं. याचा अर्थ आम्ही असा मानूं, कीं आम्हीं केलेली व्यवस्था मोडून काढण्याचा तुमचा विचार आहे, खरें कीं नाहीं ? यावर सिंद्याचे वकिलानें जबाबच दिला नाहीं.

यापुढची सिंद्याशीं कॉलिन्सची भेट २४ मार्च रोजीं झाली, तींत पुनः त्यानें तेच सवाल टाकले व जबाब मागितले.

कॉ.——आम्हीं वेळेवर बाजीरावास साह्य केलें म्हणूनच त्याचा व कांहीं अंशीं तुमचाही निभाव लागला. नाहीं तर तुमचा दोघांचा होळकराचे हातून नाश होण्याचा योग आला होता. तर आतां या बाबतींत पुढें तुम्ही कोणता मार्ग स्वीकारणार तें स्पष्ट सांगा.

सिं.——इंग्रजसरकारांनीं केलें तें ठीकच. पण पेशव्यांनीं आम्हांस यांतलें एक अक्षरही अद्यापि कळविलें नाहीं; आणि त्यांचा विचार कळल्याशिवाय आम्हांस कोणताही निकाली जबाब देतां येत नाहीं. सर्व प्रकरण आम्हांस सांगण्यासाठीं बाजीरावाचा कारभारी वसईहून निघाला आहे, तो येऊन खुलासा झाल्यावर मग काय तो जबाब तुम्हांस सांगूं. मात्र याचा अर्थ असा नाहीं, कीं वसईचा तह आम्हीं अमान्य करितों. त्यांत विरोध करण्याची आमची बिलकूल इच्छा नसून इंग्रज सरकाराशीं आमचा पूर्वापारचा स्नेह कायम आहे. यानंतर लौकरच इंग्रज फौजा पुण्यास आल्याची वार्ता दौलतरावास कळली, त्यावरून त्यानें रेसिडेंटास कळविलें कीं,—

सिं.——इंग्रज फौजा पुण्यास येण्याची गरज नाहीं. त्यास आमची हरकत आहे. ग० ज० यांस लिहून फौजा परत नेण्याची तजवीज करा.

कॉ०—वसईचा तह जर तुम्हांस मान्य आहे म्हणतां, तर त्यांतच ठरल्याप्रमाणें फौजा पुण्यास आल्या यांत गैर काय ? आतां ती गोष्ट मना करणें आमचे हातीं नाहीं.

अशी बोलाचाली चालू असतांच सिंद्यानें निजामाकडे आपला वकील पाठवून त्याजकडून चौथाईची मागणी केली. त्यावरून ग० ज० नें कलकत्त्याहून एकंदर प्रकरणासंबंधानें सिंद्यास पत्र पाठविलें तें कॉन्लिसनें दरबारांत सिंद्यास सादर केलें, त्यांतही असा मजकूर सिंद्यास लिहिलेला होता कीं, 'होळकराशीं तुमचा तंटा असेल तो आम्ही तिऱ्हाईतपणें तोडून देतों.' या मुद्यास सिंद्यानें जबाब दिला नाहीं. त्यानंतर १८ एप्रिल रोजीं सिंद्याचा वकील विठ्ठलपंत कॉलिन्सकडे आला; आणि दटावणीच्या भाषेनें म्हणाला, 'वसईच्या तहानें इंग्रजांनीं सिंद्यांचें पागोटें डोक्यावरून खालीं पाडिलें आहे, तें पुनः परत डोक्यावर ठेवतां कीं नाहीं तें सांगा.'

कॉ०—सिंद्यांशीं यत्किंचित् वैरभाव ठेवण्याची किंवा त्यांस नुकसान पोंचविण्याची आमची इच्छा नाहीं.

यानंतर ता. ४ मे रोजीं सिंद्यानें बऱ्हाणपुर सोडून दक्षिणेकडे कूच चालविलें. कॉलिन्सही त्याजबरोबर निघाला. गेल्या दोन महिन्यांत सिंदे, भोसले, होळकर, इत्यादिकांचे वकील उघडपणें एकमेकांकडे जाऊन इंग्रजांविरुद्ध मराठमंडळाची जंगी जूट उभी करण्याचा उघड प्रयत्न करीत होते, त्याची बातमी ग० ज० यास पूर्ण लागली. भोसल्याची गांठ घेण्यासाठींच सिंद्यानें बऱ्हाणपुराहून कूच केलें आणि भोसलेही त्यासाठीं फौजेसह नागपुराहून वाट चालूं लागला. तथापि यांचा उद्देश इंग्रजांशीं युद्ध करण्याचा आहे असें ग० ज० नें मानलें नाहीं. पण असा कांहीं व्यूह घाटत असल्यास त्याची माहिती स्पष्टच सिंद्यास विचारून काढा, असें ग० ज० नें कॉलिन्सला लिहिलें, आणि कळविलें कीं, त्यास मुद्दाम बजावा, ‘ जर इंग्रजांशीं दोस्ती राखण्याचा तुमचा विचार खरोखर असेल, तर अशा मोठ्या फौजा घेऊन प्रस्तुतच्या परिस्थितींत तुम्हीं दक्षिणेंत राहणें तुम्हांस व आम्हांस धोक्याचें आहे, तर तुम्हीं आपली फौज घेऊन परत नर्मदेपार निघून जा. असें न करितां तुम्ही पुण्याकडेच फौजा घेऊन जाल तर तुमचा विचार वसईच्या तहास विरोध करण्याचा व आमच्याशीं असलेला स्नेहसंबंध तोडण्याचाच आहे असें समजून, त्याच्या प्रतीकाराचे इलाज आम्हीं करूं. निजाम सरकारही आमचे दोस्त आहेत. त्यांचें संरक्षण करण्याची हमी आम्हीं घेतलेली आहे, सबब त्यांच्या वाटेस सिंदे जातील तर तें आम्हांस बिलकूल खपणार नाहीं.’ हा ग०ज०चा निर्वाणीचा खलिता ता. ३-६-१८०३ रोजीं कलकत्त्याहून सुटला, आणि त्याचा जो निकाल दौलतराव सांगतील तो तुम्ही तावडतोब से० वस्लीस कळवा, अशी ताकीद ग० ज०नें रेसिडेंटास पाठविली. शिवाय याच आशयाचें स्वतंत्र पत्र ग. ज. नें खुद्द सिंद्यास पाठविलें. भोसल्याजवळ जोशाया वेब ( Joshia Webbe ) हा रेसिडेंट होता, त्याच्याकडे भोसल्यासहीं त्याच आशयाचें पत्र ग. ज. नें पाठवून दरडावणी दिली. तिकडे पुण्यास क्लोज व से. वस्ली यांस या सर्व व्यवहारांची खबर देऊन पुढें बनाव बनेल त्या धोरणानें सावधगिरी ठेवण्याची भरपूर सूचना ग. ज. नें त्यांस दिली. खुद्द पेशव्यासही त्यानें निराळें पत्र लिहून ही सर्व परिस्थिति समजावून क्लोज व वस्ली यांस साह्य करण्याची त्यास विनंति केली.

या योगानें ठिकठिकाणचे इंग्रज अधिकारी वेळेवर सावध होऊन पुढील प्रसंगास तोंड देण्यास तयार राहिले. पुण्यास से. वस्लीनें पुढील प्रकरणाची व्यवस्था यथायोग्य लावून निजामाची, पेशव्याची व आपली अशा सर्व फौजा सिंद्यावर चालून जाण्यासाठीं सज्ज केल्या; आणि पावसाळ्यांत दक्षिण वऱ्हाडांत संग्राम चालवावयाचा, असा बेत ठरवून त्या धोरणानें त्यानें सर्वत्र हुकूम सोडिले.

युद्धाच्या तयारीनें दक्षिणचें वातावरण दुमदुमूं लागलें. कॉलिन्सनें तर प्रतिक्षणीं सिंद्याची अडवणूक चालविली. सिंदे आपल्याशीं स्नेह ठेवण्यास बिलकूल तयार नाहीं असें त्यानें वरिष्ठांस कळविलें, आणि इकडे वसईचा तह मान्य करतां कीं नाहीं, इंग्रजांची दोस्ती टिकविणार कीं तोडणार, हे प्रश्न तो सिंद्यास वारंवार विचारून साफीचा जबाब मागूं लागला. सिंद्यानें त्यास इतकेंच उत्तर दिलें, कीं 'भोसले नागपुराहून निघाले आहेत, त्यांची आमची भेट झाल्यावर मग काय तो निकाल सांगूं.' याचा अर्थ इंग्रजांनीं योग्य तोच घेतला. भेटी झाल्यावर मग युद्ध कीं स्नेह याचा निकाल सांगणें म्हणजे त्यांस आपली तयारी परिपूर्ण करण्यास सवड देणें होय असें मानून से. वस्लीनें युद्धाचीच तयारी कडेकोट चालविली. कानपुरास से० लेक होता त्यास त्यानें युद्ध सुरू होतांच सिंद्याचे तिकडील मुलखावर चालून जाण्याची सिद्धता ठेवण्यास लिहिलें. स. १८०३ च्या जून अखेर सर्व ठिकाणच्या इंग्रज सेनानींस युद्धाचे इशारे मिळाले. कलकत्त्याहून लेखी हुकूम जाण्यास वेळ लागून कामें बिघडूं नयेत यासाठीं से. वस्ली व लेक यांस परिस्थित्यनुरूप वापरण्याचे युद्धतहांचे संपूर्ण अधिकार त्यानें दिले, त्याची स्पष्टता पुढें येईल.

'युद्ध कीं स्नेह' याचा निक्षून जबाब योग्य मुदतींत सिंद्यांकडून मिळविण्याची ताकीद ग० ज० नें कॉलिन्सला दिली, आणि ती मुदत से० वस्लीनें ठरवावी असें लिहिलें. कर्नाटकांतले जहागीरदार, होळकर, अमृतराव इत्यादिकांशीं पाहिजे ते करार वगैरे करण्याचा किंवा त्यांस शत्रुमित्र ठरविण्याचा संपूर्ण अधिकार से० वस्लीस दिलेला असल्यामुळें, पुण्यांत बसून त्यानें मराठी राज्यांतला प्रत्येक सरदार अजमावून पाहिला. शत्रुपक्षाकडे जे कोणी युरोपियन अम्मलदार असतील त्यांस जरूर तें आमिष दाखवून त्यांजला आपल्याकडे वळविणें किंवा निदान बाजूस काढणें, ही गोष्ट करण्याची सूचना ग० ज० नें वस्लीस दिली. मुंबईस जोनाथन डंकन गव्हर्नर होता, त्यास या सर्व प्रकरणाची भरपूर खबर देऊन गुजरातेंत व पश्चिम किनाऱ्यावर आणि

गायकवाडांकडे वगैरे ज्या कांहीं तजविजी ठेवणें योग्य दिसेल त्या ठेवण्याची समजूत त्यास देण्यांत आली. अशीच समजूत मद्रासचा गव्हर्नर लॉर्ड क्लाइव्ह यालाही ग० ज० नें कलकत्त्याहून दिली. शत्रुपक्षाकडील युरोपियन व एतद्देशीय अम्मलदार व त्यांचे लोक यांस फितवून निकामी करण्याच्या कामगिरीवर एक मुख्य अम्मलदार मेजर फ्रिथ ( Frith ) या नांवाचा ग०ज०नें मुद्दाम नेमिला; आणि त्यासाठीं जरुरीप्रमाणें ठिकठिकाणीं जाहीरनामे काढावे, आणि ते आपल्या व शत्रुपक्षांच्या लष्करांत आणि गांवोगांवच्या सैनिकांच्या बायकामुलांस मुबलक वांटावे, अशा किती तरी विशिष्ट सूचना ग० ज० नें रोजच्या रोज लिहून पाठविल्या. अशा जाहीरनाम्यांचे मुसुदे सुद्धां त्यानें स्वतः तयार करून पाठविले. या जाहीरनाम्यांचा मतलब असा होता, कीं तीन महिन्यांचे आंत मराठे सरदारांची नोकरी सोडून जे कोणी लोक, मग ते इंग्रज, फ्रेंच, किंवा हिंदी कोणीही असोत, इंग्रजांच्या पक्षाकडे येऊन मिळतील त्यांस सत्कारपूर्वक नोकरींत घेण्यांत येऊन पूर्वी मिळत असलेला पगार इकडून देण्यांत येईल. याचे उलट जे कोणी गृहस्थ इंग्रजां विरुद्ध शस्त्र उचलून शत्रूंस साह्य करतील, त्यांस पुढें इंग्रजांचा आश्रय कधींही मिळणार नाहीं. अशा मतलबाचे जाहीरनामे पुढें ठिकठिकाणीं काढण्यांत आले. युद्ध सुरू झाल्यावर कोणीं कोठें कसें वर्तन ठेवावें, या संबंधानें भरपूर समजुतीचीं टिपणें ता. २७–७–१८०३ रोजीं ग. ज. नें रवाना केलीं. हीं टिपणें चांगलीं खुलासेवार असून युद्ध कसें चालवावें, परहद्दींत जाणें असल्यास आगाऊ जाहीरनामे काढून लोकांस खूष कसें ठेवावें, युद्धापासून कोणते हेतु सफल करून घ्यावयाचे, त्यास लागणारें साहित्य कोठून कसें संपादन करावयाचें, एका सेनापतीनें दुसऱ्याचें साह्य कोठून कसें करावयाचें, अशा शेंकडों विषयांची स्पष्टता ग.ज.नें करून दिली. उत्तरेंतील युद्धाचें केन्द्र अलाहाबाद व कानपुर येथें होतें. पेरॉननें बनविलेलें सिंद्याचें लष्कर नाहींसें करणें, बादशहास ताब्यांत घेऊन दिल्ली आग्र्याचा बंदोबस्त ठेवणें, गंगायमुनांच्या दुआबांतील मराठ्यांचा मुलूख व बुंदेलखंडाचा प्रदेश जिंकून इंग्रजी राज्यांत सामील करणें, यमुनेच्या पश्चिम कांठावर लष्करी बंदोबस्ताचीं ठाणीं कायम करणें, देशांतील फ्रेंच सत्तेचा नायनाट करणें, हिम्मतबहाद्दर गोसावी यास मराठ्यांचे पक्षांतून फोडून आपल्या बाजूस आणणें, ग्वाल्हेरचा किल्ला हस्तगत करून त्याचे उत्तरेकडील प्रदेशांत सिंद्यास आडकाठी बसविणें, गोहदचे राण्यास खर्चास देऊन त्याचे मार्फत जाठांचें साह्य मिळविणें, राजपुतान्यांतील राजे व बुंदेलखंडांतील जहागीरदार यांच्याशीं दोस्तीचे व तैनाती फौजेचे तह ठरवून

त्यांस सिंद्यांचे कक्षेंतून सोडवून स्वतंत्र करणें, बेगम समरूला इंग्रजी छत्राखालीं आणून तिची जहागीर तिजकडे चालविणें, असे किती तरी युद्धोपयोगी तपशील ग. ज. नें लेक व से. वस्ली यांस लिहून कळविले. एतद्देशीय राजांस इंग्रज छत्राखालीं आणण्याच्या या कामगिरीसाठीं लॉर्ड वेल्स्लीनें स्वतःचे विश्वासाचा एक अम्मलदार मि. मर्सर ( Mercer ) नांवाचा लेक जवळ सेक्रेटरीसारखा ठेवून दिला, कीं जेणें-करून लेकच्या हालचालींची खरी वस्तुस्थिति त्यास वेळेवर कळावी, आणि कोठें कांहीं बिघाड होत असेल तर त्याचा वेळींच बंदोबस्त करितां यावा. हिम्मत बहाद्-राचा भाऊ उमरावगीर गोसावी हा नबाब वजीरअलीचे कटांत सामील झाल्यावरून इंग्रजांनीं लखनौस कैदेंत ठेविला होता, त्यास त्यांनीं सोडून दिलें. आपणांस बुंदेल-खंडांत जहागीर द्यावी म्हणजे आम्ही दोघे बंधू मराठ्यांचा आश्रय सोडून कंपनीचे आश्रयास येतों अशी मागणी त्यांनीं केली, ती ग० ज० नें कबूल केली. या सर्व रजवाड्यांस ग० ज० नें कलकत्त्याहून स्वतः पत्रें लिहिलीं; आणि अनेक नाजूक प्रकरणें जरूरीप्रमाणें उरकण्यासाठीं भरपूर अधिकारांची सनद से० वेस्लीस ता. २६–६–१८०३ ची व लेक यास ता. १७–७–१८०३ ची पाठविली. दक्षिणेंतून से० वस्लीकडून इशारा येतांच उत्तरेंत सिंद्यावर युद्ध सुरू करावें अशी सूचना लेक यास दिली. सर्वाधिकार दिलेले असले तरी शक्य तोंवर कलकत्त्यास लिहून हुकूम आणवावे, आणि विलंब लागल्यानें काम बिघडण्यासारखें असेल तेवढ्याच पुरता हा सर्वाधिकार त्यांनीं वापरावा, असा इशारा दिलेला होता.

या नानाविध तजविजी येथें केवळ सूचक दृष्टीनेंच नमूद केल्या आहेत. तेवढ्या-वरून लॉर्ड वेल्स्लीची वस्तादगिरी व दूरदृष्टि व्यक्त झाल्याशिवाय रहाणार नाहीं. या एकंदर व्यवहारांचे हजारों छापील पृष्ठांचे खलितें इंग्लंडचे सरकारास त्यानें लिहून पाठविलेले नुसते वाचण्यास वर्ष सहा महिने पुरणार नाहींत. यावरून इंग्रजांच्या या सर्वांगीण तयारीपुढें मराठ्यांची बाजू अंगीं सामर्थ्य असूनही किती कोती होती याचा अंदाज करतां येईल.

**२ इंग्रज मराठ्यांचा स्नेहभंग** ( ३-८-१८०३ ).—रघूजी भोसल्याची भेट झाल्याशिवाय आम्हांस निकाली जवाब कांहींच देतां येत नाहीं असें कॉलिन्सला दौलतरावानें कळविल्यानंतर भोसले व सिंदे यांच्या भेटी ता. ४-६-१८०३ रोजीं वऱ्हाडांत मलकापुराजवळ बोदवड येथें झाल्या. लगेच दुसरे दिवशीं कॉलिन्सनें

आपला दुभाष्या रघूजीकडे पाठवून पूर्वीच्या प्रश्नाचा जबाब विचारिला. त्यास रघूजीनें कळविलें, कालच मला ग. ज. चें पत्र येऊन वसईच्या तहाची बातमी प्रथम कळली. त्यानंतर ता. ८ जून रोजीं सिंदे भोसल्यांचें पहिलें खलबत झालें. दुसरेच दिवशीं कॉलिन्सनें सिंद्याकडे आपला सेक्रेटरी पाठवून स्नेह कीं बिघाड या प्रश्नाचा खुलासा विचारला. परंतु वेळ मारून नेण्यापलीकडे दुसरें उत्तर सिंद्यानें त्या वेळीं दिलें नाहीं. त्यानंतर १२ जून रोजीं कॉलिन्सनें सिंद्यास व भोसल्यास पत्रें लिहून कळविलें कीं, 'आपलेकडून लगोलग उत्तर न येईल तर मला आपली छावणी सोडून निघून जावें लागेल.' त्यावर सिंद्यानें तीन दिवसांची मुदत मागितली. रघूजीनें जबाब दिला कीं, मला अद्यापि एकंदर व्यवहारांची हकीकत कळली नाहीं, ती समजून घेण्यास मुदत पाहिजे. अशा रीतीनें या त्रिवर्गाचा व्यवहार हळूहळू वर्दळीवर येत चालला. पुढें सिंदे भोसले यांनीं कळविलें, 'स्नेह कीं बिघाड, याचा निकाल सांगणार आम्ही एकटे कोण? पेशवे होळकर वगैरे सर्व प्रमुखांनीं एकत्र भेटूनच हा निकाल सांगितला पाहिजे.' पैकीं होळकर या वेळीं त्वरित भेटीच्या टप्यांत नव्हता. ता. १८ जून रोजीं कॉलिन्सनें रघूजीची भेट घेण्याची इच्छा दर्शविली. पण रघूजीनें त्याची गांठ घेतली नाहीं. त्यावरून १९ जून रोजीं कॉलिन्सनें दौलतरावास पत्र लिहिलें, कीं 'दोन दिवसांत तुम्हीं निकाली जबाब न दिल्यास ता. २२ रोजीं मी तुमची छावणी सोडून चालता होईन.' त्यावर सिंद्यानें सहा दिवसांची मुदत मागितली. दरम्यान रघूजीनें ता. २५-६ रोजीं कॉलिन्सची भेट घेतली, पण बोलणें कांहीं झालें नाहीं. नंतर २८ जून रोजीं कॉलिन्सनें दौलतरावाकडे जबाब विचारला. त्यावर सिंद्यानें कळविलें, 'आपण त्रिवर्ग येथें एकत्र भेटून खुल्या अंतःकरणानें या प्रकरणाची वाटाघाट करूं.' सिंदे भोसले असेंही म्हणूं लागले, कीं 'वसईच्या तहाची नक्कल अद्यापि आमच्याकडे पेशव्याकडून आली नाहीं. ती आल्याशिवाय व पेशव्याची भेट झाल्याशिवाय आम्ही परभारें निकाली जबाब तो काय देणार!' नंतर ता. १ जुलई रोजीं कॉलिन्सनें दौलतरावाची गांठ घेतली, आणि निष्कारण कालहरण करून तुम्ही आम्हांस कसे अडचणींत टाकीत आहां, या संबंधानें त्याची कानउघाडणी केली; आणि असेंही साफ कळविलें कीं, 'तुम्ही आपल्या सर्व फौजा घेऊन येथें जमलां, अशा स्थितींत वस्लीनें युद्ध सुरू केल्यास त्याची जबाबदारी तुमचेवर आहे.' त्यावरून ता. ४ जुलई रोजीं पुनः तिघांच्या भेटी होऊन वाटाघाट झाली. त्या वेळीं भोसल्याचे तर्फेनें त्याचा वकील श्रीधरपंत बोलत होता.

श्री०—आम्हांस विचारल्याशिवाय परभारें बाजीरावाशीं करार ठरविणें तुम्हांस योग्य नव्हतें.

कॉ०—पेशव्यास होळकरानें ग्रासिलें तेव्हां तुम्हीं कां नाहीं त्याचे मदतीस धावून आलां? आम्हीं पुढें येऊन त्याचें संरक्षण केलें, यांत त्याचा किंवा आमचा दोष तो काय?

श्री०—वसईचा करार मोडण्याची कोणाचीच इच्छा नाहीं; व आम्ही आतां येथून आपल्या फौजा पुण्याकडे पाठवीत नाहीं. अजंठा घांटही आम्ही चढणार नाहीं. मात्र तुम्ही इंग्रज फौजांस आमच्या अंगावर पुढें येऊं देऊं नका.

कॉ०—तुम्ही सिंदे व भोसले युद्धाची तयारी जोरानें करीत आहां. होळकरास सामील करून घेऊन इंग्रजांविरुद्ध मराठ्यांची जूट जमविण्याचा तुमचा उद्योग चालू आहे. अशा स्थितींत तुमचा स्नेहाचा इरादा आम्हीं खरा कसा मानावा? तुमचा भाव खरोखर स्नेहाचा असेल तर सिंद्यांनीं प्रथम येथून कूच करून नर्मदेपार जावें, आणि भोसल्यांनीं नागपुरास परत जावें; आणि दोघेही आपापल्या हद्दींत पोंचल्यावर से० वस्लीला परत जाण्याची सूचना मी करितों. इतक्यावर ही वाटाघाट त्या दिवशीं तहकूब राहिली. त्यानंतर सिंदे भोसल्यांनीं ग० ज० चे नांवचीं स्वतः पत्रें लिहून तीं पुढें रवाना करण्याकरितां ता. ९ जुलई रोजीं कॉलिन्सच्या हवालीं केलीं. इकडे या वेळीं कलकत्ता येथें ग० ज० स अशी बातमी लागली, कीं बुंदेलखंडांत गनीबेग व हिम्मतबहादूर यांस सिंद्यानें पत्रें लिहून इंग्रजांशीं लढण्यासाठीं फौजेची सिद्धता करण्याची ताकीद दिली आहे. ही बातमी कळल्यावर ग० ज० नें कॉलिन्स यास लिहिलें कीं, 'तुम्हीं अशीं बाहेर लोकांस पत्रें लिहून आमचे विरुद्ध युद्धाचा उठावा करीत आहां कीं नाहीं, याचा जाब सिंद्यास विचारावा.' तदनुसार १६ जुलई रोजीं कॉलिन्सनें सिंद्याची भेट घेऊन जाब विचारला.

सिं०—आम्हीं अशीं पत्रें लिहिलीं नाहींत. उलट इंग्रजांशीं युद्धाचा प्रसंग आणूं नका, असेंच आम्हीं त्यास बजाविलें आहे.

कॉ०—असें असेल तर तुम्हीं येथून नर्मदेपार कधीं रवाना होणार?

सिं०—आम्हीं ग० ज० यास पत्रें लिहून तुमच्याकडे दिलीं आहेत, त्यांचा जबाब आल्यावर काय तें कळवूं.

ता. १४-७ रोजीं से. वस्लीचें पत्र दौलतरावास आलें तें असें. 'निजामाचा व कंपनीचा स्नेह असून त्याचे संरक्षणाची हमी कंपनीनें घेतली आहे. अशा स्थितींत

तुम्ही व भोसले आपल्या फौजा निजामाचे हद्दीवर जमवून बसलां आहां, यामुळें आम्हांसही निजामाचे संरक्षणासाठीं लढाईची तयारी ठेवणें भाग पडत आहे. यासाठीं तुम्हीं आपले मुक्काम हालवून आपापल्या नेहमींच्या छावणींत निघून जावें. तसें न करितां आग्रहानें हल्लींच्या जागीं राहाल तर आम्हांस त्याचा प्रतिकार करावा लागेल; आणि त्यामुळें युद्ध सुरू झाल्यास त्याची जबाबदारी तुमचेवर राहील.' सिंदे भोसले यांनीं या पत्राचा खल पुष्कळ दिवस केला. भोसल्यानें ठरविलें, कीं आम्हीं आमचे हद्दींत असतां येथून निघून जाण्यास सांगणार हे कोण? तथापि सिंद्याशीं बोलणें करून मग पत्राचा जबाब देऊं, असें त्यानें कॉलिन्सला कळविलें. त्यानंतर कॉलिन्सनें दौलतरावास भेटण्याची इच्छा दर्शविली. त्यावरून २५ जुलईस भेट झाली त्यांत सिंद्यानें त्यास कळविलें कीं, 'आम्ही दोघेही आपापल्या हद्दींत आहों, पुण्यावर किंवा इतर ठिकाणीं चाल करून जात नाहीं असें लेखी आश्वासन आम्हीं दिलेंच आहे. वसईच्या तहाविरुद्ध आम्हांस वागावयाचें नाहीं असेंही आश्वासन आम्हीं दिलें आहे. यावरून इंग्रजांशीं लढण्याची आमची बिलकूल इच्छा नाहीं हें स्पष्ट आहे.'

कॉ०—तुमचे शब्दावर किंवा लेखावर विश्वास ठेवणें से. वस्लीस पसंत नाहीं. फौजा दूर नेल्याची कृति करून दाखवाल तेव्हांच त्यांची खात्री पटणें शक्य आहे. त्यांतून दौलतरावास आपल्या मुलखाच्या संरक्षणासाठीं येथें राहण्याची जरूर आहे असें म्हणावें, तर तसा शत्रुही कोणी जवळ नाहीं. मग येथेंच मुक्काम करून राहण्याचा तुमचा आग्रह कां? वस्लीच्या प्रश्नास जबाब काय तो ताबडतोब सांगा.

सिं०—ता. २८ जुलै रोजीं निकाली जबाब देऊं. पुढें २८ जुलई रोजीं कॉलिन्सनें निरोप पाठविला, "आम्हीं तुमचा जबाब स्वीकारण्यास केव्हां यावें?"

उ०—आज सिंदे भोसल्यांची बैठक आहे. ती झाल्यावर मग कॉलिन्स यांस भेटीस बोलावून जबाब सांगूं. या उत्तरानें चिडून जाऊन कॉलिन्सनें परत निरोप पाठविला कीं, 'उद्यां दुपारचे आंत तुमचा जबाब आला नाहीं तर मी येथून साफ निघून जाईन.' त्यावरून २९ जुलई रोजीं सिंद्यानें कॉलिन्स यास भेटीस बोलाविलें. त्या भेटींतही निकाली जबाब न मिळतां केवळ कालहरणाचाच प्रकार चालला आहे असें पाहून '३१ जुलई रोजीं मी निघून जातों,' असें निक्षून सांगून कॉलिन्स मुक्कामावर परत आला. त्याप्रमाणें तो ३१ जुलई रोजीं निघणार त्या दिवशीं जोराचा पाऊस पडून प्रवास करणें अशक्य झालें, आणि तितक्यांत सिंदे भोसल्यांचें त्यास भेटीचें

बोलावणें आलें. त्यावरून कॉलिन्स भेटीस गेला. त्या भेटींत सिंदे भोसल्यांनीं अशी नवीन सूचना पुढें ठेविली, कीं आम्ही दोघेही येथून बऱ्हाणपुरास परत जातों, पण त्यापूर्वी से० वस्लीनेंही आपले हद्दींत परत जावें. ही सूचना कॉलिन्सनें साफ नाकबूल केली.

सिंदे भोसले०—तुम्हींच कोणता तो दिवस मुक्रर करून आम्हांस सांगा, म्हणजे त्या दिवशीं आम्हीं बऱ्हाणपुरास व वस्लीनें आपले हद्दींत दोघांनीं एकदम येथून प्रयाण सुरू करावें.

कॉ०—से० वस्लीला विचारल्याशिवाय मला याचा निर्णय सांगतां येत नाहीं.

सिंदे भोसले—तुम्हीं से० वस्लीला लिहून त्यांसच प्रयाणाचा दिवस ठरविण्यास सांगा. ते ज्या दिवशीं आपल्या ठिकाणास पोंचतील त्याच दिवशीं आम्हीही आपले मुकामास पोहोंचूं. रघूजीनें असेंही कळविलें, कीं 'तुमचे मनांतील संशयनिवृत्ति करण्यासाठीं सिंदे, भोसले, इंग्रज व निजाम या सर्वांनीं एक दिवस मुक्रर करून त्याच दिवशीं आपापल्या स्थळास जाण्यास आपापल्या फौजांसह कूच करावें.'

कॉ. 'तुम्हीं तशीं पत्रें से० वस्लीस लिहून द्या, म्हणजे मी तीं त्यांस पोंचवून जबाब मागवितों.'

उत्तराची टाळाटाळी करून सिंदे भोसल्यांनीं नुसतें कालहरण चालविलें होतें. मराठमंडळाची जूट सिद्ध होतांच इंग्रजांशीं सामना करावा आणि वसईचा तह रद्द करून बाजीरावास सिंद्यानें आपले आश्रयाखालीं घ्यावें, हा त्यांचा घाट इंग्रजांस स्पष्ट दिसत होता, आणि त्यासाठीं त्यांचे भगीरथ प्रयत्न चालले होते. हे त्यांचे बेत परिपूर्ण होण्यास अवधि दिल्यानें ते बळकट होतील, त्यापेक्षां आतांच त्यांजवर एकदम चाल केली असतां अल्पावकाशांत त्यांचा दम उतरेल, अशी से० वस्लीची खात्री होऊन त्यानें कॉलिन्सला कळविलें, कीं 'सिंदे भोसल्यांचे सूचनेप्रमाणें आम्हीं आमचे मुक्कामास पोंचणें म्हणजे येथून श्रीरंगपट्टणचा किल्ला गांठण्यास दोन महिने पाहिजेत, आणि यांना बऱ्हाणपुरास पोंचण्यास दोन दिवसही नकोत. तर तुम्हीं आतां या वाटाघाटींत कालहरण न करितां सिंद्यांची छावणी सोडून एकदम निघून यावें.' हें पत्र आल्याबरोबर ता. ३-८-१८०२ रोजीं कॉलिन्स सिंद्याची छावणी सोडून औरंगाबादेस गेला, आणि तेथें पोंचला त्याच दिवशीं म्हणजे श्रावण शु. १५ शके १७२५ (ता. ६-८-१८०३) रोजीं से. वस्लीचें खालील पत्र दौलतरावास आलें. 'तुमचें पत्र पोंचलें. तुमच्यावर चढाई करून युद्धाचा प्रसंग आणावा अशी कंपनी सरकाराची

बिलकूल इच्छा नसतां, तुम्हींच मोठ्या फौजा एकत्र जमवून आमच्याशीं युद्ध करण्याचा इरादा व्यक्त केला आहे. तुम्ही स्नेह राखणार कीं युद्ध करणार याबद्दल साफीचा जबाब विचारला असतां, तसा जबाब न देतां उलट निजामाचे हद्दीवर फौजा जमवून बसलां आहां. आपल्या फौजा परत न्या असें कळविलें असतांही, आम्ही अगोदर निघून जावें असें तुम्ही कळवितां, यावरून तुमचा युद्धाचा इरादा व्यक्त होत आहे. मैत्रीसाठीं पुढें केलेला हात तुम्हीं झिडकारिला आहे. त्यामुळें आम्हांस युद्ध सुरू करणें प्राप्त आहे. अर्थात् त्याची जबाबदारी तुमच्यावर राहील.' दुसरे दिवशीं ता. ७-८-१८०३ रोजीं वाळकीचे मुक्कामीं से० वेल्स्लीनें जाहीर नामा काढला, कीं 'पेशवे व निजाम यांच्या संरक्षणासाठीं आम्हांस सिंदे भोसल्यांशीं युद्ध करावें लागत आहे. या युद्धांत बाहेरच्या रयतेस यत्किंचित् उपद्रव देण्याची आमची इच्छा नाहीं. मात्र लोकांनींही आमच्या फौजांस कोणताही त्रास देऊं नये. त्यांनीं स्वस्थ घरांत राहावें म्हणजे त्यांस तोशीस पोंचणार नाहीं.'

अशा रीतीनें मराठ्यांच्या इतिहासांतील अत्यंत प्रचंड व प्राणघातक युद्ध सुरू झालें. वर जे बनाव सांगितले आहेत त्यांत राजनीतींतले कित्येक विचित्र मासले अभ्यासकांस उपलब्ध होतील. त्याबद्दल जास्त विवेचन करण्याची जरूर नाहीं. एक महत्त्वाचा मुद्दा असा निघाला कीं, बाजीरावानें राज्यत्याग केला कीं काय, आणि सरदारांस न विचारतां परभारें त्या सर्वांस बंधनकारक असा करार करण्याचा त्यास अधिकार होता कीं नाहीं ? हा एक प्रश्न झाला, तर इंग्रजांच्या बाजूनें असा मुद्दा निघतो, कीं इंग्रजांनीं तरी आपण वसईस केलेला करार कोठें पाळला ? बाजीरावावर उठलेल्या बंडखोरांचें म्हणजे होळकर अमृतरावांचें पारिपत्य करणें इंग्रजांचें कर्तव्य होतें, त्या ऐवजीं त्यांनीं त्याच्या दोस्तांचें पारिपत्य केलें, ही गोष्ट पुढें त्यांच्याच कृतीवरून सिद्ध झाली. सिंदे भोसल्यांचा पाडाव होऊन होळकर मात्र निरंकुश राहिला, याजबद्दल इंग्रजांस लाज वाटून पुढील सालीं त्यांनीं होळकरावर शस्त्र धरिलें, आणि ते सिंदे-भोसल्यांच्या नाकदुराया काढूं लागले. इतकें सर्व करून शेवटीं त्यांनीं राज्यहरण केलें बाजीरावाचें, हा मोठाच विश्वासघात होय. आणखी एक मुद्दा असा निघतो, कीं वसईस झालेला करार पुरा पाडण्यास युद्धाचीच जरूर होती कीं काय ? युद्ध केल्याशिवाय देशांत शांतता प्रस्थापित झाली असती कीं नाहीं ? याचाही निर्णय विचारवंतांनीं वेल्स्लीबंधूंच्या विरुद्धच दिला आहे. युद्ध न करतांही येथें इंग्रजांची सार्वभौम सत्ता स्थापन होऊं शकली असती. एकंदरींत या युद्धाची जबाबदारी वेल्स्ली बंधूंवर आल्या-

शिवाय राहत नाहीं. पैशाचा चुराडा करून त्यांनीं भलत्याच आपत्ति देशावर आणिल्या. ता. ७-८-१८०३ चें खालील पत्र युद्धारंभींची परिस्थिति व्यक्त करतें. ‘ सिंदे भोसले अजिंठ्याच्या घांटाखालीं आहेत. पलीकडे वीस कोसांवर होळकर आहेत. खंडेराव होळकर यशवंतरावाकडे गेले. इंग्रज पलटणें नगराजवळ आहेत. भोसल्याचे चाळीस हजार स्वार व तीन कंपू, सिंद्यांचे पस्तीस हजार स्वार व तीन कंपू; व होळकराचे पाऊण लाख स्वार व सहा कंपू अशी फौज असून, बापू गोखल्यांचे स्वार पांच सहा हजार आहेत. अमृतराव नासिक प्रांतीं लूट करितात, त्यांचे पारिपत्यास जाण्याविषयीं गोखले व आपा देसाई निपाणकर यांस बाजीरावांनीं पत्रें पाठविलीं; पण से० वस्लीनें गोखले व निपाणकर यांस निरोप दिला नाहीं. अमृतरावाचा वकील प्रभाकरपंत म्हणून वस्लीजवळ आहे. सिंद्यांचे गोपाळराव चिटणीस आघाडीस गंगेवर होते, त्यांचा व स्टीव्हनूसनूचा मुकाबला होऊं लागला. सर्वांचा इरादा इंग्रजांस राज्यांतून बाहेर काढावें हा आहे. या उपरी कोणच्या थरास जाईल पाहवें. ’

सरदारांची जूट बनत आली होती, ती पुरी होण्यास अवकाश न देतां वस्लीनें एकदम साहस करून सिंद्यावर शस्त्र उचलिलें. इंग्रज व आपण मित्रच आहों अशा भावनेवर बाजीराव थोडासा गाफील होता, आणि तयारीच्या दृष्टीनें पाहिलें तरी एकदम युद्ध अंगावर घेण्यांत से. वस्लीनें साहसच केलें. त्यानें असा विचार केला कीं, त्वरा करून यश आलें तर बरेंच झालें. यदा कदाचित् बाजू अंगावर आली तरी म्हैसूरपर्यंत मागचा पाया शाबूद असल्यामुळें आपणांस फारसा धोका नाहीं. मराठ्यांच्या चालढकलीच्या स्वभावाचाही त्यास फायदा मिळाला. मराठमंडळाची जूट आठ चार दिवसांत सिद्ध व्हावयाची त्यास आठ महिनेही पुरेनात. राजनीतीच्या काव्यांत मराठ्यांच्या या युद्धाचा प्रसंग अत्यंत संस्मरणीय व अभ्यसनीय आहे. ‘ त्वरेस मोल आहे ’ हा न्याय से० वस्लीनें ओळखला. शेवटपर्यंत बाहेरून त्यानें बाजीरावाचे बचावाची सबब दाखवून, अमृतरावास व गोखल्यास बरोबर घेऊन त्रिवर्गांवर चाल केली आणि सिंदेभोसल्यांस पुनः कळविलें कीं, आम्ही बाजीरावाचे सांगण्यावरून होळकराचें पारिपत्य करणार. तरी तुम्हीं त्यास सामील न होतां आपले स्थळीं निघून जावें. त्यावर भोसल्यांनीं कॉलिन्सला सक्त जबाब दिला, त्यावरून विक्षेप मानून से. वस्ली लगेच पुढें चालून गेला.

**३ युद्धाच्या वणव्यांतील बाजीरावाचे ढंग.**—ता. १३-५-१८०३ रोजीं बाजीरावाचे पाय पुण्यास लागले, तेव्हां प्रथम आपल्या ममतेंतले कोण व

विरुद्ध कोण हें ठरविण्यासाठीं त्यानें सर्व सरदारांकडून राजनिष्ठेची शपथ घेवविण्याचा उपक्रम चालविला. ही युक्ति त्याला बहुत करून से. वस्लीनें सांगितली असावी. कारण पूर्वी कधीं असला सरसकट शपथविधि प्रचारांत असल्याचा उल्लेख आढळत नाहीं. रामचंद्र आपा लिहितो. 'सरकारांतून शपथ घ्यावयाचा मोठा आग्रह आहे. बुधवारीं रात्रीं वाड्यांत भोजनास गेलों होतों. श्रीमंतांस नक्कें आहेत. भोजनापूर्वी शपथेचा कारभार उरकला. से. वस्लीकडे बळवंतराव नागनाथ सरकारतर्फे मसलतींत असतात. शहरचा कारभार विठोजी नाईक करितात. सदाशिव माणकेश्वर श्रीमंतांची मर्जी पाहून कारभार पाहतात. खंडेराव रास्ते खासगीचें काम सांभाळून प्रसंगानुरूप लोकांचें बोलणेंही बोलतात. पुण्यास आल्यापासून दरबार वगैरे राज्याचा विचार बहुतसा नाहीं. उदासीन वृत्तीनें असतात. चित्तांतलें बोलून दाखवीत नाहींत. दौलत-प्रकरणीं अपशब्द बहुत बोलतात. होळकर धरून देतों अशी वस्लीची उमेद आहे. श्रीमंतांची मर्जी रुष्ट आहे.' ता. १-७-१८०३ चें वर्तमान. 'नित्यश्रीर्नित्यमंगलं' या न्यायें श्रीमंत सुखरूप आहेत. कोणती काळजी नाहीं. वसईहून अग्निहोत्री आणिले. चातुर्मास्यें करविलीं. स्वतः अध्वर्युत्व केलें. प्रायश्चित्त न पडतां अनुष्ठान सिद्धीस गेलें. रामचंद्र दीक्षितांसही आणविलें होतें. त्यांनीं सांगितलें जे, 'आपण क्षत्रिय धर्म करितां, आपणास अध्वर्युत्व करणें योग्य नाहीं. आपण यज्ञ करवावे.' भोजनसमयीं रांगोळ्या, वाजंत्रीं याप्रमाणें नित्योत्साह आहे. मर्जी जाणें ती भोजन आमंत्रणें वगैरे बाबतींत. दरबार प्रकरणीं शांत वृत्ति ढळत नाहीं. (ख. ले. ६६६८). 'श्रीमंतांस ज्वरांश जाला, त्यावरून दुष्ट दानें नित्य देत आहेत. शांतही चालली आहे. वसईहून ब्राह्मणाच्या पोरी दोघी बहुत खुपसुर्त्या, लावण्या बहुत चांगल्या गातात अशा, आणिल्या आहेत. बहुत पडदपोशीनें ठेवून नित्य दिवसा रात्रीं आपण व बळवंतराव नागनाथ व देवीदास सारंगी-वाला येणेप्रमाणें बसोन लावण्या ऐकत असतात. श्रीमंतांस गुदस्तांपासून बदाचा उपद्रव जाला, त्यामुळें हल्लीं प्रकृति ठीक नाहीं. उदईक एकादशीस ज्ञानेश्वराचे दर्शनास आळंदीस जाणार. मोरोबा मोन्या शागीर्द यास पालखीचीं वस्त्रें दिलीं. वसईस स्वारी गेली तेव्हां वाटेस भोजन करून घातलें. चौकीदार होता तो शागीर्द ठेविला. हल्लीं पालखी दिली. सांप्रत जवाहिरी दागिने श्रीमंतांच्या अंगावर असतात. मंगळवारीं रात्रीं पर्वतीस आतषबाजी जाली. अस्तमानीं स्वारी पर्वतीस गेली. उभयतां बाईही गेल्या होत्या. तेथें संध्या करून भोजन केलें. दहा घटका रात्रीस दारू उडावयास

आरंभ झाला. दारूचा डेरा राहुटीसारखा केला. हल्लीं नवीन मुत्सद्दीयांकडेस श्रीमंतांस मेजवान्या होत आहेत. ’

इंग्रजांशीं युद्धाचा भडका उडला असतां स. १८०३ सालचा हा बाजीरावाचा आयुःक्रम आहे. त्यापुढच्या सालीं दक्षिणेंत युद्ध नव्हतें; आणि से० वस्ली पुण्यामुंबईस होता, त्या वेळीं ‘ श्रीमंतांनीं फडक्यांचे वाड्यांत यज्ञमंडपाचें साहित्य करून स्वतः अध्वर्युपण घेऊन सात दिवस यज्ञ सिद्धीस नेला. ’ यावरून शत्रुनिवारणाचे व अरिष्ट-निरसनाचे बाजीरावाचे उपाय कशा प्रकारचे होते याची कल्पना होईल.

‘ बाजीरावाची चाल पाहून से० वस्लीचे मनांत आलें कीं बाजीराव दोस्तीच्या लायक नाहींत. याजकरितां धणी बाजीराव, परंतु त्यांस कारभारी अमृतराव करून देऊन घरचा द्वेष मोडावा, म्हणजे बाजीराव इंग्रजांचा स्नेह मोडूं पावणार नाहींत. तें कर्णेल क्लोज यांणीं होऊं दिलें नाहीं असें श्रमिंतांस समजलें. त्यावरून क्लोज साहेबांवर श्रीमंतांचा मोठा इतबार जाला. हर एक गोष्ट त्यांस कळवावी, दरबारांत-ही स्नेहवृद्धीचींच बोलणीं बोलावी, कीं माझें गेलेलें राज्य कर्णेलनीं मला दिलें, कोणाचा उपद्रव नाहींसें झालें. हें सारें करणें कर्णेल साहेबांचें; त्यांचे भरंवशावर मी आनंद करितों. ’

**४ सरदारांच्या जुटींतून यशवंतराव होळकराची फूट** ( ऑगस्ट १८०३ ).—लॉर्ड वेल्स्लीनें वसईचा तह घडवितांना असा पुकारा केला होता, कीं हिंदुस्थानांत शांतता प्रस्थापित करण्याचा आमचा हा उपक्रम आहे. पण त्या तहानें शांततेच्या ऐवजीं युद्धाचाच फैलाव सर्व देशभर कसा वृद्धिंगत होत गेला ही गोष्ट आतां येथून पुढें नजरेस येईल. मे महिन्यांत पुण्यांत बाजीरावाचें व से. वस्लीचें वास्तव्य सुरू झाल्यावर पुढें काय बनाव बनतो याचा कोणासच तर्क होईना. एका बाजूस युद्धाची तयारी परिपूर्ण करीत असतां वस्लीनें पुण्यांत बसल्या बसल्या तीन चार मुख्य गोष्टी साधल्या. बाजीरावास त्यानें बाह्यतः खूष ठेवून आंतून त्यास कोणत्याही पक्षाकडे वळूं दिलें नाहीं. दुसरी गोष्ट, पटवर्धन, गोखले, रास्ते, आपा देसाई निपाणकर यांचें साह्य मिळविलें. आम्ही केवळ बाजी-रावाचे साह्याकरितां आलों आहों अशी त्यांची समजूत पाडून, बाजीरावाकडून इग्रजांचें साह्य करण्याचे लेखी हुकूम त्यांस देवविले.त्यांचे मदतीचा प्रत्यक्ष उपयोग वस्लीस अल्प झाला, तरी ते सिंदे भोसल्यांस सामील झाले नाहींत यामुळें श्रीरंगपट्टण, मद्रास, हैदराबाद पावेतों इंग्रज फौजांना मागचा पायबंद बिलकूल राहिला नाहीं. आणखी

दोन गोष्टी म्हणजे अमृतराव व होळकर यांस विश्वास दाखवून सरदारांच्या जुटींतून त्यानें अलग केलें. हे दोन प्रकार विशेष तपशिलानें सांगितल्या शिवाय त्या वेळचीं राजकारणें नीट कळणार नाहींत.

से० वस्ली हरिहराहून पुण्याकडे निघाल्याचें कळतांच यशवंतराव होळकर पुणें सोडून पुढील अंदाज मनाशीं ठरवीत उत्तरेकडे निघाला. अमृतराव मात्र वस्ली पुण्याजवळ येईपर्यंत तेथून हालला नाहीं. ता. १-५-१८०३च्या सुमारास होळकरानें औरंगाबादेस वेढा घालून त्यांतून ११ लक्ष खंडणी वसूल केली, आणि पैठण व जालनापुर हीं शहरें लुटून जाळलीं. हें सर्व नुकसान निजामाचें होऊन क्षणोक्षणीं त्याचा कैवार घेणाऱ्या इंग्रजांनीं त्याचा वचपा काढण्याची गोष्ट सुद्धां मनांत आणिली नाहीं. नंतर होळकर चांदवडास जाऊन तेथें सुमारें दोन महिने राहिला आणि जुलईचे आरंभीं तो पुढें नंदुरबार सुलतानपुराकडे गेला.

यशवंतरावाची समजूत काढण्यासंबंधानें ता. ६-३-१८०३ रोजीं काशीराव होळकर भोसल्यास लिहितो, * 'या समयीं अडचणी स्वराज्यांत व परराष्ट्रादिक फारच, परंतु त्यांतही दुरंदेश विचार करून मनसब्याचे चालीनें थरचे चिरे थरीं बसवून करणी होऊं लागल्यास कांहीं एक अवघड पडावयाचें नाहीं.' पण हे चिरे जागच्या जागीं बसविण्याचें काम बाजीरावानें जेव्हां पुण्यास आल्यावरही अंगावर घेतलें नाहीं, तेव्हां यशवंतरावानेंच समेटाच्या अटी नक्की ठरवून त्या प्रथम भोसल्याचे वकिलामार्फत सिंद्याकडे पाठविल्या, त्या व त्यांजवरील सिंद्याचे जबाब आले ते असेः—

१ श्रीमंतांची सेवा तुम्ही आम्ही एकवाक्यतेनें करीत आलों, त्याप्रमाणें पुढें एकनिष्ठेनें उभयतांनीं सेवा करून श्रीमंतांचे मर्जीचा संतोष राखावा. एणें प्रमाणें करार.

२ भोसल्यांचा आमचा स्नेह पूर्वीपासून 'आहे तसाच तुम्हांकडून असावा. मीरखानाचा संशय भोसल्याचे मनांत आहे तो दूर करून त्यांची खातरजमा करावी, आणि त्रिवर्गांची एकवाक्यता असावी. दौलतींत ओढ बहुत त्यास फौजेचे खर्चाची योजना करावी. उत्तर. खर्चासाठीं इकडून सावकार देवविला जाईल.

३ श्रीमंत स्वामींची आज्ञा सिंदे यांजकडे येईल त्यांनीं वडीलपणें आम्हांस सल्ला सांगाल त्याप्रमाणें फौज पलटणासुद्धां तयार करून सांगाल तिकडे जाऊं. या कारभा-

* भालेरावकृत म. बु. मी. ले. ३, १२; ना. भो. का. ७३ ७६, ७९, ७४, ७७, ७८. कालक्रमानुसार हे आंकडे दर्शविले आहेत.

रानुसार त्रिवर्गाची एकवाक्यता होऊन भोसल्यांनीं बंगाल कटक प्रान्तीं फौजा पाठवून जलचरांस निकड बसवावी. ( जून १८०३ ).

मारवाडांतील व इतर ठिकाणच्या खंडण्या संबंधानें कित्येक किरकोळ कलमें वरील कागदांत आहेत, तीं येथें दिलीं नाहींत.

इतकें झाल्यावर यशवंतरावानें भोसल्याचे वकिलास नागपुरास पाठविलें. नंतर सिंद्याचा वकील यादवराव भास्करही नागपुरास गेला. तेथें चैत्रांत बोलणीं झालीं. श्रीधर लक्ष्मण यानें रघूजीस कळविलें, तुम्हीं ताबडतोब पुण्यास जाऊन जुटींत सामील व्हावें. त्याचे विरुद्ध कृष्णराव चिटणिसाचा सल्ला असा पडला, कीं इंग्रजांशीं असें एकदम विरुध्द वागूं नये; आणि फौज घेऊन नागपुराहून आतांच हलूं नये. रघूजीनें श्रीधर लक्ष्मणाची सूचना मान्य करून नागपुराहून प्रयाण केलें, आणि बोदवड येथें सिंद्याची भेट घेऊन पहिलें बोलणें होळकराची समजूत काढण्याचें केलें. तदनुसार समेट ठरून तशीं पत्रें रघूजीनें यशवंतरावास पाठविलीं. नंतर ता. २-७-१८०३ रोजीं यशवंतरावानें भोसल्यांचे वकील श्रीधर लक्ष्मण व कृष्णराव चिटणिस यांस नंदुरबारचे मुकामाहून लिहिलें, कीं 'तुम्हांकडील पत्रांचीं उत्तरें यशवंतराव रामचंद्र व व्यंकटराव कृष्ण यांजबरोबर केलीं आहेत, ते साविस्तर बोलतील. आपण केलेले श्रम वायां जाणार नाहींत ही खात्री आहे.' याच अर्थाचें पत्र ता ९ जुलईचें त्यानें रघूजी भोसल्यास लिहिलें, त्यांत तो म्हणतो, ' इंग्रज प्रकरणीं मजकूर यशवंतराव रामचंद्र व व्यंकटराव कृष्ण बोलतील त्याप्रमाणें घडावें म्हणून लिहिलें, ऐशीयास येविशींचीं उत्तरें उभयतांशीं बोलण्यांत आलीं आहेत, ते आपल्याशीं बोलतील.' हें पत्र पाठविलें त्याच दिवशीं खंडेराव होळकरास भोसल्यानें दौलतरावाकडून वस्त्रें देववून यशवंतरावाकडे रवाना केलें. ता. १-८-१८०३ च्या पत्रांत यशवंतराव रघूजीस लिहितो. "आपलें ता. २७-७ चें पत्र पोंचलें. यशवंतराव रामचंद्र व व्यंकटराव कृष्ण आले त्यांनीं बोलण्याचे भाव सांगितले व कलमबंदीच्या यादी दाखविल्या, त्या अन्वयें दौलतराव सिंदे व त्यांचे कारभारी यांची मखलाशी यादीवर करार लिहून देऊन उभयतांची रवानगी केली, ते साविस्तर बोलतील; मनन करून इंग्रजांकडील जाबसालाची निकड आहे सबब ज्या मसलतीचा उपयोग घडे तें करावें, जितकी जलदी घडेल तितका उपयोग आहे, म्हणून लिहिलें, ऐशीयास आपण उभयतांनीं बोलण्याचे भाव समजून कलमबंदीच्या यादीवर मखलासी करून पाठविली, त्यांतील अर्थ पाहतां, जागजागां दिकती व बादज (मागाहून) मसलत होण्याचे अर्थ.

तेव्हां सध्यां फौजेचा निर्वाह चालून मसलतीस उपयोग कसा घडतो, हे अर्थ आपले मनांत न यावे असें नाहीं. मसलतीची निकड आणि जाबसाल उगवल्याखेरीज फौजेचा चरितार्थ कोणे रीतीनें चालतो ? कागदीं पत्रीं लिहिल्यानें लांबण पडती. यास्तव पुनः यशवंतराव रामचंद्र व व्यंकटराव कृष्ण यांजबरोबर मल्हार शामजी व माधवराव गोविंद व विठ्ठल लक्ष्मण व शामराव बाजी यांची रवानगी केली आहे ते सविस्तर बोलतील, तो अर्थ मनन करून जाबसाल उगवून आपल्या भेटी घडून स्वराज्याचे मसलतीचा उपयोग घडेल तो अर्थ जाणल्यानें सर्वोपरी चांगलें आहे." यावरून दिसतें, कीं खंडेराव होळकर जरी यशवंतरावाचे हातीं आला तरी होळकराचे महाल परत करणें व कांहीं फौजेचे खर्चास रोख रक्कम देणें, या दोन मागण्या बाजीरावानें मान्य केल्या नव्हत्या. परंतु त्या मान्य केल्यास आपण येऊन सामील होतों, असें यशवंतराव ता. १-८-०३ च्या या पत्रांत लिहीत आहे. ता. ७-८-०३ रोजीं तो वकिलांस लिहितो, 'मखलाशीच्या यादी आल्या त्यांतील अर्थ पाहतां, सध्यां फौजेचे निर्वाहाचा उपयोग घडून मसलतीस येणें घडावें हे प्रकार कसे घडतील हें त्याहावें तेव्हांच समजावें असें नाहीं. सबब (वरील) चौघांची रवानगी केली आहे, हे सविस्तर बोलतील, त्याप्रमाणें मनन करून उत्तरें समर्पक उगवून पाठवावीं, आणि सेना साहेब सुभा यांच्या भेटी होऊन मसलतीस उपयोग घडे तें करावें.' यावरून ७ ऑगस्ट पर्यंत यशवंतरावाच्या मागण्या दौलतरावानें पूर्ण करून दिल्या नव्हत्या. ता. २३ ऑगस्ट रोजीं यशवंतराव रघूजीस लिहितो, 'पुण्याचे मुक्कामीं श्रीधर लक्ष्मण व कृष्णराव माधव यांशीं आपलीं बोलणीं इंग्रज प्रकरणीं जालीं, कीं इंग्रजांची पसर राज्यांत होऊं न द्यावी, या गोष्टीस आम्ही सर्व प्रकारें अनुकूल, त्यावरून उभयतांनीं आमची खातरजमा केली व आपलीं पत्रेंही याच अन्वयें येत गेलीं. तेव्हां आम्हीं बाहेर निघोन दौलतरावांची भेट घेऊन तुम्हांकडील जाबसाल उगवून पाठविले, कांहीं तथा राहिली नाहीं. पुढें इंग्रजांनीं नगरचा किल्ला घेतला. आम्हीही उभयतां सडे होऊन मुकाबल्यास गेलों. या प्रसंगीं तुमचें येणें घडावें, हिंदु धर्म सर्वांनीं मिळून राखावा, स्वराज्यांतून इंग्रजांस काढावें हें सर्वपरी चांगलें आहे म्हणून लिहिलें, ऐशियास,-आम्ही पुण्याचे मुक्कामीं उभयतांशीं बोललों, त्याप्रमाणें औरंगाबादेस येऊन आपल्यास पत्रें पाठविलीं. नमूद होण्यास कसूर ठेविली नसतां, आपण इकडील जाबसाल उगवून न पाठवितां आम्हांस माघारे चांदवडास जाण्याविशीं लिहिलें, तेव्हां सर्व प्रकारें आपली मर्जी, दरकूच लाचार होऊन माघारे गेलों. आजपर्यंत सहा महिने

खर्चाखालीं किती आलें, अद्याप आमचे जाबसाल वांटणीसंबंधानें निर्वेध आम्हांस प्राप्त व्हावे असे उगवले नाहींत. जाबसाल उगवल्यानंतर मसलतीस सिद्धच आहों. हल्लीं भिकणगांव नजीक येऊन उत्तराची मार्गप्रतीक्षा करीत असों. आजपर्यंत जाबसाल उगवले असते तर इतकी लांबड कशास पडती ? अद्यापिही सर्वप्रकारें अनुकूल आहों. वांटणीसंबंधानें जाबसालाचा मात्र गुंता आहे. '

यावरून उघड होतें कीं, जप्त केलेले होळकराचे महाल अद्यापि सुटले नव्हते. आणि भोसल्यानें दौलतरावास कितीही आग्रह केला, तरी होळकराचा नाश करण्याची अढी त्यानें मनांतून सोडिली नव्हती. ही अढी न सोडण्याचें कारण बाजीरावच अंतस्थ रीतीनें यशवंतरावाचा सूड घेण्यास दौलतरावास प्रोत्साहन देत होता. ता. २७-८-१८०३ रोजीं होळकर रघूजीस लिहितो, ' इंग्रजांस स्वराज्याचा लोभ उत्पन्न होऊन नगरचा किल्ला घेतला. आपल्यापाशीं इंग्रज वकील होता तो न पुसतां उठून गेला. आपला व इंग्रजांचा छेटा थोडा आहे म्हणोन ऐकतों. त्यास आजपर्यंत आपसांत फूट होती यामुळें त्यांचा इतका पसार झाला. प्रस्तुत आपली त्रिवर्गांची एकदिली जाली, तेव्हां स्वराज्यांतील सर्व लहान थोर सरदार मराठे मुसल्मान सामील होतील. हिंदुस्थान प्रांतींचे राजेरजवाडे व समशेर बहाद्दर, बुंदेले, झांशीवाले आदिकरून छोटे मोठे अनुकूल होतील, इतका भरणा पाहतां पांच सहा लाख फौज व दहा कंपू होतील. दोन थाके ( भाग ) करून चाल केली असतां कांहीं जड पडावें असें नाहीं. इकडील बळ पडून ते कायल होतील. आपण उतावीळ करून गांठ घालूं नये. धमकावून पोक्त विचारानें पाऊल पडल्यास सहजांत कायल होतील. याच बेतास लागावें. कांहीं अवघड नाहीं. त्यांची चाल चहूंकडून, आणि आपण एके ठिकाणींच घोंटाळणें ठीक नाहीं. फौज व कंपू तिकडील जिल्ह्यांतील बोलावून घेऊन त्यांची आपली छेटी लांब पल्ल्याची राखून, प्रथम नबाबाचा मुलूख पोटीं पाडावा. इकडे आम्हींही तसा बेत धरितों. त्रिवर्गांची एकी जाहली त्याअर्थीच पाहून तें करूं. आपण इकडील कोणेविशीं संशय मनांत न आणितां सर्व प्रकारें मसलतीस अनुकूल आहों हे खातरजमा ठेवून तिकडे मसलतीचा नक्ष येईल तसा इकडे कळवीत जावा. इकडे घडेल तसें आपल्यास लिहीत जाऊं. सारांश या प्रसंगीं एकदिलींत कसर नसावी. याचे पोटांत कामें बहुत आहेत. आपण विचारवंत दूरदृष्टि आहां. विस्तारें लिहावें असें नाहीं. पत्रांच्या रवानग्या वरचेवर होत जाव्या.'

यापूर्वीच जुलईंत से. वस्लीनें होळकरास पत्र पाठविलें कीं, तुमच्या आमच्या भेटी व्हाव्या. त्यावरून होळकरांनीं उत्तर दिलें, ' जशा भेटी व्हावयाच्या असतील

त्याप्रमाणें घडतील.' याचा अर्थ उघड आहे कीं स्नेह किंवा युद्ध यांपैकीं तुमचा विचार असेल तोच माझाही आहे. त्या वेळीं भोसले सिंदे अजिंठ्याचे घांटावर फर्दापुरजवळ, होळकर मागें वीस कोसांचे तफावतीनें थाल्नेरावर होता, आणि से. वस्ली अहंमदनगरचे बाजूस असतां होळकर भोसल्यांची एकवाक्यता होऊन होळकर त्यास सामील होण्यासाठीं दोन मजला अलीकडेही आला, तेथें त्यास अमृतरावानें पकडलेलें दौलतरावाचें बाजीरावास लिहिलेलें पत्र मिळालें. तेव्हां होळकर बिथरून लगोलग परत माळव्याकडे गेला. त्याचें कारण चमत्कारिक आहे तें असें. या वेळीं बाळोजी कुंजर बाजीरावाकडून दौलतरावाजवळ येऊन बसला होता. इंग्रजांशीं युद्धाचा रंग दिसूं लागतांच दौलतरावानें बाजीरावास असें एक गुप्त पत्र लिहिलें कीं, 'तूर्त होळकराचे म्हणण्यास रुकार देऊन त्यास खुष ठेवावें. इंग्रजांचें युद्ध आटोपल्यावर मग आपण यशवंतरावाचा चांगला समाचार घेऊं.' हें पत्र दौलतरावाकडून बाजीरावास जात असतां वाटेंत तें अमृतरावानें पकडून से. वस्लीस दाखविलें. वस्लीनें तें अमृतरावाकडून यशवंतरावाकडे पाठविलें. मजकूर वाचून यशवंतराव सर्द झाला; आणि दौलतरावाचें कपट ओळखून तो तडक माळव्यांत निघून गेला, आणि पुढें दिल्लीकडे सिंद्याचा पाडाव होत असतां मजा पाहत स्वस्थ राहिला. हा सर्व प्रकार खुद्द से. वस्लीनें पार्लमेंटास सादर केलेल्या आपल्या खलित्यांत स्पष्ट केला आहे.

ता. २०-६-१८०३ रोजीं आर्थर वेल्स्लीनें माल्कम यास पत्र लिहिलें त्यांत तो म्हणतो, 'वसईच्या तहांतील करार पाळण्याची बाजीरावास मुळींच इच्छा नाहीं. कांहीं गोष्टी त्याच्या हातच्या आहेत, त्या सुद्धां तो अजून करीत नाहीं. त्याचा पत्रव्यहार रोजच्या रोज सिंद्याशीं चालू आहे. होळकराशींही त्याची बोली चाललीच आहे. खुद्द त्यानें सिंद्यास लिहिलेलें पत्र पकडण्यांत आलें, त्यांत तर वसईचे करार धडधडीत मोडल्याचें पूर्ण प्रत्यंतर आहे. गव्हर्नर जनरलांनीं सिंद्यास कळविलें, कीं तुम्ही आपली फौज घेऊन नर्मदेपार उत्तरेंत निघून जा, तरच तुमचा आमचा सलूख कायम राहील. यावर बाजीरावानें सिंद्यास मुद्दाम कळविलें, कीं 'तुम्ही परत जाऊं नका, आहां तेथेंच ठांसून राहा.' यांत बाजीरावाचा उद्देश स्पष्ट होतो. यानंतर तीन दिवसांनीं आर्थर वेल्स्ली पुण्याच्या रेसिडेंटास लिहितो, 'मी असें समजतों कीं अद्यापपर्यंत सरदारांचा समेट जुळला नसून होळकरही त्यांस सामील झालेला नाहीं, यासाठींच ते आमच्याशीं युद्ध कीं सख्य करणार तें जाहीर करीत नाहींत. होळकराचा उद्देश एवढाच दिसतो, कीं आपले महाल जप्त झाले आहेत ते कसे तरी परत मिळावे.

सिंद्याचें व आमचें युद्ध झालें कीं त्याचे महाल सुटतील अशी त्याची अपेक्षा दिसते. आमचें व सिंद्याचें युद्ध झालें नाहीं तर त्यास आपले प्रांत मिळविण्यासाठीं स्वतःच सिंद्याशीं युद्ध करावें लागेल तें टाळण्यासाठीं आमचें व सिंद्याचें युद्ध लावून आपण दूर राहून त्याचा परिणाम पाहवा, असा त्याचा विचार दिसतो. हा त्याचा कावा भोसले व सिंदे ओळखून आहेत. म्हणूनच ते त्यासही युद्धांत ओढण्याचा प्रयत्न करीत आहेत. ते त्यास असें सांगत आहेत कीं पुढें मागें तरी तुम्हांस इंग्रजांशीं झगडावें लागणारच. खुद्द पेशव्यानेंही त्यास हें भविष्य लिहिलेंच आहे. तुम्ही ( क्लोजनें ) यासंबंधानें पेशव्यास भेटून त्याची चांगली कानउघाडणी केली पाहिजे, कीं आमचा कोणत्याही तऱ्हेचा दावा होळकराशीं नाहीं. होळकर सिंद्यांचा मिलाफ न होण्याचा शक्य तो प्रयत्न आपण करणें जरूर असून सिंद्याशीं तुमचा काय पत्रव्यवहार चालला आहे, तो आम्हांस दाखवा अशी स्पष्टच मागणी तुम्ही पेशव्यांकडे कां करीत नाहीं ! वास्तविक तहाप्रमाणें बाजीरावानें आम्हांस पूर्ण साह्य केलें पाहिजे. तसें न करितां उलट तो सरदारांचा समेट जुळवून त्यांस आमच्याशीं लढण्यास प्रवृत्त करतो, याचा अर्थ काय ? '

या संबंधांत आर्थर वेल्स्लीनें खुद्द यशवंतराव होळकरास पत्रें लिहिलीं तीं अशीं. ' ता. १६ जुलई १८०३. तुमच्याकडून बरेच दिवसांत कांहीं खबर कळली नाहीं, तरी असें न करितां वरचेवर पत्र पाठवून कंपनीसरकाराशीं जडलेला तुमचा स्नेह वृद्धिंगत केला पाहिजे. या हेतूनें मी यासोबत वसईच्या तहाची नक्कल मुद्दाम तुमचेकडे पाठवीत आहें. ती वाचून तुमची खात्री होईल, कीं या करारानें कोणाचेही हितास बाध न येतां सर्वत्र शांतता नांदावी अशीच त्याची योजना आहे. बारावें कलम समस्त जहागीरदारांस लागू असून त्यांत होळकरांचा स्पष्ट निर्देश आहे, त्यावरून या तहानें होळकराचे हितसंबंधास कोणताही व्यत्यय येत नसून, तशी तुमची समजूत कोणी करीत असेल तर ती चूक आहे. हा करार यथायोग्य पाळला जाण्यांतच तुमचें व होळकर घराण्याचें हित आहे. तुम्हांस लोक या बाबतींत पाहिजे तें सांगोत, किंवा दुसरे सरदार वाटेल तसें वर्तोत, तुम्ही मात्र दूरवर विचार करून आपलें हिताहित कशांत आहे हें नीट लक्षांत आणून वसईचा करार पाळण्यांत कसूर करणार नाहीं अशी मला खात्री आहे.'

या पत्राचा जबाब कांहीं आला नाहीं, तथापि पुढील युद्धांत होळकर सिंदेभोसल्यांस सामील झाला नाहीं. त्यानंतर सिंदे भोसल्यांचा पाडाव झाल्यावर पुनः ता.

५–१–१८०४ रोजीं वेल्स्लीनें खालील पत्र होळकरास लिहिलें. '१६ जुलईचें माझें पत्र तुम्हांस पोचल्याचा जबाब आला नाहीं. तथापि तें पोंचलें नसल्यास त्याची नक्कल पुनः यासोबत पाठवीत आहें. कळविण्यास संतोष वाटतो, कीं सिंदे व भोसले यांच्याशीं पुनः दोस्तीचा तह होऊन त्यांचा आमचा सलोखा कायम झाला. तुम्ही बाजूस राहून हा बनाव घडवून आणण्यास मदत केली याबद्दल मी तुमचें अभिनंदन करितों. त्या युद्धांत तुम्हीं अत्यंत शहाणपणाचें व दूरदृष्टीचें वर्तन केलें हें पाहून मला पूर्ण समाधान वाटतें; आणि मी तुम्हांस असें आश्वासन देतों, कीं जोंपर्यंत तुम्ही कंपनीसरकारच्या किंवा त्यांच्या दोस्तांच्या वाटेस जाणार नाहीं, तोंपर्यंत आम्हीही तुमच्या वाटेस जाणार नाहीं. हें पत्र मेजर माल्कम तुम्हांस भेटून सादर करतील. सिंद्याचे दरबारीं वकील म्हणून राहण्यास ते जात आहेत. तुम्हांस कांहीं कळविणें असल्यास त्यांस सांगावें म्हणजे ते आम्हांस लिहितील, तेणेंकरून तुमचा व कंपनीसरकाराचा स्नेह दिवसेंदिवस वृद्धिंगत होत जाईल अशी मला आशा आहे.'

होळकराचा व्यवहार कालानुक्रमानें जरा पुढें गेला, तरी त्यावरून मराठमंडळाच्या जुटींत तो कां सामील झाला नाहीं, आणि त्याबद्दल बाजीराव व से० वस्ली कसे व किती जबाबदार आहेत याची समजूत चांगली पडेल.

**५ अमृतराव रघुनाथाचा विश्वासघात** (स. १८०३).—बाजीरावाच्या दुष्ट स्वभावामुळें मित्र व आप्त सुद्धां त्याचे शत्रु कसे बनले याचें उत्कृष्ट उदाहरण त्याचा भाऊ अमृतराव याचें आहे. त्याची हकीकत मागें ठिकठिकाणीं आलीच आहे. प्रथम सिंदे बायांस व पुढें यशवंतराव होळकरास सामील झाल्यामुळें त्याजवर बाजीरावाचा अत्यंत रोष झाला. त्यांतून वेळ मारून नेण्याचा चिमाजी आपाचा निर्जीवपणा अमृतरावांत नसल्यामुळें, उभयतांची तेढ वाढतच गेली. बायांचा जोर हलका पाडण्यासाठीं सिंद्यानें बाजीरावाकरवीं प्रथम ता. १–१०–१७९८ रोजीं अमृतरावास सात लक्षांची जहागीर तोडून दिली; आणि पुनः वेळोवेळीं बाजीरावानें ते करार पुरे करून दिले. अशा स्थितींत यशवंतरावानें बाजीरावास पुण्यांतून काढल्यावर विनायक अमृताचे नांवानें पेशवाईचीं वस्त्रें आणिलीं, त्यावरून बाजीरावाचा राग परमावधीस पोंचला, आणि से. वस्ली पुण्यास दाखल होतांच अमृतराव आपली फौज घेऊन नासिकचे बाजूस लूट करीत, आणि पुढें काय प्रकार घडतो आणि त्यांत आपण काय कार्यभाग अंगावर घ्यावा याचा विचार करीत राहिला असतां, इंग्रजांविरुद्ध मराठमंडळाची जूट बनूं लागली.

स. १८०३ चे जुलई ऑगस्ट हे दोन महिने सिंदे होळकरांचा मुक्काम खानदेश वऱ्हाडच्या हद्दीवर अगदीं दहापांच कोसांच्या अंतरानें एकमेकांच्या नजीक होता. त्यांच्या भेटी होऊन साफ दिलसफाई झाली आणि इंग्रजांचें अरिष्ट टळलें असा पुकाराही सर्वत्र झाला. परंतु या आणीबाणीच्या प्रसंगीं से. वेल्स्लीनें अमृतरावास हाताशीं धरून त्याचे मार्फत होळकरांस मुख्य कटांतून मोठ्या युक्तीनें अलग केलें. अगदीं जवळ आला असतांही होळकरानें सिंद्याची भेट कां घेतली नाहीं आणि भोसल्यानें घडवून आणिलेला त्यांचा समेट कारण नसतां एकाएकीं कां बिनसला, याची स्पष्टता मराठी कागदांत नाहीं, ती इंग्रजी पत्रांत दिसून येते. या प्रकरणांत अमृतरावाचा संबंध असेल अशी शंका सुद्धां कोणास येणार नाहीं. जुलईंत होळकर तापी उतरून उत्तरेंत जात असतां त्यानें सिंद्यास मिळण्यासाठीं दक्षिणेकडे तोंड फिरविलें, आणि दोन मजला अलीकडे आल्यावर मग एकाएकीं कांहीं गुप्त कानमंत्र मिळून तो पुनः परत तडाख्यानें उत्तरेकडे निघून गेला.

अमृतरावास वेल्स्लीनें हाताशीं धरलेला पाहून बाजीरावाच्या अंगाची लाही लाही झाली. अमृतरावानें होळकरास आणून आपणास पेशवाईवरून काढिलें, या अपराधाबद्दल त्याचे आपण हाल हाल करून भरपूर सूड घेऊं, ही बाजीरावाची मोठी वासना होती, परंतु ती कधीं तृप्त झाली नाहीं. याचें कारण अमृतरावास वेल्स्लीनें आश्रय दिला. ह्यासंबंधानें बाजीरावानें इंग्रजांकडे वारंवार तक्रारी करून आकाश पाताळ एक करून सोडिलें; आणि वेल्स्लीनें आठ लाखांची सालीना नेमणूक अमृतरावास तोडून दिली ती बंद करण्यासाठीं बाजीरावानें जंगजंग पछाडले. हें प्रकरण कैक वर्षे इंग्लंड व हिंदुस्थानचे दरम्यान धुमसत होतें. बोर्ड आफ् कंट्रोल सभेनें वेलसलीस याबद्दल जाब विचारला तेव्हां त्यानें तारीख २७-३-१८०८ रोजीं खालील आशयाचा लेखी जबाब प्रेसिडंट डंडास यास लिहून पाठविला.

‘ अमृतराव हा बाजीरावाचा दत्तक बंधु. राज्यकारभारांत तो फार हुशार व परिस्थिति ओळखणारा होता. सवाई माधवरावाच्या मृत्यूपासून पुण्यास ज्या कांहीं उलाढाली व कारस्थानें झालीं त्यांत त्यानें चाणाक्षपणाचें वर्तन ठेविलें होतें. त्या वेळच्या मराठमंडळांत अमृतरावा इतका हुशार व इभ्रतदार गृहस्थ दुसरा कोणी नव्हता. पूर्वी नाना फडणिसाच्या बाजूस असलेली सर्व मंडळी हल्लीं अमृतरावाचे लगामीं होती, आणि या मंडळींत व्यापारी, मुत्सद्दी व सावकार यांचाच भरणा मुख्य होता. अर्थात् बाजीरावाचे चाळे अमृतरावास व वरील

मंडळीस बिलकूल पसंत नव्हते. होळकरानें पुण्यावर स्वारी केली, तींत त्यास अमृतरावाचा पाठिंबा असल्यामुळेंच एवढें यश मिळालें. बाजीराव पुणें सोडून गेल्यावर मागें अल्प कालपर्यंत अमृतरावानें सर्व कारभार व्यवस्थित चालविला. अमृतरावाचा मुलगा विनायकराव बापू यास पेशवाईवर स्थापून नवीन कारभार चालणार, तोंच बाजीरावानें वसईस इंग्रजांशीं तह करून अमृतरावाचे बेत हाणून पाडिले. बाजीरावास पेशवाईवर स्थापण्यासाठीं मी फौज घेऊन दक्षिणेकडून पुण्याकडे चालून आलों, तेव्हां स. १८०३ च्या एप्रिलांत यशवंतराव होळकर पुणें सोडून परत गेला; आणि मागोमाग अमृतरावही माझ्या फौजेपुढें हार खाऊन नासिकच्या बाजूस पळून गेला.

'पुढें मी पुण्यास येऊन ता. १३-५-१८०३ रोजीं बाजीरावास स्थानापन्न केलें. तेव्हांपासून माझ्या डोळ्यांपुढें एकच मुख्य विषय होता, तो हा कीं बाजीरावाचा कारभार आमच्या मदतीशिवाय सुरळीत चालेल अशी व्यवस्था लावून आपण निघून जावें. पुण्यास कर्नल क्लोझ रेसिडेंट होते, त्यांच्या माझ्या विचारांत असें ठरलें, कीं अमृतरावाशीं वैर ठेवण्यांत बाजीरावाचें नुकसान असून त्याची समजूत करून त्यास परत कारभारांत घेतला तरच बाजीरावाचा जम चांगला बसेल. यासंबंधांत अमृतरावाशीं बोलणें सुरू करण्याची संधि पण लगेच आली. अमृतराव निघून गेला, तेव्हां त्याची कांहीं जिंदगी माझ्या ताब्यांतील लष्कराचे हातीं लागली. ती परत देण्याविषयीं अमृतरावानें मजकडे मागणी केली, तेव्हां माझें त्या संबधांत त्याच्याशीं बोलणें चालू झालें. हा प्रकार बाजीरावास बिलकूल पसंत पडला नाहीं. अमृतरावाची इभ्रत राज्यांत मोठी होती ती बाजीरावास न खपून तो त्याचा अत्यंत द्वेष करी. आम्हीं बाजीरावाची पुष्कळ समजूत घातली; अमृतरावास आणून कारभारावर रुजू करणें घडत नसेल तर निदान त्याची व्यवस्था लावून गोडीनें त्यास दूर ठेवावें, असें आम्हीं परोपरीनें बाजीरावास सांगितलें; आणि हा प्रयत्न करितांना आम्हीं अमृतरावास विचारिलें, तुमचें मागणें काय तें स्पष्टपणें लिहून कळवा म्हणजे आम्ही बाजीरावाशीं त्याची तडजोड करून निकाल करूं.

'अमृतरावाचें मागणें आणखी तें काय असणार! वसईच्या तहापूर्वी आपली जी व्यवस्था होती, तीच कायम होऊन तहानें नुकसान झालें असेल तेवढें भरून मिळावें. हा मुख्य मुद्दा ध्यानांत धरून तहाच्या पूर्वी जी अमृतरावाची आदा होती ती त्यास बाजीराकडून ठरवून द्यावी असा प्रयत्न आम्हीं चालविला. ह्या संबंधाचा

अमृतरावाचा व माझा पत्रव्यवहार झाला तो कोर्टापुढें आहेच. शिवाय आणखी कांहीं कागद पुण्याच्या रेसिडेन्सी दप्तरांत असतील त्यांवरून आपल्या ध्यानांत येईल कीं, पूर्वी बाजीरावानें गोदातीरीं अमृतरावास जहागीर नेमून दिलेली होती, तिचें सालीना उत्पन्न चार लाखांचें होतें. त्याशिवाय पुरंदर, सावनूर तालुका, व सुरत येथें त्याचीं कांहीं उत्पन्नें होतीं, त्या सर्वांचा वसूल कमींत कमी तीन लाख होता. पैकीं गोदावरीच्या कांठचा प्रदेश मात्र त्याजकडे चालू असून, त्याचे भरीस त्यानें आणखी चार लाखांची मागणी पेशव्याकडे केली. पेशव्याचा इरादा तर त्यास कांहीं तरी क्लृप्तीनें जवळ आणून कैदेंत अडकवून ठेवावें असाच असल्यामुळें, जहागिरीसंबंधाचें बोलगेंच बाजीराव मनावर घेईना. तथापि अमृतरावानें माझा नाद चालूच ठेविला होता, आणि माझ्याही मनांत त्यास मोकळा राहूं देणें इष्ट नव्हत. अशा स्थितींत सिंदे भोसल्यांशीं आमचें युद्ध सुरू झालें, तेव्हां प्रथमच अमृतरावाचा निकाल लावण्याची निकड उत्पन्न झाली. औरंगाबादेपलीकडे अजिंटा घाटाचे उत्तरभागीं सिंदे भोसले युद्धाच्या तयारीनें सज्ज होते. होळकराचा त्यांचा समेट होऊन तोही त्यांस सामील होण्यास येत होता. गोदावरी अलीकडे अहमदनगरचा मजबूद किल्ला सिंद्याचे ताब्यांत होता, तेथून पुण्यास येऊन बाजीरावास ताब्यांत घेऊन आमच्याशीं सामना करण्याची संधि सिंद्यास मिळती तर आमचा डाव आटपलाच होता. खुद्द बाजीरावच आंतून त्यांस आमच्यावर उठवीत होता. ता. १२ ऑगस्ट रोजीं अहमदनगरचा किल्ला आमचे हातीं पडला, त्याचे दुसरेच दिवशीं अमृतरावास आठ लाखांच्या जहागिरीचा करार मीं लिहून दिला, आणि माझे पिछाडीवर हल्ला करणारा एक शत्रु गप्प बसविला. युद्ध होऊन गेल्यावर आतां या करारावर असा आक्षेप घेण्यांत येत आहे कीं, अमृतरावाजवळ अशी कांहीं मोठी फौज नव्हती कीं त्याची एवढी दहशत मला वाटावी. यासंबंधानें मीं ज्या त्या वेळीं रॅसिडेंट व गव्हर्नर जनरल यांजकडे परिस्थिति लिहून पाठविली ते कागद पाहवे, म्हणजे अमृतराव माझे पिछाडीस मोकळा राहिल्यापासून आमच्या पुढील हालचालींस कसा धोका आला असता याची खात्री होईल. पण याखेरीज आणखी कित्येक मुद्दे आहेत ते या आक्षेपकांच्या लक्षांत नाहींत. स. १८०३ च्या जुलई ऑगस्टांत अमृतराव नासिकच्या बाजूस डोंगराळ व पावसाळी मुलखांत दंगल करीत होता. मी नगराहून पुढें गोदावरीकडे चाल करीत असतां मागून तो आमच्यावर केव्हां चालून येईल याचा नेम नव्हता. मुख्य मोहीम सोडून मला त्याचेच पाठीस लागणें शक्य

नव्हतें. एक क्षणाचा विलंब सिंद्यावर चालून जाण्यांत मी करतों तर माझी सर्वथा फसगतच झाली असती. सिंदे भोसल्यांचे बेत पूर्ण होण्यास मी त्यांस अवधि दिला नाहीं म्हणूनच मला यश आलें. अमृतरावानें मागें राहून पुण्याशीं असलेला माझा पाया केव्हांच तोडून टाकला असता. ह्या माझ्या पायाचें सूत्र थेट म्हैसूरपर्यंत जुळविलेलें होतें. पटवर्धन, रास्ते, निपाणकर वगैरे कर्नाटकांतील समस्त मराठे जहागीरदार मी माझ्याकडे सांभाळून धरले होते. म्हणूनच मला निर्धास्तपणें सिंदे भोसल्यांवर चढाई करतां आली. या जहागीरदारांवर अमृतरावाचें मोठें वजन होतें; आणि बाजीरावापेक्षां अमृतरावाचे शब्दासच ते विशेष मान देत. अशा स्थितींत या जहागीरदारांस फितवून आमच्या विरुद्ध हालचाली करण्याची संधि अमृतरावास देणें किती धोक्याचें होतें, याची आपण कल्पना करा. अमृतरावाच्या प्रत्यक्ष फौजेपेक्षां मराठमंडळावरील त्याचें वजन आह्मांस जास्त बाधक होतें. पण या सर्व बाबती सोडून दिल्या, तरी आणखी एक महत्त्वाची कामगिरी अमृतरावानें आमच्यासाठीं बजावली तिची किंमत आठ लाखांच्या दुप्पट दिली तरी ती कमीच होईल, आणि तिचें विस्मरण आपणास कधीं होणें शक्यच नाहीं. ती कामगिरी अशीः—

'यशवंतराव होळकरासारखा कल्पक व धाडसी सेनानी आपल्या बाजूस वळवून घेण्याचे भगीरथ प्रयत्न सर्व जाणत्या सरदारांचे सारखे चालू होते, आणि तो जर सिंदे भोसल्यांस येऊन मिळाला असता, तर त्या तिघांशीं सामना करण्याची ताकद मला बिलकूल नव्हती. या विवेचनेंत मी असतां कशाही प्रकारें होळकराची समजूत काढा, अशा मतलबाचें एक महत्त्वाचें पत्र सिंद्यानें पुण्यास बाजीरावास लिहिलेलें मध्येंच अमृतरावानें पकडिलें. अशीं आणखी पुष्कळ पत्रें बाजीराव दौलतरावांचीं अमृतरावानें पकडून मला दिलीं, त्यांचा मला अत्यंत उपयोग झाला. याचमुळें बाजीरावाचा अमृतरावावर एवढा मोठा रोष झाला. त्या पत्रांत बाजीरावास सिंद्यानें असा मजकूर लिहिला होता कीं, तूर्त तुम्ही होस हो म्हणून कशी तरी होळकराची समजूत करा, म्हणजे सर्वांनीं मिळून प्रथम इंग्रजांचा धुव्वा उडवूं आणि वसईचा तह झुगारून देऊं. एकवार इंग्रज ठिकाणीं बसले कीं भोसले व आम्ही मिळून होळकरास नरम करून त्यास तुमच्याकडे शरण आणूं. म्हणजे पुढें तुम्हांस त्याची वाटेल ती गत करतां येईल. हें पकडलेलें पत्र माझ्या सांगण्यावरून अमृतरावानें लगेच होळकराकडे पाठविलें, आणि त्याचा परिणाम तंतोतंत माझ्या अपेक्षेप्रमाणें घडला. भोसले सिंद्यांस मिळण्यासाठीं दोन मजला अलीकडे चालून आलेला होळकर, हें पत्र हातीं पडतांच,

डोळ्यांत अंजन पडल्यासारखें होऊन, लगेच परत फिरून तडक नर्मदेपलीकडे जाऊन सिंद्याचा मुलूख लुटीत राहिला. एवढेंच नव्हे, तर दोन तीन महिने युद्ध चालून सिंद्याचा पाडाव होईपर्यंत त्यानें आमच्याशीं अत्यंत मित्रत्वाचें वर्तन ठेविलें. यावरून आपल्या लक्षांत येईल कीं अमृतरावाशीं नेमणुकीचा करार मीं केला तो अत्यंत जरूर व योग्य होता, आणि त्यामुळेंच आमचा त्या युद्धांत निभाव लागला.'

अमृतरावाची आठ लक्षांची ही नेमणूक बाजीरावाच्या अंतःकरणांत अखेरपर्यंत शल्यासारखी झोंबत होती. खुद्द बाजीरावावर पुढें स. १८१८त इंग्रजांस शरण जाण्याचा योग आला, तेव्हां निदान अमृतरावापेक्षां तरी आपली नेमणूक कमी असूं नये, अशी अट त्यानें घातली, त्यावरूनच त्याची देखील नेमणूक पुढें तितकीच ठरली. नाहीं तर ती आणखीही कमी झाली असती.

सारांश, मनुष्यस्वभाव ओळखून राज्याच्या उलाढालींत फोडा व झोडा या नीतीचा अवलंब से० वस्लीनें केला. अमृतरावानें तहाहयात जहागिरीपलीकडे जास्त काय मिळविलें ? वेल्स्लीच्या भुलथापांस न जुमानतां तो जर स्वतःच होळकराकडे जाऊन त्यास घेऊन भोसल्यास भेटता, तर मालकीच्या नात्यानें सर्व मराठमंडळास एकत्र जमवून राज्याची नवीन घडी त्यास बसवितां आली असती. सिंदे भोसले व होळकर तिघे एकत्र ठासून बसते, तर वेल्स्लीची पुढें येण्याची छाती नव्हती. पटवर्धन, रास्ते, पानसे, निपाणकर, पुरंदरे, चतुरसिंग भोसले इतके सर्व आजूबाजूस नजीक होते, त्यांस आश्वासनें देऊन त्रिवर्ग प्रमुख सरदारांस अमृतराव एकत्र आणता, तर बाजीरावाचा दुष्टपणा जागच्या जागीं जिरला असता. बाजीरावानें पेशवाईचें नामधारी पद घेऊन नेमणूकदाराप्रमाणें ख्यालीखुशालींत दिवस घालवावे, परंतु कारभार सर्व अमृतरावानें करावा, अशी व्यवस्था ठरविणें अशक्य नव्हतें. ही सोन्यासारखी संधि अमृतरावानें घालविली आणि स्वार्थाकडे पाहून राज्यघात केला, हें त्याचें वर्तन अत्यंत गर्हणीय होय असेंच इतिहास ठरवील. यापेक्षां मराठमंडळाची एक घटना करण्यांत अमृतरावाचा जीव धोक्यांत पडला असता, किंवा बाजीरावानें त्याचा प्राणही घेतला असता तरी त्याचा अर्थ राष्ट्रसेवेस त्यानें देह अर्पिला असाच झाला असता. राघोबादादाच्या बापानें जमविलेलें मराठी राज्य त्याच्या पुत्रांनीं घालविलें असें इतिहास सांगतो, त्याचें कारण हें.

६ **युद्धारंभीं बाजीरावाचा आत्मघात.**—बाजीरावाचा सर्व आधार सिंदे. त्याजवरच इंग्रजांनीं उठाव केल्याचें नजरेस येतांच इंग्रजांस कसें दूर करावें हा

विचार बाजीरावाचे मनांत घोळूं लागला. ‘ होळकर व नबाव व सिंदे भोसले एक झाले. चौघांचे विचारें इंग्रज घरांत आणले हें ठीक नाहीं. त्यास सर्वांनीं इंग्रजांचें पारिपत्य करून राज्याचा बंदोबस्त करूं. परंतु बाजीराव साहेबांची मर्जी जे, सिंदे भोसले आपलेच आहेत. पण बंडखोर होळकर त्याचें पारिपत्य करावयाचें, याबद्दल राज्य इंग्रजांनीं घेतलें तरी हरकत नाहीं.’ बाजीराबाच्या या उद्गारांवरून मराठी राज्याची त्यास केवढी दरकार होती तें दिसून येतें. मराठे सरदारांनीं वेल्स्लीस सामील व्हावें असे हुकूम बाजीरावाकडून इंग्रजांनीं मिळविले. पण आंतून तो सरदारांस सांगूं लागला कीं तुम्हीं इंग्रजांस सामील होऊं नका, त्यांचें पारिपत्य करा. वाघाच्या स्वारीपासून रास्ते पटवर्धनाशीं वेल्स्लीचें सख्य जमलें होतें. बापू गोखले बोलून चालून बाजीरावाचाच मिंधा होता. पुढें वेल्स्ली जेव्हां नगरचे किल्ल्यावर चालून जाऊं लागला, ‘ तेव्हां श्रीमंतांनीं समस्त सरदारांवर दोष ठेवून भाषण रुबरू केलें, त्यावरून रामचंद्र आपांनीं उत्तर केलें जे ‘ जशी सरकारची मर्जी, तशी सरदारांची चाल.’ असें म्हणून गोटास निघून गेले. इतरांनीं श्रीमंतांस जबाब दिले कीं इंग्रजांस निरोप द्यावा म्हणजे सरदारांचा सेमट होईल; नाहीं तर मराठे एक होत नाहींत, यावरून यजमानांस बहुत विचार पडला आहे.’ रामचंद्र आपा कोणत्याच बाजूस जाईना. त्यानें आपली खरी मनःस्थिति वेल्स्लीस कळविली, आणि बाजीरावाचा लेखी हुकूम मागितला. तेव्हां तो देणें बाजीरावास भाग पडलें. बाजीराव त्यास ता. १४-९.१८०३ रोजीं लिहितो, ‘ मजकडून स्वामींचे चरणाशीं दुसरी गोष्ट घडावयाची नाहीं, ही खातरजमा आहेच म्हणून लिहिलें त्यास, सरकारची व कंपनी सरकारची दोस्ती. हरदू सरकारांचे विचारें तुम्हांस वस्ली समागमें जावयाचें ठरलें. त्याप्रमाणें सर्व गुंता उरकोन सरकारचाकरीवर लवकर येऊन पोंचणें.’ बाजीरावाच्या या धरसोडीबद्दल इंग्रजांस अत्यंत त्वेष आला. बळवंतराव नागनाथ हाच हल्लीं क्लोजजवळ बाजीरावाचें बोलणें करीत असे. तो व क्लोज असे रघुनाथराव चिनापट्टणकर याजकडे गेले. सहा घटका बसले होते. ‘ श्रीमंतांनीं फौज द्यावी असा करार असतां फौज दिली नाहीं. होळकराचें पारिपत्य करावें. सिंदे व भोसले वगैरे मानकरी मिळणींत आहेत, त्यास सरकार कामावर कोणी उपयोगी पडावें असें दिसत नाहीं. झाडून फौज एकवटली, त्या अर्थें बाजीरावांनीं आमचे पाठीवर चलावें म्हणजे आम्ही कोणास डरत नाहीं. खासा स्वारी येथून गेली असतां कोणेविशीं खत्रा नाहीं.’ या सूचनेप्रमाणें बाजीराव वस्लीबरोबर गेला नाहीं. त्याचा साथीदार रघुनाथराव

चिनापट्टणकरही ता. ७-९-१८०३ रोजीं वारला. रघुनाथरावचा जोडीदार बळवंतराव नागनाथ हा आणखी पांच वर्षे जगून ता. २९-९-१८०८ रोजीं मरण पावला.

इंग्रजांनीं सिंद्यावर युद्ध पुकारलें तेव्हां त्यांनीं बाजीरावास फौज घेऊन बरोबर बोलावलें, त्याबर बाजीरावानें आपसांत पुष्कळ चर्चा केली. कोथरूडच्या बागांत इंग्रज भोसल्यांचे वकील व सदाशिव माणकेश्वर या त्रिवर्गास पुसिलें, त्यावर भोसल्यांचे वकिलानें जबाब दिला, 'सरदारांनीं इंग्रजांस मोडलें असतां स्वामींस सरदारांच्या सल्ल्यानें चालणें भाग आहे; आणि इंग्रजांनीं सरदारांस मोडलें असतां सरदार चौं दिशांत जाऊन जमाव करून मुलूख बेचिराख करतील; आणि इंग्रज स्वामींचा बंदोबस्त करून मुलखांत अंमल करतील: त्यास स्वामींस दोनही पक्ष सारखे. फौजेचा जमाव करून येथेंच पुण्यास राहवें. तेणेंकरून उभयांवरही दाब राहील. त्यावर इंग्रज वकील बोलला, ' आम्हीं स्वामींचे शत्रूशीं लढून त्यांचा नाश करूं: आणि फौजेस पैका पाहिजे तसा पुरवूं. साहेबीं खातरजमेनें पुण्यांत असावें. ' याप्रमाणें बाजीराव पुण्यांत दोहोंकडे दील ठेवून स्वस्थ राहिला. वसईच्या विचित्र तहानें त्यानें अशी आपली निर्जीव स्थिति करून घेतली. नाहीं त्यास इंग्रजांचा जय मान्य, कीं आपल्या सरदारांचा जय मान्य. ही निश्चित नाशाची तयारी नव्हे तर काय ?

पुढें युद्धाचा धडाका चालू झाला, तेव्हां भोसल्यांचा वकील खंडोपंत वैद्य यानें बाजीरावास विचारिलें, ' आपण स्वस्थ बसलां, जमाव कांहींच नाहीं, तेव्हां दौलतीचा परिणाम कोणता योजिला ? आपण म्हणतील, इंग्रज आमचे, आम्हांस कोणेविशीं भय नाहीं. तर तें चित्तांत आणूं नये. इंग्रजांचें प्राबल्य जालें असतांही आम्हांस वाईट, सरदार बळावले तरी वाईट. याजकरतां पन्नास हजार फौज स्वतःची जमा करावी. हें न होय तर स्वामींचा परिणाम ठीक नाहीं. या अन्वयें चारपांच वेळां स्पष्टच बोलले. खंडोपंत बोलून थकले. आल्या मार्गें जावें म्हणतात.'

युद्धांत कोणास सामील व्हावें यासंबंधानें पटवर्धनांची तारांबळ फारच उडाली. रामचंद्र आपास गंगाधरराव बोलला, ' दौलतेंत शत्रू प्रबल शिरला. दौलत राहत नाहीं. आजपर्यंत स्वेच्छा—भोक्तृत्व झालें. हिंदु धर्म सर्वांनीं एकदील होऊन राखावा. सिंदे व भोसले एकविचारें करून झाडून जमेती आणून शत्रुसंनिध नमूद झाले सिंदेहोळकरांचें वद्धकटाक्ष होतें, तें उभय पक्षीं नाहींसें होऊन होळकरांचे मुद्दे सिंद्यानीं फैसल करून दिले. पुण्यास श्रीमंतांच्या भेटी झाल्यावर आज्ञा झाली जे, तुम्हीं इंग्रजांचे बरोबर बंडखोरांचे पारिपत्यास जावें. इंग्रजांचेही आग्रह बहुतच पडले, परंतु इंग्रजांबरोबर

जाण्याची आमची चाल नाहीं. ' बाजीरावाची धरसोड पटवर्धनांस अतिशय जाचक झाली 'इंग्रजांबरोबर गेले नाहींत म्हणून इकडे श्रीमंतांशीं वैषम्य आलें आणि तिकडे त्यांची इंग्रजांची दोस्ती गेली. श्रीमंत घरीं बसून तमाशा पाहतात. लौकिक वाईट व दाबही नाहीं.' या वेळीं रघूजी भोसल्यानें खालील पत्र पटवर्धनास पाठविलें. 'इंग्रजांनीं स्वराज्यांत प्रसार करून दौलत आकर्षण केली. त्यास हिंदु धर्म रक्षावा, स्वराज्य राखावें हें चित्तांत धरून दौलतराव सिंदे यां सुद्धां आम्हीं मसलतीस प्रवर्तक जाहलों असों. तुम्हांस तों स्वराज्याचें कल्याण पाहणें, व या मसलतीस अनुकूल होणें जरूर आहे. तरी तुम्हीं कोणताही अंदेशा मनांत न आणितां अशा प्रसंगीं मसलतीस शरीक व्हावें. दिवसगत लागों नये. हा समय आहे.' याच्या उलट इंग्रजांनीं बाजीरावाकडे तगादा लाविला. ' कलुष साहेब सरकारांत आले, म्हणों लागले, सारे पगडीबंद एक झाले. पुढें आम्हीं कळेल तसें करावें कीं काय ! श्रीमंतांनीं उत्तर दिलें, तुम्ही स्वस्थ असा, मजकडून तुम्हांस अंतर नाहीं. सिंद्यास गंगातीरास आणून तुमची गोडी करून देतों. श्रीमंतांस टोपीकरांनी निकड लाविली आहे कीं करारप्रमाणें तुम्हीं आपली फौज द्यावी. ' 'श्रीमंतांची मर्जी इंग्रजांवर नाखूष होऊन ताम्रमुख लबाड हें जाणून भोसले सिंदे यांजकडेस बळवंतराव नागनाथाचे विद्यमानें गुप्तमार्गे पैगाम केला. सिंदे, भोसले व होळकर या त्रिवर्गांनीं हिंदुस्थानची व दक्षिणची मसलत केली आहे ती सर्व येथें वस्लीस समजली. त्यावरून आपले ठिकाणीं सर्द आहेत. वस्ली व कलुश यांनीं श्रीमंतांच्या भरंशावर खुष्कीची मसलत करून आजपर्यंत दहाबारा करोड रुपये खर्च होऊन कांहीं एक सिद्ध नाहीं, व हल्लीं त्यांस पैक्याची अडचण बहुत. तुंगभद्रापार टिपूच्या राज्यांत चेनापट्टण वगैरे कुल संस्थानांस इंग्रजांचें लिहिलें गेलें जे, ' रयतेकडील ऐवज वसूल करून व सावकारी कर्ज घेऊन मुलखांत पट्टी करून कळेल तसा ऐवज उत्पन्न करावा. फरासीसांनीं इंग्रजांचीं दक्षिण समुद्रांतील बंदरें तमाम मारून विलायतेचा रस्ता बंद केला, असें वर्तमान आलें. जलवासीयांनीं सर्व व्यापिलें. एका होळकराचा भ्रम राहिला आहे. गायकवाडाच्या संस्थानाची व जनानखान्याची सुद्धां दरमहा नेमणूक होऊन इंग्रजांनीं बंदोबस्त केला. कुल हिंदूंचे दौलतीवर इंग्रजांचा तावा जाहला. कलुष वस्ली यांचा बदनियत, करारा-प्रमाणें चाल नाहीं, असे अंदेशे श्रीमंतांनीं चित्तांत आणून तिन्ही सरदारांकडेस वकील पाठविले आहेत. तथापि चित्तांत इंग्रजांचे भरवशावर स्वस्थ आहेत ' ! यावरून मराठी राज्याचा चालक बाजीराव हाच स्वतः युद्धाचा तमाशा पाहत बेफिकीर राहिला ही गोष्ट सिद्ध आहे.

---

# प्रकरण नववें

## सिंदे भोसल्यांशीं इंग्रजांचें युद्ध

### ऑगस्ट—डिसेंबर स. १८०३



**१ नगर औरंगाबाद मोहीम.**—युद्धारंभीं फौजांची गणति कशी होती तें टोकळ मानानें दाखविलें पाहिजे. दक्षिणेंत इंग्रजांची सुमारें पंनास हजार फौज होतीः—

८ हजार स. स्टुअर्टचे हाताखालीं मुद्गल जवळ;

९ हजार खुद्द वस्लीचे हाताखालीं: ८ हजार स्टीव्हन्सनची:

८ हजार कॅ. मरेच्या हाताखालीं गुजरातेंत सुरतेजवळ:

१५ हजार निजामाकडून सखोरुद्ध याचे हाताखालीं आलेली.

शिवाय गोखले, निपाणकर वगैरे बाजीरावानें पाठविलेल्या सरदारांची फौज आली ती वेगळी. उत्तरेंत स. लेकच्या हाताखालीं कानपुर येथें ११ हजार; बुंदेलखंडांतील कामगिरीसाठीं अलाहबादेजवळ साडेतीन हजार: व कटक प्रांताचे कामगिरीसाटीं गंजम जवळ साडेपांच हजार, मिळून एकंदर इंग्रज फौज सत्तर हजारांचे अंदाजांत होती.

उत्तरेंत पेरूचे हाताखालीं सिंद्याचें १७ हजार पायदळ व २० हजार स्वार, दक्षिणेंत दुद्रनेकचा कंपू पांच हजार व गोपाळराव वगैरे आठ हजार व बाबा फडक्याची हुजरात अशी सिंद्याची फौज अजिंठ्याचे घाटाजवळ होती. याशिवाय भोसल्याची फौज होती ती वेगळी. कटक प्रांताचे बंदोबस्तासाठीं बापू घाटगे व महाडिक हे दोन सरदार भोसल्यानें ठेविले होते.

शके १७२५ च्या गोकुळ अष्टमीचे दिवशीं इंग्रज मराठ्यांचें युद्ध सुरू होऊन तें मार्गशीर्ष वद्य ३० रोजीं संपलें. युद्धाच्या तपशिलानें शेंकडों इंग्रजी ग्रंथ भरले.

आहेत. परंतु मराठी कागदांत प्रत्यक्ष युद्धाची किंवा चाललेल्या राजकारणाची हकीकत फारसी उपलब्ध नाहीं. बराचसा कार्यभाग इंग्रजांनीं संग्रामापेक्षां राजकारणाच्या डावपेंचांनीं सिद्धीस नेला. लढण्याचाच भाग पाहूं गेल्यास मराठ्यांनाच जास्त शाबासकी द्यावी लागेल. अनेक अडचणींच्या परिस्थितींत शौर्य, साहस, राष्ट्रसेवा वगैरे बावतींत मराठ्यांनीं इंग्रज सेनापतीपुढें चांगलीच परीक्षा दिली. परंतु तितक्याच मानानें ते डावपेंचांत हीन ठरले. याचें मुख्य कारण धनी बाजीराव होय. त्याची धरसोड वरपासून खालपर्यंत लोकांचे अंगांत संचार करीत गेली. तो निश्चयानें कोणती तरी एक बाजू निक्षून पत्करिता, तर सरदारांसही आपल्या कर्तव्याची उमज पडून नेटानें उद्योग करण्याची स्फूर्ति प्राप्त झाली असती. मनांत एक, बाहेर दुसरें, आणि यदृच्छेनें घडेल ते तिसरें, अशा बाजीरावाच्या वागणुकीनें तीन महिन्यांच्या अल्प कालांत इंग्रजांनी आपला डाव जिंकून हिंदुस्थानच्या भवितव्यतेंत कायमचा परिणाम घडवून आणिला. पेशव्यांच्या बखरींत या युद्धाची खालील अल्प हकीकत आहे. 'इंग्रज पुण्यावर येऊन लागलेच सरंजामसुद्धां क्रोज व वस्लीसाहेब नगरावर गेले. नगरचा किल्ला सिंद्याकडे होता, त्यांत वस्लीनें आपलें ठाणें बसविलें. पुढें गंगा उतरून औरंगाबाद प्रांतीं गेले. दौलतराव पुण्यास येण्याच्या उद्देशांत होते. त्यांजला इंग्रज आल्याची बातमी लागली. सबब त्यांचा मुक्काम भोकर्दनावर झाला. रघूजी भोसले व बाबा फडके तेथें जाऊन मिळाले. इंग्रजही त्या रोखें सिंद्यांचे फौजेवर चालून आले. लढाई मोठी कडी जाहली. दोहोंकडील आगीचा मार तोफेवर तोफ चालली. सात आठ हजार माणूस लढाईंत कामास आलें. इंग्रजांचीं तीस पलटणें होतीं, त्यांतलीं आठ शिल्लक राहिलीं. साहेब लोक तोंडांत बोटें घालून आश्चर्य करूं लागले. तरणोपाय नाहीं असें पाहून रघूजीकडे सूत्र लावून फितूर केला; त्यामुळें सिंद्यांचा मोड जाहला. इंग्रज पाठीमागें लागला. सिंद्यांची मोठी खराबी झाली. तेव्हां इंग्रजांशीं तह करून दौलतराव माघारे माळव्यांत गेले.'

खंडेरावास यशवंतरावाचे हवालीं केलें तेव्हां सिंदे भोसले श्रीमंतांस अनुकूल नाहींत असें समजून बाळोजी कुंजर वगैरेनीं निघोन यावें तें न झालें. पुढें कलण (Collins) साहेब सिंद्यास सोडून निघून गेले, तेव्हांही कुंजर वगैरे निघून आले नाहींत. कलण साहेबाचे बोलीचा मजकूर सिंद्यांचे कारभारी रामचंद्र भास्कर यांनीं श्रीमंतांस लिहिला. होळकराशीं समेट करावा हें श्रीमंतांचे मनांतून नाहीं. बाळोजी कुंजरांनीं ३ ऑगस्टचें पत्र सिंद्याचे मुकामावरून पुण्यास श्रीमंतांस लिहिलें त्यांत मजकूर कीं, ' कलण

साहेबाचे जलदीपुढें उपाय नाहीं.' श्रीमंत इंग्रज सरकाराशीं गोडी दाखवीत होते, पण आंतून राजकारणाचा शिलशिला ठेवीत होते. नंतर कलणसाहेब निघून आल्यामुळें उघड युद्ध सुरू झालें. पुण्यांत बाजीरावाच्या मंडळीस पैसे भरून त्याजकडून त्याच्या हालचालींची बातमी काढीत जावी असें से० वस्लीनें क्लोज यास सुचविलें. त्याजवर असलें घाणेरडें काम मी कधीं करणार नाहीं, असा जबाब क्लोजनें वस्लीस दिला.

दक्षिणेंतील युध्यमान फौजांचा मुक्काम गोदावरीपासून तापी नदीपर्यंतच्या प्रदेशांत विस्तारला होता. दोन पक्षांच्या मध्यें निजामाचें मोहरें शहास उभें केलें होतें. युद्ध सुरू होणार त्याच दिवशीं म्ह. ता. ६-८-१८०३ रोजीं बरेच दिवस खितपत पडलेला निजामअली मरण पावला. त्याचे दरबारांत दुफळी होती तरी गेल्या पांचचार वर्षांत दिवाण मुशीरुन्मुल्कच्या हातीं सर्व कारभार मुखत्यारीनें असून, इंग्रजांच्या साह्यानें सिंकंदरजास पदावर बसवून त्यानें आपली छाप टिकविली होती.

निजामअलीच्या बायका व त्याचे कांहीं मुलगे सिकंदरजाच्या विरुद्ध होते. अशा स्थितींत मराठी फौजा हैदराबादेवर चालून जाव्या, तर त्यांस तेथें थोडाबहुत थारा मिळाला असता. असा बनाव घडून येऊं नये म्हणून सिंदे भोसल्यास वऱ्हाडांतच अडवून धरणें से. वस्लीस जरूर पडलें. स्टीव्हनसनचा मुक्काम परभणीजवळ होता. ता. ६-८-१८०३ रोजीं वस्लीनें त्यास कळविलें, ' तुम्हीं आपल्या लष्करानिशीं थोडें पुढें जाऊन मराठी फौजांस अजिंठा घाटांतून पुढें येऊं देऊं नका. त्यासाठीं अजिंठ्याचें नाकें आणि कासारबारीचें नाकें दोनही तुम्हीं अडवून धरा. तोंपर्यंत मी अहमदनगर घेऊन तुम्हांस येऊन मिळतों. त्यानंतर पुढील व्यवस्था ठरवूं '. वरील कामगिरीवर स्टीव्हनसन गेला, परंतु त्यास न जुमानतां मराठी फौजा अजिंठा घाटांतून जालनापर्यंत पुढें चालून आल्या.

**अहमदनगर**चा किल्ला धनधान्य साहित्यानें भरलेला व मजबूद असा सिंद्याचे ताब्यांत असून, तेथें आरबांचा बंदोबस्तही चांगला होता. हा किल्ला आपल्या ताब्यांत घेतला कीं तेथून पुणें हैदराबाद बऱ्हाणपुर एवढ्या टापूवर नजर ठेवतां येईल, अशी ही सोईची जागा प्रथमच काबीज करावी असें से. वस्लीनें ठरवून ता. ८ ऑगस्ट रोजीं तो वाळकीहून निघाला. किल्ला व तटबंदीची पेठ असे दोन भाग असून, आल्याबरोबर वस्लीनें हल्ला करून पेठ हस्तगत केली, त्यांत मराठ्यांचे शंभरपर्यंत आरब मृत्यु पावले. वस्लीचेही शंभरपर्यंत लोक जायां झाले. ' आरब ऐकत ना, तेव्हां इंग्रजानें धुराचे गोळे टाकिले. धुरामुळें आरबांस इकडील माणूस दिसों नये, इंग्रजांस मात्र

दिसावें. त्यानंतर ता. १० रोजीं से. वस्लीनें किल्ल्यावर मारागिरी सुरू केली. किल्ल्यावरील गोरे अम्मलदार आरंभींच फितूर होऊन इंग्रजांकडे गेले. बरोबर देशी शिपाई व गोलंदाज फितवून नेले. त्यामुळें किल्ल्यावरून मारा लागू झाला नाहीं. ता. १२ रोजीं किल्लेदार मल्हारराव कुळकर्णी श्रीगोंदेकर यानें कौल घेऊन किल्ला इंग्रजांचे स्वाधीन केला. त्यांनीं त्यास मुंबईस पोंचविलें. खंडेराव रास्त्याचा चुलत-भाऊ विनायकराव यास तेथील बंदोबस्तास ठेवून वस्लीनें पुढें कूच केलें. वर निशाण बाजीरावाचें लाविलें. नगरचा किल्ला सिंद्याचा म्हणजे पर्यायानें बाजीरावाचाच. तो जिंकून घेण्यास बाजीरावानें वस्लीस परवानगी द्यावी हें विचित्र होय. अशा रीतीनें ही प्राचीन निजामशाहीची सुप्रसिद्ध नाक्याची जागा बाजीरावानें इंग्रजांस देऊन टाकिली.

लगेच वस्लीनें सभोंवारचा प्रदेश हस्तगत करून तेथील वसुलाची व्यवस्था लाविली. त्यासाठीं त्यानें एक इंग्रज कलेक्टर नेमिला. नगराहून पुढें चाल करून वस्लीनें २१ ऑगस्ट रोजीं गोदावरी ओलांडिली. त्या वेळीं स्टीव्हनसनचा मुक्काम जाफराबाद येथें होता. ता. २९ रोजीं तो औरंगाबादेस पोंचला. त्यापूर्वी सिंद्याची कांहीं फौज स्टीव्हनसनला चुकवून २४ ऑगस्ट रोजीं जालना येथें उतरली. तेथून हैदराबादेकडे जाण्याचा त्यांचा रोख वस्लीस दिसल्यावरून तो परत गोदावरीवर आला. खुद्द रघूजीला युद्धाची बिलकूल हौस नव्हती. नुसत्या दबावानें किंवा सक्त जबाबानें आपण कॉलिन्सला गप्प बसवूं अशी त्याची अटकळ होती ती फसली. तेव्हांपासून तो गोंधळून गेला. एकदां बाजू अंगावर आल्यावर मग कसूर न करतां या दोघांनीं जरी नेटानें युद्ध चालविलें असतें तरी सुद्धां वस्लीचा निभाव लागला नसता. वस्लीपेक्षां सिंदे होळकरांनाच परिस्थिति जास्त अनुकूल होती. वस्लीच्या हालचालींची योग्य बातमी ठेवून मोक्यावर येतांच त्यास अडचणींत गांठून प्रहार करण्याचा एकही प्रसंग मराठ्यांनीं साधला नाहीं. उलट वस्लीनें मात्र यांची पूर्ण माहिती काढून अडचणीच्या व असावध स्थितींत त्यांस गांठून आपला हेतु साधला, असेंच दरएक संग्रामांत दिसून येईल.

से. वस्ली ही मोहीम शक्य तितकी बाजीरावाची आज्ञा घेऊन चालवीत होता. दाखववयाचा हेतु असा, कीं आपण बाजीरावाचे हुकूम उठवीत आहों. ' सरकारांतून वस्लीस आज्ञा जाली त्यावरून नगरचा किल्ला त्यानें चौ रोजांत घेऊन सरकारचें निशाण चढविलें. पुढें लोहगड, सोलापुर, मिरज वगैरे मजबूद किल्ले आहेत ते वस्लीच्या

हातून घ्यावे अशी सरकारची मर्जी आहे. नगर हस्तगत झाल्यापासून इंग्रज गवर्नर जनरल ३१ ऑगस्ट रोजी गोखले सुद्धां औरंगाबादेस दाखल झाले. तेव्हां तिकडून सिंदे, भोसले, पेंढार कंपू सुद्धां बदनापुरचा घांट चढून औरंगाबादेपासून सहा कोसांवर मुक्काम केला. शहराचे शहावर कंपू व पेंढार ठेवून उभयतां सरदार पन्नास हजार फौजेनिशीं पैठणावर दाखल झाले. वस्ली सर्द होऊन विचारांत पडले आहेत. त्रिवर्ग सरदार सामन्यास येणार तेव्हां झगडा रगडा आहे. ता. ४ सप्टेंबर रोजीं सिंदे-भोसल्यांचा मुक्काम पैठणजवळ आला. गंगा उतरून पुण्यास दसऱ्यास जावें असा बेत आहे. गंगेवरून खंडोपंतास बोलणें करण्याकरतां पुण्यास रवाना केलें. बोलण्यांतील भाव कीं, इंग्रजांस निरोप द्यावा म्हणजे सारे सरदारांचा समेट होईल. नाहीं तर मराठे हातीं लागत नाहींत. श्रीमतांस बहुत विचार पडला आहे. वस्लीची फौज पुढें गेली होती त्यांची आघाडी पिछाडी मारून बहुत उपद्रव केला.'

युद्धारंभींच स्टीव्हन्‌सन्‌ला वस्लीनें अजिंठा घांटाकडे पाठविलें होतें. ' तो फुलंब्री पावेतों गेला तों तेथें सिंदे भोसल्यांकडील सदाशिवराव पेंढार व फौज घेऊन कहीम उपद्रव करूं लागले. त्यांनीं हजार पांचशें घोडे इंग्रजांचे आणिले. एके दिवशीं लढाई दिली त्यांत एक पलटण मारिलें. पुनः लढाई औरंगाबादेजवळ झाली, आणखी एक पलटण मारिलें. एका पलटणाचे लोक बंदुका टाकून गेले. हें वर्तमान ऐकून वस्ली दरमजल टोक्यावर गेले. तों गोपाळराव चिटणीस सावध होऊन त्याचे सामन्यास आले. दुसरे दिवशीं लढाई झाली. वस्लीचे तीनशें स्वार जायां झाले. यामुळें वस्ली खपा आहेत.' ता. १० सप्टेंबर पावेतों सिंदे भोसल्यांचा मुक्काम जालनापुरनजिक डोंगरगांवावर होता. त्यांचे व इंग्रजांचे मध्यें १४ कोसांचें अंतर होतें. नेहमीं गोळागोळी चालू होती. एके दिवशीं लढाई झाली तींत २५-३० गोरे ठार व इकडीलही तितकेच कामास आले. १० सप्टेंबर रोजीं भोसल्यांनीं होळकरास आणण्यासाठीं मल्हार शामजीस त्याजकडे रवाना केलें.

' वस्लीबहादर खंडक्याहून (?) कूच करून ११ सेप्टेंबर रोजीं आंबेड येथें आले. स्टीव्हन्‌सन्‌चे लष्करांत महर्गता बहुत, त्याचे मागें सडी फौज लागली आहे. सिंदे यांनीं जालनापुर पुनः घेतलें. इंग्रजांकडील हजार बाराशें मनुष्य कापिलें. तमाम पेंढाऱ्यांनीं रसद बंद केली. त्यावरून वस्ली अंबेडाहून पैठणास येऊं लागले. तेव्हां सरदारांकडील फौजांनीं येऊन गांठ घातली. लढाई होऊन वस्ली पैठणावर आले. सिंद्याकडील गोपाळराव व भोसल्याकडील विठ्ठलराव वस्लीचे पिच्छावर आहेत. होळकर नर्मदा उतरून महेश्वराकडे गेल्याची बातमी आली.'




आसई व आडगांवच्या लढाया (स. १८०३)
आणि बाजीरावाचा पळ (स. १८१८)

पृ. २६४.

ता. ६ सप्टेंबर रोजीं वस्ली लिहितो, ' जाफराबादजवळ स्टीव्हनसनला शत्रूंनीं खूपच त्रास दिला. मी २९ ऑगष्ट रोजीं औरंगाबादेस आलों, तेव्हां सिंदे जालना-पुरावर होता. निजामाचें बदनापुर त्यानें लुटून घेतलें. मी औरंगाबादेस आल्याचें ऐकून सिंदे पूर्वेकडे पडदुरावर चालला. त्याबरोबर स्टीव्हनसननें येऊन २ सप्टेंबर रोजीं जालनापुर काबीज केलें. सिंदे भोसल्यांचा रोख हैदराबादेकडे आहे असें पाहून मी परत पैठणाकडे आलों, आणि राक्षसभुवनाकडून रसद येत होती ती घेण्यासाठीं गोदावरीचे उत्तरेस सहा मैलांवर मुक्काम केला. परंतु असें रेंगाळत न राहतां एकदम जोराची चढाई वऱ्हाडांत करण्याचें मी ठरविलें. एलिचपुर, गाविलगड व खुद्द नागपुरकडे धामधूम केली कीं शत्रूंच्या फौजा पुणें हैदराबादचा रोख सोडून परत जातील, अशी मीं अटकळ करून गोदावरीचे उत्तरेसच त्यांच्याशीं निकराचा सामना करण्याचा विचार केला आहे. होळकरास बाजूस ठेवण्यासाठीं मालकम् यास त्याजकडे पाठवावें असा माझा उद्देश आहे. अमृतराव, आपा देसाई व निजामाच्या फौजा या सर्वांस खर्चास पुरवितांना मला पुरेवाट होते. पुण्याहून पैशाचा पुरवठा मला चालू आहे म्हणूनच माझा निभाव आहे.' *

**२ आसईची लढाई** ( २५-९-१८०३ ).—भोसले सिंद्यांत आणखी एक लढा उत्पन्न झाला. भोसल्याचा विचार गनिमी काव्यानें लढावें असा होता. त्याचे उलट सिंद्यानें ठरविलें, कीं कंपूनीं ठांसून लढून इंग्रजांस नरम करावें. बहु नायकी व फितूर यांजमुळें मराठ्यांचें पुष्कळसें बळ फुकट गेलें. वस्लीची धूर्तता व तरतूद ठेवणारा सेनानायक मराठ्यांकडे नव्हता. सिंद्यांनीं जालनापुर घेतलें तें ९ सप्टेंबर रोजीं स्टीव्हनसननें फिरून आपल्या हस्तगत केलें. तेव्हां मराठी फौजा मागें भोकर्दन येथें २१ सेप्टेंबर रोजीं जमा झाल्या. त्या दिवशीं वस्ली व स्टीव्हन्सन् बदनापुरावर होते. तेथें दोघांनीं विचार ठरविला, कीं दोन टोळ्यांनीं अजिंठा घांटाकडे कूच करून ता. २४ सप्टेंबर रोजीं मराठ्यांशीं सामना करावा. असा बेत ठरवून पूर्वेच्या बाजूनें वस्ली व पश्चिमेच्या बाजूनें स्टीव्हन्सन आपापल्या टोळ्या घेऊन सामन्यास निघाले. ता. २३ रोजीं नवलनी येथें वस्लीचा मुक्काम झाला. तेथून सहा मैलांवर भोकर्दन येथें केळणा नदीच्या आश्रयानें सिंदे भोसल्यांचा तळ

* Wellesley Disp. Vol III, 153; Welligton's Disp. no. 170.

होता. त्या ठिकाणीं २४ सप्टेंबर रोजीं तुंबळ लढाई झाली. तीच **आसई**ची लढाई होय. फुलंब्री, भोकर्दन, आसई व जाफराबाद या चौकोनाच्या क्षेत्रांत ही लढाई झाली. तिचें वर्णन मराठी कागदांत खालील प्रमाणें आढळतें. ' छ ८ जमादिलाखर रविवारीं ( ता. २५-९-१८०३ ) सिंद्यांच्या डेऱ्यांत प्रातःकालपासून लोकांचें धरणें बसलें. झाडून लोक एक जागां जमा झाले. शत्रु जवळ, तोड निघाली पाहिजे, म्हणोन दौलतराव बाबा सेनासाहेबांचे डेऱ्यांत गेले. उभयतांचे डेऱ्यांस तीन कोसांची तफावत होती. शत्रूस व सिंद्यांचे डेऱ्यास सहासात कोसांची तफावत. गोपाळराव भाऊ व तीन पलटणें टोपीकरांचे मोहल्ल्यावर होतीं. सिंद्याकडे धरणें बसलें ही बातमी पक्की आणवून प्रहर दिवसास खासा वस्लीनें चार पलटणें घेऊन सिंद्यांच्या पलटणावर चालून घेतलें. दीड प्रहरपर्यंत मारगीर बहुत झाली. सिंद्यांच्या पलटणांनीं वस्लीचा काट चालों दिला नाहीं. हें वर्तमान गोपाळराव भाऊस समजतांच तेही चालोन आले. लढाईत टोपीकरांचें हजार बाराशें माणूस ठार व जखमी झालें. इतक्यांत वस्लीच्या दुसऱ्या टोळीनें गोपाळरावावर चालोन घेतलें. तोफा मागें ओढाव्या तर बैल झाडून रानांत चरावयास गेले सबब तोफा टाकून मागें सरले. गोपाळरावांच्या दहावीस तोफा होत्या तितक्या टोपीकरांनीं नेल्या. तोफा सांपडल्या हीच फत्ते मानून व माणूस फार पडलें हें पाहून, वस्ली मागें सरले; व फौज पलटणेंही माघारीं गेलीं. हिंदूंचें शेंपन्नास माणूस जायां व जखमी झालें. वस्ली चिन्तांत खिन्न आहेत. भोसल्यांनीं सिंद्यांचे लोकांची तोड पाडली. दुसरे दिवशीं फौज पलटणेंसुद्धां कूच करून अजंटा घांटाजवळ गेले. इंग्रजांपुढें टिकाव न निघे याजकरतां मागें सरले असा अर्थ नाहीं. फौजेंत पैक्याचा गवगवा, व कांहीं मसलत व होळकरांचीं पत्रें जलद येऊन पोंचतों म्हणून आलीं, त्यावरून मागें गेले. टोपीकरांस नगरची रसद लांब पडावी हाही मनसबा होता. इंग्रजांकडील जखमी नगरास फार आले. पुढें इंग्रज घांट उतरोन मैदानांत यावा म्हणजे चोहोंकडून घेरावयास येईल या विचारें करून, तापीतीरानजीक बऱ्हाणपुरच्या लगत्यास चालले. सिंद्यांचे पलटणांत वस्लीचा फितूर समजण्यांत आला.' वरील वर्णनांत आणखी थोडी भर घालतां येईल. ' दोन प्रहरां वस्लीचें कूच होऊन त्यांचे तुरुप स्वार व दोन तीन पलटणें तलाव्यास ( टेहळणीस ) आलीं. त्यावर इकडील पलटणांच्या

**रघुनाथ मल्हार**
कुळकर्णी निगडीकर

| | | |
|---|---|---|
| **आबाजी** | **कृष्णोबा** | **गोपाळराव** |

तोफा लागू केल्या. सहा घटकापावेतों लढाई मातबर झाली. वस्लीकडील बारा तेराशें गोरे व तेलंग पांचसातशें तोफांच्या मारगिरीनें ठार पडले. त्यांचा मोड झाला असें पाहून दौलतरावांनीं जलदी करून घोडीं घातलीं. पूर्वी लढाईचा बेत अगदीं नव्हता. दौलतराव उठले तेव्हां इकडील तोफाही बंद झाल्या. इतक्यांत इंग्रजांनीं संधि पाहून एकंदर बाजूनें उलटले. तेव्हां सिंद्याकडील यादवराव भास्कर पडले: आणि शेंपन्नास माणूस जाग्यावर ठार झालें. नंतर लढाई बिघडली. सिंदे माघारें निघाले. त्यांचीं तीन पलटणें मारलीं गेलीं: व पंचवीस तोफा जिनसी थोर गेल्या. बाकीच्या तोफा व १५–१६ पलटणें व उभयतांकडील झाडून फौजा बचावून माघारें आल्या. दुसरे दिवशीं रात्रीं सारी फौज अजिंठ्याचे घांटाखालीं जमली. तेथेंच दसऱ्याचा समारंभ झाला. दोन-चार रोजांत फिरोन गांठ घालावी हा इरादा होत आहे. सडे होऊन गंगातीराम नबाबाचे मुलखांत जाणार. सिंद्यांच्या पलटणांनीं लढाई चांगली केली, परंतु फौजेच्या हातून धीर निघाला नाहीं. फौजा मोठ्या म्हणून इतकें तरी सामान बचावून निघालें. वस्लीकडील फौजांनीं पाठलाग अगदीं केला नाहीं.’

अशी ही आसईच्या लढाईची हकीकत आहे. इंग्रजांचे लेखांत या संग्रामाचा मोठा बडेजाव आढळतो. परंतु फार झालें तर दोघांची बरोबरी झाली येवढेंच कदाचित् म्हणतां येईल. असावध स्थितींत वस्लीनें येऊन एकाएकीं छापा घातला. सिंद्यांची तयारी बिलकूल नव्हती. परंतु आघाडीच्या पलटणांनीं लढाई चालू केल्यामुळें मागऱ्यांस अवसर सांपडला. इंग्रजी लेखांत चारशें अठ्ठावीस मेले व अकराशें अडतीस जखमी झाले असें वर्णन आहे. लढाईचे प्रसंगीं चिंतो आत्माराम वाकडे हा होळकराचे लगत्यावर होता, त्यास सर्जेरावानें पुण्याहून ता. २९-९-१८०३ रोजीं लिहिलें कीं, ‘तुम्हीं दरकूच पलटणें व फौज घेऊन बऱ्हाणपुरास जावें. पेंढाऱ्यांस पत्रें पाठविलीं आहेत ते व तुम्हीं सामील होऊन दरमजल पुढें जाण्याचें करणें.’ या वेळेपासून पेंढाऱ्यांचा उपयोग मराठे सरदारांस विशेष होऊं लागला. **पेंढारी** म्हणजे पूर्वीच्या गनिमी फौजा व कवाइती कंपू यांस जोडणारा दुवा होय. कवाइती कंपूंची ठांसून लढण्याची पद्धत मराठ्यांनीं स्वीकारली, तेव्हां लढाईच्या पूर्वी व पश्चात् शत्रूस हैराण करण्याचें काम शिल्लक राहिलें, त्यासाठीं पेंढाऱ्यांचा उपयोग विशेष होऊं लागला. त्यांस नियमित पगार देण्याची जरूर नसून

ग्वालेरचे वाकडे

**आत्माराम शिवराम**

| | | |
|---|---|---|
| **चिंतो** | कृष्ण | शिवराम |

शत्रूच्या मुलुखावर परभारें गुजारा चालवयाचा असल्यामुळें पेंढारी फौज या बिन-शिस्तीच्या पडत्या कालांत विशेष सोईची पडूं लागली. इंग्रजांस त्यांचा अतिशय जाच होऊं लागला; आणि याच कारणास्तव त्यांचा निःपात करण्यास एकूण एक मराठे नाखूष होते. आसईचे लढाईंत अगोदर व मागाहून पेंढाऱ्यांनीं इंग्रजांस अत्यंत हैराण करून सोडलें. दुसरी एक गोष्ट नजरेस पडते ती अशी, कीं अवघड कामीं स्टीव्हनसन्ला पुढें करून से० वस्ली पराक्रमाचें श्रेय आपल्या पदरांत पाडून घेत असे. त्या वेळच्या इंग्रजी कागदांत अशी कुरकूर वारंवार आढळते.

आसईच्या लढाईनंतर सिंदे भोसले फौजेचा जमाव करून बऱ्हाणपुरच्या संरक्षणा-साठीं मागें गेले. इकडे वस्लीनें कांहीं दिवस औरंगाबादच्या आसपास राहून पुढील तयारी चालविली; आणि स्टीव्हन्सनला अशीरगड काबीज करण्यास पाठविलें. स्टीव्हन्सन् चालून येतो असें पाहून सिंदे त्याच्या सामन्यास गेला, आणि वस्लीला मागून शह देण्यासाठीं भोसले पश्चिमेस चांदवडाकडे वळला. हें पाहून ता. १६-१०-१८०३ रोजीं वस्ली स्टीव्हन्सन्च्या बचावास निघाला. तो ता. १९ रोजीं अजिंठ्याचा घांट उतरतांच तिकडून सिंदे मलकापुरच्या बाजूस त्यास आडवा आला. तितक्यांत भोसले आपल्या पाठीवर गोदावरीकडे आल्याची खात्रीलायक बातमी वस्लीस कळली. त्याबरोबर त्वरेनें परत फिरून वस्ली ता. २५ रोजीं अजिंठा घाटांतून मागें येऊन २९ ऑक्टोबर रोजीं औरंगाबाद नजीक उतरला.

**३ बऱ्हाणपुर, अशीरगड, गावीलगड.**—तिकडे स्टीव्हनसननें १५ ऑक्टोबर रोजीं बऱ्हाणपुर शहर हस्तगत केलें. तेथें सिंद्याचा बंदोबस्त कांहींच नव्हता. लगेच दोन दिवसांनीं स्टीव्हनसन अशीरगडावर चालून गेला. ता. २० रोजीं त्यानें किल्ल्यावर तोफांचा मारा केला. तेव्हां किल्लेदारानें त्यास कळविलें, ' माझ्या फौजेचा पगार २० हजार रुपये तुंबला आहे तो तुम्हीं द्याल तर किल्ला खालीं करून देतों. त्या प्रमाणें रक्कम स्टीव्हनसननें रोख दिली आणि किल्ला हस्तगत केला. 'अशेरकर किल्लेदार यांनीं कावा करून शिबंदीचे सात लाख रुपये घेतले,' असा मराठी कागदांतील उल्लेख आहे. याचा वरच्याशीं मेळ कसा घालावयाचा तें समजत नाहीं. येणेंप्रमाणें बऱ्हाणपुर व अशीरगड हीं दोन सिंद्याचीं दक्षिणचीं नाकीं विशेष त्रास न पडतां इंग्रजांस मिळालीं. बऱ्हाणपुरास सिंद्याचीं पलटणें होतीं तिजवरील नऊ इंग्रज अम्मलदार व कांहीं गोरे शिपाई वस्लीच्या जाहीरनाम्याचा फायदा घेऊन स्टीव्हन्सनच्या स्वाधीन झाले.

से० वस्ली लिहितो, 'रघूजी भोसले गोदावरीकडे आला म्हणून वर लिहिलें, त्याचा उद्देश असा होता, कीं निजामाचे प्रदेशांतून मला धान्यसामुग्रीचा पुरवठा होत होता तो बंद पाडावा. हा पुरवठा शाबूद ठेवण्यासाठीं मुंबई, पुणें व नगर या तीन ठिकाणीं मला आपलीं सूत्रें कायम ठेवणें जरूर होतें. म्हणून मी सिंद्यांचा नाद सोडून एकदम परत रघूजीचे मुकाबल्यास आलों. गोदावरीचे कांठीं भोसल्यानें अमृतरावास आपल्या बाजूस वळविण्याचा प्रयत्न केला. त्याजवर एकदम हल्ला करावा असें माझ्या मनांत होतें. परंतु त्याच वेळीं सामान घेऊन आमची एक टोळी गोदावरीवरून अलीकडे येत होती, तिला सांभाळण्यासाठीं मी रघूजीवर हल्ला करण्याचें सोडून दिलें. त्या टोळीची व रघूजीची चकमक होऊन ता. १ नोव्हेंबर रोजीं सामान मजकडे येऊन पोंचलें; आणि पुढें रघूजीही पूर्वेच्या बाजूनें वऱ्हाडांत गेला. आसईची लढाई झाल्यापासून सिंदेभोसल्यांनीं समेटाचें बोलणें माझ्याकडे चालू केलें. नाहीं होय करतां ६-११-१८०३ रोजीं यशवंतराव घोरपडे समेटाचें बोलणें करण्यास सिंद्याकडून माझ्याकडे आला. त्यानंतर १२ नोव्हेंबर रोजीं अमृतराव माझ्या फौजेंत येऊन सामील झाला. त्याच्या नेमणुकीचा करार मी ऑगस्टमध्येंच कायम करून दिला होता; परंतु तेव्हांपासून कोणचा पक्ष वरचढ होतो याची वाट पाहत तो पूर्वी दूरदूर राहत होता, तो आतां निःशंकपणें माझ्याकडे आला. बऱ्हाणपुर व अशीरगड हीं ठिकाणें इंग्रजांचे हातांत गेल्याचें समजल्यापासून भोसल्यास मोठीच धास्ती वाटूं लागली; आणि वस्लीस अडविण्याचें सोडून तो केवळ आपल्या राज्याच्या बचावासाठीं परत गेला. याच वेळीं उत्तरेंतील मोहिमेंत अलीगड, दिल्ली, आग्रा वगैरे ठिकाणें सिंद्याचे हातून गेल्याचें बाहेर कळतांच सर्व मराठे सरदार हवालदील होऊन आपापल्या बचावास लागले. सिंदे भोसल्यांच्या फौजाही त्यांस भराभर सोडून जाऊं लागल्या. अर्थात् त्यांजकडून निजामावर चढाई होण्याची वस्लीची धास्ती पार नाहींशी झाली; आणि तो आतां निकरानें भोसल्याचेच पाठीस लागला. अशीरगड हातांत येतांच भोसल्याचा प्रसिद्ध मजबूद किल्ला गावीलगड हस्तगत करण्याची कामगिरी से० वस्लीनें स्टीव्हन्सन यास सांगितली. तदनुसार तो तिकडे जात असतां रघूजी त्यास अड-



विण्यास पुढें आला. तेव्हां त्यास मागून पायबंद देण्यासाठीं खुद्द वस्ली अमृतरावास बरोबर घेऊन राजुरा* घांटानें सिंधफणा नदीवर आला. त्यापूर्वी स्टीव्हनसनचा मुक्काम बाळापुरावर होता. २६ नोव्हेंबर रोजीं बाळापुर सोडून स्टीव्हन्सन पुढें निघाला, तेव्हां वस्लीची व त्याची गांठ पडली. हे दोघे रघूजीवर चालून जातात असें पाहून दौलतरावानें आपली फौज त्याजवर रवाना केली. इकडे सिंद्यानें तहाचें बोलणें चालविलेंच होतें. त्यानें वस्लीस विचारिलें, 'तहाचें बोलणें चालू असतां तुम्ही भोसल्यावर चालून जातां हें काय'? वस्लीनें जबाब दिला कीं, 'तुमच्याशीं आमचें युद्ध तहकूब असलें तरी भोसल्याशीं तें चालूच आहे. अशा रीतीनें त्यानें सिंदे भोसल्यांमध्यें देखील या वेळीं खुबीनें फूट पाडिली. भोसले व सिंदे यांच्या फौजा छ. १४ साबान (=ता २९-११-१८०३) रोजीं **आडगांव**जवळ उतरलेल्या वस्लीस आढळल्या. त्याजवर तिसरे प्रहरीं वस्लीनें एकदम लगट केली; आणि अल्पवकाशांत त्यांजवर संपूर्ण विजय मिळविला.

'भोसल्याकडील आघाडीस त्याचा सेनाध्यक्ष विठ्ठलपंत बक्षी व होळकराकडील फौज मिळोन तीस पस्तीस हजार जमाव होता. त्यास अकोलें बाळापुरचे मुक्कामीं वस्लीची व बक्षीची लढाई अडीच प्रहर होऊन वस्लीचीं तीन चार पलटणें कापिलीं, व विठ्ठलपंताकडील दोन हजार मनुष्य पडलें. मोठी लढाई झाली. खासे भोसले पंधरा कोस मागें होते. सिंदे जळगांवचे पूर्वेस दहा कोस होते. वस्लीचे मदतीस निजामाचीं पलटणें होतीं. अडीच प्रहर लढाई झाल्यावर बक्षी मोहरा सोडून मुक्कामावर गेले. हें वर्तमान वस्लीस समजतांच जलदी करून बक्षीचे पिच्छावर गेले. वस्ली आल्याचें कळल्यावर बक्षी कूच करून दहा कोसांवर बाजूस गेले. पुनः वस्लीशीं लढाई द्यावी असा सिंदे भोसल्यांचा इरादा आहे. अमृतराव वस्लीबरोबर आहेत. लढाईंत वस्ली, शिकस्त जाला, परंतु मागती हुशार होऊन कायम आहे.' या वर्णनावरून आडगांवच्या लढाईंत सुद्धां मराठ्यांनीं कसून काम केलें, आणि पराभवामुळें त्यांची उमेद बिलकूल खचली नव्हती असें दिसतें. वास्तविक पाहतां उत्तरेंत पेरॉनच्या हरामखोरीमुळें से. लेक यास अकल्पित विजय मिळून सिंद्यांच्या सत्तेचा तिकडे जो धुव्वा उडाला त्याचा अप्रत्यक्ष परिणाम दक्षिणच्या मोहिमेवर झाला. सिंदे उत्तरेंत

---

* यासच रोहिणखेडचा घांट म्हणतात. सिंधफणा गोदावरीस मिळते.

Wellesley Disp Vol III P. 57, 473; Wellington Disp, no. 195.

स्वतः हजर असता तर अल्पावकाशांत असा त्याचा बोजवारा उडाला नसता. दक्षिणेंतील मान पाहतां सर्व सरदारांचें एकमत झाल्याचा पुकारा एवढा मोठा झाला होता, कीं देशांत भलभलत्याच बातम्या उठल्या. ' इंग्रज शिकस्त झाले. वस्लीसाहेब ठार झाले. लंगडा फिरंगी धरला गेला. निजामाचा सरदार मखो रुद्र आपली फौज घेऊन मराठ्यांस सामील झाला. ' अशा अफवा उठून लोक आनंदांत गर्क होते तोंच त्याचे अगदीं विपरीत प्रकार कानावर येऊन लोकांची मोठी निराशा झाली.

आडगांवच्या लढाईनंतर वस्लीनें लगेच गाविलगडावर चाल केली. ता. ५ डिसेंबर रोजीं तो एलिचपुरास आला. तेथें सर्व जखमी मंडळी ठेवून त्यानें स्टीव्हन्सन् यास ७ डिसेंबर रोजीं गाविलगडावर रवाना केलें. त्या ठिकाणीं मोर्चे बांधून ता. १३ रोजीं त्यानें किल्ल्यावर तोफांचा मारा चालू केला. भोसल्यांचा शूर सरदार बेणीसिंग यानें किल्ल्याचा बचाव शिकस्तीनें केला, परंतु त्याचा नाइलाज होऊन २५ डिसेंबर रोजीं गाविलगड इंग्रजांस मिळाला. येथेंच दक्षिणेंतील मोहीम संपली. यापूर्वींच भोसल्यानें वस्लीशीं तह करून युद्धांतून आपली सुटका करून घेतली होती. या तहाची हकीकत देण्यापूर्वी प्रथम उत्तर हिंदुस्थानांतील युद्धाची वार्ता सांगितली पाहिजे.

**४ पेरॉनचा विश्वासघात, अलीगडचा पाडाव** * (२९-८-१८०३).- स.१७९२ सालांत महादजी सिंदे दक्षिणेंत आल्यापासून उत्तर हिंदुस्थानचा कारभार प्रथम डीबॉयन् व हल्लीं सात वर्षे पेरॉन याचे हातीं राहिला. जात्या हुशार व खटपटी, वर कोणी विचारता नाहीं, कसा झाला तरी युरोपियन, यामुळें सात वर्षांत त्यानें तिकडे चांगला जम बसविला. स्वतःचा व फौजेचा खर्च तिकडील वसुलावरच चालवा-वयाचा असल्यामुळें, फौजेच्या बळावर मुलुखांत स्वस्थता राखून लोकांस खूष ठेवणें त्यास भाग पडलें. कर्नल कॉलिन्स लिहितो, कीं ' पेरॉननें हातांतील सत्तेचा दुरुपयोग न करतां प्रांतांत सुव्यवस्था ठेविली. ' याचा परिणाम मात्र असा झाला कीं सिंद्यांच्या पदरचे दुसरे लष्करी अम्मलदार त्यास पाण्यांत पाहूं लागले. इतकेंच नव्हे तर खुद्द दौलतराव सिंद्यासही भय पडलें, कीं वेळीं हा आपणांस सुद्धां दगा देण्यास सोडणार नाहीं. ता. ३०-४-१८०२ रोजीं कॉलिन्स लिहितो, ' पेरॉनच्या हातांत असा सर्वाधिकार देऊं नका, अशी दौलतरावास त्याच्या सर्व सरदारांनीं गळ घातली. त्यावरून दौलतरावानें निश्चय केला कीं संधि येतांच

---

*Mill Vol VI 406-409; Wellesley Disp IV p. 131.

आपण खुद्द त्या बाजूस जाऊन पेरॉन यास दूर करूं; निदान आग्र्याचा किल्ला तरी त्याजकडून काढून घेऊं. ता. २७-२-१८०२ रोजीं मीं दौलतरावाची भेट घेतली तेव्हां याच विषयाचा खल त्याचे दरबारीं चालला होता. पेरॉननें सर्व तटबंदीचीं स्थळें मजबूद करून तेथें आपल्या भरंशाची शिबंदी ठेवून दिली आहे. यशवंतराव होळकराशीं त्याचें अंतःस्थ संधान आहे. आज कित्येक वर्षांचा वसूल संग्रहीं टाकून पेरॉन गब्बर बनला आहे.' पुढें ता. २४-६-१८०२ रोजीं खुद्द कॉलिन्सनें पेरॉनची भेट घेतली, त्या वेळीं त्याच्या नजरेस आलें, कीं दौलतरावाशीं व त्याच्या सरदारांशीं पेरॉनचें अतिशय वितुष्ट आलें आहे. 'मी लवकरच तुमचे आश्रयास फत्तेगड येथें येतों असें त्यानें मला बोलूनही दाखविलें.'

पेरॉननें तयार केलेल्या एकंदर फौजेची संख्या ३९०५० असून त्यांपैकीं अलीगड येथें खुद्द त्याचेजवळ १६६०० लोक होते. बाकीचे ठिकठिकाणीं बाहेर होते. पेरॉनची ही सोळा हजार फौज अत्यंत उत्कृष्ट, जय्यत तयारीची, व महादजी सिंद्याच्या वेळे-पासून प्रचंड खर्च करून बनविलेली असून, आग्रा व अलीगड येथें तोफांचे व हत्यारांचे सर्वोत्कृष्ट कारखाने पेरॉनच्या ताब्यांत होते. लेकशीं सामना करून त्याचा संपूर्ण फन्ना उडविण्याची उत्कृष्ट संधि त्या वेळीं त्यास आली असतां सेनानायकास अत्यंत लाजिरवाणें व लांछनकारक वर्तन पेरॉननें केलें तें पुढें कळून येईल.

पुढें स. १८०३ च्या पावसाळ्यांत युद्ध सुरू झालें, त्या वेळीं ग० ज० नें से० लेक यास सर्वाधिकार देऊन काय काय गोष्टी साध्य करावयाच्या त्याची समज दिली होती. त्यांतला मतलब असा कीं, 'प्रथम तुम्हीं पेरॉनची फौज नाहींशी करावी. ही फौज म्हणजेच हिंदुस्थानांतील फ्रेंच सत्ता होय. पावसाळा संपण्यापूर्वी या फौजेचा नायनाट करण्यास तुम्हीं चुकूं नये. त्यासाठीं पाहिजे ते इलाज करण्यास माझी तुम्हांस परवानगी आहे. नुसत्या गोडीगुलाबीच्या संधानानें पेरॉन वश होईल तर चांगलेंच. कदाचित सर्व फौजेसह तो तुम्हांस येऊन मिळेल तरी वाईट नाहीं. त्यासाठीं इंग्रज सरकाराकडून त्यास योग्य मोबदला कबूल करण्याचा अधिकार मी तुम्हांस भरपूर देतों. आज जो त्याजकडे जहागीर म्हणून प्रदेश आहे तो व मोगल बादशहा यांस त्यानें आमच्या हवालीं करावें, म्हणजे त्याबद्दलही आम्हीं त्यास निराळें बक्षीस देऊं. पेरॉनच्या हाताखालीं युरोपियन अम्मलदार असतील त्यांसही आपल्याकडे ओढण्याची खटपट तुम्हीं अवश्य करावी; आणि तशा आशयाचा उघड जाहीरनामा तुम्हीं काढावा. या जाहीरनाम्याचे कित्येक मसुदे मी

यासोबत पाठवीत आहें. हे जाहीरनामे पेरॉन व त्याचे हाताखालील लोक यांचे नजरेस पडतील अशी व्यवस्था तुम्हीं करावी. ' या सूचनांची बजावणी लेकनें भरपूर केली. दक्षिणेंत ता. ३-८-१८०३ रोजीं क. कॉलिन्स सिंद्याची छावणी सोडून गेला ही बातमी लगेच लेक यास पोंचून, तोही ७ ऑगस्ट रोजीं कानपुरची छावणी सोडून दिल्लीच्या मोहिमेवर निघाला, तो ता.२८ रोजीं सिंद्याच्या मुलखाच्या हद्दीवर पोंचला. परंतु त्यापूर्वींच त्यानें जाहीरनामे वगैरे काढून पेरॉन व त्याचे अम्मलदार यांजकडे भेद चालविला होता. त्यास अनुसरून २० ऑगस्ट रोजीं पेरॉननें लेक यास पत्र पाठविलें कीं, ' तुमच्याशीं लढण्याची माझी बिलकूल इच्छा नाहीं. उपस्थित लढा सलुखानें मिटविण्याची तडजोड करण्यास माझी तयारी आहे. तरी या संबंधानें तुम्हीं आपला विचार कळवावा.' त्यावरून बोलणें करण्यासाठीं पेरॉननें आपला एक हस्तक ता. २९ ऑगस्ट रोजीं लेकचे भेटीस पाठविला. परंतु त्या भेटींत तडजोड ठरली नाहीं; आणि त्याच दिवशीं अलीगडजवळ लेकनें पेरॉनच्या फौजेवर चाल केली. तेव्हां लढाई न करितां पेरॉनची फौज मागें हटली.

पेरॉनशीं सामना न करतां मागें हटलेले लोक दुसऱ्या दिवशीं भराभर त्यास सोडून जाऊं लागले. अलीगड जवळचें कोलचें ठाणें बिनआयास लेकच्या हस्तगत झालें. मात्र खुद्द अलीगडच्या किल्यांतील फौज लेक यास वश होईना. तेव्हां लेकनें किल्ल्यास वेढा घातला. वेढ्याचें काम क. मॉन्सम याजकडे होतें. किल्ल्यासभोंवार मोठा खंदक असून आंत जाण्याचा लाकडी पूल मोकळा सांपडला, त्यावरून ब्रिटिश लष्कर आंत घुसलें. तोफांचा मारा करून त्यांनीं दरवाजे पाडले. या प्रसंगीं मॉन्सन् यास जखमा लागल्या व सहा ब्रिटिश अम्मलदार ठार झाले. आंतील फौज पळून बचावाच्या नादास लागली. दोन तीन हजार तरी खंदकांत उड्या घेऊन मेले. अशा रीतीनें **अलीगड**चा किल्ला इंग्रजांच्या हस्तगत झाला. लगेच पेरॉननें लेक यास पत्र लिहून कळविलें कीं, ' तुम्ही मला कुटुंब व मालियत घेऊन ब्रिटिश हद्दींतून लखनौपर्यंत सुखरूप पोंचवीत असाल तर मी सिंद्यांची नोकरी सोडून तुमच्या स्वाधीन होतों.' याशिवाय उभयतांमध्यें आणखी काय व्यवहार घडले त्यांचा उल्लेख आढळत नाहीं. अलीगडच्या लढाईंत देखील पेरॉननें प्रत्यक्ष भाग घेतला नाहीं. सैनिकाच्या पेशास जागणारे कित्येक अम्मलदार त्याच्या हाताखालीं होते त्यांनींच किल्ला लढविला. पेरॉननें अंग काढून घेतलें नसतें तर सिंद्याच्या फौजेची अशी दाणादाण उडाली नसती, आणि या प्रसंगाचा निराळाच इतिहास इंग्रजांना

लिहावा लागला असता. हाताखालील फौज किंवा युद्धसामुग्री पेरॉननें इंग्रजांचे हवालीं केली नाहीं. दौलतरावाबद्दल त्यास अत्यंत अनादर वाटत होता. त्याचा त्यानें असा सूड आयत्या वेळीं निमकहरामपणानें घेतला. लेक यास त्यानें कळविलें कीं, 'माझे जागीं सिंद्यानें दुसरे इसमाची नेमणूक केली असल्याचें मला समजलें आहे; आणि माझे हाताखालचे सर्व युरोपियन अम्मलदार मला पाण्यांत पाहतात. अशा स्थितींत इंग्रजांशीं युद्ध खेळणें मला शक्य नाहीं.' सारांश अल्प सवलतीवर हा सिंद्यांचा मुख्य सेनापति दूर होतो हा कांहीं थोडा लाभ नव्हे असें पाहून, लेकनें त्यास त्याच्या मालीयतीसह सुरक्षितपणें लखनौस पोंचवून दिलें. बंदोबस्ताकरतां बेकेट व फ्ल्यूरी हे दोन इंग्रज अम्मलदार लेकनें त्याजबरोबर दिले. त्यांसह पेरॉन ता. ८-११-१८०३ रोजीं लखनौहून निघाला तो चंद्रनगरास जाऊन तेथून पुढें युरोपास गेला. अशा रीतीनें या फ्रेंच सेनापतीनें दरसाल चाळीस लाखांचा तनखा कैक वर्षें खाऊन त्याचें चीज करून दाखविण्याच्या ऐन प्रसंगीं धन्याचा गळा कापून दगा दिला, आणि शिपाईबाण्यास कायमचें लांछन आणिलें. या दुर्वर्तनामुळें स्वदेशीं परत गेल्यावर नेपोलियननें त्याचें तोंड सुद्धां पाहिलें नाहीं.

**५ आग्रा व लासवाडी** ( ३१-१०-१८०३ ).—ता. ५-९-१८०३ रोजीं अलीगडचा किल्ला लेकच्या स्वाधीन झाला; आणि ता. ७ रोजीं तो पुढें दिल्लीवर निघाला. ता. ९ सेप्टेंबर रोजीं तो सिकंदरा येथें पोंचतो तों से० बूरक्विनचे* हाताखालील फौज दिल्लीजवळ यमुना उतरून त्याचे सामन्यास आली. तेव्हां यमुनेच्या कांठीं खडाजंगीची लढाई होऊन से. बूरक्विनचा पराभव झाला. त्याच्या ६८ तोफा लेक यास मिळाल्या, आणि सुमारें तीन हजार लोक मारले गेले. दुसऱ्या दिवशीं लेकनें यमुनेच्या कांठीं तळ दिला. खुद्द दिल्लींत बादशहाजवळ आतां फौज तर

---

* बूर्क्विन व पेरॉन यांना दिल्लीचा अंमल बसवितांना जॉर्ज टॉमस नामक दुसऱ्या एका इसमाशीं कसा झगडा करावा लागला, तो एक विचित्र वृत्तान्त आहे. जॉर्ज टॉमस ऊ० जहाज फिरंगी हा इंग्रज सैनिक समरूजवळ असून तो हंसी येथें स्वतःचें स्वतंत्र राज्य उभारून आपला जम बसवीत होता. बहादूरगड येथें स. १८०१ सालीं टॉमस व बूर्क्विन यांचें तीन महिने पावेतों खडाजंगीचें युद्ध झालें. ता. २९-९-१८०१ रोजीं बूर्क्विननें टॉमसचा पराभव केला. पुढें हा टॉमस ता. २२-७-१८०२ रोजीं मरण पावला. हिंदुस्थानांत स्वतःचें स्वतंत्र राज्य स्थापणारा हा एकच युरोपियन आहे.

नव्हतीच, आणि यापूर्वीच ग० ज० नें त्याजला गुप्त पत्र पाठवून इंग्रज छत्राखालीं घेण्याचें अभिवचन दिलें होतें. या संबंधाचा बादशहाचा गुप्त जबाब २९ ऑगस्ट रोजीं लेक यास आला होता. तदनुसार ता. १४ सेप्टेंबर रोजीं ब्रिटिश फौज यमुना उतरून दिल्लींत आली. त्यापूर्वीं से० बूर्किन व दुसरे चार फ्रेंच अम्मलदार आणि दूद्रनेक हे लढाईचे कैदी म्हणून लेकच्या स्वाधीन झाले. ता. १६ रोजीं लेकनें बादशहाची भेट घेतली. मीर्झा अकबर यानें सामोरें जाऊन लेक यास सायंकाळीं ६ वाजतां बादशहाचे भेटीस आणिलें. त्या भेटींत बादशहानें, ' शंशामुद्दौला अजगर-न्मुल्क खानडौरान खान जनरल जरार्ड लेक बहादुर फत्तेजंग' असा भपकेदार किताब त्यास अर्पण केला. पुढें ऑक्टरलोनी यास दिल्लीच्या बंदोबस्तास ठेवून २४ सेप्टेंबर रोजीं लेक आग्र्यावर जाण्यास निघाला. तो २ आक्टोबर रोजीं मथुरेस आणि ४ रोजीं आग्र्याखालीं उतरला. ता. १० ऑक्टोबर रोजीं त्यानें शहर कबजांत घेतलें. त्या प्रसंगीं पराभव पावलेले २५०० लोक त्यास शरण आले, त्यांस त्यानें आपल्या नोकरींत घेतलें. पुढें किल्ल्यावर तोफांचा मारा सुरू होतांच किल्लेदार शरण आला आणि १७ ऑक्टोबर रोजीं आग्र्याचा किल्ला लेकच्या हस्तगत झाला. किल्ल्यांतील सर्व सामान, दारूगोळा, तोफांचा व हत्यारांचा कारखाना व प्रचंड द्रव्यसंचय लेकच्या हातीं आलें. त्यांत ७० लक्ष नगद ऐवज होता असा उल्लेख आहे.

' नगरचा किल्ला घेतल्याबरोबर इंग्रज दिल्लीवर चाल करणार हें ओळखून दौलतरावानें पेरूसाहेबास खबरदारीनें युद्ध करण्याविषयीं कळविलें; करीमखान पेंढारी व अंबूजी इंगळे यांस त्याजकडे जाण्याविषयीं लिहिलें, आणि पुढें होळकर जेव्हां माळव्याकडे गेला तेव्हां त्यासही त्यानें इंग्रजांवर सांपडेल तेथें चढाई करण्याची सूचना दिली. ह्या सूचना येतांच पेरूनें मथुरेपासून चार कोसांवर इंग्रज पलटणें होतीं तीं छापा घालून लुटलीं. करीमखान व खंडूजी इंगळे यांनीं यमुनापार जाऊन इंग्रजांचीं ठिकाणें उध्वस्त केलीं. ' असा मराठा कागदांतील उल्लेख आहे.

लेकच्या विजयाचीं वर्तमानें दौलतरावास दक्षिणेंत कळलीं, तेव्हां तेथून बरीच मोठी फौज त्यानें लगोलग लेकवर रवाना केली. ती दिल्लीवर चालून येत आहे अशी बातमी लेक यास लागतांच तो २७ ऑक्टोबर रोजीं स्वतः आग्रा सोडून दक्षिणेस त्या फौजेच्या मुकाबल्यास चालून गेला. फत्तेपूरशिक्रीजवळ आपलें जड सामान ठेवून लेक पुढें जातो तों ३१ ऑक्टोबर रोजीं सिंद्याची फौज जवळ आल्याचा त्यास सुगावा लागला. भरतपुरपासून बारा कोशांवर लासवाडीजवळ ती फौज एका ओढ्याच्या

आश्रयानें लढाईस सज्ज होती. गुलाबराय कदम वगैरे दोन हजार स्वार दक्षणी व फडणीस आदीकरून पंधरा पलटणांनिशीं तांब्राचा मुकाबला केला. चार प्रहर तोफखान्याची लढाई मातबर झाली. प्रथम लेकचा मदतनीस व्हॅन्डलूर यानें एकदम हल्ला केला. परंतु पहिल्या हल्ल्यांत तोच ठार झाला. त्या प्रसंगीं तुंबळ युद्ध झालें. मेजर ग्रिफिथ्स, मेजर जनरल वेअर वगैरे अनेक शूर इंग्रज अम्मलदार लढाईंत ठार झाले. शेवटीं इंग्रजांस विजयश्रीनें माळ घातली. युद्ध मुख्यतः तोफांचेंच झालें. इंग्रजांकडील दोन हजार गोरे व तीन हजार तेलंगे ठार व जखमी झाले. अखेर जनरल लेकनें स्वतः हल्ला केला तेव्हां मराठी फौज पळून गेली. त्यांचा तोफखाना दरोबस्त इंग्रजांचे कबजांत आला. **लासवाडी** या लढाईनें सिंद्याच्या समग्र फौजेचा संहार झाला आणि यमुना कांठचा संपूर्ण प्रदेश इंग्रजांचे कबजांत आला. उत्तरेकडील या मोहिमेचे मराठी कागद बिलकूल उपलब्ध नाहींत, ही मोठी उणीव आहे. खुद्द दौलतरावास तरी लेकच्या चढाईचीं वर्तमानें किती कळलीं असतील कोणास ठाऊक ?*

गुजरातेंत भडोच, पावागड वगैरे ठिकाणें सिंद्याचीं होतीं. तिकडे इंग्रजांचा क० मरे युद्धावर होता त्यानें क० वुडिंग्टन यास ता. २१-८-१८०३ रोजीं बडोद्याहून भडोचवर रवाना केलें. ता. २९ रोजीं त्यानें भडोचचा तट हस्तगत केला; आणि अकरा लक्ष उत्पन्नाचा सबंध परगणा इंग्रज अमलाखालीं आणिला. तेथून वुडिंग्टन चापानेरवर गेला. चापानेर हस्तगत करून ता. १७ सप्टेंबर रोजीं त्यानें नजीकचा पावागड किल्लाही घेतला. येणें प्रमाणें महाराष्ट्र, गुजरात, कटक, दिल्ली व बुंदेलखंड अशा पांच ठिकाणीं सिंद्याबरोबर संग्राम होऊन इंग्रज विजयी झाले.

**६ बुंदेलखंड काबीज, मांडलिकांशीं स्वतंत्र तह** ( सेप्टेंबर–डिसेंबर १८०३).—उत्तर हिंदुस्थानांतील समस्त मांडलिकांवर जें सिंद्याचें प्राबल्य होतें, त्यामुळेंच

---

* सें० लेक, जन्म ता. २७-७-१७४४, चौदावे वर्षी लष्करांत दाखल झाला. सप्तवार्षिक युद्ध, अमेरिकन युद्ध, व नेपोलियनचीं युद्धें यांत कर्तबगारी दाखवून तो प्रसिद्धीस आला. स. १७९८ त आयरिश बंडखोरांविरुद्ध त्यानें विजय मिळविले. स. १८०१ सालीं हिंदुस्थानांत त्यास सेनापतीचें काम मिळून तो कानपुरचे छावणींत येऊन राहिला. राजपूत राजांस दिलेला आश्रय बार्लोनें काढून घेतला, त्या बाबतींत त्याच्याशीं लेकचा विरोध होऊन त्यानें १८०७ त राजीनामा दिला. परत गेल्याबर त्यास व्हायकाउंट पदवी मिळाली. तो ता. २१-२-१८०८ रोजीं मरण पावला.

मराठ्यांना सार्वभौमत्वाचा मान होता. बादशहा सिंद्याचे ताब्यांत असून जाठ, राजपूत राजे आणि अंतर्वेदींतले नबाब सिंद्यास करभार देत. हें स्वामित्व से. लेकनें तत्काळ हिरावून घेतलें. त्यानें पेरॉन यास फोडून अलीगड दिल्ली व आग्रा हीं बादशाही सत्तेचीं मुख्य स्थळें हस्तगत केलीं, त्याबरोबरच से. लेकनें सिंद्याचे मांडलिकांशीं स्वतंत्र तह करून त्यांस इंग्रजी कक्षेंत आणिलें. हे तह येणेंप्रमाणें—

( १ ) भरतपुरचा जाठ रणजितसिंग याजबरोबर ता. ९-१०-१८०३.

( २ ) रावराजा माचेडीकर याजबरोबर ता. १४-११-१८०३.

( ३ ) जयपुरचा राजा जगत्सिंह याजबरोबर ता. १२-१२-१८०३.

( ४ ) जोधपुरचा राजा तख्तसिंह याजबरोबर ता. २२-१२-१८०३.

हे जे चार स्वतंत्र तह से. लेकनें केले त्यांमुळें पुष्कळ घोटाळे उत्पन्न होऊन ते पुढें इंग्रजांसच रद्द करावे लागले. अशाच प्रकारचा तह उदेपुर व कोटा येथील राजांशीं घाटत असतां सूरजी अंजनगांव येथें सिंद्याचा तह पुरा झाला, तेव्हां वरील दोघांचे स्वतंत्र तह पुढें घडून आले नाहींत. रणजितसिंग जाठास इंग्रजांच्या आश्रयाखालीं आणण्याचें काम त्याचा वकील निरंजनलाल यानें सिद्धीस नेलें, परंतु रणजितसिंगाचा मुलगा रणधीरसिंग यास ती गोष्ट मान्य नव्हती, त्यामुळें पुढें होळकराचे युद्धांत हा जाठ राजा इंग्रजांविरुद्ध उठला. *

वरील सत्ताधीशांखेरीज गोसावी सरदार हिम्मतबहाद्दर, गोहदचा राणा, अंबूजी इंगळे व मस्तानीचा वंशज समशेर बहाद्दर (२ रा) इतक्यांशीं से. लेकनें स्वतंत्र तह करून त्यांस मराठ्यांचे सत्तेंतून फोडून इंग्रजांचे आश्रयाखालीं आणिलें. पैकीं शेवटच्यास त्यानें लढाईत जिंकिलें. अंबूजी इंगळ्याचा प्रकार विचित्र झाला, तो स्वतंत्रच सांगितला आहे. गोहदच्या राण्याचें प्रकरणही विशेष चिडीस गेलें, त्याचा तपशील पुढें येईल. प्रथम समशेर-बहाद्दराची हकीकत देऊन मग गोसावी हिंमतबहाद्दराची या कलमांत सांगावयाची आहे.

माळवा व बुंदेलखंड हे दोन प्रान्त मराठ्यांचें मुख्य अधिष्ठान. पैकीं बुंदेलखंडांत यमुनेकडून शिरण्याचा मार्ग इंग्रजांस सुलभ होता. सिंदे भोसल्यांवर जेथें जेथें म्हणून प्रहार करतां येईल तेथें चढाई करण्याचे हुकूम ग० ज० नें आरंभींच दिले होते. त्यानें आपले उत्कृष्ट चेले वरदहस्त देऊन देशभर संचार करण्यास मोकळे सोडिले. त्यावरून

* Wellesley Desp. Vol IV page 183, 398; Vol V page 79.

गुजरात, कटक व बुंदेलखंड या ठिकाणीं सुद्धां युद्धाच्या मोहिमी झाल्या, त्यांचें स्वरूप लक्षांत घेणें जरूर आहे. बुंदेलखंडांत उतरण्यासाठीं ग० ज० नें अलाहाबादेजवळ एक स्वतंत्र फौज जमवून ती क० पॉवेल याच्या हाताखालीं तयार ठेविली. अलीगडचा किल्ला लेकच्या हातीं पडला, त्याच दिवशीं पॉवेलची फौज यमुनेपलीकडे जाऊन बुंदेलखंडांत उतरली. या प्रांतांत पेशव्यांचा सरदार अलीबहाद्दर, हिंमतबहाद्दर गोसाव्याच्या साह्यानें मराठी राज्य टिकवून होता, हें पूर्वी सांगितलेंच आहे. गेल्या दहा वर्षांत या दोघांनीं बहुतेक बुंदेलखंड कबजांत आणिलें होतें. अलीबहाद्दर ता. २८-८-१८०२ रोजीं मरण पावला, त्या वेळीं त्याचा मुलगा समशेर बहाद्दर आठ वर्षांचा पुण्यास होता. बाजीरावाची या कुटुंबावर इतराजी झाल्यामुळें त्यानें यांची जहागीर जप्त केली. त्या संबंधानें समशेर बहाद्दरानें पुण्यास पुष्कळ खटपट केली, परंतु त्याची दाद न लागतां बुंदेलखंडांतील त्याचा सरंजाम नीलकंठ रामचंद्र प्रभु पागे यास देऊन बाजीरावानें त्याची रवानगी बुंदेलखंडांत केली. त्यामुळें समशेरबहाद्दर अत्यंत नाराज झाला. हडपसरचे लढाईत तो बाजीरावाचे वतीनें हजर राहून पुढें बाजीरावाबरोबरच महाडास गेला होता. तेथून परत आल्यावर त्यानें अमृतरावाकडून सरंजामाचा हुकूम घेऊन बुंदेलखंडांत प्रयाण केलें. 'तेथें त्यास असें आढळून आलें कीं हिंमतबहाद्दर गोसावी व अलीबहाद्दराचा मावसभाऊ गनीबेग यांनीं एक विचारानें तेथील सर्व कारभार चालविला आहे. ते समशेर बहाद्दरास दाद देईनात. गनीबेगाचा फितुर पाहून त्यास समशेर बहाद्दरानें कैद केलें. त्या योगानें हिंमतबहाद्दर जागा होऊन आपले बचावास लागला तो प्रकार असा. कारभारी गोरे यानें अलीबहाद्दराचें साह्य फार चांगलें केलें.

बुंदेलखंडांतील मराठ्यांचा प्रदेश कोणत्या ना कोणत्या युक्तीनें हस्तगत करण्यासाठीं ग. ज. नें आपला तिसरा भाऊ हेन्री वेल्स्ली यास अगोदरच तिकडे रवाना करून मागाहून दुसरा आपल्या भरंवशाचा इसम मर्सेर यास त्याच कामावर रवाना केलें. स. १८०३ च्या जून महिन्यांत दक्षिणेंत से. वस्ली व सिंदे यांचें बिनसत चाललें, त्या वेळीं मुद्दाम सिंद्यानें हिम्मतबहाद्दर व गनीबेग या आपल्या सरदारांस निकडीचीं पत्रें लिहून बुंदेलखंडाचा बंदोबस्त नीट राखा, इंग्रज लोकांचा तिकडे शिरकाव होऊं देऊं नका, अशी वारंवार ताकीद दिली होती. पण हे दोघेही धन्याशीं बेइमान होऊन इंग्रजांशीं संधान करूं लागले. मर्सेर अलाहाबादला येतांच तेथें हिम्मतबहाद्दरानें आपले तर्फेनें वकील म्हणून मिसलबॅक नांवाचा डच गृहस्थ पूर्वी त्याचे नोकरींत होता त्यास मर्सेरचे भेटीस पाठविलें, आणि त्यास आपल्या मागण्या

लिहून कळविल्या त्या अशाः—( १ ) आम्ही बुंदेलखंडांतील प्रदेश जिंकण्यास इंग्रजांस सामील होऊन फौजेनिशीं मदत करावी; ( २ ) इंग्रजांस येऊन सामील झाल्यावर फौजेच्या खर्चासाठीं त्यांनीं आम्हांस वीस लक्षांचा प्रदेश बुंदेलखंडांत तोडून देऊन शिवाय अंतर्वेदींत स्वतंत्र जहागीर द्यावी; ( ३ ) आमचा भाऊ उमरावगीर लखनौस वजिराचे कैदेंत आहे त्याची इंग्रजांनीं सुटका करावी; ( ४ ) आम्ही ज्या एतद्देशीय सरदारांस स्वतंत्र करार करून इंग्रजांचे आश्रयाखालीं आणूं त्यांचे ते करार इंग्रजांनीं पाळावे.

या अटी मर्सेरनें कबूल करून ता. ४-९-१८०३ रोजीं हिम्मतबहादूरास करार लिहून दिला, आणि त्यास ' महाराज ' किताब देऊन स्वतंत्र राजा बनविलें. नंतर त्या करारांचीं कलमें पुरीं करून देण्याचें काम अलाहाबादचा कलेक्टर आमुटि ( Ahmuty ) याजकडे से. लेकनें सोंपविलें. ता. १२ सप्टेंबर रोजीं इंग्रज फौज क. पॉवेल याच्या हाताखालीं यमुना उतरून बुंदेलखंडांत शिरली आणि हिम्मत-बहादूर कराराप्रमाणें १६ हजार फौज घेऊन त्यास सामील झाला. फौजेबरोबर वरील आमुटीही होता. याप्रमाणें हिम्मतबहादूर निघून गेल्यामुळें बुंदेलखंडांत मराठ्यांची सत्ता टिकविण्याचें काम एकट्या समशेरबहादूरावर येऊन पडलें. गोहदचा राणा व अंबूजी इंगळे यांसही या वेळीं इंग्रजांनीं शिंद्याचे तैनातींतून फोडून आपले बाजूस आणिलें; आणि तिकडून बाजीरावाचाही हुकूम त्यांनीं आणिला कीं, समशेर बहादूर बंडखोर आहे, त्यास पकडून त्याजकडील प्रदेश इंग्रजांनीं हस्तगत करावा. मस्तानीच्या या वंशावर बाजीरावानें वक्रदृष्टि धरून निष्कारण त्याचा निःपात करविला. अमृतरावाप्रमाणेंच तो आपल्याविरुद्ध आहे अशी बाजीरावाची समजूत होती. वसईच्या तहांत इंग्रजांच्या तैनाती फौजेच्या खर्चास बाजीरावानें सव्वीस लक्षांचा मुलूख द्यावयाचा तो गुजरातेंत सुरत जवळचा ओरपाड तालुका व कर्नाटकांतील सावनूर प्रांत हे त्यानें प्रथम तोडून दिले होते, परंतु इंग्रजांस हे दूरचे तालुके सांभाळणें अडचणीचें वाटलें, आणि बुंदेलखंड जिंकावयाचेंच होतें, सबब से० वेल्स्लीनें बाजी-रावाची समजूत घालून ओरपाड व सावनूर यांच्या ऐवजीं बुंदेलखंडांतील पेश-व्यांचा ३६ लाखांचा मुलूख त्याजकडून लिहून घेतला. पहिल्या बाजीरावास छत्र-सालाकडून मिळालेली ही पहिली खासगी जहागीर मस्तानीच्या वंशाकडे दिलेली होती. बाजीरावानें ही ता. ५-१०-१८०३ रोजीं इंग्रजांस लिहून दिली.

इतक्या सगळ्या शस्त्रांचा प्रहार बिचाऱ्या समशेर बहाद्दरावर होतांच, तो इंग्रजांच्या माऱ्यास कितीसा टिकणार? तथापि त्यानें शेवटपर्यंत झगडा करून आपल्या शूर पूर्वजाचें नांव राखण्यास कमी केलें नाहीं. त्याचा मुक्काम केन नदीच्या कांठीं असतां ता. २३·९·१८०३ रोजीं इंग्रज फौजा त्याजवर चालून आल्या. तेव्हां एके बाजूनें लढणें आणि दुसरे बाजूनें समेटाचें बोलणें अशा दोनही उद्योगांनीं त्यानें बचावाचा उपक्रम चालविला. हें समेटाचें बोलणें आमुटीकडे चाललें होतें. पण आमुटी आजारी पडून परत गेला आणि समेट फिसकटला. तेव्हां पॉवेलनें त्याजवर ता. १३ ऑक्टोबर रोजीं चाल करून त्याची फौज उधळून लाविली. परंतु यापूर्वींच आमुटीनें ठरविलेला करार ग० ज० कडे जाऊन तेथून मंजूर होऊन आला होता. त्या करारांचें बोलणें पुरें करण्यासाठीं कॅ० बेली यास मुद्दाम कलकत्त्याहून त्यानें समशेरबहाद्दराकडे पाठविलें. त्यांची दोन महिने वाटाघाट चालली. पण ती जुळून न येतां पुनः समशेरबहाद्दराचा पाठलाग इंग्रज फौजेनें चालविला. ‘बहाद्दर शिकस्त खाऊन काल्पी नजीक आले. ताकद नाहीं. यशवंतराव होळकराचीं गुप्त पत्रें आलीं, कीं तांब्रांकडे कोणी सामील न होणें, आम्ही लवकरच त्या प्रांतीं येतों. परंतु कालमाहात्म्यामुळें जयपुर भरतपुर वगैरे सर्वांनीं इंग्रजांचा आश्रय केला. लोकांस जाण्यास ठिकाण राहिलें नाहीं. चहूंकडून इंग्रजांनीं ग्रासलें. दरोबस्त दखल त्यांचा झाला.’ म्हणून समशेर बहाद्दरानें हैराण होऊन कॅ० बेलीची याचना केली. तेव्हां बेलीनें ग० ज० मार्फत पुण्याहून पेशव्याची मंजुरी आणून त्यास दरसाल ४ लाखांची नक्त नेमणूक बांधून दिली. ती स्वीकारून आणि बांदा येथें राहण्याचें ठरवून ता. १८-१-१८०४ रोजीं समशेरबहाद्दर इंग्रजी छावणींत येऊन बेली व पॉवेल यांस भेटला. याच संधीस ता.४-१-१८०४ रोजीं झांशीचा सुभेदार शिवरामभाऊ नेवाळकर यानेंही समशेरबहाद्दराचें अनुकरण करून बेली व पॉवेल यांस भेटून इंग्रजांचा आश्रय स्वीकारिला. काल्पीचा जहागीरदारही याच वेळीं इंग्रजांचे आश्रयास आला. भगेलखंडाचा राजा अजितसिंग याच्याशीं स्वतंत्र तह करण्याचे प्रयत्न इंग्रजांनीं केले, ते या वेळीं सिद्धीस गेले नाहींत. भगेलखंडाची राजधानी रेवा यालाच पूर्वी रेवामुकुंदपुर म्हणत. रामचंद्र बल्लाळ बुंदेले खेर याच सुमारास निवर्तला.

या युद्धांतील चवथी मोहीम भोसल्याच्या कटक प्रांतांत झाली. बंगालपासून मद्रासपावेतों आपला मुलूख सलग असावा अशी इंग्रजांची धडपड आज ४० वर्षें चालू होती. पण मध्यें भोसल्याचा कटक प्रांत असल्यामुळें त्यांचा नाइलाज होत

असे. ही गोष्ट या युद्धांत साध्य करून घेण्याचा वस्लीचा प्रथमपासूनच संकल्प होता. मद्रास इलाख्याच्या उत्तरभागीं जी फौज होती, ती व बंगालची कांहीं फौज अशी दोहोंकडून एकट्या भोसल्याच्या परगण्यावर चालून जावी असें ठरवून तें काम कँप्बेल यास सांगण्यांत आलें. परंतु कँप्बेल आजारी झाल्यामुळें ती कामगिरी क. हारकोर्ट याजकडे आली. हा भाव ओळखून भोसल्यांनीं नागपुरचा बंदोबस्त उत्तम करून बंगाला व कलकत्ता या रोखें फौजा ठेविल्या. बंगाल प्रांतीं बापू घाटगे व कलकत्त्याचे रोखें महाडीक ठेविले होते. ता. ८-९-१८०३ रोजीं गंजमची इंग्रज फौज पुढें चालून गेली, तिनें १४-९ रोजीं भोसल्याचें ठाणें माणिकपट्टण हस्तगत केलें, त्यांत जगन्नाथाचें मंदिर होतें, तें तेथील ब्राह्मणांनीं इंग्रजांचे हवालीं केलें. पुढें कटकवर जाण्यास पावसाची अडचण आली, ती संपल्यावर ता. १०-१० रोजीं कटक इंग्रजांचे हातीं पडलें. तसेंच बंगालकडील इंग्रज फौजेच्या हातांत बालासोर ता. २३-९ रोजीं पडलें.*

**७ तह व वाटाघाट** ( नोव्हें०-डिसें० १८०३ ).—एवढा युद्धाचा धुमाकूळ चालला, तथापि आपण हरलों ही भावना सिंदे भोसल्यांची बिलकूल नव्हती. कसें तरी करून चाललेलें युद्ध मिटवावें आणि पुनः प्रयत्न करून मराठमंडळाचें ऐक्य जमवून मग इंग्रजांचें पारिपत्य करावें, अशा भावनेनें त्यांनीं तहाची वाटाघाट फक्त दक्षिणेंत से० वस्लीशीं सुरू केली; पण त्यानें एकत्र वाटाघाट होऊं दिली नाहीं. तुम्हीं तुमच्या एकट्यापुरतें बोला असें प्रत्येकास सांगून त्यानें त्यांच्याशीं निराळे तह केले. आपसांत भांडण उत्पन्न झाल्यास त्याचा निर्णय आम्हीं करूं तो तुम्ही पाळावा, अशा प्रकारचें कलम प्रत्येक तहांत घालून वस्लीनें आपला डाव सिद्धीस नेला. मराठी कागदांतून तर असाच ध्वनि निघतो, कीं वस्लीबंधूंस युरोपांतून वरिष्ठ सरकाराचा मनाई हुकूम येऊन त्यांनीं युद्ध थांबविलें; आणि ज्याप्रमाणें युद्धांत नानाविध लपंडाव झाले, त्याचप्रमाणें तहांचें चऱ्हाटही दोन तीन वर्षें सारखें वाढतच गेलें. दरखेपेस नवी अडचण निघाली कीं पुनः नवा तह झाला, अशी कांहीं काळ पद्धतच पडून गेली. युद्धानें आपण स्वराष्ट्राचा मोठा फायदा केला अशी शेखी वस्लीबंधूंनीं मिरविली; परंतु फायद्या ऐवजीं कर्जवृद्धि व व्यापार बूड यांनीं एवढी आपत्ति इंग्रजांवर आणली कीं

* बा. रो. ले. १३६; रु. ३ ले. २२३; Mill Vol VI p. 440; Welleslay Disp. Vol III page 631.

वस्ली बंधूंस बदलून पूर्वीचें वातावरण उत्पन्न करण्यासाठीं इंग्लंडच्या सरकारानें लॉर्ड कॉर्नवालिस यास पुनः इकडे पाठविलें. मिळून शांतता प्रस्थापित करण्याचा लॉर्ड वेल्स्लीचा उद्देश साफ फसला. तिसरा युद्धाचा उद्देश फ्रेंचांचा पाडाव करण्याचा, हा केवळ लॉर्ड वेल्स्लीच्या कल्पनेंतच होता. त्याच्या कुरापती स्वभावास हें एक दिखाऊ कारण सांपडलें इतकेंच. कारण फ्रान्सचा पाडाव होणें न होणें ही गोष्ट त्या वेळीं युरोपच्या परिस्थितीवर अवलंबून होती. त्यांत त्या वेळीं हिंदी राजकारणाचा संबंध येत नव्हता.

पहिला युद्धांतला तीव्र प्रसंग आसईचा होय. त्यांत वाताहत झाल्याबरोबर सिंदे भोसल्यांनीं समेट करण्याचें ठरवून ता. ६–१०–१८०३ रोजीं बाळोजी कुंजरामार्फत से० वस्लीस पत्र लिहिलें कीं, ' आमची इच्छा तुमच्याशीं युद्ध चालविण्याची नाहीं, समेट करण्याची आहे. त्यासाठीं तुम्हीं आपला एक व निजामाकडील एक असे दोन इसम आमचेकडे बोलणें करण्याकरितां पाठवावेत. ' बाळोजी कुंजरानें या पत्रांत सिंदे भोसल्यांचा उल्लेख केला नव्हता. तेव्हां पुढें त्यांनीं या बोलण्याचा इनकार केल्यास आपली फसगत होईल असें से० वस्लीनें ताडून, आणि इंग्रज वकील मराठ्यांचे छावणींत गेल्यास इंग्रज हतबल होऊन तहाची याचना करतात असा समज पसरून, मराठी फौजांस लढण्याचा नवीन हुरूप येईल तो न यावा, म्हणून वस्लीनें बाळोजी कुंजराच्या या पत्रास कांहीं एक महत्त्व दिलें नाहीं. नंतर अशींच समेटाचीं संधानें अनेकांकडून वस्लीकडे चालू होतीं, परंतु सिंद्याकडचा तहाचा खरा उपक्रम नोव्हेंबरच्या पहिल्या आठवड्यांत बऱ्हाणपुर व अशीरगड पडल्यानंतर सुरू झाला; आणि त्यानें आपले दोन वकील यशवंतराव घोरपडे व नारोपंत नाना वस्लीशीं बोलणें करण्यास पाठविले. पहिलें बोलणें ता. १० नोव्हेंबर रोजीं झालें. त्यांत वस्लीस असें दिसून आलें कीं दौलतरावानें या दोघांस तहाचे संपूर्ण अधिकार दिलेले नाहींत. तसे अधिकार लेखी आल्याशिवाय आम्ही तहाचें बोलणें करीत नाहीं, असें पत्र वस्लीनें दौलतरावास पाठवून जबाब मागविला, आणि वकील आपलेजवळ ठेवून घेतले. त्यावर दौलतरावानें महंमद मीरखान यास पूर्ण अधिकार देऊन बोलणें करण्यास पाठविलें, आणि असेंही लिहिलें कीं घोरपडे आणि नारोपंत हे केवळ आपल्याच जबाबदारीवर बोलणें करण्यास गेले, आम्ही त्यांस पाठविलें नाहीं. त्यावरून वस्लीनें ता. २० नोव्हेंबर रोजीं त्या वकिलांस बोलावून कळविलें, कीं ' तुम्हांस आतां आमचे जवळ येथें ठेवून घेतां येत नाहीं. ' यावर ते परत जाऊन लगेच पुनः

दौलतरावाचें पत्र घेऊन वस्लीकडे आले, तेव्हां वस्लीनें यशवंतरावास कळविलें, तुम्हीं फक्त सिंद्यापुरतें बोलणें बोला. वकिलांनीं सांगितलें, 'तह ठरेपर्यंत युद्ध तहकूब करा.' त्यावरून सिंद्यापुरतें युद्ध तहकूब करण्याचें वस्लीनें मान्य केलें; आणि भोसल्याशीं युद्ध चालूच ठेविलें. पुढें ता. २९ नोव्हेंबर रोजीं आडगांवची लढाई झाली तींत सिंदे भोसले या दोघांनींही भाग घेतला. यानंतर आठ पंधरा दिवसांत दोघांशीं पृथक् तह वस्लीनें ठरविले, त्यांच्या योगानें कलकत्त्यास ग० ज० ची अत्यंत निराशा झाली. 'दौलतराव सिंदे व रघूजी भोसले यांस पकडून मजकडे कलकत्त्यास पाठवा, त्यांनीं येथें येऊन माझ्या पायाशीं तहाची याचना केली पाहिजे,' अशी ताकीद त्यानें से० वस्लीस दिलेली होती. पण आपण घाई करून तह कां पुरा केला याचीं कारणें से. वस्लीनें खालील प्रमाणें दिली आहेत.* ता. २३–११–१८०३ च्या पत्रांत तो लिहितो, 'आतां यापुढें सिंद्यास आणखी नरम करण्याची शक्ति मला नाहीं. दक्षिणेंतला त्याचा मुलूख मीं हस्तगत केलाच आहे. गुजरातच्या फौजेस उज्जनवर चालून जाण्याची सोय नाहीं. सिंद्याचे पायदळ कंपू सर्व नाहींसे झाले. घोडदळ मात्र सर्व शाबूद आहे. या घोडदळाचे पाठीस लागण्यांत आम्हांस देशभर भटकावें लागेल. त्यांत धान्याचा पुरवठा आम्हांस होणें बिलकूल शक्य नाहीं. उलट सिंदे मात्र आपल्या घोडदळानें आमचा पुष्कळ नाश करूं शकेल; आणि भोसल्याशीं तह होत आहे तो बिघडवील. दोघे पुनः संगनमत करून उठतील तर त्यांजपुढें माझा व स्टीव्हन्सनचा बिलकूल निभाव लागणार नाहीं. दौलतरावानें बापूजी सिंद्यास उज्जनचे बचावास पाठविलें आहे. सिंद्याचे कांहीं पायदळ कंपू उज्जनीस असून इकडून पराभव पावून गेलेले कंपूही तेथें जमत आहेत. कर्नेल मरे गुजरातेंत कान्होजी गायकवाडावरील मोहिमेंत गुंतला आहे; आणि त्याजवर बापूजी सिंदे उज्जनहून चालून जाण्याचा संभव आहे. अशा स्थितींत गुजरातेंत सिंद्याची फौज उतरेल तर तेथें आपला निभाव कांहींच लागणार नाहीं. तह झाल्यानें हे सर्व परिणाम टळतील. शिवाय भोसल्याचा तह पुरा झाला म्हणजे एकटा सिंदे काय करणार ? यास्तव तूर्त हे तह करून मी मोकळा होतों. पुनः संधि आल्यास तह मोडून सिंद्याचा पाडाव करण्यास विलंब लागणार नाहीं.' यावरून इंग्रज किती टेकीस आले होते आणि मराठ्यांकडून

---

* Disp. IV pp. 984, 522, 132. Wellington Disp, No. 184, & No. 195.

प्रयत्न झाला असता तर त्यांचा कसा नाश झाला असता, ही गोष्ट स्पष्ट होते. से. वेस्ली लिहितो, 'गाविलगडचा वेढा चालू असतांच रघूजीचे वकील मजकडे तहाचें बोलणें बोलत होते. त्यांस दहशत पडावी म्हणून प्रत्यक्ष नागपुरावर हल्ला करण्याच्या इरादानें मी तीन मजला चालूनही गेलों. तेव्हां पुढील संकट टाळण्यासाठीं रघूजीनें २३ डिसेंबर रोजीं माझ्या अटींना **देवगांव** मुक्कामीं मान्यता लिहून कळविली. त्यापूर्वी सिंद्यांच्या अटीही ठरून चुकल्या होत्या. परंतु आडगांवच्या लढाईंत त्यानें भाग घेतल्यामुळें भोसले अलग झाल्यानंतरही सिंद्याचें युद्ध चालूच राहिलें, आणि आतां तो एकटाच सामना करण्यास उभा राहिल्यामुळें मी त्याच्या वकिलास जरब दिली कीं, 'मी आतां सिंद्यावर चाल करून जाणार.' हा माझा निश्चय ऐकून आणि भोसल्याचा तह पुरा झालेला पाहून सिंद्याची तह करण्याची उत्कंठा वृद्धिंगत झाली. मुनशी कवलनयन व विठ्ठलपंत या दोन वकिलांस त्यानें मजकडे पाठविलें. 'मी सांगितलेल्या अटींस तुम्ही दोन दिवसांत मान्यता न द्याल तर मी एकदम सिंद्यावर चाल करीन,' अशी धमकी देऊन मी क. मरे यास गुजरातेंतून उज्जनवर जाण्याचा हुकूम पाठविला. तिकडून से० लेकनेंही उज्जनच्या रोखानें चाल सुरू केली. नंतर मी थोडा पश्चिमेकडे वळून ता. २६-१२-१८०३ रोजीं एलिचपूर जवळ **सूरजी अंजनगांव** येथें स्टीव्हन्सनला येऊन मिळालों. ता. २८ डिसेंबर रोजीं माझ्या अटींस सिंद्यानें मान्यता दिली, आणि ता. ३० रोजीं रात्रीं एक वाजतां मीं तहनाम्यावर सही केली. नंतर तो कागद सिंद्याकडे जाऊन त्याची सही होऊन ता. ५-१-१८०४ रोजीं मजकडे आला. तहांचे तपशील अमलांत आणणेसाठीं सिंद्याचे दरबारीं माल्कम् व भोसल्याचे दरबारीं एल्फिन्स्टन् हे ब्रिटिश रेसिडेंट म्हणून दाखल झाले.'

तोंडजबानीच्या वाटाघाटींत मराठे वकील आपणांस फार हुशार समजत. तलवारीच्या जोरावर जें नुकसान त्यांस भरून काढतां आलें नाहीं तें आपण अकलेच्या जोरावर पुरें करूं असा समज सामान्यतः मराठे सरदारांचा असे. परंतु वेस्ली बंधूंचा जबरदस्त कावा स्पष्टपणें समजण्यास या मराठे सरदारांस सुद्धां कांहीं काळ लागला. ता. २९–११–१८०३ रोजीं आडगांवची लढाई झाली, आणि दुसरेच दिवशीं भोसल्यानें यशवंतराव रामचंद्र यास वेस्लीकडे बोलणें करण्यासाठीं पाठविलें. त्याजबरोबर आनंदराव माधव व कृष्णराव माधव चिटणीस हेही गेले होते. सुरवातीसच युद्धाची जबाबदारी कोणावर हा प्रश्न निघाला, त्यावर पुढील संवाद झाला. वकील म्हणाले, "तुम्हीं जरूर नसतां आपण होऊन घाईनें युद्ध सुरू केलें."

व०—भोसल्यांनींच ही आपत्ति अविचारानें आपणावर ओढून आणिली.

य०—रघूजीस निघून जा म्हणून हुकूम करण्याचा कॉलिन्सला अधिकार काय ?

व०—युद्धाच्या तयारीनें तुम्हीं दोघे निजामाच्या सरहद्दीवर येऊन बसलां म्हणून आम्हांस शस्त्र उचलणें भाग पडलें.

य०—आमची फौज आमचे हद्दींत होती, हद्द सोडून बाहेर गेली नव्हती. होळकरानें मुलखाचा सत्यानाश चालविला तो बंद करण्यासाठीं आम्हांस फौजा जमवाव्या लागल्या, आणि तुम्हीं बाजीरावाशीं स्वतंत्र तह करून त्यास बांधून टाकिलें, म्हणून आम्हांस फौजा सिद्ध करणें भाग पडलें.

व०—सिंदे होळकरांचा तंटा तोडण्यासाठीं निजामाच्या हद्दीवर फौजा आणण्याचें तुम्हांस प्रयोजन काय ? पेशवा वाटेल त्याच्याशीं तह करण्यास मुखत्यार आहे. त्यास अडथळा करण्याचा तुम्हांस काय अधिकार ? अशीं उत्तरें प्रत्युत्तरें वाढून पार येईना, तेव्हां–

य०—बरें ! मागें झालें तें झालें. आतां याचा शेवट कसा लावायचा ?

व०—आम्ही तहाच्या अटी सांगूं त्या मान्य करण्यास तुमचे यजमानानें तुम्हांस संपूर्ण अधिकार दिला आहे काय ?

य०—नाहीं. तुमच्या अटी काय त्या समजून घेऊन आम्हांस येऊन कळवा एवढीच आम्हांस यजमानांची आज्ञा आहे.

व०—तुम्हीं युद्ध सुरू करून आम्हांस जो त्रास दिला त्याबद्दल दंड व आमचा झालेला खर्च भरून द्याल तरच आम्ही समेट करूं.

य०—याचा विचार करण्यास थोडा अवधि पाहिजे. मुदत नेमा आणि तोंपर्यंत युद्ध तहकूब ठेवा.

व०—मी क्षणभरही युद्ध थांबविण्यास तयार नाहीं. मीं सांगितलेल्या अटी या क्षणीं कबूल करा.

य०—तर मग हा प्रकार यजमानांस कळवून उत्तर आणीपर्यंत तरी आम्हांस येथें तुमच्या छावणींत राहण्याची परवानगी द्या.

व०—नाहीं. आमच्या छावणींत राहण्याची परवानगी तुम्हांस मिळणार नाहीं. बाहेर वाटेल तेथें मुक्काम करा.

त्यावर वकील निघून रघूजीकडे परत गेले. ९ डिसेंबर रोजीं पुनः वस्लीकडे आले. त्यांनीं कळविलें कीं, तुमच्या अटी आमचे यजमान मान्य करतात. त्यांची स्पष्टता करा.' त्यावरून वस्लीनें खालील अटी कळविल्या. भोसल्यांनीं ( १ ) सबंध कटक परगणा व बालासोरचें बंदर आणि गाविलगड व नरनाळा हे किल्ले इंग्रजांस द्यावे; ( २ ) वर्धेपर्यंतचा पश्चिम वऱ्हाडचा प्रदेश निजामास द्यावा; ( ३ ) ज्या मांडलिकांशीं इंग्रजांनीं स्वतंत्र तह केले आहेत ते सर्व मान्य करावेत; ( ४ ) इंग्रजांविरुद्ध केलेली जूट सोडून देऊन इंग्रजांचे युरोपियन शत्रूंस नोकरींत ठेवूं नये.

य०—या अटींनीं तर भोसल्यांचें सर्व राज्यच खलास झालें.

व०—तुमचे यजमान रघूजी बावा फार शहाणे आहेत. कर्तव्याकर्तव्यतेचा विचार त्यांस चांगला समजतो. प्रथमच त्यांनीं पूर्ण विचार करून पाऊल टाकावयाचें होतें. आतां त्यास इलाज काय ? आतां परिणाम भोगिले पाहिजेत.

यानंतर पुष्कळ भवति न भवति होऊन गाविलगड व नरनाळा हे दोन किल्ले बंडखोरांच्या बंदोबस्तासाठीं आम्हांस अवश्य पाहिजेत असा वकिलांनीं आग्रह धरल्यावरून ते भोसल्यास देण्याचें वस्लीनें कबूल केलें. उपरांत ता. १६-१२-१८०३ रोजीं उभय पक्षीं कायम अटी मुक्रर होऊन ता. १७ रोजीं देवगांव येथें सह्या होऊन तहनामा पुरा झाला.

वऱ्हाडांत तहाची ही वाटाघाट चालू असतांच ग० ज० नें त्याजबद्दल विस्तृत समजुती व पदरांत पाडून घ्यावयाचे मुद्दे लांबलचक तयार करून ता. ११ डिसेंबर रोजीं कलकत्त्याहून लेक व वस्ली यांजकडे एकदमच रवाना केले. त्यांत तैनाती फौजेचें बंधन प्रत्येकाचे गळ्यांत अडकवावें असा मुख्य मुद्दा लॉर्ड वस्लीनें नमूद केला होता. परंतु त्या सूचना दाखल होण्यापूर्वीच भोसल्याचा तह पुरा झाला; आणि सिंद्याच्या तहांतही ती अट तूर्त सिद्धीस गेली नाहीं, याबद्दल ग० ज० ला बरेंच वैषम्य वाटलें. तरी होऊन गेलेल्या करारास मान्यता देणें त्यास भाग पडलें.

भोसल्याचा तह पुरा झाल्यानें वस्लीला आपला सर्व जोर सिंद्यावर योजितां आला. हा जोर तो असहाय दौलतराव कितीसा सहन करणार ? यशवंतराव घोरपडे, मुनशी कवलनयन, विठ्ठल महादेव, नारो हरि, हे चार वकील वस्लीकडे पाठवून नेहमींच्या धरसोडीचें तहाचें चऱ्हाट सिंद्यानें सुरू ठेविलें होतें. ता ८ डिसेंबर रोजीं वस्लीनें वकिलांस कळविलें, आम्हांस फक्त नुकसान भरपाई पाहिजे, दुसरें कांहीं नको.

वकील—आमचेंच नुकसान इंग्रजांनीं जास्त केलें आहे तें आधीं त्यांनीं भरून द्यावें.

वस्ली०—तुम्हींच युद्ध सुरू करून आम्हांस नुकसानींत आणिलें ( त्या संबंधानें पुष्कळ बोलाचाली झाल्यावर )

वस्ली०—पाठीमागच्या गोष्टी आतां सोडा, त्यांची वाटाघाट करण्यांत अर्थ नाहीं. एक गोष्ट निर्विवाद आहे कीं, युद्धांत तुम्ही हरलां व आम्ही जिंकलों, सबब आमचें नुकसान भरून देणें तुम्हांस भाग आहे.

यापुढची वाटाघाट ता. ११ डिसेंबर रोजीं झाली; आणि तीच पुढें ता. २४, २६ व २८ रोजीं चालून वस्लीच्या किमान अटी सिंद्यानें मान्य केल्या. ता. ३० रोजीं सूरजी अंजनगांव येथें सह्या* होऊन तह पुरा झाला. त्या अटी अशाः—

१ गंगा यमुनांच्या मधील दुआबाचा सिंद्यांचा सर्व प्रदेश, जयपुर, जोधपुरचा प्रदेश, गोहदच्या उत्तरेकडचा मुलूख, यमुनाकांठचा सर्व मुलूख, भडोच परगणा व त्याखालचा गुजरातेंतील प्रदेश, अहमदनगर किल्ला, अजिंठ्यापासून दक्षिणेस गोदावरी-पर्यंतचा प्रदेश, हे सर्व सिंद्यानें इंग्रजांस द्यावे.

२ दिल्लीचे बादशहावरचा ताबा सोडावा.

३ पेशवे, गायकवाड, निजाम व इंग्रजांनीं स्वतंत्र करार केलेले सरदार व मांड-लिक, यांजवरचे सर्व हक्क सिंद्यानें सोडून द्यावे.

४ फ्रेंच, अमेरिकन वगैरे इंग्रजांचे शत्रूंस सिंद्यानें आपले राज्यांत ठेवूं नये.

५ सिंद्यावर कोणी चालून आल्यास इंग्रजांनीं त्याचे संरक्षणास आपली फौज द्यावी. या अटी कबूल केल्यावर बऱ्हाणपुर, अशिरगड पावागड व दाहोद हीं स्थळें सिंद्यास वस्लीनें परत दिलीं.

वरील तहांत घेतलेल्या प्रदेशांपैकीं वऱ्हाड प्रान्त वस्लीनें निजामास देऊन टाकिला व अहमदनगर किल्ला पेशव्यास दिला. राजपूत राजे, गोहदकर राणा व अंबूजी इंगळे हे सिंद्याचे ताब्यांतून सुटून स्वतंत्र झाले. परंतु पुढें मांडलिकांचें हें कलम रद्द करण्यांत आलें.

**८ इंग्रजांची हलाखी व दौलतरावाची वंचना.**—दोन्ही तहांतील मतलब सूक्ष्म दृष्टीनें पाहिल्यास किरकोळ गोष्टींत सिंद्याचें मन खूष राखून, त्याचे हातपाय

* वरील चार वकिलांच्या सह्या मूळ कागदावर आहेत. ग्वालेर गझेटियर पृ. ३१५; पे. अ. पृ. १२४–१२९.

चांगले बांधले जातील असे सर्व प्रदेश से. वस्लीनें कबजांत घेतले, ही गोष्ट व्यक्त होते. महादजीची कन्या बाळाबाई शितोळे, गुरु मन्सूर साहेब, तहाचें बोलणें करणारा मुनसी कवलनयन, बुगाजी जामदार, आमदोजी जाधव व वरदाचार्य या लोकांस सिंद्याकडून पूर्वी जहागिरी होत्या, त्या त्यांजकडे अव्याहत चालविण्याचें वचन वस्लीनें दिलें. यावरून अनुमान होतें, कीं या मंडळींनीं तहाचे वेळीं वस्लीकडे वशिला लावून आपला मतलब त्या ठरावांत उगवून घेतला.

सिंद्यास बराचसा गोंजारून इतक्या लवकर हा तह वस्लीनें कां सिद्धीस नेला हें एक गूढ आहे. गोहदचे राण्याचें व अंबूजी इंगळ्याचें प्रकरण त्या वेळीं इंग्रजांकडे घाटत असून तें सिंद्यास जाचक होणार होतें. यशवंतराव होळकर उत्तरेंत जाऊन तिकडील मुलखांत दौलतरावास इंग्रजांविरुद्ध उठवूं लागला. वस्लीबंधूंस खर्चाची टंचाई अतिशय पडून ते घाबरे झाले. अमृतराव इंग्रजांशीं बिथरला, तेव्हां बाजीरावाचे जागीं त्यास पेशवाईवर आणण्याचा घाट चालू झाला. सबब तूर्त सिंद्याशीं मिटतें घेऊन वस्लीनें अडचणींत सांपडलेला आपला हात सोडवून घेतला; आणि यशवंतराव होळकरास अलग करून त्याचा सूड घेण्याची बाजीरावाची इच्छा होती तीस अप्रत्यक्ष भर दिली. या गोष्टी खालील उताऱ्यांत स्पष्ट दिसतात.

‘ सिंदे भोसले व इंग्रज यांजमध्यें तह व्हावयाचें कारण जे, अंबूजी इंगळे वगैरे हिंदुस्तानी फौज होळकर सुद्धां लखनौंत जाऊन तेथून कलकत्ता प्रान्तीं इंग्रजांचे मुलखांत दंगा मांडिला, व लखनौकर गव्हर्नर आग्र्याचे लढाईत पडले. यामुळें इंग्रजांची निम्मी बाजू खचली. मसलतीस आणीक वरीस दोन वर्षे लागण्याचा सुमार दिसूं लागला. तेव्हां हरतऱ्हा करून तिघां सरदारांचा व श्रीमंतांचा तह करून बचाव करावयाचे तजविजींत इंग्रज आहेत. विलायतेहून हुकूम आला जे, ‘मराठ्यांशीं बखेडा न करितां समेट करून श्रीरंगपट्टणास जावें. त्यावरून वस्लीनें समेट केला. बाजीरावास स्थापावें असें तहाचे वेळीं इंग्रजांचें बोलणें होतें. परंतु सिंदे व भोसले यांचा आग्रह, कीं चिमाजी आपास अथवा अमृतरावाचे मुलास स्थापावें. असें जाहलेस तह करूं, नाहीं तर करीत नाहीं. फराशीसांचाही नेट इंग्रजांस लागला, तेव्हां बोलणें मान्य करणें भाग पडलें. ( खरे ले. ६७५४ व ७४ )

‘ सिंद्याचे प्राचीन शेणवी सरदार पांचसात असामी ब्रह्मावर्तास होते. त्यांस सिंदे-होळकर व इंगळे यांनीं खातरजमेचीं पत्रें पाठवून लखबाचा मुलगा ( आबाजी? ),

जगोबा बापू व यशवंत शिवाजी यांस होळकरांनीं सर्फराजी करून रवाना केलें. होळकरांनीं जाठ, शीख, राठोड व कुल रजवाडे समशेर बहाद्दर सुद्धां एकत्र करून, सर्वांनीं मिळून दिल्लीस जाऊन दिल्लीचें संस्थान हस्तगत करून, इंग्रजांचें पारिपत्य करून पुढें लखनौस जाऊन गव्हर्नराचें पारिपत्य करावें हा बेत करून, समशेर बहाद्दर व इंगळे यांचे इतल्ल्यानें सर्वांनीं चालावें याप्रमाणें सिंदे, भोसले, होळकर त्रिवर्गांनीं ठरविलें. वस्लीच्या चित्तांत हरतऱ्हा करून तिघां सरदारांचा व श्रीमंतांचा तह करून आपला बचाव करून निघून जावें असें आहे.' (२४·११·१८०३.) 'इंग्रजांबरोबर अमृतराव पुण्यास येत आहेत-त्यांचा पक्ष टोपीकरांनीं धरला आहे. त्यामुळें श्रीमंतांचे चित्तांत अनेक प्रकारचे अंदेश आले आहेत. टोपीकरांचे मतें खूळ करून ठेवावें, हाच मनसबा आहे. बंधूंची एक. वाक्यता करून द्यावी असें त्यांचें म्हणणें, परंतु बाजरिावांचे दृष्टीस अमृतराव नकोत.' (डि. १८०३). यावरून सिंदे भोसल्यांस सर्वथा हैराण करून मग से० वस्लीनें तह केला असें नाहीं. बाजीराव कोणासच नको होता, त्यास काढून अमृतरावास पेशवाईवर आणण्याची थाप देऊन से० वस्लीनें अंगांवर आलेलें युद्ध आवरलें.

बाजीरावास अमृतराव नको होता, म्हणून त्यास आठ लक्षांची जहागीर देण्याचा ठराव करून, 'भिंगार येथें होते त्यांस इंग्रजांनीं काशीस रवाना केलें. अमृतरावाची व वस्लीची भेट होऊन परस्परें सफाईचे जाबसाल होऊन रावसाहेब निघून औरंगाबादेस वस्लीचे लष्करांत गेले. कुटुंब औरंगाबादेस होतें तें, विनायकराव व त्याची स्त्री व बहीण मैनाताई अशीं नगरचे किल्ल्यास पाठविलीं,' (ता. १·१२·१८०३). कर्जाचा पेंच, फौजेची वाताहत, उत्कृष्ट कमाईचा गमावलेला मुलूख, आणि हातांतून गेलेला बादशहाचा ताबा, या कारणांनीं दौलतराव एकदम उच्चासनावरून कोसळून विपत्तीच्या खड्ड्यांत पडला, त्यांतून तो वर उठला नाहीं. होळकर मात्र नुसता शाबूद नव्हे तर बलवान् झाला. राजपूत राजांवरचे होळकराचे हक्क कायम राहून दौलतरावाचे तेवढे नष्ट झाले. तेव्हां आतां यशवंतरावाचे तडाख्यांतून आपणास वांचवा अशीं आर्जवें तो रेसिडेंट माल्कमचीं करूं लागला. त्याची स्वतःची फौज नाहींशी झाल्यामुळें यशवंतरावापासून बचाव करण्याचें साधन त्यास राहिलें नाहीं. बाजीरावाची तर त्यास सारखी टोंचणी होती, कीं कसेंही करून होळकराचा निःपात करा. तहाच्या वाटाघाटींत हाच मुख्य मुद्दा सिंद्याचे वकील इंग्रजांशीं बोलत होते. म्हणजे आपण नाहींसे झालों, राज्य गेलें तरी चालेल, पण यशवंतरावानें वर डोकें करून नांदतां नये, असा बाजीरावाचा उद्देश होता. त्यावरून माल्कमकडे अहोरात्र

याचना करून सिंद्यानें सुर्जीअंजनगांवचे तहांत तैनाती फौजेचें नवीन कलम वाढवून ता. २७·२·१८०४ रोजीं बऱ्हाणपुर येथें पूर्वीचा तह बदलून घेतला. त्यांत ( १ ) बाजीरावाचें पेशवाई पद इंग्रजांनीं अढळ ठेवावें; व ( २ ) यशवंतराव होळकराचा पाडाव करण्यास त्यांनीं मदत करावी, अशीं कित्येक कलमें होतीं.

प्रिन्सेप म्हणतो, या तहानें दौलतराव सिंद्यानें आपले हातपाय जास्तच बांधून घेतले. इंग्रज सरकाराची परवानगी घेतल्याशिवाय आपण दुसऱ्या कोणाशीं स्नेह वगैरे जोडणार नाहीं असें त्यानें कबूल केलें, त्यावरून इंग्रजांनींही त्यास असा करार करून दिला कीं, ' तुमच्या राज्याच्या अंतर्व्यवस्थेंत आम्ही हात घालणार नाहीं, तुम्हास कोणी प्रतिस्पर्धी उत्पन्न होईल तर त्यास आम्ही मदत करणार नाहीं, उलट जे कोणी तुमच्या विरुद्ध दावा धरून उठतील त्यांचा आम्ही पाडाव करून तुमचा आधिकार चालू करून देऊं.' या ठरावानें इंग्रजांची मदत घेऊन मराठशाहींतील आपलें वजन पुनः पूर्ववत् स्थापन करूं अशी दौलतरावाची अपेक्षा होती, आणि ती पूर्ण होण्यास बाजीरावच त्यास पेशवाईवर हवा होता. तरी बरें, दौलतरावाचे हयातींतच बाजीरावाची उचलबांगडी झाल्याचें त्याच्या प्रत्ययास आलें.

संस्थानी राज्यकारभारांत या तहाचा आणखी एक अनिष्ट परिणाम असा झाला, कीं दौलतराव जे काय जुलूम किंवा अन्याय रयतेवर किंवा इतरांवर करील ते अंमलांत आणण्याची जवाबदारी इंग्रजांनीं पत्करिली. हिंदुस्थानांत शांतता नांदावी, न्यायनीतीचें राज्य सुरू व्हावें, लोकांस सुखशांति मिळावी हे जे उच्चहेतू ऐटीच्या सुंदर भाषेंत ग० ज० नें वारंवार पुकारले, ते सर्व कागदावर राहून पुढें अनवस्थाप्रसंग प्राप्त झाला. अन्यायानें वागणाऱ्या दुष्ट दौलतदारांस इंग्रजांचा आश्रय मिळून, बाजीराव, निजाम, अयोध्येचा वजीर व खुद्द दौलतराव सिंदे अशांची खासगी चैन वाटेल तशी चालण्याची सोय झाली, आणि पूर्वीचीं स्वेच्छाचारावरील बंधनें निघून गेलीं. हा प्रकार थोड्या फार अंशानें पुढें रूढ होऊन वसईच्या तहानें जी पेरणी वस्ली बंधूनीं केली, तिचें पीक अद्यापि आपण अनुभवीत आहों.

बऱ्हाणपुरच्या तहांत सिंद्याकडून नवीन मुलूख इंग्रजांनीं मागितला नाहीं. पूर्वी घेतलेल्या मुलखाच्या उत्पन्नांतून खर्च भागवून आपली तैनाती फौज सिंद्याचे मदतीस देण्याचें त्यांनीं कबूल केलें, आणि तैनाती फौजेचे सामान्य निर्बंध सिंद्यावर लादले.

सामील होऊं शकला नाहीं, आणि इंग्रजांस होळकरावर जय मिळाला. होळकरास सिंदे सामील झाला असता तर इंग्रजांचा निभाव लागला नसता. या दृष्टीनें बऱ्हाणपुरचा तह करण्यांत सिंद्याची सर्वस्वी घोडचूक झाली. त्यापेक्षां रघूजी भोसल्यानें प्रसंग ओळखून अज्ञातवासांत दडी मारली, तो मार्ग कांहीं तरी बरा होता. रघूजीस इंग्रज वारंवार विचारीत, 'आम्ही तुम्हांस शत्रु समजावें कीं मित्र समजावें ?' तो म्हणे, कांहींच समजूं नका, शत्रुत्व किंवा मित्रत्व दोन्ही प्रकार मी ओळखीत नाहीं.' ता. २७·१२·१८०३ च्या पुढील पत्रांत रघूजीची भावना व्यक्त होते. हें पत्र त्यानें स्वहस्तानें नारायणराव वैद्यास लिहिलेलें आहे. 'नारायणरावजी, तुम्हास माझें लिहिणें हेंच कीं जें करणें तें काळावर नजर देऊन केलें. त्यास आतां सर्व माझे तुम्ही जे सोबती आहां, त्यानीं धैर्य व मसलत चुकूं नये, हे तुमचीं व माझीं उभयांचीं बोलणीं जाहलींच होतीं. याप्रमाणें उद्योग असावा. तिघांतून एकाचा प्रकार तैसा जाहला. यासीं श्रीसत्ता प्रमान ! परंतु तुम्ही उभयतां आहां. तेव्हां धैर्य व मसलतीस न चुकतां वरचेवर इतला देत जावा; व भेट ही एखादे तऱ्हेनें सत्वर होईलच. फार काय लिहूं ? हे विनंति. मोर्तब सुद.'+

वस्ली बंधूंचा उपदव्याप हिंदी राष्ट्रास पुष्कळ काळ भोवला. इंग्रजी राजनीतीला कायमचें दूषण आलें; आणि या राष्ट्रास उन्नतीचा मार्ग सांपडण्यास अपरंपार अडचणी उत्पन्न झाल्या. मुख्य गोष्ट वाइटाचें संवर्धन व चांगल्याचें निर्मूलन असा वस्लींच्या पद्धतीचा कायम परिणाम होऊन बसला. पैशाच्या बाबतींत से० लेकचा बाणा निःस्वार्थी तरी होता. त्याचे खालील शब्द* स्मरणीय आहेत. 'पैशासंबंधानें माझ्या मनांत अत्यंत तिरस्कार वागत असून ही माझी वृत्ति सदैव कायम राहील अशी माझी खात्री आहे.' याच संबंधांत यशवंतराव होळकराचे प्रतिनिधीस लिहिलेले खालील उद्गार ध्यानांत ठेवण्याजोगे आहेत. 'आजपर्यंत हिंदु राज्य सर्वांनीं एकदील राहून चालविलें. आलीकडे ज्याचे त्याचे दौलतींत गृहकलह होऊन राज्यविपर्यास पडोन हिंदुधर्म नाहींसा होण्यास मूळ जाहलें. त्याचें छेदन करण्यास

---

\+ Wellesley Desp. Vol IV pp. 132–177; खंड १०–६५२.

* I have ever held money in most sovereign contempt, and shall I am sure do so to the end of my life. Well.'s Desp. Vol. III. Page 414.

सर्व एकदील झाले पाहिजेत, तर हिंदूंची कायमी राहील. आम्हीं जो क्रम इंग्रजांशीं लढण्याचा आरंभिला आहे, हाच यावद्देह चालवावा असें मनांत आहे. यांत परमेश्वर अनुकूल होऊन जें घडवील तें खरें. परंतु एकानेंच असा प्रकार करून बाकीच्यांनीं तमाशा पाहून आपापली दौलत सांभाळून असावें, यांतील परिणाम कसा हें चित्तीं विचारून ज्यांत हिंदुधर्माची कायमी व परिणामास नीट तें करावें. याचा विचार तुमच्यासारख्यांनीं न केला तर दुसरा कोण करील ? '

इंग्रजांनीं या युद्धास आपल्या लेखांत मराठ्यांशीं दुसरें युद्ध असें नांव दिलें आहे, तें थोडेंसें भ्रामक आहे. पहिलें युद्ध स. १७७४–८२ पावेतों चाललें तें सर्व मराठ्यांशीं झालें असें म्हणतां येईल. पण हल्लींचें युद्ध सर्व मराठ्यांशीं नव्हतें. छत्रपति पेशवे, पटवर्धन वगैरे पुष्कळशी मंडळी त्यांत पडली नव्हती. भोसले व सिंदे हे दोघेच काय ते लढले. पण मराठ्यांची सार्वभौम सत्ता या युद्धांत गेली अशा अर्थानें वरील नांव योग्य होईल. युद्धांत मराठ्यांचा पाडाव होण्यास दौलतरावाच्या खालील चुका कारण झाल्या असें ठोकळमानानें म्हणतां येतें. ( १ ) दौलतरावानें सर्व ठिकाणीं जागृत राहून आपल्या सेनाध्यक्षांस एका कर्तव्यशिस्तीनें वागविलें नाहीं. ( २ ) प्रथमच होळकराची समजूत काढून त्यास सामील करून घेतलें नाहीं. ( ३ ) तयारी पूर्ण होण्यापूर्वीच धिटाईचें बोलणें करून युद्ध अंगावर ओढून घेतलें. ( ४ ) होळकराचा सूड घेण्याच्या भावनेंत राज्याचा नाश करून घेतला. ( ५ ) पुण्यांत सहा वर्षें बाजीरावाच्या नादीं लागून उत्तरेंतील कारभाराकडे अत्यंत दुर्लक्ष केलें. ( ६ ) आसईच्या लढाईनंतर निकरानें पुण्यास येऊन बाजीरावास काढून, अमृतरावास पेशवाईवर आणण्याचा प्रयत्न त्यानें केला नाहीं. तथापि ही कारणपरंपरा ज्याच्या त्याच्या भावनेप्रमाणें बदलूं शकेल. आतां हे विचार मागाहून सुचतात हेंही दृष्टीआड करून चालणार नाहीं. जीं कारणें गूढ किंवा अज्ञात असून आपणांस सांगतां येत नाहींत त्यांस दैव असें सामान्य नांव आपण देतों, आणि ' दैवंचैवात्रपंचमम् ' हा गीतेंतील सिद्धान्त अबाधितच राहतो.

**९ बाजीराव अमृतरावांबद्दल वल्लीचा रिपोर्ट** (स.१८०३–०४).—एवढी प्रचंड राज्यक्रांति होऊन मराठी राज्याचा संहार झाला तरी बाजीरावाचें वर्तन कसें होतें त्याची खालील हकीकत आर्थर वेल्स्लीनें ग० ज० कडे लिहून पाठविली, ती अशी. ता. १५·१·१८०४. ' जवळच्या खास तैनातींतील मंडळीची बाजीरावानें कशी वाट लावली. हें सोबतच्या यादीवरून दिसून येईल. याशिवाय आणखी

पुष्कळांचे त्यानें हाल केले आहेत. अमृतरावानें अशा मंडळीची एक याद मला दिली, त्यावरून जुन्या एकनिष्ठ सेवकांचे त्यानें कसे हाल केले हें व्यक्त होतें. हल्लींच किती तरी मंडळी निरनिराळ्या किल्ल्यांवर नाहक कुजत पडली आहे. त्यांचा अपराध काय म्हणाल तर केवळ ते नानाफडणिसाच्या पक्षांतले, सारा जीव राज्याच्या सेवेंत घालविलेले. अमृतरावानें मला अशी मुद्दाम शिफारस केली कीं, जर पेशव्यांचें राज्य नीट चालावें अशी कंपनी सरकाराची मर्जी असेल तर आधीं या सर्व मंडळींना त्यांच्या यातनांतून सोडवा. मीं ही बाबत कर्नल क्लोज यांसही कळविली आहे. खरें म्हणाल तर, मेहेरबानसाहेब, पेशव्याचा कारभार आज केवळ नांवाचाच आहे. पुण्यापासून खुद्द पांच मैलांवर येथें कांहीं राज्य किंवा व्यवस्था आहे याची खूणसुद्धां मिळणार नाहीं. शेतें उद्ध्वस्त होऊन जंगलें वाढत आहेत, चोरांचा सुळसुळाट चाललाच आहे. स्वतः कोणताही कारभार करण्याची अक्कल पेशव्यास नाहीं, दुसऱ्या कोणावर त्याचा विश्वास नाहीं, आणि जवळची मंडळी सर्व बेवकूफ जमा झाली आहे. अमृतरावास कारभार करण्याची अक्कल व सामर्थ्य आहे, पण त्याजला तर बाजीराव अगदीं पाण्यांत पाहतो. आपल्या या भावाची दशा बाजीराव काय करील याचा थांग लागत नाहीं. मी त्या कामीं शिकस्त करून हताश झालों. हा भाऊ नुसता त्यास दृष्टीसमोर नको, मग त्यास कारभारांत घेण्याची काय कथा! तूर्त यास एकच मार्ग दिसतो तो हा कीं, कैदेंतील मंडळी बाजीरावाकडून आपण सोडवावी, आणि त्यांस पुनः नोकरींत घेऊन त्यांजकडून वसुलाचा तरी बंदोबस्त करवावा. अमृतरावाची त्याची गोडी न झाली, तरी त्यास योग्य नेमणूक देऊन दूर ठेवावें, आणि अशा रीतीनें पेशव्याचा कारभार सुधारण्यास आपण शक्य तितकी मदत करावी.

‘पेशव्यास आपण स्पष्ट शब्दांनीं असें कळविलें पाहिजे, कीं लहानांपासून थोरांपर्यंत असा एकही इसम तुमचे राज्यांत नाहीं कीं ज्याचा तुमचेवर विश्वास आहे, किंवा जो कंपनीसरकाराचे मध्यस्थीशिवाय तुमच्याशीं यत्किंचित् संबंध ठेवूं इच्छील. कोणत्याही कामांत प्रत्येकजण आमच्या सरकाराची जामिनगिरी चाहतो. मुख्यतः वसुलाची व न्यायनिवाड्याची व्यवस्था राज्यांत प्रथम झाली पाहिजे. ही व्यवस्था सुडाची भावना त्यानें मनांतून साफ काढून टाकल्याशिवाय होणार नाहीं. न्यायाच्या मार्गानें चालण्याची इच्छा तो धरील तर मी त्याचा कारभार हां हां म्हणतां सुधारून देईन. नाहीं तर चहूंकडे बंडें होऊन मुलखाची राखरांगोळी होईल, आणि त्याचा परिणाम पुढें आम्हांसही भोगावा लागेल.

'वेड्यावांकड्या गोष्टी मी त्यास करूं देत नाहीं, म्हणून मजवरही तो अतिशय चिडलेला आहे. तोंडावर गोड बोलून माझी समजूत पाडतो, पण माझी पाठ फिरतांच लगेच उलट वागूं लागतो. त्याला वाटतें, मीच ( वेल्स्ली ) काय तो कंपनीसरकारांत एक कांटा आहें. माझ्यामुळें बाजीरावाच्या कारभारास अडथळा येत असेल तर, शक्य तितक्या त्वरेनें माझी येथून बदली करा. म्हणजे तरी बाजीरावाचा विश्वास पटून त्याचा कारभार चालीस लागो. कारण मी बाजीरावाकडे शिफारस केल्यामुळेंच जर लोकांचें नुकसान होऊं लागलें, तर मग कंपनीसरकाराची लोकांत इभ्रत ती काय राहिली ! कामाची निरवानिरव करून मी शक्य तितक्या लौकर येथून चालतें व्हावें यांतच उभय पक्षीं फायदा आहे. बाजीरावासंबंधानें माझें अत्यंत वाईट मत बनलें आहे यांत शंका नाहीं. त्याला शब्दाची किंमत नाहीं कीं जनांची लाज नाहीं. स्वभाव तर इतका खुनशी व दुष्ट आहे कीं कांहीं पुसूं नये. कपटविद्येंतही तो पूर्ण निष्णात आहे. वसईचा करार केल्या दिवसापासून आज एका वर्षांत त्यानें स्वतःच्या हिताची किंवा आम्हीं सुचविलेली एकही गोष्ट केली असेल तर शपथ. मग असला गृहस्थ राज्यावर ठेवणें युक्त आहे काय, असें मला विचाराल तर माझें उत्तर इतकेंच, कीं या गोष्टीस नाइलाज आहे. मला दुसरा मार्गच दिसत नाहीं. आतांच सर्व राज्य आपण ताब्यांत घ्यावें तर भयंकर युद्ध माजून विश्वासघाताचें पाप आमचे माथीं येईल. चिमाजी किंवा अमृतराव यांपैकीं कोणास तरी दिवाण नेमून त्याजकडून कारभार घ्यावा असें कदाचित् ठरवितां येईल, पण त्यामुळें बाजीरावाची सुडाची भावना कशी नाहींशी होणार ! खरें म्हटलें तर तिघां बंधूंत अमृतरावच शहाणा व राज्य सांभाळ-ण्यास लायक आहे, आणि त्यासच आपण पेशवाईवर आणावा तर, पुढें कधीं काळीं न होऊन जर तो आमच्याशीं वांकडा झाला तर, तो आपल्या राज्यास एक नवीनच कांटा उत्पन्न झाला असें समजा. त्यापेक्षां हल्लींचा बाजीरावच शतपट बरा.'

अमृतराव व होळकर पुण्यास पेशवाईचा जम बसवीत होते, त्यांसच साह्य करून त्यांजकडून बाजीरावाची कांहीं तरी स्वतंत्र व्यवस्था ठरवून घेणें इंग्रजांस शक्य होतें. या योगानें युद्ध टळून मराठ्यांचें राज्य इतक्या लवकर घसरलें नसतें. सिंदे व भोसले यांस पुण्यांत आणून सर्व मराठे सरदारांची एकी इंग्रजांस घडवून आणतां आली असती. हा प्रकार बाजूस ठेवून, झालें तें झालें असें समजून इंग्रज जरा तटस्थ राहते, तरी देखील मराठमंडळास आपलें घर सुधारण्याची संधि मिळाली असती. अमृतराव व यशवंतराव हे दोघेही उत्साही व तरुण असून कोणाच्याही वाइटावर नव्हते. पूर्व चालीस

अनुसरून मराठी राज्य व्यवस्थित चालावें अशीच दोघांना कळकळ वाटत होती. एक राज्यकारभारांत हुशार तर दुसरा लष्करी बाबतींत निष्णात, अशी जोड त्या पडत्या काळांत यदृच्छेनें जमून आली होती. बाजीरावास धास्ती वाटे त्याचें बीज हें. इंग्रजांचें मुख्य कर्तव्य म्हणजे तिऱ्हाइताप्रमाणें वागून पुण्यास सर्वांची एकवाक्यता करून मराठी राज्य संभाळायचें. त्या ऐवजीं वेल्स्ली बंधूनीं बाजीरावास वसईच्या कोपऱ्यांत गांठून सर्वच गिळण्याचा उद्योग आरंभिला. कर्नाटकांतले जहागीरदार बाजीरावास प्रतिकूळ आहेत हें ओळखून, त्यांच्याशीं स्नेह जोडून त्यांस आर्थर वेल्स्लीनें बाजीरावापासून अलग केलें. नंतर अमृतराव आपल्या जिवाच्या पेंचांत पडलेला असतां त्यास स्वतंत्र जहागिरीचें आश्वासन देऊन दोघां भावांत कायम फूट पाडिली. पुढें होळकर हा सिंदे-भोसल्यांस सामील होतो असा देखावा दिसतांच, परभारें अमृतरावाकडून सिंद्याचें कपटपत्र होळकरास पोंचविलें. त्याबरोबर होळकर साफ बिथरला आणि राज्याची चिंता सोडून थेट आपल्या स्वतंत्र पंथास लागला. सिंदे भोसल्याशीं लढत असतां वेल्स्ली बंधू होळकराच्या वाटेस बिलकूल गेले नाहींत. उलट त्यास गोंजारून त्याची मनधरणीच करीत होते. पण भोसले-सिंद्यांचा पाडाव होऊन आठ दिवस गेले नाहींत, तोंच वेल्स्लीनें नरम धमकीचें नाजूक पत्र त्यास लिहून इशारा दिला, कीं अतःपर तुम्ही दुसऱ्या कोणाच्या वाटेस जाल तर तें आम्हांस खपणार नाहीं. ही धमकी न जुमानतां यशवंत-रावानें आपल्या स्वभावानुरूप इंग्रजांशीं दोन वर्षें एकट्यानें युद्ध चालवून इंग्रजांस इतकें दमविलें, कीं इंग्लंडांतील हुकमानें वेल्स्ली बंधूंची तेथून उचलबांगडी झाली. पण होळकर एकटा लढत असतां इतर मराठ्यांनीं त्यास साह्य केलें नाहीं; आणि खुद्द बाजीराव तर सुडाच्या भावनेनें इतका अंध झाला होता कीं, होळकराचा पाडाव होत असतां त्यास आनंदाच्या लहरी येत होत्या.

सिंदे भोसल्यांस नरम केल्यावर होळकरास धमकी देऊन वेल्स्ली पुण्याचे बंदोबस्तास परत आला. तेथें स० १८०४ च्या मार्च महिन्यांत बाजीरावाची गांठ घेऊन आणि हिराबागेंत त्याजकडील मेजवानी खाऊन तो व कर्नेल क्लोज मुंबईस गव्हर्नराचे भेटीस गेले, आणि तेथें दोन महिने त्यांची पुढील व्यवस्थेबद्दल भरपूर वाटाघाट झाली. मे अखेर वेल्स्ली परत पुण्यास आला. पुण्यास ४ मार्च १८०४ रोजीं सदाशिव माणकेश्वराचें व वेल्स्लीचें पुष्कळ बोलणें झालें होतें, त्याची हकीकत त्यानें कलकत्त्यास लिहून कळविली, तींत तो लिहितो. ' सदाशिव माणकेश्वरानें मला विचारिलें एवढी तुम्ही लढाई मारलीत, पण बंडखोरांचें पारपत्य तर कांहींच केलेंत नाहीं, याचा अर्थ

काय ? बाजीरावानें आपलीं कामें सिद्धीस नेण्याकरितां कंपनीसरकारास मुलूख व पैसा देऊन इंग्रजी फौज मदतीस आणली, त्या फौजेनें पेशव्याचे मित्रांचाच तेवढा तुम्हीं पाडाव केला, आणि बंडखोर शत्रू तर तसेच राहिले यास काय म्हणावें ! मी त्यास विचारलें, कोणते शत्रु पाडाव केल्याशिवाय राहिले त्यांचीं नांवें सांगा. तो म्हणाला, मुख्य अमृतराव व दुसरे दंगेखोर तर अद्यापि तसेच आहेत. अमृतरावासंबंधानें तर त्यानें मोठेंच आख्यान केलें. तो म्हणाला, या अमृतरावाबद्दल बाजीरावास एवढी चीड वाटते कीं, त्याचें नुसतें नांव कोणीं घेतलें तरी स्नान करावें असें त्यास वाटतें.' यापुढें वेल्स्ली लिहितो.—'बाजीरावाचा हव्यास काय तो एकच कीं कोणत्या ना कोणत्या उपायानें पैसे उकळावे. कशासाठीं, तर राज्याच्या किंवा लोकांच्या उपयोगासाठीं नव्हे, किंवा शत्रूंचा पाडाव करावा म्हणून नव्हे, तर केवळ स्वतःची चैन व ख्यालीखुशाली एवढ्याचसाठीं त्यास हा पैशाचा घोष लागलेला आहे.' बाजीरावाच्या एकंदर वर्तनासंबंधानें आर्थर वेल्स्लीनें ग० ज० कडे विस्तृत अहवाल लिहून पाठविला तो अवश्य वाचण्यालायक आहे. ( ले. २१८, से० वेल्स्लीचे खलिते. )

---

# प्रकरण दहावें

## होळकरानें इंग्रजांस दमविलें

१ होळकराशीं इंग्रजांचा बेबनाव. २ होळकराची हाव व उद्योग.
३ मुकुंदरा खिंडींत मॉन्सनची वाताहत. ४ यशवंतरावाची दुआबांत स्वारी.
५ रणजितसिंग जाठ. ६ निजाम दरबाराचा इंग्रजांस विरोध.
७ अंबूजी इंगळ्यास स्वतंत्र राज्याचें आमिष. ८ भरतपुरचें प्रचंड युद्ध व जाठाशीं तह.

**१ होळकराशीं इंग्रजांचा बेबनाव** ( फेब्रुवारी–एप्रिल १८०४ ).—सिंदे-भोसल्यांशीं युद्ध चालू असेपर्यंत इंग्रज होळकराच्या वाटेस गेले नाहींत हें वर सांगितलेंच आहे. खुद्द त्याचें मन द्विधा झालें होतें. बाजीरावाचा व दौलतरावाचा होळकरास बिलकूल विश्वास वाटत नव्हता. तसेंच सिंदे भोसल्यांचा इतका लवकर पाडाव होऊन इंग्रजांचें वर्चस्व सिद्ध होईल अशीही त्यास अटकळ नव्हती. औरंगाबादेंतून त्यानें लूट जमा केली त्याबद्दल से० वस्लीनें त्यास आपली नापसंती दर्शविली नाहीं.

स. १८०३ च्या ऑक्टोबरांत सिंद्याच्या उज्जनींतून कांहीं पैसा गोळा करून पुढें डिसेंबरांत तो जयपुरावर गेला. जयपुरच्या राजानें यापूर्वीच इंग्रजांचा आश्रय केला होता. तरी होळकराचाही तेथून वार्षिक खंडणी गोळा करण्याचा हक्क होताच. त्यानें लॉर्ड लेक यास गोड पत्र लिहून असें कळविलें, कीं 'इंग्रजांशीं वांकडें वर्तन करण्याची मला बिलकूल इच्छा नाहीं. उलट मी आपली मैत्री चाहतों.' इकडे याच वेळीं त्यानें माचेडीकर रावराजाला पत्र लिहून इंग्रजांचे विरुद्ध उठण्याचा सल्ला दिला, तेंच पत्र रावराजानें से० लेक यास दाखविलें. अशा रीतीनें हळूहळू होळकराची दुटप्पी वागणूक चोहोंकडून इंग्रजांचे नजरेस येऊं लागली. यामुळें सिंद्याचें युद्ध संपल्यावरही आपल्या फौजा परत ठिकठिकाणीं छावणींत नेणें लेक यास इष्ट वाटलें नाहीं. इंग्रजांविरुद्ध एतद्देशीयांस उठविण्याचे होळकराचे प्रयत्न अनेक ठिकाणीं इंग्रजांस दिसले. ता. २१·१·१८०४ रोजीं यशवंतरावानें आपला नागपुरचा वकील खंडो महादेव यास कळविलें, कीं 'तुमची रवानगी रघूजी भोसले व दौलतराव यांजकडे केली, त्यावर तुमचीं पत्रें आलीं त्यांचीं उत्तरें इंदूर येथून पाठविलीं तीं पोंचलींच असतील. अलीकडे विश्वनाथ उमाजी शहापुऱ्याचे मुकामीं येऊन दाखल झाले. भेटी होऊन बोलण्याचे भाव सांगितले, त्यावरून संतोष झाला. येथें मसलतीचा प्रसंग. येथील एक संधान राहून शत्रूचें पारिपत्य होऊन बंदोबस्त झाला पाहिजे या अन्वयें तुम्हीही बोलून ज्यांत त्यांची कायमी पूर्वीप्रमाणें राहून मसलत शेवटास जाऊन स्वराज्याचा बंदोबस्त घडून हिंदुधर्म राहील तें करणें. अंबूजी इंगळ्याचे कुमकेस मीरखान यांस जाण्याविषयीं लिहिलें आहे. आम्हीं अजमीरचे सुमारास जाऊन जोधपुरकरांचें संधान पक्कें केलें आहे. त्यांची फौज सामील करून घेऊन सडे होऊन करोलीचे सुमारें जातों. तेथें अंबूजी इंगळ्यांना बोलावून घेऊन पुढील मसलतीचा नक्षा ठरवून त्याप्रमाणें गांठ घालून शत्रूचा मुकाबला घेतों. कोणी कांहीं लिहितील व बोलतील त्याचे संशय मनांत येऊं न देतां, कायमी राहून ज्यांत एकदिलीनें मसलत शेवटास जाऊन बंदोबस्त घडे तें करणें.' ‡

से० लेकनें होळकराच्या सर्व हालचाली ग० ज० स लिहून कळविल्या; आणि पुढें काय मसलत योजावी त्याचा खुलासा मागितला. तिकडून लिहून आलें, कीं 'यशवंतरावास तुम्ही एकदां निक्षून कळवा, कीं तुमच्या वाटेस जाण्याची आमची इच्छा नाहीं.

---

‡ रुमाल ३. २२४–२२६. खंडो महादेवाचे कुटुंबाचा पत्ता आढळत नाहीं.

मात्र तुम्हीं आमची अगर आमच्याशीं तहानें बद्ध झालेल्या रजवाड्यांची आगळिक केल्यास ती आम्हांस बिलकूल खपणार नाहीं. ' अशा आशयाचें पत्र २९·१·१८०४ रोजीं लॉर्ड लेकनें यशवंतरावास लिहिलें, आणि त्यांत असेंही कळविलें, कीं तुम्हांस आमच्याशीं समेट राखावा असें वाटत असेल तर हल्लींची युद्धाची तयारी सोडून बोलणें करण्यासाठीं वकील आमच्याकडे पाठवा. या पत्राचे पाठोपाठ लेक आपली फौज घेऊन होळकराचे अंगावर हिंडौन येथें आला. चोहोंकडे नजर ठेवण्यास हें ठिकाण योग्य होतें. ता. २८·२·१८०४ रोजीं कारभारी विठ्ठल महादेव हाळकरास लिहितो, ' आपसांतील फुटीमुळें नानाप्रकारचीं वर्तमानें येतात, येणें करून मसलतीस पायबंद पडतो. याचें मनन राखून तूर्त समेट घालून क्रम चालवावा. दुर्जेनांनीं ( Drugen ) दौलतींत बखेडे करून पलटणवाल्यांस सामील करून घेऊन अनेक तंटे करतात. आमची पराकाष्ठा तोंपर्यंत कायावाचा मनें करून लाखो रुपयांचे सावकारांचे देण्यांत राहोन उपयोग पडण्यास कमी नाहीं. प्राणांत प्राण आहे तों पर्यंत दौलतींत चाकरी करण्यास सिद्धच आहें. '

से० लेकनें होळकरास पत्र पाठविलें, त्याचा जबाब २७·२·१८०४ रोजीं आला, त्यांत त्यानें कळविलें कीं, ' तुमच्या सूचनेप्रमाणें आम्ही आपल्या फौजा घेऊन परत जातों; आणि वकीलही तुमचे भेटीस पाठवितों. ' इकडे याच वेळीं होळकरानें इंग्रजां-विरुद्ध रजवाड्यांस पत्रें लिहिलीं, तीं इंग्रजांस सांपडून पुनः लेकनें त्यास ताकीद दिली. त्यावर १६ मार्च रोजीं होळकराचे दोन वकील लॉर्ड लेकच्या छावणींत हजर झाले. त्यांनीं होळकराच्या मागण्या कळविल्या त्या अशाः—( १ ) रजवाड्यांकडून चौथाई वसूल करण्याचा चालत आलेला आमचा हक्क इंग्रजांनीं मान्य ठेवावा; ( २ ) दुआबांत बारा परगणे, बुंदेलखंडांत एक परगणा, तसेंच इटावा आणि हर्योना हे परगणे आमचे आहेत ते आमच्याकडे चालवावेत; आणि ( ३ ) सिंद्याशीं ज्या अटीवर तह झाला आहे तशाच अटींवर आमच्याशीं तह करावा. या मागण्या लेकला चढेलपणाच्या वाटल्या, सबब त्या अमान्य करून वकिलांना दरडावणी देऊन त्यानें परत पाठविलें; आणि पुनः होळकरास पत्र लिहून कळविलें कीं, ' आम्हांस मान्य होतील अशाच अटी लिहून कळवा; आणि संपूर्ण अधिकार दिलेला तुमचे विश्वासाचा इसम तह करण्यास पाठवा ?' लेकशीं ही वाटाघाट चालू असतां त्याच वेळीं होळकरानें दक्षिणेंत से० वस्लीला पत्र लिहून तिकडचे कांहीं परगणे पूर्वी होळकरांचे ताब्यांत असलेले त्यानें परत मागितले; आणि त्याच पत्रांत अशी धमकावणी दिली कीं,

' समरांगणावर जरी तुमच्या तोफखान्यापुढें माझा इलाज चालत नसला, तरी शेंकडों मैलांच्या दौडी मारून अल्पावकाशांत दूरदूरचे प्रदेश जाळून लुटून टाकण्याचें सामर्थ्य मला आहे. तुम्हांस एका क्षणाची विश्रांति मी घेऊं देणार नाहीं. एकदां समुद्राच्या लाटांप्रमाणें होळकराच्या फौजा देशभर लोटूं लागल्या, म्हणजे लाखों प्राण्यांचा संहार होईल. त्यांजला विरोध करण्याची छाती कोणालाही होणार नाहीं. ' या दांडगाईच्या उत्तरानें इंग्रजांची खात्रीच झाली कीं होळकराशीं आतां युद्ध केल्याशिवाय परिणाम नाहीं. *

नवरोज अलीखान व सुलतान बक्ष हे आपले दोन वकील यशवंतरावानें से० लेक याजकडे बोलणें करण्यास पाठविले होते, त्यांजबरोबर त्यास ता. ४-४-१८०४ चा जबाब आला, कीं 'तुम्हीं प्रथम आपल्या हद्दींत निघून जा. असे फौजा घेऊन बाहेर हिंडूं नका, म्हणजे तुमचा आमचा तंटा होणार नाहीं; आणि जे काय लढे असतील ते तडजोडीनें मिटवितां येतील. हल्लीं तुम्ही जयपुरचे हद्दींत आहां. जयपुरचा राजा आमचा दोस्त आहे, त्याचें संरक्षण करणें आमचें कर्तव्य आहे. तोंडानें मात्र तुम्हीं समेटाच्या गोष्टी बोलतां, परंतु कृति अगदीं उलट चालली आहे. तुमचे बक्षी भवानी शंकर यांनीं कॅ० गार्डिनर यांस पत्रें लिहिलीं आहेत त्यांचा आशय तुम्हास मान्य असेल, तर कंपनीसरकाराशीं तुम्ही दोस्ती राखूं चाहतां हें तुमचें म्हणणें क्षणभरही कबूल करतां येण्यासारखें नाहीं. तुम्ही भलत्याच मागण्या केल्या आहेत, त्या आम्हांस मान्य करतां येणार नाहींत. अद्यापि तुम्हीं योग्य विचार करून आमचा सल्ला ऐकावा, यांतच तुमचें हित आहे. ' वर सांगितलेला कॅ० गार्डिनर हा पूर्वी होळकराचे व जयपुरचे नोकरींत होता. त्यावरून त्याची व भवानीशंकराची दाट ओळख होती. हल्लीं तो होळकराची नोकरी सोडून लेक यास मिळाला होता. तेव्हां त्याचेच मार्फत होळकराशीं इंग्रजांनीं ही तहाची वाटाघाट चालविली. यशवंतराव या वेळीं यात्रेचें निमित्त करून पुष्कर तेथें सिंद्याचे हद्दींत उतरला, आणि त्याची फौज अजमीर लुटून जयपुरचे हद्दींत गेली. सिंद्याचा मुलूख तर तो आज वर्षभर लुटीतच होता. यशवंतरावाचें हें वर्तन सिंद्यास अतिशय दुस्सह झालें. इंग्रजांपुढें आपणांस मात्र नमून वागण्याचा प्रसंग यावा, आणि होळकरानें पूर्वीचे आपले ढंग तसेच चालू ठेवावे ही गोष्ट सिंद्यास कशी खपावी? दौलतरावाचें जें बोलणें रेसिडंट माल्कमशीं या वेळीं होई, त्यांत यशवंतरावाच्या या वर्तनाची

---

* Wells. Desp. IV. pp. 5-52, 107; भालेराव ले. ७.

सारखी तक्रार त्यानें चालविली होती. दौलतराव म्हणाला, ‘ गुदस्तां भोसल्याचे मार्फत यशवंतरावाची समजूत घालून आम्ही आणाशपथा घेऊन करार केले, त्यांतलें एक अक्षरही यशवंतरावानें पाळलें नाहीं. हा दरोडे घालून पाहिजे तशी बंडखोरी करीत स्वच्छंदानें हिंडत जातो. वास्तविक याचा होळकरांचे दौलतीवर कांहीं एक हक्क नसतांही, आम्हीं त्याच्याशीं करार करून दौलतीवरचा त्याचा हक्क मान्य केला आहे. असें असूनही तो गैरवर्तन करतो तर त्याचा बंदोबस्त करणें इंग्रजांचें कर्तव्य आहे.’

याच वेळीं यशवंतरावानें आपले वकील बऱ्हाणपुरास सिंद्याकडे पाठवून विनंति केली, कीं इंग्रजांचा पाडाव करण्यासाठीं तुम्हीं आम्हांस सामील व्हावें ता. ५·३·१८०४ रोजीं ते वकील सिंद्याकडे आले. पण एकवार युद्धांत हात चांगलेच पोळले असल्यामुळें पुनः त्यांत पडण्याची सिंद्यास बिलकूल इच्छा नव्हती. त्याच्या मनांतली उत्कंठा एकच. यशवंतरावाचा स्वैर संचार बंद व्हावा, आणि आपला अधिकार पूर्ववत् चालावा. असा विचार करून दौलतरावानें आपला वकील यशवंतरावाकडे पाठवून त्यास कळविलें कीं, ‘ तुमचा आमचा सलूख राहवा अशी इच्छा असेल तर तुम्हीं आमच्या मुलुखास बिल्कूल उपद्रव देऊं नये. नाहीं तर आम्हांस तुमच्यावर शस्त्र उचलण्याचा प्रसंग आल्याशिवाय राहणार नाहीं. ’ सिंद्याचा हा वकील तारीख ३·३·१८०४ रोजीं होळकराकडे येऊन दाखल झाला. त्यास होळकरानें गुप्तपणें भेटून कळविलें कीं, ‘ सिंद्याचें यत्किंचित् अहित करण्याचा माझा इरादा नाहीं. इंग्रजांस नरम करावें येवढाच माझा हेतु आहे. इंग्रजांनीं मराठ्यांचें राज्य बुडविलें त्याचा प्रतिकार करणें हेंच अत्यंत निकडीचें माझें काम असून त्यासाठीं तुमचें अजमीरचें ठाणें मला तात्पुरतें ताब्यांत घेणें जरूर वाटलें. तें स्थळ जोधपुरकरांस देऊन त्यांची मदत मीं मिळविली आहे. युद्ध संपल्यावर तुमचें अजमीर स्थळ तुम्हांस पूर्ववत् परत मिळेल.’

स. १८०४ च्या उन्हाळ्यांत यशवंतरावाचे बेत काय चालले होते त्यांचें वर्णन खालील पत्रांत आहे. ‘ यशवंतराव होळकर सांबरच्या किल्ल्यानजीक व जयपुरनजीक मुक्काम करून होते. त्यास जयपुर प्रांत बेचिराख करून पंचवीस लाख खंडणी घेऊन तेथून सडी फौज करून घोडा राऊत निवडक लाख सवालाख पावेतों बरोबर घेऊन कोट्यास दाखल झाले. पुढें पूर्वेस बंगाला वगैरे मुलूख आहे तिकडे जाऊन खंडण्या घ्याव्या, इंग्रजांनीं पिच्छा केला असतां बंगाल्यांतून भोसले व नबाब यांच्या मुलखां-तून आर्काट, चेनापट्टण व श्रीरंगपट्टण इकडे यावें हा बेत आहे. अथवा इंग्रजांनीं पिच्छा न केला तर छावणी कोटा अगर गढेमंडळ प्रांतीं करावी हा बेत आहे. कबिले,

तोफखाना वगैरे भारी अजबाब मारवाडांत ठेऊन तेथें हरनाथसिंग व नागो जिवाजी पंचवीस तीस हजार फौजेनिशीं आहेत. शिवाय मीरखान पठाण वीस हजार फौजेनिशीं अजमेर प्रांतीं आहे. जीवलाल वगैरे तीन सरदार चांदवड नजीक दहाबारा हजार जमाव करून दंगा करितात. काशीराव होळकर थाल्नेरा नजीक दोन हजार फौजेनशीं होते, त्यास जीवलालसिंग यांनीं दौड करून काशीरावास धरून फौज लुटली. ' ( ख. ६८३४. )

हे सर्व प्रकार इंग्रज पूर्णपणें जाणत होते. होळकरानें जवळ मोठी फौज बाळगिली होती आणि तिचा खर्च चालण्यास लुटीशिवाय दुसरें साधन नव्हतें. त्यांत इंग्रजांची दोस्ती पत्करलेले राजपूत संस्थानिक होते, त्यांचें रक्षण करणें इंग्रजांस भाग होतें. शिवाय जयपुर सारख्यांस लुटून त्या पैशावर यशवंतराव फौज वाढवील तर पुढें तो आपणांस फारच भारी होईल असें इंग्रजांस वाटलें. सिंदे भोंसल्यांकडे पूर्वी मोठाल्या फौजा होत्या त्या आतां रजा मिळून पोटासाठीं यशवंतरावाकडे येऊन नोकरीस राहिल्या. ही एकंदर परिस्थिति से० लेकनें ग० ज० यास कळविल्यावर त्यानें लगेच होळकराशीं युद्ध सुरू करण्याचे हुकूम ता. १६·४·१८०४ रोजीं सोडिले. दक्षिणेंत चांदवड हें होळकराचें मुख्य ठिकाण असून खानदेशांतही त्याचा मुलूख होता. हीं ठिकाणें काबीज करण्यांत खर्च व त्रास पुष्कळ पडणारा असल्यामुळें से० वस्लीनें असें सुचविलें, कीं क० मरेनें गुजरातची फौज घेऊन माळव्यावर चालून जावें, म्हणजे तेथें त्यास सिंद्याची मदत येईल सिंद्यानेंही उज्जनीवर ही मदत पाठविण्याचें मोठ्या खुषीनें मान्य केलें, पण त्याप्रमाणें पुढें वर्तन मात्र घडलें नाहीं. अद्यापि दौलतरावाचें चित्त संशयग्रस्त होतें. यशवंतरावाचा पाडाव करण्यास जरी तो उत्सुक होता, तरी इंग्रज सत्ता कायम होणें त्यास पसंत नव्हतें. यास्तव कोणताही निश्चित मार्ग त्यानें स्वीकारला नाहीं. पूर्वीच्या त्याच्या गैरवागणुकींत ही आणखी नवीन भर पडली.

पुण्यास बाजीरावाचीही होळकराचे बाबतींत कुचंबणा होऊं लागली. आनंदराव होळकर नांवाचा यशवंतरावाचा एक नातेवाईक पुण्यास पेशव्याचे दरबारीं राहून यशवंतरावाचें संधान संभाळीत होता, आणि बाजीरावाचा कारभार सदाशिव माणकेश्वर पाहत असे. होळकराचें इंग्रजांशीं युद्ध सुरू झालें, तेव्हां सदाशिव माणकेश्वर व आनंदराव होळकर यांचीं पुण्यास दररोज गुप्त खलबतें सुरू झालीं. तेव्हां रेसिडेंटास संशय आला कीं बाजीराव स्वतः यशवंतरावाचा पुरस्कार करीत असावा. त्याबद्दल रेसिडेन्टानें पेशव्यास जाब विचारला. त्याबरोबर पेशव्याची

घाबरगुंडी उडाली. त्यानें जबाब दिला कीं, ‘ आनंदराव हा यशवंतरावाचा मनुष्य नव्हे. त्याचें व यशवंतरावाचें वांकडें आहे. उलट पक्षीं तो काशीरावास होळकराची दौलत देण्यासंबंधानें पुण्यांत राहून खटपट करीत आहे. इंग्रजांनीं जर यशवंतरावाचा मुलूख जिंकला तर तो त्यांनीं आपला आपणास परत द्यावा, अशी काशीरावाची मागणी आहे; आणि हाच उद्योग आनंदराव येथें बसून करीत आहे. तथापि मी आनंदरावास पुण्यांतून काढून लावितों.’ यशवंतरावाच्या प्रस्तुतच्या उठावणींत दुसऱ्या अनेक प्रकरणांचे धागे गुंतलेले होते. यशवंतराव सारा कारभार खंडेरावाचे नांवानें करीत होता. पण दौलतीचा नामधारी मालकी काशीरावाकडे होती. काशीरावास धास्ती पडली कीं, यशवंतरावाचा जय झाला तर अर्थातच आपण भिकेस लागणार; बरें त्याचा पाडाव झाला तरी होळकरी दौलत इंग्रज हस्तगत करणार. अशा स्थितींत होळकरांचा मुलूख इंग्रजांनीं यशवंतरावाकडून जिंकल्यावर तो आपला आपणांस परत द्यावा, अशी मागणी काशीरावानें रेसिडेंट क्लोजकडे केली. त्यानें हें प्रकरण ग० ज० कडे पाठविलें. ग० ज० नें निकाल दिला कीं, ‘एका लुच्च्याचें राज्य घेऊन दुसऱ्या लुच्च्यास द्यावें हा न्याय कोठला ? होळकराच्या दौलतीची व्यवस्था पुढें काय करावयाची तें ठरविण्याचा हक्क इंग्रज सरकाराचा आहे; आणि प्रसंग येईल तेव्हां ते त्याचा निकाल योग्य तोच करतील.’

स. १८०४ च्या उन्हाळ्यांत इंग्रजांचें होळकराशीं युद्ध सुरू झालें, तेव्हां दौलतराव सिंदे बऱ्हाणपुरास होता. त्यास धास्ती पडली कीं होळकर एकदम धाड घालून आपलें उज्जनी शहर हस्तगत करील. उज्जनीच्या आजूबाजूसच होळकर घिरट्या घालीत होता सिंद्यानें ही आपली चिंता रेसिडेंटाकडे व्यक्त करतांच त्यानें त्यास आश्वासन दिलें, कीं तुम्हीं उज्जनीबद्दल बिलकूल चिंता करूं नये. गुजराथेंत क० मेरे याचे हाताखालीं बरीच फौज सज्ज होती, तिला त्यानें लगोलाग हुकूम पाठविला कीं, ‘ तुम्हीं एकदम परभारें माळव्यावर चालून जावें, आणि उज्जनीस ठाणें देऊन राहवें.’ दक्षिणची व गुजरातची ही व्यवस्था से० वस्ली पाहत होता. त्यानें वरील हुकूम मेरे यास पाठविला; आणि पुढें लगेच से० वस्लीस ग० ज० नें जरूरीच्या कामासाठीं कलकत्त्यास बोलाविलें. त्यावरून २५·६·१८०४ रोजीं से० वस्ली पुण्याहून निघून कलकत्त्यास गेला. होळकराचें प्रकरण निकरावर येऊन अनिवार होऊं लागलें, आणि त्याबद्दल इंग्लंडांतही वस्लीबंधूंबद्दल मोठा गवगवा सुरू झाला, त्याचा विचार करण्यासाठींच ग० ज० नें भावास आपल्याजवळ बोलाविलें.

**२ होळकराची हाव व उद्योग.**—एप्रिलचे अखेरीस लेकनें युद्धाची तयारी केली. दक्षिणेंत जसा निजामचा बचाव, तसा उत्तरेंत जयपुरचा बचाव हें इंग्रजांचें पहिलें बुजगावणें होतें. आरंभींच लेक यास बातमी आली कीं विकर्स, डॉड व रायन ( Vickers, Dodd, Ryan ) या नांवाचे तीन युरोपीय अंमलदार होळकराचे नोकरींत होते, त्यांनीं इंग्रजी जाहीरनाम्याचा फायदा घेऊन इंग्रजांशीं लढण्याचें नाकारलें, त्यावरून यशवंतरावानें उदेपुरनजीक नहर मघान गांवीं वाघाचे डोंगरावर त्यांचीं डोचकीं कापून लोकांस दहशत बसविण्याकरितां तीं भाल्यावरून मिरविलीं. ही बातमी आल्यावर यशवंतरावाच्या मनांत पुढें काय वागत आहे या विषयीं इंग्रजांस संशय उरला नाहीं. यापूर्वींच यशवंतरावानें दिल्लीच्या बादशहाकडे संधान लावून 'महाराजाधिराज, राजराजेश्वर अलिजाबहाद्दर' अशी पदवी मिळविली. त्यावरून बादशहाचा कबजा होळकर घेणार अशी इंग्रजांस भीति पडली, आणि नुसत्या दरडावणीनें त्यास गप्प बसवूं अशी ग० ज० ची अपेक्षा होती ती नाहींशी झाली. आजपावेतों त्यांनीं यशवंतरावास दौलतीचा मालक समजून त्याच्याशीं व्यवहार केला होता. परंतु आतां त्यांस काशीरावाची आठवण झाली. त्यास पुष्टि देणार दौलतराव होताच. त्याच्या सांगण्यावरून ग० ज० नें यशवंतरावास कळविलें कीं, 'होळकराचे दौलतीवर तुमचा हक्क बिलकूल नाहीं. सबब तुम्हीं बंडाळी सोडून स्वस्थ बसाल तर तुमची योग्य व्यवस्था इंग्रज सरकार लावून देईल.' यामुळें तर होळकर अतिशय चिडून गेला; आणि उघडपणें इंग्रजांविरुद्ध लहानमोठ्या राजांस उठवूं लागला. बुंदेले, जाठ, शीख इत्यादिकांस त्यानें उठावणीचीं पत्रें लिहिलीं. काबूलच्या दुराणी शहासही अशींच पत्रें लिहून त्यानें पंजाबवर स्वारी करण्याची भर दिली. यावरून होळकराशीं युद्ध केल्याशिवाय गत्यंतर नाहीं, असाच कयास इंग्रजांनीं बांधिला.

हें युद्ध मे १८०४ पासून डिसेंबर १८०५ पावेतों चाललें; आणि त्यांत अनेक संग्राम होऊन इंग्रज अगदीं टेकीस आले. आदल्या वर्षीं सिंदे भोसल्यांस तीन महिन्यांत नरम केल्याचा अनिवार गर्व इंग्रजांस वाटत होता तो सर्व यशवंतरावापुढें साफ जिरून गेला. पहिल्याच पावसाळ्यांत मुकुंदरा खिंडींत क० मॉन्सनशीं यशवंतरावानें जें धावपळीचें युद्ध केलें, त्यास तर इतिहासांत बहुधा तोडच मिळणार नाहीं. यशवंतरावाएवढा गनिमी पद्धतीनें लढणारा सेनापति उत्तर मराठशाहींत दुसरा कोणी झालाच नाहीं अशी त्याची वाहवा सर्वतोमुखीं झाली. सर्व प्रमुख मराठे सरदारांचा विरोध असतांही स्वपराक्रमानें उदयास येऊन दोन वर्षें पावेतों

इंग्रज बहादरांस त्यानें त्राहि त्राहि करून सोडलें ही गोष्ट असामान्य कर्तृत्वाचीच गणली पाहिजे. बाजीराव, सिंदे, भोसले वगैरे प्रमुख सरदार दुरूनच त्याचें कौतुक पाहत राहिले. त्याची उघड कुमक करण्याची छाती एकालाही झाली नाहीं. लढण्यांत तर त्याजपुढें इंग्रजांचा टिकाव लागला नाहींच, केवळ कपटविद्येनें त्याच्या एकेका सहायकांस अलग करून इंग्रजांनीं कसाबसा आपला निभाव करून घेतला. आर्मी क्वार्टरलीच्या ऑक्टोबर १९२२ च्या अंकांत डी. सी. बुल्जर (D. C. Boulger) यानें The Murat of the Mahrathas ' या नांवाखालीं यशवंतराव होळकरावर एक लेख लिहिला आहे त्यांत तो म्हणतो, ' युद्धांत जय मिळणें ही गोष्ट केवळ फौजेच्या तयारीवर अवलंबून नसते. पहिली गोष्ट सेनानायक अनुभवलेले व चतुर असले पाहिजेत; आणि त्याबरोबरच कपटविद्येचा सारखा मारा चालू ठेवण्याची पात्रता व परिस्थितीचा फायदा हरघडी घेण्याची चतुराई चालकांच्या अंगीं असावी लागते. या गोष्टी लक्षांत घेतां दुसरा बाजीराव, दौलतराव व रघूजी भोसले हे तिघे केव्हांही नालायकच गणले जातील. वरील बाबतींत एक यशवंतराव होळकर लायक ठरेल. त्यास मोठी अडचण नडली ती पैशाची. इतरांनीं नुसता त्यास बाहेरून पैशाचा पुरवठा केला असता, तरी त्यानें एकट्यानें इंग्रजांस वठणीस आणलें असतें. मराठ्यांकडे जेवढे म्हणून युरोपियन अम्मलदार होते ते सर्व इंग्रजांनीं फितूर करून फोडले, म्हणजे मुत्सद्देगिरींत दोघे वस्ली बंधू, लेक व माल्कम या चौघांपुढें वर सांगितलेले चौघे मराठे नायक अगदीं हीन ठरतात. '

होळकराच्या युद्धांतील स. १८०४ व १८०५ सालचे खालील मुख्य प्रसंग कालानुक्रमानें ध्यानांत ठेविल्यास युद्धाचें पुढील विवेचन स्पष्ट होईल.

१ मॉन्सन व यशवंतराव यांची राजपुतान्यांतली झटापट, २८ एप्रिल—१६ मे.

२ बुंदेलखंडांतील मोहीम, २१ मे पासून.

३ मॉन्सनचा पळ, ७ जुलई—३१ ऑगस्ट.

४ होळकरानें मथुरा हस्तगत केली, सेप्टेंबर १८०४.

५ दिल्ली जवळचे संग्राम, ता. १ ते १४ ऑक्टोबर १८०४.

६ चांदवड जालना इंग्रजांस हस्तगत, २९ सप्टेंबर—२५ ऑक्टोबर १८०४.

७ शामलीची लढाई, ता. ३०·१०·१८०४.

८ अंतर्वेदींत लेककडून यशवंतरावाचा पाठलाग, ३ ते १७ नोव्हेंबर पावेतों, हापड, खुर्जा, फत्तेगड, अलीगंज व फर्रुखाबाद पर्यंत.

९ दीग येथें वाढत चाललेला संग्राम, ५ नोव्हेंबर-२३ डिसेंबर १८०४.

१० भरतपुरचा संग्राम, ३ जानेवारी—१० एप्रील, १८०४.

११ सबळगड येथें यशवंतराव दौलतरावांची भेट, ११·४·१८०५. या भेटींत चतुरसिंग भोसले, बापूजी सिंदे, अमीरखान वगैरे बहुतेक सरदार हजर.

१२ सिंद्याकडून रेसिडेंटास अटक, सिंदे होळकरांस फोडण्याचा इंग्रजांचा प्रयत्न, जानेवारी—मे १८०५.

१३ कॉर्नवॉलिसची अल्पकालीन कारकीर्द, ३०·७·१८०५—५·१०·१८०५. त्यानें वसूलीचें धोरण सोडून दिलें. सर जॉर्ज बार्लोची हंगामी नेमणूक.

१४ होळकराचें अजमिराहून माचेडी रेवाडीवरून पत्याळास प्रमाण,—सेप्टेंबर १८०५; ऑक्टोबरांत लेककडून त्याचा पाठलाग.

१५ ब्यास नदीवर राजपूरघाट येथें होळकराशीं इंग्रजांचा तह, २४·१२·१८०५.

१६ सिंद्याशीं नवीन तह, २३·११·१८०५, माल्कम व मुनशी कवलनयन यांजकडून.

ता. १६·४·१८०४ रोजीं ग० ज० नें होळकराशीं युद्ध सुरू करण्याचे हुकूम ठिकठिकाणच्या हस्तकांस सोडिले, ते यशवंतरावास कळण्यास विलंब लागला नाहीं. त्याला मोठी ईर्षा वाटत होती कीं, शिंदे भोसल्यांना करतां आलें नाहीं तें आपण करून दाखवूं, आणि इंग्रजांचा पाडाव गनिमी काव्यानें करून मराठी राज्याचा बचाव करूं. यासाठीं सर्व मराठा मंडळाची एकी करण्याची त्याला मोठी तळमळ लागली. आदल्या वर्षी सिंदे भोसले जशी यशवंतरावाची पायधरणी करीत होते, तशीच तो आतां त्यांची करूं लागला. बाजीरावास तर चैनबाजीपुढें कांहींच सुचेना. भोसल्यानें आपला कान पिरगळून घेऊन पुनः युद्धाच्या भानगडींत पडावयाचें नाहीं असा निश्चयच केला होता; आणि सिंद्याला पतंगाचा खेळ व युद्ध या दोन्ही कला सारख्याच किंमतीच्या वाटत होत्या. सर्जेरावानें त्यास थोडीशी भर देण्याचा प्रयत्न केला, पण त्यांत त्याची उचलबांगडी होऊन इंग्रजांनीं सिंद्याचे हातपाय जास्तच जखडून टाकले. एवंच यशवंतरावाला दुसरा कोणी साहाय्यक मिळाला नाहीं. फक्त भरतपुरच्या जाठानें

कांहीं काल त्याचें साह्य मनापासून केलें. प्रथमच होळकरानें आत्माराम शिवराम व बाळाजी यशवंत यांस रघूजीचें मन वळविण्यास नागपुरास पाठविलें. ता. १९·६·१८०४ रोजीं तो आपल्या या वकिलांस लिहितो, 'सेनासाहेब सुभा यांचें लक्ष स्वधर्मसंरक्षणाकडे पूर्ण आहे प्रसंग पाहून जलचरांशीं तूर्त समेट घातला, परंतु त्याजवर कायम नाहींत. प्रस्तुत कटक बंगाल्याकडे फौजा पाठविण्याची तयारी होत आहे, म्हणून लिहिलें तें विदित जालें. सेनासाहेबांकडील फौज जाणार ही गोष्ट फार चांगली. असे चहूंकडून पायबंद असल्यावर जलचर कोठपावेतों पुरे पडतील ? याजकरतां फौज सत्वर विदा करावी.' धर्मसंरक्षणाची ही हाकाटी यशवंतराव आपल्याकडून शक्य तितकी उठवीत होता; पण शिवाजीच्या वेळची ती हृदयभेदी आरोळी आतां दीडशें वर्षांनीं कोणाचेच कानांत शिरेनाशी झाली होती. स्वार्थापलीकडे दुसरा धर्म कोणासही सुचत नव्हता. क० क्लोज या वेळीं मुद्दाम पुण्याहून भोसल्याची समजूत पाडून त्यास यशवंतरावाकडे जाऊं न देण्यासाठीं नागपुरास गेला. ता. २३·६·१८०४ रोजीं सर्जेराव घाटगे विचारतो, 'त्यांचे (क्लोजचे) चित्तांत काय इरादा होता, नागपुरास आले कां, माघारी जातात कसे, येविशींचा खुलासा लिहून कळवावा. तूर्तचा प्रसंग कसा आहे हें सर्व लक्षांत आहेच. एकवेळ सरकारची चाकरी करून दाखवावी हेंच लक्ष सर्वपरी ठेवून कर्तव्य करावें.' हें पत्र होळकराचा नागपुरास गेलेला वकील आत्माराम शिवराम वाकडे यास लिहिलेलें आहे. ( भालेराव–म. बु. मी. ले. ५ व ८ ).

त्या वेळचे कागदपत्र पाहतां दुसरी एक गोष्ट उघड दिसते, कीं जाग्यावर बसून अहंमन्यतेच्या नादांत एकदम आपली राज्यतृष्णा भागविण्याची हाव धरणारा ग० ज० रिचर्ड वेल्स्ली याच्यापेक्षां, त्याचा धाकटा भाऊ आर्थर हा नुसता लढाईच्याच कामांत नव्हे, तर मनुष्यस्वभाव ओळखून आणि न्यायान्यायाची चाड शक्य तितकी बाळगून वर्तन करणारा होता. गोहद व ग्वाल्हेर हीं ठिकाणें सिंद्यास परत दिल्याचें श्रेय मुख्यतः आर्थर यास आहे. यशवंतराव होळकराचा सुद्धां आर्थरवर जास्त भरंवसा होता. से० लेक मात्र सर्वस्वी ग० ज० च्या विचारसरणीचा होता. लेकशीं लढत असतां खुद्द यशवंतराव होळकरानें वस्लीकडे आपले वकील पाठवून त्याजकडे न्याय मागितला. तो म्हणाला, 'से० लेकनें आमच्यावर निष्कारण तोहमत चालविली आहे. आमचा व आमच्या दौलतीचा त्यांनीं निःपात आरंभिला आहे. म्हणून नाइलाजानें आम्हांस इंग्रजांविरुद्ध शस्त्र धरावें लागत आहे. तुम्ही आमची समजूत करून द्या. याहून दुसरें माझें कांहीं मागणें नाहीं.' परंतु न्याय किंवा समजूत ही भाषा

ग० ज० व लेक यांच्या गांवींच नव्हती. पुण्याचा रेसिडेंट कर्नल क्लोज हा सुद्धां आर्थर वस्लीच्याच मताचा होता. राजकारण म्हणजे व्यक्तिगत मनोविकारांचा झगडा होय.

**३ मुंकदरा खिंडींत मॉन्सनची वाताहत** ( जुलई ७–ऑगस्ट ३१).— युद्धारंभीं यशवंतरावानें जोधपुरचे राजास सामील करून घेतलें होतें. त्या राजाचें महत्त्वाचें ठिकाण अजमीर महादजी सिंद्यानें जिंकून घेतल्यापासून तें आपल्यास परत मिळावें अशी जोधपुरच्या राजास मोठी उत्कंठा लागली होती. सिंद्याचा उत्तर हिंदुस्तानांतील प्रदेश मोकळा दिसतांच यशवंतरावानें अजमीरचा ताबा घेऊन तें जोधपुरकरांस दिलें, आणि त्यानें त्याबद्दल यशवंतरावास खर्चास रक्कम व मदतीस फौज दिली. शिवाय यशवंतरावाचा जनानखाना आणि पुतण्या खंडेराव होळकर यांस त्या राजानें आपलेजवळ निगेंत ठेवून घेतलें. त्यामुळें यशवंतराव सडा होऊन शत्रूच्या पाठीस लागण्यास मोकळा झाला. ग० ज० नें युद्धाचे हुकूम सोडले ते ठिकठिकाणीं पोंचून मोहीम सुरू होण्यास पर्जन्यकाल आला. तथापि राजपुतान्यांत पाऊस विशेष नसल्यामुळें तो प्रदेश घोडेस्वारांच्या धावपळीस सोईचा, परंतु तोफखान्याच्या पायदळी युद्धास अडचणीचा होता. उन्हाळ्याच्या दोन तीन महिन्यांत होळकर जयपुरांतून खंडणी वसूल करण्याचा प्रयत्न करीत असतां त्याजवर टेहेळणी ठेवण्यास से० लेकनें क० मॉन्सन यास मुद्दाम जयपुरहद्दींत ठेवून दिलें. मॉन्सननें होळकराचा पाठलाग सुरू करतांच तो जयपुरकडून परत फिरून माळव्याकडे आपल्या हद्दींत येऊं लागला. पावसाळ्यांत होळकराचा पाठलाग करूं नये अशी ग० ज० ची ताकीद असतांही मॉन्सननें हें साहस उगाच अंगावर घेतलें. होळकराच्या पाठीवर लेक व मॉन्सन चालून आले. वाटेंत टोंक रामपुरा येथील मजबूद किल्ला होळकराचे मालकीचा होता तो त्यांनीं तोफा चालवून ता. १६·६·१८०४ रोजीं हस्तगत केला, आणि तेथील बंदोबस्तास आपली कांहीं फौज ठेवून दिली. आग्र्याकडून दक्षिणेकडे येतांना प्रथम जयपुरचा मुलूख लागतो. त्याच्या दक्षिणेस बुंदी व कोटा हीं राज्यें असून त्यांत नद्या, नाले व अडचणीचा मुलूख असल्यामुळें तेथें पावसाळ्यांत फौजांच्या हालचाली अशक्य होतात. कोटाचे दक्षिणेस पूर्व पश्चिम डोंगरांची रांग असून तीच राजपुताना व माळवा यांची हद्द समजली जाते. टोंक रामपुरा हस्तगत करून आणि होळकर आतां माळव्याकडे गेला असें पाहून, लेकनें ठरविलें कीं सर्वच फौज होळकराचे पाठीवर ठेवण्याची गरज नाहीं. गुजरातेंत क० मेरे याच्या हाताखालीं फौज होती, त्यानें माळव्यावर चालून येऊन उज्जनी येथें मुक्काम


७६
७७
७८
७९
फरिदाबाद
खुर्जा
शिकारपुर
अलीगड
कासगंज
गंगानदी
फरुकाबाद
मथुरा
डिग
भरतपुर
आग्रा
फतेपुरसीकी
मैनपुरी
शिकोहाबाद
बियाना
हिंडौन
इटावा
जयपुर
धोलपुर
काल्पी
ग्वाल्हेर
टोंक
चंबळ नदी
झांशी
कोटा
मुकुंदरा
झालरापाटण
बिना
रामपुरा
गरोठ
मानसनचा मार्ग
मुकुंदरा खिंडीतून
कर्नल मानसनची
धावपळ
जुलै-आगस्ट स०१८०४
भेलसा
महिदपुर
उज्जयिनी
सिहोर
भोपाळ

करावा असा हुकूम सुटलेला होता. तेव्हां क० मॉन्सन याचे हाताखालीं लेकनें पांच पायदळ पलटणें व तोफा देऊन त्यास होळकराचे पाठीवर ठेविलें आणि आपण मुख्य फौज घेऊन जून महिन्यांत बरसातीसाठीं कानपुरचे छावणींत गेला. मॉन्सनचे मदतीस देशी घोडेस्वारांचा तीन हजार जमाव बापूजी सिंदे याचे हाताखालीं दौलतरावानें पाठविला होता. शिवाय आणखी एक हिंदी घोडेस्वारांची पलटण ले० ल्यूकनचे हाताखालीं मॉन्सनबरोबर होती. वर जी डोंगरांची रांग सांगितली तींत मुकुंदरा नांवाची खिंड कोट्याचे दक्षिणेस सुमारें तीस मैलांवर असून तिलाच माळव्याचें प्रवेशद्वार समजतात. या खिंडीपासून दक्षिणेस होळकराचा मुलूख लागतो. से० लेक परत गेल्यावर मॉन्सन होळकराचा पाठलाग करीत मुकुंदरा खिंडींतून पुढें दक्षिणेस आला. क० मरे गुजरातेंतून येईल त्यास जाऊन मिळावें असा त्याचा हेतु होता. बुंदी व कोटा येथील राजे इंग्रजांस सामील झालेले असून त्यांच्याही फौजा मॉन्सनचे मदतीस होत्या. मॉन्सनजवळ धान्यसामुग्री मात्र पुरेशी नव्हती. परंतु जवळच होळकराचा हिंग्लजगड किल्ला होता तेथें आपणांस भरपूर सामुग्री मिळेल असें मनांत आणून मॉन्सननें ता. १·७·१८०४ रोजीं किल्ला हस्तगत केला. शिवाय हा किल्ला क० मरेच्या वाटेवरच असल्यामुळें तो आपल्या ताब्यांत असणें इंग्रजांस सोईचें होतें.

होळकरास या वेळीं पैशाची मोठी निकड होती. फौजांचा गवगवा मिटविण्यासाठीं तो प्रथम उज्जनीपावेतों आला; आणि तेथून चंबळचे पश्चिमेस मंदसोरला गेला. मंदसोर हें सिंद्याचें ठिकाण मजबूद व सधन होतें, तें होळकरानें हस्तगत करून पुष्कळ लूट पैदा केली; आणि जूनचे अखेरीस चंबळच्या पश्चिम कांठीं येऊन नदी उतरण्याच्या बेतांत होता. नदीच्या पूर्वेस पांच कोसांवर मॉन्सनचा मुक्काम असतां त्यास बातमी लागली कीं, 'होळकर नदी उतरून आपलेकडे येत आहे. तेव्हां उतारांतच त्याजवर हल्ला करावा, म्हणजे सहज त्याची दाणादाण उडेल असें मनांत आणून, मॉन्सन त्या उताराकडे वळला. इतक्यांत त्यास कळलें कीं होळकर सर्व फौज घेऊन नदी उतरून अलीकडे आला सुद्धां. त्याच वेळीं क० मरेकडून त्यास असें पत्र आलें कीं माळव्यावर चालून येणें या वेळीं मला शक्य नसल्यामुळें मी महीनदी उतरून परत छावणीस जात आहें. ही नवीनच अडचण मॉन्सनला उद्भवली. दुसरी एक चिंता त्यास लागली, कीं जवळचें धान्य दोन दिवसांहून जास्त पुरण्यासारखें नव्हतें. अशा स्थितींत होळकराशीं सामना करण्याचा नाद सोडून टोंक रामपुऱ्याकडे परत जाऊन आपला बचाव करणें एवढाच उपाय त्यास उरला. होळकरासही त्याच्या

हालचालींची भरपूर माहिती होती. तेव्हां त्याचे तोंडावर बापूजी सिंदे व ल्यूकन यांस ठेवून मॉन्सन मुकुंदरा खिंडीकडे तोफखान्यासह परत जाऊं लागला. मॉन्सन दूर गेला असें समजतांच होळकरानें ल्यूकन व बापूजी सिंदे यांजवर चाल करून त्यांच्या फौजांचा फन्ना उडविला आणि ल्यूकन यास पकडून घेतलें. ही बातमी मॉन्सनला मुकुंदरा खिंडींत समजली. पुढें लवकरच ल्यूकन् होळकराचे छावणींत मरण पावला. त्यावरून होळकरानें त्यास विष घालून ठार मारिलें असा प्रवाद पुढें उत्पन्न झाला. पण हा प्रवाद खरा नाहीं. ल्यूकन आतिसाराचे विकारानें मरण पावला असें पुढें सिद्ध झालें. लगेच होळकर खुद्द मॉन्सनवर ता. ९ जुलई रोजीं खिंडीकडे चालून गेला. त्याजबरोबर शौर्यानें लढत मॉन्सन् निभावून परत जाऊं लागला. इतक्यांत त्याला बातमी कळली कीं लेककडून कांहीं तोफा व पायदळ आपल्या मदतीस उत्तरेकडे नजीक आलें आहे. त्यास जाऊन भिळण्यासाठीं मॉन्सन मुकुंदरा खिंड ओलांडून कोटा पावेतों गेला. कोट्याच्या राजानें त्यास चंबळ नदी उतरण्यास होड्या दिल्या, परंतु धान्यसामुग्री देण्याचें नाकारिलें. त्या दिवशीं म्हणजे १० तारखेस जोराचा पाऊस पडून पुढें जाणें अशक्य झालें. तेव्हां मॉन्सननें जवळ तोफा होत्या त्यांस खिळे मारून निकाम्या केल्या व सडी फौज घेऊन संकटानें तो मागें रामपुऱ्यास पोंचला. होळकर त्यास त्रास देत पुढें चालून गेला. रामपुरा येथें मॉन्सन यास आग्र्याहून आलेली मदत पोंचली; आणि पोटाची अडचण दूर झाली. पण मागून होळकरही त्याचे पिच्छावर येऊन दाखल झाला. ता. २१ ऑगस्ट रोजीं मॉन्सन रामपुऱ्याहून पुढें निघाला, रस्त्यांत बनास नदी लागली तेथें उतार मिळेना. म्हणून एक दिवस मुक्काम केल्यावर पाणी कमी होऊन ता. २४ रोजीं सर्व सामान व फौज मॉन्सननें नदीपलीकडे पोंचविली. पण तेवढ्या अवधींत होळकरही वर दुसऱ्या ठिकाणीं नदी ओलांडून पुढून मॉन्सनच्या तोंडावर आडवा आला. त्या वेळीं निकराची लढाई होऊन मॉन्सनची पुष्कळच खराबी झाली. तेव्हां सर्व जड सामान टाकून देऊन ता. २४ ऑगस्टच्या रात्रीं होळकरास चुकवून मॉनसन पुढें निघाला, तो सारखा २४ तास प्रवास करून २५ ऑगस्टच्या रात्रीं खुशालगडला पोंचला. तेथें एक दिवस विश्रांति घेऊन तेथून पुढें निघाला तों ता. ३० रोजीं त्यानें आग्र्याचा किल्ला गांठला. अशा रीतीनें पुष्कळ वाताहत होऊन दोन महिन्यांचा हा पळ मॉन्सननें जीवमात्र बचावून पुरा केला.

हा प्रकार इंग्रजांच्या इभ्रतीस मोठा लांछनकारक गणला जातो. त्यामुळें यशवंतराव होळकराचा लौकिक युद्धकलेच्या संबंधानें देशांत अतिशय वाढला. त्यास नवीन हुरूप

येऊन जाट वगैरे त्यास सामील झाल्यामुळें आणखी एक वर्ष युद्ध चालविण्याचा प्रसंग इंग्रजांवर आला. सुरवातीस मॉन्सनबरोबर एकंदर फौज किती होती आणि तिच्यापैकीं किती जायां झाली याचा तपशील उपलब्ध नाहीं. से० वस्लीनें या प्रकरणावर चिकित्सापूर्वक मार्मिक अभिप्राय दिलेला वाचण्यालायक आहे. त्यानें खालील चुका मॉन्सनच्या पदरांत घातल्या. ( १ ) लहानशा फौजेनें होळकराच्या समग्र लष्कराशीं आपण सामना करूं शकूं असें मॉन्सनला वाटलें ही त्याची पहिली चूक. ( २ ) बरोबर धान्याचा पुरवठा भरपूर नसतां मुद्दाम त्यानें चढाई अंगावर घेतली ही दुसरी चूक. ( ३ ) एतद्देशीय राजांकडून आपणांस धान्य सामुग्री मिळेल अशी आशा त्यानें ठेविली ही त्याची तिसरी चूक. ( ४ ) कोटा, बुंदी, रामपुरा इ० ठिकाणीं धान्य संपादन करण्याचा त्यानें प्रयत्न केला नाहीं ही चवथी चूक. ( ५ ) भर पावसाळ्यांत नदी नाल्यांच्या अडचणींतून फौजा नेण्याचें धाडस करणें ही सुद्धां अशीच मोठी चूक होय. से० वस्ली म्हणतो, मला तर असें वाटतें कीं होळकरानें हल्ला केला नसता तरी सुद्धां मॉन्सनच्या या फौजेची अशीच वाताहत झाली असती. *

केवळ समजफेरामुळें मॉन्सन व मरे यांचा असा घोटाळा झाला. मे अखेर यशवंतराव राजपुतान्यांतून परत फिरून माळव्यावर येऊं लागला, तेव्हां हा आतां उज्जनवर धाड घालणार अशी बातमी दौलतरावास कळून तो अगदीं घाबरा झाला. त्यावरून से० वस्लीच्या मार्फत त्यानें कर्नल मरे गुजरातेंत होता त्यास निकडीचा हुकूम पाठविला कीं पत्र पावतांच तुम्ही निघून उज्जनीस तळ द्या. जनावरें वगैरे मिळण्यास थोडा विलंब लागल्यामुळें मरे यास तावडतोब निघतां आलें नाहीं. पुढें तो ता. ३० जून रोजीं रतलामचे पूर्वेस बदनावर म्हणून ठिकाण आहे तेथें पोंचला, तेव्हां मॉन्सनचें पत्र त्यास मिळालें कीं से० लेक कानपुरच्या छावणींत परत गेले असून मी होळकराचे टेहळणीवर मुकुंदरा घांटांत राहत आहें. त्यावरून मरेचा समज झाला कीं मॉन्सन आतां होळकराचे बंदोबस्तास आहेच; आपल्याला निकडीनें उज्जनवर जाण्याचें कारण नाहीं. दुसरी बातमी त्यास आणखी अशी कळली, कीं होळकर उज्जनचा रोख सोडून आपल्याच अंगावर चालून येत आहे. होळकर चालून आल्यास त्याजपुढें टिकाव लागण्यासारखी मरेची तयारी नसल्यामुळें त्यानें बदनावराहून १ जुलई रोजीं परत कूच केलें आणि ही गोष्ट

---

* Wellington's Desp. No. 244; Well. Desp. Vol. IV p. 327; for Murray p. 200.

त्यानें मॉन्सनला कळविली. तो परत गेल्यावर पांचवे दिवशीं त्यास बातमी कळली, कीं होळकरानें आपल्यावरचा रोंख सोडून सिंद्याच्या मंदसोरवर धाड घातली. तें ऐकतांच मेरे लगेच परत फिरला आणि कांहीं एक अडथळा न येतां ८ जुलई रोजीं उज्जनीस पोंचला. म्हणजे मॉन्सन मुकुंदराकडे परत फिरला, त्याच दिवशीं मेरे उज्जनीस होता. मात्र होळकराच्या टेहळणीमुळें त्यांस एकमेकांची बातमी पोंचली नाहीं. मॉन्सन व मेरे यांची भेट झाली असती तर बहुधा होळकराचा कारभार आरंभींच सर्व बंद पडला असता. एखाद्या क्षुल्लक कारणावरून भयंकर परिणाम कसे होतात, त्याचें हें एक स्मरणीय उदाहरण आहे.

मॉनसनच्या पाठलागाचें वर्णन होळकर कैफियतींत दिलेलें व्यवस्थित व मार्मिक आहे, तें असें:—'यशवंतराव होळकर सडी स्वारी ज्येष्ठ अखेर मंदसोरास आले. तेथें एक महिना मुक्काम केला. इंग्रजांचीं पलटणें कोटेवाल्याची फौज व बापू सिंदे बरोबर घेऊन मुकुंदऱ्याचे मार्गानें उतरून रामपुरा* व हिंगलगडाखालीं वगैरे जप्ती बसवून गरोटे-नजीक आले. हें वर्तमान मंदसोर मुक्कामीं यशवंतरावास समजतांच तेथें लोकांची दीलभरी करून ज्येष्ठ वद्य ३० च्या दिवशीं ( ७·७·१८०४ ) पलटणाबर चाल केली. अंतूरचे घांटें चर्मण्वती उतरून सडाघोडा राऊत ऐशीं हजार हलवून अग्नीचा कल्लोळ असा येऊन गरोटेहून दोन कोसांवर मुक्काम केला. लढाई फार मातबर झाली. फिरंगी हरून मुकुंदऱ्याचे मार्गे निघाला. कोटेवाल्याचीं माणसें फार करून कामास येऊन सरदार धरला. एक फिरंगी खासा ( Lucan ) मुकत्यार हत्तीवर मारला. वरकड तोफा डेरे जेथील तेथें टाकून सडे जीव घेऊन निघाले. कोटेवाल्यांनीं फिरंग्यांस नावा देऊन नदीपार करून दिलें. तों मागाहून यशवंतरावाची सडी स्वारी कोट्यास दाखल झाली. फिरंग्यांस सामील झाल्यामुळें कोटेवाल्यांवर त्यांचा दांत. तो अन्याय तूर्त पदरीं घालून कांहीं पैका घेऊन चर्मण्वती उतरले. तों बाजीराव बापूजी इंद्रगडीं होते. लाखे-रीचे डोंगराचे माहितगार. त्यांनीं भिल्ल जमा करून जागजागीं नाकीं बांधून फौज फार करून लुटली. टोप्या, अंगरखे व बंदुका गाड्यावर घालून आणिलें. पुढें फिरंग्यांशीं गांठ बनास नदीवर श्रावण वद्य ४ स ( ता. २४·८·१८०४ ) घालून तेथेंही झटपट बरीच केली. माणसें किती मारिलीं, किती नदींत उड्या टाकून गेले, त्यांजवर घोडे पाण्यांत घालून मारिले. त्या लढाईत सरशी फिरंग्यांचीच होती.

* उत्तरेकडचें टोक रामपुरा नव्हे. हें होळकराचें दुसरें ठिकाण भानपुऱ्याजवळ आहे.

इकडील कंपूचा मालक माकणसिंग मारला जाऊन तोफा त्यांनीं घेतल्या होत्या, परंतु महाराज ( यशवंतराव ) भाग्यवान् जातीनें तोफेवर येऊन आपण तोफा चालवून शेंकडों माणसें मारलीं. याप्रमाणें लढाई फत्ते करून पिच्छावर चालले. नदीस पाणी यामुळें तोफखाना उतरूं पावला नाहीं. सडा घोडा उतरून कंपू मागें टाकले. तोफा पलटणास सावरून फावतां किल्ले खुशालगडात शिरले. त्यांचे मुकाबल्यास होळकराकडील चिमणाजी कृष्ण यांचें पथक होतें. त्यावर ताशेरा देऊन बाहेर पडले ते आग्र्याचे मार्गें गेले. महाराजांची स्वारी श्रावण वद्य ९ स फत्तेपुर शिक्रीस दाखल झाली.'

बापूजी सिंदे मॉन्सनला सोडून यशवंतरावास मिळाला हा प्रकार इंग्रजांस फार झोंबला. त्यांत दौलतरावाचें अंग असावें असें त्यांस वाटलें. बऱ्हाणपुरचे करारानुसार दौलतरावानें आपली फौज इंग्रजांचे मदतीसाठीं बापूजी सिंदे या सरदाराचे हाताखालीं लेक बरोबर ठेविली होती, हें मागें सांगितलेंच आहे. लेकनें ही फौज मॉन्सनचे मदतीस दिली, ती मुकुंदऱ्याचे पळांत हजर होती. मान्सनबरोबर कांहीं काळ राहिल्यावर बापूजी सिंदे मध्येंच इंग्रजांस सोडून यशवंतराव होळकरास मिळाला. करार असा होता कीं या फौजेचा खर्च इंग्रजांनीं द्यावा. पुढें मॉन्सन अडचणींत आला, तेव्हां बापूजी सिंद्याचे खर्चास इंग्रजांकडून कांहींच पावेना. कित्येक महिने फौजेस उपास पडले. खुद्द मॉन्सनचीच दुर्दशा होती, मग बापूजी सिंद्यास कोण विचारतो ? त्याची फौज धरणें धरून बसली, तेव्हां नाइलाजानें यशवंतरावाकडून पैसा घेऊन तो होळकरास मिळाला. परंतु इंग्रजांस हा प्रकार कसा रुचणार ? ग० ज० च्या हुकुमावरून लेकनें जाहीरनामा काढला कीं बापूजी सिंदे व त्याची फौज हे आमचे गुन्हेगार आहेत. त्यांनीं एकदम येऊन आमचे स्वाधीन व्हावें. न आल्यास त्यांस आम्ही पकडून तोफेच्या तोंडीं देऊं. सदाशिव भाऊ म्हणून दुसरा एक सिंद्याचा सरदार असाच होळकरास मिळाला होता. त्याच्या संबंधानेंही वरच्यासारखाच जाहीरनामा से० लेकनें काढिला. परंतु पुढें हें प्रकरण सामोपचारानें मिटलें.

**४ यशवंतरावाची दुआबांत स्वारी** (आक्टोबर-नोव्हेंबर १८०४).—फत्तेपुराहून कूच करून यशवंतराव मथुरेस गेला. तेथें फिरंग्यांचा सरंजाम होता तो निघून परत आग्र्यास आला. तेव्हां मथुरा कबजांत घेऊन गणपतराव दिवाण व चिमणाजीपंत यांस यशवंतरावांनीं आग्र्याचे सुमारास रवाना केलें. से० लेक कानपुरचे छावणींत जाऊन तेथून ता. ३·९·१८०४ रोजीं मोहिमेस निघाला तो ता. २२ रोजीं आग्र्यास पोंचला. तेथून ता. १ ऑक्टोबर रोजीं तो मथुरेवर चालून गेला. त्याच्या तोंडावर

आपली मुख्य फौज ठेवून यशवंतरावानें ता. ८ रोजीं एकदम दिल्लीवर चाल केली. तेथें थोडीच इंग्रज फौज बंदोवस्तास होती. तिजवर क० बर्न हा अम्मलदार असून क० ऑक्टरलोनी रेसिडेंट होता. एक आठवडापावेतों होळकरानें दिल्लीचे तटावर तोफा चालवून शहर काबीज करण्याचा शिकस्तीचा प्रयत्न केला. परंतु शहर त्याचे हातीं आलें नाहीं. इकडे लेकनें तयारी करून मथुरेहून ता. १७ ऑक्टोबर रोजीं दिल्लीकडे चाल केली. त्यापूर्वीच क० बर्न ता. २६ रोजीं दिल्ली सोडून आपलीं पलटणें घेऊन साहारणपुरास मूळ नेमणुकीचे जागीं जाण्यास निघाला. बर्नची फौज थोडी आहे ही बातमी राखून त्याचे मागोमाग ता. २९ रोजीं होळकरानें बागपतावर यमुना उतरून पलीकडे शामली येथें बर्न यास गांठलें, आणि त्याचा पुढें सहारणपुरास जाण्याचा मार्ग अटवून धरिला. हा प्रकार लेक यास समजतांच तो ही मागोमाग ३१ ऑक्टोबर रोजीं बागपतावर यमुना उतरून होळकराचे पाठीवर ता. ३ नोव्हेंबर रोजीं शामलीवर दाखल झाला. पण त्या पूर्वीच होळकर तेथून निघून गेल्याची बातमी त्यास कळली, आणि तेव्हांपासून होळकर व लेक यांची जी धावपळ सुरू झाली, तिच्या योगानें होळकरानें आदल्या वर्षी से० वस्लीला इशारा दिला होता, त्याचा प्रत्यय लेक यास आला. शामलीहून होळकरानें समरूचे बेगमेकडे गुलामलीखान यास पाठवून तिला सामील करून घेण्याचा प्रयत्न केला. परंतु बेगमेनें दुटप्पी वर्तन ठेवल्यामुळें तिचा भरंवसा होळकरास पटेना. तिनें तीस हजार रुपये दिले ते घेऊन तो लेकच्या समाचारास गेला. त्याच्या तोंडावर त्यानें महिपतराव रामचंद्र यास पाठविलें. त्यानें पेंढाऱ्यांच्या साह्यानें लांडगेतोड करून लेकचा दारूगोळा खराब केला.. पुढें यशवंतराव सारमेवरून फर्रुखाबादेस गेला ( ता. १६·११·१८०४ ), तेथें लेकनें त्याजवर छापा घातला, तो मोठ्या शर्तीनें परत फिरवून कानपुरची इंग्रजी छावणी जाळून टाकण्याच्या विचारानें यशवंतराव तिकडे चालला असतां फौजेंत फितूर झाल्याचें आढळल्यावरून तो एकदम यमुना उतरून डीगचे आश्रयास आला. लेकनें पाठोपाठ येऊन तारीख १·१२·१८०४ रोजीं डिगचे किल्ल्यास मोर्चे लाविले. येणेंप्रमाणें गेल्या दोन महिन्यांत यशवंतरावाच्या दौडीनें इंग्रज पलटणें भारी जेरीस आलीं. दररोज पंचवीस मैलांहून कमी दौड कधीं पडली नाहीं; आणि छापे वगैरे घालतांना तर कधीं कधीं ७०—७५ मैलांची मजल मारल्याशिवाय भागलें नाहीं.

**५ रणजीतसिंग जाट***—येथ पावेतों होळकरानें स्वतः एकट्यानेंच इंग्रजांशीं

---

* Wellesley Desp. Vol. IV page 352.

सामना केला. पण याच वेळीं सर्व देशभर दुसरीं पुष्कळ राजकारणें खेळत होतीं, त्यांचें अनुसंधान ध्यानांत राखल्याशिवाय पुढील विषय स्पष्ट होणार नाहीं. अशां-पैकीं प्रथम जाटाचें प्रकरण व मग निजामाचें येथें सांगणें जरूर आहे.

यशवंतराव होळकर दुआबांतून परत फिरला तेव्हां त्यास भरतपुरचा जाट रणजित-सिंग अचानक सामील झाला. डीग व भरतपुर हे जाटांचे दोन मजबूद किल्ले युद्ध-सामुग्रीनें भरपूर सिद्ध होते. त्या ठिकाणीं होळकरास सर्व प्रकारचा आश्रय मिळून दोघांच्या फौजा एकत्र झाल्या आणि सर्व पुढारपण यशवंतराव होळकरानें आपल्या-कडे घेऊन डिसेंबर १८०४ पासून एप्रिल १८०५ पावेतों जें युद्ध केलें तें हिंदुस्थानच्या इतिहासांत संस्मरणीय झालें आहे. आदल्या वर्षी सिंद्याशीं युद्ध सुरू झालें तेव्हां इंग्रजांनीं कित्येक हिंदी राजांशीं स्वतंत्र तह करून त्यांस आपल्या बाजूस वळवून घेतलें त्यांत हा भरतपुरचा रणजितसिंग जाट होता. स. १७७० पासून तो सिंदे होळकरांचा पक्का दोस्त असून तीच परंपरा त्याची कायम होती. सिंद्याचा कांहीं मुलूख त्यास देऊन ता. ३१·१०·१८०३ रोजीं सेनापति लेकनें त्याजबरोबर स्वतंत्र तह केला, तेव्हांपासून तो इंग्रजांचा दोस्तच होता, आणि त्याची कांहीं फौज सिंद्याशीं लढण्यांत लेक यास सामील झाली होती. पुढें होळकराचा वंडावा सुरू झाला, तेव्हांही आरंभीं रणजितसिंगानें इंग्रजांशीं बाह्यतः अत्यंत सख्य दाखविलें. परंतु क. मॉन्सन याची वाताहात झालेली ऐकून रणजितसिंगाच्या मनाची चलबिचल सुरू झाली: आणि त्याच सुमारास यशवंतरावाशीं जाटानें गुप्त पत्रव्यवहार केला. ही गोष्ट से० लेकच्या कानावर मथुरा येथें असतांच आली होती. होळकरानें आपला वकील नीरंजनलाल नांवाचा भरतपुरच्या राजाकडे पाठविला होता. तो राजास भेटून परत मथुरेस आला असतां त्यास संशयावरून से० लेकनें एकदम पकडलें. त्याच्या जबानीवरून असें दिसून आलें कीं, होळकर व जाठ यांचे बरेच दिवसांपासून इंग्रजांविरुद्ध बेत चालले असून, दुआबांतील जमीनदारांस इंग्रजांविरुद्ध उठविण्याची ते दोघे अतिशय खटपट करून राहिले आहेत. ऑगस्ट महिन्यांत मॉन्सन रामपुरा येथें असतां त्याचे हातांत जाठरणजितसिंग व त्याचा पुत्र कुवर [रणधीरसिंग व त्यांचे हस्तक यांनीं यशवंतराव होळकरास लिहिलेलीं कित्येक पत्रें आढळलीं, तीं मध्येंच पकडून मॉन्सननें लेककडे पाठविलीं. तेव्हां जाटाच्या विश्वासघाताबद्दल लेकची खात्री झाली. त्याला पुढें नीरंजनलाल याच्या जबानीचा दुजोरा मिळाला. प्रथम लेक यास हा प्रकार विशेष महत्त्वाचा वाटला नाहीं. कारण दोघेही पितापुत्र

जाट चैनी व हलगर्जी होते. तेव्हां हा सर्व प्रकार मधल्या हस्तकांचाच असावा असा लेकचा तर्क झाला. पकडलेल्या पत्रांवरून असें दिसलें कीं जाटांचें हें दुटप्पी वर्तन गेल्या वर्षीं इंग्रजांशीं तह केल्या वेळेपासूनचें होतें. लेकनें हें सर्व प्रकरण कलकत्त्यास ग० ज०कडे पाठविलें. त्यानें तेथून लेक यास कळविलें, तुम्हीं जाट राजास भेटून त्याच्या मनांतील संशय दूर करावे. 'तुमच्याशीं झालेले करार आम्ही यथायोग्य पाळूं. तुमच्या हितास कोणत्याही तऱ्हेनें बाध येऊं देणार नाहीं. तुमच्या कारभारांत हात घालण्याची आमची इच्छा नाहीं, आणि तशी तुमची समजूत झाली असेल तर ती खोटी होय,' अशी त्याची समजूत घालावी, आणि त्यास पकडलेल्या पत्रांच्या नकला द्याव्या. त्याप्रमाणें लेकनें भेटून रणजितसिंगाची खात्री केली. राजानें उत्तर दिलें कीं, 'हा प्रकार आपण केलेला नाहीं.' त्यावरून तुमच्या नांवानें कोणी खटपटी लोक हा उपद्याप करीत असतील, तर त्यांचा तपास करा, आणि त्यांस पकडून सजा करण्यासाठीं आमचे स्वाधीन करा,' अशी मागणी लेकनें राजाकडे केली. तथापि या बाबतींत राजानें साफ कानावर हात ठेविले; आणि इकडे इंग्रजांस मदत करण्याचे हेतूनें आणखी फौज व सामुग्री त्यानें जमा केली. परंतु आंतून यशवंतरावासच मदत करण्याचा क्रम त्यानें चालू ठेविला. यशवंतराव जो बागपतावर यमुना उतरून अंतर्वेदींत गेला त्यास मुख्य भर जाट चीच होती. जाटाचें राज्य संपन्न होतें, त्यांचा लढाईचा बाणा सुप्रसिद्ध होता आणि त्यांची युद्धाची तयारी भरपूर होती. तिचा पूर्ण उपयोग यशवंतरावास मिळाला, म्हणूनच तो इंग्रजांस इतका भारी झाला. जाटाच्या या विश्वासघाताबद्दल इंग्रज अधिकाऱ्यांचे मनांत बिलकुल संशय उरला नाहीं. परंतु या वेळीं आपल्यावर आणीबाणीचा प्रसंग आहे हें जाणून तूर्त भरतपुरचे राजास कोणत्याही प्रकारें दुखवूं नये, आणि प्रथम होळकराचाच पाडाव करावा, पाठीमागून आपण या प्रकरणाचा योग्य तो निकाल करूं, अशा प्रकारचे गुळमुळीत हुकूम १३-११-१८०४ रोजीं ग० ज०नें लेक यास पाठविले. परंतु जाटानें पुढें यशवंतरावास डीग व भरतपुर येथें आश्रय दिला, म्हणून युद्धास विशेष रंग चढला.

**६ निजाम दरबाराचा इंग्रजांस विरोध** (स. १८०४).— सिंदे भोसल्यांच्या युद्धांत निजामाची फौज जरी वस्लीच्या धाकानें हजर होती तरी खुद्द त्याचे दरबारीं अतिशय घोटाळे माजले असून तेथेंही इंग्रजांचें वर्चस्व न होऊं देण्यासाठीं जोराचा प्रयत्न झाला. रेसिडेंट कर्कपॅट्रिक निजामाच्या मृत्युसमयीं मोठ्या धूर्ततेनें वागून आपल्या सरकाराचें संधान राखीत होता. मराठ्यांचें युद्ध सुरू झालें त्याच

दिवशीं निजामअली मरण पावला. ‘ तिसरे रोजीं पोलादजंग यास मशीरानें गादी-वर स्थापून पत्रें पुण्यास पाठविलीं. परंतु नबाबाची स्त्री व नातू कांहीं सरदार घेऊन गोवळकोंड्यास गेले. बिबींनीं सिंदे व भोसले यांजकडे बोलणें केलें कीं, ‘पैका दोन क्रोड देतों, दौलतीचा बंदोबस्त करावा.’ त्यावरून मशीर व त्याचा दुय्यम दिवाण राजा रघूत्तमराव हे पोलादजंग यास घेऊन परांड्यास गेले. नबाबाच्या स्त्रीनें त्यांस धुडकावून लाविलें. त्यांचा जमाव झाडून मराठ्यांस सामील आहे. बिबीनें मशीरास मारिला अशी सुद्धां बातमी उठली. परंतु लवकरच मशीर व पोलादजंग यांनीं रेसिडें-टांच्या मदतीनें सर्व बंदोबस्त करून बायकांस व साहेबजाद्यांस अटकेंत ठेविलें, आणि पागे पथके यांस धरून संस्थानचा बंदोबस्त केला. रघूत्तमरावाचा कल विरुद्ध पाहून त्यास अटकेंत ठेविलें. याप्रमाणें एक महिन्यांत सर्व बंदोबस्त झाला. या संबं-धाची संपूर्ण हकीगत ग० ज० नें युरोपास सिक्रेट कमिटीकडे लिहून पाठविली ती वाचण्यालायक आहे. मशीरनें शिकंदरजास कैदेंत ठेवून कारभार चालविला. प्रमुख सरदार व फौज मशीरच्या विरुद्ध होती. पण फौजेचा पुष्कळ भाग सखो रुद्र याचे हाताखालीं अगोदरच वस्लीकडे रवाना झाला होता; आणि तिच्यावर संपूर्ण हुकमत वस्लीची होती. रेसिडेंटानें राजा महीपतराम यास जवळ घेऊन सर्व ठिकाणचें संधान संभाळलें. शिकंदरजास पदावर बसविते वेळींच पूर्वीचे सर्व करार व तह यथायोग्य पाळूं अशी लेखी कबुली त्याजकडून रेसिडेंटानें घेतली. अशीच कबुली रघूत्तमरावानें रेसिडेंटाकडून मागितली, ती त्यानें प्रथम दिली नाहीं, मागाहून ग०ज० नें दिली. युद्धप्रसंगीं मशीरानें जर इंग्रजांस मनापासून साह्य केलें नसतें तर त्यांजवर मोठा कठिण प्रसंग गुदरला असता. हैदराबादेस सिंदे भोसल्यांचे वकील होते ते युद्ध सुरू झाल्यावर रेसिडेन्टानें घालवून दिले. तथापि पुष्कळ महत्त्वाच्या प्रकरणांत नवीन निजामानें लॉर्ड वेल्स्लीच्या सूचनांकडे बिलकूल लक्ष दिलें नाहीं. आपण इंग्रजांच्या बंधनांत पडलों याचा त्यास सारखा खेद वाटत होता; आणि शक्य तितका त्यानें इंग्रजांशीं विरोधच केला. आसईच्या लढाईनंतर से०वस्लीनें जखमी इंग्रज लोक दौलताबादेस पाठविले, परंतु तेथील किल्लेदारानें त्यांस आंत ठेवून घेतलें नाहीं. बदनापुर येथें निजामाची लहानशी फौज होती तिनें तर वस्लीकडे येणारी कही लुटून घेतली.*

---

* Wellesley Desp. Vol. V, Report Secret Committee, April 804, pages 110-115.

धारूरच्या किल्ल्यांतील फौजेनें असेंच विरुद्ध आचरण केलें. वस्लीबरोबर निजामाचा सरदार सखो रुद्र होता, त्यानें इंग्रजांस दाणा वैरण सुद्धां मिळूं दिली नाहीं. अशा अनेक प्रकरणांची तक्रार रेसिडेंटानें ग० ज० कडे लिहून पाठविली; आणि त्यांत असें लिहिलें कीं, ' प्रत्यक्ष निजाम सिकंदरजाशिवाय बाकीचे यच्चयावत् अधिकारी व कुटुंबांतील माणसें इंग्रजांच्या अगदीं विरुद्ध आहेत. त्यांचें म्हणणें आम्ही स्वतंत्र आहों. आम्हांस वाटेल तसे हुकूम करण्याचा अधिकार इंग्रजांस बिलकूल नाहीं. त्यावरून ग० ज० नें एक जोराचा खलिता रेसिडेन्ट मार्फत सिकंदरजास पाठविला; आणि इंग्रजांचें मराठ्यांशीं युद्ध चालू असेपर्यंत निजामाच्या राज्यांतले सर्व किल्ले त्यानें आपल्या ताब्यांत मागितले. हा निकराचा खलिता रेसिडेन्टानें भर दरबारांत निजामास वाचून दाखविला. त्यावरून पुढें निजाम व मशीर यांजमध्यें अत्यंत वितुष्ट आलें. वजिरास कैद करून अगर अन्य रीतीनें काढून टाकण्याचा प्रयत्न सिकंदरजानें चालविला. तेव्हां रेसिडेन्टानें सिकंदरजाची समजूत घालून त्याजकडून वजिरास संपूर्ण अधिकार देवविल. अर्थात् इंग्रजांच्या दट्ट्यापुढें सिकंदरजाचें कांहीं चालेना. एकट्या मशीराशिवाय दुसरा एकही इसम इंग्रजांचे बाजूस नव्हता. या वेळीं इंग्रजांची दांडगाई इतकी विकोपास गेली होती कीं निजामाचें राज्य आजच संपलें अशीच समस्त लोकांची भावना झाली. तों मुशीरुन्मुल्क ता. १०·५·१८०४ रोजीं मरण पावला, आणि त्याचे जागीं मीर आलमची नेमणूक वजीर म्हणून झाली. मीर आलमचा बाप सय्यद रेझा हा इराणांत फार विद्वान् म्हणून नांवाजलेला होता; आणि तो लहानपणींच इकडे येऊन निजामअली खानाजवळ राहिला. त्याचा वडील मुलगा सय्यद अबदुल कासीम स. १७५२ त हैदराबाद येथें जन्मला, तोच हा मीर आलम होय. त्यानेंही रेसिडेंटाचें तंत्र संभाळून निजामाचा कारभार स. १८०८ पर्यंत केला. या पुढील निजामशाहीची संबद्ध हकीकत पुढें यथावकाश येईल; येथें राजकारणाच्या संदर्भापुरतीच दिली आहे.

**७ अंबूजी इंगळयास स्वतंत्र राज्याचें आमिष** (१६·१२·१८०३).—दक्षिणेंत ज्यप्रमाणें होळकर अमृतरावांस से० वस्लीनें मराठ्यांच्या जुटींतून वेगळें केलें त्याचप्रमाणें उत्तरेंत से० लेकनें जाट, राजपूत वगैरे संस्थानिकांशीं स्वतंत्र तह केले आणि खुद्द सिंद्यांच्या फौजेंतील बेगम समरू, पेरॉन व अंबूजी इंगळे यांस मोठ्या युक्तीनें फितवून बाहेर काढिलें. कवाइती पलटणावर जसा पेरॉन मुख्य तसा अंबूजी इंगळे हा दौलतरावाचा हिंदी फौजेचा मुख्य सेनापति होता. त्याचे खर्चास गोहद व ग्वाल्हेर या परगण्यांची जहागीर महादजी सिंद्याचे वेळेपासून तोडून दिलेली होती. से० लेकनें

अंबूजी इंगळ्याकडे खडे टाकून पाणी मुरतेंसें दिसतांच त्यास कळविलें, कीं 'तुम्ही सिंद्यांची नोकरी सोडून इंग्रजांचे पक्षास याल तर तुमच्याकडे जी जहागीर चालत आहे तेवढ्याचें स्वतंत्र राज्य तुम्हांला कायमचें तोडून देऊं.' या भुलथापांस अंबूजी कसा व कां भाळला त्याची मराठी हकीकत बाहेर येणें जरूर आहे. ग्वालेर गोहदचा हा प्रदेश पुरातन काळापासून राज्यसंरक्षणाचे सोईचा व त्यामुळें सिंद्यांचे दौलतीचा केवळ प्राण असा मानला जात होता. ग्वालेरचा किल्ला हस्तगत झाल्याशिवाय बुंदेलखंडांत इंग्रजांची सत्ता स्थापन झाली नसती. मध्यंतरीं हा प्रदेश कांहीं काल गोहदचे राण्या-कडे होता. पुढें महादजीनें राण्यास नाहींसा करून आणि अति खर्च व मेहनत भोगून तो प्रांत हस्तगत केला, आणि त्याचे संरक्षणास भरंवशाचा सरदार इंगळे यास नेमिलें. सिंद्याशीं इंग्रजांचें युद्ध सुरू झालें, तेव्हां गोहदचा राणा म्हणून कोणी सत्ताधीश अस्तित्वांत सुद्धां नव्हता. राणा कीरतसिंग सिंद्यांचे पदरीं होता, कैदेदाखल त्यास महत्त्व नव्हतें. युद्ध सुरू होऊन ऑगस्ट सेप्टेंबर महिन्यांत अलीगड, दिल्ली आग्रा वगैरे प्रमुख स्थळें इंग्रजांचे हातांत पडल्याबरोबर तिकडचे लहान मोठे सत्ताधीश इंग्रजांमार्फत आपली व्यवस्था स्वतंत्र तोडून घेण्याच्या उद्योगास लागले. त्यांत अंबूजी इंगळ्यास से० लेकचा इशारा येतांच त्यानें आपला वकील पत्रें देऊन लेककडे पाठविला आणि कळविलें, कीं 'हल्लीं माझ्या ताब्यांत असलेला प्रदेश स्वतंत्र राज्य म्हणून तोडून देण्याची व्यवस्था कंपनीसरकार करतील तर मी सिंद्यांची ताबेदारी सोडण्यास तयार आहें.' ता. १९·१०·१८०३ रोजीं लॉर्ड वेल्स्ली से० लेक यास लिहितो. 'अंबाजी इंगळ्याचा वकील तुमच्याकडे फत्तेगडास आला आहे आणि मजकडेही त्यानें आपला आशय कळविला आहे. त्यासंबंधानें कळविणें, कीं अंबाजी-कडे हल्लीं किती मुलूख आहे याची बरोबर कल्पना मला नाहीं. परंतु गोहदचे राण्यास कांहीं तरी स्वतंत्र प्रदेश असाच तोडून देण्याची वाटाघाट चालली असून राण्यास पाहिजे असलेला बराच मुलूख अंबाजीचे कबजांत आहे. तेव्हां दोघांसही खूष ठेवण्याची कांहीं तरी शकल काढिली पाहिजे. दुसरीकडे मोबदला घेऊन अंबाजी आपले कबजांतील कांहीं मुलूख गोहदचे राण्यास देण्यास तयार असेल तर विचा-रावें, आणि तुम्हांस योग्य वाटेल त्याप्रमाणें दोघांचीही व्यवस्था लावून द्यावी, मात्र ग्वाल्हेरचा किल्ला व शहर हें आपल्याकडे कायम ठेवावें. अंबाजीला आश्वासन द्या कीं, तुमच्याकडे हा प्रदेश निर्बाध चालेल. त्याबद्दल खंडणी वगैरे कांहीं तुम्हांस द्यावी लागणार नाहीं; आणि परशत्रूपासून तुमचें संरक्षण करण्याची हमी इंग्रज

सरकार घेईल.' ग० ज० च्या या हुकमास मान्यता देऊन से० लेकनें अंबूजीशीं ता. १६·१२·१८०३ रोजीं स्वतंत्र करार पुरा करून दिला. तेणेंकरून ग्वालेर किल्ला व शहर आणि त्याचे उत्तरेकडील यमुनेपर्यंतचा प्रदेश इंगळ्यानें सोडून दिला, आणि त्याच वेळीं दक्षिणेकडील प्रदेशाचें राज्य त्यास स्वतंत्र तोडून मिळालें. *

इकडे गोहदचे राण्यास सिंद्याविरुद्ध उठविण्याचें प्रकरण मर्सरचे मार्फत ग० ज० नें स्वतंत्र चालू केलें होतें, तें पुरें होऊन त्याच्याशीं देखील ता. २९·१·१८०४ रोजीं आणखी एक करार करून वरचाच प्रदेश त्यासही देऊन टाकण्यांत आला. मात्र त्या करारांत राण्यानें ग्वाल्हेरचा किल्ला इंग्रजांस लिहून दिला. राण्यानें थोडी फौज ठेविली ती घेऊन इंग्रजांची एक तुकडी ग्वालेर ताब्यांत घेण्यास आली. परंतु सिंद्याचा किल्लेदार + वर होता तो किल्ला खालीं करून देईना. तो म्हणाला, 'किल्ला सिंद्यांचा आहे. तो इंग्रजांस देण्याचा अधिकार अबूंजीचा नाहीं किंवा राण्याचाही नाहीं.' असा पेंच पडला असतां इंग्रजांनीं किल्ल्यावर हल्ला करून ता. ४·२·१८०४ रोजीं तो हस्तगत केला; आणि लगेच अंबूजीला कळविलें कीं, 'तुमचेकडून कराराप्रमाणें ग्वाल्हेरचा किल्ला आमचे कबजांत आला नाहीं त्यामुळें तुमचा करार आतां रद्द समजण्यांत येत आहे.' अशा रीतीनें अंबूजी मात्र तोंडघशीं पडला. दौलतराव सिंद्यापाशीं तो उघड राजद्रोही ठरला आणि इंग्रजांकडील राज्य तर त्यास मिळालेंच नाहीं. ता. २१·१·१८०४ रोजीं यशवंतराव होळकर लिहितो, 'अंबूजी इंगळ्यांनीं कोती अंदेशा मनांत आणून इंग्रजांकडे संधान लावून गोहद ग्वालेर वगैरे जागा देऊन मिळवून घ्यावें असें केलें होतें. तें वर्तमान समजतांच इकडून माणसें पाठवून निषेधपूर्वक बोध करून मार्गावर आणिलें. जागा न देतां मजबुती राखून हुशार केलें. आतां त्यांजला बोलावून घेऊन पुढील मसलतीचा विचार ठरवून गांठ घालून शत्रूचा मुकाबला घेतों.' पुढील सालीं स. १८०५ त यशवंतराव व दौलतराव यांची भेट सबळगडास झाली, त्या वेळीं यशवंतरावानें अंबूजीचे हाल करून त्याजपासून पंनासलाख रु. वसूल केले आणि वरील फितुरीचें प्रायश्चित्त त्यास भरपूर दिलें.

---

* Desp. Vol. III. page 409, Vol. IV. page 19, 21, 35, and Letters numbres V, VII, XI. हा तह ऑक्टोबर स० १९३०च्या रत्नाकराच्या अंकांत बडोद्याचे विद्यमान से० नानासाहेब सिंदे यांनीं छापला आहे तो अवश्य पाहवा.

+ या किल्लेदाराचें नांव उपलब्ध नाहीं. संशोध कांनीं तें हुडकून काढणें जरूर आहे. पहा रु. ३. २२४, WellingtonDesp. ले. २२०.

ग्वालेरची भानगड मात्र एवढ्यानेंच मिटली नाहीं. किल्ला हातचा गेला हा हृद्रोग दौलतरावाचे जिव्हाळीं लागला; आणि त्या बाबतींत इंग्रजांचे कपटनीतीचें पुरेपूर माप त्यानें त्यांचे पदरीं घातलें. प्रत्यक्ष से० वस्लीनेंही लिहून कळविलें, कीं 'हिंदुस्थानचें इंग्रजांचें सगळें राज्य गेलें तरी मला पत्करेल, पण वचनभंगाचा डाग इंग्रजांचे नांवास लागलेला मला कधीं खपणार नाहीं.' त्यावरून स. १८०५ त ग्वालेरचा किल्ला सिंद्यास परत मिळाला.

**८ भरतपुरचें प्रचंड युद्ध व जाठाशीं तह** (ता. ११·४·१८०५).— यशवंतरावानें भाऊ भास्कर यास भरतपुरच्या जाठास सामील करून घेण्यासाठीं पाठविलें होतें. त्यानें येऊन जाठाचें म्हणणें कळविलें तें असें:—' इंग्रज सरकाराचें व आमचें भांडण नाहीं. आमच्याशीं ते नरमाईचें वर्तन ठेवितात. पूर्वीचा आमचा मुलूख कायम करून आणखी नवीन मुलूख त्यांनीं आम्हांस पुष्कळ दिला आहे. तेव्हां त्यांच्याशीं विरोध करणें योग्य होणार नाहीं.' हें उत्तर ऐकून पुनः यशवंतरावानें भाऊ भास्करास जाठाकडे पाठविलें, आणि विनंति केली कीं आम्हांस नुसती सुरक्षित राहण्यासाठीं जागा द्यावी. अशा प्रकारें स्नेह जुळला.

जाठ रणजितसिंग स्वभावानें हिम्मतदार, थोर मनाचा व भिडस्त होता. त्याला यशवंतरावाची विनंति अमान्य करवेना. डीग व भरतपुरच्या बाहेर यशवंतरावाचे फौजेस राहण्यास त्यानें जागा ठरवून दिली. त्याचप्रमाणें इतर रजवाड्यांकडूनही मदतीचीं आश्वासनें यशवंतरावाकडे आलीं. गेल्या वर्षीं प्रथम जेव्हां होळकर दिल्लीकडे गेला, तेव्हांच त्यानें वर सांगितल्याप्रमाणें जाठाकडे बोलणें करून आपलीं कवाइती पलटणें व तोफखाना डीग जवळ खंडी म्हणून जागा आहे तेथें ठेवून दिलीं. पुढें से० लेक जेव्हां यशवंतरावाचे पाठलागास दिल्लीकडे निघाला, तेव्हां या फौजेनें मागून आपल्यावर चढाई करूं नये म्हणून त्याजला धाकांत ठेवण्यास मेजर जनरल फ्रेजर यास एक तुकडी देऊन त्यानें रवाना केलें. ता. ५·११·१८०४ रोजीं फ्रेजर दिल्लीहून निघाला तो गोवर्धन येथें मुक्काम करून राहिला. तेथून त्यानें ता. १३ रोजीं डीगजवळ होळकराची फौज होती तिजवर चाल केली. त्या वेळीं उभयतांमध्यें थोडाच वेळ तुंबळ रणकंदन झालें. त्यांत खुद्द फ्रेजर यास जखमा लागून त्या योगें तो थोड्याच दिवसांनीं मरण पावला. पुढें फ्रेजरचें काम मॉन्सननें शेवटलें; आणि तोफांच्या मारानें होळकराची फौज दीग जवळून हुसकून दिली. हा प्रकार झाल्यावर थोड्याच दिवसांनीं स्वतः होळकर अंतर्वेदींतून डीगचे आश्रयास आला, तेथें जाठानें त्याचें साहित्य केलें;

त्यांचा वाढता जोर पाहून से० लेकनें डीगवर चाल केली, आणि १०·१२·१८०४ रोजीं किल्ल्यास मोर्चे लाविले. कांहीं दिवस तोफांचा मारा झाल्यावर ता. १३ डिसेंबर रोजीं तटास लहानसें खिंडार पडलें. त्यांतून रात्रीच्या वेळीं तीन टोळ्यांनीं निकराचा हल्ला करितांच डीग किल्ला व शहर इंग्रजांचे हस्तगत झालें. मात्र त्या कामीं उभय पक्षांचे पुष्कळ लोक जायां झाले.

डीगचा पाडाव झाल्यावर होळकर व जाठ यांच्या संयुक्त फौजा भरतपुरास येऊन राहिल्या. जाठ रणजितसिंगानें यशवंतरावास कळविलें, ' तुम्हीं मदत असावें. खर्चास चार रुपये लागतील ते देऊं. ' ता. १९·१२·१८०४ रोजीं से० लेक भरतपुरावर चालून आला. त्याजवर यशवंतरावानें बाहेरून छापे घालून पुष्कळ नासाडी केली. क० मरे उज्जनीहून हलक्या मजलांनीं लेकचे मदतीस येत होता, परंतु त्याजकडून होळकरास फारसा उपद्रव झाला नाहीं. भरतपुरचा तट चिखलाच्या रुंद भिंतींनीं बनविलेला खालीं मोठा खंदक असलेला दुर्लंघ्य गणला जात असे. त्या तटावर मोर्चांतून लेकनें तोफांचा मारा ता. ७·१·१८०५ रोजीं चालू केला. कांहीं दिवसांनीं तटास खिंडार पडलें, त्यांतून हल्ला चढवितांच इंग्रज फौजेवर जाठांनीं जोराचा मारा केला. त्यांत इंग्रजांचे पुष्कळ लोक मरून ते नाउमेद झाले. २१ जानेवारी रोजीं दुसरा हल्ला चढविला, तोही तसाच फसला. तेव्हां कांहीं चांगल्या तोफा बाहेरून आणून एक महिना पावेतों लेकनें पुनः सर्व सिद्धता केली; आणि २० फेब्रुवारी रोजीं तिसरा हल्ला चढविला. पण त्याही प्रसंगीं पुष्कळ युरोपियन लोक मारले जाऊन कांहीं एक परिणाम घडला नाहीं. दुसरे दिवशीं पुनः तसाच हल्ला चढविण्याचें लेकनें ठरवून त्या कामीं मॉन्सनची योजना केली. त्या प्रसंगीं किल्ल्यावरून तोफांचे गोळे, लाकडाचे पेटलेले ओंडे, आणि आगीचे घडे यांचा वर्षाव हल्ला करणाऱ्यांवर असा कांहीं बेसुमार झाला, कीं याही हल्ल्यांत भयंकर नुकसान होऊन इंग्रजांस परत फिरावें लागलें. असे हल्ले वारंवार चढवून इंग्रजांचे तीन हजारांहून जास्त शेलके लोक जायां झाले, आणि दारूगोळा सर्व संपला. तसेंच तोफा निकाम्या होऊन धान्यसामुग्रीही खलास झाली. शिवाय सर्व देशभर इंग्रजांची बदनामी झाली ती निराळीच. इंग्रजांच्या एवढ्या प्रचंड लष्कराला भरतपुरचा लहानसा किल्ला हस्तगत होत नाहीं हें वर्तमान देशभर पसरलें. ' अठरा हल्ले आले. अठराही हल्ले आंतून जाठ, बाहेरून होळकर यांनीं मारून काढिले. इंग्रज पलटणांचा शेणसडा झाला. होळकरांकडील सोमाजी लांबहाते केवळ कलींतला अर्जुन कामास आला. ' या हल्ल्यांसंबंधानें लेकनें पाठविलेलीं तपशीलवार हकीगतीचीं

पत्रें छापिलीं आहेत, परंतु त्यांवरून त्याच्या अपयशाचीं कारणें स्पष्ट कळून येत नाहींत. रणजितसिंग जाटानें इंग्रजांशीं बेइमान केलें, त्या संबंधाचें पुष्कळच वाङ्मय इंग्रजींत आहे तें विस्तारभयास्तव येथें घेतां येत नाहीं.

यशवंतरावानें मीरखानास बुंदेलखंडांतून भरतपुरावर बोलाविलें, तेव्हां तो लगोलग धावून आला. त्यामुळें मराठ्यांसही लढण्यास मोठा धीर आला, आणि २९ मार्च पासून १ एप्रिल पावेतों लेकनें पराकाष्ठेचे हल्ले केले त्यांत मीरखानाच्या चतुराईमुळें भरतपुरावर इंग्रजांचा इलाज चालला नाहीं. पुढें भरतपुरचा जाठ इंग्रजांशीं समेट करूं लागला, तेव्हां यशवंतरावानें मीरखानास लगेच रोहिलखंडांत पाठवून तिकडे इंग्रजांचा उच्छेद चालविला. इतक्यांत तह झाल्यामुळें तो सबळगड येथें परत येऊन सिंदे होळकरांस सामील झाला, त्यापुढचे बनाव अन्यत्र सांगितले आहेत.

चांदवड, लासलगांव, धोडप, जालना वगैरे होळकराचीं स्थळें महाराष्ट्रांत होतीं, तीं हस्तगत करण्याची कामगिरी बाजीरावाच्या तैनाती फौजेचा अम्मलदार क० वॉलेस याजला सांगण्यांत आली. तदनुसार तो ता. १·९·१८०४ रोजीं पुण्याहून निघाला. हैदराबादची फौजही त्यास सामील झाली. पेशव्यानें आपल्या तर्फेनें विंचुरकरांस इंग्रजांच्या मदतीस बरोबर दिलें. बापू गोखल्यास बरोबर द्या अशी मागणी इंग्रजांनीं केली, परंतु तो कर्नाटकांतून येऊं शकला नाहीं. ता. १२·१०·१८०४ रोजीं चांदवडचें ठाणें वॉलेसनें हस्तगत केलें. त्यानंतर दोन दिवसांनीं धोडपचा किल्ला घेतला. तेथून जालनावर जाऊन तेंही ठिकाण त्यानें २३ ऑक्टोबर रोजीं काबीज केलें. पुढें कांहीं दिवस या इंग्रज फौजा खानदेशांत मुक्काम करून राहिल्या. यापुढें बुंदेलखंडांतील मोहीम सांगितली म्हणजे होळकराचे प्रकरणाचा मुख्य भाग संपेल.*

क० फॉसेट बरतर्फ झाल्यावर त्याचे जागीं क० मार्टिंडेल याची नेमणूक झाली. बुंदेलखंडांत होळकराचा सरदार मीरखान बुंदेल्यांस इंग्रजांवर उठवून इंग्रजांशीं झगडत होता. ता. २·७·१८०४ रोजीं मार्टिंडेलनें महोबा येथें बुंदेल्यांचा पाडाव करून तें ठिकाण हस्तगत केलें. दुसरा बुंदेला राजा केशरीसिंग जेतपुरास राहून इंग्रजांशीं लढत होता, त्याजवर ता. २८·७·१८०४ रोजीं मार्टिंडेलनें चाल केली, पण त्या कामीं जेतपुर पुढें चांगलाच मार खाऊन त्यास परत फिरावें लागलें नंतर त्यानें आणखी तोफा व पलटणें आणून जेतपुरावर हल्ला चढविला आणि ता. २०·८·१८०४ रोजीं तें ठिकाण हस्तगत केलें. यानंतर से० लेकचा जाठाशीं

*Desp. Vol. V page 370; Vol IV pp 352–360. हो. कै; भ. रो.

झगडा सुरू झाला तेव्हां त्यानें मार्टिंडेल यास काल्पी येथें चहूंकडे टेहेळणी करण्या-साठीं ठेवून दिलें. नोव्हेंबर महिन्यांत काल्पीहून कुंच येथें जाऊन तें ठिकाण मार्टिंडेलनें हस्तगत केलें. या पूर्वींच म्हणजे सेप्टेंबर महिन्यांत यशवंतरावाचे सूचनेवरून मीरखान बुंदेलखंडांतील काम सोडून भोपाळचे मुलुखांत शिरला होता. भोपाळचे नबाबानें नागपुरकर भोसल्याचा मुलूख दाबला होता, तो सोडविण्यासाठीं दौलतरावही त्या बाजूस कां गेला तें वर्तमान पुढें द्यावयाचें आहे. भोपाळचा मुलूख लुटून मीरखान भेलसा ताब्यांत घेऊन सागरवर आला. तेथें अंबाजी इंगळे व मीरखान एकत्र झाले, आणि दौलतराव त्या बाजूस येत होता त्यास मिळवून घेऊन इंग्रजांवर चढाई करण्यास सिद्ध झाले. अशा स्थितींत भरतपुरावर यशवंतरावाचा इंग्रजांशीं प्राणांतिक झगडा सुरू झाला, तेव्हां त्यानें मीरखानास आपल्या मदतीस भरतपुरास बोलावून घेतलें, त्यामुळें बुंदेलखंडांतील कार्यभाग मागें पडला; आणि मार्टिंडेल कालीसिंध नदीवर मुक्काम करून राहिला. त्या ठिकाणीं त्यास ता. १३·१·१८०५ रोजीं रेसिडेंट जेंकिन्सचें पत्र आलें, कीं 'सिंद्यांचा आमचा बेबनाव होऊन मी त्यांची छावणी सोडून निघून गेलों. तुम्हीं सावध रहा.' त्यावरून मार्टिंडेल सिंद्यावर चालून जाण्याच्या बेतांत होता. परंतु या वेळीं आपणावर कठिण प्रसंग गुदरणार असें पाहून ग० ज० नें आपले हात आखडले आणि मार्टिंडेल यास तातडीचे हुकूम पाठवून लढाईपासून निवृत्त केलें. सिंद्याचा व इंग्रजांचा या वेळीं उघड बेबनाव झाला होता, आणि ग० ज० नें मुद्दाम माघार घेतली नसती, तर सर्व मराठ्यांची जूट होऊन त्याचे परिणाम इंग्रजांस अनिष्ट झाले असते.

से० लेकचे हल्ले वारंवार विफल होऊन इंग्रजांची दुर्दशा झाली आणि त्याच संधीस सिंद्याशीं त्यांचा बेबनाव होऊन हिंदी सत्ताधीशांची प्रचंड जूट जमण्याचा योग आला. सिंद्यानें आपली फौज घेऊन भरतपुरावर जाण्याचें ठरविलें. उन्हाळाही जालीम सुरू झाला; आणि भरतपुरचें युद्ध न आवरेल तर पुढें पावसाळ्यांत आपल्यावर कठिण प्रसंग येईल अशी चिंता इंग्रजांस लागली. अशा अडचणींत लेकनें लढाईचा उद्योग थोडा ढिला पाहून जाठांकडे व होळकराकडे कपटविद्येचा प्रयोग सुरू केला. जाठास त्यानें कळविलें कीं, 'एवढें युद्ध चालविण्यांत तुमचा फायदा तो काय? लढण्याऐवजीं तुम्ही आमच्याशीं समेट कराल तर तुमचा जास्त फायदा होण्याचा संभव आहे.' असें बोलणें सुरू करून अत्यंत सवलतीच्या अटींवर दोन दिवसांत लेकनें जाठाशीं तह करून त्यास अलग केलें. ता. १०·४·१८०५ रोजीं उभय पक्षीं कलमें मान्य

झालीं तीं अशीं:—( १ ) जाठानें इंग्रजांस युद्धखर्चाबद्दल २० लाख रुपये हाप्त्या-हाप्त्यानें द्यावे; आणि ( २ ) जाठाकडे पूर्वी मुलूख होता तो सर्व इंग्रजांनीं त्याजकडे कायम ठेवावा. जाठानें हीं कलमें आनंदानें कबूल केलीं. इंग्रजांनीं मात्र प्रचंड खर्च व वाताहत झालेली निमूटपणें सहन करून व थोडी बहुत अब्रू बचावून अडचणींत सांपडलेला हात तूर्तातूर्त मोकळा करून घेतला. जाठावरील हा द्वेष त्यांनीं पुढें वीस वर्षांनीं कसा उगवून घेतला हें इतिहास जाणतो. अशा प्रकारें जाठ स्वस्थ बसल्यावर होळकर उघडा पडला. त्याच्याकडे इंग्रजांनीं कांहीं महिने बिलकूल लक्ष दिलें नाहीं. मध्यंतरीं लॉर्ड वेल्स्लीच्या हातचा कारभार जाऊन कॉर्नवॉलिस अधिकारावर आल्यानें पूर्वीचें सगळेंच धोरण फिरलें, तो प्रकार पुढें सांगण्यांत येईल.

---

# प्रकरण अकरावें

## मराठशाहीचे खांब सिंदे होळकर ढांसळले

**“ जब दोनोका मिलाफ हुवा आप फिरंगी घबराया।**
**यहां लढनेका नहीं ठिकाना, कलकत्ता लंबा राह्या ॥**
**फिरंगीनें वकील भेजकर, महाराजको समझाया।**
**हमने हारा तुमने जीता, जो हुवा सो भला हुवा ॥**
**सवाई खंडेराव प्रसन्न, महाराज पर है छाया।**
**हरिबालानें गाया पोवाडा, तमाम लष्कर खुशी किया ॥ ”**

१ होळकराचे युद्धांत सिंद्याची कुचंबणा ( जाने. १८०४-एप्रिल १८०५ ).
२ सबळगड येथें मराठमंडळाचा जमाव ( एप्रिल-जून १८०५ ).
३ कॉर्नवालिसचें समेटाचें धोरण, वस्लीवर टीका ( जुलई-आक्टो. १८०५ ).
४ होळकराचा ठराव ( ता. २४·१२·१८०५ ).
५ यशवंतराव, खंडेराव, व काशीराव होळकरांचे अंत.
६ यशवंतरावाची योग्यता.

**१ होळकराचे युद्धांत सिंद्याची कुचंबणा**(जाने. १८०४–एप्रिल १८०५).
स. १८०३ च्या पावसाळ्यापासून दौलतरावास ज्या प्रचंड घडामोडी अल्पा-

वर्षीत अनुभवाव्या लागल्या त्यांच्या योगानें त्याचें मन चलच्चित्रपटांतील देखाव्यांप्रमाणें अत्यंत भांबावून गेलें. झालें काय व आपण आहों कोठें याची उमज पडण्यासच त्यास पुष्कळ काळ लागला. दौलत संभाळणें म्हणजे पतंगाचा खेळ नव्हे ही खात्री त्यास हळू हळू पटत चालली. एके बाजूनें माल्कम, क्लोज, वस्ली यांच्यासारखे जहांबाज सर्वभक्षक सामनेवाले, आणि दुसरे बाजूस सर्जेराव घाटग्यासारखे नाना प्रकृतींचे उपद्यापी सल्लागार, या दोहोंच्या साकव्यांत त्या बिचाऱ्या निर्बुद्ध व विलासी तरुणाचा साफ चेंदा होऊन गेला. निश्चित धोरण असें त्याला कोणतेंच स्वीकारितां येईना. प्रवाहपतित होऊन तो वाहत चालला होता. सर्व बाजूंनीं इंगळ्या लागल्याप्रमाणें त्याची अवस्था होती. होळकराशीं युद्ध सुरू होतांच बऱ्हाणपुरच्या तहानुसार इंग्रजांनीं दौलतरावाची सर्व फौज आपल्या मदतीस बोलाविली. ती देत नाहीं म्हणण्याची त्यास सोय नव्हती. फौज न पाठवावी तर आपण होळकरास सामील आहों असें समजून इंग्रज पुनः आपणास बडवणार. अगोदरच त्यास धाडस म्हणजे काय हें ठाऊक नव्हतें. त्यांतून नुकतेच युद्धांत हात चांगले पोळून निघाल्यामुळें पुनः त्या भानगडींत पडूं नये, अशी त्याची मनोदेवता त्यास शिकवीत होती. उलट यशवंतराव होळकराचा त्याजकडे एकसारखा लकडा चालू होता, कीं झालें तें सर्व विसरून तुम्ही एकदम कंबर बांधून मला सामील व्हा. तुम्ही, मी व भोसले एक झाल्यावर इंग्रजांची बिशाद काय ? त्यांना तत्काल उखडून देऊन आपण मराठशाहीचा पुनः उद्धार करूं. बाजीरावाचेंही सिंद्यास असेंच अंतस्थ प्रोत्साहन होतें. सर्व शहाणे व जाणते लोक दौलतरावास दोष देऊन राज्य इंग्रजांचे घरांत घातल्याबद्दल त्याची नाचक्की करीत होते. सर्जेराव घाटग्यासारखे विकृष्ट सल्लागार सुद्धां या वेळीं होळकरास सामील होण्याविषयीं दौलतरावास टोंचणी लावीत होते. अशा या भयंकर ओढाताणींत त्या बेहिमती दौलतरावानें आपला निभाव कसा करावा ? मतिभ्रष्ट माणसाला यांत तोड एकच; ती ही कीं ज्या वेळीं जें सुचेल तें बोलावें, थाप द्यावी, लपून बसावें, कसेंही करून आतांचा प्रसंग निभवावा; उद्यांची बात उद्यां. तात्पर्य, एकच व्यवस्थित धोरण इतउत्तर दौलतरावानें ठेविलें नाहीं. जसा प्रसंग नाचवील, किंवा जो कोणी प्रसंगीं त्यास जिकडे ओढील, तिकडे जाण्यापलीकडे दुसरें कांहीं त्यानें केलें नाहीं. इ. स. १८०४ व १८०५ या दोन सालांत दौलतरावाची काय अवस्था होती तिचें स्वरूप हें असें आहे. दौलतरावाचा हा स्वभाव पूर्णपणें ओळखून त्याचा भरपूर फायदा पदरांत पाडून घेण्याचें कार्य रेसिडेंट माल्कमनें मात्र चांगलें केलें. एक तर त्यास

' महाराज महाराज ' म्हणून नेहमीं त्यानें चढवून धरलें. त्यास घटकेंत चढवावें, घटकेंत दाबावें, थोडा धाक दाखवून त्यास नरम करावें, असा प्रकार माल्कमनें सारखा दीड वर्ष चालविला. या गोष्टी मनांत चांगल्या उतरण्यास ग० ज० नें इंग्लंडचे सरकारास वेळोवेळीं या दोन वर्षांत हजार पांचशें छापील पानांचे जे भरपूर वृत्तान्त लिहून पाठविलेले उपलब्ध आहेत, तेच वाचले पाहिजेत. मराठी कागदांत या हकीकती कोठेंही नमूद नाहींत. या वेळच्या अंतस्थ राजकारणांची गुंतागुंत एवढी अवघड आहे, कीं तिची स्पष्टता करण्यास पुष्कळ गोष्टींचें अनुसंधान ठेवून विषय-विस्तारही बराच करावा लागणार आहे.

स. १८०४ त कर्नेल मरे उज्जनीला पोंचला तेव्हां, ' त्याचे मदतीस तुम्ही आपलें घोडदळ ताबडतोब पाठवा आणि स्वतः तुम्ही आपली सर्व फौज घेऊन बऱ्हाणपुर सोडून एकदम उज्जनीस निघून जा, ' असा लकडा इंग्रजांनीं दौलतरावास लाविला. मुख्यतः यशवंतरावाशीं चालणारें युद्ध घोडदळाच्या गमिनी काव्यानें होणार, पावसाळ्यांत अवघड ठिकाणीं तोफखान्याचा व पायदळाचा निभाव लागणार नाहीं हें ओळखून, होळकराशीं सामना करण्यास दौलतरावाचें रिकामें बसलेलें घोडदळ पुढें आणावें आणि सिंदे होळकरांचा झगडा जुंपवून देऊन पुनः सिंद्याचें संरक्षण केल्याचें श्रेय आपण मिळवावें, असा हा इंग्रजांचा डाव होता. क० मरे उज्जनीस आला, तेव्हां तेथें अंताजी गिरिधर नांवाचा सिंद्याचा कारभारी होता, त्याला मरेनें निकड लावली, कीं सिंद्याचें घोडदळ एकदम आणा; निदान पेंढाऱ्यांची फौज तरी पाठवा. परंतु ती फौज कांहीं केल्या येईना. बापूजी सिंद्यास दौलतरावाचे हुकूम गेले, कीं तुम्हीं ताबडतोब जाऊन मरे यास सामील व्हावें ? परंतु हुकूम पोंचण्यापूर्वीच बापूजी सिंदे यशवंतरावाकडून खर्चास घेऊन इंग्रजांविरुद्ध त्यासच सामील झाला होता. खरें पाहतां सिंद्याची मुख्य अडचण पैशाची होती, इच्छेची नव्हती. सर्व फौज व कंपू अहोरात्र त्याजपाशीं धरणें धरून बसले होते. सर्वत्र अंदाधुदी माजल्यामुळें जमेच्या नांवानें पूज्य होतें. आज तीन चार वर्षें सारखे युद्धप्रसंग चालू असल्यामुळें त्याचा खर्च अतोनात वाढला होता. सावकार सुद्धां कोणी उभा राहीना. प्रत्यक्ष दौलतरावासही सारखे उपास पडत होते. अशा स्थितींत पोटास मिळाल्याशिवाय फौज बाहेर कशी पडणार ? गया वयां करून इंग्रज रेसिडेंटाची समजूत पाडण्यासच दौलतरावास नाकीं नव येत होते. कर्ज द्या, मुलूख गहाण घ्या, पण कसेंही करून खर्चास द्या, हेंच तो सारखा इंग्रजांकडे मागत होता. इंग्रज तरी पैसा कोठला आणणार ? सारखीं युद्धें चालू राहिल्यामुळें तेही

अगदीं टेकीस आले होते. यास्तव दौलतरावाचा पाय बऱ्हाणपुरांतून निघेना किंवा फौजही बाहेर पडेना. तेव्हां मरेनें उज्जनजवळ इंदूर वगैरे जे प्रदेश होळकराचे होते ते एकदम आपल्या ताब्यांत घेऊन सिंद्याच्या कामगारांच्या हवालीं केले. मरे यास गायकवाडाकडून मदत येणार होती, पण तेथेंही पैशाची अशीच हाकाटी असल्यामुळें, तिकडील फौजही येऊं शकली नाहीं. स. १८०४ चे पावसाळ्याचे दोन तीन महिने मरे यानें उज्जनीस काढून फौजेची बरीचशी तयारी केली; आणि १८ ऑक्टोबर रोजीं उज्जन सोडून तो निघाला, तो ११ नोव्हेंबरास मंदसोर येथें पोंचला. मंदसोर जवळ नारायणगड, मल्हारगड व रामपुरा हे तीन होळकराचे किल्ले होते ते त्यानें हस्तगत केले. येणेंप्रमाणें होळकराचा माळव्यांतील सर्व प्रदेश इंग्रजांच्या हस्तगत झाला. पुढें चाल करून मरे ३० नोव्हेंबर रोजीं मुकुंदरा खिंडींत येऊन तेथून पुढें डिसेंबर अखेरीस तो नरवरनजीक शहाबाद येथें पोंचला.

इकडे बऱ्हाणपुरास इंग्रज रेसिडेंट दौलतरावाजवळ फौजेची मागणी सारखी करीतच होता. अशा संधींत होळकराचे वकील दौलतरावाकडे आले. अर्थात् त्यांची गांठ घेऊन बोलणें करणें दौलतरावास भाग पडलें. ही गोष्ट रेसिडेंटास समजली. त्यानें लगेच दौलतरावास धमकावणी दिली कीं, ‘यशवंतराव आमचा शत्रु, त्याच्याशीं आमचें युद्ध चालू आहे, अशा वेळीं त्याच्या वकिलांस तुम्ही आपल्याजवळ ठेवणें मुनासब नाहीं. त्यांस एकदम काढून द्या. नाहीं तर तुम्ही सुद्धां होळकरास सामील आहां असें मानणें आम्हांस भाग पडेल.’ दौलतरावानें कळविलें, कीं आमचे वकील यशवंतरावाकडे आहेत, ते परत आल्याशिवाय आम्हांस यशवंतरावाचे वकिलांस काढून देतां येत नाहीं. दौलतरावास तगादा करण्याचा हा देखावा इंग्रजांनीं मुद्दामच जोरानें चालविला होता. त्यांस मोठी दहशत एकच होती कीं, ‘हा वेडा पीर दौलतराव यशवंतरावाच्या जाळ्यांत सांपडून एकदम भलतेंच कृत्य अंगावर घेऊन होळकरास सामील झाला तर पंचाईत पडेल.’ तसें होऊं नये म्हणून त्यांनीं त्याजपुढें असें आमिष ठेविलें कीं, ‘आम्ही यशवंतरावाचा जो मुलूख जिंकून घेऊं त्यांतला बराच मोठा भाग तुम्हांस देऊं. गोहद व ग्वाल्हेर हीं तुमचीं ठिकाणें कितीही भानगडी झाल्या तरी तुमचीं तुम्हांस परत देऊं. इतकेंच नव्हे तर हीं ठिकाणें तुमच्या हातून गेल्यापासून तीं परत येईपर्यंत तुमचें जें काय नुकसान होईल, तेंही आम्ही भरून देऊं.’ अर्थात् एवढें मोठें आमिष पुढें दिसल्यावर दौलतरावाची काय छाती होती कीं यशवंतरावास जाऊन मिळावें! होळकराशीं युद्ध होण्याच्या संधीस माल्कम

यास जरूरीच्या कामासाठीं ग० ज० नें बऱ्हाणपुराहून कलकत्त्यास बोलाविलें. ता. १८·५·१८०४ रोजीं कलकत्त्यास निघतांना रजा घेण्यासाठीं त्यानें दौलतरावाची भेट घेतली. त्या वेळीं, ' यशवंतरावाचे वकील काढून द्या, नाहीं तर भलताच प्रसंग तुमच्यावर ओढवेल, असें त्यानें दौलतरावास विशेष बजाविलें. ' नाहीं–होय ' करतां दौलतरावानें ती गोष्ट कबूल केली. माल्कमचे जागीं जोशाया वेब येऊन दाखल झाला; आणि त्याचा दुय्यम म्हणून जेन्किन्स हा गृहस्थ नेमिला गेला. ३० मे रोजीं माल्कमास पुनः भेटीस बोलावून दौलतरावानें कळविलें कीं, 'यशवंतरावाचे वकील आम्हीं काढून दिले असून आतां ता. २ जून रोजीं बऱ्हाणपुर सोडून युद्धांत इंग्रजांचें साह्य करण्यासाठीं आम्ही निघणार. याप्रमाणें बेत ठरला तरी पुढें कैक महिने पावेतों सिंद्याचा पाय तेथून निघाला नाहीं. इतक्यांत बापूजी सिंदे होळकरास सामील झाला ही तक्रार रेसिडेन्टानें दौलतरावाकडे केली. त्या वेळीं दौलतराव म्हणाला, ' मी तरी काय करणार ? आम्ही इतक्या दूर अंतरावर आहों. आमचा हुकूम हे अमलदार मानीत नाहींत, त्यास आम्हीं काय करावें ?' रेसिडेंट म्हणाला, 'म्हणूनच तर तुम्ही एकदम निघून उज्जनला चला. ' सिंदे म्हणाला, ' तुम्ही म्हणतां तें खरें, पण खर्चास मिळाल्याशिवाय आमचा पाय येथून कसा निघावा ? तुम्हीं आमचे धोलपुर वगैरे परगणे तारण घेऊन कांहीं कर्ज द्याल तरच निभाव लागेल.' दुसरी एक गोष्ट दौलतरावानें सुचविली ती अशी कीं, ' आम्ही स्वतः युद्धांत सामील होण्यासाठीं उत्तरेंत आलों तर तुमच्या व आमच्या सर्व फौजेचें आधिपत्य आमचेकडे असलें पाहिजे, तरच आम्ही हें युद्ध यशस्वी करून दाखवूं. ' अशी अनेक वार वाटाघाट होऊन शेवटीं दौलतरावाचा प्रदेश ताब्यांत घेऊन त्यास सहा लाख रुपये कर्ज देण्याचा ग० ज० चा हुकूम रेसिडेंटानें आणिला. यशवंतराव होळकर जरी इंग्रजांशीं निकरानें लढत होता, तरी दौलतरावासारख्यास मध्यस्थीस घालून आपली व काशीरावाची कांहीं तरी सुव्यवस्था इंग्रजांकडून लावून घ्यावी, आणि युद्धांत सांपडलेला हात सोडवून घ्यावा, अशी त्याचीही इच्छा नव्हती असें नाहीं. इकडे वस्लीबंधूंनाही युद्धांतून अंग काढणें इष्टच वाटत होतें. विशेषतः आर्थर वस्ली कलकत्त्यास गेल्यापासून त्यानें तेथून समेटाचा डाव आरंभिला; आणि त्यासंबंधीं दौलतरावाचा अंदाज काढा असें रेसिडेंटाला लिहिलें. त्यावरून दौलतावानें अशी सूचना केली, कीं ' अमृतराव पेशव्याप्रमाणें यशवंतराव होळकराला खर्चापुरती जहागीर नेमून द्यावी आणि काशीराव वगैरे जे दौलतीचे हकदार असतील त्यांच्याही स्वतंत्र नेमणुका बांधून द्याव्या; आणि बाकीचा होळकरांचा प्रदेश

तुम्हीं व आम्हीं वांटून घ्यावा.’ समेटाच्या या सूचना युद्धारंभींच सुरू झाल्या होत्या. पण पुढें पावसाळ्यांत यशवंतरावानें जेव्हां मॉन्सन यास मुकुंदरा खिंडींत चोपून काढिलें, तेव्हां त्याचा पहिला नूर सर्वस्वी पालटला. त्याचा चेला हरनाथसिंग व दोस्त मीरखान हे दोघे शूर व खंबीर पुरुष पाहिजे तें साहस करून यशवंतरावाची सरशी करण्यास झटत होते. यशवंतरावानें मॉन्सनला चेपलें त्याच सुमारास हे सर्व एकत्र जमले, आणि पुढील युद्धाचा विचार त्यांनीं एकमतानें ठरविला. हरनाथसिंगानें उज्जन प्रांतांतून पुष्कळ लूट मिळवून आणिली. मीरखानानें सिंद्याचा भेलसा प्रांत हस्तगत केला, आणि खुद्द यशवंतरावानें मॉन्सनची दुर्दशा केली. एवढे पराक्रम गाजविल्यावर अल्प नेमणुका घेऊन सारी दौलत गमावण्यास यशवंतराव होळकर कसा तयार होणार?

पुढें सेप्टेंबरचे आरंभीं दौलतराव सिंदे बऱ्हाणपुर सोडून निघाला, तेव्हांपासून हलके हलके मजला करीत तो नर्मदेवर आला. निघतांना विचार उज्जनीस जाण्याचा होता; आणि बरोबर रेसिडेंट होता त्यासही तसेंच वाटत होतें. पण नर्मदेवर आल्यावर सिंद्यानें उत्तरेस न जातां नर्मदा कांठानें पूर्वेकडे कूच चालविलें; आणि हुशंगाबादे-जवळ नदी उतरून बुंदेलखंडांत जाण्याचा विचार ठरविला. ही चलबिचल पाहून रेसिडें-टास अत्यंत आश्चर्य वाटलें. हुशंगाबाद व जवळचे कांहीं परगणे भोपाळच्या नबाबाचे स. १७९५ च्या सुमारास रघूजी भोसल्यानें जिंकून घेतले होते, ते आपले आपणास परत मिळावे अशी नबाबाची मोठी उत्कंठा होती. स. १८०३ सालीं सिंदेभोसल्यांचें इंग्रजांशीं युद्ध जुंपलें ती संधि साधून भोपाळकरानें हुशंगाबादचे परगणे भोसल्याचे ताब्यांतून परत घेतले, ते पुनः आपले आपणास परत मिळावे अशी भोसल्याची खटपट चालू झाली. त्या साल अखेर तह झाल्यावर भोसल्यानें दौलतरावाकडे बोलणें चालविलें, कीं कसेंही करून हुशंगाबादचा प्रांत आमचा आम्हांस परत देववावा. यासंबंधानें कांहीं गुप्त करार भोसले सिंद्याचा झाला असावा असा सुगावा रेसिडेंटास लागला, आणि हुशंगाबाद जिंकण्यासाठीं सिंद्याची स्वारी उज्जनकडे न जातां पुढें पूर्वेकडे चालली आहे असें त्यानें ताडलें. नर्मदेवर मुक्काम आला तेव्हां सर्जेराव घाटग्याची स्वारी दक्षिणेंतून एकदम सिंद्याचे छावणींत प्रगट झाली. आदल्या वर्षीं दौलतरावानें त्यास आपल्या जवळून काढून दिल्यावर मराठे सरदारांची जूट जमवून इंग्रजांचा पाडाव करावयाचा उद्देश धारण करून, तो सिंद्यास सोडून दक्षिणेंत गेला. तिकडे बाजीरावादि सर्व मंडळीचा अंदाज काढून सर्जेराव आतां सिंद्याकडे परत आला. तो येतांच सिंद्याजवळ त्याची चलती सुरू झाली. खुद्द दौलतराव त्याजपुढें नमून

वागत असल्यामुळें इतरांस तो पाहिजे तसा वांकवी यांत नवल काय ! घाटग्याचीं हीं कारस्थानें सुरू होतांच भोपाळच्या नबाबाचे वकील इंग्रजांकडे पत्रें घेऊन आले, आणि रेसिडेंटास म्हणूं लागले कीं, ' सिंदे हुशंगाबादेवर चालून येतात. भोसल्यापासून भली मोठी रक्कम घेऊन सिंद्यानें हे आपले परगणे जिंकून भोसल्यास देण्याचा करार केला आहे. या कामीं इंग्रजांची फौज सुद्धां सिंद्याची मदत करणार असा आमचा तर्क आहे. तर इंग्रजांनीं आमचेवर कृपा करून आमचा सांभाळ करावा; आणि आमचे परगणे हातून जाणार नाहींत अशी तजवीज ठेवावी.' वकिलांचें म्हणणें ऐकून घेतल्यावर रेसिडेंटाची खात्री झाली, कीं कांहीं तरी जंगी कारस्थान मराठ्यांचें शिजतें आहे. सिंदे भोसल्यांचें संगनमत होऊन त्यांचे आपसांत गुप्त करार ठरले असावे; मग ते सर्वांनीं मिळून इंग्रजांस घालवून देण्याचे असोत, किंवा नुसती लुटालूट करून पैसा जमविण्याचे असोत. सर्जेराव घाटगे परत आल्यावर तर रेसिडेंटाचा हा समज चांगलाच बळकट झाला. याचा निकाल करून घेण्यासाठीं ता. ११·८·१८०४ रोजीं रेसिडेंटानें मुद्दाम दौलतरावाची गांठ घेतली आणि स्पष्ट सवाल केला, कीं ' अलीकडे सर्जेराव घाटग्याचीं तुमचीं इतकीं गुप्त खलबतें रोजरोज काय चाललीं आहेत; या खलबतांत यशवंतराव होळकराचे वकील तुमच्याकडे कशासाठीं येतात आणि पुढें तुमचा विचार काय आहे ? घाटग्याचा महाखटपटी व दुष्टस्वभाव तुम्ही चांगला ओळखतां. मानापमान, न्यायान्याय इत्यादींची घाटग्यास बिलकूल क्षिति वाटत नसून साधी माणसकी सुद्धां त्याच्या ठिकाणीं नाहीं. वाटेल त्या अनन्वित कृत्यांनीं स्वतःची तुंबडी भरण्यापलीकडे तो कांहीं जाणत नाहीं. आजपावेतों अत्यंत नीच वर्तनानें त्यानें आपल्या तोंडास कायमचा काळिमा लावून घेतला आहे. तुम्हींच त्यास गुदस्तां काढून देऊन पुनः त्याचें दर्शन नको असा निश्चय केलात. असें असतां या गृहस्थास फिरून तुम्ही जवळ आणतां याचा अर्थ काय ? एकदां चांगला अनुभव आल्यावर पुनः तोच मार्ग स्वीकारण्यांत तुम्हीं आपला काय फायदा पाहिला ?' असे प्रश्न दरडावून रेसिडेंटानें विचारतांच दौलतरावानें उत्तर केलें कीं, " तुमचे आमचे करार ठरले आहेत त्यांत यत्किंचित् तफावत करण्याची आमची इच्छा नाहीं; आणि तुम्हीं नाहक भलतेच कुतर्क मनांत आणूं नयेत. होळकराशीं आमचें सख्य होईल अशी कल्पना सुद्धां तुम्हीं करूं नये. सर्जेराव घाटगे कसे झाले तरी आमचे नातेवाईक पडले. त्यांस आपल्याप्रमाणेंच आम्ही देखील पूर्णपणें ओळखतों. आम्हीं त्याची कांहीं तोड काढावी म्हणून ते येथें आले आहेत, तेव्हां त्यांचे खटपटीनें आम्ही आपले

विचार अगर करार बदलूं असें घडणार नाहीं. त्यासंबंधानें आपण निश्चिंत असावें. आम्ही कांहीं त्यांस कारभारावर नेमीत नाहीं. कारभार बापू विठ्ठल करीत आहे, त्याजवर आमचा पूर्ण भरंवसा आहे." पुनः ता. ८·९·१८०४ रोजीं रेसिडेंट व दौलतराव यांची भेट होऊन वरच्याच प्रकारची चर्चा झाली. या वेळीं मॉन्सनची वाताहत झाल्याची बातमी चहूंकडे आल्यानें सिंद्याच्या हालचालींवर रेसिडेंटाची नजर जरा जास्त कडक होती. सेप्टेंबर महिन्यांत सिंद्याचा कारभारी बापू विठ्ठल आजारी पडून बऱ्हाणपुर येथें मरण पावला. तो आज बरेच दिवस दुखणाईत झाला असून इंग्रजांशीं सख्य ठेवण्याची आपल्याकडून पराकाष्ठा करीत होता. तो मरण पावतांच पुनः दरबारांत चलबिचल सुरू होऊन सर्जेरावाचा जोर वाढत चालला. यशवंतराव होळकराकडे सर्जेरावाचें संधान सारखें चालू होतें, तें रेसिडेंटास दुःसह वाटूं लागलें; आणि 'होळकराशीं तुम्ही कसें वर्तन ठेवणार,' या प्रश्नाचें समाधानकारक उत्तर न देतांच सेप्टेंबरचे आरंभीं जेव्हां दौलतराव आपल्या सर्व लव्याजम्यानिशीं बऱ्हाणपुर सोडून उत्तरेकडे निघाला, तेव्हां आपण कोठें जाणार, कोणत्या मार्गानें जाणार, याचीही त्यानें रेसिडटास दाद लागूं दिली नाहीं. तेव्हां रेसिडेंटानें दौलतरावास लिहून कळविलें, कीं 'तुम्हीं चोळी मेहश्वराहून थेट उज्जनीस जावें हें उत्तम. म्हणजे क० मरे आपल्या फौजेसह येऊन तुम्हांस नर्मदेवर भेटतील. परंतु हुशंगाबादेकडे जाल तर तुम्हांस मरेच्या फौजेचा आश्रय मिळणार नाहीं.' या पत्रास दौलतरावानें जबाब दिला नाहीं. उत्तरोत्तर रेसिडेंटाचे बोलण्याकडे तो जास्तच दुर्लक्ष करूं लागला. तेव्हां आतां सिंद्याकडे कोणताही जबाब न विचारतां पुढें कसें धोरण ठेवावें याचा हुकूम रेसिडेंटानें ग० ज० कडून मागविला. या बाबतींत जो विशेष महत्त्वाचा खलिता रेसिडेंट वेब यानें ता. १·१०·१८०४ रोजीं ग० ज० कडे रवाना केला, त्यांत दौलतरावाच्या कारभाराचें त्यानें संपूर्ण विवेचन केलें आहे.

यशवंतराव होळकराचे उद्योगास जसजसें यश येत चाललें तसतशी हिंदी सत्ताधीशांचे मनाची चलबिचल वाढत चालली. नागपुरचे दरबारींही रघूजी भोसल्याचे विचार इंग्रजांविरुद्ध उठण्याचे चालू होऊन हुशंगाबाद काबीज करण्याकरतां त्यानें आपली कांहीं फौज नर्मदेवर आणिली. हुशंगाबाद परगणा परत घेण्याच्या बाबतींत बोलणें करण्याकरितां रघूजी भोसल्यानें बाळाजी यशवंत यास दौलतरावाकडे पाठविलें होतें. सिंदे हा त्याच बाजूस कूच करून जाऊं लागला. परंतु सिंद्याशीं एकदम चढाईचें धोरण ग० ज० नें स्वीकारिलें नाहीं. इंग्रजांस हा प्रसंग आणीबाणीचा

होता. तेव्हां नमतें घेऊन निभावून घेण्याचें धोरण ठेवावें असें त्यानें रेसिडेंटास लिहिलें. पण हें धोरण सांभाळण्याचें दिवसेंदिवस रेसिडेंटास जड पडूं लागलें. कूच चाललें असतां एकदम दौलतरावानें आगाऊ वर्दी रेसिडेंटास दिल्याशिवाय हुशंगाबादेचा मार्ग धरला. त्या दिवशीं रेसिडेंटाची प्रकृति नादुरुस्त होती, म्हणून तो कांहीं दिवस मागें राहिला. पुढें शिवनी येथें त्यांची गांठ पडली, तेव्हां दौलतरावाची फौज भोपाळचे मुलुखावर चालून जाण्यास सिद्ध झाली होती; आणि त्याची सर्व देखरेख खुद्द सर्जेराव घाटगे करीत होता. तेव्हां रेसिडेंट वेब यानें जेन्किन्स यास घाईघाईनें दौलतरावाकडे पाठवून कळविलें, कीं 'इंग्रजांशीं तुमचा दोस्तीचा करार असतां त्यांस कळविल्यावांचून त्यांच्या दोस्तावर युद्ध करणें तुम्हांस रास्त नाहीं.' त्यावर दौलतरावानें जबाब दिला, कीं 'भोपाळचा नबाब आमचा मांडलिक आहे; आणि त्याच्याशीं कसें वर्तन ठेवावें तें आम्ही जाणतों, इंग्रजांनीं त्यांत मध्यस्थी करण्याचें कारण नाहीं. आम्हांस पैशाच्या अडचणीमुळेंच हुशंगाबादच्या मार्गानें जाणें भाग पडत आहे; आणि शक्य तितक्या लवकर फौज जमवून आम्ही इंग्रजांस सामील होऊन होळकरावर चालून जाणार.'

रेसिडेंट वेब याची प्रकृति कांहीं दिवस नादुरुस्त होती. दुखण्याचा विकोप होऊन हुशंगाबादेनजीक ता. ९·११·१८०४ रोजीं त्याचा काळ झाला. ता. १·५·१८०४ रोजीं माल्कमचे जागीं तो दौलतरावाचे दरबारीं दाखल झाला; आणि सहा महिने काम केल्यावर मरण पावला. तो फार हुशार म्हणून नांवाजलेला होता. दौलतरावाजवळ काम करणें जोखमीचें असल्यामुळें त्याचे जागीं ग० ज० नें पुण्याचा कर्नल क्लोज याची नेमणूक केली. पण क्लोज यास नागपुरास वगैरे जावें लागल्यामुळें तो या नवीन कामावर रुजू होऊं शकला नाहीं. जेंकिन्स असिस्टंट होता तोच काम पाहूं लागला. क्लोजचे जागीं पुण्यास सिडनहॅमची नेमणूक करण्यांत आली.

इकडे सर्जेराव घाटगे व दौलतराव या दोघांची आतां पूर्ण खात्री झाली, कीं बाजीरावाचे नादास लागून आपला घात झाला. त्यांत घाटग्याचा बोभाटा आधींच देशभर झाला होता कीं हाच विघ्नसंतोषी व घरबुडव्या. युद्ध सुरू होण्यापूर्वी अंबूजी इंगळ्यानें त्यास दौलतरावाजवळून दूर करविलें. तेव्हां तो जून स. १८०३ त कोल्हापुरास आला. नंतर त्यानें 'बाजीरावाकडे पैगाम लावून पुण्याच्या कारभारांत येण्याचें सिद्ध केलें. घाटग्यांबरोबर बाळाजी जनार्दन जांबगांकराचे बंधु बापू जनार्दन आहेत. घाटग्यांकडून बंडवाल्यांचीं वगैरे पारिपत्यें करून राज्याचा बंदोबस्त करावा.

असा श्रीमंतांचा बेत आहे. कांहीं दिवस वाटाघाट होऊन ता. २४·९·१८०३ रोजीं सर्जेरावानें चारशें लोकांनिशीं पुण्यास येऊन श्रीमंतांचें दर्शन घेतलें. श्रीमंत यांची तारीफ बहुत करितात, कीं यांचे तोडीचा मनुष्य नाहीं. नंतर घाटग्यानें थोडीबहुत फौज जमवून बाजीरावाच्या नावडत्या मंडळीची खोड मोडली.' पुढें इंग्रजांचें युद्ध संपून सिंद्याची वाताहात झाली तेव्हां सर्जेराव फिरून दौलतरावाकडे गेला. स. १८०४ च्या सबंध वर्षांत सिंदे होळकरांनीं मिळून पुनः इंग्रजांस नरम करण्याची सारखी खटपट घाटग्यानें सिंद्याजवळ राहून केली, त्यामुळें सिंद्याजवळ इंग्रज रेसिडेंट जेंकिन्स होता, त्याचें व घाटग्याचें वांकडें आलें. स. १८०५ च्या जानेवारींत सागर नजीक सिंद्याचा मुक्काम असतां एके रात्रीं पेंढाऱ्यांनीं रेसिडेंटाचा गोठ लुटून त्यास अटकेंत ठेविलें. हें प्रकरण हळूहळू विकोपास जाऊन ग० ज० नें सिंद्यास धमकावणी दिली, कीं घाटग्यास तुम्ही दूर करा, नाहीं तर आम्ही तुमच्यावर एकदम शस्त्र धरूं. रेसिडेंटास तर सिंद्यानें प्रथमच सोडून दिलें होतें, परंतु पुढें नाइलाजास्तव घाटग्यासही दूर करणें त्यास भाग पडलें. पुढें तीन वर्षें घाटगे बाहेर बाहेर होळकराकडे वगैरे संधानें लावीत होता. जेंकिन्सच्या अटके संबंधानें ओवेनकृत वेलिंग्टनचे खलिते ले. २१८ व २३१ पृ. ३७७ व ४०६ हे अवश्य वाचण्यालायक आहेत.

जेन्किन्स यास बातमी कळली, कीं सर्जेराव घाटगे याचा पत्रव्यवहार होळकर व त्याचे साथीदार मीरखान वगैरेशीं सारखा चालला असून, तो इंग्रजांविरुद्ध मोठा उठावा करीत आहे. यशवंतरावानेंही या वेळीं असा पुकारा केला, कीं इंग्रजांविरुद्ध सर्व हिंदु दौलतदार उठले असून सर्वांनीं मिळून एकदम त्यांचा पाडाव केला तरच आपला निभाव आहे. यशवंतरावाच्या या सुनावणीस नागपुराहूनही जोराचा पाठिंबा मिळाला. अशा रीतीनें ज्यांनीं त्यांनीं आपले गेलेले प्रदेश परत मिळविण्याचा उद्योग चालविला. या बातम्या ग० ज० नें पुण्यास क्लोज यास कळवून सर्जेरावाविषयीं सावध राहण्यास सुचविलें; आणि इकडे जेकिन्स यास लिहिलें, 'तुम्हीं प्रथम दौलतरावाकडे जाऊन दोन गोष्टी करा. एक त्यानें एकदम उठून उज्जनीस जावें; व दुसरी सर्जेरावास दूर करावें.' हें धमकावणीचें पत्र येतांच रसिडेंट जेन्किन्सनें दौलतरावाची भेट घेऊन त्यास आपले सर्व संशय खुलासेवार कळविले. दौलतराव बोलला, 'तुम्ही आपल्या मनांत भलतेच कुतर्क लढवितां हें बरोबर नाहीं. माझी निष्ठा इंग्रजांचे ठायीं अढळ आहे. ती केव्हांही बदलणार नाहीं. मी मुद्दाम पूर्वेकडील मार्गानें जात आहें, याचें कारण माळवा प्रांत होळकरानें उद्ध्वस्त केल्यामुळें तिकडे आपणास फौजेची

सिद्धता करतां येणार नाहीं. बुंदेलखंडांत फौजा लगेच उभारतां येतील. रघूजी भोसले इंग्रजांविरुद्ध उठल्याची बातमी अशीच साफ खोटी आहे. सर्जेराव उपद्व्यापी आहे खरा, पण त्याच्या बोलण्यावर विश्वास ठेवून नवीन साहस अंगावर घेण्यास कोणासच छाती होणार नाहीं.' या उत्तरानें इंग्रजांची संशयनिवृत्ति झाली नाहीं. कारण वारंवार तशींच कांहीं तरी कारणें घडत गेलीं. स० १८०४ च्या डिसेंबर महिन्यांत अमृतराव पेशवे काशीस जाण्याकरतां उमरावतीस आला, तोसुद्धां कपटानें वागत असून विरुद्ध कारस्थानांत सामील आहे असा इंग्रजांस संशय आला. पण अमृतराव दुसऱ्या भानगडींत न पडतां तसाच निघून पुढें काशीस गेला, तरी रघूजी भोसल्याच्या हालचालींची खरी बातमी काढण्याकरितां ग० ज० नें क्लोज यास सन १८०५ च्या जानेवारींत मुद्दाम पुण्याहून नागपुरास पाठविलें. नागपुरास एल्फिन्स्टन होताच. त्या दोघांनीं पूर्ण तपास करून हकीकती लिहून पाठविल्या. त्यावरून दिसून आलें कीं ग० ज० वेल्स्लीचें मन निष्कारण संशयग्रस्त झालें आहे. वास्तविक त्याचेंच मन त्यास खात होतें. त्याला वाटे, आपण जो एवढा व्यूह रचला तो सर्व ढांसळून पडणार. समस्त हिंदी दौलतदार आपल्या विरुद्ध उठून इतके दिवस केलेला उद्योग हाणून पाडणार. असा परिणाम होऊं नये म्हणून ग० ज० ची वरील सर्व धडपड चालू होती. त्यासाठीं नेभळट दौलतरावास त्यानें खालील युक्तीनें सर्वस्वी वश करून घेतलें. त्याला पैशाची मोठी अडचण पडली आहे हें पाहून ग० ज० नें त्यास कळविलें, 'धोलपुर वगैरे तुमचे कित्येक परगणे तारण घेऊन आम्ही तुम्हांस रुपये ६ लाख पावेतों रक्कम कर्ज देऊं.' स० १८०४ च्या डिसेंबरांत सिंद्याची स्वारी नर्मदेच्या दक्षिण कांठानें चालली असतां मार्गांत ता. ६·१२·१८०४ रोजीं डीगच्या लढाईंत यशवंतरावाचा पाडाव होऊन इंग्रजांस जय मिळाला ही बातमी जेंकिन्सला कळली. त्याबरोबर त्यानें दौलतरावाची गांठ घेऊन कर्जाऊ रकमेची मंजुरी व डीग येथील विजय ह्या दोन आनंदाच्या बातम्या दौसतरावास कळविल्या. तो म्हणाला, 'आतां फक्त एकच गोष्ट तुम्ही करा, म्हणजे तुमच्या आमच्या दोस्तींत बिलकूल व्यत्यय येण्याचें कारण राहणार नाहीं. ती गोष्ट ही कीं सर्जेरावास कारभारांतून काढा.' दौलतरावानें कळविलें, 'विचार करून उत्तर देतों.' त्यानंतर नर्मदा उतरून दौलतराव हुशंगाबाद भेलशावरून ता. ६·१·१८०५ रोजीं सागरजवळ येऊन पोंचला. त्या ठिकाणीं दौलतरावानें रामचंद्र भास्करास रेसिडेंटाकडे पाठवून कळविलें कीं, 'सर्जेरावास दूर करण्याचें आम्हीं ठरविलें आहे. इतःपर आम्ही सर्वस्वी तुम्ही सांगाल त्याप्रमाणें वागूं.

मात्र कर्जाऊ रक्कम लगोलग द्यावी.' पण रेसिडेन्टानें, कळविलें ' सर्जेराव निघून गेल्याशिवाय रक्कम मिळणार नाहीं.' याच वेळीं जीन बॅप्टिष्ट याचा कंपू कामगिरीवर होता तो दौलतरावास सागर येथें येऊन मिळाला.

आपल्या विरुद्ध इंग्रज असें आकाशपाताळ एक करीत आहेत ही गोष्ट सर्जेरावास कळल्याशिवाय राहिली नाहीं. तोही कांहीं कमी खटपटी नव्हता. रेसिडेंटाची थोडी बहुत खोड मोडण्याचा विचार त्यानेंही मनांत आणिला. सागरला येऊन पोंचण्यापूर्वी मार्गांत लष्कराचा मुक्काम असतां ता. २७·१२·१८०४ रोजीं रात्रीं एकाएकीं चोरांच्या टोळीनें रेसिडेंटाच्या दप्तरखान्याच्या तंबूवर हल्ला करून पहारेकऱ्यांस ठार मारून सुमारें बारा हजार किंमतीचा ऐवज लांबविला. ही गोष्ट कोणी करविली त्याचा थांग रेसिडेंटास लागेना. दौलतरावाकडे त्यानें तक्रार केली. त्यानें तपास करून कळविलें, कीं, " चोरी पेंढाऱ्यांनीं केली असून त्या दांडगट लोकांस वठणीस आणण्याचें साधन मजजवळ नाहीं. "

रे—यासाठींच तुम्ही एकदम निघून उज्जनीस चला. न जाल तर मी तुमची छावणी सोडून जातों.

दौ—अंबूजी इंगळे येथें लवकरच आमच्या भेटीस येत आहेत, त्यांचा सल्ला घेऊन तुम्हांस काय तें सांगतों. तोंपावेतों तुम्हीं असे निघून जाऊं नका.

तरी रेसिडेंटानें आपला निश्चय बदलला नाहीं; आणि निघण्याची तयारी केली. तेव्हां दौलतरावानें रामचंद्र भास्करास रेसिडेंटाकडे पाठवून शपथपूर्वक निरोप कळविला कीं, ' ता. १६·१·१८०५ रोजीं आम्ही उज्जनीकडे कूच करतों.' तथापि रेसिडेंटाची ही चढेलीची अडवणूक पाहून दौलतरावाचें मन अत्यंत चिडून गेलें. इतक्यांत अंबूजी ईंगळ्यानें आमची आगळिक केली आहे त्यास तुम्ही शिक्षा करा, अशी मागणी रेसिडेंटानें केली. तेव्हां दौलतरावास दम निघेना. त्यानें रेसिडेंटाशीं बोलणेंच सोडलें. त्यावरून ता. २३-१-१८०५ रोजीं रेसिडंट दौलतरावाच्या छावणींतून कांहीं अंतरावर निघून गेला. त्यास परत आणण्यासाठीं दौलतरावानें माणसांवर माणसें पाठविलीं व विनवण्या केल्या. त्यावरून रेसिडेंट परत येऊन दुसरे दिवशीं दौलतरावास भेटला. मागें पेंढाऱ्यांनीं त्याचे तंबूंत शिरून पुनः त्याचें सर्व सामान लुटून नेलें. त्या गडबडींत दोन इंग्रज अम्मलदार आणि कांहीं सैनिक व नोकर जखमी झाले. हें वर्तमान दौलतरावास कळलें. तेव्हां त्यानें त्याबद्दल आपला खेद व्यक्त केला, आणि नुकसान भरून देण्याचें आश्वासन रेसिडेंटास दिलें. पेंढाऱ्यांचे हे हल्ले बहुधा सर्जेरावानें मुद्दाम करविले असावे असें

ग० ज० स वाटून त्यानें रेसिडेंटास समजूत दिली कीं, 'अतिप्रसंग करून तुम्हीं दौलतरावास चिडवूं नये.' दौलतरावाची मर्जी संभाळून आपला मतलब साधण्याचें काम जेंकिन्सकडून बरोबर होत नाहीं असा ग० ज० चा समज होऊन, त्यानें क० क्लोज याची बदली ताबडतोब सिंद्याचे दरबारीं केली; आणि चोरी करणाऱ्या गुन्हेगारांचा तपास करून त्यांस शिक्षा करा व झालेलें नुकसान भरून द्या, अशी नेटाची मागणी सिंद्याकडे केली. अशा प्रकारें एक महिना बोलाचालींत निघून गेला. ता. २४·२·१८०५ रोजीं दौलतरावानें उज्जनीस जाण्याच्या रोखानें सागराहून कूच केलें. रस्त्यांत ता. २ मार्च रोजीं दौलतरावानें सर्जेराव घाटग्यास बरोबर घेऊन रेसिडेंटाची भेट घेतली; आणि नम्र भाषणांनीं विनंति केली, कीं 'झालेले प्रकार सर्व आपण विसरून जावे आणि स्नेहभाव पूर्ववत् कायम ठेवावा.' छावणींत असतांच नरवरच्या मुक्कामीं दौलतरावानें बहीण बाळाबाई शितोळे हिच्या मुलाचें लग्न केलें. त्याचा लग्नसोहळा मार्च ता. ७ पासून १४ पावेतों एक आठवडा चालला होता.

दौलतरावाच्या वर्तनावर रेसिडेंटाची सक्त टेहेळणी सुरू झाल्यापासून घासाघीस वाढत जाऊन त्यास स्वातंत्र्य कसें तें बिलकूल राहिलें नाहीं. या स्थितीबद्दल अत्यंत खंति वाटून तो सदैव दुःखी व संतप्त राहत असे. अशा मनःस्थितींत त्यानें यापूर्वीच एक लांबलचक पत्र स्वतः ग० ज० यास लिहून त्यांत सर्व गाऱ्हाणीं नमूद केलीं; आणि न्याय, नीति, वचनें, तह, करार इत्यादि सर्वांस हरताळ फांसून इंग्रजांनीं कसे स्वेच्छाचार चालविले आहेत त्याचें भरपूर माप त्यानें ग० ज० चे पदरांत घातलें. हें पत्र त्यानें आपल्या खास माणसांबरोबर ता. १८·१०·१८०४ रोजीं काशीच्या वाटेनें कलकत्त्यास रवाना केलें. पण तेथें पोंचण्यास त्यांस चार महिने लागले. ग० ज० नें पत्र वाचून लगेच त्यास तसेंच लांबलचक उत्तर लिहून पाठविलें; आणि त्यांत सिंद्यानें केलेले दोषारोप खोडून काढिले. या पत्रांच्या नकला त्यानें माहितीसाठीं इंग्लंडचे सरकाराकडेही पाठविल्या; आणि इकडे दौलतरावाची मार्दवानें समजूत करण्याचा मार्ग मनांत आणून सर्व चाललेल्या तक्रारी तडजोडीनें मिटवून घ्या, कठोर वर्तनानें त्यास चिडवूं नका, सौम्यपणानें त्याची समजूत घाला, असा हुकूम रेसिडेंटास पाठविला. अशा रीतीनें ग० ज० आतां अनुभवानें शहाणा झाला. सर्जेराव घाटग्यास कारभारांतून काढण्याचा हट्ट त्यानें सोडून देऊन त्या संबंधानें एवढेंच कळविलें कीं, 'घाटग्यास कारभारांतून काढणें तुमच्याच हिताचें आहे, परंतु न काढल्यास त्यांत आमचें कांहीं जात नाहीं.' क० क्लोज याजला अनेक

भानगडीचीं कामें पुणें नागपुरकडे करावीं लागल्यामुळें तो दौलतरावाचे दरबारीं येऊं शकला नाहीं. दरम्यान माल्कमची बदली म्हैसुरास झाली होती ती रद्द करून त्यासच पुनः सिंद्याचे दरबारीं ग० ज० नें कलकत्त्याहून नेमून पाठविलें. प्रथम से० लेक यास भेटून नंतर तुम्हीं सिंद्याकडे जावें असा त्यानें माल्कम यास हुकूम दिला. म्हैसूरचे दरबारीं मे० विल्क्स याची नेमणूक करण्यांत आली. ता. २९·४·१८०५ रोजीं माल्कम कलकत्त्याहून निघाला. [ Wellesley Desp IV & V ].

**२ सबळगड येथें मराठमंडळाचा जमाव** (एप्रिल—जून १८०५).- भरतपुरचे जाटाशीं चाललेलें युद्ध दोन तीन महिने जोरांत होतें. त्याचा निकाल लागेना, तेव्हां दौलतरावानें मनांत विचार आणिला, कीं आपणच भरतपुरास जाऊन होळकराचा समेट करून द्यावा. ता. २२·३·१८०५ रोजीं त्यानें रेसिडेंटास निरोप पाठविला, कीं 'आम्ही येथून भरतपुरास जाणार.' हा निरोप ऐकून रेसिडेंटाचें धाबेंच दणाणलें. त्याला भीति पडली, कीं सिंदे भरतपुरास जाऊन जाट व होळकर यां समवेत इंग्रजांवर चढाई करणार. तथापि त्यांस अडवून धरण्याचें सामर्थ्य रेसि-डेन्टांत नव्हतें. सिंद्याचा हा विचार ऐकून ग० ज०नें लेक यास मुद्दाम इशारा दिला कीं, दौलतराव भरतपुराकडे आल्यास त्याच्याशीं अत्यंत नरमाईचें वर्तन करावें, त्यास चिडवून लढाईचा प्रसंग आणूं नये. मात्र होळकर व इंग्रज यांजमधील युद्धांत सिंदे मध्यस्थी करूं म्हणेल तर ती बिलकूल ऐकूं नये. जाटांच्या पराक्रमामुळें सर्व हिंदुस्थानभर इंग्रजांविरुद्ध मोठा उठावा चालू झाला होता, त्याचें वेळींच निरसन व्हावें म्हणून ग० ज० नें पुण्यास क्लोज यास व मद्रास येथील गव्हर्नरास तात्कालिक उपाय योजण्या-साठीं आपले संपूर्ण अधिकार दिले.

भरतपुराकडे रोख वळवून दौलतराव सिंदे ता. २९·३·१८०५ रोजीं चंबळ नदीवर सबळगड येथें दाखल झाला. मुख्य फौज त्याची मागेंच होती. या ठिकाणीं अंबूजी इंगळे येऊन त्यास मिळाला, आणि सगळे मिळून चंबळ उतरून जाणार असा सुमार दिसतांच रेसिडेंटानें पुनः सर्जेरावाची व सिंद्याची एकत्र गांठ घेऊन कळविलें, 'तुम्हीं चंबळ उतरून पुढें जाण्यांत धोका आहे तर बेत रहित करावा.' शिंदे बोलला, 'आम्ही पलीकडे गेल्यानें युद्धाचा फैलाव अधिक होईल ही तुमची समजूत साफ खोटी आहे. आम्ही समक्ष जाऊन यशवंतरावाची समजूत घालतों आणि लगेच युद्ध थांबवितों.' ही गोष्ट रेसिडेंटास पटली नाहीं; परंतु आपलाच हेका चालवून नदीपलीकडे जाण्याचें धाडस दौलतरावानेंही केलें नाहीं. त्यानंतर अल्पावकाशांतच

म्हणजे ता. ११·४·१८०५ रोजीं जाठानें इंग्रजांशीं तह करून युद्धांतून आपलें अंग काढिलें, हें वर्तमान दौलतरावास पोंचल्यावर त्याला भरतपुराकडे जाण्याचें प्रयोजन राहिलें नाहीं. मात्र तह होण्यापूर्वीच सर्जेराव घाटगे यास होळकराची समजूत पाडण्यासाठीं कांहीं फौज बरोबर देऊन दौलतरावानें लगबगीनें भरतपुरास रवाना केलें. यशवंतराव व त्याचे साथीदार मीरखान वगैरेची गांठ सर्जेरावानें घेतली आणि जाट युद्धांतून निघाला, आतां आपण पुढें कोणता मार्ग स्वीकारावयाचा याची वाटाघाट सर्जेरावानें चालविली. फौजा, शौर्य, अक्कल सर्व कांहीं मराठ्यांना असतां, सार्वभौमसत्ता हातची जाऊन इंग्रजांचें जूं मानेवर बसलें, हा प्रकार सर्वांचे मनास झोंबत होता. नागपुरास रघूजी भोसले त्याच विषादानें झुरत होता. भरतपुरचे नैर्ऋत्येस १५ मैलांवर वेर येथें सर्जेरावानें मुक्काम केला; आणि तेथून से० लेक यास पत्र लिहिलें कीं, आपला व होळकरांचा समेट करून देण्याकरतां सिंद्यांनीं आम्हांस इकडे पाठविलें आहे. ते स्वतःच येत होते, परंतु रेसिडेंटाचे सल्ल्यावरून त्यांनीं तो बेत रहित केला. आतां माल्कमसाहेब येत आहेत त्यांच्या भेटीची वाट पाहत सिंदे बसले आहेत. आम्ही भरतपुरास होळकरांची भेट घेऊन पुढें ते काय विचार करतात तें आपणांस कळवूं '. या पत्रास लेकनें जबाब पाठविला कीं, ' तुम्हीं भरतपुरास जाऊं नये. येथूनच परत जावें. ' लेकची अशी समजूत झाली कीं, ' जाठानें इंग्रजांशीं तहाची वाटाघाट चालविली आहे त्यापासून त्यास निवृत्त करून पुनः सर्वांस युद्धास प्रवृत्त करावें असा घाटग्याचा घाट असावा. परंतु लेकचा सल्ला न ऐकतां घाटगे भरतपुरास गेला. तेथें इंग्रजांच्या कारवाईमुळें जाठानें त्याची भेट घेतली नाहीं. म्हणून तो लगेच वेर येथें परत आला. त्या ठिकाणीं यशवंतराव होळकर त्यास येऊन भेटला. तहाच्या दुसऱ्या दिवशीं म्हणजे ता. १२·४·१८०५ रोजीं सिंद्याचा सरदार बापूजी सिंदे यशवंतरावाजवळ होता तो सबळगड येथें सिंद्याचे छावणींत दाखल झाला. इंग्रज त्याला पाण्यांत पाहत होते.

पुढें घाटग्याकडून दौलतरावास पत्रें आलीं त्या अनुरोधानें ता. १५·४·१८०५ रोजीं दौलतरावानें रेसिडेंटास कळविलें कीं, ' रणजितसिंग जाठाचा तह झाल्यावर होळकर इंग्रजांचे मुलखावर गंगापार चालून जात होता, त्याची सर्जेरावानें समजूत घालून सांगितलें कीं, आतां तुम्हीं इंग्रजांशीं लढणें इष्ट नाहीं, समेट करावा हेंच रास्त आहे. हा समेट घडवून आणण्याचें काम आम्हीं ( दौलतरावानें ) पत्करलें असून त्यासाठीं होळकरास घेऊन घाटगे आमचे भेटीस येत आहेत. नागपुराहून

रघूजी भोसलेही यासाठीं येणार आहेत.' हा मजकूर रेसिडेंटास कळतो तों त्याच दिवशीं यशवंतराव होळकर फौजेसह सबळगड येथें दौलतरावाचे भेटीस आला. दौलतरावानें छावणींतून पुढें जाऊन त्याचा सत्कार करून त्यास मुक्कामावर आणिलें. या प्रसंगीं चतुरसिंग भोसले व अनेक मराठे सरदार पुढील विचार करण्यासाठीं सिंद्याच्या छावणींत जमले. सर्वांचा विचार इंग्रजांस बाहेर काढावें, तर दौलतरावाचा विचार इंग्रजांशीं समेट घडवून आणावा. वाटाघाट होणार त्या प्रसंगीं रेसिडेंटासही सिंद्यानें भेटीस बोलाविलें. ता. १७·४·१८०५ रोजीं सिंद्याचे छावणींत दरबार होऊन रेसिडेंट व होळकर यांचीं बोलणीं झालीं. दौलतरावाची मध्यस्थी ऐकूं नये ही ग० ज० ची आज्ञा रेसिडेंटास पाळतां आली नाहीं. होळकर सिंद्याकडे आल्याचें कळतांच से० लेकही त्याजवर नजर ठेवण्यास २१ एप्रिल रोजीं चंबळच्या पलीकडे येऊन उतरला. ही मंडळी कांहीं वांकडा डाव टाकतील तर त्याचा लगेच प्रतिकार करावा अशी तयारी लेकनें ठेवून रेसिडेंटास कळविलें, कीं 'होळकराचे व आमचे भांडणांत तुम्हीं बिलकूल पडूं नये, तो प्रकार आमचा आम्ही पाहून घेऊं, असें तुम्हीं सिंद्यास साफ सांगा; आणि असेंही कळवा कीं, होळकरास सोडून तुम्हीं दूर निघून जावें, न जाल तर त्याचे जे परिणाम होतील ते तुम्हांस भोगावे लागतील.' सिंदे होळकर एकत्र भेटले याचा अर्थ, सिंद्यानें तह मोडला असें समजून त्यावर एकदम युद्ध सुरू करणेंच योग्य होय, असा ग० ज० नें ठरविला; आणि मुद्दाम अतिप्रसंग न करितां तयारींत राहवें अशी सूचना त्यानें लेक यास पाठवून दिली. ग० ज० म्हणतो, 'बऱ्हाणपुराहून निघतांना जरी सिंद्याचा उद्देश होळकरास सामील होण्याचा नव्हता, तरी नर्मदेपार गेल्यावर फेब्रुवारीपासून त्याचे विचार त्याबाजूनें चालूं लागले.' सिंदे-होळकरांच्या या भेटीचें वर्णन होळकर कैफियतींत खालीलप्रमाणें आहे. 'चर्मण्वती उतरून चैत्र वद्यपक्षीं भेटीचा बेत ठरला. शिंदे यांनीं जागा मैदान पाहून बिछायत करून पांच हजार खासा उंची पोशाखांत येऊन बसले. नंतर होळकरांची स्वारी आली. बरोबर ६० हजार स्वार अंगांत दहाशेर रुईचा डगला, सफेत दुपट्टा, ढाल तरवार, खांद्यावर बासडा, गांठची गांठच आली. त्यांत यशवंतराव कोणते हें ओळखूं येईना. येतांच गराडा फिरवून देऊन दोन हजार खासा उतरला. तिकडल्या इकडल्या तोफा चालल्या. चार घटकापर्यंत कोणाचा शब्द कोणाचे कानीं पडेना. दौलतरावाचें तोंड सुकून गेलें. एक दोन रोज बोलणीं होऊन सफाईचीं बोलणी झालीं. उभयतांचा विचार एक होऊन होळकर कूच करून कोट्याकडे गेले चर्मण्वती उतरून पाटणजवळ मुक्काम केला.

सबळगडच्या या भेटीचा पहिला भूर्दंड अंबूजी इंगळ्यास पडला. आदल्या वर्षी इंग्रजांस फितूर झाल्याबद्दल त्याजवर दौलतरावाचा रोष होता. परंतु एवढ्या बलवान् सरदारास सजा करण्याचें धाडस त्यास नव्हतें. सिंदे होळकर दोघांसही पैशाची मोठी अडचण होती. यास्तव दौलतरावाचें अनुमोदन मिळतांच ता. १८ एप्रिल रोजीं यशवंतरावानें त्यास पकडिलें, आणि थोडेसे हाल करून व जरब दाखवून ५० लाख दंड घेण्याचा ठराव केला. ' यशवंतरावानें अंबूजीस पकडून हरनाथाचे स्वाधीन केलें. त्यानें हुजरातीचे चांदणींत कापडाचे गद्द्यावर अंबूजीस बसवून आपण पुढें हात जोडून उभा राहिला, आणि विनंति केली, 'आपण सिंदे होळकरांचे साहेब सुभे. मी हरनाथ तीन कवडीचा खास बारदार, फार वाईट आहें. काय बोलणें तें झटकन बोलावें. माझा वाईटपणा उजेडास आणूं नये.' त्यांचें बोलणें तीन चार पांच (लाख) श्रवण करून गालीप्रदानें शेलकीं समर्पण करून तगाद्याचीं आभुषणें आणिलीं. तवे, तोबरा, खाट, जेरबंद आणून टाकिले. कोळसे शिलगावले. मग इंगळे बोलले, उदईक जाब ठरावांत आणूं. उत्तम आहे म्हणून आयुधें परत रवाना केलीं. तेच दिवशीं रात्रीं ५० ठरले; व सहा महाराजांचे खासगत. याप्रमाणें जाब ठरून पैका आणावयास बाळाराम शेट आगरवाले यास कोट्यास रवाना केलें. वर्तमान ऐकून सिंद्यास व त्याचे मंडळीस आश्चर्य झालें. आपले येथें महिनाभर होते व आणखी महिनाभर राहते तरी पूर्व दिवसच. विना निर्भीडतेखेरीज पैका निघत नाहीं. असें आश्चर्य केलें. पैका आल्यावर पंचवीस सिंद्यास दिले. एकतीस होळकरानें घेतले. ' आपल्यास पैसा कमी मिळाल्याबद्दल सिंद्यास विषाद वाटला. अंबूजी इंगळे या वेळीं वयानें पाऊणशेंच्या वर होता. परंतु धनतृष्णेस वयाची चाड काय ?

सबळगडची छावणी उठवून एकदम उज्जनीस जावें आणि होळकरास काढून द्यावें, हा रेसिडेंटानें लाविलेला लकडा दौलतरावानें मानिला नाहीं. तेव्हां लेकनें आपली फौज २९ एप्रिल रोजीं चंबळच्या पश्चिम कांठीं शिंद्याचे समोर आणिली. तें पाहतांच मराठी फौजांत एकदम धांदल उडून गेली. होळकराच्या साथीदारांसही दम निघेना. त्यांस वाटलें ह्याचे संगतीस लागून आपण फसलों. लभ्यांश कांहीं न होतां कर्जेबाजारी झालों. इंग्रजांनींही आंतून फितूर चालविलाच होता. त्यावरून लाला भवानीशंकर आणि मुर्तुजाखान हे होळकराचे दोन सरदार ता. १·५·१८०५ रोजीं लेक यास येऊन भेटले, आणि आपली व्यवस्था लावून घेऊन होळकरास सोडून गेले. तेव्हां दौलतराव व यशवंतराव यांस धाक पडून ते थोडे मागें शिवपुर येथें मुक्काम

करून राहिले. वेळींच सबळगड सोडल्यामुळें युद्धाचा प्रसंग टळला असें ग० ज० लिहितो. वस्तुतः दोघांसही युद्ध नकोच होतें. शिवाय पावसाळा जवळ येत होता. म्हणून होळकराचा पाठलाग करण्याचे नादास लागूं नये अशी ताकीद ग० ज० नें लेक यास लिहून पाठविली. होळकरासही कांहीं आधार नव्हता. शरण जावें किंवा युद्ध करावें याशिवाय तिसरा मार्ग त्यास उरला नव्हता. अशा स्थितींत नशिबानें त्यास हात दिला. लॉर्ड वेल्सलीची बदली होऊन जुलई महिन्यांत कॉर्नवॉलिस येऊन दाखल झाला. त्यानें चाललेला क्रम साफ बदलून आपणच युद्ध थांबविलें. तो प्रकार पुढें कळून येईल.

अंबूजीनें कबूल केलेली रक्कम कोटा येथें आदा व्हावयाची होती. ती पदरांत घेण्यासाठीं सर्जेराव घाटगे तीन हजार स्वार घेऊन ४ मे रोजीं कोट्यास गेला. तरी यशवंतराव सिंद्याची छावणी सोडून जाईना, म्हणून रेसिडेंटानें, मी तुमची छावणी सोडून निघून जातों, असा पुनरपि धाक घातला. पण होळकराचा पाठिंबा असल्यामुळें या धाकास दौलतरावानें भीक घातली नाही. उलट त्यानें रेसिडेंटावर आपला पाहरा बसवून त्यास छावणी सोडून जाण्याची अटक केली. सिंद्याच्या या उपक्रमानें सर्वत्र गवगवा सुरू झाला. समस्त इंग्रजांस हा आपला मोठा अपमान वाटला. सुमारें दोन महिने पावेतों रेसिडेंटावरील सिंद्याची अटक कायम होती. सभोंवार सक्त पाहरा असल्यामुळें रेसिडेंटास बाहेर निघून जातां येईना. प्रवास करतांनाही अटक चालूच होती. ता. १० मे रोजीं सिंदे होळकर आपलीं लष्करें घेऊन कोट्याकडे जाऊं लागले. एवढा अपमान झाला तरी थंड होत असलेले युद्धाचे निखारे पुनः प्रदीप्त करण्याचें धाडस लॉर्ड वेल्स्लीस झालें नाहीं. आपली बदली होणार याची त्यास भीति होतीच. शिवाय पर्जन्यकाळीं मराठी फौजांशीं सामना करणें किती धोक्याचें आहे हा अनुभव आदल्या वर्षीं चांगलाच आला होता. म्हणून रेसिडेंटानें छावणी सोडून जाण्याचा धाक भलत्याच वेळीं घालण्यांत शहाणपणा केला नाहीं. कोट्यावरून सिंदें होळकर अजमिराकडे गेले. तिकडे रजपुतांपासून सालाबादची खंडणी वसूल करण्याचा त्यांचा इरादा होता. इंग्रजांनीं रजपुतांस आपल्या आश्रयाखालीं न घेतां मराठ्यांची ही खंडणी मोकळी ठेवली असती तर होळकराला युद्ध करण्याचा प्रसंग आलाच नसता. अलीकडे दोन महिने सिंद्याचा कारभार सर्जेराव व यशवंतराव हे दोघे नेटानें करीत होते. ज्या गोष्टी करण्यास दौलतरावाचा जीव कचरे त्या हे दोन कडे पुरुष तेव्हांच सिद्धीस नेत. अंबूजी इंगळ्याप्रमाणें दुसऱ्या कित्येकांच्याही प्रत्ययास हा करडा अम्मल आला. मुनशी

कवलनयन सिंद्यांचें दौलतींत पुष्कळ वर्षें इंग्रजांकडे बोलणें करण्यांत होता. तो इंग्रजांस मिळून सिंद्यांचें नुकसान करतो अशी सर्जेराव व यशवंतराव यांची भावना झाली; आणि हे आपलें नुकसान करतील असें समजून तो नोकरी सोडून दिल्लीस आपल्या घरीं जाऊन राहिला. तसाच शिंद्याचा अम्मलदार जीन बॅप्टिस्ट हा कंपूवाला अनुभवलेला सेनानायक होता. तो इंग्रजांस फितूर होऊन यशवंतराव होळकरास पकडून लेकचे हवालीं करणार असा संशय आल्यावरून, यशवंतरावानें त्यास पकडलें आणि त्याचे हाल केले, (जून १८०५). या प्रकरणाचें वर्णन होळकर कैफियतींत आहे तें असें.–'जॉन बत्तिसाचे कंपूत फौजेनें पगारासाठीं गवगवा केला. तेव्हां यशवंतराव पन्नास हजार रुपये सांडण्यांवर घेऊन पांचा स्वारांनिशीं कंपूंत गेले. बत्तिसास वेगळा करून अवघे ऑफिसर चांदणी खालीं बोलावले. तेव्हां सर्वांस आश्चर्य वाटलें. सरदार खावंद यांजला म्हणावें. छाती करून एकला आपल्यांत आला. ऑफिसरांस प्रश्न केला, कीं 'तुम्ही चाकर बत्तिसाचे कीं आमचे.' आप्सरानें उत्तर केलें, आम्हांस बत्तीस व सरकारची बटीक दोनही सारखेच; सांगाल त्याची चाकरी करूं, बाकी चाकर सरकारचे.'

य०—उत्तम आहे. आम्ही आज तुमची रक्कम चुकवितों. बत्तिसास कित्येक जाब विचारावयाचे आहेत, त्यास आमचे स्वाधीन करावें.

त्याप्रमाणें रकमा वांटल्या व बत्तिसास हस्तगत करून घेतलें, आणि दौलतरावाचे स्वाधीन केलें.'

याच भेटींत दौलतरावानें काशीराव होळकरास यशवंतरावाकडे आणून त्यांची गोडी करून दिली. अंबूजीकडचा पैसा हातीं लागतांच त्याजवरचा राग दौलतरावानें सोडून दिला; सन्मानानें भेटीस आणून त्याचा गौरव केला; आणि सर्जेरावाकडून कारभार काढून तो अंबूजीचे हवालीं केला. रे० जेंकिन्स या वेळेस अटकेदाखलच बरोबर होता. त्यासंबंधानें दरडावणीचें पत्र ता. २५.७.१८०५ रोजीं लॉर्ड वेल्स्लीनें सिंद्यास लिहिलें. पण त्यानंतर पांचच दिवसांनीं त्यास कारभार सोडावा लागल्यामुळें त्या प्रकरणाचा निकाल पुढें कॉर्नवॉलिसनें केला.

वसईचा तह झाल्यावर मराठ्यांनीं जूट करून सर्वांनीं एकविचारानें इंग्रजांशीं झगडा केला असता तर इंग्रजांचा डाव सर्वथैव फसला असता, हें नीट लक्षांत येण्याकरतां सिंद्याचे दरबारीं काय प्रकार घडत होते याचें संक्षिप्त वर्णन येथवर केलें. या प्रकरणाचीं शेंकडों पानें इंग्रजींत असून त्यांचा गोषवारा संदर्भापुरताच येथें थोडक्यांत दाखल केला आहे. त्यावरून एक गोष्ट सर्वांचे मनास पटण्याजोगी दिसते ती अशी

कीं, इंग्रजांनीं मराठ्यांचा पाडाव कपटनीतीनें केला, शस्त्रांनीं केला नाहीं. अनेक प्रकरणाचे बारीक तपशील व संदर्भ बरोबर लक्षांत येण्यासाठीं वरील हकीकतींची जरूर आहे. होळकराच्या युद्धांत सिंदे भोसले कां सामील झाले नाहींत, आणि इंग्रजांचा वरचष्मा मराठे सरदारांनीं आपखुषीनें कबूल केला कीं काय, हें समजण्याची जिज्ञासा पुष्कळांस असते, पण ती तृप्त करणाऱ्या हकीकती मराठींत बहुधा कोठेंही लिहिलेल्या नाहींत. बाजीरावाच्या बखरींत किती अवास्तव प्रकार आहे पहा. ‘ सिंदे भोसल्यांचा तह झाल्यावर वस्लीसाहेब फौजेसुद्धां माघारे येऊन स्वदेशीं हरिपंत भावे, विठ्ठल बाबाजी, गोपाळ भगवंत, विश्वासराव घाटगे, निंबाजी भोसले, मलबा नगरकर वगैरे बंडखोरांचीं पारिपत्यें करून बाजीरावाचें राज्य निर्वेध केलें; आणि पुण्यास येऊन बाजीरावास भेटले; आणि कर्नेल क्लोज यांसह मुंबईस गेले.’ एवढाच काय तो ऐतिहासिक कयास पेशव्यांच्या बखरकारानें या प्रचंड घडामोडीचा केला आहे. त्यावरून चिकित्सक इतिहासाची आवड बखरकारांस किती होती हें दिसून येतें. अद्यापि आपणास मराठी राज्याचा अंत कसा झाला, याचें साधार विवेचन कागदी पुराव्यानें करावयाचें आहे, त्यासाठीं इंग्रजी हकीकती अवश्य पाहव्या लागतील. सेनापति आर्थर वस्ली प्रथम ता. ८·३·१८०५ रोजीं स्वदेशीं निघून गेल्यावर मागाहून चार महिन्यांनीं त्याचा वडील भाऊ गव्हर्नर जनरल यानेंही तां. १५·८·१८०५ रोजीं स्वदेशीं प्रयाण केलें.*

**३ कॉर्नवालिसचें समेटाचें धोरण, वस्लीवर टीका** ( जुलई–आक्टो. १८०५ ). हिंदुस्थानांत शांतता प्रस्थापित करण्याच्या उद्देशानें तैनाती फौजांची अपूर्व पद्धत आपण नवीन शोधून काढली अशी शेखी आज कैक वर्षें लॉर्ड वेल्स्ली मिरवीत होता. ती पद्धत शांतता राखण्यास असमर्थ ठरली. त्या योगानें शांततेऐवजीं देशभर युद्धें व अस्वस्थता यांचेंच साम्राज्य एवढें माजलें, कीं आतां यांतून शांततेचा मार्ग कसा काढावा याची खुद्द त्यांसच पंचाईत वाटूं लागली. निजाम सिंदे वगैरेशीं केलेले तह निरुपयोगी ठरून त्यांत वारंवार बदल करावे लागले. एके जागीं ठिगळ लावावें तों दुसरीकडे फाटावें अशी अनवस्था उत्पन्न झाली. सात वर्षांत कंपनीचा व्यापार ठार बसला. इंग्रजांचें सारें लक्ष युद्धें व राजकारणाकडे लागून व्यापाराचें काम चालविण्यास फुरसदच आली नाहीं. उलट कर्जमात्र अतोनात झालें. जमेच्या नांवानें पूज्य होऊन खर्च अतोनात वाढला. याजबद्दल इंग्लंडांत कंपनीचे चालक व

* हो. कै.; भ. रो.; Well. Deisp.

सरकाचे अधिकारी या दोघांचीही वेल्स्लीच्या कारभाराविरुद्ध हाकाटी चालू झाली. अगोदरच त्याच्या धोरणास मोठासा पाठिंबा कोणाचाही नव्हता. तशांत मॉन्सन्च्या पळाची बातमी इंग्लंडांत पोंचून लोकांचा रोष दुणावला. त्यांतच हिंदी संस्थानिकांच्या शेकडों तक्रारी बाहेर जाऊन त्याजबद्दल मोठा गवगवा झाला. मुख्य प्रधान पिट्ट नेपोलियनला कसा आवरून धरावा या विवंचनेंत होता. त्याजवर हिंदी राजकारण आवरण्याची आणखी एक जबाबदारी वेल्स्लीच्या कारभारामुळें येऊन पडली. कॉर्नवॉलिसवर पिट्टचा मोठा इतबार होता. हिंदुस्थानचे रोगास कांहीं औषध असेल तर तें कॉर्नवॉलिस, अशी त्याची ठाम समजूत होती. म्हणून कॉर्नवॉलिसला पुनः गळ घालून ग० ज० चे जागीं पिट्टनें त्याची नेमणूक करून इकडे पाठविलें. पार्लमेंटपुढें कज्जा भरून वेल्स्लीच्या कारभाराची चौकशी व्हावी अशा सूचना पिट्टकडे आल्या होत्या. परंतु झाल्या गेल्या गोष्टींचा काथ्याकूट करण्यापेक्षां पुढील सुधारणेकडे लक्ष देण्याचा व्यावहारिक कल इंग्रजांचा असल्यामुळें त्यासंबंधीं विशेष भर कोणी दिला नाहीं. लॉर्ड कॉर्नवॉलिसनेंही ६७ वर्षांच्या वयाची व प्रकृतीची क्षिति न बाळगितां राष्ट्रसेवेच्या भावनेनें हें भलतेंच ओझें अंगावर घेतलें.

येथें दाखल होतांच त्यानें पूर्वीचें चढाऊ धोरण सोडून असलेल्या स्थितींतच युद्ध आवरिलें, म्हणून इंग्रजांविरुद्ध हिंदी सत्ताधीशांची मोठी जूट बनत होती ती आपोआप थांबली. वेल्स्लीचें पूर्वीचें धोरण चालू राहतें तर बिकट प्रसंग ओढवून रक्तपातही मोठा झाल्याशिवाय राहिला नसता. देशांत आतां इंग्रजांची सत्ता चालू राहणार या संबंधानें अलीकडच्या पांच चार वर्षांत कोणाही विचारवंतास संशय राहिला नव्हता. मग ती सत्ता जरा मंद गतीनें झाली तर बिघडलें कोठें ? एवढाच फरक या दोघांच्या पद्धतींत होता. कारभार हातीं घेतांच कॉर्नवॉलिसनें वरिष्ठांस लिहून कळविलें कीं, ' हल्लीं होळकराशीं युद्ध सुरू असून सिंदे त्यास सामील होण्याच्या रंगांत आहे. अशा स्थितींत हरएक बाबतीचा ताबडतोब निकाल करण्यासाठीं मी युद्धभूमीच्या नजीक उत्तरेंत जात आहें. कारण पावसाळा संपतांच युद्धास रंग चढणार त्यापूर्वीं मानहानि केल्याशिवाय तें मिटवावें असा माझा प्रयत्न आहे; आणि त्या धोरणानें मी सर्व गोष्टींची निरवानिरव करीत आहें. खर्च कमी करून पैदास वाढविण्याकरतां मीं प्रथम हिशेबाची तपासणी चालविली आहे. इंग्रजांविरुद्ध लढणाऱ्या फौजांत जे अम्मलदार असतील ते आपले हाताखालील मंडळीसह नोकरी सोडून इंग्रजांचे पक्षास मिळतील तर त्यांस त्यांचा तनखा पूर्वीप्रमाणें

चालू राहील, असें वेल्स्लीनें जाहीर आश्वासन दिलें होतें. त्यामुळें बिनकवाइती भटकें घोडदळ इंग्रजांकडे उगाच मोठें फुगून गेलें. बक्षी भवानीशंकराचें उदाहरण या संबंधांत मोठें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. शिवाय इंग्रजांच्या कायम फौजांचे पगारही पुष्कळ दिवसांचे चढले होते; आणि पुनः युद्ध सुरू होईल तर त्यांचा खर्च कसा भागवावा ही माझ्यासमोर मोठीच अडचण उभी आहे. शिवाय संस्थानिकांशीं तैनाती फौजेचे तह केल्यानें नवीनच घोटाळे व अडचणी उपस्थित झाल्या आहेत. बाजीराव पेशव्यासारख्यास इंग्रजांनीं संरक्षणाची हमी दिल्यानें हे सत्ताधीश खुशालचंद, उधळे व बेफिकीर बनले आहेत. वसूल जमा झाला नाहीं, लोकांनीं बंडें केलीं, रयत व अम्मलदार बंड करून उठले, तरी इंग्रजांनीं त्याचा कारभार दुरुस्त करून देऊन त्याचें संरक्षण केलें पाहिजे असा करार असल्यामुळें, रेसिडेंटाला राजाच्या कारभारांत ढवळाढवळ करण्याचे प्रसंग वारंवार उद्भवतात. रेसिडेंटाची ही मध्यस्थी पेशव्यास रुचत नाहीं. या इंग्रजांचा आपल्यावर एवढा सक्त पहारा व जाच कां असावा असें त्यास वाटतें. प्रत्यक्ष त्याच्या कारभारांत पडून तो दुरुस्त करण्याचें काम अंगावर घ्यावें तर त्याचा पार येणार नाहीं. न घ्यावें तर हे राजश्री लुच्च्या, स्वार्थसाधु बंडखोरांच्या तावडींत सांपडून नामशेष होणार; आणि या सर्व परिणामाचें अपेश मात्र इंग्रजांवर येणार. असा हा दुहेरी पेंच वेल्स्लीच्या वाखाणलेल्या पद्धतीपासून उत्पन्न होत आहे. क० क्लोजसारखा इभ्रतीचा गृहस्थ पुण्याहून ज्या हकीकती लिहून पाठवितो त्यांत हा प्रकार रोज रोज स्पष्ट होत आहे. क्लोजचे हे खलिते मी मुद्दाम अवलोकनासाठीं सोबत पाठवीत आहें. राज्यकारभाराचीं पूर्वीचीं या सत्ताधीशांचीं सोंगें सर्व कायम राहून त्यांजबद्दल जबाबदारी मात्र त्यांजवर नाहीं. याच मासल्याचें सिंद्याचें दुसरें उदाहरण आहे. नागपुरकर भोसले व हैदराबादकर निजाम यांच्या येथील प्रकारही याच्याच तोडीचे किंबहुना जास्त त्रासदायक आहेत. तेव्हां तैनाती फौजांच्या या पद्धतीचा फायदा तो काय ? व ती पुढें कशी चालवावयाची हाच मोठा बिकट प्रश्न आज माझ्यापुढें आहे. या पद्धतीनें घोटाळे उत्पन्न करून ते दुरुस्त करीत बसण्यापेक्षां हीं सर्व राज्यें एकदम खालसा करून इंग्रजी अमलाखालीं आणिलीं तर त्यांत रयतेचें तरी कल्याण होईल. इंग्रजांच्या मध्यस्थीनें जे राज्यकारभारांतले दोष दूर होणार, त्यापेक्षां त्या मध्यस्थीपासून घोटाळे व तोटेच जर जास्त वाढूं लागले तर ती पद्धत तरी काय कामाची ? राज्यलोभाचे नादीं लागून इंग्रज सरकार निष्कारण सर्वांस लुबाडीत आहे; आणि न्यायान्याय त्यांनीं सर्व गुंडाळून ठेविला आहे, असाच

बोभाटा हल्लीं सर्वत्र ऐकूं येतो. सबब माझ्या मतें इंग्रजांच्या इभ्रतीवर लोकांचा विश्वास सदैव कायम राहील अशी योजना आपण केली पाहिजे. केलेले करार मोडले तरी एक वेळ चालेल, पण लोकांचा विश्वास संपादन करणें हें पहिलें काम आहे. हल्लीं दरएक संस्थानिकाच्या मुलखांत खटपट, जुलूम जबरदस्ती, अव्यवस्था व दंगे वगैरे प्रकार थोड्या फार अंशानें चालू आहेत, ते दुरुस्त करण्याचें अशक्य काम अंगावर घेण्यापेक्षां केलेल्या करारांतून हलके हलके आपला हात काढून घेऊन राज्यकारभाराची जबाबदारी ज्याची त्याच्यावर टाकणें एवढाच तरणोपाय सद्यः-स्थितींत मला दिसतो.

'हा प्रकार करारांनीं बद्ध झालेल्या संस्थानिकांचा झाला. पण प्रत्यक्ष युध्यमान राजांचा प्रकार आणखी वेगळा आहे. त्यांत प्रथम सिंद्याचें प्रकरण निकरावर येत आहे तें मिटविलें पाहिजे. सिंद्याच्या संबंधांत दोघांच्या दोन आगळिकी मला दिसतात. रेसिडेंटास अडकवून धरलें ही सिंद्याची आगळिक आणि त्याचीं ग्वाल्हेर व गोहद हीं ठाणीं आम्हीं घेतलीं ही आमची आगळिक. साधक-बाधक मुद्यांचा विचार करतां दोनही मुद्दे सोडून देऊन सिंद्याची समजूत घालावी हेंच मला श्रेयस्कर दिसतें. गोहदचा राणा कीरतसिंग यास सालीना तीन लाखांचा तनखा नेमून देऊन गोहद परगणा सिंद्यास परत द्यावा: आणि जयपुरकडून सिंद्यास सालाची तीन लाख खंडणी येते ती त्यास देववावी, म्हणजे रेसिडेंटास अडकविल्याचा प्रश्न आपोआप मिटेल. दुसरें प्रकरण होळकराचें. त्याचीं समजूत घालणें झाल्यास त्याचा जेवढा प्रदेश आपण जिंकला आहे तेवढा त्यास परत द्यावा म्हणजे त्याची तक्रार राहणार नाहीं. माचेडी, भरतपुर वगैरे जे लहान संस्थानिक आहेत त्यांच्या संरक्षणाची जबाबदारी आपण बिलकूल अंगावर घेऊं नये; आणि त्यांचे मुलूख त्यांस परत द्यावे. मुख्य गोष्ट म्हणजे संस्थानांच्या संरक्षणाची किंवा त्यांचा कारभार सुरळीत चालविण्याची जोखीम आपण बिलकूल अंगावर घेऊं नये. ते आपली व्यवस्था मर्जीप्रमाणें वाटेल ती करोत. असें करण्यांत आपल्यास मोठी भीति काय कीं सिंदे वगैरे शिरजोर होऊन या लहान संस्थानिकांस आपले कबजांत आणतील. आणीत ना पाहिजे तर ! त्यांत आमचें काय जातें ! असें करितांना इंग्रजांचे वाटेस ते जातील असा संभव मला दिसत नाहीं; आणि गेलेच तर त्यांस नरम करण्यास आम्हांस उशीर लागणार नाहीं. उलट माचेडी, भरतपुर सारख्यांच्या पाठीस लागण्यांत त्यांचींच हाडें खिळखिळीं होतील.'

अशा प्रकारची योजना मनांत ठरवून आणि ती वरिष्ठांस लिहून कळवून, कॉर्नवॉलिसनें सिंद्यास पत्र लिहिलें कीं, ' रेसिडेंटास तुम्ही मोकळा करा म्हणजे गोहद व ग्वाल्हेर हीं तुमचीं ठिकाणें तुम्हांस परत देण्याचा हुकूम से० लेक यास मी पाठवीत आहें. ' हें पत्र पोंचण्यापूर्वीच सिंद्यानें सर्जेरावास कारभारांतून काढून त्याचे जागीं अंबूजी इंगळ्यास नेमिलें होतें. त्यामुळें सर्जेराव रुष्ट होऊन होळकराकडे गेला. होळकराचे भानगडींत पडल्यापासून आपला बिल्कूल फायदा नाही असें सिंद्यास आढळून आलें. इकडे होळकरानेंही पाहिलें कीं सर्जेरावाच्या नादास लागण्यांत लभ्यांश कांहीं नाहीं, उलट नुकसान मात्र आहे. म्हणून त्या भुकेबंगालास त्यानें आपल्याजवळ आश्रय दिला नाहीं, त्यावरून तो लवकरच निघून दक्षिणेंत गेला. त्याजबरोबर बरेचसे रुष्ट गृहस्थ पूर्ववत् कामें करण्यास उत्सुक झाले. मुनशी कवलनयन सिंद्याची नोकरी सोडून दिल्लीस जाऊन राहिला होता हें पूर्वीं सांगितलेंच आहे. तो इंग्रजांचा चहाता होता हें जाणून त्यास लेकनें आपल्याजवळ बोलाविलें: आणि त्यास सिंद्याचें मन वळवून समेट करण्यास सांगितलें. पूर्वींचा ताठा सोडून इंग्रज नरमाईनें बोलूं लागले हें पाहून सिंद्यानेंही समेटास तात्काळ मान्यता दिली. त्यानें रेसिडेंट जेंकिन्स याची अटक दूर करून त्यास लेककडे पोंचविलें. लेक मूळचा वेल्स्लीच्या तालमेंतला; त्यास कॉर्नवालिसची ही नरमाई बिलकूल पसंत पडली नाहीं. त्यानें चाललेली पद्धत न सोडतां सिंद्याची समजूत घालून कॉर्नवालिसचा उद्देश पार पाडण्याचा नवीनच मार्ग स्वतःचे जबाबदारीवर सुरू केला. चंबळच्या उत्तरेकडील प्रदेश सिंद्यास परत न देतां तो इंग्रजांचे ताब्यांत ठेवणेंच इष्ट आहे अशी त्यानें कॉर्नवालिसची समजूत घातली. गोहदचा राणा सर्वथा दुर्वृत्त व दुर्बल आहे असें पाहून त्याच्या संबंधानें कॉर्नवालिसनें सुचविलेली व्यवस्था लेकनें मान्य केली. पण अशा रीतीनें एक एका प्रकरणाचा निकाल पत्रव्यवहारानें सिद्धीस जाण्यापूर्वींच कॉर्नवालिसची अखेर मजल येऊन पोंचली. कलकत्त्याहून गलबतांत बसून भागीरथींतून वर येत असतां गाजीपुरनजीक ता. २९·९·१८०५ रोजीं तो आसन्नमरण झाला, तेव्हां त्यास गलबतांतून शहरांत आणून बंगल्यांत ठेविलें, तेथें ता. ५·१०·१८०५ रोजीं त्याचा अंत झाला. सरजॉर्ज बार्लो कौन्सिलचा श्रेयान सभासद होता, त्यानें लगेच तात्पुरता अधिकार धारण केला. बार्लोचें धोरण मूळपासूनच कॉर्नवालिसच्या सारखें असल्यामुळें चाललेल्या व्यवस्थेंत खळ पडला नाहीं. त्यानें यमुना नदी इंग्रजांची व एतद्देशीय संस्थानिकांची हद्द ठरविली. या संबंधाचा पत्रव्यवहार व विवेचनें फारच

विस्तृत असल्यामुळें त्यांचा निर्देश येथें करितां येत नाहीं. विशिष्ट अभ्यासकांनीं तीं वाचलीं पाहिजेत.

सिंद्याच्या समेटाचें काम माल्कम व कवलनयन या दोघांनीं पुरें केलें. त्या दोघांनीं वाटाघाटी करून ता. २२·११·१८०५ रोजीं नवीन करार ठरविला, त्याचा उल्लेख मागें आला आहे, त्यास **मुस्ताफापुरचा** तह म्हणतात. त्यास चढाईचें किंवा बचावाचें नांव मुद्दामच देण्यांत आलें नाहीं. सूर्जी अंजनगांवचा तह मुख्यतः जमेस धरून त्यांतील व्यंगें तेवढीं दुरुस्त करण्यांत आलीं. ग्वाल्हेर व गोहदचीं ठिकाणें सिंद्यास परत देण्यांत आलीं. इंग्रजांनीं दौलतरावास सालीना चार लाखांची नक्त नेमणूक आणि त्याची बायको व मुलगी यांस प्रत्येकीं दोन लाख अशा नेमणुका इंग्रजांनीं आपलेकडून दिल्या. चंबळ नदी त्याच्या मुलुखाची हद्द ठरली गेली. राजपूत संस्थानांवरील इंग्रजांनीं आपला ताबा सोडून दिला. सर्जेरावास कारभारांत न घेण्याचें सिंद्यानें कबूल केलें. अशा रीतीनें सिंद्याचें प्रकरण तात्पुरतें मिटलें.

**४ होळकराचा ठराव** ( २४·१२·१८०५ ).—सिंद्याची समजूत पडल्यामुळें होळकराचा बंदोबस्त होण्यास वेळ लागला नाहीं. मुख्यतः राजपूत संस्थानांवरचा हक्क इंग्रजांनीं सोडून दिल्यामुळें होळकराच्या नाराजीचें एक मुख्य कारण आपोआप नाहींसें झालें. ऑगस्ट महिन्यांत सिंद्यास सोडून होळकर अजमिराकडे गेला हें पूर्वीं सांगितलेंच आहे. सेप्टेंबर महिन्यांत त्यानें पंजाबाकडे कूच केलें. शीख व अफगाण यांच्या साह्यानें इंग्रजांशीं सामना करण्याचा त्याचा तिकडे उद्देश होता. त्याजबरोबर सुमारें १२ हजार देशी स्वार पांच पन्नास तोफा व थोडें पायदळ होतें. शेखावटींतून माचेडीकराचे मुलखास ओलांडून कित्येक संस्थानिकांस सामील करून घेऊन यशवंतराव पत्याळा येथें गेला. मागून लेकनें रेवाडी व नार्नोळ येथें आपलीं ठाणीं बसवून यशवंतरावाचा पाठलाग चालविला. ऑक्टोबरांत लेक मथुरेहून पुढें निघाला. ' यशवंतरावानें रणजितसिंग शीखास सामील होण्याविषयीं कळविलें. तेव्हां राजे यांनीं साफ जबाब न सांगतां चाळवाचाळव चालविली. यशवंतरावाची व इंग्रजांची गोडी करून द्यावी अशा इच्छेनें उभयतांकडे बोलणें करून करार मदार ठरले. ' प्रथम माल्कम साहेबाकडील पैगाम सलुखाविषयीं मीरखानाकडे आला होता, मग बाळाराम शेट आणि मीरखान यांनीं मसलत करून यशवंतरावाचे कानावर घातलें. त्यांचेंही अंतःकरण होतेंच. मग बाळारामास हरनाथसिंगाकडे पाठविलें. त्यांचें बोलणें होऊन भेटीचा बेत ठरला. लेक साहेबाकडून दोन साहेब भेटीस आले.

यशवंतरावाची भेट झाली. दोस्ती होऊन लेकसाहेब दिल्लीकडे गेले. युद्धारंभीं होळकराची फौज सत्तर हजार व १०० तोफा इतकी होती ती अखेरीस पंधरा हजार व २० तोफा एवढी राहिली.

वस्लीचें चढाऊ धोरण सुटल्यापासून इंग्रज सरकार आपला बचाव करील ही दौलतदारांची आशा सुटली, आणि ते आपआपल्या बचावास लागले म्हणून होळकरासारख्यास मदत करण्याला कोणींच तयार होईनात. त्यानेंहीं पाहिलें कीं शक्य तितका फायदा करून घेण्याची ही संधि आहे. अशा विचारानें त्यानें लेककडे समेटासाठीं माणसें पाठविलीं. इकडे होळकराची समजूत घालून कसें तरी युद्ध संपवावें असा ग० ज० चा हुकूम लेक यास असल्यामुळें, तह ठरण्यास विलंब लागला नाहीं. ब्यास नदीच्या कांठीं **राजपूर घाट** येथें ता. २४·१२·१८०५ रोजीं तह कायम झाला. सर्जेराव घाटग्यास आश्रय देऊं नये असें कलम तहांत प्रथम घातलें होतें, पण त्यामुळें भानगडी उपस्थित होण्याचें लक्षण दिसल्यावरून तें गाळण्यांत आलें. तहाचीं मुख्य कलमें पे. अ. पृ० १३६ वर आहेत तीं पाहावीं. त्यांवरून दिसून येईल कीं, होळकराचा पूर्वीचा सर्व प्रदेश त्याजकडे कायम राहिला. बुंदेलखंडांतील कुंचचा जिल्हा यशवंतरावाची कन्या भीमाबाई इजला जहागीर म्हणून देण्यांत आला. महादजी सिंद्याची कन्या बाळाबाई इला इंग्रजांनीं जहागीर दिली तसाच हा प्रकार होता. तह ठरल्यावर यशवंतराव परत येऊं लागला, तेव्हां रस्त्यांत जयपुरचे राजाकडून १८ लाख खंडणी त्यानें बोलबोल म्हणतां वसूल केली, असें इंग्रजी लेखांत आहे. त्यासंबंधानें भवानी शंकर लिहितो, ‘ यशवंतराव रोहतक येथून निघून आसमंतांत चांगल्या बहादुर सैन्यासह दाखल झाले. प्रत्येक गांवांतून लाख रुपये मामलत घेत गेले. हिंदुस्तानी रिसालदारांनीं तनखा मिळण्याबद्दल बंड व फिसाद केला. तीन दिवस धरणें दिलें. त्यांस तनखा देऊन समजूत केली. पुढें जयपुर व जोधपुर यांजमध्यें युद्धाग्नि पेटला होता, त्यांत जयपुरच्या राजानें दहा लाख रुपये नजराणा देऊन यशवंतरावाची कुमक घेतली; आणि आपलीं घरचीं माणसें जोधपुरास होतीं तीं बोलावून घेतलीं; आणि कोणाकडेही सामील न होतां तटस्थ राहिले. ’

सिंदे होळकरांचे तह ठरत असतां राजपूत राजांना करारानें दिलेला आश्रय काढून घेऊं नये असा जोराचा आग्रह से० लेकनें धरला; आणि आपलें असें मत निक्षून लिहून पाठविलें, कीं चंबळच्या पलीकडील संस्थानिक ब्रिटिश कक्षेंतले समजावे हें पूर्वीचें धोरण बिलकूल बदलूं नये. बुंदी, जयपुर, माचेडी वगैरे ठिकाणचे राजे इंग्रजांचे

मांडलिक झालेले पुनः सिंदे होळकरांच्या तावडींत देणें अत्यंत गैर होय असें त्यानें बार्लोच्या नजरेस आणिलें. इतकेंच नव्हे तर बुंदी, जयपुर वगैरे ठिकाणच्या राजांस खुद्द त्यानें आपल्या जबाबदारीवर तशीं आश्वासनें दिलीं. परंतु बार्लोनें लेकचें म्हणणें मुळींच मान्य केलें नाहीं. त्यावर लेकनें पुनः विनंति केली कीं निदान लगोलग हें नवीन धोरण जाहीर न करतां कांहीं मुदत पावेतों चाललें आहे असें चालवून मग तें हलके हलके अमलांत आणावें. ही सुद्धां त्याची विनंति बार्लोनें अमान्य केली. फक्त भरतपुर व माचेडी यांचे संबंधांत कांहीं कालपर्यंत पहिलेंच धोरण चालविण्याची सवड बार्लोनें मंजूर केली. लेक व बार्लो यांजमधील ही फूट उत्तरोत्तर वाढत जाऊन त्यांचें साफ पटेनासें झालें, तेव्हां लेकनें स. १९०७ त नोकरीचा राजीनामा देऊन स्वदेशीं प्रयाण केलें. तेथें तो स. १८०८ सालीं मरण पावला.*

अशा रीतीनें वेल्स्लीच्या चढाईनें उद्भवलेल्या युद्धांचा तात्पुरता शेवट झाला. खरें पाहूं जातां वेल्स्लीचें धोरण सर्वांसच जाचक झालें. तें धोरण सुटून इंग्रजांचा राज्यकारभारांतील दृष्टिकोन बदलल्याचें लोकांचे नजरेस येतांच शांतता प्रस्थापित होण्यास वेळ लागला नाहीं. मात्र ती प्रस्थापित करण्यांत झालेल्या घाईमुळें पुष्कळ भानगडी उत्पन्न झाल्या, त्यांचें निरसन होण्यास आणखी एका प्रचंड युद्धाची आणि वेल्स्लीच्याच तोडीच्या जहांबाज अधिकाऱ्याची इंग्रजांना पुढें गरज लागली. बार्लो व मिंटो यांनीं सगळ्या हिंदुस्थानांतील संस्थानिकांची सुव्यवस्था सर्वांचे हक्क कायम ठेवून निरपक्षेतेनें लाविली असती तर पुढील इतिहास पुष्कळसा बदलला असता.

टिपू, निजाम व मराठे हीं तीनच प्रकरणें वेल्स्लीच्या कारभारांत मुख्य आहेत. त्यांपैकीं पहिलें मात्र लगोलग सिद्धीस गेलें. अल्पावकाशांत टिपूचें राज्य जिंकून तेथील प्रांताची व्यवस्था पूर्णय्यानें नीट ठेविली म्हणूनच पुढील युद्धांत इंग्रजांस पैशाचा व फौजेचा उत्कृष्ट पुरवठा झाला. वरचेवर नवीन फौजा पूर्णय्यानें तयार करून से० वल्स्लीकडे पाठविल्या, याजबद्दल इंग्रज अधिकारी त्याची व त्याच्या हिंदी मदतनीसांची फार फार वाखाणणी करतात.† म्हैसुरांतील डाव जसा आपण लवकर जिंकला तसाच मराठ्यांचाही बोलबोल म्हणतां जिंकूं अशी जी वेल्स्लीची अपेक्षा होती ती सर्वथैव विफल ठरली. तिसरें प्रकरण निजामाचें त्याची व्यवस्था कशी लागली हें पुढें यथास्थलीं सांगण्यांत येईल.

---

* मागें पृ. २७६ पहा. † हो. कै.; भ. रो; Desp. Vol. V page 219.

होळकराच्या सर्वच साथीदारांचीं चरित्रें अनेक दृष्टींनीं स्फूर्तिदायक आणि बहादुरीच्या दृष्टीनें इतिहासांत कायम स्थान मिळण्यास पात्र आहेत. यशवंतरावाला शोभतील असेच त्याचे साथीदार होते. लाला भवानीशंकर, मीरखान, हरनाथसिंग, शामराव महाडिक, अचबेसिंग, शहामतखान, बाळारामशेट, विठ्ठल महादेव किबे, गणपतराव दिवाण वगैरे किती तरी पुरुषांची नांवें यशवंतरावाच्या कारभारांत येतात. त्यांचेही संपूर्ण वृत्तान्त आपणांस कळणें जरूर आहे. मीरखानाचा सगळाच इतिहास अजब कृत्यांनीं भरलेला आहे. इंग्रजांनीं त्याजपुढें हात टेकून त्यास टोंकचें राज्य नेमून दिलें, तें अद्यापि त्याच्या वंशांत चालू आहे. दिवाण गणपतराव हा नारोगणेश याचा मुलगा. याच्या अंगीं विशेष कर्तबगारी नव्हती. भवानीशंकरानें आपल्या आठवणी फारशी भार्षेत लिहिल्या असून त्यांचें रूपांतर नुकतेंच इंदुरास प्रसिद्ध झालें आहे तो ग्रंथ व होळकराची कैफियत यांतील हकीकती जरी चऱ्हाटासारख्या अद्भुत कथा वाटल्या, तरी त्यांतील पुष्कळ भाग इंग्रजी कागदपत्रांनीं साधार ठरतात. निदान मराठींत इतक्या विस्तृत दुसऱ्या हकीकती उपलब्ध नाहींत. मराठशाहीच्या त्या पडत्या काळांत साहस, शौर्य, दीलदारपणा इत्यादि उच्च गुणांचें दिवाळें वाजलें असल्यामुळें हे दोन ग्रंथ विशेष आदरणीय वाटतील. परिस्थिति ध्यानांत घेऊन हीं पुस्तकें वाचलीं तर त्यापासून पुष्कळ बोध होईल.

**५ यशवंतराव, खंडेराव व काशीराव यांचे अंत.**—मराठशाहीच्या अखेरीस यशवंतराव होळकर हा असामान्य पुरुष निर्माण झाला, म्हणूनच पेशवाईच्या बुडत्या काळांत मराठ्यांच्या अंगचें पूर्वींचें पाणी पुनः एकवार चांगलें झळकलें. लाखेरीच्या लढाईपासून होळकरशाही बुडविण्याचा सिंद्यांचा प्रयत्न चालू होता, तो यशवंतरावानें हाणून पाडिला. आज होळकरांचें राज्य शाबूद आहे याचें श्रेय प्रथम यशवंतरावालाच दिलें पाहिजे. होळकरांइतकीं गंडांतरें दुसऱ्या मराठ्यांवर आलेलीं आढळत नाहींत. यशवंतरावाचा मुख्य गुण म्हणजे तडफ व शौर्य. त्या वेळीं त्याच्या तोडीचा सेनानायक दुसरा कोणी नव्हता. त्याचें अंतःकरण उदार होतें; आणि स्वतःपेक्षां तो आपल्या साथीदारांच्या सुखसोयींकडे विशेष लक्ष देई. आरंभीं त्याचा उत्कर्ष होत गेला, तेव्हां तो हाताखालच्या मंडळीस अत्यंत प्रिय होता. इंग्रजांचा तोफखाना व मुख्यतः कपटनीति यांचा प्रभाव दुःसह होऊन त्यास अपयश आलें, तरी एकंदरींत इंग्रज त्याजपुढें अगदीं टेकीस आले. त्याचे मोटे पराक्रम पुष्कळ सांगण्यासारखे आहेत. दौलतरावाच्या कंपूचा त्यानें फन्ना उडविला. हडपसरची लढाई

स्वतःच्या हिमतीनें जिंकली. मॉन्सन्ला मुकुंदरा खिंडींत रडकुंडीस आणून त्यानें इंग्रजांस दहशत बसवली; आणि दीग व भरतपुर येथें से० लेक याचे हल्ले परतवून युद्धकलेंत त्याजवर कायमची मात केली, हे त्याचे सर्व विजय संस्मरणीय आहेत. परंतु त्याला परिस्थितीचें आकलन किंवा राजकारणाचें ज्ञान फारसें नव्हतें. दौलतराव व बाजीराव यांस युक्तीनें वश करून भिन्न प्रकृतींच्या माणसांस आपल्या लगामीं लावून घेण्याची हातोटी त्यास साधली नाहीं. त्याचा एकंदर आयुःक्रम उच्च पर्वत व खोल दऱ्याखोरीं यांनीं व्यापलेल्या भूपृष्ठभागाप्रमाणें अत्यंत खडबडीत, आणि गुण व दोष या दोनही बाबतींत सारखाच अद्भुत दिसतो. अमृतराव, मोरोबा दादा, दौलतराव सिंदे, रघूजी भोसले अशा सत्प्रवण किंवा हुशार व्यक्तींला यशवंतराव कार्यप्रवृत्त करूं शकला नाहीं, यावरून राजकारणांतील अष्टपैलूपणा त्याचे अंगीं नव्हता असें म्हणावें लागतें.

रणजितसिंग जाटानें त्याची संगत सोडतांच यशवंतराव उघडा पडला. त्याला स्वतःलाच खर्चास नसल्यामुळें साथीदारांसही कांहीं मिळेनासें झालें; उपासमारीनें लोक त्यास खाण्यास उठले. सर्व मराठ्यांनीं एकजुटीनें इंग्रजांचा पाडाव करावा अशी उच्च व प्रचंड महत्त्वाकांक्षा धारण करून ती सिद्धीस नेण्यांत शिकस्तीचे प्रयत्न करावे असें तोंडानें म्हणणारा प्रत्येक दौलतदार स्वार्थाचे नादास लागून इंग्रजांकडून आपल्यापुरती व्यवस्था लावून घेण्यांत गुंतल्यामुळें, समग्र राज्याची आस्था कोणासच राहिली नाहीं. जिकडे तिकडे अडचणी व निराशा यांचें साम्राज्य पसरलें. त्याबरोबर यशवंतरावाचा मूळचा उतावळा स्वभाव अत्यंत चिडखोर व खुनशी बनला. पुढें जें त्याला वेड लागलें त्याची छटा तह झाल्यापासूनच त्याच्या स्वभावांत दिसूं लागली. कोणीही सरळ व सत्य सांगितलें तरी तें त्यास खपेनासें झालें. त्या आवेशांत तो लोकांचे अपमान व नुकसान करून प्रसंगानुसार कडक शिक्षाही करूं लागला. भवानीशंकराचें व त्याचें पटनासें होऊन त्यानें यशवंतरावास सोडून इंग्रजांमार्फत आपली व्यवस्था ठीक लावून घेतली हें मागें सांगितलेंच आहे. यशवंतराव जेव्हां दौलतरावाचे भेटीस सबळगडास गेला त्याच वेळीं भवानीशंकरानें लेक साहेबास पत्र लिहिलें कीं, आपली परवानगी असेल तर मी आपल्या सेवेस येऊन हजर होतों. लेकचा जबाब लगेच आला, कीं 'तुम्हीं ताबडतोब इकडे निघून यावें, तुमच्यावर पूर्ण कृपा केली जाईल.' त्यावरून धोलपुर बारीवर कुवारी नदीचे कांठीं लेकचा मुक्काम असतां भवानीशंकर जाऊन त्यास भेटला. लेकनें त्यास सन्मानपूर्वक आपल्या नोकरींत ठेवून घेतलें.

यशवंतरावानें आपल्या पराक्रमानें होळकराच्या दौलतीची मालकी सिद्ध केली.

राजे रजवाड्यांत व इंग्रजांकडचे सर्व करार त्याच्याच नावें झाले, तेव्हां शिक्क्यांत पूर्वी खंडेरावाचें नांव होतें तें रद्द करून स० १८०५ पासून शिक्का आपल्या नांवचा चालू केला. *मोठी फौज बाळगण्याचें आतां प्रयोजन नसून खर्च झेपत नव्हता म्हणून ती कमी करावी लागली. दक्षणी फौज होती ती पोट भरण्यास त्यानें जिकडे तिकडे लावून दिली. पण अमीरखान वगैरे पठाण होते ते अडून बसले, तेव्हां समजूत काढण्याकरितां त्यांचे हवालीं खंडेरावास त्यानें तारण म्हणून दिलें; आणि त्यास पोट भरण्याकरितां जयपुरचे नोकरींत पाठविलें. तसेंच हरनाथसिंगास ऐवज जमा करावयास मुलखांत रवाना केलें. जयपुर व जोधपुर यांचें या संधीस कृष्णाकुमारीवरून युद्ध जुंपलें होतें. जोधपुरकरांनीं युद्धारंभीं यशवंतरावाचे कुटुंबास आश्रय दिला हा उपकार स्मरून यशवंतरावानें त्या दोघांचा समेट करून दिला, आणि खंडेराव व कुटुंब यांस घेऊन तो परत येऊं लागला. खंडेरावाचा सांभाळ करण्यास गणपतराव दिवाण होता, 'त्याच्या संबंधानें बातमी उठली, कीं दौलतीचा धनी आम्हांजवळ आहे, यशवंतरावास कोण विचारतो ? अजमीर जवळ किशनगड परगण्यांत कूच होतें असतां हरमाड्याचे मुक्कामास आले. तेथें खंडेरावाचे प्रकृतीस विकृति झाली. स. १२१६+ माघ शुद्ध पौर्णिमेस देहावसान होऊन तेथें कांहीं दिवस मुक्काम करून कोट्याचे सुमारें चर्मण्वती उतरून पाटणास मुक्काम झाला. तेथून फौजेची समजाविशी करून स० १२१७ सालीं आषाढ शु० १ स ( ६.७.१८०७ ) भानपुर येथें आले. 'रस्त्यांत शहापुर येथें खंडूजी होळकर हैजानें ( महामारीनें ) वारला' असें भवानीशंकर लिहितो. यशवंतरावानें त्याचा खून केला असें माल्कम लिहितो तें लेखी पुराव्यानें सिद्ध होत नाहीं. शिवाय खंडेरावास मारून टाकण्यांत यशवंतरावाला कारणही कांहीं नव्हतें. न्यायाधीश मुकुंदराव बर्वे यांनीं या संबंधाचा तपास करून खून झाला नाहीं असें साफ विधान केलें आहे तेंच प्रमाण मानलें पाहिजे. याचे उलट क० माल्कम त्या वेळीं सर्व अंतस्थ कारस्थानांचा पूर्ण माहीतगार होता, हेंही विसरून चालणार नाहीं. माल्कमचाच अनुवाद डफ व गॅझेटियर कर्ता ल्युअर्ड यांनीं केला आहे.

* हो. कै. १०८; गुळगुळे दप्तर भा. २ ले. १५५; भ. रो. + स. १२१५ चा माघमास (=३.२.१८०६) असावा. स. १२१६ चा माघमास स० १८०७ त येतो. स० १८०५ च्या डिसेंबरांत इंग्रजांशीं तह होऊन यशवंतराव पंजाबातून परत निघाला, तेव्हांपासून दोन महिन्यांतच खंडेरावाचा मृत्यु झाला असावा. चौदा महिने लागल्याचें दिसत नाहीं.

बंधु काशीराव यासही यशवंतरावानें ठार मारिलें असें माल्कमचें म्हणणें आहे. त्या संबंधानें खालील अस्सल पुरावा बिनतोड खरा मानला पाहिजे. ता २·३·१८०८ रोजीं सिंद्याचा रेसिडेंट कॅ० क्लोज गायकवाडाचा रेसिडेंट मेजर वॉल्कर यास लिहितो.* 'काशीरायास यशवंतरावानें उत्तर खानदेशांत बीजागड येथें पाठविलें. त्यास सोडवून गादीवर आणण्याच्या हेतूनें कांहीं मंडळींनीं बंडावा केला. त्यांचें पारिपत्य करण्यासाठीं यशवंतरावानें भानपुऱ्याहून आपल्या जवळची भली मोठी फौज बीजागडास पाठविली. तिनें बंडखोरांचा पाडाव केला; पण त्या झटापटींत काशीराव मारला गेला.'* हा प्रकार स० १८०८ च्या आरंभाचा म्हणजे यशवंतरावास वेड लागलें त्या पूर्वीचा आहे. या पत्रावरून काशीरावाचाही खून मुद्दाम यशवंतरावानें केला हें खोटें ठरतें. यशवंतरावाच्या लहरी स्वभावावरून लोकचर्चेत या दोन प्रकरणांचा खोटा आरोप त्याजवर आला. होळकर कैफीयतींत याची स्पष्टता नाहीं. यशवंतरावाचे पत्रांत सेंधव्याचे बंदोबस्ताचा मात्र उल्लेख आहे.

इंग्रजांशीं तह केल्यावर यशवंतरावानें स्वस्थ न बसतां मराठी राज्य पूर्व स्थितीस आणणाचे आटोकाट प्रयत्न सुरू केले. या कर्मीं त्यास बाळोजी कुंजराचें मुख्य साहाय्य होतें. त्यासाठीं बाळोजी कुंजरानें आपले दोन वकील त्रिंबकराव यशवंत व उमाजी पाटील हे पुढील उद्योग निश्चित करण्याकरितां यशवंतरावाकडे पाठविले होते. यशवंतरावानें जबाब दिला कीं, 'पूर्व क्रमानुरूप थरचा चिरा थरीं बसवावा यांत सर्व गोडपणा आहे.' ( ता. १५·६·१८०७ ). यशवंतरावास या संबंधानें रघूजी भोसल्याचा मोठा भरंवसा होता. त्यास यशवंतरावानें आपले विचार वारंवार मोकळेपणानें कळविलेले आढळतात. ता. २·११·१८०७ च्या पत्रांत तो लिहितो 'आत्माराम शिवराम वाकडे आपलें मनोगत राखतात ही चाल मार्गाचीच आहे. ते कुलीन आहेत,

---

* Holker continues at Bhanpura and has been obliged to detach the greatest part of his force to quell a disturbance in the province of Maheshwar, raised, it would appear, by partizans of Kasirao Holkar, who made a night attack on the party in charge of the person of Kasirao, near the fort of Bijagad and dispersed them. Kasirao Holker was killed in the scuffle.

Burway, Life of Tukoji Holkar, App No 5.

उचितास चुकणार नाहींत. तीनही दौलतींत वडील माणूस आपण. आपणा विरहित आमच्या उद्योगासंबंधीं संतोष मानणार दुसरा कोण आहे? येथेंही माणसास कमती नाहीं. कालमाहात्म्यानुरूप त्यांचें मनोतगत राखणें प्राप्त. दहा वर्षांमागें सर्व लहान मोठ्यांनीं दौलत संरक्षित केली. सोबत्यास (सिंद्यास) माणसांचा जथ चांगला. त्यांचा व आमचा दुतर्फा बोज राखण्यास सेनासाहेब सुभा हेच समर्थ आहेत.' 'भानपुऱ्यास आल्यावर नवीन सवार्शें तोफा ओतण्याचा कारखाना चालू केला. पूर्वीचे कंपू मोडून निवडक माणसें छाटून बारा पलटणें नवीन भरलीं. आणखी सहा पलटणांची भरती करावयास लोक जागजागां गेले आहेत. फौजेंत दरोबस्त मराठे व कांहीं पठाण असे भरले आहेत.' यावरून अद्यापि यशवंतरावाची उमेद केवढी होती हें दिसून येतें.

'पंजाबाहून परत आल्यावर परतंत्र व्हावयास प्रारंभ झाला,' हें कैफीयतकाराचें विधान अर्थपूर्ण दिसतें. त्या वेळेपासूनच यशवंतरावास चित्तभ्रम झाला. 'भानपुऱ्यास आल्यावर तोफा ओतण्याचा कारखाना लाविला. तात्पर्य जरबवान पुरुष. तोंडांत दौलत आहे. दिवसेंदिवस परतंत्रता गालब होत चालली. तोफांचा कारखाना आटोपल्यावर महालांचे हिशेब पाहूं लागले. परतंत्रतेच्या अनुषंगानें मनस्वी जमा वाढविल्या. त्या प्रसंगीं ग्वालेरचे महिपतबावा गोसावी ढोलीबावा भानपुऱ्यास आले होते, त्यांचे ठायीं आस्था बसून उपदेश घेतला. त्यांनीं ब्राह्मणभोजन मंत्रजप करण्यास सांगितलें. त्याप्रमाणें क्रम चालला. आश्विन व० ४ स. १२१८ (ता. ८·१०·१८०८) ते दिवशीं रात्रौ देवाची आरती करीत असतां प्रकृति बेसावध झाली. दंगा करूं लागले. दोघां चौघांनीं धरून बाडांत नेले. बाळाराम कौशाराम शेट आगरवाले व चिमणाजीपंत भाऊ कारभारी यांनीं दौलतीस आळा घालून, हलकीं माणसें निवडून पाहारे नेमून दिले. माघमासीं भानपुऱ्याहून रामपुऱ्यास आले. तदुत्तर उपचार करितां आराम न पडून स. १२२१ कार्तिक शु. ११ भानपुर मुक्कामीं काल झाला. (२८·१०·१८११). यशवंतरावाच्या आईचें नांव यमुनाबाई. ही स. १८०८ पर्यंत ह्यात होती.

**६ यशवंतरावाची योग्यता.**—बाजीराव दौलतरावांनीं होळकरांची दौलत गिळंकृत केली होती, ती यशवंतरावानें प्रचंड युद्धें लढून परत मिळविली. त्या दोघां नेभळटांनीं इंग्रजांपुढें हार खाऊन मराठशाहीचा बोज घालविला होता, तो यशवंतरावानें कांहीं अंशीं वांचविला. मॉन्सन यास हैराण करून इंग्रजांवर मात केली, हा त्याचा पराक्रम इतिहासांत चिरंतन राहिल. मराठशाहीचें अस्सल पाणी त्याच्या द्वारें

पुनः एकवार चमकलें. थॉर्ननें स.१८०५च्या तहाच्या वेळचें त्याचें वर्णन प्रत्यक्ष पाहून केलें आहे. ' यशवंतराव सुस्वरूप व तरतरीत होता. एक डोळा गेल्यानें थोडें वैगुण्य आलें असलें तरी चेहरा प्रसन्न व प्रफुल्ल दिसे. बोलण्या चालण्यांत तो इतका उदार व कनवाळू असे, कीं त्याच्या हातून अत्यंत क्रूर कृत्यें घडलीं असें मनांत सुद्धां येणार नाहीं. युद्धांत पकडलेल्या सैनिकांची तो एकजात कत्तल करून टाकी. त्याच्या स्वभावांत विरोधी गुणांचें मिश्रण विचित्र होतें. तो केव्हां हिरेमोत्यांचे बहुमोल अलंकार व भपकेदार पोषाख चढवून मुद्दाम आपलें वैभव प्रगट करी, तर अन्य क्षणीं नुसती टीचकभर लंगोटी लावून उघड्या पाठीच्या घोड्यावर खुशाल पाहिजे तिकडे दौडा मारी. स्वारी प्रसन्न झाली कीं जवळ असेल नसेल तें सर्व बक्षीस देण्यास उशीर नाहीं. पण जर का क्षोभ झाला तर, मग दया माया बिलकूल नाहीं. एवंच त्याच्या वर्तनावर विचाराचा दाब नसून लहरीनेंच सर्व कारभार चाले. विलायती दारूच्या नादानें त्याचा लहरी स्वभाव पराकाष्ठेस पोंचला. त्यानें आपल्या नांवाचा स्वतंत्र रुपाया पाडिला होता. ' डफ लिहितो, ' यशवंतराव होळकर त्या वेळच्या मराठ्यांच्या मानानें चांगला शिकलेला होता. मराठी व फारशी दोन्हींत लेखन वाचन त्यास करतां येत असे. त्याचें अक्षर सुवाच्य व वळणदार होतें. स्वभाव थट्टेखोर असून त्यांत शिपायांचीं मनें आकर्षून घेण्याची कला होती. त्याचा बांधा ठेंगू , पण हाडापेरानें मजबूद व काटक होता. रंग काळा असून चेहऱ्यावर शौर्य, धाडस व लहर यांची झांक चांगलीच मारीत होती. त्याला पुढें प्रत्यक्ष वेड लागलें, त्याचें कारण हा वर्तनातिशय होय.' ढोलीबुवा महिपतीनाथ यास गुरु करून त्याचा उपदेश त्यानें घेतला होता. इंग्रजांस नरम करण्याची त्याची मोठी हाव अतृप्त राहिली. निराशेनें युद्ध थांबवून त्याला आपला बचाव करावा लागला. ही शूर पुरुषास लाजीरवाणी गोष्ट त्याचे मनास सदैव खात असे. इंग्रजांवर मात करण्याचे उद्देशानें तोफा ओतण्याचें काम तो स्वतः करूं लागला. त्यांत अतिशय कष्ट होऊन पानासक्ति वृद्धि पावली. तथापि इंग्रजांशीं केलेले करार त्यानें यथायोग्य पाळले. अखेरपर्यंत त्याच्या नांवाचा दरारा सर्व देशभर एवढा प्रचंड होता, कीं त्याच्या वाटेस जाण्याची छाती कोणास झाली नाहीं. त्याच्या मृत्यूनंतरही पांच सात वर्षें या दराऱ्यावरच होळकरशाहीचा बचाव झाला. यशवंतरावाच्या हयातींत त्याचा लौकिक इतका वाढला होता, कीं हैदराबादकर निजामअलीच्या बेगमेनें राजा महीपतराम यास मुद्दाम यशवंतरावाकडे पाठवून आपल्या दरबारांतील वजिराची बंडाळी मोडण्यासाठीं त्यास फौज घेऊन मदतीस बोलाविलें. पण त्यास वेड लागल्यानें ती गोष्ट सिद्धीस गेली नाहीं.

यशवंतरावाविषयीं बाजीरावाचा ग्रह किती अप्रयोजक व निंद्य होता, हें खालील पत्रावरून दिसून येतें. त्यास वेड लागल्यावर दोन तीन वर्षांनीं आसन्न स्थितींत जेजुरी येथें कुलदेवाचें दर्शन घेण्याची त्यास मोठी इच्छा झाली. त्यासाठीं दक्षिणेंत येण्यास त्यानें बाजीरावाची परवानगी मागितली. त्याजबद्दल बाजीरावानें ता. १७.२.१८११ रोजीं छत्रपतीकडे पत्र लिहिलें तें असें:—'होळकरास येण्याविषयीं सरकारांतून आज्ञा न झाली तरी जबरदस्तीनें दक्षिणेंत यावयाचा त्यांचा इरादा आहे. केवळ प्रकृतीच ठीक नाहीं म्हणून येणार कीं देवदर्शनाचे निमित्तानें जबरदस्तीनें येणार, कोणत्या मतलबाकरतां येतो याचा निश्चय नाहीं. होळकराचें आमचें वांकडें कसें व त्यानें प्रांताची दशा कशी केली हा मजकूर जगप्रसिद्ध आहे. यास्तव होळकराचें इकडे येणें जहालें असतां मीं पुण्यास राहवें हें मसलतीस येत नाहीं. त्याचे येण्याचा प्रकार दिसला म्हणजे मीं विजयदुर्गास जाऊन राहण्याचा बेत केला आहे. होळकर इकडे आल्यावर प्रसंग कसा पडतो याचा नेम आज समजत नाहीं. पूर्वीं चिमणाजी रघुनाथ व विनायक अमृतराव यांचे नांवें पेशवाईचीं वस्त्रें आणून बखेडे झाले. सातारा जागा नाजूक बलकुबलीस राहवयाचे उपयोगी नाहीं. प्रसंगाचे दिवसांत खासा स्वारी सातान्यास राहणें हे माझे व सदाशिव माणकेश्वरांचे विचारास येत नाहीं. त्यास रायगड जागा चांगली मजबूत. तेथें फौज पाठवून वस्त्रें आणूं किंवा बंडबखेडा करूं तर होणार नाहीं. याजकरितां साहेबांचे मर्जीस आल्यास यशवंतराव होळकर दक्षिणेंत येऊन माघारा गेल्यावर मी विजयदुर्गाहून पुण्यास येईन, ते समयीं साहेबांची स्वारी सातान्यास जावी. कदाचित् होळकरानें लढाईच्या इराद्यावर येऊन बखेडा केल्यास ते मसलत शेवटास जाय तों महाराजांनीं रायगडास कुटुंब सुद्धां आनंदांत असावें. मसलत शेवटास गेल्यावर मग सातान्यास यावें. याचें मनन करून मसलत बाहेर कोठें न फोडतां आज्ञोत्तर यावें.'* सिंदे होळकरांचीं युद्धें संपून कैक वर्षे देशांत शांतता नांदत असतां वेड लागलेल्या दौलतरावाची एवढी दहशत बाजीरावास वाटावी हें केवढें आश्चर्य! उलट त्यानें होळकरास सन्मानपूर्वक बोलावून त्याचा सत्कार करून मागील दुष्टावा मनांतून काढून टाकण्यास ही संधि चांगली आली होती. त्यांत बाजीरावाचाच लौकिक चांगला झाला असता. एकट्या होळकरानें येऊन बाजीरावास पेशवाईवरून काढण्याची गोष्ट आतां मनांत आणणें सुद्धां अशक्य होतें. इंग्रजांनींच त्याचा बंदोबस्त

* रा. भालेराव संग्रह; मुकुंदराव बर्वे पुरवणी पृ. १६; का. सं. प. या. ४७७. व भा. व. १ प. या. ३२.

केला असता. कदाचित् छत्रपतीसच रायगडावर कायमपणें अटकेंत ठेवण्याचा बाजीरावाचा हा घाट नसेल कशावरून ? कारण वरील पत्राचेच वेळीं चतुरसिंग भोसल्यास असेंच बाजीरावानें दगाबाजीनें अडकवून ठेविलें, हें सुप्रसिद्ध आहे. छत्रपतीसंबंधानें बाजीरावास नेहमींच धास्ती वाटे.

आपल्या एकंदर उद्योगाचा फलादेश खुद्द यशवंतरावानें नागपुरकर व्यंकोजी भोसले यास एक सुंदर पत्र लिहून केला आहे तें पत्र येणें प्रमाणें:—

राजश्री व्यंकोजी भोंसले सेना-धुरंधर गोसावी यांस सकल गुणालंकरण अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य, स्ने।। यशवंतराव होळकर राम राम विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकीय लिहीत असावें. विशेष. आपण छ १६ रबिलाखरचें ( १४·७·१८०५ ) पत्र पाठविलें तें छ १६ जिल्कादीं ( ८·२·१८०६ ) पावलें. अभिप्राय अवगत झाला. ' आपलें पत्र आलें होतें त्यावरून येण्याची सिद्धता झाली, परंतु अनेक प्रकारच्या अडचणी प्राप्त होऊन यावयाचा योग तूर्त घडत नाहीं; जमियेत रवाना केली आहे ती येऊन पावेल, मागाहून हरएक निमित्तानें नर्मदा उत्तर तीर येणें घडेल व सविस्तर रा। व्यंकटराव कृष्ण यांचे लिहिल्यावरून कळेल, ' म्हणोन लिहिलें व मशारनिल्हेचे लिहिण्यावरून समजण्यांत आलें. ऐशीयास, स्वराज्यांत जलचरांचा प्रसार विशेष झाला. हा घडूं न येण्यास्तव, महाल मुलकाची आशा न ठेवितां, कळेल त्याप्रमाणें फौज व कंपू वाढवून, करोडों रुपयांचे पेंचांत येऊन, आज दोन अडीच वर्षे होत आलीं, रात्रंदिवस इंग्रजांशीं मुकाबल्याचा प्रसंग घडत आला. दरम्यान र।। दौलतराव सिंदे यांसी मेळ करून भेट घेतली. त्यांचे आपले एकविचारानें पगडीवाले सामील राहतीलच, या भावें आपल्याकडे पत्रांच्या रवानग्या होत गेल्या. मेवाड प्रांतीं आलियावर तांम्रांस चोहोंकडून पायबंद देऊन हारीस आणावे यास्तव पंजाबापावेतों यावयाचें केलें. इकडे लाहूरवाले वगैरे शीखांच्या भेटी होऊन सर्व सामल जाले. पोख्त जमाव झाल्यामुळें फिरंगी मागें पंचवीस तीस कोसांचे अंतरानें येत गेले. त्यांनीं पट्यालाचे मुकामापासून समेटाचें बोलणें लाविलें. इकडील मुस्तेद ( तयारी ) पाहून सोबत्यांनीं ( सिंद्यांनीं ) राजेरजवाडे अनुकूल करून दिल्लीचे सुमारें येऊन शह द्यावा, तें न करितां, कारभारी दुराशेंत ( कारभाऱ्यांच्या स्वार्थात ) येऊन पुनः त्यांसीं एकोपा ठेवून मेवाडांत राहिले. ( पूर्वी ) स्वराज्यांतील ऐक्यता बहुत, येणें करोन आज पावेतों व्यंग न पडतां एकछत्री अंमल फैलावला होता. हल्लींच्या आपसांतील चाली पाहून सर्वांस आपलें घर संरक्षण करून जमीनदारीनें

असावें हें प्राप्त झालें. ( आपले ) येण्याची प्रतीक्षा होतीच, तो योग न झाला. फौज सामल होईल हें कागदपत्रीं मात्र श्रवण झालें; अथवा तिकडेच बंगाल्यांत वगैरे बल धाडलें असतें तरी किती उपयोग घडता ! हिंदु धर्मास मुख्य आपले इरादे नमूद असावे तें कांहीं एक दिसण्यांत येईना. स्वधर्मास येक आमचा नफा, वरकडांची नुकसानी, असाही अर्थ नाहीं. सर्वत्रांची उमेद अनुभव व प्रत्यये पाहून अंग्रेजांकडून समेटाचें बोलणें जालें होतें, त्यावरून समेट करून घेतला. फिरंगी कूच करून माघारे दिल्ली प्रांतीं गेले. आमचे मुकाम व्यासगंगा व सतलज नदीचे द्वाबांत आहे. इतःपर दरकूच माळवा प्रांतीं यावयाचें घडेल वरकड घरोब्याचे विचार सनातन आहेत ते यथाक्रम चालवावे; इकडील दुसरा अर्थ मानूं नये. सविस्तर राजेश्री व्यकंटराव कृष्ण यांचे लिहिल्यावरून कळेल. सर्वदा पत्र पाठवून कुशळ वर्तमान कळवीत असावें. रवाना छ २५ जिल्काद सु॥ सीत मया तैन व आलफ. जीणाजे. बहुत काय लिहिणे लोभ कीजे हे विनंती मोर्तब ( १५·२·१८०६ ).

# प्रकरण बारावें

## बाजीरावाची चहूंकडून घसरपट्टी

### १८०५–१८१४

**मावशीबाई नांव सवाई बहु कीर्त केली ।**
**पंताचे मागें जहागीर ठासून राखिली ॥**

प्रतिनिधींचा पोवाडा—**दाऊ बहुरूपी.**

१ प्रतिनिधींचा पाडाव, बापू गोखल्याचा उत्कर्ष ( स. १८०५·०६ ).
२ निजामशाहीचा उत्तर कालीन कारभार; पामर-पेढी.
३ जहागीरदारांना इंग्रजांचा पाठिंबा,-पंढरपुरचा तह.
४ खुरशेटजी मोदी. ५ गायकवाडींत इंग्रज घुसले.
६ इंग्रजांस काढण्याचे गायकवाडांचे निष्फळ प्रयत्न.
७ गंगाधर शास्त्र्यास पुण्यास येण्याचें प्रयोजन.

**१ प्रतिनिधींचा पाडाव, बापू गोखल्याचा उत्कर्ष,** (स. १८०५·६)—फत्तेसिंग माने रहिमतपुरकर यशवंतराव होळकराचा एक प्रमुख सरदार होळकराचे

स्वारींत दक्षिणेंत आल्याचें पूर्वी सांगितलेंच आहे. त्यास आपल्या बाजूस वळविण्याचे बाजीरावानें पुष्कळ प्रयत्न केले. तेव्हां त्यानें होळकरास सोडलें, परंतु दंगेखोरपणाचा त्याचा स्वभाव गेला नाहीं. दहा हजार फौज जमवून नीरेचे दक्षिणेकडील प्रतिनिधीच्या वगैरे मुलखावर तो यथेच्छ ताव मारूं लागला. तेव्हां प्रतिनिधींचा कारभारी बळवंतराव फडणीस व चिंतामणराव पटवर्धन यांनीं बाजीरावाचे हुकमानें त्याजवर चाल करून पंढरपुराजवळ फत्तेसिंगास व त्याच्या पुष्कळ साह्यकांस ठार मारिलें, (६·७·१८०५), आणि त्याच्या फौजेचा जमाव मोडून टाकिला. या नंतर प्रतिनिधींचें प्रकरण विकोपास गेलें. परशरामपंत प्रतिनिधीची व बाजीरावाची चुरस केवढी होती त्याची हकीकत मागें (प्र. ६ क. ७ त) आली आहे. लहानपणीं मावशीनें राज्य रक्षिलें फार दुर्वृत्त निघाला. आईचें व त्याचें वांकडें आलें. बायकोला त्यानें टाकून दिलें आणि रक्षा रमा तेलीण ठेविली. तिच्या नादानें वागूं लागल्यामुळें सर्वांशींच त्याचा बेबनाव झाला. भांग फार प्यावी, रामोशी लोक चाकरीस ठेविले. मुलखांत दंगे दरोडे घालून मुलूख लुटून व मारून माणसांचे नाकांत व कानांत दारू घालून माणसें मारावीं, अशीं दुष्ट कर्मे चालविलीं. गवई, तमासगीर वगैरे हलक्या माणसांच्या संगतींत तो आपला सर्व काळ घालवूं लागला. त्याच्या स्त्रिया लक्ष्मीबाई व रमाबाई नवऱ्याच्या भीतीनें पळून विशाळगडावर जाऊन राहिल्या.

कृष्णराव तात्या जोशी यास पूर्वी नाना फडणिसानें प्रतिनिधीचे कारभारावर नेमिलें होतें. त्यास (स.१७९५त) पंतानें काढून गणेशपंत कात्रे व बळवंतराव फडणीस व मातुश्री काशीबाई यांचे सल्ल्यानें त्यानें कांहीं दिवस कारभार केला. पुढें कात्रेही कारभारांतून निघाले. पंतांचें व मातुश्रीचें वांकडें पडलें. तिनें बळवंतराव फडणिसास हाताशीं घेऊन फौज जमविली. इकडे प्रतिनिधिही आपली फौज जमवून प्रांतांत खंडण्या घेऊं लागले. निगडीकर आबा चिटणिसाचे नातू तात्या याचे कानांत काकडे पेटवून घालून व तव्यावर उभे करून त्याचा वाडा लुटला. त्या मारानें तात्या चिटणीस मेला. असा प्रजेस बहुत उपद्रव केला. कोकणांत उतरून दंगा करणार म्हणून त्याचे बंदोबस्तासाठीं ता. ११·११·१८०४ रोजीं कोंकणच्या अधिकाऱ्यास बाजीरावानें हुकूम सोडले. बळवंतराव फडणिसानें हा सर्व प्रकार बाजीरावाचे कानावर घालून प्रतिनिधीचा बंदोबस्त करण्याविषयीं विनंति केली. बाजीराव तर प्रतिनिधीस तिलांजली देण्यास अगोदरच टपून बसला होता. फत्तेसिंग मान्यास जिंकल्या पासून त्याची मर्जी बळवंतरावावर खूष झाली होती. यापूर्वीच बाजीरावानें प्रतिनिधीचा फडशा उडविला असता, परंतु पटवर्धन मंडळी प्रतिनिधीस सामील होतील या भीतीनें बाजीरावानें आपला हात आवरला.

प्रस्तुत बळवंतरावानें पुण्यास येऊन बाजीरावाची मदत मागतांच बापू गोखल्यास त्यानें प्रतिनिधीवर पाठविलें. त्याच्या मदतीनें काशीबाईनें पंतास पकडून मसूरच्या गढींत अडकवून ठेविलें ( स. १८०६ ), आणि बंडाचा उपशम झाला असें समजून बापू गोखले पुण्यास परत आला. परंतु पंताची रक्षा रमा ऊर्फ ताई तेलीण धाडसी व कल्पक होती. तिनें फौज जमवून सह्याद्रीच्या डोंगरी भागांतील वासोटा किल्ला हस्तगत करून बंड उभारलें आणि तेथून मसूरवर चालून येऊन तिनें प्रतिनिधीस सोडविलें. त्यानें लगेच मुलखांत धुमाकूळ आरंभिला. आम्ही छत्रपतींचे नोकर आहोंत, बाजीरावाची आज्ञा आम्ही मानणार नाहीं, छत्रपतीस सुद्धां बाजीराव अन्यायानें वागवीत आहे, सबब त्यासच काढून टाकिलें पाहिजे, असा पुकारा करून, वारणा आणि नीरा नद्यांच्या दरम्यान पंतानें उपद्रव आरंभिला. त्याच्या या अद्भुत लौकिकानें त्या बाजूचे पुष्कळ साहसी लोक त्याचे साह्यकारी झाले. न्यायाच्या व व्यवस्थेच्या मार्गानें मुलखाचा बंदोबस्त करून छत्रपतीच्या नांवाखालीं तो उद्योग करता तर बाजीरावास भारी झाला असता. पण त्याच्या क्रूर स्वभावानें तो सर्वांसच अप्रिय झाला. आई व बळवंतराव यांस सामील असलेल्या माणसांचे त्यानें अतिशय हाल चालविले. तेव्हां बाजीरावानें पुनः बापू गोखल्यास त्याजवर रवाना केलें. गोखल्याशीं समोर सामना न करितां डोंगरी मुलखांतच तो बचावाचें धोरण स्वीकारून राहता तर त्याचा गोखल्यापुढें थोडा बहुत निभाव लागला असता. परंतु वसंतगडाखालीं येऊन त्यानें गोखल्यावर चाल केली. कोणेगांवचे रानांत ता. २७·३·१८०६ रोजीं उभयतांची लढाई होऊन प्रतिनिधीला १४ जखमा लागल्या, आणि त्याचा उजवा हात तुटून त्यास गोखल्यानें पकडून घेतलें. तेव्हां पासून त्यास थोटेपंत असें नांव पडलें. त्या प्रसंगीं ' कारभारी बळवंतराव यास व मातुश्रीस तुम्ही अटकेंत ठेवीत असाल तर आम्ही जखमा शिवून घेऊं, नाहीं तर आम्हास जिवंत राहण्याची इच्छा नाहीं,' हें त्याचें भाषण ऐकून गोखल्यानें बळवंतरावाचा व मातुश्रीचा बंदोबस्त केला; आणि प्रतिनिधीस हत्तीचे अंबारींत घालून पुण्यास आणिलें, आणि राघोपंत गोडबोले याचे वाड्यांत कैदेंत ठेविलें. प्रतितिनिधीची दौलत सर्व गोखल्यानें लुटून घेतली. त्याचा एकंदर सरंजामही बाजीरावानें गोखल्याचे ताब्यांत दिला. हा सरंजाम कैक वर्षे बापू गोखल्याकडे राहिल्यामुळें फौजेच्या बळावर त्यानें सुद्धां रयतेस नागवून अतिशय संपत्ति जमा केली. याच पैशाच्या बळावर गोखल्यास पुढें एवढें महत्त्व प्राप्त झालें. बळवंतराव फडणिसास मात्र बाजीरावाकडे प्रथम दाद मागितल्या-

बद्दल अत्यंत पस्तावा झाला. कारण पंत बरा, पण गोखले नको, अशी त्याची स्थिति जाली. तो कैदेंतच मरण पावला असें दिसतें.

बाजीरावानें प्रतिनिधीचें पुरातन घराणें धुळीस मिळविलें ही गोष्ट दौलतराव सिंद्यासही मानवली नाहीं. त्यानें माधवराव देशमुख नेवासकर यास खालील मतलबाचीं वारंवार पत्रें लिहून बाजीरावाची समजूत घालण्यास लिहिलें. 'प्रतिनिधि, त्यांची मातुश्री व कारभारी यांची मुक्तता करून त्यांचें संस्थान यथापूर्व त्यांजकडे चालेसें करावें. दिवसगत लावूं नये' (ता. ६·३·१८१० प्रतिनिधि दप्तर ). प्रतिनिधींच्या बायांची व्यवस्था लावण्यासंबंधानेंही अशाच शिफारसी दौलतरावानें केल्या.

वसंतगडच्या संग्रामांतून तेलीण पळून गेली ती वोसाटा किल्ला बळकावून बसली. तेव्हां त्या किल्ल्यावर बापू गोखल्यानें चाल केली. त्या प्रसंगीं तिनें शिताफीनें आठ महिने किल्ला लढविला. परंतु धान्याची कोठडी जळाल्यामुळें तिचा नाइलाज होऊन ती बापू गोखल्याचे स्वाधीन झाली. 'तेलिण मारी सोटा' ही सुप्रसिद्ध आर्या त्या प्रसंगाची आठवण अद्यापि लोकांत जागृत ठेवीत आहे. तेलणीस आणून गोखल्यानें पुण्यास कैदेंत ठेविलें. प्रतिनिधीच्या बायका लक्ष्मीबाई व रमाबाई यांस विशाळगडचे प्रतिनिधि भगवंतराव यांनीं वसंतगडाहून आपल्या जवळ आणून त्यांचा सांभाळ केला. त्या नऊ वर्षें तेथें होत्या. ता. १·१२·१८११ रोजीं बाजीरावानें प्रतिनिधीस कैदेंतून सोडिलें आणि त्यास कांहीं अत्यंत नीरस मुलूख सरंजामांत लावून देऊन परत कऱ्हाडास पाठविलें. "प्रतिनिधीकडील अंमलाचीं जप्ती गोखले याजकडून दूर करून सालमजकुरीं प्रतिनिधीचे जातीस व सरंजामास लावून देवविला."

पुण्याहून पंत सुटून आल्यावर तो भगवंतरावाचे भेटीस मलकापुरास गेला. तेथें उभयतांच्या भेटी व सत्कार पुष्कळ झाले. त्याच्या बायका मलकापुरास अगदीं एका कुटुंबांतल्याप्रमाणें नऊ वर्षें राहत होत्या. नंतर पंत कऱ्हाडास येऊन कारभार करूं लागला, तरी त्याची पूर्वीची वृत्ति निवळली नाहीं. आई मरण पावली तेव्हां त्याच्या बायका मलाकापुराहून कऱ्हाडास आल्या. परंतु नवऱ्यानें त्यांची भेट घेतली नाहीं. लाड्या न्हावी प्रतिनिधीचे फार लोभांत होता. आपलेपेक्षां त्याचा इतमाम अधिक ठेवून सारा कारभार त्याजकडे दिला. त्याची वर्तणूक नीट नाहीं म्हणून त्यास गोखले यांनीं कैद करून कांगोरीचे किल्ल्यावरून लोटून ठार मारिलें ( स. १८१७ ).

सन १८१८ त पेशवाई बुडून सातारचें राज्य निर्माण झालें, तेव्हां प्रतिनिधीस इंग्रजांनीं छत्रपतीचे ताब्यांत दिलें. तेव्हां पासून इंग्रजांचे धाकानें पंत पुष्कळ नरमाईनें

वागूं लागला आणि पुष्कळ वर्षे जगून ता. १०-५-१८४८ रोजीं मरण पावला. एकंदर परिस्थिति ध्यानांत घेतली तर या प्रतिनिधीची गणना कर्तृत्ववान पुरुषांत केली पाहिजे. त्याच्या खाजगी वर्तनाचा उगाच गवगवा करून बाजीरावानें आपला स्वार्थ साधला. व्यक्तीच्या खाजगी वर्तनाकडे दुर्लक्ष करण्याचाच विचारवंतांचा संप्रदाय आहे. तैलीण रक्षा ठेविली हें प्रतिनिधीचें पाप बाजीरावाच्या स्त्रैणत्वापुढें कांहींच नव्हे. बाजीरावानें प्रतिनिधीस उत्तेजन देऊन राष्ट्रीय कामगिरीवर घेतलें असतें तर मराठी राज्य बचावण्याचे कामीं पंताच्या शौर्याचा व धाडसाचा उपयोग चांगला झाला असता, असें वाटल्याशिवाय राहत नाहीं. चतुरसिंग भोसले किंवा हा प्रतिनिधि यांच्यासारखे अनेक पराक्रमी पुरुष केवळ बाजीरावाच्या नालायकीमुळें मातीमोलास पावले. खुद्द त्याचा प्रियकर दोस्त त्रिंबकजी डेंगळे हा सुद्धां बाजीरावाच्याच नालायकीमुळें दुर्दशेस पोंचला. प्रतिनिधीला नागवून बापूगोखल्याचा बडेजाव वाढविण्यांत बाजीरावानें कसकशा युक्त्या लढविल्या त्याचा पुरावा इ. सं. पे. द. सरंजाम याद्या नं. ३, ४, ५ व २९, ३० व ३१ स. १८०८–१८१४ पावेतोंच्या छापलेल्या आहेत त्यांत पाहवा. प्रतिनिधीचा दर्जा किंवा पूर्व इतिहास बाजीरावास यत्किंचित् अवगत होता असें त्यावरून दिसत नाहीं.

**बापूगोखल्या**चें मूळ ठिकाण कोंकणांत पिरंदवणें ता. विजयदुर्ग येथें होतें. याची वंशावळ अन्यत्र दिली आहे, ती पाहवी. विजयदुर्गची मामलत गंगाधरपंत भानूकडे असतां त्याचे हाताखालीं धोंडोपंत गोखले कामावर राहिला. चोरांचें वगैरे पारिपत्य केल्यामुळें धोंडोपंत गोखल्यास नाना फडणिसानें पुण्यास आणून हुजरातींत ठेविलें. तेव्हांपासून त्यानें आपलें पथक घेऊन अनेक स्वाऱ्यांत काम केलें. वाघाचे स्वारींत धोंडोपंत गोखले व पुतण्या महादेव आपा गोखले मारले गेले हें वर्तमान पूर्वी आलेंच आहे. पटवर्धनाचा पाडाव करण्यांत गोखल्यांनीं बाजीरावाची मर्जी संपादिली. "बापू गोखले हे महाशूर, इमानी, मसलती, लोकराजी, जितेंद्रिय यशस्वी, अंतरनिष्ठ, ज्ञानी असे योग्य जाणून श्रीमंतांनीं हुजूर आणून ठेविले, वासोटा किल्ल्यावर तेलणीशीं लढून प्रतिनिधीचा पाडाव केला." ता १-८-१८१२ रोजीं फौजेचे बेगमीस बाजीरावानें गोखल्यास सरंजाम दिला. "बाजीरावाचा बिघाडाचा डौल दृष्टीस पडतांच एल्फिन्स्टननें बापूकडे निरोप पाठविले, कीं 'आपण आमचे लक्षांत असावें.' त्यावरून धन्याचें इमान बुडविल्यास इंग्रज बहादूरच मला दोष लावतील, चाकरीवर प्राण गेला तरी चिंता नाहीं, परंतु लोकांचा

अपवाद येणार आणि परलोकही नाहीं, असें मनांत आणून बाजीरावास न सोडण्याचा आपला निश्चय त्यानें साहेब बहादूरांस कळविला. " त्यापुढें लढाया चालू झाल्या. पेशव्यांची स्वारी बाहेर निघाल्यावर बापू गोखल्यानें ठिकठिकाणीं इंग्रजांस गांठून मातबर लढाया करून, यजमानांची आघाडी पिछाडी संभाळीत चालले. यांच्या फौजेची चिकाटी इंग्रजांस तुटेना. बहुतच अडचण त्यांस पडली. शेवटीं आष्टीच्या समरभूमीवर त्यानें प्राणत्याग करून स्वामिनिष्ठेची शर्थ करून दाखविली ती हकीकत पुढें येईल.*

**१ निजामशाहीचा उत्तरकालीन कारभार, पामर–पेढी.**—मराठ्यांच्या इतिहासांत निजामाचा संबंध नाहीं असें कधीं होत नसतें. स. १७९८ त इंग्रजांचा प्रवेश निजामशाहींत झाल्यावर त्याचें राजकारण संपलें. तरी मराठ्यांच्या हकीकती समजण्यास निजामशाहीच्या कारभाराचें सामान्य दिग्दर्शन करणें अवश्य आहे. निजामाची हकीकत मागें प्र. १० क. ६ त आली आहे. सिकंदरजा सन १८०३ सालीं गादीवर आला. त्याचें व इंग्रजांचें कधींच पटलें नाहीं. रेसिडेंटानें सर्व कारभार आपल्याच हातांत ठेविला होता. ता. १०·५·१८०४ रोजीं मश्रून्मुल्क मरण पावल्यावर मीरआलम यास रेसिडेंटाच्या आग्रहास्तव दिवाण नेमण्यांत आलें. मीरआलमवर सिंकदरजाचा बिलकूल विश्वास नव्हता, व त्याच्या हातांत सत्ताही पण त्यानें दिली नाहीं. महिपतराम या नांवाचा गृहस्थ निजामाच्या तर्फेनें वऱ्हाडच्या कारभारावर होता, त्यास दिवाण करावें अशी निंजामाची इच्छा होती. महिपतराम इंग्रजांचे विरुद्ध असून सिंदे होळकरांच्या मदतीनें निजामशाहीवरील इंग्रजांचा ताबा झुगारून द्यावा अशा खटपटींत होता. हा महिपतराम आपले जिवास दगा करील अशी मीरआलम यास धास्ती पडली, म्हणून तो हैदराबाद शहरांत असलेलें आपलें मकाण सोडून इंग्रज हद्दींत रेसिडेंटाच्या आश्रयास जाऊन राहिला. ‡

तैनाती फौजा एतद्देशीय राजाच्या संरक्षणास इंग्रजांनीं ठेविल्यापासून ते स्वतः उत्तरोत्तर अत्यंत दुर्बल बनले. शरीराच्या अवयवांना आपण काम दिलें नाहीं तर ते जसे निरुपयोगी बनतात तशी या दौलतदारांची स्थिति झाली. निजामानें तर या फौजेच्या बळावर हाताखालच्या जहागीरदारांस वाटेल तसे छळून पैसा उपटण्याचा सपाटा

---

* बा. रो. पृ. ४८-४९; गोखले कै. रु. २.   ‡ Origin of the Pinharies 1818 p. 132, 139; Prinsep.

चालविला. त्यांच्या ताब्यांतला सुंदर प्रदेश अगदीं बेचिराख होऊन गेला, शेती बंद पडली, लोक त्रस्त व दुबळे झाले. अशीच स्थिति अयोध्येच्या वजिराची झाली. दोन्ही राज्यांत अंदाधुंदी इतक्या परमावधीस पोंचली कीं प्रत्यक्ष इंग्रजांस सुद्धां त्याजबद्दल लाज वाटूं लागली. निजाम सिंकदरजा अत्यंत व्यसनी व निर्बुद्ध होता. कारभार करीत नसे. उभ्या वर्षांत तो कधीं जनानखान्याबाहेर पडत नसे. सन १८०६ नंतरच्या दहा वर्षांत त्याला कधीं कोणीं नजरेनें सुद्धां पाहिलें नाहीं. नेहमीं बायकांच्या संगतींत राहून दासींच्या तोंडी निरोपांनीं सर्व कारभार चाले. प्रत्यक्ष कुटुंबांतील लोक सुद्धां आपल्यावर उठलेले आहेत अशी त्याची भावना होऊन त्याला आपल्या जिवाची एवढी धास्ती वाटे, कीं स्वतःच्या मुलांची तरी भेट वर्षांतून एकदां झाली तर भाग्य! मुख्य कारभारी मीरआलम याजवर त्याची अगदीं इतराजी होती. सर्व कारभार नायब दिवाण चंदुलाल करी, त्यासच रेसिडेंटाचा पाठिंबा होता. व्यसनासक्तीमुळें विचार करण्याची देखील पात्रता सिंकदरजाच्या अंगीं राहिली नव्हती. सरकारी कामासंबंधानें कोणताही प्रश्न दिवाणानें त्याजपुढें आणिला तर त्यास अत्यंत तिरस्कार वाटे. काहीं कर्तव्यच न राहिल्यामुळें खुद्द त्यालाही आपलें जिणें नकोसें झालें. या हीन स्थितीचें कारण इंग्रज अशी मात्र त्याची पक्की खात्री होऊन बसली. हैदराबादची वस्ती तीन लाख असून राजाप्रमाणेंच लोक सुद्धां दुःखांत व व्यसनांत निमग्न असत. वेश्या, मद्य, खून वगैरे अनाचार हैदराबादेप्रमाणें पृथ्वीच्या पाठीवर दुसरे कोठेंही नसतील असें त्या वेळच्या लेखांत म्हटलेलें आहे. निजामाची फौज सन १८०७ पासून कमी करण्याचा प्रयत्न इंग्रजांनीं चालविला. निजामास इंग्रजांचें संरक्षण नसतें तर त्याची फौज व राज्य या पूर्वीच मराठ्यांनीं गिळंकृत केलें असतें. खर्ड्याच्या लढाईनंतर सवाई माधवराव दिवंगत होऊन बाजीरावाच्या भानगडी उपस्थित झाल्या नसत्या, तर निजामाचें राज्य कधींच नाहींसें झालें असतें. कारण शक्तीच्या व नीतिमत्तेच्या योगानें मराठे निजामाहून किती तरी पट वरचढ होते. मुसलमानांपेक्षां हिंदु लोक पुष्कळ पटीनें जास्त निर्व्यसनी, उद्योगी व नीतिमान आहेत असें त्या वेळच्याच इंग्रज मुत्सद्यांनीं अनेकवार लिहून ठेविलें आहे. इंग्रजांनीं मध्यें पडून निजामास वांचविलें हाच याजवर त्यांचा मोठा उपकार होय.

दिवाण मीर आलमचा नायब पेशकार **चंदूलाल** हा कारभार करी हें वर सांगितलेंच आहे. हल्लीं ( सन १९३१ ) पेशकारीवर असलेला राजा किसनप्रसाद हा चंदुलाल-चाच वंशज होय. सिंदे होळकरांची मदत आणण्याकरितां राजा महिपतराम वऱ्हाडचा

कारभार सोडून माळव्याकडे गेला, तेव्हां त्याच्या जागीं चंदुलालचा भाऊ गोविंदबक्ष याची नेमणूक करण्यांत आली. चंदूलाल व गोविंदबक्ष हे सर्वथैव रेसिडेंटाच्या तंत्रानें चालत. महिपतराम होळकराकडे गेला तो पुनः परत आला नाहीं. होळकरांकडेच असतां तो सन १८११ च्या सुमारास मारला गेला. दिवाण मीरआलम सन१८०८त मरण पावला, तेव्हां मुनीरुल्मुल्क यास नांवाची दिवाणगिरी देऊन कच्चा कारभार चंदूलालानें करावा असें ठरलें. त्या वेळीं मयत निजामअलीचे दोघे धाकटे मुलगे शमशामउद्दौला व मुबारीजउद्दौला आणि चुलतबंधु इन्तियाजउद्दौला हे तिघे रंगेल गडी वाटेल तशी उधळपट्टी चालवीत होते. त्या मुलांची आई आणि सिकंदरजाची बायको जहान परवर बेगम या दोघींचा त्यांस पूर्ण पाठिंबा होता. त्यामुळें चंदुलालाचें त्यांच्यापुढें कांहीं चाललें नाहीं. रेसिडेंटानें खुद्द निजामाकडे या संबंधानें तक्रारी केल्या, त्यावरून निजामानें हुकूम दिला, कीं त्या दोघां भावांस पकडून त्यांचा बंदोबस्त करा. एकदां सेप्टेंबर १८१४ त रेसिडेंटानें त्यांस पकडलें सुद्धां आणि गोवळकोंड्याच्या किल्ल्यावर बंदींत ठेविलें. तेव्हां थोडे दिवस हैदराबादेंत कांहींशी शांतता झाली.

चंदूलालानें निजामशाहीचा कारभार स. १८०८ पासून १८४३ पर्यंत ३५ वर्षें केला. इंग्रज रेसिडेंटाच्या कलानें वागून त्यानें राज्यांत शक्य तेवढी सुधारणा केली. मध्यंतरीं निजाम सिंकंदरजा ता. २१·५·१८२९ रोजीं मरण पावला, तेव्हां त्याचा मुलगा नासीरउद्दौला पदारूढ झाला. परंतु यामुळें चंदूलालाच्या कारभारांत फरक घडून आला नाहीं. निजामाच्या राज्यास अतिशय कर्ज झालें, त्याचें निवारण न करतां आल्यामुळें चंदूलाल यास राजीनामा देणें भाग पडलें, ( ता. ६·९·१८४३ ). त्यानंतर ता. १५·४·१८४५ रोजीं तो मरण पावला. त्यास दररोज १ हजार रु. तनखा होता. चंदुलालाचे पश्चात् त्याचा पुतण्या राजाराम बक्ष यानें निजामशाहीचा कारभार कांहीं दिवस केला. निजामाच्या राज्यांत चंदूलालाचा व त्याच्या घराण्याचा लौकिक मोठा आहे. तो स्वतः उदार, धर्मनिष्ठ व दयाळु होता, अशी त्याची ख्याति असून, त्याची वाखाणणी सर्व इंग्रज रेसिडेंटांनी केली आहे. हैदराबाद येथील रेसिडेंटाच्या बंगल्यांत त्याची अस्सल तसबीर आहे.

निजामशाहीस कर्ज झालें त्या बाबतींत **पामर आणि कंपनी** या नांवाच्या इंग्रज पेढीचा त्या वेळीं मोठा गवगवा झाला. ही पढी अलाहाबाद येथें स्थापन झाली होती. सिंद्याचा रेसिडेंट कर्नल पामर यानें एका मुसलमान बाईशीं लग्न केलें, तिच्या पोटीं त्यास तीन मुलगे झाले, त्यांची नांवें जॉर्ज, वुइल्यम व हेस्टिंग्ज. वडील जॉर्ज पामर

हा कलकत्ता येथें व्यापार करून धनाढ्य बनला. दुसऱ्या दोघां बंधूंनीं हैद्राबाद येथें राहून व्यापार सुरू केला. पैकीं पुढें वुइल्यम पामरनें अलाहाबाद येथें आपली पेढी स्थापिली, आणि सर्व हिंदुस्थानभर व्यापार सुरू केला. या इंग्रज पेढींत सॅम्युअल रसेल, वुल्यम करी, आणि सर वुल्यम रंबोल्ड ( मद्रासचा गव्हर्नर टॉमस रंबोल्ड याचा नातू ) हे गृहस्थ पामरचे भागीदार होते. प्रथम कर्जाऊ रकमा देऊन या पेढीनें वऱ्हाडांतील कापसाचा व इमारती लाकडांचा व्यापार सुरू केला. हेन्री रसेल नांवाचा गृहस्थ स. १८११ पासून १८२० पावतों हैद्राबादेस रेसिडेंट होता. त्यानें चंदूलाचे मार्फत पामर पेढींतून कर्जाऊ रकमा वारंवार निजामास देऊन त्याच्या अडचणी भागविल्या. हें कर्ज वाढत जाऊन सर्वच राज्य गहाणा दाखल सावकारांचे हातांत गेलें, तेव्हां पामर व रंबोल्ड यांनीं राज्यांत वाटेल तसा धिंगाणा चालविला. त्यामुळें पंचवीस वर्षें पावेतों पैशाच्या पायीं राज्यास अत्यंत दैन्यावस्था आली. त्यांतच पेंढाऱ्यांनीं व मराठ्यांनीं त्या राज्यावर ताव मारण्यास कमी केलें नाहीं. स. १८२० सालीं रसेलची बदली होऊन मेटकाफ् रेसिडेंट म्हणून नेमून आला, त्यानें पामर पेढीच्या विरुद्ध आलेल्या कागाळ्या ऐकून सर्व राज्यांत स्वतः फिरून पामर कंपनीस काढून टाकण्यासंबंधानें ग० ज० कडे सूचना केल्या. परंतु त्या सूचना लॉर्ड हेस्टिंग्जनें मान्य न केल्यामुळें पामर कंपनीचें वजन जास्तच वाढलें. पुढें स. १८२३ चे आरंभीं लॉर्ड हेस्टिंग्ज कारभार सोडून गेल्यावर त्याचे जागीं जॉन अॅडमची हंगामी नेमणूक झाली. अॅडमनें मेटकाफ्ची सूचना स्वीकारून सरकारांतून निजामास कर्ज दिलें व पामर कंपनीच्या देण्याचा निकाल केला; त्याबरोबर कंपनीचें दिवाळें निघून कैक वर्षें चाललेले या उधळखोरांचे अनाचार बंद पडले.

निजामाचे राज्यांतील अंदाधुंदी पूर्वापारचीच आहे. कोणताही उपयुक्त उद्योग न करतां व्यसन व चैनबाजींत कालक्रमणा करण्याचा राज्यकर्त्यांचा सपाटा शेंकडो वर्षें सारखा चालत राहिल्यामुळें निःसीम बजबजपुरी राज्यांत माजली आणि इंग्रजांच्या लष्करी संरक्षणामुळें ती अव्यवस्था कधींच मोडूं शकली नाहीं. मराठ्यांचा एतत्कालीन इतिहास समजण्यास वरील निजामशाहीची हकीकत लक्षांत ठेविली पाहिजे.

**३ जहागीरदारांना इंग्रजांचा पाठिंबा, पंढरपुरचा तह** (७-७-१८१२).— बाजीराव व इंग्रज यांचे परस्पर संबंध कसकसे बनत गेले, परस्परांचा लोभ व रोष केव्हां काय निमित्तानें उद्भवला हें लक्षांत आणणें बोधप्रद आहे. सन १८०५ अखेर सर्व युद्धें पुरीं होऊन मराठे व इंग्रज दोघेही कांहीं काळ शांत वृत्तीनें

व्यवसाय करूं लागले. तेव्हां इंग्रजांविरुद्ध कारस्थानें चालविण्याचें प्रयोजनही उरलें नाहीं. " वसईस तहनामा झाल्यावर राज्याचा बंदोबस्त कंपनी सरकाराचे दोस्तीमुळें बंडावा वगैरे मोडून मुलूख आबाद झाला. सालोसाल वसुलाची पैदास वाढत गेली. सारे सरदार हुकूम मानूं लागले. त्यावरून श्रीमंतांची मर्जी सुप्रसन्न होती. सदाशिव माणकेश्वरानें रेसिडेंटाशीं रहस्य ठेवून श्रीमंतांचें हित साधलें. " सर बॅरी क्लोज पुण्यास रेसिडेन्सीवर असेपर्यंत हा प्रकार चालला. तो गृहस्थ सन १८०९ च्या जुलै महिन्यांत पुणें सोडून हैदराबादेस गेला, तेव्हां कांहीं दिवस हेन्री रसेलची हंगामी नेमणूक पुण्यास झाली. पण या सालच्या अखेरीस एल्फिन्स्टन अफगाण वकिलातीचे कामावरून परत कलकत्त्यास आला, तेव्हां त्याची नेमणूक पुण्याचे रेसिडेन्सीवर होऊन तो सन १८१०चे जानेवारींत कलकत्त्याहून निघून जलमार्गानें मुंबईस येऊन उन्हाळ्यांत पुण्यास दाखल झाला. सर बॅरी क्लोज पुढें कांहीं दिवस पेंढाऱ्यांचे बंदोबस्तास होता, तो सप्टेंबर १८१०त मरण पावला. *

रेसिडेंटाची ही बदली बाजीरावाचे दरबारास अप्रत्यक्षपणें भोवली. **खुरशेटजी मोदी** नांवाचा गृहस्थ क्लोज व बाजीराव यांचे दरम्यान बोलणें करण्याचे कामावर कैक वर्षें होता. त्याचें व सदाशिव माणकेश्वराचें रहस्य असून दोघे एक विचारानें वागून आपापल्या धन्याचें हित सांभाळीत होते. पुढें एल्फिन्स्टन आल्यावर त्यास देशी भाषा येत असल्यामुळें मोदीची जरुरी राहिली नाहीं. इकडे याच वेळीं त्रिंबकजी डेंगळ्यावर बाजीरावाचें मन बसून त्यास त्यानें कारभारांत घेतलें, तेव्हां डेंगळ्याचें व मोदीचें रहस्य जुळून सदाशिव माणकेश्वर बाजीरावाचे मर्जीतून उतरला. ' त्रिंबकजीस दौलतदारीची चाल ठाऊक नाहीं, कधीं काम केलें नव्हतें. यामुळें पहिले संप्रदाय सोडून मनास वाटेल तशीं ताठ्याचीं बोलणीं रेसिडेंटाशीं बोलूं लागले, आणि त्रिंबकजीचे ठिकाणीं बाजीरावाचा भरंवसा जसजसा वाढत गेला, तसतशी एल्फिन्स्टनची नाखुषी होऊं लागली. '

बाजीरावाचा लोभही अनावर झाला. सरदारांचे सरंजाम खालसा करून तो आपलें उत्पन्न वाढवूं लागला. बाजीरावाच्या संरक्षणास इंग्रज सिद्ध असल्यामुळें सरदारांची पर्वा ठेवण्याचें प्रयोजन त्यास उरलें नाहीं. पटवर्धन, रास्ते, निपाणकर, पानसे इत्यादिकांचे सरंजाम तो जप्त करूं लागला. तसेच कोल्हापुरकर छत्रपति व

* मेजर क्लोज म्हणून सिंद्याचे दरबारीं स. १८०८ पासून रेसिडेंट होता त्याचा सर बॅरीशीं काय संबंध होता याचा उलगडा होत नाहीं.

सांवतवाडीकर यांजवरही बाजीराव आपलें अधिराज्य सांगूं लागला. तेव्हां या मंडळींनीं त्याजविरुद्ध रेसिडेंटाकडे कागाळ्या नेल्या, आणि एल्फिन्स्टननें त्यांत हात घालतांच त्याच्याशीं बाजीरावाचें वितुष्ट वाढूं लागलें. ही सर्व उठावणी त्रिंबकजी डेंगळ्यामुळें उत्पन्न झाली होती. याचा परिणाम असा झाला, कीं एल्फिन्स्टननें मध्यस्थी करून सरदारांचे सरंजाम वांचविले. सन १८१२ च्या जुलई ता. ७ रोजीं बाजीराव पंढरपुरास असतां जहागीरदारांची नवीन व्यवस्था एल्फिन्स्टननें त्याजकडून कबूल करून घेतली. या व्यवस्थेनें जहागीरदारांवरील बाजीरावाचा ताबा बहुतेक नष्ट झाला. त्यानंतर पांच वर्षांनीं ता. १३·६·१८१७ रोजीं जो नवीन तह बाजीरावाकडून एल्फिन्स्टननें कबूल करून घेतला, त्यामुळें सिंदे, होळकर, गायकवाड, भोसले, वगैरे मोठ्या सरदारांवरील बाजीरावाचें स्वामित्व साफ नष्ट झालें. त्यांच्याशीं कोणत्याही प्रकारचें दळणवळण ठेवण्याचा त्यास पुढें अटकाव झाला. अर्थात् वरील दोन तह बाजीरावाच्या कारभारांतील राजकारण अजमावण्याचे दोन मोठे टप्पे आहेत. ता. १३·६·१८१७च्या तहानंतर बाजीरावानें सिंदे होळकर व भोसले यांस इंग्रजांवर उठण्याविषयीं उत्तेजन दिलें, आणि इंग्रजांशीं युद्ध सुरू केलें, तेव्हां त्यांनीं त्याचें राज्य खालसा करण्याचा निश्चय केला. प्रस्तुत दक्षिणेंतील पहिला जहागीरदारांचा प्रकार तपशिलानें स्पष्ट करून सांगावयाचा आहे.

बाजीरावाचे मुख्य जहागीरदार पटवर्धन, रास्ते, व पानसे हे फौजबंद व पिढीजाद कामें केलेले होते. बाजीरावाचा अन्याय त्यांस खपत नसे, आणि अन्यायी हुकूम अमलांत आणण्यास ते खुषी नसत. कृष्णेच्या दक्षिणेकडील प्रदेशांत त्यांचें वजन चांगलें असून वाघाचे स्वारीपासून इंग्रजांशीं त्यांचे स्नेहभाव जुळले होते. त्यांचा नक्ष उतरण्याठीं बापू गोखल्यास सरंजाम देऊन बाजीरावानें फौजेचा मुख्य अधिकारी केलें आणि त्याचे खर्चास प्रतिनिधीकडून घेतलेला मुलूख तोडून दिला, (ता. १·८·१८१२ ).* " गणपतराव पानसे यांजकडून तोफखान्याचें काम दूर करून तें त्रिंबकजी डेंगळे यास सांगितलें, भांबुर्ड्यास नवीन दारूखान्याचें काम चालविलें, व जुने तोपखान्यांत बाणांची नवी तयारी सुरू केली. " इतरांचाही बाजीरावानें असाच उच्छेद चालविला, तेव्हां त्यांनीं एल्फिन्स्टनकडे कागाळ्या केल्या.

" पटवर्धन मंडळी श्रीमंतांच्या अलोभांत, यामुळें त्यांचे घरची फोडाफोड करून आंतल्या आंत कलह लावून हलके करावे असें श्रीमंतांनीं मनांत आणून

* पे. अ. पृ. १४६; पे. द. सरंजाम यादी नं. २९,३०,३१.

चिंतामणराव आपा व गंगाधरराव गोविंद यांची वांटणी केली, व गणपतराव परशराम यास हिस्सा देवविला* ( ता. १९·२·१८१२ ); आणि गैरसनदी मुलूख पटवर्धनां-कडे होता तो ते देत नाहींत व बाबा फडके यास हवालीं करण्यासंबंधानें आमचा हुकूम मानीत नाहींत, याजकरितां आम्ही त्यांजवर फौज पाठवून बंदोबस्त करतों असें शेटजीचे सल्ल्यानें श्रीमंतानीं एल्फिन्स्टनकडे बोलणें केलें." या गोष्टीस एल्फि-न्स्टननें कबुली दिली नाहीं. त्यानें पटवर्धनांचा कैवार घेऊन त्यांचा बचाव केला, बाजीरावाला मनाप्रमाणें त्यांचा सूड घेऊं दिला नाहीं. मात्र पटवर्धनांकडे गैरसनदी मुलूख चालत होता, तेवढा एल्फिन्स्टननें त्यांची समजूत घालून बाजीरावास परत देव-विला; आणि फडक्यास चिंतामणरावानें आश्रय दिला होता त्यास त्याजकडून काढून बाजीरावाचे हवालीं केलें. बाजीरावानें फडक्यास वसईच्या किल्ल्यांत अटकेंत ठेविलें. तेथें दुखणें लागून तो लवकरच मरण पावला. स्त्री मिरजेस होती ती सती गेली. एवढ्या मोठ्या घरंदाज व पिढीजाद सेवकाचा असा छळ केल्याबद्दल बाजीरावाची लोकांत फार नाचक्की झाली.

इंग्रजांची तैनाती फौज बाजीरावाचे साह्यास नसती तर दक्षिणच्या सरदारांनीं या वेळीं बाजीरावास पदच्युत सुद्धां केलें असतें. प्रतिनिधीचा बंडावा झाला तेव्हांच ही गोष्ट सरदारांचे मनांत आली होती. एल्फिन्स्टन यास या संबंधानें मोठा पेंच पडला होता. पेशव्याशीं व जहागीरदारांशीं त्याच्या पुष्कळ वाटाघाटी झाल्या. एल्फि-न्स्टन मध्यें पडला नसता तर दक्षिणेंत उघड युद्धच जुंपलें असतें. इतक्या वर्षे राष्ट्राची सेवा केलेल्या पिढीजाद सरदारांचा निःपात व्हावा ही गोष्ट एल्फिन्स्टन यास रुजू वाटली नाहीं. तसेंच बाजीरावाशीं त्यांचा संबंध तोडून त्यांस सर्वथैव स्वतंत्र करावें तर तेंही गैरच होतें. कसे झाले तरी ते पेशव्यांचे ताबेदार होते. यासाठीं तडजोडीचा मध्यम मार्ग एल्फिन्स्टननें काढिला. मात्र त्यांत अप्रत्यक्ष रीतीनें इंग्रज सरकाराचें वजन त्यानें वाढविलें. बाजीरावास पैशाचा लोभ उत्पन्न होऊन, नवीन राज्यवृद्धि होत नस-ल्यामुळें, जुन्या डोईजड जहागीरदारांस नागविल्याशिवाय द्रव्योत्पत्तीचा दुसरा उपाय त्यास राहिला नव्हता. पण त्या कामीं एल्फिन्स्टननें सडकून हरकत घेतली, आणि पुष्कळ काळ वाटाघाट केल्यावर बाजीरावाकडे जहागीरदारांस वागविण्यासंबंधानें खालील याद लिहून पाठविली. १ जहागीरदारांवरील पूर्वीचे द्वेष सोडून द्यावे; २ पूर्वीच्या सनदांस व रिवाजांस सोडून नवीन मागण्या पेशव्यानें त्यांजकडे इंग्रजांच्या परवागनीशिवाय

* पहा पे. द. सरंजामयादी नं. १९.

करूं नयेत; ३ तैनात जाबत्यांत ठरल्याप्रमाणें जहागीरदारांनीं फौजा बाळगून पेशव्याची नोकरी करावी; ४ इंग्रजांचे परवानगीशिवाय त्यांचे सरंजाम पेशव्यानें जप्त करूं नयेत; ५ भेटीच्या व अन्य प्रसंगीं पेशव्यांनीं त्यांचा योग्य सन्मान ठेवावा; ६ सनदेबाहेर जे प्रदेश जहागीरदारांचे ताब्यांत असतील ते त्यांनीं सोडून पेशव्याचे हवालीं करावे; ७ उभयतांमध्यें तक्रार उपस्थित झाल्यास त्याचा निवाडा इंग्रज करतील तो मान्य करावा: ८ जहागीरदारांशीं कोणताही करार परभारें करण्यास इंग्रज सरकार मुखत्यार आहेत. ' श्रीमंताची स्वारी आषाढमासीं पंढरपुरास गेली. बरोबर पटवर्धन वगैरेच्या जाबसालाकरतां एल्फिन्स्टनसाहेबास नेलें. त्या ठिकाणीं वरील करार ता. ७·७·१८१२ रोजीं एल्फिन्स्टननें बाजीरावाकडून पुरा करून घेतला. या करारानें बाजीरावाची आपल्या जहागीरदांवरील हुकमत पार नाहींशी होऊन तो दुर्बल झाला. एल्फिन्स्टनकडून बाजीरावाला पहिला तडाखा बसला तो हा होय. तेव्हांपासून पुढें उभयांचें वैमनस्य वाढतच गेलें.

सरंजामदारांवर अवलंबून राहिल्यानें युद्धप्रसंगीं आपला नाइलाज व घात होतो असें ओळखून बाजीरावानें एल्फिन्स्टनच्या मार्फत गोऱ्या अधिकाऱ्यांचे हाताखालीं वागणारा एक पायदळाचा कवाइती कंपू स. १८१३ त तयार करविला, त्याजवर **कॅप्टिन फोर्ड** ऊ. पोटसाहेब यास मुख्य नेमिलें. हा फोर्ड पूर्वी रेसिडेंट क्लोझच्या तुकडींत होता. या कंपूंत दक्षिणचे मराठे फारसे नसून बहुतेक हिंदुस्थानी लोक होते. जोंपर्यंत बाजीराव इंग्रजांशीं स्नेहानें वागत आहे, तोंपर्यंत त्याचे हुकूम बिनतक्रार पाळण्याच्या शपथा सर्व लोकांनीं घेतल्या होत्या, अशीं विधानें डफ वगैरे इंग्रज लेखक करितात, आणि खडकीचे लढाईत हा फोर्ड बाजीरावास सोडून इंग्रजांस मिळाला, त्यांत त्यानें विश्वासघात केला नाहीं, असें त्याच्या वर्तनाचें समर्थन करितात, तें मराठी कागदांवरून सर्वथैव लटकें पडतें. जॉन फोर्ड बहादर यास नोकरींत घेऊन कंपू तयार केला त्याचा संपूर्ण तपशील ता. २१·१·१८१३ च्या यादींत तमाम नांवनिशी, कामें व चाकरीचे नियम भरपूर देऊन छापलेला आहे, तो वाचकांनीं पे. द. सरंजाम यादी नं. ३५ पृ. ९३-१०१ येथें अवश्य वाचावा. त्याचा बैठा खर्च सालाचा साडेतीन लाख असून, लढाईचे वगैरे प्रसंगीं आणखी पाऊण लाख जास्त द्यावयाचा करार होता. फोर्ड यास जातपगार दरमहा अडीच हजार रुपये असून, कोणत्याही गोष्टीविषयीं कंपनी सरकारचा उजूर न करितां सर्व लोकांसह सांगूं तेव्हां व सांगूं तेथें एकनिष्ठपणें इमानें इतबारें चाकरी करूं, फंदफितूर गैर मार्गाची वर्तणूक करणार नाहीं,

कोणाशीं राजकारण करणार नाहीं, ’ अशा अर्थाचीं २४ कलमें फोर्डनें स्वहस्तानें सही करून लिहून दिलीं होतीं. हा कंपू घोडनदीच्या कांठीं शिरूर येथें ठेवण्यांत आला.

पेंढाऱ्यांचा बंदोबस्त करण्यांत बाजीरावानें फौजेची मदत करावी असें इंग्रजांनीं सांगितल्यावरून त्यानें आणखी एक गोसाव्यांचा नवीन बेहडा तयार केला, त्याजवर मनोहरगीर गोसावी याची नेमणूक केली. परंतु मनोहरगीर स. १८१३ च्या एप्रिलांत मरण पावला, तेव्हां त्याचे जागीं रूपराम चौधरी याची नेमणूक झाली.

खर्च वाढला म्हणून बाजीराव मामलती चढावानें देऊं लागला, तेव्हां त्याचा वसूलही पुष्कळ वाढला. “ कामास लायक नसला तरी चढ बोलला कीं त्यास मामलत सांगावी अशी पैदास सालोसाल वाढत गेली देवस्थानें, धर्मादाय इनामें इत्यादींवर किती चढ कबूल करायचा त्याचें मान राहिलेंच नाहीं. पांच हजार मामलतीवर पन्नास हजार बोलला तरी त्याजकडे मामलत सांगावी असा प्रकार होऊं लागला. अखेरीस बाक्या खूप थकल्या. त्याबद्दल कित्येक मामलतदारांस अटकेंत घातलें तरी बाकी वसूल झाली नाहीं. ” सामान्यतः बाजीरावाचे मुलखाचा वसूल सालाचा १। कोट रुपये होता. त्यापैकीं सालाचे ५० लाख तरी तो शिल्लक टाकी. सन १८१५ त त्याचे शिलकेंत ५ कोटी ऐवज नगद होता. मोदी व त्रिंबकजी यांनीं बाजीरावास सल्ला दिली कीं मागें पुढें इंग्रजांशीं कलह जुंपणार; सबब फौजेची तयारी अगोदरपासून नीट ठेवावी. त्यासाठीं अनेक युक्त्या त्यांनीं बाजीरावास सुचविल्या. सन १८१४ च्या आश्विनांत दुसऱ्यांदां कार्तिकस्वामीच्या दर्शनाची सबब काढून बाजीरावानें बरोबर नेण्यासाठीं म्हणून आणखी फौज ठेविली. स्वारी कर्नाटकांत निघाली तेव्हां धारवाडचा किल्लेदार बापू सिंदे पेशव्याचे भेटीस आला. त्या प्रसंगीं किल्ला त्रिंबकजीचे स्वाधीन करा असा हुकूम त्यास बाजीरावानें फर्माविला. त्यावर बापूजी सिंदे यानें सांगितलें, मी त्रिंबकजीचे हवालीं किल्ला करीत नाहीं. दुसरा कोणी सरकारचा कारकून द्यावा त्याचे स्वाधीन करतों. त्यावरून त्रिंबकजीनें बापूजीच्या तोंडात मारून त्यास कैद केलें; आणि जबरदस्तीनें किल्ल्याची सोडचिठ्ठी लिहून घेतली. नंतर सिंद्याचा फडणीस गंगाधरपंत यास बरोबर घेऊन डेंगळा किल्ला घ्यावयास गेला. किल्ल्यांत बापूजी सिंद्याचे बंधू कुटुंबसह होते. गंगाधरपंतानें डेंगळ्यास बाहेर बसविलें, आणि सांगितलें, ‘ मी पुढें जाऊन सर्व तजवीज करून तुम्हांस बोलावतों ! आपण किल्ल्यांत गेला आणि सांगून पाठविलें, ‘ किल्ला देत नाहीं. ’ त्यावरून त्रिंबकजी परत आला, आणि पेशव्याबरोबर कार्तिकस्वामीस गेला.

बापूजी सिंदे यास त्यांनीं गोखल्याचे ताब्यांत दिलें. पेशवा पुण्यास परत आल्यावर बापूजी सिंद्याचे हातचा हुकूम बाजीरावानें घेऊन धारवाडास पाठविला, तेव्हांच गंगाधरपंत फडणिसानें किल्ला बाजीरावाचे हवालीं केला. यावरून बाजीरावाच्या कारभाराची कल्पना करावी.

जहागीरदारांस वागविण्यासंबंधानें एल्फिन्स्टननें बाजीरावास कडक नियम घालून दिले, तरी पुष्कळ बाबतींत त्यांजवर आपली सत्ता बाजीरावास चालवितां येत असे. त्यांनीं फौज बरोबर व पुरेशी ठेविली नाहीं, किंवा ती वक्तशीर आली नाहीं अशा सबबीवर त्यानें जहागीरदारांस अगदीं रडकुंडीस आणिलें. माधवराव रास्त्याचा मुलूख पूर्वीच्या सन १८०१ च्या जप्तीमुळें फार खराब झाला होता, वसूल येईना. त्यामुळें त्याजकडून कराराप्रमाणें चाकरी होईनाशी झाली. श्रीमंतांनीं रेसिडेंटाकडे कागाळी केली. त्यांनीं फौज पाठवावयास सांगितलें, परंतु ती येऊं शकली नाहीं; सबब सरंजाम जप्त केला, ( ता. ३०·५·१८१५ ). हे प्रकार सारखे चालूच होते.

**४ खुरशेटजी मोदी.**—मोदीचें प्रकरण बाजीरावाचे अमदानींत महत्त्वाचें आहे. हा फारशी गृहस्थ खंबायतचा राहणारा सुमारें सन १७५५ त जन्मला. मॅलेट सुरत येथें असतां त्याची व मोदीची ओळख झाली. पुढें मॅलेट पुण्याचे रेसिडेन्सीवर आल्यावर त्यानें मोदीस तेथें आपल्या हाताखालीं कामावर घेतलें, तेणेंकरून अनेक कारभारांत रेसिडेंटाचे तर्फेनें कारभाऱ्यांकडे बोलणें करण्यास हा मोदी जाऊं लागला. क्लोजचा त्याजवर अत्यंत इतबार असल्यामुळें तो पुष्कळांचीं कामें साहेबाकडून करून देई, त्यामुळें सदाशिव माणकेश्वर + यानेंही त्याचें संधान ठेविलें. बयाजी नाईक म्हणून बाजीरावाचा हुजऱ्या होता, त्यासही बाजीराव मोदीकडे पाठवून रेसिडेन्सींतील बातमी काढून त्या धोरणानें आपलीं कामें करवून घेई. मोदी, भाऊ व बयाजी नाईक असें हें त्रिकुट कांहीं वर्षे पावेतों पुण्याच्या कारभारांत प्रमुख होतें. * ' तिघांनींही साहेबांचा निरोप म्हणून श्रीमंतांस सांगावें. श्रीमंतांची मर्जी अमुक आहे म्हणून साहेबाकडे सांगावें. अशा रीतीनें पुष्कळ लोकांस खराब करून त्यांनीं लाखों रुपये मिळविले. ' पुढें सन १८०९ सालीं पुण्यांतून क्लोजची बदली झाली

---

+ यास सदाशिवपंत भाऊ म्हणतात. सोयीसाठीं पुढें याचा निर्देश ' भाऊ ' असाच केला आहे. * बयाजीचीं बातमीपत्रें का. सं. प. या. ले. ४८५·८७ येथें छापलेलीं आहेत.

आणि हेन्री रसेल थोडे दिवस पुण्यास रेसिडेंट आला, त्या संधींत मोदीवर बाजीरावाची मोठी मेहरबानी होऊन त्यालाही वाटूं लागलें, कीं आपण बाजीरावाचा कारभार करावा. कर्नाटकचा सरसुभा आनंदराव हुपरीकर याजकडे होता तो मृत्यु पावला, त्याचे जागीं ता. १६·९·१८०९ रोजीं बाजीरावानें मोदीची नेमणूक केली. हें काम भाऊ स्वतःसाठीं मागत होता, पण बाजीरानें तें त्यास दिलें नाही, म्हणून मोदीचें व भाऊचें वांकडें आलें.

स. १८०२त बाजीराव पुणें सोडून वसईस गेला तेव्हां खंडेराव रास्ते यानें तेथें त्याची व्यवस्था उत्कृष्ट लावून दिली; तेव्हांपासून रास्ते याजवर बाजीरावाची मर्जी बसून त्यास त्यानें कारभारांत घेतलें. खंडेरावाचा हा उत्कर्ष सदाशिव माणकेश्वरास सहन झाला नाहीं. रेसिडेंटास सामील होऊन हा तुमचें अहित करतो अशी त्याजवर भाऊनें तोहमत आणिली. भाऊनें कोणी तफावती उभा करून श्रीमंतांपुढें प्रकरण मांडलें. श्रीमंतांची आज्ञा चौकशी करावी म्हणून झाली. तेव्हां मामलतीच्या घालमेली केल्याशिवाय तफावत लागू होणार नाहीं असा आग्रह पडला. तेव्हां त्याजकडून कोंकणच्या सरसुभ्याचें काम काढून तें परशराम खंडेराव ऊर्फ अन्याबा राहतेकर याजकडे सांगितलें. तथापि रास्ते याजवर तफावत लागू झाली नाहीं. हिशेबावरून त्याचेंच घेणें श्रीमंतांकडे निघालें त्यावरून मे सन १९०९ सालीं इंग्रजांचे दरम्यानगिरीनें पेशव्यानें खंडेराव रास्ते यास दोषमुक्त करून रजा दिली. खंडेरावानें आपलें कुटुंब वाड्यांत पाठविलें नाहीं म्हणून त्याजवर श्रीमंतांचा हा राग झाला असा ध्वनि होता. खंडेराव ता. २५·५·१८१०रोजी भांबुर्डा येथें मृत्यु पावला.* रास्ते मेल्यावर बयाजी नाइकास श्रीमंतांनीं घरीं बसविलें, तेव्हां मोदीसही हलकें करावें असें भाऊचे मनांत येऊन त्यानें बाजीरावाकडे तक्रार केली. तेव्हां भाऊचा पाण-उतारा करण्याकरितां तकार एल्फिन्स्टन पुढें मांडण्यास त्यास बाजीरावानें सांगितलें. तेव्हां

* श्यामजी नाईक रास्ते (पहा म. वि. ३ पृ. ३०८)



भाऊंनीं एल्फिन्स्टन पुढें फिर्याद करविली, कीं शेटजी सरकार कामाची पायमल्ली करून पैका खातात. त्यावरून एल्फिन्स्टननें श्रीमंतांस त्या बाबतींत सवाल केला. तेव्हां श्रीमंतांनीं साहेबांस सांगून पाठविलें, कीं 'तुम्हां जवळ बोलतात ते लबाड आहेत. शेटजी कडून आमचे कामांत कांहीं खलेल नाहीं. तुम्हीं चौकशी करूं नये' तेव्हांपासून भाऊंचें व शेटजीचें फार वांकडे आलें. मोदीनें आपल्या तर्फेनें बापू साने यास कर्नाटकाचे कारभारावर पाठविलें आणि आपण पुण्यांतच पहिल्या कामावर राहिला.

सन १८१० सालीं एल्फिन्स्टनची नेमणूक पुण्याचे रेसिडेन्सीवर झाली, त्याबरोबर तेथील कामाच्या पद्धतींत एकदम मोठा फरक उत्पन्न झाला. क्लोज एकतंत्री व सरळमार्गी होता त्याचे उलट एल्फिन्स्टन पाताळयंत्री सर्व ठिकाणची चौकशी ठेवून स्वतःचे विचारानें चालणारा होता. देशी भाषा त्यास चांगल्या अवगत असल्यामुळें कोणताही व्यवहार उलगडण्यास त्यास दुसऱ्याचे साह्याची जरूर लागत नसे. सन १८०१-२त तो पुण्यास क्लोजचे हाताखालीं काम करीत असतांनाच मोदी वगैरेंचे अंतस्थ डाव तो चांगले ओळखून होता. म्हणून कारभार हातीं येतांच मोदीच्या मध्यस्थीची अपेक्षा न ठेवतां एल्फिन्स्टन स्वतःच सर्वांस भेटून कामाचे निकाल करूं लागला. त्यामुळें मोदीचें तेज साफ मावळून गेलें. अगोदरच भाऊ व मोदी यांजमध्यें वितुष्ट आलें होतें, त्यांत मोदीनें त्रिंबकजी डेंगळ्याचे द्वारें श्रीमंतांस इशारा दिला, कीं "आज पावेतों साहेब लोकांची चाल होती तशी एल्फिन्स्टनची नाहीं. त्यांशीं जाबसाल करणें तो संभाळून करीत जावा. त्यांनीं आपलें धोरण वेल्स्लीसारखें ठेविलें आहे. आपले ठिकाणीं मजबुदीनें राहवें म्हणजे त्यांचा इलाज चालणार नाहीं. आपला माझा अंतःकरणापासून लोभ आहे म्हणून हें सुचवितों." ही गोष्ट बाजीरावाचे मनांत मोदीनें पुरतेपणीं आणून दिली. त्यावरून त्रिंबकजी व शेटजी यांच्या इतबारावर ते सांगतील तसे श्रीमंत चालूं लागले. आंतून कामकाजास त्रिंबकजीस घेतलें. त्रिंबकजीस सरदार करून व त्याचे ताब्यांत फौज देऊन कामगिरीवर पाठवूं लागले. सदाशिवपंत भाऊवरची मर्जी उतरली. इकडे बाजीरावाकडे संधान लावून मोदी आपला स्वार्थ साधतो हा प्रकार एल्फिन्स्टन यास अत्यंत गैर वाटला. त्यानें मोदी यास कळविलें, कीं तिकडे बाजीरावाची व इकडे रेसिडेंटाची अशा दोन नोकऱ्या तुम्ही चालवितां हें बरोबर नाहीं, त्यांपैकीं एक कोणती तरी सोडा. त्यावरून मोदीनें कर्नाटकची सुभेदारी सोडून दिली, तेव्हां त्या जागीं बाजीरावानें लगेच त्रिंबकजी डेंगळ्याची नेमणूक केली.

गंगाधर शास्त्री याचें प्रकरण पुढें पेशव्याकडे भिजत पडलें असतांच, इकडे त्रिंबकजी व मोदी एक विचारानें वागून बाजीरावास बदसल्ला देऊं लागले, यामुळें एल्‌फिन्स्टन यास बिलकूल चैन पडेना. 'आपल्यावर साहेबांचा लोभ नाहीं, परंतु श्रीमंत आपले हातीं आहेत, ते साहेबांचे कामास ओढूं लागले म्हणजे आपलें अगत्य साहेबांस पडेल, अशी दुर्बुद्धि मनांत आणून गंगाधर शास्त्री पुण्यास आले होते त्यांचे कामांत बिघाड करण्याची सल्ला मोदीनें बाजीरावास दिली. फौजेचा जोर मागें असला म्हणजे इंग्रज नरम पडतात असें त्यानें श्रीमंतास भासविलें त्याचे म्हणण्यास त्रिंबकजीनें दुजोरा दिला त्यावरून श्रीमंत फौज जास्ती बाळगूं लागले. त्रिंबकजीनें मसलत दिली, कीं आज पेंढारी इंग्रजांस भारी आहेत. श्रीमंतानीं पेंढाऱ्यांस लोभाचा डोळा दाखवावा. बिनपैशानें त्यांची मोठी फौज आपलीशी होईल. ते परभारें निजामाचे व इंग्रजांचे मुलखांत पोट भरून राहतील. ही गोष्ट श्रीमंतांस पटली. श्रीमंत त्रिंबकजीच्याच बोलण्यावर भरंवसा ठेवीत गेले. श्रीमंताची स्वारी कोपरगांवीं असतां ( मार्च १८१४ ) पेंढाऱ्यांचे सरदार त्रिंबकजीनें आणून श्रीमंतांस भेटविले. गोडीचीं बोलणीं झालीं. आमचे रसदी मुलखास उपद्रव करूं नये, परभारें पोट भरून आमचे उपयोगी पडावें, असा करार ठरून त्यांजकडे कृष्णाजी गायकवाड नांवाचा आपला हस्तक श्रीमंतांनीं कायमचा ठेवून दिला, आणि त्यांस वस्त्रें देऊन निरोप दिला.

मोदी व त्रिंबकजी यांची जोडी फोडल्याशिवाय बाजीरावाचे डाव बंद पडणार नाहींत अशी एल्फिन्स्टनची खात्री होऊन, मोदीस पुण्यांतून कसा काढावा याचा विचार तो करूं लागला. त्यानें पुष्कळ वर्षे इंग्रज सरकाराची नोकरी केली होती त्याचा मोबदला त्यास मिळणें अवश्य होतें. त्याचे दुष्कृत्यांची उघड चौकशी करून आरोप सिद्ध करणें शक्य नव्हतें. यास्तव वरिष्ठांची परवानगी आणून एल्फिन्स्टननें त्यास दरमहा ५०० रु. निवृत्ति वेतन बांधून देऊन गुजरातेंत स्वदेशीं जाऊन राहण्याचा हुकूम केला. या हुकमानें मोदीचा अत्यंत मानभंग झाला. जगापुढें आपली अब्रू गेली असें त्यास वाटलें, आणि पुण्यांतून निघून जाण्याच्या तयारींत असतां माघ व॥ ४ रोजीं साहेबांची रजा घेऊन तो सायंकाळीं घरीं आला आणि त्याच रात्रीं विषप्राशन करून मरण पावला, ( २७.२.१८१५ ).*

* Mod. Rev. 1922, vol. I; पे. अ.

मोदीनें स्वतःच विष प्राशन केलें, कीं दुसऱ्यानें कोणी प्रयोग केला याचा उलगडा झालेला नाहीं. एल्फिन्स्टननें पुष्कळ दिवसपर्यंत त्याचा कसोशीनें तपास केला. आपण पुण्यांतून गेल्यावर मागें तपास झाल्यास आपलीं कृष्ण कृत्यें उघडकीस येतील या भीतीस्तव त्यानें आत्महत्या केली, असा त्या वेळीं सर्वसामान्य समज होता. रेसिडेंटास भेटून सायंकाळीं घरीं आल्यावर सुलेमान नांवाच्या एक मांत्रिकास त्यानें घरीं आणिलें. त्या मांत्रिकानें कांहीं भारलेले पदार्थ त्यास खाण्यास दिले, त्यामुळें रात्रीं अतोनात वांत्या होऊन तो मरण पावला. पुण्यांत त्याचा बंगला व बाग होती आणि त्या बागेंत एक गणपति होता त्यास अद्यापि मोदीचा गणपति असें म्हणतात. मोदी मरण पावतांच बाजीरावानें रेसिडेंटाकडे बोलणें करण्यास त्रिंबकजीची नेमणूक केली, त्यामुळें बाजीरावासंबंधानें रेसिडेंटाचें मन ज्यास्तच बिघडत गेलें. सदाशिवपंतभाऊची नरमाईची हातोटी त्रिंबकजीनें पार झुगारून दिली. पूर्वीचे संप्रदाय मोडून वाटेल तशीं सक्तीचीं बोलणीं तो बोलूं लागला. वसईचे तहनाम्याचे विरुद्ध काम होऊं लागलें. त्रिंबकजीच्या सांगण्यावरून नंगे गोसावी व पन्हीं मुसलमान यांची नवीन फौज बाजीरावानें तयार केली. असें करितांना जुन्या मंडळीस दुखविल्यामुळें बाजीरावाची बाजू लंगडी पडत गेली. विष्णुपंत दादा गद्रे पुण्याचा प्रसिद्ध सावकार बाजीरावाचा जाच चुकविण्यासाठीं इंग्रजांचे कच्छपीं लागला. अशीच दुसरी मंडळी एल्फिन्स्टनच्या मदतीनें आपलीं वतनें कायम करून घेऊं लागली. कित्येक सावकार संरक्षणार्थ मुंबईस जाऊन राहिले.

पेशव्यांची एकनिष्ठ सेवा केलेला आणखी एक इसम **रूपराम चौधरी** होय. हा पानशांचे तोफखान्यांत चौधरकीच्या कामावर होता. नारायणरावाचे वधापासून तो दादासाहेबांचे लक्षांत वागून त्याज बरोबरच सुरत वगैरे ठिकाणीं होता. दादाचे मृत्यूनंतर त्यानें पुनः सवाई माधवरावाचे वेळीं बदामी, श्रीरंगपट्टण, खर्डा वगैरे स्वाऱ्यांत हजर राहून कामें केलीं. पुढें बाजीरावास पेशवेपद मिळाल्यावर वडिलांचा विश्वासु नोकर म्हणून रूपरामावर त्याची विशेष मेहेरबानी झाली. पेंढारी, भिल्ल, कोळी वगैरेंचीं बंडें मोडण्याचें बरेंचसें काम बाजीरावाच्या हुकमानें रूपरामानें केलें. होळकराचे प्रसंगानंतर बाजीराव पळून वसईकडे गेला, तेव्हां महाडापर्यंत रूपराम, विंचुरकर व बापू गोखले त्याजबरोबर होते. महाडाहून ही मंडळी पुण्याचे बंदोबस्तास परत आली. पुढें रूपराम बाजीरावाचे नोकरींत असतां ता. १७.६.१८१४ रोजीं मरण पावला, आणि त्याचें काम दत्तक पुत्र रामचंद्रराव यास मिळालें. बाजीरावाचें व इंग्रजांचें युद्ध

चालू झाल्यावर सिंहगडावर इंग्रज चालून आले, तेव्हां रामचंद्ररावानें बराच काळ किल्ला लढविला, आणि पुढें निभाव न लागून त्यानें किल्ला खालीं करून एल्फिन्स्टन साहेबाशीं सल्ला करून घेतला. एल्फिन्स्टननें त्यास चासगांव सरंजामास लावून दिला.* आतां हा भाग संपविण्यापूर्वी दुसऱ्या एका विषयाकडे वळणें जरूर आहे.

**५ गायकवाडींत इंग्रज घुसले** (.१८००-१८०६).—नागपुरकर भोसले, सिंदे, होळकर व गायकवाड हे चार मुख्य सरदार बाजीरावाचे आरंभीं मराठशाहीचे आधार समजले जात असून त्यांच्याच कर्तृत्वावर मराठी राज्यास साम्राज्य म्हणतां येत होतें. इंग्रज लेखकांनीं यांसच ' मराठा कॉन्फेडरसी ' असें संबोधिलेलें आढळतें. वरच्यांपैकीं पहिल्या तिघांची वाताहत कशी झाली त्याची विस्तृत कथा पूर्वी येऊन गेली आहे. बाकी राहिले गायकवाड. त्यांची कहाणी सांगितल्याशिवाय बाजीरावाचा इतिहास पुरा होणार नाहीं. पहिले तीन इंग्रजांशीं सामना करून हितवीर्य झाले, तर गायकवाडांस इंग्रजांनीं केवळ जबरदस्तीच्या राजकारणानें नरम केलें. गायकवाडींतील या भानगडींतील व्यक्तींची समजूत पटण्यासाठीं प्रथम खालील दोन वंशावळी लक्षांत ठेविल्या पाहिजेत‡:—




+ ४ बायका, १ गहिनाबाई, २ सुंदराबाई पुत्र आनंदराव, ३ अन्नपूर्णाबाई पुत्र फत्तेसिंग, ४ गयाबाई पुत्र सयाजीराव; रक्षा गजराबाई पुत्र कान्होजी.

* कै. या; पे. अ. ‡ या कलमास मुख्य आधार बडोदा गॅझेटियर; का. सं. प. या. ४४९; बा. रो. ५८; खरे.




गोविंदराव गायकवाडास पुणे येथें ता. १९·१२·१७९३ रोजीं सेनाखासखेलीचीं वस्त्रें मिळून तो पुढें बडोद्यास दाखल झाला, हा प्रकार मागें सांगितलाच आहे. इतर कित्येक घराण्यांप्रमाणेंच गायवाडांसही औरस अनौरस संतति विपुल लाभली, तीच कांहीं अशीं घराण्याचे नाशास कारण झाली. धरमपुरकर राजपूत कुमारी गजराबाई नांवाची गोविंदरावाची रक्षा होती, तिचा मुलगा कान्होजी पराक्रमी होता. त्यानें आपल्या आईच्या मदतीनें बापाचा उच्छेद आरंभिला. मोठ्या शिकस्तीनें त्यांचा बंडावा तात्पुरता मोडून गोविंदरावानें स. १७९४ त बडोद्यांत कारभार सुरू केला. नाना फडणिसानें मुद्दाम गोविंदरावाबरोबर रावजी आपाजीस पुण्याहून कारभारी म्हणून नेमून दिलें, आणि रावजी आपलें सर्व कुटुंब घेऊन बडोद्यास गेला. त्याच्याच बरोबर गंगाधरशास्त्री पटवर्धन व त्याचा बाप गुजरातेंत गेले. पुढें अहंमदाबादची सुभेदारी नानाफडणिसानें आबाजी कृष्ण शेलूकर यास देऊन पेशव्याच्या निम्या हिशाची वहिवाट करण्यास पाठविलें नाना फडणीस मरण पावल्यावर आबाचा आधार तुटला, तेव्हां गोविंदरावानें आबाशीं लढून अहंमदाबाद हस्तगत केली, आणि शेलूकरास पकडून बलसाड येथें सक्त कैदेंत अडकवून ठेविलें. त्यास मुक्त करून इतमामासह पुण्यास पाठविण्याबद्दल बाजीरावानें ता. १५ १०·१८०१ रोजीं हुकूम पाठविला, तो अमलांत आल्याचें दिसत नाहीं. पुढें बाजीरावानें दरसाल पांच लक्ष रुपये घेण्याच्या करारानें अहंमदाबादची वहिवाट गोविंदरावाचा अनौरस पुत्र भगवंतराव याचे न वें लिहून दिली. गोविंदरावास अनेक अडचणी आल्या, त्यांतून त्याचा निभाव रावजी आपाजी व त्याचा शूर बंधु बाबाजी यांनीं शिकस्तीनें केला; आणि तशाच स्थितींत गोविंदराव ता. १९·९·१८०० रोजीं मरण पावला.

रावजीनें गोविंदरावाचे विद्यमानें बंदोबस्तासाठीं पुष्कळसे आरब नोकरीस ठेविले. आरबांचा शिरजोरपणा पुण्याच्या कारभारांतही व्यक्त झालेलाच आहे त्यांचें माहात्म्य बडोद्यांत इतकें वाढलें कीं, त्याचें निवारण करण्यासाठीं इंग्रजांचीं पलटणें मदतीस आणण्याचा प्रसंग गायकवाडांवर आला. त्यांत गोविंदरावाच्या मृत्यूनें दौलतीच्या वारसासंबंधीं घोटाळे माजले त्यांची भर पडली. गोविंदरावास चार औरस व चार अनौरस पुत्र होते. पैकीं कान्होजी पराक्रमी होता, तो आपला हक्क सांगून भांडूं लागला औरस पुत्र आनंदराव हा भोळसर होता, त्यास गहिनाबाईनें स्थानापन्न केलें व रावजी आपाजीकडून कारभार चालविला. 'आनंदराव गायकवाडांनीं दौलत करावी, त्यांत कान्होजी गायकवाड दुसरे पुत्र रजपुताणीचे यांनीं पांच सहा महिने दौलत केली, त्यांस कोणाचेंच भान नाहीं. खुद्द आनंदरावास कैद करून परम अमर्यादा केली ती ईश्वरास न मानली. पौषमासीं कान्होजीस सर्वांनीं कैद केलें, त्या दिवसापासून रावजींनी कारभार करावा त्यास शिबंदीचा गवगवा मोठा त्याजमुळें चैन नाहीं.' कान्होजीनें प्रथम आनंदरावाचें मन वळवून आरबांच्या साह्यानें कारभार हातीं घेतला आणि बायकांस व आप्तांस कैदेंत टाकून खर्च भागविण्यासाठीं त्यांचें जडजवाहीर हरण केलें, त्यावरून सर्वांसच त्याचा वीट आला; आणि त्याच आप्तेष्टांनीं आरबांस फितवून व रावजीस पुढ करून ता. २९·१·१८०१ रोजीं कान्होजीस पकडिलें आणि रणपुर येथें कैदेंत ठेविलें. तथापि आरबांचा जाच मिटेना, म्हणून रावजीनें खंबायतेस जाऊन इंग्रजांची मदत आणण्याची तजवीज केली. कान्होजी जरी कैदेंत होता, तरी कडीचा मल्हारराव फौज जमवून बंडावा करूं लागला. आनंदरावाचा दुसरा अनौरस पुत्र मुकुंदराव म्हणून होता तो त्यास सामील झाला. त्या दोघांनीं इंग्रजांकडे फौजेची मागणी केली, आणि त्याबद्दल सुरत चौऱ्यांशीं परगणा जो इंग्रजांस पाहिजे होता, तो त्यांस देण्याचें कबूल केलें. मुंबईस गव्हर्नर डंकन याजकडे दोनही पक्षांच्या मागण्या गेल्या, त्या वेळीं वेल्स्लीचें नवीन आक्रमण सर्वत्र सुरू होतें, त्यास अनुसरून डंकननें वस्तुस्थिति पाहून पुढील मार्ग ठरविण्यासाठीं मेजर वॉकर नांवाच्या इसमास बडोद्यास पाठविलें, आणि त्याचे मदतीस खंबायतेहून दोन हजार फौज दिली. वॉकर येऊन पोंचण्यापूर्वीच रावजी व मल्हाराव यांचा झगडा सुरू झाला होता. 'गायकवाडबंधूंचा कलह लागला आहे. मल्हाररावानें फौजा जमा करून तमाम मुलकांत दंगा करून रावजीशीं लढाई सुरू आहे. रावजींनीं गायकवाडांचे अठ्ठावीस महाल सुरतेनजीकचे इंग्रजांस देऊन त्यांची

पलटणें कुमकेस आणिलीं, म्हणोन गायकवाडांवर पेशव्यांची बहुत बेमर्जी झाली. सुरतकर इंग्रजांनीं मदतीच्या निमित्तें गायकवाडींत प्रवेश करून स्वराज्यांत मोठाच कलह उत्पन्न केला. ' मल्हाररावाचे बाजूस त्याचा भाऊ हणमंतराव हा फौजेची सर्व देखरेख चांगली ठेवीत होता. ते चालून आले तेव्हां रावजीची अगदीं त्रेधा उडून गेली. हा इंग्रजांस घरांत आणितो म्हणून आरबही त्याजवर उठले. त्यांनीं रावजीच्या सर्व कुटुंबावर सक्त पहारा बसविला. रावजीनें सिंद्याकडेही खटपट करून मदत मागविली, पण त्या वेळीं सिंदे-होळकरांचा तीव्र झगडा नर्मदेवर चालू असल्यामुळें गुजरातेंत फौज पाठविण्यास सिंद्यास कोठून सवड होणार ! उलट सिंद्याचा पाडाव करण्यास इंग्रजही टपलेले असल्यामुळें वॉकरनें बडोद्यास येऊन लगोलग तेथील बंदोबस्त केला. त्यानें प्रथम ता. २०·१·१८०२ रोजीं आनंदरावाची भेट घेतली. भेटींत त्याचा खुळसट स्वभाव लगेच वॅाकरचे नजरेस आला. दोघांचें बोलणें झालें त्यांत आनंदरावानें रावजीबद्दल आदर व मल्हाररावाबद्दल द्वेष व्यक्त केला, तेवढ्यावरून वॅाकरनें रावजीसच उचलून धरण्याचें मनांत ठरवून मल्हाररावास धमकावणी दिली; आणि बाबाजीस बरोबर घेऊन तो ता. २३·२·१८०२ रोजीं बडोद्याहून कडीवर चालून गेला. पण चांगले दोन महिने पावेतों वॉकरचा काट चालला नाहीं; तेव्हां त्यानें आणखी इंग्रज फौजा ठिकठिकाणाहून मागविल्या, त्या येऊन पोंचल्यावर मल्हाररावाचा उपाय हरला; आणि तो ता. ३·५·१८०२ रोजीं शरण आला वॅाकरनें त्याची समजूत काढून नडियाद येथें राहण्याची सोय करून दिली. मल्हाररावासारखाच त्याचा दुसरा एक भाऊबंद गणपतराव गायकवाड संखेडा येथें राहून मल्हाररावाची साथ करीत होता, त्याजवर पुढें वॅाकर चालून गेला; आणि ता. ७·७·१८०२ रोजीं त्यानें संखेड्याचें ठाणें हस्तगत केलें, तेव्हां गणपतराव व मुरारराव हे दोघे पळून धार येथें आनंदराव पवाराच्या आश्रयास जाऊन राहिले. संदर्भासाठीं येथें लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, हा आनंदराव गोविंदराव गायकवाडाचे मुलीचा मुलगा स. १७८० च्या सुमारास जन्मलेला बडोद्यांतच लहानाचा मोठा झाला. त्याची बायको मैनाबाई ही सुद्धां गोविंदरावाची पुतणीच होती. या आप्तसंबंधामुळें पवार गायकवाडांचे व्यवहारांस ऐतिहासिक महत्त्व आलें.

सहा महिन्यांत वॅाकरनें लष्करी बळावर आनंदरावाजवळ रावजी आपाजीचा जम बसवून दिला, त्याबद्दल भरभक्कम मोबदला घेण्यास त्यानें विलंब लाविला नाहीं. ता. ६·६·१८०२ रोजीं रावजीनें सुरत परगणे लिहून देऊन वॅाकरच्या खर्चाची व्यवस्था

ठरवून दिली. ती पदरांत घेऊन तो लगेच मुंबईस गेला आणि गव्हर्नराशीं वाटाघाट करून परत ता. ११·७·१८०२ रोजीं बडोद्यास आला. तेथें त्या ठरावाला मागाहून ता. २९·७·१८०२ रोजीं आनंदरावानें खालील स्वदस्तुरचें पत्र लिहून कायमची मान्यता दिली. ' आरबांनीं आमचा उच्छेद करून प्राण घेण्यापर्यंत प्रसंग आणिला, म्हणून आमची सर्व लोकांस अशी ताकीद आहे कीं मेजर वॉकर सांगतील तो प्रकार अवश्य मान्य करावा. त्याविरुद्ध खुद्द आमचा स्वतःचे हातचा लेख असला तरी तो कोणीं मानूं नये. आमचे अहितांचें आचरण कोणी दुष्ट लोक करितील तर, अगर दिवाण रावजी आपाजी, त्यांचे मुलगे, बंधु किंवा दुसरे नातेवाईक, किंवा माधवराव तात्या मुजूमदार यांजविरुद्ध कोणी कांहीं गैरशिस्त प्रकार करतील तर, अथवा खुद्द आम्ही किंवा आमचे कोणी वंशज एखादी गैरशिस्त वर्तणूक करूं तर इंग्रज सरकारानें मध्यें पडून त्याचा लगोलग बंदोबस्त करावा. ' हें सर्वग्रासी पत्र तलवारेच्या धारेखालीं वॉकरनें लिहून घेतलें. त्यांतही पुढें प्रसंगानुसार तफावती उत्पन्न झाल्या त्यांचें निरसन करण्यासाठीं ता. २१·४·१८०५ व ता. १२·७·१८०८ रोजीं दोन उजळणी तह करून इंग्रजांनीं गायकवाडींत आपली सोय चांगली लावून घेतली. याबद्दल वॉकरच्या चातुर्याची तारीफ होत आहे. या भयंकर मगरमिठींतून सुटका करून घेण्यास गायकवाडांस काय प्रयास पडले ते पुढील इतिहासांत नमूद आहेत. वॉकरनें रावजीस करार करून दिला तो असाः—

'कंपनीचे तर्फेनें मेजर वॉकर कबूल करितात, कीं रावजी आपाजी दिवाण व त्यांचे पुत्र, भाई, सोयरे व दोस्त पुस्तदरपुस्त यांची दिवाणगिरी व कारभार जोंवरी गायकवाडाची दौलत तोंवरी चालेल. दरम्यान बहांदरी कंपनीची असे. * ( छ० २७ रबिलावल आषाढ संवत् १८५८). तुमचेपुत्र, बंधु, नातेवाईक व स्नेही यांस कोणतेंही संकट आल्यास त्यांचा सांभाळ इंग्रज सरकार करील. खुद्द बडोदाधिपति अगर दुसरा कोणी तुमचे वाटेस जाईल तर त्याचा बंदोबस्त इंग्रज करून देतील; आणि तुमच्याकडे

* ' It is the wish of the Bombay Govt. that the Dewanship of the Baroda state should remain always in the family of Raoji Appaji from generation to generation, & that his son, brothers, nephew or relative always be well taken care of by & receive assistance from the Govt. Jonathan Duncan ' ( 8. 6. 1802 ).

इनामी गांव चालू आहेत, त्यांव्यतिरिक्त सालीना साठ हजार रुपये रोख तनखा तुम्हांस इंग्रजांकडून मिळेल.' अशा रीतीनें रावजीनें आपला पाया भक्कम करून घेतल्यामुळें त्यास कोणीच विचारता उरला नाहीं. लगेच त्यानें समस्त गायकवाडी प्रदेशांत आपल्या नातेवाइकांच्या नेमणुका केल्या, आणि आपल्या मतें टिकाऊ व्यवस्था लावून घेतली. यापुढें लवकरच बाजीरावानें वसईस इंग्रजांशीं तह केला, त्यांत बडोद्याच्या व्यवस्थेची मान्यता त्यांनीं त्याजकडून कबूल करून घेतली. पुढें रावजी फार दिवस जगला नाहीं. तो ता. १८·७·१८०३ रोजीं मरण पावला. त्याचा भाऊ बाबाजी जास्त पराक्रमी होता, त्यानें या घोटाळ्याच्या परिस्थितींतून थोडी बहुत निभावणी करून घेतली. आरबांस इंग्रजांनीं राज्यांतून काढिलें, पण त्या कारभारांत रावजी आपाजीप्रमाणेंच दुसऱ्या अनेक इसमांस त्यांनीं बहांदरी ऊर्फ जामीनगिरी लिहून दिल्यामुळें अतिशय घोटाळे माजले. पेशव्याची मध्यवर्ती सत्ता कोसळल्या-बरोबर मराठशाहीच्या घटकावयवांवर कशा आपत्ती आल्या, त्यांचें अनुमान बडोद्याचे ह्या भानगडींवरून करतां येतें.

रावजी आपाजीस मुलगा नव्हता. त्याचा वडील बंधु चिमणाजी यास दोन मुलगे सखाराम व सीताराम असे होते. त्यांपैकी सीतारामास रावजीनें मरणापूर्वी ता. २२·५·१८०३ रोजीं दत्तक घेतलें. सखाराम व रावजीचा चुलता काकाजी हे-दोघे चांगले लढवय्ये बाबाजीच्या हाताखालीं वागून येईल ती कामगिरी उठवीत होते. एकंदरींत रावजीच्या घराण्याची कौटुंबिक जूट प्रशंसनीय मानली पाहिजे. सीताराम व **गंगाधर शास्त्री** पटवर्धन दोघेही समवयस्क एकत्रच वाढलेले होते. रावजीच्याच शिफारसीनें शास्त्री यास वॉकरनें ता. २·२·१८०३ रोजीं दरमहा शंभर रुपये पगार करून गायकवाडांचा दरबार वकील या नात्यानें रेसिडेंटाशीं बोलणें करण्याच्या कामा-वर नेमिलें. तेव्हांपासून त्याचा उत्कर्ष भराभर होत गेला. अलोट बुद्धिचातुर्य आणि खटपटी व साहसी स्वभाव यांच्या योगानें इंग्रजांस जरी त्याचा मोठा उपयोग झाला, तरी हा केव्हां काय किटाळ उपस्थित करील अशी धास्ती सुद्धां त्यांस सदैव वाटत असे. अर्थात् पुढें त्याचा खून झाला तेव्हां इंग्रजांस त्याजबद्दल फारसें वाईट वाटलें नाहीं. त्याच्या कल्पक वृत्तीचा भरपूर उपयोग त्यांनीं अगोदरच करून घेतला होता.

**६. इंग्रजांस काढण्याचे गायकवाडांचे निष्फळ प्रयत्न** ( स. १८०६–१४ ).—इंग्रजांनीं गायकवाडांच्या दौलतींत एकदम एवढा आक्रम केला याबद्दल सर्वांसच वैषम्य वाटलें; आणि त्यांस उखडून काढण्याचे विचार अनेकांच्या

मनांत घोळूं लागले. त्यांसंबंधानें पुढें जे प्रयत्न झाले त्यांनींच पुढील बडोद्याचा इतिहास बनला आहे. सीतारामास नांवाची दिवाणगिरी मिळाली, पण त्याचा जम बसला नाहीं सर्व बाजूंनीं इंग्रजांनीं ग्रासल्यामुळें कारभार अशक्य झाला; आणि त्यांच्याशीं त्याचें सडकून वाकडें आलें. स. १८०४ त होळकरांशी इंग्रजांचें युद्ध सुरू झालें, त्यांत गुजरातची इंग्रज फौज क० मरेच्या हाताखालीं माळव्यांत गेली, तिजबरोबर वॉकरनें गायकवाडी फौजही पाठविली. तिजवरील अंमलदार सखाराम व काकाजी फणसे हे इंग्रजांविरुद्ध वागूं लागले. काठेवाडांत बंडें उपस्थित झालीं. कान्होजीनें पुनः इंग्रजांवर उठाव केला या सर्व अडचणींचें मूळ सीताराम होय असें वाटून त्यास कारभारांतून काढण्याचा उपक्रम वॉकरनें चालविला. आदल्याच वर्षी त्याचे बापास इंग्रजांनीं बडोद्याची दिवाणगिरी वंशपरंपरा लिहून दिली, त्यासच काम झाल्याबरोबर ते आतां पदावरून ओढूं लागले. ही प्रसंग पडेल तसें वागण्याची राजनीति अजब म्हटली पाहिजे. त्या नीतीला लेख, सत्य, न्यायान्याय यांची क्षिति कधींच वाटली नाहीं. याच नीतीच्या बळावर इंग्रजांचें राज्य या देशांत कायम झालें अशीं उदाहरणें अनेक असून त्यांत बडोदें किंवा सातारा हीं प्रकरणें विशेष स्मरणीय वाटतील.

अहंमदाबाद सुभ्याची वहिवाट पेशव्याकडून स. १८०० मध्यें गोविंदराव गायकवाडानें वडील पुत्र भगवंतराव याचे नांवें करून घेतल्याचें मागें सांगितलेंच आहे. पांच वर्षांची मुदत भरण्यापूर्वीच पेशव्यानें ती वहिवाट ता २·१०·१८०४ रोजीं सालीना साडेचार लक्ष घेण्याच्या करारानें दहा वर्षांची मुदत ठरवून पुनः भगवंतरावास लिहून दिली, त्यामुळें पुढें दहा वर्षांनीं कशी अडचण आली तें लक्षांत येईल. सतिरामास कारभारांतून काढण्यासाठीं कांहीं नवीन योजना करणें वॉकर यास जरूर वाटूं लागलें. आनंदरावाचा वडील पुत्र भगवंतराव हुशार व बापाचा आवडता असून त्यासच आपल्या हयातींत राज्यावर स्थापावें अशी आनंदरावाची इच्छा होती. पण तो अनौरस व इंग्रजांविरुद्ध वागणारा असल्यामुळें वॉकरनें आनंदरावाचा भाऊ फत्तेसिंग ह्यास हाताशीं घेतलें. बापानें फत्तेसिंगास जेजुरीचे खंडोबास वाहिलेलें असून यशवंतरावानें स. १८०२ त पुण्यावर चाल केली तेव्हां फत्तेसिंह जेजुरीस होता, त्यास व त्याचे आईस यशवंतरावानें पकडून घेतलें आणि बडोद्यांतून इंग्रजांचें बस्तान उठविण्यासाठीं गुजरातेंत रवाना केलें. तो. स. १८०३ त सोनगडाजवळ गेला; आणि तेथून हळू हळू जम बसवीत ता. २·१०·१८०३ रोजीं बडोद्यांत गहिनाबाईजवळ येऊन राहिला. आनंदरावाच्या कर्तृत्वशून्य स्वभावाचा फायदा घेऊन इंग्रजांनीं दौलत ग्रासिली हें पाहून, सीताराम, गहिनाबाई व आरब यांनीं फत्तेसिंगास

पुढारपण देण्याचें ठरविलें. तेव्हां वॉकरनें भेदनीति करून आनंदरावाची आवडती बायको तख्ताबाई इच्या मार्फत तो डाव हाणून पाडिला; आणि आपणच फत्तेसिंगास हाताशीं घेऊन सीतारामास दूर करण्याचा प्रयत्न सुरू केला. फतेसिंग देवास वाहिलेला, कारभारास नालायक अशी हरकत उत्पन्न झाली, तिचें निवारण करण्यासाठीं शास्त्राधार काढून ता. ३. ४. १८०६ रोजीं फत्तेसिंगाची तुला करण्यांत आली, त्याचे साडेचार हजार रुपये ब्राह्मणांस वांटून त्यास शुद्ध केलें, आणि त्याचे हातीं मुखत्यारी दिली. सीताराम केवळ नामधारी बनला. दरम्यान बाबाजीनें दोन वर्षें खपून तलवारीच्या जोरावर काठेवाडांतील बंडावे मोडून तो प्रांत जिंकिला. हा त्याचा पराक्रम ओळखून त्याचाही वॉकरनें कारभारांत उपयोग करून स. १८०६ त रीजन्सी कौन्सिल नेमिलें, त्यांत वॉकर स्वतः मुख्य सत्ताधारी, रीजंट फत्तेसिंग, नेटिव्ह असिस्टंट गंगाधर शास्त्री, दिवाण बाबाजी आणि मुजुमदार इतके गृहस्थ नेमण्यांत आले हें रीजन्सी कौन्सिल स. १८१९ त सयाजीराव अधिकारावर येईपर्यंत कायम होतें. इंग्रजांस काढण्याचे प्रयत्न सीतारामानें सखाराम व काकाजी यांच्या साह्यानें अतिशय केले, पण त्यांत त्यास यश आलें नाहीं.

अशा रीतीनें बडोद्याचे कारभारास रीजन्सी कौन्सिल पचनीं पडण्यापूर्वींच स. १८१०-११ सालीं कित्येक महत्त्वाच्या गोष्टी घडून आल्या. गायकवाडांची फौज कमी करण्याचा वॉकरचा प्रयत्न सुरू असतां त्याची प्रकृति बिघडल्यामुळें स. १८१० त त्यास नोकरी सोडून जावें लागलें, तेव्हां त्याचे जागीं जेम्स रिव्हेट कार्नॅक याची नेमणूक झाली. हाच गृहस्थ पुढें मुंबईचे गव्हर्नरीवर येऊन स. १८३९ त प्रतापसिंह छत्रपतीस सातारचे गादीवरून काढण्यांत प्रमुख होता. मुंबईचा गव्हर्नर जोनाथन डंकन हाही मुंबईस ऑगस्ट १८११ त मरण पावला. तसेंच बाबाजी आपाजी ता. २८-११-१८१० रोजीं मरण पावल्यामुळें सीतारामाचें वजन अगदींच कमी झालें. बाबाजीचा मुलगा विठ्ठलराव यास काठेवाडची सुभेदारी मिळून त्यानें तिकडे गायकवाडांचें वजन राखिलें. विठ्ठलराव बाबाजीचे वंशास काठेवाड दिवाणजी हें नांव अद्यापि चालू आहे. धार व बडोदें यांचा संबंध भौगोलिक परिस्थितीनें निकट होता, तसाच आप्तपणानेंही होता. आनंदराव पवार ता. १०-६-१८०७ रोजीं मरण पावला, तेव्हां त्याचा मुलगा मुरारराव अल्पवयी होता, म्हणून राज्याचा सांभाळ करण्यासाठीं गहिनाबाईनें बडोद्यांतून सखाराम चिमणाजीस धारेस पाठविलें. तिकडे सखारामाचे हातून जम न बसतां तो तेथेंच ता. ५-१-१८११ रोजीं मरण पावला, त्या वेळीं त्याचा जोडीदार

बापू रघुनाथ दिघे म्हणून होता, त्यानें मैनाबाईचा बंदोबस्त राखिला. बापू रघुनाथ याचे घराण्यास धारचे दिवाण असें नांव असून त्यांची एक शाखा बडोद्यास आहे.

कान्होजी गायकवाड बाहेर भटकत होता. तिकडे त्याचा निभाव न लागतां स. १८०६ त त्यानें वॉकरकडे तडजोडीचें बोलणें सुरू केलें, आणि सालाचा ४० हजार तनखा घेऊन स. १८०८ च्या एप्रिलांत पादरा येथें वास्तव्य केलें. तेथें दोन तीन वर्षे काढल्यावर पुनः स. १८११ त त्यानें बडोदें हस्तगत करण्याचा उद्योग चालविला. राणी तख्ताबाईनें त्यास पैसा व माणसें पुरविलीं. त्याच्या हालचालींची बातमी चांगली राखून इंग्रजांनीं ता. २·४·१८१२ रोजीं पादरा येथें अकस्मात् छापा घालून त्यास पकडिलें; आणि बेड्या घालून प्रथम सुरतेस, तेथून मुंबईस व शेवटीं मद्रासेस रवाना केलें. तिकडेच त्याचा अंत झाला. कान्होजीबद्दल फत्तेसिंग वगैरे सर्वांस मोठी हळहळ वाटत होती, पण इंग्रजांपुढें कोणाचा इलाज चालला नाहीं. राणी तख्ताबाईलाही इंग्रजांनीं सख्त बंदी केली. ह्या सर्व प्रकरणांत इंग्रजांस गंगाधरशास्त्री याचा अत्यंत उपयोग झाला, म्हणून त्यांनीं त्याची प्रतिष्ठा वाढवून त्यास सालाचा ६० हजार तनखा व मुतालिक ही पदवी दिली. अर्थात् या राष्ट्रद्रोहाबद्दल सर्व बडोदें शास्त्र्याचे विरुद्ध झालें यांत नवल नाहीं. बाळाजीपंत नातू व गंगाधरशास्त्री या दोघांनीं मराठ्यांचे इतिहासांत अपूर्व लौकिक मिळविला आहे. त्रिंबकजी डेंगळ्यानें शास्त्र्यास दीर्घायुष्य लाभूं दिलें नाहीं, म्हणून त्याचा उद्योग थोडक्यांतच बंद पडला. इतउत्तर शास्त्र्याची रवानगी पुण्यास होऊन तिकडे त्याचा खून झाल्यानें मराठशाहीची इतिश्री कशी ओढवली तो कथाभाग पुढील प्रकरणीं व्यक्त होईल.

**७ गंगाधर शास्त्र्यास पुण्यास येण्याचें प्रयोजन.**—मध्यंतरीं फत्तेसिंग रीजंट झाल्यापासून संस्थानच्या कारभारांत कांहींच सुधारणा झाली नाहीं. इंग्रजांचें वर्चस्व दिवसेंदिवस वाढूं लागलें तें कोणासही बरें वाटेना. इंग्रजांशीं उघड सामना करण्याची तर ताकद कोणास नव्हतीच, आणि जो कोणी विरोध दाखवी त्याचा निःपात होऊं लागला. अशा स्थितींत पुण्यास बाजीरावाकडे वटोदरवासी लोकांचे डोळे लागले. समग्र हिंदुस्थानांत स.१८१३–१४ सालांत जो उठावा इंग्रजांविरुद्ध चालू झाला, त्याची लाट बडोद्यास पोंचली, आणि अनेकांचे प्रयत्न त्या दिशेनें तेथेंही चालू झाले. आनंदराव स्वतः अगदींच निःसत्त्व होता, आणि फत्तेसिंगासही इंग्रजांविरुद्ध हालचाल करण्याची छाती होईना. बडोद्यांतील यच्चयावत् हालचाली शास्त्र्यामार्फत रेसिडेंटास कळत, म्हणून त्यास हरयुक्तीनें दूर करावें अशी तेथें मोठी सार्वत्रिक भावना उत्पन्न झाली. सीताराम व राणी तख्ताबाई यांनीं या बाबतींत पुढारपण स्वीकारिलें. गोविंदराव

बंधूजी गायकवाड या नांवाचा त्यांनीं आपला एक हस्तक पुण्यास बाजीरावाकडे खटपट करण्यास पाठविला. तेथें त्याचीं खुरसेटजी मोदी व त्रिंबकजी डेंगळे यांचे मार्फत बडोद्यासंबंधानें कारस्थानें चालू झालीं. मुंबईचे इंग्रजांतही फितूर करण्यासाठीं गोविंद-रावाचा मेहुणा महिपतराव व हाफीज महंमद दाऊद हे दोघे इसम तेथें ठाणें देऊन बसले. सर्व ठिकाणीं हरिभक्ति सावकाराच्या पेढ्या होत्या, त्यांचे मार्फत खटपटीचीं पत्रें खेळूं लागलीं. मुंबई गव्हर्नराच्या हाताखालील वजनदार अधिकाऱ्यांस पैसे वगैरे चारून तेथून गुप्त बातम्या काढण्याचे खेळ या मंडळींनीं चालू केले. बडोद्यांत तख्ताबाई व सीताराम यांचीं रात्रीचीं खलबतें वारंवार चालून त्यांनीं आनंदरावाकडून स्वदस्तुरचीं पत्रें पेशव्यास व गव्हर्नरास लिहून घेतलीं, कीं सीतारामाचे हवालीं कारभार करावा. तसेंच पेशवा हाच मराठी राज्याचा मुख्य चालक, त्यानें आपली सत्ता गायकवाडावर सांगून इंग्रजांचा जोर कमी करावा, असा या मंडळीचा घाट चालू झाला. त्यासाठीं प्रथम शास्त्री यास बडोद्याचे बाहेर काढलें पाहिजे, त्याशिवाय भागणार नाहीं, असें या मंडळीस वाटूं लागलें होतें

याच संधींत अहंमदाबादची पेशव्याची वहिवाट दहा वर्षांच्या करारानें गायक-वाडांस दिलेली त्याची मुदत संपणार होती. इंग्रजांचा मुलूख गुजरातेंत ठिकठिकाणीं असल्यामुळें त्यांना ही वहिवाट पुढेंही गायकवाडांकडेच राहवी अशी मोठी इच्छा असून, त्यासंबंधानें एल्फिन्स्टन मार्फत पुण्यास बाजीरावाकडे इंग्रजांची खटपट चालू झाली. बाजीरावाला अशी भीति पडली कीं इतउत्तर पूर्वींसारखीच ती वहिवाट गाय-कवाडांकडे ठेविल्यास, तो कायमचा दाखला होऊन आपला हक्क शाबूद राहणार नाहीं. म्हणून कांहीं झालें तरी गायकवाडाकडून ती वहिवाट काढण्याचाच बाजीरावानें निश्चय केला. तेव्हां गुजरातच्या सुभेगिरीसंबंधानें बाजीरावाकडे अनेकांची खटपट सुरू झाली. खुरसेटजी मोदीनें ती वहिवाट आपणास मिळावी असा प्रयत्न सुरू केला. पुढें ती पेशव्यानें ता. २३·१०·१८१४ रोजीं त्रिंबकजी डेंगळ्यास दिली आणि त्रिंबकजीनें आपल्या तर्फेनें विठ्ठल नरसिंह यास त्याकामावर अहंमदाबादेस पाठविलें. स. १८१४ च्या फेब्रुवारींत एल्फिन्स्टननें बडोद्याचे रेसिडेंटास लिहून कळविलें, कीं गोविंदराव बंधूजी पुण्यांत राहून भलभलत्या खटपटी करीत आहे त्यास तेथून परत बोलवून घ्या. उलट शास्त्री यानें कार्नॅकचे मार्फत एल्फिन्स्टनास कळविलें, कीं पुण्यांत मोदी इंग्रजांविरुद्ध बाजीरावास चिथवीत आहे त्यास नोकरींतून एकदम काढून टाका. अशा या उलटसुलट खटपटींनीं समग्र वातावरण कसें अतिरिक्त होऊन गेलें असेल याची कल्पनाच केली पाहिजे. जितका या खटपटींचा निरास करण्याचा इंग्रजांनीं उद्योग

करावा तितका त्याचा फैलाव जास्त होत गेला. गहिनाबाईनें स्वतःचे पैसे देऊन आनंदरावाचा वडील मुलगा भगवंतराव गायकवाड यास स. १८१५ चे जानेवारींत गोविंदरावाचे मदतीस पुण्यास पाठविलें. तेव्हां तर त्रिंबकजी डेंगळ्याशीं त्यांचीं खल-बतें उघडउघड चालू झालीं. याच वेळीं शास्त्रीही पुण्यास होता हें पुढें दिसून येईल. आनंदरावाची चौथी बायको गयाबाई हिनें आपला मुलगा सयाजीराव यास कारभार देण्याबद्दल पेशव्याकडे खटपट चालू केली. पुण्यास भगवंतरावानें आनंदरावाचीं पत्रें आणून पेशव्यास दिलीं आणि त्याचा पेशव्यानें चांगला सत्कार चालविला. याबद्दल बडोद्याच्या रेसिडेंटानें फत्तेसिंगाकडे सडकून तक्रार केली; पण फत्तेसिंग म्हणाला, मी तरी काय करूं! फार तर भगवंतरावाचा तनखा बंद करतां येईल. तथापि आनंरावाकडून त्यानें भगवंत-रावास पत्रें पाठविलीं, कीं तुम्ही ताबडतोब निघून परत बडोद्यास यावें. परंतु भगवंतराव व गोविंदराव दोघेही पुण्यास ठाणें देऊन बसले ते परत येईनात. त्यांस आपल्या हवालीं करण्याबद्दल एल्फिन्स्टननें जंग जंग पछाडले पण त्याचा कांहींच उपयोग झाला नाहीं. खुद्द तख्ताबाईनें आनंदरावाचे मनांत भरविलें, कीं तुम्हीच उठून बाजीरावाचे भेटीस पुण्यास जावें आणि त्याजकडून बडोद्याची व्यवस्था लावून घ्यावी. रेसिडेंटास ही बातमी लागतांच त्यानें आनंदरावावर स्वतःचा पाहरा बसविला आणि त्यास बाहेर पडण्याची मनाई केली.

अशा स्थितींत बाजीरावानें गायकवाडांकडील कर्जाबद्दल तगादा चालू केला होता, तो उत्तरोत्तर दुःसह होऊं लागला, आणि त्याची कांहीं तरी तोड काढण्याची निकड उभय पक्षांस भासूं लागली. गायकवाडावर पेशव्याची ताबेदारी आहे कीं नाहीं, हा मूलभूत प्रश्न वरील सर्व खटपटीचे मुळाशीं होता. इतर सर्व बाबती या मुख्य प्रश्नापुढें क्षुल्लकच समजल्या पाहिजेत. कर्जाची रक्कम पुष्कळ वर्षांची नजराण्याची सांचलेली असून, नवीन वारस नेमतांना नजराणा घेण्याचा हक्क बाजीरावानें सोडणें म्हणजे त्याचें अधिराज्य संपल्याच सारखें होतें. अर्थात् कर्जाच्या या तडजोडींतच इंग्रजांच्या हिताचे अनेक महत्त्वाचे प्रश्न गुंतलेले होते. त्यावरून समक्ष वाटाघाटीसाठीं बाजीरावानें गायकवाडाचे वकील पुण्यास बोलावले, तेव्हां इंग्रजांना वाटलें, कीं या बाबतींत आपली बाजू बरोबर सांभाळील असाच इसम पुण्यास गेला पाहिजे. शास्त्र्याशिवाय दुसरा कोण त्यांची बाजू संभाळणार ! स. १८१२ सालींच फत्तेसिंगानें रेसिडेंटास पत्र पाठवून सुचविलें होतें, कीं शास्त्री यास पुण्यास पाठवावें म्हणजे तो आपल्या अकलेनें बाजीरावाची समजूत पाडून इष्ट कार्य घडवून आणील. बडोद्यांत तर शास्त्री कोणासच नको होता, तेव्हां कोणत्या तरी निमित्तानें ही ब्याद

एकदां पुण्यास जाईल तर बरी; तेथें बाजीरावानें त्यास अडकवून ठेवावें किंवा आपल्या कारभारावर घेऊन इंग्रजांचा नक्ष कमी करावा, अशी कांहीं तरी शक्कल निघणें शक्य होतें. अशा स्थितींत इंग्रजांची जामीनगिरी घेऊन त्यांचें हित साधण्या-साठीं शास्त्री स. १८१४ त पुण्यास गेला; आणि पुढें लवकरच बाजीरावानें अहंमदा-बादची वहिवाट डेंगळ्यास दिली. पुण्यांतील परिस्थिति शास्त्री यास अवघड वाटून त्यानें तेथून बडोद्यास कळविलें, कीं सीतारामच बसल्या बसल्या सगळीं सूत्रें पुण्यास हालवीत आहे, त्याचा बंदोबस्त केल्याशिवाय कार्य सिद्धीस जाणार नाहीं. त्यावरून रेसिडेंटानें स. १८१४ च्या सेप्टेंबरांत फत्तेसिंगाकडून सीतारामास बडोद्यास कडक अट-केंत ठेविलें. हे प्रकार पुढील प्रकरण पंधराच्या संदर्भासाठीं लक्षांत ठेविले पाहिजेत.

# प्रकरण १३ वें

## नागपुरकर भोसल्यांचा पाडाव.

### स. १८०५-१८

**बाणापाठी बाण गणपतरावानें मारिला ।**
**फिरंगी थरथर कांपला ॥**
**रामचंद्र वाघानें गोळा सणाटा भरला ।**
**आवाज तोफेचा केला ॥**
**अवघे गेले पळून बाणी राखिली आरबानें ।**
**फिरंगी जातो येथून ॥** —बापू मराठा

१ रघूजी भोसल्याचा इंग्रजांशीं व्यवहार ( स. १८०५–१६ ).
२ भोपाळ संस्थानावरून सिंदे–भोसल्यांचा रुसवा ( स. १८१४–१५ ).
३ रघूजीचा मृत्यु, मुधोजी आपासाहेबाचा तैनाती तह.
४ परसोजीचा मृत्यु: आपासाहेबाची पदावर स्थापना.
५ आपासाहेबाचा इंग्रजांवर उठाव, सिताबर्डीची लढाई.
६ आपासाहेबाचा वनवास, अखेर व योग्यता.

**१ रघूजी भोसल्याचा इंग्रजांशीं व्यवहार**,*( स. १८०५-१६ )—देवगांवचा तह झाल्यावर रघूजी भोसले ता. २५·१·१८०४ रोजीं नागपुरास पोंचला.

*या एकंदर प्रकरणास मुख्य आधार प्रिन्सेप, नागपुर बखर, जेकिन्सचे रिपोर्ट.

नवीन रेसिडेंट एल्फिन्स्टनही त्याचेच बरोबर आला. हुशंगाबाद व शिवणी हे दोन भोसल्याचे परगणे इंग्रजांशीं युद्ध चालू असतां भोपाळचे नबाबानें लाटले ते परत मिळविण्याची खटपट रघूजीनें लगेच चालू केली. जवळ पैसा नसल्यामुळें त्याला अडचणी भासूं लागल्या, तेव्हां कामगार मंडळी, रयत, सावकार वगैरे जे कोणी सधन झालेले होते त्यांजकडून त्यानें पुष्कळसा पैसा उकळला. मात्र फौजेचें सर्व देणें त्यानें फेडलें असें नाहीं. पुढें यशवंतराव होळकरानें इंग्रजांवर युद्ध पुकारलें तेव्हां त्यास सामील व्हावें अशी इच्छा रघूजीस उत्पन्न झाली. पण एकवार युद्धांत हात पोळून निघाल्यामुळें पुनः त्या फंदांत पडण्याचें धैर्य त्यास झालें नाहीं. इंग्रजांशीं तैनाती फौजेचा तह करून रघूजीनें ती पदरीं बाळगावी, असा आग्रह रेसिडेंटानें त्यास वारंवार केला. परंतु ती गोष्ट अखेरपर्यंत रघूजीनें मान्य केली नाहीं. संबळपुर व छत्तीसगड परगणे वेल्स्लीनें हस्तगत केले होते, ते कॉर्नवालिसनें नवीन धोरणानुसार रघूजीस परत दिले. पुढें सिंद्याशीं संगनमत करून त्याच्या साह्यानें रघूजीनें भोपाळच्या नबाबापासून हुशंगाबाद व शिवणी हे परगणे स० १८०७ त परत घेतले. खरें म्हटलें तर भोपाळचें सगळेंच राज्य हिसकावून घेण्याचा सिंदे व भोसले या दोघांचा त्या वेळीं विचार होता. पण नबाबास इंग्रजांचा पाठिंबा असल्यामुळें ती गोष्ट शक्य झाली नाहीं. शिवाय स. १८०९ सालीं होळकराच्या वतीनें अमीरखानानें फौजेसह नागपुरावर ताव मारण्यास सुरवात केली; त्यामुळें रघूजीला बाहेर आपला जम बसविणें अशक्य झालें. सन १८०० त यशवंतराव होळकर नागपुरास कैदेंत असतां त्याचें कांहीं जडजवाहीर रघूजीनें हस्तगत केलें होतें, तें तो परत देईना, हें निमित्त करून अमीरखानानें नागपुरावर स्वारी करण्याचें योजिलें. सन १८०९ सालच्या उन्हाळ्यांत अमीरखान आपले पेंढारी बरोबर घेऊन भोपाळचे बाजूस आला. तेथें त्यास भोपाळचा नबाब सामील झाला. पावसाळ्यांतच त्यांनीं गढामंडळा हा भोसल्यांचा जिल्हा लुटून उद्ध्वस्त केला, आणि नर्मदेस उतार झाल्यावर अमीरखान फौजेसह नदी उतरून नागपुर हद्दींत शिरला; परंतु रघूजीनें त्याजवर फौज पाठवून त्याचा पराभव करून त्यास घालवून दिलें. या प्रसंगीं इंग्रजी फौजेची तुकडी कर्नल क्लोजचे हाताखालीं होती, ती रघूजीचे मदतीस आली. वास्तविक ही मदत रघूजीनें मागितली नव्हती. परंतु ग० ज० मिंटोनें मुद्दाम त्यास खूष करण्यासाठीं ही फौज पाठविली. मनांतील हेतु असा होता, कीं रघूजीनें तैनाती फौजेचा तह मान्य करून कायमचीच ती फौज आपल्याजवळ बाळगावी. परंतु

इंग्रजांनीं मदत पाठविली ह्याबद्दल आभार मानण्याऐवजीं उलट रघूजीनें त्या संबंधांत त्यांस सडकून दोष मात्र दिला. पुढें पेंढाऱ्यांच्या धाडी नागपुरावर वारंवार येऊं लागल्या, तरी रघूजीनें इंग्रजी फौजेची कुमक बोलाविली नाहीं. भोपाळचा मुलूख जिंकण्याची मात्र त्याची इच्छा तीव्र होती, त्यास इंग्रजांनीं सडकून विरोध केला. तेव्हां सिंदे व भोसले या दोघांनीं आपल्या फौजा एकत्र करून खुद्द भोपाळला वेढा घातला. तो वेढा नोव्हेंबर १८१३ पासून जुलई १८१४ पावेतों चालू होता. या प्रसंगीं भोपाळचा नबाब वजीरमहंमदखान यानें शिकस्तीनें लढून भोपाळचा बचाव केला, तेणेंकरून भोसले-सिंद्यांस नामोहरम होऊन परत जावें लागलें. पुढें पेंढाऱ्यांवर दाब ठेवण्याकरतां इंग्रजांनींच भोपाळचे नबाबास आपले संरक्षणाखालीं घेऊन त्या ठिकाणीं आपलें मजबूद लष्कर ठेवून दिलें, त्यामुळें रघूजीस अत्यंत वैषम्य वाटलें. गढामंडळा, झांशी, सागर, भोपाळ वगैरे संबंधानें सिंद्याशीं इंग्रजांचे तंटे चालू झाले तेही या व्यवहारांत संदर्भासाठीं लक्षांत ठेवणें जरूर आहे. हीं सर्व प्रकरणें कैक वर्षें चाललीं, त्यांत बाजीरावाचा संबंध तर अवश्य होता. उदाहरणार्थ ता. ३१·७·१८११ रोजीं खालील पत्र बाजीरावानें रघूजी भोसले यास लिहिलेलें आढळतें. 'संस्थान गढेकोट सरकारचे पेश्यांतील, सेनासाहेब सुभा यांचा तेथें कांहीं संबंध नसतां ते घेतात म्हणून दौलतराव सिंदे यांनीं हुजूर विनंति लिहिली, त्याजवरून दरोबस्त संस्थान बाळोबा कुंजर यांचे हवालीं करण्याविषयीं हुजुरहून दौलतराव सिंदे यांस लिहिलें आहे. त्या प्रांतीं आपली फौज आहे, त्यांनीं खटला करूं नये म्हणून आपण आपल्या सरदारांस निक्षून ताकीद करावी.' अशीं हीं आपसांतील तंटे बखेड्यांचीं प्रकरणें कैक वर्षें चालू होतीं.

**९ भोपाळ संस्थानावरून सिंदे भोसल्यांचा रुसवा (१८१४-१५).**— इंग्रज सरकारचे ताब्यांत या वेळीं सर्व देशभर तुटक प्रदेश पुष्कळ असल्यामुळें इतरांपेक्षां त्यांसच अमीरखान व पेंढारी यांचा अतिशय त्रास होऊं लागला. पेंढाऱ्यांस तहानें बांधून घ्यावें तर त्यांचें स्थाईक राज्य नव्हतें; लढाई करून जिंकावें तर त्यांचें अमुकच कायम ठिकाण नव्हतें; लढाईत पराभव झाल्यानें त्यांचें फारसें नुकसान होणारें नव्हतें. अशा विशिष्ट परिस्थितींतून आपली सत्ता व इभ्रत कायम राखण्याचा मार्ग लॉर्ड हेस्टिंग्जनें कसा काढला हें आतां पुढें सांगावयाचें आहे.

सन १८१४ सालीं इंग्रजांचें नेपाळशीं युद्ध जुंपलें या संधीचा फायदा घेऊन मराठे व पेंढारी इंग्रजांवर उठण्याची सिद्धता करूं लागले, म्हणून नेपाळच्या युद्धांतील

इंग्रजांचे जय व अपजय मराठ्यांची उचल धान्यांत येण्यास नजरेसमोर पाहिजेत. तूर्त लॉर्ड हेस्टिंग्जनें केवळ बचावाचें धोरण ठेविलें. काल्पीवरून कटक पर्यंत एक कल्पित रेषा काढली तर त्या रेषेच्या पूर्व बाजूस ठोकळमानानें इंग्रजांचा प्रदेश होता, आणि पश्चिम बाजूस अनेक सत्ताधीश असले तरी त्यांतील मुख्य नागपुरकर भोसले हा होता. रघूजीनें आपल्याशीं तैनाती फौजेची मैत्री करावी असा प्रयत्न कैक वर्षे इंग्रज अधिकाऱ्यांनीं अत्यंत निकरानें चालविला होता. परंतु रघूजीनें त्यास कधींही मान्यता दिली नाहीं. त्याचें उत्तर एकच, ' मला तुमची मैत्री नको वा शत्रुत्व नको. ' रघूजी अनुकूल होईना, म्हणून आपल्या बचावाचा दुसरा कांहीं मार्ग शोधून काढणें लॉर्ड हेस्टिंग्ज यास जरूर वाटलें. मुख्यतः काल्पी पासून नर्मदे पावेतों जे सत्ताधीश होते त्यांच्याच आश्रयानें पेंढाऱ्यांस सामर्थ्य येत असल्यामुळें त्या संस्थानिकांशींच स्वतंत्र करार करण्याचें हेस्टिंग्सनें ठरविलें, त्यांत नर्मदेच्या उत्तरेस भोपाळच्या नबाबाचा प्रदेश मुख्य असून तो प्रांत पूर्वी सिंदे भोसल्यांनीं जिंकलेला होता. औरंगजेबाचे वेळेपासून भोपाळ

**भोपाळचे नबाब**
**१ दोस्त महंमद**
**१७०९–४०**
|
**२ यार महंमद**
|
**३ फैझमहंमद**
**४ शरीफ महंमद**
**| वजीर ३ चा)**
**५ वजीरमहंमद**
**मृ. १८१६**
|
**६ नजरमहंमद**

येथें एका पठाण सरदाराचा अम्मल असून स. १८१४ त वजीर महंमद नांवाचा नबाब त्या ठिकाणीं आपली लहानशी जहागीर संभाळून होता. हा प्रदेश जिंकण्याचा उद्योग भोसले व सिंदे यांनीं अंगावर घेतल्याचें पूर्वी सांगितलें आहे. स. १८१४त जीन बॅप्टिस्ट यास दौलतरावानें भोपाळ जिंकण्यास रवाना केलें, तेव्हां वजीरमहंमदानें दिल्लीचा इंग्रज रेसिडेंट मेट्काफ याजकडे वकील पाठवून इंग्रजांच्या मदतीची याचना केली. या पूर्वीच हें प्रकरण हेस्टिंग्जकडे गेलें होतें. त्यावरून त्यानें खालील आशयाचा तह वजीरमहंमदाशीं करावा असा हुकूम पाठविला, ( ऑक्टोबर १८१४ ).

१ इंग्रजांनीं भोसले व सिंदे यांचें निवारण करून नबाबाचें संरक्षण करावें; २ नबाबास आपल्या राज्यांत पूर्ण स्वातंत्र्य असावें, पण आपल्या मुलखांतून इंग्रज फौजांस जाण्यायेण्यास त्यानें वाट द्यावी; ३ इंग्रजांस राहण्यासाठीं आपला एक मजबूद किल्ला त्यानें हवालीं करावा; ४ नबाबानें इंग्रजांच्या सल्लयाशिवाय बाहेर कोणाशीं तह वगैरे करूं नये, कलह उद्भवल्यास इंग्रज निकाल करतील तो त्यानें मान्य करावा; आणि ५ नबाबानें पेंढाऱ्यांस मदत देऊं नये.

अशाच प्रकारचा स्वतंत्र तह सागरच्या जहागीरदाराशीं करण्यासाठीं वॉशोप Wauchope नांवाच्या रेसिडेंटास ग० ज० नें बुंदेलखंडांत रवाना करून भोपाळचा तह पुरा करण्याचें कामही त्यालाच सांगितलें. त्याचप्रमाणें बुंदेलखंडांत जास्त इंग्रज फौज त्यानें पाठविली; आणि गुजरात, पुणें व हैद्राबाद या ठिकाणच्या फौजांसही नर्मदेकडे जाण्याचा हुकूम केला. या वेळीं सिंद्याजवळ रिचर्ड स्ट्रॅकी Strachey नांवाचा इंग्रज रेसिडेंट होता, त्यानें भोपाळच्या तहाचें प्रकरण सिंद्यास कळविलें, त्यावरून सिंद्यास अत्यंत संताप आला. त्यानें रेसिडेंटास साफ कळविलें, कीं ' भोपाळचा संस्थानिक आमचा मांडलिक आहे; त्याच्याशीं स्वतंत्र तह करण्यास तुम्हांस अधिकार नाहीं. सिंद्यांचा कारभार या वेळीं गोपाळरावभाऊ पाहत होता त्यानें सप्रमाण सिद्ध करून दाखविलें कीं, भोपाळकडून सिंद्यांनीं आज पावेतों कैक वर्षे खंडण्या वसूल केल्या आहेत. ता. ३० नोव्हेंबर १८१४ रोजीं भोपाळचा हा वाद मोठ्या आवेशानें चालून शेवटीं प्रकरण ग० ज० कडे फेरविचारासाठीं पाठवावें असें ठरलें. भोपाळचा हा वाद याच वेळीं नागपुरास जेंकिन्सच्या मार्फत व पुण्यास पेशव्याकडेही चालू झाला होता. सर्वांसच इंग्रजांचें हें कृत्य अत्यंत नापसंत होऊन सर्वांनीं मिळून त्याचा निषेध करण्याचा बेत केला. पेंढारी सरदार व पठाण अमीरखान हेही त्या जुटींत सामील झाले, आणि डोंगराळ प्रदेशांत इंग्रजांशीं युद्ध चालवून त्यांस मोडण्याचा विचार सर्वांनीं ठरविला. हे प्रकार स. १८१४ डि. व १८१५ जा. या समयांत चालू होते. याच वेळीं नेपाळांत इंग्रज फौजा चालून गेल्या असून, युद्धासाठीं इंग्रजांस पैशाची अडचण पडली म्हणून त्यांनीं लखनौचा वजीर गादीउद्दीन हैदर याजकडून एक कोट रुपये कर्ज घेतलें. ता. ३१·१०·१८१४ रोजीं नेपाळांत कलुंग किल्ल्यावरील हल्लयांत इंग्रज सेनापति जिलेस्पी मारला गेला, आणि पुढें दोनतीन महिनेपयत इंग्रजांची तिकडे सारखी दुर्दशा होत चालली. ता. २७ डिसेंबर रोजीं मेजर मार्टिन्डेल यास असेंच अपयश आलें. या बातम्या बाहेर प्रसिद्ध होऊन इंग्रजांच्या विरोधकांस पुष्कळच बळ चढलें. अशा अडचणीच्या प्रसंगीं ग० ज० नें सन १८१४ च्या डिसेंबरांत सिंद्यास एक लांबलचक पत्र लिहिलें व अशी सूचना केली कीं भोपाळच्या जहागिरीचा वाद आपण हळू हळू तडजोडीनें मिटवूं. तोंपर्यंत तुम्हीं एकदम चढाई करून प्रकरण हातघाईवर आणूं नये. ही गोष्ट सिंद्याच्याही पथ्यावर पडली. भोपाळकरानेंही अंतस्थ रीतीनें सिंद्याकडे बोलणें करून आपला बचाव केला, आणि दोघांकडे संधान ठेवून शक्य तितका फायदा करून

घेतला. परंतु हें त्याचें दुटप्पी वर्तन ग० ज० यास कळतांच त्यानेंही तहाचा नाद सोडून दिला. सागरकरांचेंही प्रकरण असेंच अर्धवट सोडून देणें ग० स० यास भाग पडलें. नेपाळचें युद्ध सन १८१५ त चालूच होतें. त्याचा शेवट सन १८१६ च्या आरंभीं झाला. तें युद्ध मिटेपर्यंत पेंढारी व मराठे यांच्याशीं ग० ज० नें अगदीं नमतें घेतलें. सिंदे भोसल्यांस दुखवूं नये म्हणून भोपाळचा तह त्यानें पुरा केला नाहीं; नुसत्या फौजांच्या पोकळ हालचाली मात्र दाखविल्या. तेवढी दहशत सिंदे भोसल्यांस पुरे झाली. त्यांच्यानें एकदम भोपाळवर चालून जाववलें नाहीं. तितक्यांत सिंद्याचे सरदार यशवंतराव भाऊ व बॅप्टिस्ट या दोघांचें आपसांत भांडण लागल्यामुळें परभारेंच भोपाळचा बचाव झाला. या शिवाय भोपाळ प्रकरणास थंडाई येण्यास दुसरेंही एक कारण झालें तें असें. सन १८१० च्या आरंभीं होळकराचा कारभार कांहीं दिवस तात्या आळेकरास हाताशीं घेऊन मैनाबाई पाहत होती. सन १८१५ च्या जानेवारीचे आरंभींच मैनाबाईनें तात्या आळेकरास दौलतराव सिंद्याचे भेटीस पाठविलें; आणि चढावाचा व बचावाचा असा गुप्त तह घडवून आणिला. पेशव्यास आपला धनी समजून त्याचे हुकमतींत सिंदे होळकरांनीं एक जुटीनें वागून मराठी राज्याचा बचाव करावा; पेंढारी सरदारांस जहागिरी देऊन आपल्या मदतीस घ्यावें, आणि राजपूत राजे स्वतंत्र होऊं पाहत होते त्यांस पूर्वीप्रमाणें आपले ताबेदार बनवावें, अशीं या तहांत कलमें होतीं. अमीरखान व इंग्रज यांची सत्ता मोडून काढावी, अशींही आणखी कांहीं गुप्त कलमें या तहांत होतीं. हा तह सिद्धीस न जाण्याचें कारण दौलतराव होय. त्याच्या मनांत होळकराची दौलत घशांत घालावयाची होती म्हणून त्यानें या तहाप्रमाणें वर्तन केलें नाहीं. पुढें मैनाबाई व तात्या आळेकर यांच्या हातांतील कारभार तुळसाबाई व बाळारामशेट यांनीं हिसकून घेतला; आणि अमीरखानास जवळ आणिलें, त्यामुळें वरील तह फुकट गेला. पण जूट उभी करून इंग्रजांस शह देण्याचा प्रयत्न कसा चालला होता हें त्यावरून दिसतें.

**३ रघूजीचा मृत्यु, मुधोजी आपासाहेबाचा तैनाती तह** (१८१६).—उत्तरेंत नेपाळयुद्ध, दक्षिणेंत गंगाधरशास्त्र्याचा खून, आणि सर्व देशभर पेंढाऱ्यांचा दंगा, या प्रकरणांनीं स. १८१५ चा काळ व्यापून गेला. सन १८१६ च्या मार्च महिन्यांत इंग्रजांच्या फायद्याच्या दोन तीन गोष्टी घडून आल्या. नेपाळशीं चाललेलें इंग्रजांचें युद्ध संपून त्यांची एक धास्ती कमी झाली. मराठ्यांची जूट फोडण्यासाठीं नर्मदेवर भोपाळ संस्थानाची पाचर इंग्रज नवीन बनवीत होते ती

पूर्ण होण्याचा योग असा आला, कीं ता. १७·३·१८१६ रोजीं नबाब वजीर महंमद मृत्यु पावला; आणि त्याचा अल्पवयी मुलगा नजरमहंमद नबाबगिरीवर आल्यामुळें त्या मुलखांत आपापल्या परी ढवळाढवळ करण्यास इंग्रज, पेंढारी व मराठे यांस एक नवीन संधि प्राप्त झाली. तिसरी गोष्ट, ता० २२ ३·१८१६ रोजीं नागपुरास रघूजी भोसले मृत्यु पावला. मृत्युसमयीं रघूजीला एक मुलगा होता त्याचें नांव परसोजी ऊर्फ बाळासाहेब. हा गादीवर आल्यावर नागपुरावर तैनाती फौज बसविण्याचें इंग्रजांनीं मनांत आणिलें. भोपाळच्या नबाबाशीं तह करण्याचें मुख्य प्रयोजन इंग्रजांना असें होतें, कीं कोणीकडून मराठ्यांची एक जूट होऊं देऊं नये. तेव्हां सिंद्यास दुखवून भोपाळचा तह सिद्धीस नेण्यापेक्षां नागपुरकरांसच तैनाती फौजेनें बांधून घेतलें म्हणजे आपोआप मराठ्यांचा व पेंढाऱ्यांचा बंदोबस्त होतो, असें समजून ग० ज० नें नागपुरचा रेसिडेंट जेंकिन्स यास कळविलें, कीं रघूजीच्या मृत्यूची संधि साधून भोसल्यांशीं तैनाती फौजेचा तह घडवून आणावा. इकडे बुंदेलखंडांतील रेसिडेंट वॉशोप व सिंद्याचे दरबारीं राहणारा रेसिडेंट स्ट्रॅकी, यांसही त्यानें कळविलें कीं, तूर्त भोपाळचा तह घडवून आणण्याची त्वरा करूं नये. नागपुरचा उद्योग यशस्वी न झाला तर त्यासंबंधीं पुढें पाहतां येईल.

नागपुरचे गादीवर आलेला परसोजी हा शरीरानें व मनानें अगदींच कमकुवत म्हणजे अंध व दुर्बुद्ध होता. त्याचें वय अडतीस वर्षांचें होतें तरी वायूच्या झटक्यानें त्याचा हात लुला होऊन तो बहुतेक अंथरुणांत पडून असे. बोलण्यांत व व्यवहारांत त्याचा बिलकूल धरबंद नव्हता. पण तो लहरी व संतापीही कांहीं कमी नव्हता. रघूजीच्या उत्तरकार्यांतच त्यानें अनेक अविचार केले. उत्तरकार्याचे वेळीं क्षौर झालेलें विसरून पुढें दरबारांत तो संतापून विचारूं लागला, "माझ्या मिशा कोणीं नेल्या ?" सारांश हा राज्य करण्यास अगदीं लायक नाहीं असेंच सर्व लहानथोरांचें मत असल्यामुळें राज्यकारभाराची कांहीं तरी अन्य योजना झाली पाहिजे असा प्रसंग आला. रघूजीचा बंधु व्यंकोजी नानासाहेब याचा मुलगा मुधोजी आपासाहेब हा कुटुंबांत दुसरा हुशार गृहस्थ वीस वर्षांचा तरुण व राज्य करण्यास लायक होता. रघूजीच्या मुलीचा एक मुलगा चिटकोजी गुजर नांवाचा दुसरा एक वारस होता, पण तो अल्पवयी होता. मयत रघूजीचें आपासाहेबावर प्रथम मुळींच प्रेम नव्हतें. त्याची जहागीर जप्त करून त्यास निर्वाहाचें साधनही त्यानें ठेविलें नाहीं, तेव्हां ब्रिटिश रेसिडेंटानें मध्यस्थी करून आपासाहेबाची कांहीं अल्प व्यवस्था रघूजीकडून बांधून दिली होती. तथापि अंतसमयीं रघूजीनें आपासाहेबास जवळ बोलावून काकुळतीनें

सांगितलें, कीं ' बाळासाहेब निर्बुद्ध आहे त्याचा सांभाळ करा आणि घराण्याची अब्रू संभाळा. ' अशी निरवानिरव करून रघूजी मरण पावला, तरी त्याच्या हयातींत जी मंडळी आपासाहेबाचें वितुष्ट पाहणारी होती त्यांस आतां जोर चढला. या मंडळींत धर्माजी भोसले नांवाचा रघूजीचा पाळीव पुत्र प्रमुख असून रघूजीच्या हयातींतच त्याच्या ताब्यांत सर्व खजिना, जडजवाहीर व बराचसा कारभार होता. त्याच्याच नादानें वागून रघूजीनें आपल्या अखेरच्या काळांत पाहिजे तसा जुलूम करून पुष्कळ द्रव्यसंचय केला. जनानखान्यावर तर धर्माजीचें वजन फारच होतें. वाड्यांतील पहाऱ्यावरचे आरब शिपाई धर्माजीच्या ताब्यांत होते, तेव्हां मयत रघूजीची बायको बाकाबाई इच्याकडून राज्याचा कारभार चालवावा, चिटकोजी गुजर यास परसोजीनें दत्तक घ्यावें, आणि आपासाहेबास दूर ठेवावें असा व्यूह धर्माजीनें रचिला. उत्तरकार्य चालू असतांच हे प्रकार सुरू झाले.

या खटपटी पाहून आपासाहेबास चीड आली. त्याच्या बाजूसही कित्येक दरबारी लोक होतेच, ते उघड उघड बंडाच्या गोष्टी बोलूं लागले, त्यावरून धर्माजीच्या पक्षास धास्ती पडली. उभय पक्षांत तडजोड करण्याचा प्रयत्नही कित्येकांनीं केला. पण धर्माजीनें आपासाहेबाचें कांहीं चालू दिलें नाहीं. रघूजीच्या हयातींत शेवटीं कित्येक वर्षें नागपुरचा कारभार मुख्यतः भवानी नागनाथाचा पुतण्या श्रीधर लक्ष्मण पंडित हा पाहत असे. परंतु शेवटीं रघूजीशीं त्याचा बेबनाव होऊन त्याच्या मृत्युपूर्वी थोडे दिवस श्रीधर पंडित नागपुर सोडून काशीस जाऊन राहिला. कोणत्याही बाबतींत इंग्रजांशीं विकोपास न जातां समेटून कारभार करण्याचें श्रीधर पंडिताचें धोरण होतें. रघूजीचे पश्चात् दोन्ही पक्षांस अशी भीति पडली, कीं इंग्रज आतां राज्यांत आपला हात जास्त शिरकवतील त्यासाठीं श्रीधरपंतास काशीहून आणविण्याचा बेत त्यांनीं ठरविला. देवगांवचा तह घडवून आणणारा यशवंतराव रामचंद्र याचेंही वजन रेसिडेंटाजवळ चांगलें होतें. त्याचे मार्फत आप्पासाहेबानें रेसिडेंटास कळविलें, कीं नागपुरच्या कारभारांत तुम्ही मला साह्य करीत असाल तर इंग्रजांची तैनाती फौज ठेवण्याचें मी कबूल करतों. ही सूचना रेसिडेंटानें ग० ज० कडे पाठविली; आणि विचारिलें कीं, मालक परसोजी अगदींच निर्बुद्ध आहे आप्पासाहेब हुशार आहे, पण त्याच्या हातांत कायदेशीर अखत्यार नाहीं. अशा स्थितींत नवीन तहाचें हें काम आपण हातीं घ्यावें कीं नाहीं? दुसरी एक अडचण या प्रसंगीं अशी होती, कीं नागपुर दरबारांतील दोन पक्षांच्या खटपटीत इंग्रजांनीं मध्यस्थी केली

नाहीं तर कदाचित पेशवे, सिंदे किंवा कोणी पेंढारी सरदार फौज आणून आपलें वजन येथें बसवतील, त्यापेक्षां आप्पासाहेबाकडे कारभार जाण्यांत आपलें हित आहे आणि त्यासच आपण पाठिंबा देणें योग्य होय असें रेसिडेंटानें ठरविलें. ग० ज० चा हुकूम आला, कीं परसोजी जर सर्वथैव नालायक आहे आणि आप्पासाहेब योग्य दिसतो, तर त्याच्याशीं तह वगैरे करण्यास कांहीं हरकत नाहीं. मात्र परसोजी अगदींच नालायक आहे याची खातरी स्पष्टपणें करून घ्यावी. ग० ज० नें हा खलिता ता. १५ एप्रिल रोजीं कलकत्त्याहून नागपुरास रवाना केला; आणि प्रसंग पडल्यास रेसिडेंटाजवळ फौज असावी म्हणून निजामाची तैनाती फौज कर्नल डोव्हटन याच्या हाताखालीं एलिचपुर येथें होती, तिला जेंकिन्सचे मदतीस जाण्याचा हुकूम सोडिला. तैनाती फौजेचा जो तह नागपुरशीं करावयाचा त्याचें स्वरूप पूर्वी पेशव्याशीं किंवा निजामाशीं केलेल्या तहासारखेंच होतें. बंडाळी मोडून दक्षिण देशचा बंदोबस्त यथास्थित राहवा, या उद्देशास्तव तैनाती फौज स्वीकारणारांची ही एक नवीन जूट बनविलेली असून, तो उद्देश सिद्धीस नेण्यासाठीं सर्वांनीं आपआपलें सामर्थ्य एकत्र आणावयाचें असें या तहांत इंग्रजांचें धोरण होतें. त्यासाठीं इंग्रजांची फौज नागपुरांत राहील तिच्या मदतीसाठीं भोसल्यांनींही आपल्या जवळील फौज चांगल्या स्थितींत ठेवून ती जरूर पडेल तेव्हां बिनतक्रार कामगिरीवर पाठवीत जावी; तूर्त ही फौज नर्मदेच्या बाजूस राहून तिनें दक्षिण उत्तरचा बंदोबस्त राखावा; भोसल्यानें इंग्रजांच्या परवानगीशिवाय दुसऱ्या कोणत्याही सत्ताधीशांशीं तह वगैरे करूं नये; फौजेच्या खर्चास लागणारी रक्कम महिने महाल रोख देत जावी, आणि त्या हप्तेबंदींत व्यत्यय येऊं लागल्यास तितक्या उत्पन्नाचा प्रदेश कायम तोडून द्यावा, अशीं कलमें इंग्रजांनीं सुचविलीं. तूर्त इंग्रजांस प्रदेश-संरक्षणाची जास्त जबाबदारी अंगावर घ्यावयास नको होती, म्हणून त्यांनीं आपासाहेबा-कडून खर्चासाठीं रोख हप्तेच बांधून मागितले.

ग० ज० कडून वरील आशयाचे हुकूम रेसिडेंटास आले, त्यामुळें आपासाहेब व धर्माजी यांची एकवाक्यता होत होती ती बिघडली. धर्माजी व्यसनी व दुष्ट स्वभा-वाचा होता सर्व जाणते लोक त्याच्या विरुद्धच होते. अशा स्थितींत आपासाहेबानें परसोजीस भेटून कळविलें, कीं, ' मालक आपण आहांच. इंग्रजांचें संधान राखण्या-साठीं मी तुमचे जवळ बसून सर्व कारभार करितों पण हा धर्माजी कोणाचें ऐकत नाहीं याचा बंदोबस्त केला पाहिजे. ' असें सांगून आपासाहेबानें परसोजीकडून

धर्माजीस कैद करण्याचा हुकूम घेतला; आणि आपल्या भरंवशाचे कांहीं लोक वाड्यांत पाठवून ता० ११·४·१८१६ रोजीं त्यास पकडून कैद केलें, आणि त्याच्या हातांतील सर्व सत्ता हस्तगत केली. या प्रसंगीं परसोजीनें नेटानें वागून आपासाहेबाचें पूर्ण साह्य केलें. धर्माजीस कैद केल्यावर तीन दिवसांनीं परसोजीनें दरबार भरवून आपासाहेबास नायब मुखत्यार ही पदवी देऊन सर्व कारभार त्याचे हवालीं केला. या दरबारांत रेसिडेंट जेंकिन्स हजर असून त्यानें आपासाहेबाचें अभिनंदन केलें. असा अधिकार हातीं आला तरी पूर्वीच्या विरोधी पक्षांतील पुष्कळसे लोक कारभारावर असल्यामुळें ते केव्हां काय करतील या संबंधानें आपासाहेबास धास्ती वाटूं लागली. यास्तव तैनाती फौजेचा तह करून इंग्रजांचा आश्रय स्वीकारण्याचा त्यानें निश्चय ठरविला. मात्र इंग्रजांस घरांत आणण्याचा आपासाहेबाचा हा उद्देश एकाही वजनदार मुत्सद्यास पसंत पडला नाहीं. नारोबा चिटणिसानें आपासाहेबास भेटून कळविलें, ' हल्लीं पेशव्यांचे मार्फत सर्व मराठमंडळाची एकजूट करण्याचा प्रयत्न चालू आहे त्यांत तुम्ही सामील व्हा आणि इंग्रजांची तैनाती फौज घेण्याचा विचार सोडून द्या. रघूजीनें अखेरपर्यंत जो क्रम पत्करला तो तुम्ही सोडूं नका, उलट इंग्रजांनीं आपले ओरिसा व वऱ्हाड प्रांत हस्तगत केले आहेत ते परत मिळविण्यासाठीं इंग्लंडचे राजाकडे वकील पाठवा.' इंग्लंडास वकील पाठविण्याची ही शक्कल रघूजीच्या हयातींतच निघालेली होती. रावजी परशुराम नांवाचा एक गृहस्थ थोडेंसें इंग्रजी जाणणारा आणि वर्तनांत मोठी ऐट ठेवणारा असा रघूजीजवळ होता. त्यानें युरोपांतील खटपटीसाठीं बरेचसे पैसे रघूजीजवळून घेतले होते. ही इंग्लंडांतील खटपट पुनः चालू करावी अशी नारोबानें आप्पासाहेबास टोंचणी लावली. नारोपंत म्हणून दुसरा एक गृहस्थ आप्पासाहेबाचे मर्जींतला होता, त्याची इच्छा नारोबाचा कारभार आपणांस मिळावा अशी असल्यामुळें, नारोबास काढण्याचा विचार मनांत आणून आप्पासाहेबानें त्याची ही अंतस्थ खटपट स्वतः जाऊन जेंकिन्सला कळविली. हेतु हा कीं इंग्रजांच्या साह्यानें आपली छाप राज्यांत बसवून फौज व जुने कारभारी विरुद्ध होते त्यांस काढून टाकावें, आणि आपणांस पाहिजे तेव्हां उपयोगी पडणारी इंग्रजांची फौज घरांत आणावी. मात्र इंग्रजांचा पक्षपाती श्रीधरपंत काशीस होता तो पुनः कारभारावर येईल तर तो त्यास नको होता. श्रीधर पंडितास आणण्याचा आग्रह यशवंतराव रामचंद्र याचा असून हा यशवंतराव रेसिडेंटाशीं बोलणें करण्यांत प्रमुख असे; म्हणून तैनाती फौजेच्या तहाचे प्रकरणांत आप्पासाहेबानें यशवंतरावाचा उपयोग न करतां नारो पंडित

मार्फत तें बोलणें ता. २५ एप्रिल रोजीं सुरू केलें. त्याच दिवशीं नारोबाला कारभारांतून काढण्याची गोष्ट आप्पासाहेबानें जेंकिन्सला कळविली होती. आज आप्पासाहेब तैनाती तहाची उत्सुकता दर्शवितो आहे, उद्यां कदाचित् त्याचें मत फिरलें तर पुनः अडचण उत्पन्न होईल असें मनांत आणून, जेंकिन्सनें नागो पंडितास ता. २४ एप्रिलच्या रात्रीं तह करण्यासाठीं आपल्या बंगल्यावर बोलाविलें. त्या प्रसंगीं वाटाघाट झाली ती अशी कीं, "बाळासाहेब शरीरानें पंगू, दौलत करण्याचें अंगवण आपासाहेबाचे अंगीं. धर्माजी भोसले अमर्याद. बाळासाहेब मालिक आहेतच. आंतून बाहेरून चौघीं माणसें आपासाहेबांकडे पाहतात हें नारोत्रिंबक व नारायण पंडित यांनीं पुर्तेपणें जाणून आपासाहेबांचे मर्जीनुरूप जंकिन व साउथबीसाहेब यांस रात्रौ बेमालूम नारोत्रिंबकाचे घरीं आणून तेथें आपासाहेब व पंडित यांसहित एकांतांत बसून मसलत केली. धर्माजी धोसले यास धरण्याचा व नवीन तह करण्याचा त्याची पक्कायत जाली.' याप्रमाणें ता. २७·४·१८१६ रोजीं रात्रीं आप्पासहेबानें तहावर सही करून जेंकिन्स यास कागद पुरा करून दिला. मुद्दामच हा सर्व प्रकार आप्पासाहेबानें अत्यंत गुप्तपणें केला. नागपुरांतील सर्व जाणते लोक या तहाचे विरुद्ध असून इंग्रजांची फौज नागपुरांत येऊन दाखल होईपर्यंत आप्पासाहेबास आपल्या जिवाची सुद्धां धास्ती वाटत होती. असें कांहीं संकट आप्पासाहेबावर आल्यास प्रसंगीं आपण तुमचा बचाव करूं असें कांहीं कलम इंग्रजांकडून मुद्दाम तहांत दाखल करण्यांत आलें होतें. तह घडवून आणल्याबद्दल नागोपंडितास सालाची २५ हजार रु० तहायात नेमणूक रेसिडेंटानें करार करून दिली. ता. २५·६·१८१६ रोजीं ग० ज० नें या तहास मान्यता दिली; आणि ता. १३ जुलै रोजीं खास पत्र लिहून त्यानें त्याबद्दल आप्पासाहेबाचें अभिनंदन केलें. ठरल्याप्रमाणें कर्नल डोव्हटनची फौज ता. १० जून रोजीं नागपुरास येऊन दाखल झाली; आणि त्याच दिवशीं हा तह शहरांत जाहीर करण्यांत आला. इंग्रज फौज नागपुरांत आल्याबद्दल सर्व लोकांस अत्यंत वैषम्य वाटलें. मुख्यतः बाकाबाई व परसोजीची बायको काशीबाई वगैरे मंडळी व नारोपंडित वगैरे मुत्सद्दी आप्पासाहेबावर अत्यंत चिडून गेले. इंग्रजांस घरांत आणण्यापूर्वी त्यानें आपणांस एका शब्दानें सुद्धां विचारलें नाहीं, याचा त्यांस विशेष संताप आला. सिंदे, होळकर, बाजीराव वगैरे प्रमुख लोक मोठी जूट उभी करून इंग्रजांच्या चढाईपासून राज्य राखण्याची पराकाष्ठा करीत असतां, भोसल्यासारख्या प्रमुख व समृद्ध राज्याची आहुती आप्पासाहेबानें केवळ स्वहिताकरितां

इंग्रजांचे पायांवर अर्पण करावी, हा योगायोग ' विनाश काले विपरीत बुद्धि ' अशा प्रकारचाच सर्व राष्ट्रास वाटला, आणि खुद्द आप्पासाहेबास तर नागपुरांत राहणें सुद्धां इतकें धोक्याचें झालें, कीं त्यानें तैनाती फौजेच्या छावणींत तेलंगखेडीच्या बागेंत जाऊन ता. २७ जून रोजीं वास्तव्य केलें.

**४ परसोजीचा मृत्यु, आप्पासाहेबाची पदावर स्थापना**(फे.१८१७).- आप्पासाहेबाविरुद्ध आतां जबरदस्त कारस्थान सुरू झालें. खुद्द त्याच्याच पदरीं वाढलेला रामचंद्र वाघ नांवाचा त्याच्या फौजेचा अधिकारी होता तोच त्याच्या विरुद्ध उठला. रामचंद्र वाघ धाडसी, हुशार व खटपटी होता. स्वतः आप्पासाहेबही अत्यंत चंचल वृत्तीचा असून त्याला लवकरच कृतकर्माचा पश्चात्ताप वाटूं लागला. प्रथम आपल्या शिवाय कांहीं एक काम चालूं नये अशी व्यवस्था त्यास ठेवावयाची होती, परंतु परसोजी जिवंत असेपर्यंत त्याला फारशी हालचाल करतां आली नाहीं. तेव्हां परसोजीलाच नाहींसा करण्याचा घाट त्यानें रचिला. सादीक उल्लाखान नांवाचा भोसल्याच्या फौजेवर मुख्य सेनानायक होता, त्यास फौजेच्या खर्चास मुलूख तोडून दिलेला होता. त्यास कामावरून काढल्याशिवाय परसोजीस नाहींसा करणें शक्य नव्हतें. तह पुरा होतांच आपली फौज सुधारा असा तगादा रेसिडेंटानें दरबारास लाविला. ही सुधारणा सादीकउल्लाच्या मार्फत व्हावयाची, म्हणून तें काम आप्पासाहेबानें सादीकउल्लास सांगितलें, तें त्यानें लगोलग सुरू केलें नाहीं. तेव्हां सादीकउल्लास कैद करावें असें आप्पासाहेबानें मनांत आणलें, आणि त्यासाठीं रेसिडेंटाचें अनुमत विचारलें. रेसिडेंट या कामांत हात घालीना. तो म्हणाला, ' तुमचे तुम्ही पाहून घ्या. ' अशा स्थितींत जानेवारी १८१७ च्या अखेरीस आप्पासाहेब एकाएकीं नागपुर सोडून चांद्यास गेला. मागें नागपुरचे वाड्यांत ता० १ फेब्रुवारी रोजीं सकाळीं परसोजी भोसले बिच्छान्यांतच मरण पावलेला आढळला. पूर्वी तो विशेष आजारी असल्याचें कांहीं एक चिन्ह दिसलें नव्हतें. मृत्यु कसा झाला हें कळेना, तेव्हां जेंकिन्सनें खाजगी तपास केला. परंतु त्यांतही त्यास कांहीं विशेष कारण आढळून आलें नाहीं. आप्पासाहेबानेंच त्यास नोकरांकडून तोंडांत बोळा घालून ठार मारिलें, असें पुढें वर्ष सहा महिन्यांनीं आप्पासाहेब पदच्युत झाल्यावर निदर्शनास आलें. मृत्यूच्या दिवशीं रात्रीं प्रथम त्यास विड्यांतून विष देण्यांत आलें होतें. विडा कडू लागून तो त्यानें थुंकून टाकिला, आणि त्याचा परिणाम झाला नाहीं. तेव्हां मग लगेच दुसरा तोंड-

पांडववाडीचे धोंडभट
आचवल
ऊ० रहाळकर
कोंडभट मुधंभट
मनभट

दाबीचा प्रयोग झाला, अशी हकीकत बाहेर आली. हें एकंदर कृत्य रामचंद्र वाघ व मनभट उपाध्ये या दोघांनीं केलें. हा मनभट भोसल्यांचा कुलोपाध्या, त्यांच्याच पदरीं वाढलेला कोंकणस्थ ब्राह्मण, उपनांव आचवल ऊर्फ रहाळकर, गोत्र भारद्वाज, पांडववाडीचा राहणारा. मनभटाचा आजा प्रथम भास्करराव कोल्हटकर याजबरोबर नागपुरास आला, तेव्हां त्यास तेथील उपाध्येपण मिळालें. मनभट शूर, बाणेदार व आप्पासाहेबाचा मुख्य साह्यकर्ता होता.

या एकदंर प्रकरणासंबंधानें खालील उल्लेख बखरींत आहे. "सेनासाहेबांचा लेकावळा धर्माजी भोसले व आप्पासाहेब यांचा कलह उभा राहिला. मातोश्री बाकाबाई व धर्माजी यांचे चित्तांत कीं परसोजी शरीरप्रकृतीचे योगानें भ्रमिष्ट होते, तेव्हां दौलतीचा बंदोबस्त करून मातोश्रींचे आज्ञेनें कारभार चालवावा, या सल्ल्यांत नारायण यशवंत होते. परंतु आप्पासाहेब बोलतांना बोलत होते कीं मालक बाळासाहेब आहेत, मात्र कारभार आम्हीं करावा. राज्यांत मुत्सद्दी नारायण यशवंत, यशवंतराव रामचंद्र, गुजाबादादा गुजर, नबाब सादीकअलीखान व रावजी सखाराम व मनु भालदार यांजला गंगाजल तुलसी इमान प्रमाण देऊन आप्पासाहेबांनीं बोलण्यांत आणिलें, कीं कारभार मजकडेच द्यावा. मी असतां धर्माजीनें कारभार करावा हें चांगलें नाहीं. मी एकनिष्ठेनें बाबासाहेबांची सेवाचाकरी करीन, अंतर करणार नाहीं. याविषयीं शपथा वाहून सर्वांस आपल्यांत मिळविलें; आणि धर्माजी भोसले याजला दगा करून कैद केलें; आणि बाकाबाईसाहेबांची सफाई करून बाबासाहेबांस गादीवर बसविलें. चैत्र मासीं नजरा झाल्या. आप्पासाहेब कारभारी झाल्यानंतर जुन्या माणसांवर इतराजी करून कोणास कैद करावें, कोणास दोष ठेवून मारावें, असे उपद्रव करूं लागले. बाकाबाईला नवे हवेलींत कैद ठेवून बंदोबस्त केला. आपण तेलंगखेडीस जाऊन राहिले. गुजाबादादा गुजर याजवर रोष केला. नारायण यशवंत व सखाराम महिपत यांजला कैद केलें. नाना गुजर यांची स्त्री बनूबाई हिला सक्त पाहऱ्यांत ठेविलें. मनू भालदार याजला मारहाण करून चंद्रपुरास पाठवलें. ते वेळेस आप्पासाहेबाजवळ कारभारी मुखत्यार नागो त्रिंबक व मुसाहेब रामचंद्र वाघ याचे मुतालीक नारायण सखाराम व मनभट, यांचे हातें कारभार होऊं लागला. तशांत आप्पासाहेब सरंजाम पाहावयाकरतां चंद्रपुरची जहागीर त्यांची वडिलार्जित होती, तेथें गेले. पाठीमागें परसोजीपाशीं

मनभट व मनु भालदार बंदोबस्तास ठेविले. त्यांतून अपाय होऊन माघ शुद्ध पौर्णिमेस (२·२·१८१७) बाबासाहेब मृत्यु पावले. बायको काशीबाई सती गेली. जेंकिन्सबहादुरांनीं त्याबद्दल गुंडो लक्ष्मण याजला पाठवून तपास केला. सेनासाहेबाचीं वस्त्रें आपणास आणण्याकरतां पुण्यास बाजीरावाकडे आप्पासाहेबानें नागोपंताचे विद्यमानें खंडो गोविंद याजला पाठविलें."

परसोजी मेल्याबरोबर आप्पासाहेब चंद्रपुराहून परत येऊन सेनासाहेब पदावर अधिष्ठित झाला. लगेच मुहूर्त नसल्यामुळें समारंभ पुढें स. १८१७ एप्रिल ता. २१ रोजीं झाला. परसोजीच्या खुनाचा वहीम आपणावर येऊं नये म्हणून कांहीं काळपर्यंत आप्पासाहेबानें अत्यंत शिताफीची वर्तणूक ठेविली; म्हणजे पूर्वी ज्यांच्याशीं त्याचा विरोध होता त्यांच्यावर मेहरबानी दाखविली. नारायण पंडित रेसिडेंटाकडे बोलणें करण्यास जात असे त्याला त्यानें कामावरून काढिलें. कारण तैनाती फौजेच्या इंग्रजांच्या तहांत व्यत्यय आणूं नये असा आग्रह हा गृहस्थ आप्पासाहेबास सारखा करीत होता. सेनासाहेबाचें पद मिळेपर्यंत आप्पासाहेबास इंग्रजांची जरूर होती. परसोजीचा काटा दूर होऊन नागपुरचीं राजसूत्रें संपूर्ण आप्पासाहेबाचे हातीं येतांच, इंग्रजांविरुद्ध बाहेर जी नवीन जूट तयार होत होती तिच्यांत सामील होण्याचा निश्चय आप्पासाहेबानें आपल्या मनांत ठरविला. परंतु सर्व जुळवाजुळव होई पर्यंत तो बाहेर प्रगट करणें प्रथमच इष्ट नव्हतें, म्हणून सुमारें सहा महिने पावेतों ( सन १८१७ मे–नोव्हेंबर ) त्यानें दुटप्पी वर्तन चालविलें. निदान रेसिडेंटास त्यानें आपला थांग लागूं दिला नाहीं. बाहेरून अत्यंत मित्रभावाची बतावणी करून अंतस्थ रीतीनें ठिकठिकाणची खबर ठेवून आपले पुढील घाट त्यानें थोडे थोडे जुळवीत आणिले. परंतु हें दुटप्पी वर्तन फार दिवस गुप्त राहूं शकलें नाहीं. त्यांतून डोळ्यांत तेल घालून जागत बसलेल्या इंग्रजांस तो किती दिवस फसवूं शकणार ! त्याच्या रोजच्या हालचालीच्या बातम्या त्याच्याच हस्तकांकडून जेंकिन्स यास कळत होत्या, म्हणून त्याच्या दुटप्पी वर्तनाचा परिणाम अंतीं त्यासच अतिशय घातक झाला. प्रथमतः त्यानें ठिकठिकाणच्या फौजा व सरदार आपल्या तर्फेचे केले; आणि इंग्रजांशीं अनुरक्त असणाऱ्या एकूण एक इसमांचा कांहींना कांहीं कारणानें उच्छेद आरंभिला. बाकाबाई, गुजाबादादा गुजर वगैरे वजनदार मंडळींना त्यानें भिळवून घेतलें नाहीं ही त्याची एक चूक म्हणतां येईल. या मंडळींना आप्पासाहेबाची कृत्रिम वागणूक बिलकूल पसंत पडली नाहीं. इंग्रजांची तैनाती फौज घरांत आणिली व परसोजीला नाहींसे केलें, याबद्दल आप्पासाहेबावर सर्वांचा अतिशय रोष झाला.

परसोजीस नांवाचें पद देऊन आप्पासाहेबानें सर्वांच्या विचारानें कारभार केला नाहीं, तेव्हां हा कोणे वेळेस काय घात करील यासंबंधानें लोकांस अत्यंत धास्ती पडली. गुजाबादादावर आप्पासाहेबानें अनेक प्रकरणांत जबरदस्ती चालविली. "गुजाबांनीं आपलें जागां विचार केला कीं आप्पासाहेबानें झाडून फौज आपली केली. सेनासाहेबाचें अन्न सर्वांनीं आजवर खाल्लें असतां क्षुल्लक माणसांचें ऐकून जेंकिन्सशीं प्रेम जोडिला. इंग्रजांचीं पल्टणें तेलंगखेडीवर छावणी करून राहिलीं. रेसिडेंट-साहेबांचा बंधु मेजर जेंकिन्स यास आपले खाजगींत दोन पल्टणानिशीं चाकरीस ठेविलें. हुशंगाबादचा किल्ला अंग्रजांस कोठी वगैरे ठेवण्यास दिला. दिवसेंदिवस पल्टणांचे पगार वेळेवर पोंचविण्यासाठीं ऐवज देण्याची अडचण पडूं लागली. सिंद्याकडील राजकारण व पुण्याकडील साधन अशा गोष्टी आप्पासाहेबास रुचत चालल्या. पुण्यास पंतप्रधानाकडे संधान जोडण्यास खंडोगोविंद यास पाठविलें होतें ते परत येऊन आप्पासाहेबास भेटले. सेनासाहेब पदाचीं वस्त्रें पुण्याहून रवाना झालीं. इंग्रजांविरुद्ध जमाव करावा असा लेंकुरपणाचा विचार अंगीं. गंगाधर शास्त्री यांचा प्रकार तसा झाला; ती आळ त्रिंबकजी डेंगळ्यावर इंग्रजांनीं आणिली. त्रिंबकजीस धरून नेऊन जंजिऱ्यांत ठेविलें. त्याजला ईश्वरानें मार्ग देऊन सुटला. त्यानें जमाव केला. पंतप्रधानाचीं संधानें सिंदे होळकर यांजकडेस. त्या त्रिवर्गांचा एक विचार. यांत आपण आपले सरसबाजीस अंग्रेजांशीं दोस्ती केली असतां, आतांच त्यांजकडील इतक्या अडचणी दिसूं लागल्या, तेव्हां पुढें फायदा काय होणार ? अंग्रेज ज्या घरांत शिरले त्याचे घरचा परिणाम कोणाचा चांगला झाला ! लखनौ हैदराबाद वगैरेंचा दृष्टांत मनांत आणून रामचंद्र वाघ वगैरे बोलले, बाजीरावाशीं आपण संधान करावें म्हणजे सर्व गांठोडें एक जालें. ऐसे प्रकार मनांत येऊन आपासाहेबांची बुद्धि फिरली."

आप्पासाहेबाच्या कपट-वृत्तीच्या बातम्या रेसिडेंट जेंकिन्स यास पोंचून त्यानें त्याज-बद्दल आप्पासाहेबास जाब विचारला असतां कसें तरी परिमार्जन करून तो संशय-निवृत्ति करूं लागला. गुजाबादादास आप्पासाहेबाकडून अपाय होईल अशी भीति पडून तो जेंकिन्ससाहेबाकडे गेला. साहेबानें त्यास डेरे वगैरे देऊन आपणाजवळ ठेविलें. गुजाबादादाची व साहेबाची भेट घडून परस्परें बोलून दादांची रवानगी प्रया-गास करून दिली ( एप्रिल १८१७ ). तेथून तो पुढें नागपुरचें वातावरण निवळ-ल्यावर सन १८१८ च्या आश्विनांत परत नागपुरास आला. सिदीकअलीखान साहे-

बांस मिळून आहे असें कळल्यावरून त्यास कैद केलें. पैशाची अडचण भागविण्या-साठीं अनेकांवर पट्टी बसवून मनभटानें तगादे करून पैसे घेतले.

सिंदे होळकर पेशवे यांचे वकील नागपुरांत होते, त्यांचीं कारस्थानें आप्पासाहे-बाशीं इंग्रजां विरुद्ध उघड उघड चालू झालीं. नागपुरची गादी मिळेपर्यंत जो इंग्र-जांचा आश्रय आप्पासाहेबास हवा होता त्याची आतां त्यास जरूर राहिली नाहीं. आपलें स्वातंत्र्य गमावून इंग्रजांचा आश्रय पतकरणारा हा पहिला प्रमुख सरदार होय अशी त्याची हेटाळणी होऊन, त्या तहाची पूर्ण बजावणी अमलांत आली नाहीं, तोंच तो तह झुगारून देऊन आपला डाग धुऊन काढावा अशी त्याची भावना झाली; आणि तुम्ही पुढाकार घ्याल तर इतर सरदार तुम्हांस लगोलग सामील होतील अशी त्याची वकिलांनीं समजूत घातली. स. १८१७ च्या एप्रिल-मे महिन्यांत बाजीरावानें इंग्रजांशीं जो अतिरेकाचा बेबनाव पुण्यास सुरू केला त्याचा मुख्य आधार हा आपासाहेब होता असें मागाहून आढळून आलें.

**५ आपासाहेबाचा इंग्रजांवर उठाव, सिताबर्डीची लढाई.—** इकडे पुण्यास सन १८१७ च्या नोव्हेंबरांत बाजीरावानें इंग्रजांवर उघड युद्ध पुकारलें, त्याचा परिणाम ताबडतोब नागपुरासही दिसूं लागला. जून महिन्यांत इंग्रजांनीं नवीन तहानें बाजीरावाचे हातपाय बांधले तेव्हांपासून त्यानें नागपुरास आप्पा-साहेबाकडे युद्धाची सारखी उठावणी चालविली. मनांतून जरी बाजीरावाचें साह्य कर-ण्याची आप्पासाहेबास आतुरता होती, तरी बाहेरून त्यानें रेसिडेंटाशीं मित्रत्वाचा देखावा चालूच ठेविला होता. आक्टोबर पावेतों विरोधी हालचालीचें कांहीं एक चिन्ह रेसिडेंटास दिसलें नाहीं, उलट त्या संबंधानें रेसिडेंटानें वरिष्ठांकडे आप्पासाहेबाची तारीफच लिहून पाठविली. परंतु नोव्हेंबरच्या आरंभीं बाजीरावानें पुण्यास इंग्रजांवर उठावा केल्याची बातमी नागपुरास येतांच आप्पासाहेबानेंही तोच मार्ग स्वीकारण्याचा निश्चय केला. ता. १५ नोव्हेंबरच्या सुमारास रेसिडेंटास आप्पासाहेबाबद्दल चांगलाच संशय आला. आप्पासाहेबानें फौजेची तयारी जोरानें चालविली. मात्र कशा पद्धतीनें आपण चढाई सुरू करावी या संबंधानें त्याचें मन घुटमळूं लागलें. जवळची मंडळी आपआपल्या तऱ्हेनें त्यास पढवूं लागली. बाजीरावाप्रमाणें आपणही एकदम युद्ध पुकारावें असा एका पक्षाचा सल्ला होता, तर इंग्रजांशीं बिघाड करूं नये असें शिकविणारा दुसरा पक्षही होताच. या दोघांच्या मध्यें आप्पासाहेबाचें मन पुष्कळ वेळ अनिश्चित राहिलें, तरी रेसिडेंटाशीं चाललेल्या व्यवहारांत त्यानें बाहेरून यत्किंचित् बिघाड दाखविला

नाहीं. उलट खडकीच्या लढाईची बातमी नागपुरास पोंचतांच रेसिडेंटाच्या मुनशीला आप्पासाहेबानें आपल्या भेटीस बोलावून त्याजवळ बाजीरावाच्या या मूर्खपणावर पुष्कळच टीका केली. पुढें ता. २४·११ रोजीं रामचंद्र वाघा मार्फत त्यानें रेसिडेंटास कळविलें, कीं बाजीरावाकडून आप्पासाहेबाचे नांवानें सेनासुभ्याचीं वस्त्रें आलीं आहेत, तीं स्वीकारण्याचा समारंभ व्हावयाचा आहे, त्या समयीं रेसिडेंटानें हजर राहवें. त्यावर रेसिडेंटानें कळविलें, कीं ' बाजीराव आमचा शत्रु आहे, त्याजकडून तुम्हीं हीं वस्त्रें घेणें वाजवी नाहीं; आणि मी त्या समारंभास येणार नाहीं. ' तथापि ता. २७ नोव्हेंबर रोजीं आप्पासाहेबानें वस्त्रांचा समारंभ ठरविला. त्या समारंभाचे निमित्तानें जी फौज जमली तिचा नूर उघड उघड इंग्रजां-विरुद्ध दिसत होता. त्यावरून आपल्या बचावासाठीं जेंकिन्सनें बाहेरची फौज बोलावली. ता. २६ रोजीं चहूं दिशांस आप्पासाहेबाच्या फौजांचा संचार दिसूं लागला. रेसिडेन्सीवर मार करतां येईल अशा रीतीनें तोफा ठेवण्यांत आल्या. नागपुरच्या पश्चिमेस सीताबर्डी नावांची तीनशें यार्ड लांबीची उंच टेकडीची रांग असून तिच्या उत्तरभागीं खालीं मैदानांत रेसिडेंटाचा बंगला होता. या टेकडीवर रेसिडेंटानें आपल्या फौजेची व्यवस्था जमविली. ता. २६ नोव्हेंबर रोजीं संध्याकाळीं या टेकडीवर फौजेचे पहारे लागत असतां त्यांजवर आप्पासाहेबाच्या आरबांनीं बंदुकांचा व तोफांचा मारा चालू केला. हा मारा मध्यरात्री पावेतों सारखा चालूच होता, त्यामुळें इंग्रजांचे पुष्कळ लोक मरून कांहीं अंमलदारही जायां झाले. दुसरे दिवशीं आतां काय प्रसंग होतो या संबंधानें इंग्रजांस मोठी धास्ती उत्पन्न झाली. टेकडीवर साधा हल्ला आला तरी मराठी फौजेच्या नुसत्या संख्येनेंच इंग्रजांचा चुराडा झाला असता. तथापि असा हल्ला आल्यास बचावाची सिद्धता त्यांनीं लगोलग केली. ता. २७ रोजीं सकाळीं पुनः जोराचा मारा इंग्रजांवर चालू झाला. सकाळीं ७ वाजतां इंग्रजांच्या दारूच्या कोठ्यास आग लागून तो उडाल्यामुळें नुकसानांत आणखी भर पडली. आप्पासाहेबाचे शूर आरब टेकडी हस्तगत करण्यास धावून आले. इंग्रजांस तोफा काढून घेण्यास सुद्धां अवधी मिळाला नाहीं. इंग्रजांच्या तोफा हस्तगत करून त्या आरबांनीं चालविल्या. इंग्रजांपाशीं थोडेसे घोडेस्वार होते ते घेऊन कॅप्टिन फिट्जरल्ड मैदानांतील आरबांच्या अंगावर घुसला. त्याबरोबर आरब कचरून मागें सरले, आणि त्यांजवर ह्या स्वारांनीं घोड्यावरून उतरून तोफा चालविल्या. कांहीं वळ असा नेटाचा संग्राम झाल्यावर आप्पासाहेबाचे लोक चहूं बाजूंनीं कचरून पळून

जाऊं लागले. १८ तास पावेतों इंग्रजांनीं मोठ्या शिकस्तीनें आपला बचाव करून मराठ्यांस मागें हटविलें. या एकंदर संग्रामांत इंग्रजांचें सगळें मिळून चवदाशें आणि भोसल्यांचें दहा हजार पायदळ व दहा हजार स्वार इतकें सैन्य होतें. पैकीं इंग्रजांचे ३३३ मेले आणि आप्पासाहेबाचा नाश तर पुष्कळच झाला. ५ नोव्हेंबरची पुण्याची खडकीची लढाई आणि ता. २७ नोव्हेंबरची नागपुरास झालेली सीताबर्डीची लढाई दोन्ही इंग्रजांच्या चिवट धैर्याचीं उदाहरणें आहेत. आपला निभाव लागत नाहीं असें आप्पासाहेबास दिसतांच ता. २७ रोजीं सायंकाळीं त्यानें आपले वकील रेसिडेंटाकडे पाठवून कळविलें, कीं लढाईचा प्रकार माझ्या संमतीनें झाला नसून केवळ फौजेकडून झाला. बाजीराव व आप्पासाहेब यांनीं बाहेरून गोडी दाखवून आंतून अत्यंत विश्वासघात केल्याबद्दल इंग्रज लेखक त्यांस दूषण देतात, परंतु इंग्रजांचा जाच सर्वच दौलतदारांस दुःसह झाला होता ही गोष्ट लक्षांत घेतली म्हणजे त्यांनीं आपला प्रयत्न करून पाहिला यांत विश्वासघात तो काय ! इंग्रजांनीं तरी स्नेह दाखवूनच त्यांचे हात पाय बांधले कीं नाहींत !

नागपुरच्या युद्धाची ही वार्ता हां हां म्हणतां ठिकठिकाणच्या इंग्रजांस कळून ते रेसिडेंटाच्या मदतीस चहूंकडून धावून आले. कर्नल गहन नर्मदेवर होता तो ता. २९ नोव्हेंबरास नागपुरास दाखल झाला. मेजर पिट्मन उमरावतीस होता तो ५ डिसेंबरला आला; आणि जनरल डोव्हटन जाफराबादला होता तो तेथें ता. १२ डिसेंबरला येऊन दाखल झाला. लढाईच्या दुसरे दिवशीं आप्पासाहेबानें जेव्हां रेसिडेंटास कळविलें, कीं माझ्या हुकमांत फौज नाहीं व माझ्या हुकमानें हें कृत्य झालेलें नाहीं, तेव्हां रेसिडेंटानें त्यास कळविलें, ' तुम्हीं म्हणतां हा प्रकार खरा असेल तर तुम्ही एकदम आमच्या आश्रयास रेसिडेन्सींत येऊन रहा. आपल्या फौजेपासून दूर राहणेंच तुम्हांस जरूर आहे. बाहेरून मदत येईपर्यंत कसा तरी आपण निभाव करावा असाही जेंकिन्सचा यांत उद्देश होता. पुरेशा फौजा दाखल होतांच त्यानें नागपुरचा बंदोबस्त ताबडतोब करण्याचें ठरविलें. एकदां आप्पासाहेबाची चांगली खोड मोडली म्हणजे दुसऱ्या मराठे सरदारांना पक्की दहशत बसेल अशी योजना त्यानें ठरविली. उत्तरेकडून ग० ज० नें जनरल हार्डिमन यास नागपुरचे मदतीस पाठविलें. त्यानें जबलपुर प्रांत व नर्मदेच्या उगमाजवळील भोसल्यांचा प्रांत हस्तगत केला. ता. १५ डिसेंबर रोजीं जेंकिन्सनें आप्पासाहेबास पत्र लिहून कळविलें, कीं ' तुमची आमची दोस्ती असतां एकदम इंग्रजांशीं तुम्ही युद्ध सुरू केल्यामुळें, आतां

तुम्हांस इंग्रजांनीं मदत करण्याचें कांहीं एक कारण उरलें नाहीं. तुमच्या राज्याची व्यवस्था इंग्रज वाटेल तशी करतील. तुम्ही आपला तोफखाना मात्र लगेच इंग्रजांच्या ताब्यांत द्यावा; आरबांचीं वगैरे नवीन पलटणें तयार केलीं आहेत त्यांस रजा द्यावी; नागपुर शहर व राजवाडा आमचे कब्जांत द्यावा; आणि खुद्द तुम्ही उद्यां सकाळीं ४ वाजण्याचे आंत रेसिडेन्सींत येऊन आमचे स्वाधीन व्हावें. असें न केल्यास इंग्रज फौजा तुमच्यावर चालून जातील, त्यामुळें जे परिणाम होतील ते तुम्हांस भोगावे लागतील. परंतु या गोष्टी तुम्हीं प्रथमच कबूल केल्यास फौजेच्या खर्चापुरता कांहीं मुलूख घेऊन बाकी पूर्वीप्रमाणें राज्य तुमच्याकडे चालवूं. या वाटाघाटींत आप्पासाहेबानें नारायण पंडित यास ता. १५ डिसेंबर रोजीं अनेकवार जेंकिन्सकडे पाठवून विचारासाठीं थोडा अवकाश द्या अशी विनंति केली. त्यावरून फक्त आणखी तीन तास म्हणजे दुसरे दिवशीं सकाळीं ७ वाजे पावेतों जेंकिन्सनें फुरसत दिली. ता. १६ रोजीं सकाळीं ६ वाजतां नारायण पंडितानें येऊन जेंकिन्सला कळविलें, आप्पासाहेबास आरब फौज इकडे येऊं देत नाहींत. तोफखाना त्यांचे ताब्यांत आहे, तो हस्तगत करून त्यांस रजा देण्यास आणखी तीन दिवसांचा तरी अवधि पाहिजे. त्यावर जेंकिन्सनें कळविलें, प्रथम आप्पासाहेबानें ९ वाजण्यापूर्वीं आमचेकडे येऊन दाखल व्हावें, म्हणजे इतर बाबतीसाठीं अवकाश देण्यांत येईल. तरी आप्पासाहेब येऊन दाखल झाला नाहीं. तेव्हां सेनापति डोव्हटननें लगेच भोसल्यांच्या फौजेवर चाल केली. त्याबरोबर आप्पासाहेब घाबरून जाऊन नागोपंत व रामचंद्र वाघ यांस बरोबर घेऊन दहा वाजतां रेसिडेन्सींत दाखल झाला. लगेच त्यांच्याशीं पुढील गोष्टींची वाटाघाट सुरू झाली. तोफा आहेत तेथेंच ठेवून फौज मात्र दुपारीं १२ वाजण्याच्या आंत दुसरीकडे न्यावी असें ठरून त्यासाठीं आप्पासाहेबानें रामचंद्र वाघ यास शहरांत पाठविलें. तो १२ वाजतां परत आला; आणि कर्नल डोव्हटन यास घेऊन तोफा त्यांचे हवालीं करण्यासाठीं परत गेला. तेव्हां ३६ तोफा त्यास मिळाल्या. पण दुसऱ्या ठिकाणच्या तोफा हस्तगत होण्यापूर्वीं त्यांनीं इंग्रजांवर थोडा बहुत मारा केला. त्या प्रसंगीं उभयतांमध्यें चकमक उडून दीड वाजतां आणखी ७५ तोफा इंग्रजांच्या हस्तगत झाल्या.

आप्पासाहेबाला इंग्रजांविरुद्ध उद्युक्त करणारे मनभट उपाध्ये व सुभेदार गणपतराव परांजपे हे होते. आप्पासाहेब रेसिडेन्सीत गेल्याबरोबर मनभाटानें आरबांना घेऊन राजवाडा हस्तगत केला. राजवाड्याला बाहेर मोठा तट आहे. या तटावर

इंग्रजांनीं तोफांचा मारा करून मुख्य दरवाजा पाडला. त्या कामीं इंग्रजांचे पुष्कळ लोक जायां झाले, आणि ता. ३०डिसेंबर रोजीं राजवाडा व मनभट इंग्रजांचे हस्तगत झाले, तेव्हां राजवाड्यावर इंग्रजांनीं आपलें निशाण लाविलें; आणि आप्पासाहेबाचें पुढें काय करावयाचें याचा विचार जेंकिन्सनें चालविला. नागपुरची फौज तर सगळी संपलीच होती. परंतु राज्यविस्तार मोठा असल्यामुळें पुनः इंग्रजांवर चढाई करण्याचें सामर्थ्य आप्पासाहेबास राहूं नये म्हणून तेथची लष्करी सत्ता इंग्रजांनीं आपल्या हातांत घेतली; सर्व किल्लयांवर त्यांनीं आपल्या फौजा ठेवून दिल्या; आणि २४ लाख उत्पन्नाचा मुलूख फौजेच्या खर्चाकरितां ताब्यांत घेऊन सिताबर्डीची टेकडी तटबंदीकरितां आपल्या कबजांत घेतली. याप्रमाणें ठराव करून आप्पासाहेबास गादीवर बसविण्याचें जेकिन्सनें ठरविलें. इतक्यांत ग० ज० चा हुकूम आला कीं आप्पासाहेबास गादीवर ठेवूं नये. तथापि जेंकिन्सनें पुनः सर्व हकीकत विस्तारानें लिहून ग० ज० स कळवितांच त्याची मंजुरी आली; आणि नवीन तहानें इंग्रजांच्या मागण्या कबूल करून आप्पा-साहेबानें ता. ९·१·१८१८ रोजीं पुनः आपल्या वाड्यांत प्रवेश केला. आप्पासाहेब बाणेदार पुरुष होता. बाजीरावानें पुण्यास मराठमंडळाचा पुढाकार घेतला असता तर आप्पासाहेबाकडून त्यास चांगलीच मदत झाली असती. परंतु बुडत्याचा पाय खोलांत या न्यायानें सर्व देशभर बजबजपुरी माजली, आणि भरपूर लष्करी तयारीनें इंग्रजांनीं जेव्हां सगळा देश जखडून टाकला, तेव्हां कितीही अक्कलवान् पुरुष असता तरी त्याचा पुनः सर्व जम बसणें अशक्य होऊन गेलें असतें. ता. १६ डिसेंबर रोजीं आप्पासाहेवास अडचणीच्या प्रसंगीं रेसिडेंडाकडे आणण्याचें अवघड काम मुख्यतः नारायण पंडितानें केलें. सबब त्यासच इंग्रजांनीं आप्पासाहेबाचा पेशकर म्हणून नेमून दिलें; आणि नांवाची दिवाणगिरी नागोपंताकडे ठेवली.

याप्रमाणें सर्व प्रयत्न निष्फळ होऊन पिंजऱ्यांतल्या राघूसारखी स्थिति आपल्या कपाळीं येऊन बसली, याबद्दल त्या मानी आप्पासाहेबास अत्यंत दुःख व खंती वाटूं लागली. नारायण पंडितानें आपणांस फसविलें असें त्याच्या मनानें घेतलें, आणि पुनः एकदां स्वतःच्या अकलेनें नशीबाची परीक्षा पाहण्याचा विचार त्यानें योजिला. सर्व किल्ले इंग्रजांचे ताब्यांत द्यावयाचें कलम तहांत होतें. मंडला, चोरागड, धामुनी, चांदा वगैरे ठिकाणच्या किल्लेदारांस आप्पासाहेबानें आंतून निरोप पाठविले, कीं 'शक्य त्या तऱ्हेनें इंग्रजांशीं लढून राज्याचा बचाव करा.' 'जैसा देखो वैसा करो' असें एक सांकेतिक वाक्य आप्पासाहेबानें सर्वांस कळविलें होतें. गणपतराव सुभेदार कमी झालेली फौज सावरून

बाहेर पडला, तो बाजीरावाचे मदतीस निघून गेला. नारो सखाराम नांवाचा आपल्या खास भरंवशाचा इसम आप्पासाहेबानें बाहेर रवाना करून त्याचे मार्फत ठिकाठकाणीं तोंडीं उठावा त्यानें सुरू केला. दक्षिणेंत या वेळीं बाजीराव पळून नागपुराकडे येण्याच्या बेतांत होता, त्यास जाऊन मिळण्याची खटखट आप्पासाहेबानें चालविली. परंतु बाहेरून त्यानें उपरतीचा एवढा कांहीं देखावा केला, कीं कैक दिवसपर्यंत तो स्वतः दुःखितासारखा एका लहानशा खोलींत पडून होता. नारायण पंडितावर मात्र तो अतिशय चिडून गेला. गुप्तपणें चाललेल्या तजवीजींत त्यानें नारायण पंडितास कधीं घेतलें नाहीं. त्या तजविजी नारोपंत व रामचंद्र वाघ यांचे मार्फत आप्पासाहेबानें चालविल्या. जडजवाहीर चांद्यास युद्धापूर्वींच रवाना केलेलें होतें, तें त्यानें परत न मागवितां गुप्तपणें बाहेर ठेवून दिलें. कांहीं तरी कारस्थान आप्पासाहेबाकडे शिजत आहे असा वास रेसिडेंटास आला, आणि त्यासंबंधानें ता० ६·३·१८१८ रोजीं ग० ज० ला लिहून पुढील कर्तव्याचे हुकूम त्यानें मागविले. आप्पासाहेबानें आपले दोन हस्तक कांहीं गुप्त निरोप सांगून बाजीरावाकडे रवाना केले. जेंकिन्सनें ता० १४·३·१८१८ रोजीं त्यांना पकडलें. एकाचें नांव आत्माराम होतें, त्याजवळ खुद्द आप्पासाहेबाच्या हातची एक चिठ्ठी सांपडली; पकडल्याबरोबर ती चिठ्ठी त्यानें फाडून नाहींशीं केली. त्याच दिवशीं दुसरी बातमी आली, कीं भोसल्यांचा सरदार गणपतराव सुभेदार बाजीरावास घेऊन नागपुरावर येत आहे. आप्पासाबेब गुप्तपणें पळून जाऊन त्यास चांदा येथें सामील होणार होता, म्हणून पळून जाण्यापूर्वीच अचानकपणें त्यास अटकेंत ठेवण्याचा निश्चय रेसिडेंटानें केला.

६ **आपासाहेबाचा वनवास, अखेर व योग्यता** ( ३·५·१८१८–१५०७–१८४० ).—मयत रघूजीची बायको बाकाबाई हिचें नांव मागें आलेंच आहे. आप्पासाहेब तिला दृष्टीसमोर नको होता. इंग्रजांना निष्कारण दुखवून यानें राज्य बुडविलें अशी तिची समजूत झाली, ही गोष्ट रेसिडेंट जाणून होता. ता. १४ रोजीं रात्रीं त्यानें बाकाबाईस सांगून पाठविलें कीं उद्यां आम्ही आप्पासाहेबास कैद करणार. ता. १५ मार्च रोजीं सकाळींच त्यानें आप्पासाहेबास लिहून कळविलें, कीं तुमच्या वागणुकीचा आम्हांस संशय आलेला आहे त्याचें निराकरण होई पर्यंत तुम्हीं ताबडतोब निघून आमचे जवळ रेसिडेन्सींत येऊन राहवें, यत्किंचित् सबब ऐकिली जाणार नाहीं. पत्र घेऊन जाणाऱ्या जासुदाबरोबर फौजेची तुकडी पाठविण्यांत आली. त्यांनीं आप्पासाहेब, नागोपंत पंडित व रामचंद्र वाघ यांस

ताबडतोब पकडून रेसिडेन्सींत आणिलें. तपास करितां आप्पासाहेबावर बरीच तोहमत लागू झाली. त्यांत मुख्यतः त्यानें आपण होऊन परसोजीचा खून करविला हें सिद्ध झालें. तेव्हां या संबंधांत लिहून त्यानें ग० ज० कडून हुकून मागविले. बाजीराव नागपुरास आला तर आप्पासाहेब त्यास सामील होऊन भलताच प्रसंग ओढवेल तो बंद व्हावा, म्हणून आप्पासाहेबास रेसिडेन्सींत ठेवणें सुद्धां जेंकिन्स यास धोक्याचें वाटलें; आणि ग०ज०चा हुकूम आणून त्यास अलाहाबादेस ठेवण्याचें ठरविलें. ता. ३·५·१८१८ रोजीं आप्पासाहेब व त्याचे दुसरे जोडीदार यांस लष्करी बंदोबस्त देऊन नागपुराहून अलाहाबाद येथें पाठविण्यांत आलें. बरोबर त्याचे लहान मोठे खास शंभर नोकर होते. अलाहाबादच्या किल्ल्यांत मोगल बादशहाचा जुना वाडा होता ती जागा आप्पासाहेबाचे राहण्यास मुक्रर करण्यांत आली. जबलपुरच्या अलीकडे पंचवीस मैलांवर रायचूर गांवीं ता. १२ मे रोजीं या मंडळींचा तंबूंत मुक्काम झाला. आप्पासाहेबास ही कैद अत्यंत जाचक वाटली यांत नवल नाहीं. प्रत्यक्ष शिवाजी जर बादशहाच्या कैदेंतून पळाला तर आप्पासाहेबास सुटका करून कां घेतां येऊं नये! बरोबर शिपायांची तुकडी होती त्यांस आप्पासाहेबानें वश करून घेतलें. ता. १३ मे रोजीं पहांटे दोन वाजतां पहाऱ्यावरील शिपायानें दुसऱ्या एका शिपायाचे संपूर्ण कपडे तंबूंत आणून आप्पासाहेबास दिले. ते घालून पहारेकऱ्याच्या वेशानें बाहेर पडून मुक्कामावर जाण्याच्या निमित्तानें तो चालूं लागला आणि टप्याचे घोडे ठेवलेले होते त्यावरून फरारी झाला. बरोबर त्याचे दोन खास नोकर होते. फौजेच्या तुकडींतील आणखी सहा शिपाई त्याच वेळीं नोकरी सोडून गेले. आप्पासाहेब सुटून गेला, तेव्हां त्याच्या तंबूंतील व्यवस्था इतकी बेमालूम ठेवण्यांत आली, कीं रात्रीं पाय दाबण्यास राहणारे दोन नोकर बिच्छान्याजवळ आपलें काम करीत बसलेले होते. पहाटे चार वाजतां पाहरा बदलला. पाहऱ्याचा अंमलदार हिंदी होता त्यानें हे नोकर पाय दाबीत बसलेले पाहून आणि आप्पासाहेब निजला आहे असें समजून जास्त तपास केला नाहीं. दिवस उगवल्यावर खरी बातमी बाहेर कळली, तेव्हां चहूंकडे शोधासाठीं फौजा रवाना करण्यांत आल्या. आप्पासाहेब गोंडांचे मुलखांत पळून गेला. छिंदवाड्याच्या उत्तरेस व नर्मदेच्या दक्षिणेस जिल्हा नेमाडांत महादेवाचे डोंगर* आहेत तेथील चीनशहा नांवाच्या गोंड राजानें त्यास आश्रय दिला. पावसाळ्याचे अखेरीस आपासाहेबानें कांहीं लोक नोकरीस ठेविले; आणि तो मुलखांत बंडाळी करीत हिंडूं लागला.

---

* पंचमडी हें हवेचें ठिकाण याच डोंगरांत आहे.

आप्पासाहेबास जो कोणी धरून देईल त्यास एक लाख रुपयांचें रोख बक्षीस व दहा हजार रुपयांची इनाम जमीन देण्यांत येईल, असा जाहीरनामा काढण्यांत आला. त्याचा उपयोग होईना, म्हणून बक्षिसाची रक्कम दुप्पट करण्यांत आली, तरी आप्पासाहेब हातीं आला नाहीं. मोठमोठ्या इंग्रज फौजांनीं दोन वर्षें पावेतों मध्य हिंदुस्थानांतील सर्व जंगलें व डोंगर पालथे घातले, तरी त्यांस आप्पासाहेब उमगला नाहीं. नागोपंत व रामचंद्र वाघ यांची सुटका झाली नाहीं. ते तसेच अलाहाबाद येथें अटकेंत राहिले.

आप्पासाहेब पळून गेल्यामुळें इंग्रजांवर पुष्कळच नवीन संकटें गुदरलीं. नर्मदेच्या दक्षिणेकडील डोंगरी प्रदेशांत त्यानें कित्येक महिनेपर्यंत मोठाच बंडावा उपस्थित केला. नागपुरच्या फौजेंतून व बाजीरावाच्या फौजेंतून सुटलेले लोक आश्रयासाठीं आप्पासाहेबाजवळ येऊन राहिले. पेंढाऱ्यांचा पाठलाग चालला, त्यांचेही पुष्कळसे लोक आप्पासाहेबाजवळ जमा झाले. पावसाळ्यामुळें इंग्रजांचा त्यांजवर कांहीं एक इलाज चालला नाहीं. पावसळा संपल्यावरही गनिमी काव्यानें वागून आप्पासाहेबानें गोंडांच्या आश्रयानें इंग्रजांस सडकून दमविलें. क्षणभर असाही लोकांस भास झाला कीं मराठ्यांचें गेलेलें राज्य हा आप्पासाहेब पुनः जुळवून आणणार. कॅप्टन ब्राउनच्या ताब्यांतून आप्पासाहेब पळून गेला त्याजला शिक्षा करण्यांत आली, आणि थोड्याशा हलगर्जीपणामुळें आपणावर भयंकर प्रसंग ओढावला याबद्दल इंग्रज सरकारास मोठी लाज वाटूं लागली. वर्ष सहा महिने पावेतों इंग्रज फौजांस आप्पासाहेबाचा पाठलाग हा एकच महत्त्वाचा विषय होऊन राहिला. बाजीरावास आवरावें तों आप्पासाहेब उठतो, आप्पासाहेबास संभाळावें तों सीतू पेंढारी डोकें वर काढतो, सीतूस दमवावें तों अमीरखान बळकावतो, अशा पेंचांत इंग्रज लोक स. १८१८–१९ च्या दोन वर्षांत अगदीं रडकुंडीस आले.

आप्पासाहेबास नागपुरांतून काढून बाहेर पोंचविल्यावर मागें तें राज्य खालसा करण्याचा विचार ग० ज० चे मनांत आला. परंतु त्या आणीबाणीच्या वेळीं चहूंकडे शत्रु पसरले असतां एवढ्या मोठ्या राज्याचा ग्रास पचणार नाहीं असें जाणून, बाकाबाईची दोस्ती संपादून तिच्या मार्फत परसोजीची हयात स्त्री दुर्गाबाई हिला दत्तक पुत्र देऊन दौलतीस मालक करावा असा सल्ला जेंकिन्सनें दिला. तो ता. १८·६·१८१८ रोजीं ग० ज० नें मंजूर करून पाठविला. रघूजीची कन्या बनूबाई गुजर हिचा मुलगा बाजीबा नामें दहा वर्षांचा होता, त्यास दुर्गाबाईचे मांडीवर दत्तक देऊन त्याचें नांव

रघूजी बापूसाहेब असें ठेविलें, आणि ता. २६·६·१८१८ रोजीं त्यास दत्तविधान-पूर्वक गादीवर बसविलें. गुजाबा दादा गुजर अलाहाबादेस होता तो येऊन दाखल झाल्यावर दसऱ्याचे मुहूर्तानें ता. ९·१०·१८१८ रोजीं राज्यारोहण समारंभ करण्यांत आला. 'गुजाबा दादास आणविण्याविषयीं बाईसाहेबांनीं बोलण्यांत आणिलें, त्यावरून ते आश्विन मासीं येऊन पोंचले. ते, बाईसाहेब व इंग्रज लोकांच्या भेटी होऊन दौलतीचा आळा चालविला व बंदोबस्त करविले. दिवसेंदिवस राजेसाहेबांनीं विद्याभ्यास, घोडे हत्तीवर बसणें, शिपाईगिरीचे इल्म शिकविणें, कचेरी दरबार मुत्सद्दी यांस घेऊन करण्याची तालीम जी लौकिकी गोष्ट चांगली ती दसऱ्याचे समारंभासमवेत करून दाखवीत आहेत.' परंतु हिंदी अधिकाऱ्यांवर विश्वास नसल्यामुळें नागपुरच्या सर्व राज्यांत नवीन ब्रिटिश अधिकाऱ्यांची नेमणूक करण्यांत आली. त्यामुळें प्रत्यक्ष इंग्रजी मुलखाहूनही नागपुरचे राज्यांत इंग्रजांचें वजन पुढें तीस चाळीस वर्षें कायम राहिलें. गुजाबा दादा गुजर याचे जोडीस नारायण पंडित देऊन उभयतांस दिवाणगिरीचा कारभार देण्यांत आला. इतक्यानें सुद्धां आप्पासाहेबाची धास्ती इंग्रजांचे पोटांतून गेली नाहीं. गोंड लोकांचे बंडावे चालूच होते. सन १८१८ च्या ऑगस्ट सेप्टेंबर महिन्यांत त्यांजवर इंग्रज फौजा चालून गेल्या. त्या फौजेपुढें गोंडांचे मुलखांतून आप्पासाहेब पळून १८१९ च्या फेब्रुवारींत अशीरगडाकडे आला. त्या ठिकाणीं पेंढारी सीतू त्यास साह्य झाला. पण सीतूस वाघानें भक्षिल्यानें आप्पासाहेबाचा आधार तुटला. अशीरगडचा किल्लेदार यशवंतराव लाड यानें आप्पासाहेबास किल्ल्यावर आश्रय दिला. इंग्रजांनीं किल्ला लढून घेतला व ता० ९·४·१८१९ रोजीं यशवंतराव लाड इंग्रजांचे स्वाधीन झाला. पण त्यापूर्वीच आप्पासाहेब वेश पालटून पळून गेला होता. त्यासंबंधाचें खालील पत्र उपलब्ध आहे. नखीबावा नांवाचा साधु माल्कमचे मर्जीतला होता त्यानें आप्पासाहेबाची बातमी माल्कम यास लिहून पाठविली. "नगपुरवाला राजा आप्पासाहेब अशेरहून निघाले. बरोबर सरंजाम घेऊन खरगोण येथें आले. तेथून सरंजामास रजा देऊन अंगास विभूत व लंगोटी लावून एक इसम बरोबर घेऊन राजपिंपळा येथें नर्मदा नदी उतरून अलीमोहन जवळ आले. तेथून आमझेरा, झाबवा जवळून पुढें देवळ्या प्रतापगडावरून उदेपुर, नाथद्वार या रस्त्यानें लाहोरास जाण्याचा त्यांचा इरादा आहे. पूर्वी महादेवाच्या डोंगरांत राजा होता त्यानें अगोदरच एक इसम लाहोरास पाठविला होता, तो तेथून परत निरोप घेऊन अशेर येथें आला. तुम्ही आमच्यापाशीं यावें असा लाहोराहून जबाब आल्यावरून ते येथून गेले.

असा त्यांचा पत्ता लागला आहे. ही बातमी सांगणारा इसमच हें पत्र घेऊन आपल्याकडे जात आहे. जेष्ट शु॥ ३ संवत १८७३,' (ता. २६ मे १८१९ )*

आप्पासाहेब पळून उत्तर हिंदुस्थानांत लाहोरपर्यंत गेला. इंग्रजी फौजा त्याच्या मागावर होत्याच. लाहोरहून तो जोधपुर हद्दींत परत आला असतां, त्यास जोधपुरच्या रेसिडेंटानें पकडिलें; आणि पुढें कोठें तरी कठोर बंदींत ठेवण्याचा विचार चालू असतां जोधपुरचा राजा मानसिंग यानें त्याची सर्व प्रकारची हमी पत्करून त्यास आपल्या ताब्यांत घेऊन अखेरपर्यंत त्याचा परामर्ष घेतला, आणि त्याच्या इतमामाप्रमाणें त्याचा सर्व खर्च त्यानें चालविला. एवढा बनाव सिद्ध होण्यांत दोन तीन वर्षें गेलीं. नागपुरचा कारभार सुरळीत चालूं लागला. बाजीराव वगैरे सर्व उत्पाती लोक ठिकाणीं बसून देशांत शांतता झाली. तेव्हां पुढें आप्पासाहेबास हट्टानें आपल्या कबजांत घेण्याचें प्रयोजन इंग्रजांस उरलें नाहीं. उलट त्याच्या खर्चाची जबाबदारी वांचली. तेव्हांपासून आप्पासाहेबाचें वास्तव्य जोधपुरासच कायम झालें. ता. १५·७·१८४० रोजीं हा शेवटचा शूर मराठा राजपुरुष मरण पावला. आप्पासाहेबाचा जन्म सन १७९६ तला असल्यामुळें मरणसमयीं त्याचें वय ४४ वर्षांचें होतें.

आप्पासाहेबासंबंधानें इंग्रज लेखक एकही गोड शब्द उच्चारीत नाहींत. भित्रा, कपटी, चंचल अशा शब्दांनीं ते त्याची बोळवण करितात; आणि त्यानें आपले करार पाळले नाहींत असे त्याजवर विश्वासघाताचे नाहीं नाहीं ते आरोप करितात. परंतु प्रत्यक्ष आप्पासाहेबाचीं कृत्यें व त्याच्या संबंधानें मराठी कागदांतील ठिकठिकाणचे नानाविध उल्लेख एकत्र लक्षांत घेतले असतां विनाशकालच्या त्या अंधारांत हा आप्पासाहेब राष्ट्रोद्धाराच्या तेजस्वी बाण्यानें चमकत राहिलेला दिसतो. अनेक प्रसंगीं जबरदस्तीनें मारून मुटकून इंग्रजांनीं त्याजकडून भलते सलते करार कबूल करून घेतले; बाकाबाई, नारायण पंडित यांच्या सारख्या द्वारांनीं कपटभेद करून आप्पासाहेबाची सत्ता अगदीं दुर्बल करून सोडिली, तरी सुद्धां आप्पासाहेबास चीड येऊं नये आणि त्यानें आपली शांति कायम ठेवून रेसिडेंट सांगेल त्यास हो म्हणत राहवें, अशी अपेक्षा जे लेखक करितात, त्यांची राष्ट्राभिमानाची व्याख्या कांहीं तरी अजब असली पाहिजे. नागपुरचें राज्य टिकवावें ही एकच चिंता अहर्निश आप्पासाहेबाचे

* ऐ. संकीर्ण साहित्य खंड १ पृ. १६४.

मनांत वागत होती. त्यांत पुष्कळदां धरसोड झाली असेल तर तो बराच परिस्थितीचा दोष होता. बाजीराव मराठमंडळाचा पुढाकार घेऊन इंग्रजांशीं निकरानें सामना करीत आहे, अशा बातम्या आप्पासाहेबास पोंचल्या आणि त्या खुद्द बाजीरावानेंच त्याजकडे पाठविल्या. तेव्हां इंग्रजांशीं समेट करण्याचे पूर्वीचे विचार रद्द करून त्यानें त्यांजवर चढाई केली, यांत धरसोड ती काय झाली! त्या धामधुमीच्या काळाचा सगळाच इतिहास आपणांस नवीन बनवावयाचा आहे. तो लिहिला जाईल तेव्हां आप्पासहेबासारख्या कित्येक बाणेदार व्यक्ती आपणांस सांपडतील. मराठ्यांच्या इतिहासांत अद्भुत कृत्यें करणारे जे कांहीं थोडे पुरुष उदयास आले, त्यांतच आप्पासाहेबाची गणना करावी लागेल. मात्र हें त्याचें अद्भुत चरित्र बारीक तपशिलांनीं सजवून राष्ट्रप्रेमाच्या उठावदार वृत्तीनें लिहिलें गेलें पाहिजे. रायचूर येथून इंग्रजांच्या कैदेंतून शिताफीनें निसटून जाणें, महादेवाच्या डोंगरांतील वनवासांत इंग्रजांस वर्षानुवर्ष दमविणें इत्यादि कित्येक प्रसंग त्या चरित्रांत मोठे हृदयंगम मानले जातील. परसोजीस ठार मारल्याचा आरोप त्याजवर आलेला आहे तो खरा समजून चाललें, तरी परिस्थितीवरून तो अक्षम्य ठरणार नाहीं. परसोजी अंध व भ्रमिष्ट आणि राज्य करण्यास अत्यंत नालायक होता. इंग्रजांनीं त्यास मतलबासाठीं उचलून धरिलें. नागपुरच्या राज्याची त्यांस एवढी कळकळ वाटत होती तर वेड्या परसोजीस पाठिंबा देण्या ऐवजीं बाणेदार आप्पासाहेबासच त्यांनीं पुढें आणून त्याचा जम बसवून दिला पाहिजे होता. परसोजी हा केवळ खटपटी विरोधकांच्या हातांतलें खेळणें बनला होता. अशा स्थितींत त्यास नाहींसें करण्याशिवाय दुसरामार्ग आप्पासाहेबास दिसला नाहीं. बाकाबाई, गुजाबादादा वगैरे वजनदार माणसांस जेंकिन्सनें प्रथम पासूनच आपले लोभांत मिळवून घेतलें होतें.

रघूजीच्या मृत्यूनंतर नागपुरास सुमारें दोन वर्षे पावेतों प्रचंड क्रान्ति झाली, तिची विस्तृत हकीकत ना. भो. का. लेखांक ३६ यांत दिलेली प्रत्येक अभ्यासूनें लक्षपूर्वक वाचण्यालायक आहे. त्यांत आप्पासाहेबाचें स्वभावचित्र उत्कृष्ट दिसतें.

---

# प्रकरण चवदावें.

## पेंढाऱ्यांच्या निमित्तानें इंग्रजांचा आक्रम

**कुणान कुणि धनि मना येइल तसे जनांसि जन वंचिती ।**
**अठां दिसांमधिं पठाण तिनदां लुटावया धावती ।**
**काय समय हा लया रुद्र करी दया दृष्टि झांकली ।**
**दुजी आस न कविरायाची कृति येथुनि उरकली ॥**

—रामजोशी कृत पोवाडा.



**१ वेल्स्लीच्या कारभाराचे परिणाम, मिंटोची परिस्थिति.***–ता. ३१·७·१८०७ पासून ता. ४·१०·१८१३ पर्यंत लॉर्ड मिंटो इंग्रजांच्या कारभारावर होता. वेल्स्लीच्या कारभाराचे परिणाम याच्या वेळेस दिसून आले. पुढील विषय नीट लक्षांत उतरण्याकरितां या परिणामांचें थोडें विवेचन प्रथमच करणें जरूर आहे. लॉर्ड वेल्स्ली म्हणतो, "तैनाती फौजांच्या तहांनीं समस्त संस्थानिकांस अशा रीतीनें बांधून घेतां येईल कीं, इंग्रजांविरुद्ध एखादी जूट किंवा कोणताही कट करण्याची शक्ति त्यांना राहूं नये. असें झालें म्हणजे प्राच्य देशांत जे अनेक उपद्यापी सत्ताधीश वाटेल तसा धिंगाणा घालून सर्वत्र दंगा उसळून देतात, तो बंद होऊन आपणांस येथें कायम शांति स्थापन करतां येऊन सर्वांना धाकांत ठेवण्याचें सामर्थ्य उत्पन्न होईल." वास्तविक या पद्धतीचा उगम क्लाइव्हच्या वेळेस झाला. तदुत्तर टिपूशीं चाललेल्या युद्धांत इंग्रजांनीं एतद्देशीय संस्थानिकांचें साह्य घेतलें, त्यांत इंग्रज सेनापतीस मोठी धास्ती वाटे, कीं एवढ्या या लटांबरांत आपला निभाव कसा लागेल व केव्हां

* या प्रकरणास मुख्य आधार प्रिन्सेप, लायल व माल्कम इत्यादींचे ग्रंथ.

कोणती अडचण उत्पन्न होईल! ऐन वेळीं हे इंग्रजांचे दोस्त अंगचोरपणा करून खुशाल बाजूस राहत, आणि जयाचीं चिन्हें दिसतांच लुटीच्या फायद्यापुरते धावून पुढें येत. या अडचणी टाळण्याकरितां आपल्या बरोबरीनें लढणारे आणि सदैव आपल्या हुकमतींत वागणारे असे दोस्त इंग्रजांस पाहिजे होते. त्या दोस्तांच्या फौजांतील अंमलदार इंग्रज असल्याशिवाय ही गोष्ट घडून आली नसती. असा परिणाम उत्पन्न होण्यास फौजांस पगार वेळेवर पोंचणें आणि त्यांनीं सर्वथा एका सेनापतीच्या हुकमतींत वागणें, या गोष्टींची जरूर वाटूं लागली. याचाच परिणाम असा झाला, कीं इंग्रजांच्या दोस्तांनीं फौजांच्या ऐवजीं केवळ त्यांचे खर्चास पुरे इतका पैसा इंग्रजांच्या हवालीं करावा, आणि त्या पैशानें आपणांस हव्या तशा फौजा इंग्रजांनी तयार कराव्या. युरोपांत देखील अनेक प्रसंगीं दोस्तांची मदत घेण्याचे प्रसंग इंग्रजांस आले, परंतु युरोपांतील प्रकार आणि हिंदुस्थानांतील प्रकार यांत मुख्य फरक असा होता, कीं इंग्लंडनें ऑस्ट्रिया, रशिया वगैरे आपल्या दोस्तांस स्वतःचे पैसे देऊन त्यांच्या तयार फौजा आपल्या मदतीस घेतल्या. याचे उलट हिंदुस्थानांत इंग्रजांनीं दोस्तांकडून आपण पैसे घेऊन त्यांच्या फौजा तयार केल्या. हिंदुस्थानांतील रजवाडे आपल्या फौजांवर थोडा खर्च करीत असें नाहीं. पण त्यांच्यांत शिस्त नव्हती, लोक वेळेवर हजर होत नसत, पुष्कळदां आपसांत तंटे करून फितूर बनून धन्याचा घात करीत. असा दुबळेपणा कायम ठेवण्या ऐवजीं इंग्रजांसारख्या ऐपतवान व युद्धकलानिपुण सत्तेच्या हातांत संस्थानिकांनीं पैसा द्यावा आणि त्यांजवरच फौजा बनविण्याचें काम पूर्णपणें सोंपवून आपण त्या दगदगींतून निवृत्त होऊन स्वस्थ बसावें, अशी योजना एतद्देशीय सत्ताधीशांवर वेल्स्लीनें लादली. ती पुढील इंग्रजांनीं मोठ्या चतुराईनें सिद्धीस नेली हें आपण पाहतोंच. नियमितपणें पैसा हातांत येईल तरच ही योजना यशस्वी होणार होती. त्यासाठीं इंग्रजांनीं संस्थानिकांकडून प्रदेश तोडून घेतले. वेल्स्ली आला तेव्हां इंग्रजांशीं सामना करण्यास उभे राहणारे मुख्यतः तीन सत्ताधीश होते, अयोध्येचा वजीर, हैदराबादचा निजाम व मराठे. पैकीं पहिले दोन निःसत्त्व झालेच होते विशेष धास्ती इंग्रजांना फक्त मराठ्यांची होती. त्यांना त्यांनीं कसें जाळ्यांत अडकाविलें हें आपणांस विदितच आहे. वेल्स्लीवर मुख्य आरोप येतो तो असा, कीं आपली सार्वभौम सत्ता स्थापण्यासाठीं एतद्देशीयांच्या नुकसानीची त्यानें बिलकुल परवा केली नाहीं. सबुरी, आत्मसंयमन किंवा औदार्य या चिजा त्याच्या संग्रहीं नव्हत्या. अयोध्येच्या वजीराशीं तर त्यानें अत्यंत स्वार्थाचें वर्तन करून रोहील-

खंड वगैरे त्याचे अनेक समृद्ध प्रदेश हिरावून घेऊन सर्व बाजूंनीं त्यास घेरून नागवून सोडिलें. वजिराची ही कहाणी अत्यंत हृदयद्रावक आहे. गंगा नदीच्या कांठचे बनारसच्या बाजूचे चांगले प्रदेश इंग्रजांच्या हातांत आल्यानें त्यांना कधीं पैशाची ददात उरली नाहीं. त्याच्याच जोरावर त्यांनीं मराठ्यांस नरम केलें. फ्रेंच सत्तेचा उच्छेद करणें हें एक दिसण्यांत योग्य असें पोकळ कारण वेल्स्लीनें दाखविलें. मराठ्यांस आळा घालण्याचें काम वेल्स्लीनें हातीं घेतलें नसतें, तर पेशव्यांनीं जसें छत्रपतीस बाजूस सारलें तसें सिंदे होळकरांनीं पेशव्यासही कैदेंत बसविलें असतें. हडपसरच्या लढाईंत यशवंतराव होळकराचा पराभव होण्याचा बेत आला होता, पण केवळ स्वतःच्या धाडसानें त्यानें बाजू उलटवून त्या प्रसंगांत उत्तम विजय मिळविला. पुढें वसईच्या तहानें मराठे सरदारांच्या मुसक्या बांधण्याचें काम वेल्स्लीनें केलें, त्यासंबंधानें इंग्लंडांत भारतमंत्री लॉर्ड कॅसलरीघ यास मोठी धास्ती पडून त्यानें वेल्स्लीला नियंत्रण घालण्याचा सडकून प्रयत्न केला. पण होऊन गेलेले प्रकार बदलणें शक्य नव्हतें. वसईच्या तहाचा हा डाव मराठमंडळानें चांगला ओळखला; त्यामुळेंच ते इंग्रजांविरुद्ध आपली जूट बनविण्याच्या उद्योगास लागले, पण इंग्रज रेसिडेंटांच्या वस्तादगिरीमुळें अशी जूट फलदायी होऊं शकली नाहीं. अल्पावकाशांत हिंदी राजकारणाचा सबंद आराखडा वेल्स्लीनें साफ बदलून टाकला. यांत सुद्धां त्यानें विशिष्ट योजना काय केली तें लक्षांत घेण्याजोगें आहे. मराठे सत्ताधीशांकडे त्यानें सलंग प्रदेश कोठेंही कायम ठेविले नाहींत. दोन मराठी संस्थानांच्या दरम्यान राजपूत, जाठ, मुसलमान वगैरे कोणी तरी परकीय सत्ताधीश पाचर म्हणून त्यानें निर्माण केला. तसेंच बंगाल, मद्रास, मुंबई वगैरे दूरदूरचे इंग्रजांचे प्रदेश तुटक होते ते मधले तुकडे हस्तगत करून त्यानें सलंग केले. दिल्ली, आग्रा, अलीगड वगैरे नाक्यांचीं महत्त्वाचीं ठिकाणें घेऊन व गंगा यमुनांचा दुआब व त्या नद्यांच्या कांठचे समृद्ध प्रदेश ताब्यांत घेऊन इंग्रजी राज्याची हद्द त्यानें उत्तरेस हिमालय धरून थेट पंजाबास नेऊन भिडविली. एकंदरींत सर्व हिंदुस्थानास त्यानें इंग्रजी सत्तेचें जबरदस्त कुंपण घालून, मध्यंतरीं आपल्या सोईचे रस्ते म्हणजे पायंडे त्यानें बनविले. खुद्द त्यानेंच हा प्रकार खालील प्रमाणें वर्णिला आहे. "हिंदुस्थानांतील मुख्य मुख्य संस्थानें इंग्रज सरकाराशीं सामान्य बंधनांनीं निगडित झालीं असून हा संबंध दृढ करीत जाणें हेंच प्रत्येक संस्थानाच्या हिताचें आहे. या संबंधामुळें आतां कोणाही संस्थानिकाला दुसऱ्यावर ताव मारून आपली हद्द वाढविण्याची शक्ति राहिली नाहीं. प्रत्येकाची

जी हद्द व व्यवस्था आज आहे तिच्यांतच त्यानें संतुष्ट राहिलें पाहिजे. हीच स्थिति कायम राखण्याबद्दल इंग्रज सरकार बांधलें गेलें आहे. " परंतु हा त्याचा कयास फार वेळ टिकला नाहीं, हें पुढील हकीकतीवरून स्पष्ट होईल. वेल्स्लीच्या धोरणाचा अर्थ असा कीं संस्थानें व इंग्रज सरकार यांचा जो पूर्वी समान दर्जा होता तो नाहींसा होऊन इंग्रज सार्वभौम व संस्थानें मांडलिक बनलीं.

पुढें लॉर्ड मिंटोची कारकीर्द सुरू झाली तेव्हां युरोपांत नेपोलियनची सत्ता परमावधीस पोंचली होती, आणि आशिया खंड जिंकून हिंदुस्थानावर येण्याचे त्याचे मनोरथ पुनः उचंबळूं लागले होते, त्यामुळें हिंदुस्थानांतील आपली सत्ता कायम टिकविण्याकरितां हिंदुस्थानाबाहेरील परिस्थितीकडे दृष्टिक्षेप करणें लॉर्ड मिंटो यास जरूर पडलें. या संबंधाचा पहिला प्रसंग त्यानें मुद्दाम उत्पन्न केला. इराण, अफगाणिस्तान, सिंध येथील राज्यकर्ते आणि पंजाबचा रणजितसिंग यांजकडे आपले वकील पाठवून स्नेहसंबंध जोडण्याचा उपक्रम मिंटोनें केला. त्याचा जरी तात्कालिक परिणाम झाला नाहीं तरी तेव्हांपासून इंग्रज राजकारणाला निराळेंच स्वरूप प्राप्त झालें, हें ध्यानांत ठेवलें पाहिजे. आपला व्यापार सुरक्षित राहवा, आणि परचक्रापासून कोणताही बाध त्यास येऊं नये, अशा तजविजी मिंटोनें हातीं घेतल्या. आफ्रिकेच्या दक्षिण टोंकाचा प्रदेश केप्-ऑफ्-गुड-होप इंग्रजांचे ताब्यांत आला. स. १८१० त लॉर्ड मिंटोनें हिंदुस्थानांतून आरमार पाठवून जावा बेटांतून फ्रेंचांस हुसकून दिलें, त्याच वेळीं मॉरिशस बेट फ्रेंचाकडे होतें तें इंग्रजांनीं जिंकलें. हीं नाक्याचीं ठिकाणें इंग्लंडचे ताब्यांत आल्यामुळें स. १८१५ त नेपोलियनचा पाडाव झाल्यावर इंग्रज सत्तेची व व्यापाराची वाढ झपाट्यानें होऊं लागली. हिंदुस्थानांतही त्यांची सत्ता निर्बाध झाली. मात्र सिंदे, होळकर, गायकवाड व भोसले हे मराठी राज्याचे चार मुख्य घटक प्रसंगीं एक होऊन आपणांस दगा देतील कीं काय एवढीच धास्ती मिंटो यास होती. तथापि मिंटोनें कोणतेंही युद्धकृत्य अंगावर घेतलें नाहीं. पुण्यास एल्फिन्स्टन यास त्यानें उच्छृंखल होऊं दिलें नाहीं. अनेक विषयांत व्यवस्थित राज्यकारभाराची सुरुवात करून त्यानें देशांत स्वास्थ्य उत्पन्न केलें. तेणें करून वेल्स्लीच्या वेळच्या पैशाच्या अडचणींचें निरसन झालें, त्याचा फायदा पुढें लॉर्ड हेस्टिंग्सनें पूर्णपणें करून घेतला. ( प्रिन्सेप्; लॉयल. )

**२ स. १८०५ नंतरचें हिंदी राजकारण,-लॉर्ड हेस्टिंग्स.**—स० १८०३ पासून स० १८०५ पर्यंत इंग्रज मराठ्यांचीं युद्धें होऊन, त्यांत इंग्रजांची

सार्वभौम सत्ता देशावर स्थापन झाली, तथापि ही सत्ता कायम होऊन सार्वभौम सरकाराशीं एत्तद्देशीय सत्ताधीशांचे संबंध कशा प्रकारचे राहवे याची निश्चिति होण्यास आणखी १५ वर्षांचा काळ लागला. लॉर्ड वेल्स्लीनें घातलेली जाज्वल्य पद्धत त्याच्या पश्चात् आलेल्या इंग्रज अधिकाऱ्यांनीं यथायोग्य अमलांत आणली असती तर इंग्रजांची सत्ता देशभर चालू होऊन एक दोन वर्षांत सर्वत्र शांतता प्रथापित झाली असती, आणि संस्थानें म्हणून उरलीं नसतीं. परंतु इंग्लंड व फ्रान्स यांजमध्यें चाललेल्या झगड्यामुळें इकडील इंग्रजी कारभारांत निश्चित धोरण राहिलें नाहीं परिणामांवरून पाहतां कॉर्नवॉलिस, बार्लो वगैरे अधिकाऱ्यांस वेल्स्लीची पद्धत सोडून दिल्याबद्दल पुष्कळ लेखक दोष देतात; परंतु परिस्थितीकडे पाहिलें म्हणजे इंग्रजांना तरी त्या वेळीं गत्यंतर नव्हतें असेंच म्हणावें लागतें. इ० स० १८०७ पर्यंत युरोपांत नेपोलियनची सत्ता दिवसेंदिवस वाढत होती, आणि त्याच्या चढाई पुढें आपण जगतों कीं मरतों ही विवंचना इंग्रज राष्ट्राच्या मागें कायम असल्यामुळें हिंदुस्थानांत आणखी शत्रुत्व व युद्धें उत्पन्न करून असलेल्या अडचणींत भर घालूं नये; न जाणों, कदाचित् हिंदुस्थानचा मोठा घास एकदम गिळून टाकण्याच्या प्रयत्नांत सर्वच गमावण्याची पाळी यावयाची. या धास्तीमुळें स० १८१३–१४ पावेतों हिंदुस्थानच्या राजकारणाकडे इंग्लंडच्या सरकारानें पुष्कळशी डोळेझांक केली. सिंदे, होळकर, बाजीराव, नागपुरकर भोसले, गायकवाड वगैरे समस्त मराठे सत्ताधीश थोड्या बहुत फरकानें अत्यंत नाराज राहिले. आपण काय करावें आणि काय करूं नये याची उमज त्यांस पडेना. त्यांच्या दरबारीं असलेले इंग्रज रेसिडेंट मन मानेल तसा कारभार करीत. त्यांत एकसूत्रता बिलकूल नव्हती. राजाचें वजन कमी करून शक्य तितका आपल्या राष्ट्राचा फायदा करावयाचा, मग त्यांत न्याय अन्याय पाहवयाचा नाहीं, अशी या सर्व रेसिडेंटांची वागणूक होती. बडोद्याचा वॉकर आनंदराव गायकवाडाच्या नेभळट वृत्तीचा फायदा घेऊन बडोद्याचें सर्वच राज्य हाताखालीं घालीत होता. एल्फिन्स्टननें पुण्यास बाजीरावासंबंधानें तोच क्रम चालविला. नागपुरचा रघूजी इंग्रजी फौज आपल्या संरक्षणास घेत नाहीं या दुराग्रहाबद्दल अचंबा करीत रेसिडेंट जेंकिन्स रघूजीच्या मरणाची वाट पाहत दिवस कंठीत होता. सिंद्याचा स्ट्रॅकी दौलतरावाच्या दरबारांतील लष्करी व इतर भानगडींस कंटाळून आपला निभाव कसा करावा या विवंचनेंत होता. यांशिवाय आणखी एक इंग्रजांचा जबरदस्त अधिकारी मेटकाफ् नांवाचा दिल्लीस होता, त्याला तर सर्व राजपूत राजांचीं, जाठांचीं, शीखांचीं व

सिंधु-पलीकडील अफगाणिस्तानाचीं सूत्रें सांभाळावीं लागत होतीं. सिंदे होळकरांस वाटे, राजपूत राजांकडून खंडणी वसूल करण्याचा सालोसाल हक्क आपला आहे. गायकवाडास वाटे, काठ्यावाडचे व इतर लहान मोठे संस्थानिक आपले मांडलिक आहेत. नागपुरकर भोसल्यास वाटे ओढ्या, बहार, भोपाळ वगैरे प्रांतांवर आपला हक्क आहे. पेशव्याला वाटे, सांवतवाडी, कोल्हापुर, सोंडूर, तंजावर पर्यंतच्या प्रदेशांत हितसंबंध आपले आहेत. अशा स्थितींत हे सत्ताधीश मनांतून इंग्रजांवर अत्यंत चिडून गेले. तथापि बाह्यतः रेसिडेंटास खूष ठेवून शक्य तितका आपला मतलब ते साधीत. त्यांतल्या त्यांत अत्यंत कुचंबणा जयपुर, जोधपुर, उदेपूर, बुंदी, कोटा वगैरे राज्यांची झाली. सिंद्याच्या व होळकराच्या फौजांनीं सालोसाल त्यांच्या राज्यांत घुसून त्यांची दैना उडवावी, पण त्यांस कोणी त्राता नाहीं, अशी स्थिति झाली. वेल्स्लीनें या राजपूत राजांस स्वतंत्र तहांनीं इंग्रजांच्या संरक्षणाखालीं घेतलें होतें, परंतु कॉर्नवॉलिसनें ते तह रद्द करून त्यांस केवळ अधांतरीं लोंबत ठेविलें. तेव्हां या सर्व राजांनीं दिल्लीचा रेसिडेंट मेटकाफ् याजकडे वारंवार वकील पाठवून आणि अर्ज व विनवण्या करून, कसेंही करून आम्हांस आपल्या संरक्षेखालीं घेऊन आमचा बचाव करा, असा त्याचा धावा चालविला. परंतु इंग्लंडांतून वरिष्ठ सरकाराचा हुकूम नसल्यामुळें येथल्या अधिकाऱ्यांनीं त्या बाबतींत लक्ष घातलें नाहीं. या संबंधानें वरील सर्व रेसिडेंटांचे खलिते व तक्रारी ग० ज० च्या मार्फत स० १८१० पासून १८१३ पावेतों सारख्या इंग्लंडास जात होत्या. जयपुरच्या राजानें तर इंग्रज अधिकाऱ्यांच्या विनवण्या करण्यांत कमाल केली. माल्कमच्या पुस्तकांत वरील १२ वर्षांचें राजकारण स्पष्टपणें मांडलेलें आहे. हेस्टिंग्सचा स्वभाव वेल्स्लीच्या धर्तीवर असल्यामुळें त्याजपासून वरील रेसिडेंटांस आक्रमणाची नवीन स्फूर्ति प्राप्त झाली.

जयपुरच्या राजाची मागणी मंजूर करण्याचे हुकूम लॉर्ड मिंटोनें इंग्लंडाहून मागविले. इतक्यांत मिंटोची मुदत संपून लॉर्ड हेस्टिंग्स कारभारावर दाखल झाला. जयपुरच्या मागणीसंबंधाचा सीक्रेट कमिटीचा ठराव ता. १३·१२ १८१३ रोजीं सुटला, तो ता. १०·६·१८१४ रोजीं हिंदुस्थानास पोंचला. त्या वेळीं इकडे नेपाळचें युद्ध जोरांत चालू असल्यामुळें राजपुतांची ही नवीन भानगड आतांच अंगावर घेऊं नये, असें ग० ज० ने ठरविलें. जयपुरकडून खंडणी गोळा करण्याचा मराठ्यांचा हक्क होता; आणि नेपाळच्या युद्धाचा फायदा घेऊन मराठे सरदार इंग्रजांवर चढाई करण्याच्या उद्योगांत होते. पुढें स. १८१५ च्या अखेरीस नेपाळयुद्ध बरेंच आटो-

क्यांत आलें आणि त्याच संधीस अमीरखानानें होळकराचे तर्फेनें जयपुरावर स्वारी करण्याची दहशत घातली. तेव्हां तेथील राजा प्रतापसिंग यानें पुनः आपले वकील दिल्लीस मेटकाफ् कडे पाठवून इंग्रज फौजेची मदत मागितली. त्यावरून जयपुरशीं तैनाती फौजेचा तह करावा असा हुकूम मेटकाफ् यास ता. २०·४·१८१६ रोजीं ग० ज० नें पाठविला, आणि तो सिद्धीस जाईल असें समजून नेपाळांतून परत येणाऱ्या फौजा जयपुरचे हद्दीवर जमविल्या. दक्षिणेकडील फौजाही त्याच वेळीं नर्मदेकडे बोलावण्यांत आल्या. एवढी ही तयारी पाहिल्याबरोबर जयपुरचा राजा बिचकून गेला. इंग्रजांची फौज आपल्या छातीवर घेतली म्हणजे आपली स्वतंत्रता सर्वच नाहींशी होते, त्यापेक्षां कधीं काळीं चढाई करणारे मराठे कांहीं वाईट नाहींत असें म्हणणारा पक्ष जयपुर दरबारांत होताच. शिवाय जयपुरचे ताब्यांत पुष्कळ लहान मांडलिक होते त्यांनीं आपण होऊनच अमीरखानाचा बंदोबस्त केला, त्यामुळें इंग्रजी फौजांचें प्रयोजन त्यास उरलें नाहीं. अर्थात् इंग्रजांनीं तहाची आतुरता दाखवितांच तत्संबंधी जयपुरची आतुरता बंद पडली. जयपुरचे वकील मेटकाफ्कडे येऊन भलत्याच मागण्या करूं लागले, तेव्हां मेटकाफ्नें त्यांस आपल्या जवळून घालवून दिलें. त्यानंतर हे वकील पुनः ता. १७·११·१८१६ रोजीं दिल्ली येथें मेटकाफ्कडे येऊन इंग्रज मदतीची याचना करूं लागले. टोंक—रामपुरा परगणा मूळचा जयपुरचा होळकरानें हस्तगत केला होता तो, इंग्रजांनींच स० १८०४ सालीं जिंकून जयपुरकरांस परत दिला; पण स० १८०५ च्या तहानें हा परगणा इंग्रजांनीं होळकराचे हवालीं केला. तो होळकराकडून जिंकून इंग्रजांनीं आपल्यास परत द्यावा अशी मागणी जयपुरच्या वकिलांनीं मेटकाफ्कडे केली. त्यामुळें इंग्रजांस आतांच होळकराशीं म्हणजे पर्यायानें सर्व मराठमंडळाशीं झगडावें लागणार असा संभव वाटल्यामुळें, टोंकरामपुऱ्याची कामगिरी मेटकाफ्नें मनावर घेतली नाहीं. त्यावरून पुनः या जयपुरच्या तहाचें बोलणें फिसकटलें.

दुसऱ्या दोन महत्त्वाच्या गोष्टी याच वेळीं घडल्या त्यांचें अनुसंधान ध्यानांत घेतल्यानें इंग्रजी राजकारणाची संगति कळून येईल. स० १८१६ त नागपुरचा रघूजी भोसले मरण पावल्यावर त्या राज्यावर रेसिडेंटानें आपली तैनाती फौज बसविली, आणि पेंढाऱ्यावर स्वारी करण्याचें योजिलें. पुण्यास गंगाधर शास्त्र्याच्या खुनावरून बाजीराव पेशव्याशीं इंग्रजांचा बेबनाव झाला आणि त्रिंबकजी डेंगळ्यास त्यांनीं आपल्या कब्जांत घेतलें. होळकर दरबारांतही अमीरखान व गफूरखान यांनीं

प्रचंड अडचणी उपस्थित केल्या. या गोष्टींचें पर्यवसान उत्तरोत्तर नजरेस येईल. तसेंच इंग्रजांविरुद्ध एतद्देशीयांचा उठाव कसा गुप्तपणें होत होता, त्याचें खालील उदाहरण लक्षांत ठेवण्याजोगें आहे.

नेपाळचें युद्ध सुरू होण्यापूर्वी दौलतराव सिंद्यानें नेपाळचे राजास पाठविलेलीं पत्रें मोठ्या चमत्कारिक रीतीनें इंग्रजांचे हातीं पडलीं. 'हिंदुस्थानांतील समस्त रजवाडे व तुम्ही आम्ही मिळून एक होऊन इंग्रजांचा हा काटा देशांतून काढून टाकूं या,' अशा आशयाचा मजकूर त्या पत्रांत होता. सिंद्याचे हे दूत भिक्षुकांचीं सोंगें घेऊन नेपाळांत चालले असतां बिठूर जवळ गंगा उतरतांना इंग्रजांस आढळले. त्यांच्याजवळ पोथ्या होत्या आणि त्या पोथ्यांच्या पानांत हीं पत्रें काळजीपूर्वक डकविलेलीं होतीं. त्या कागदांवर सिंद्याचें खास मोर्तब होतें. ते कागद पकडून त्यांचें पुडकें ग० ज० नें रेसिडेंटकडे पाठविलें आणि लिहिलें, कीं 'हें पुडकें भरदरबारांत तुम्हीं नेऊन दौलतरावास नजर करावें; मात्र त्या संबंधानें दुसरी कांहीं वाच्यता करूं नये. सिंद्याचे हे चाळे आम्ही ओळखून आहों एवढी खूण त्यास पटली म्हणजे पुरे.'

ता. ४·१०·१८१३ रोजीं लॉर्ड मिंटोनें ग० ज० च्या कामाचा हवाला अर्ल मोयरा यास दिला, त्यासच पुढें मार्क्विस हेस्टिंग्स ही पदवी मिळाली. वेल्स्लीप्रमाणेंच किंबहुना त्याहून जास्त महत्त्वाचीं प्रकरणें या हेस्टिंग्सनें सिद्धीस नेलीं. त्याचा कारभार चांगला ८ वर्षांवर चालला. हिंदुस्थानच्या एकंदर ग० ज० त पहिला वॉरन हेस्टिंग्स खेरीज करून दुसऱ्या कोणाचीही कारकीर्द एवढी लांब झाली नाहीं. दूरदृष्टि, उद्योग, दक्षता वगैरे गुणांतही याची बरोबरी करणारे इंग्रज अधिकारी फार थोडे झाले. यानें स्वतःची खासगी रोजनिशी कांहीं थोड्या वर्षांची लिहिलेली प्रसिद्ध आहे, तिजवरून त्याचें कर्तृत्व निदर्शनास येतें. स्वतः रणांगणावर उभें राहून सेनापतीचें काम त्यानें कधीं केलें नाहीं, तथापि मराठ्यांचे युद्धप्रसंग चालले असतां बुंदेलखंडांत सर्वांवर देखरेख ठेवण्याच्या सोईच्या जागीं आपला मुक्काम ठेवून त्यानें सर्व ठिकाणच्या मोहिमा दक्षतेनें पार पाडिल्या *

---

* या मोहिमांवर असतां त्यानें प्रिन्सेप नांवाच्या हुशार लेखकास चिटणीस म्हणून जवळ बाळगिलें होतें. या प्रिन्सेपनें हेस्टिंग्सच्या हातून झालेला सर्व पत्रव्यवहार तपासून त्या वेळच्या घडामोडींचें तपशीलवार वर्णन लिहून तें स० १८२० त लंडन येथें छापलें; त्यावरून हिंदी राजकारणाची परिस्थिति चांगली कळते.

चार प्रकारच्या सत्ताधीशांशीं हेस्टिंग्सचा संबंध आला. ( १ ) इंग्रजांची तैनाती फौज स्वीकारलेले सत्ताधीश, उ० निजाम, पेशवा, गायकवाड, म्हैसूर, त्रावणकोरचा राजा आणि अयोध्येचा वजीर; ( २ ) तैनाती फौज न स्वीकारलेले पण इंग्रजांचें संरक्षण अनुभवणारे सत्ताधीश, उ० भरतपुर, माचेडीकर, बुंदेलखंडांतील कित्येक राजे आणि कांहीं शीख सरदार; ( ३ ) इंग्रज सरकाराशीं तह केलेले पण वस्तुतः स्वतंत्र असे सत्ताधीश उ० होळकर, सिंदे, नागपुरकर भोसले वगैरे; ( ४ ) इंग्रजांशीं कोणताही संबंध नसलेले स्वतंत्र सत्ताधीश, यांत जयपुर जोधपुर येथील राजे गणतां येतील. अशा चार प्रकारच्या सत्ताधीशांशीं हेस्टिंग्सला आपलें राजकारण खेळावें लागलें. त्यांपैकीं कित्येकांचीं प्रकरणें निकरावर येण्यास मुख्यतः पेंढाऱ्यांचें निमित्त कारण झालें; म्हणून त्यांची हकीकत प्रथम सांगितली पाहिजे. मराठ्यांच्या इतिहासाची संगति दाखविण्यापुरतीच पेंढाऱ्यांची हकीकत येथें द्यावयाची आहे.

**३ पेंढाऱ्यांचा इंग्रजांस उपद्रव** ( स. १८१४–१६ ).—सन १८१५ त पुण्यास शास्त्र्याचें प्रकरण चालू असतां नेपाळांत इंग्रजांचें युद्ध जोरांत होतें. पुढें गुरख्यांचा पाडाव होऊन ता. ३·३·१८१६ रोजीं उभयतांत तह ठरून युद्ध संपलें, तेव्हां पुनः पेंढाऱ्यांचें प्रकरण हातीं घेण्याची इंग्रजांस सवड मिळाली. ह्यासंबंधाची योजना अगोदरच ठरवून ग० ज० नें वरिष्ठांकडून लेखी हुकूम मागितले होते. सन १८१५ च्या पावसाळ्यांत हेस्टिंग्स उत्तर हिंदुस्थानांत गेला होता तो पाऊस संपल्यावर कलकत्त्यास परत आला. त्यानंतर नर्मदेच्या उत्तरेकडील नेमावर प्रांतांत **सीतू**च्या आधिपत्याखालीं दसऱ्याचा सण साजरा करून पेंढाऱ्यांच्या झुंडी नर्मदा उतरून दक्षिणेकडे वळल्या. एक टोळी तापीच्या कांठानें चालली असतां तिचा पाठलाग निजामाच्या फौजेंतील मेजर फ्रेजर यानें केला. निजामाची ही फौज या कामीं निरुपयोगी दिसून आल्यावरून ती सर्व सुधारून कामावर घेण्याकरितां ग० ज० नें कॅप्टन सिडनहॅम याची नेमणूक औरंगाबाद येथें केली. पेंढाऱ्यांची दुसरी टोळी खानदेशांतून निजामाचे राज्यांत शिरून स. १८१५ च्या नोव्हेंबर अखेरीस दक्षिणेस कृष्णेपावेतों येऊन पोंचली. कृष्णेस उतार न मिळाल्यामुळें पेंढाऱ्यांच्या टोळ्या तशाच लुटालूट करीत पूर्वेकडे मच्छलिपट्टण पावेतों गेल्या. तेथून उत्तरेकडे वळून गोदावरीच्या तीरानें वर्धा नदीच्या प्रदेशांतून लूट करून त्या परत नेमावर प्रांतांत आल्या. या प्रसंगीं पेंढाऱ्यांना एवढी लूट मिळाली कीं त्यांनीं आणिलेलें जडजवाहीर विकत घेण्याकरितां उज्जनचे व्यापारी मुद्दाम नेमावरास आले. पहिल्या

टोळीचा हा विजय ऐकून दुसरे पुष्कळ लोक भराभर पेंढाऱ्यांचे पक्षांत जमा झाले. ता. ५·२·१८१६ रोजीं पुनः दहा हजार पेंढारी नेमावरांतून बाहेर पडले, ते ता. १० मार्च रोजीं मच्छलिपट्टण जिल्ह्यांत दाखल होऊन तेथून दक्षिणेस मद्रास इलाख्यांत घुसले. दररोज ४० मैलांची मजल आणि ५० खेड्यांची धूळदाण ते करीत. गुंटूर व कडपा जिल्हे लुटून ता. १२ मार्च रोजीं कृष्णा उतरून ते उत्तरेस गेले. त्यांजवर ठिकठिकाणच्या इंग्रजी फौजा चालून गेल्या, त्यांस पेंढाऱ्यांनीं साफ चकविलें. त्यांनीं आपल्या टोळ्यांचे अनेक विभाग केले आणि कृष्णा कांठानें हैदराबादेचा मुलूख जिंकीत ते पेशव्यांचे राज्यांत घुसले. तसेच त्यांच्या कांहीं टोळ्या मध्य हिंदुस्थानच्या पूर्व भागांतून लुटालूट करीत गेल्या. अशा रीतीनें ता. १७·५·१८१६ रोजीं पुनः ते सर्व पेंढारी लोक नर्मदा पार होऊन मोठी लूट मिळवून नेमावरांत परत आले. मिळून स० १८१५ च्या दसऱ्यापासून पुढील सालच्या पावसाळ्यापूर्वी त्यांनीं पूर्व व दक्षिण हिंदुस्थान दोन वेळां पादाक्रान्त केलें. यावरून त्यांची दौड किती भारी होती याची कल्पना होईल. पेंढाऱ्यांच्या या स्वारीनें किती नुकसानी झाली याचा तपास इंग्रजांनीं केला असतां असें आढळून आलें, कीं मद्रास इलाख्यांत बारा दिवस त्यांचा मुक्काम होता, तेवढ्या अवधींत त्यांनीं १८२ लोक ठार मारले, ५०० जखमी केले आणि साडेतीन हजारांना अनेक यातना सहन करण्यास लाविलें. शिवाय नक्त ऐवज दहा लाखांचा नेला. आज दोन तीन वर्षे इंग्रज पेंढाऱ्यांचा पिच्छा पुरवूं लागले हें पाहून त्यांनीं देखील वरील स्वारी मुख्यतः इंग्रज व निजाम यांच्याच मुलखांत केली. मराठ्यांचा मुलूख लुटूं नये असें त्यांनीं आपलें धोरण मुद्दामच ठेविलें होतें. सर्व मराठ्यांनीं पेंढाऱ्यांस साह्य करावें अशी खटपट करणारा मुख्य इसम वाघापुरचा पाटील बाळोजी कुंजर होय. वसईच्या तहानें बाजीराव जखडला गेला असें पाहून त्याच्या आज्ञेनें तो सिंद्याकडे इंग्रजांविरुद्ध खटपट करण्याकरतां गेला तो फिरून बाजीरावाचे भेटीस येऊं शकला नाहीं. त्याची लायकी कशीही असली तरी इंग्रजांचा तो अत्यंत द्वेष करी, आणि मराठ मंडळाची जूट उभारून इंग्रजांचा पाडाव करण्याची त्यानें शिकस्त केली. त्यानें सर्व पेंढारी सरदारांच्या भेटी घेतल्या, आणि त्यांस इंग्रजांवर चाल करण्याची भर दिली. स० १८१५ च्या आरंभीं सिंद्याच्या छावणींतून निघून तो नागपुरास गेला, तेथून तो नेमावरास जाऊन सीतूस भेटला. एका बाजूनें पेंढाऱ्यांनीं इंग्रजांचा उच्छेद चालवावा आणि त्याच संधींत ठिकठिकाणच्या मराठ्यांनीं एकदम इंग्रजांवर शस्त्र धरावें अशी

योजना तो घडवून आणीत होता. या खटपटीचा उगम पुण्यांतून बाजीरावामार्फत चालला होता. गंगाधर शास्त्र्याच्या खुनामुळें त्रिंबकजी डेंगळ्याचें प्रकरण सुरू झाल्यापासून बाजीरावाचे मनांत इंग्रजांबद्दल अत्यंत द्वेष उत्पन्न होऊन त्यानें सिंदे होळकर पेंढारी वगैरेंना इंग्रजां विरुद्ध उठविण्याचा जोराचा प्रयत्न सुरू केला. एल्फिन्स्टनसारखा वस्ताद इंग्रज पुण्यास त्याचे छातीवर बसून त्याचीं कारस्थानें युक्तीनें व दांडगाईनें म्हणून पाडीत होता म्हणूनच बाजीरावाचे प्रयत्न सिद्धीस गेले नाहींत.

**४ पेंढाऱ्यांबद्दल मराठ्यांची आपुलकी.**—पेंढाऱ्यांचा उगम व विस्तार कसा झाला हें येथें सांगण्याची जरूर नाहीं. त्यांची उत्पत्ति मराठी राज्याच्या आरंभापासूनची आहे. मुख्य लढाई आटोपल्यावर शत्रुपक्षाची लूट करून त्याचा फन्ना उडविण्याचे कामीं सर्व मराठे सरदार आपल्याबरोबर पेंढाऱ्यांचीं पथकें नेहमींच बाळगीत. मराठ्यांची मुलूखगिरी बंद पडल्यावर इंग्रज सरकारानें या पेंढाऱ्यांचा बोभाटा मतलबासाठीं केला, ही गोष्ट विशेष लक्षांत घेण्याजोगी आहे. इंग्रजांनीं आपल्या नवीन कवाइती फौजा बनविल्या, त्या बिलकूल पिढीजाद हिंदी वळणाच्या नव्हत्या. त्या फौजांस क्षत्रियत्वाचें स्वरूप नव्हतें. त्याला बंधनें होतीं तीं लष्करी कायद्याचीं व शिस्तीचीं होतीं, जातीचीं नव्हतीं. महारपोर अठरापगड जातींचे व नाना पेशांचे पोटभरू लोक एकत्र जमवून त्यांस कवाईत शिकवून इंग्रजांनीं आपली फौज बनविली. अशा विसकळित वृत्तीच्या लोकांस मराठी राज्याचा किंवा हिंदु धर्माचा बिलकूल अभिमान वाटत नव्हता. मराठी राज्याची एकंदर रचना मूलतः तरी धार्मिक व क्षत्रिय बाण्यावर सिद्ध झालेली होती. त्याचे अगदीं उलट बाणा इंग्रजी फौजांचा होता. जो पोटास देईल त्याची नोकरी करावी, आणि वरचे अंमलदार करतील तो हुकूम बेधडक उठवावा, तो बरा आहे किंवा वाईट आहे याचा विचार करणें आपलें कर्तव्य नाहीं, अशी वृत्ति या इंग्रजी पलटणांची बनली. त्या पलटणांत मराठे, मुसलमान, कानडे, तेलंगी, पूरभये, महार, मांग वगैरे अनेक प्रकारचे लोक होते. त्यांच्या ठिकाणीं राष्ट्राभिमान बिलकूल उत्पन्न झाला नाहीं यांत नवल नाहीं. सारांश, इंग्रजांची सार्वभौम सत्ता कायम होतांच मराठ्यांचा मुख्य धंदा बंद पडला, आणि त्यांना निर्वाहाचें क्षेत्र राहिलें नाहीं. उरली सुरली क्षत्रिय वृत्ति व राष्ट्रप्रेम लयास गेलें. वैश्यवृत्तीचे शेतीचे किंवा अन्य उद्योगाचे धंदे अंगवळणीं पडण्यास त्यांस पुढें बराच काळ लागला. या संक्रमणकाळांत पेंढारी या संज्ञेनें मराठे आपला निर्वाह करूं लागले आणि पूर्वी शिस्तीचें जें कांहीं थोडें बंधन त्यांस होतें तें साफ नाहींसें

होऊन केवळ लुटालूट व जाळपोळ एवढेंच त्यांचें स्वरूप फैलावूं लागलें; आणि तें इंग्रजांस दुःसह झालें.

पेंढाऱ्यांचा मुख्य भरणा मध्य हिंदुस्थानांत सिंदे आणि होळकर यांचे पदरीं होता. त्यावरून त्यांना सिंदेशाही व होळकरशाही अशीं नांवें मिळालीं होतीं. स. १७९४ त महादजी सिंद्यानें आपल्या पदरच्या **हीरू** आणि **बुराण** या दोन पेंढारी सरदारांस नर्मदोत्तरच्या विंध्याद्रींतील कांहीं प्रदेश तोडून दिला. लांब लांब मजला करण्यांत पेंढाऱ्यांची बरोबरी करूं शकणारे दुसरे स्वार कोणी नव्हते, त्यामुळें त्यांच्याशीं सामना करून त्यांचा पाडाव करणें अवघड होत असे. स. १८०० च्या सुमारास हीरू नागपुर येथें व बुराण अशीरगड येथें मरण पावले. हीरूच्या पश्चात् त्याचे मुलगे दोस्तमहंमद व वसील महंमद प्रसिद्धीस आले. परंतु त्यांचे अगोदरच होळकराचे पदरचा **करीमखान** जास्त पुढें आला. करीमखानास यशवंतरावासारख्या धाडशी व कर्तबगार सरदाराचा आश्रय मिळाल्यामुळें त्याचा उत्कर्ष फार लवकर झाला. कांहीं काळानें त्यास सिंद्यानें होळकराकडून काढून आपल्या पदरीं घेतलें. भोपाळच्या राज्यावर ताव मारणारा मुख्य पेंढारी सरदार हा करीमखान होय. उत्तरेस चंबळच्या मुखापासून आग्नेयीस गोदावरीच्या मुखापर्यंत जो विस्तृत प्रदेश आहे, तो सर्व कैक वर्षें करीमखान व इतर पेंढारी सरदारांनीं अगदीं उद्ध्वस्त करून टाकिला. स. १८०६ सालीं माळव्यांत करीमखानाच्या ताब्यांत जो प्रदेश होता त्याचें सालाचें उत्पन्न १५ लाख होतें. ह्या त्याच्या वाढत्या सत्तेची दौलतरावास दहशत पडून त्यानें स. १८०६ त त्यास भेटीस बोलावून अचानकपणें कैद केलें आणि पांच वर्षें पर्यंत ग्वालेरच्या किल्ल्यांत अडकवून ठेविलें. याप्रमाणें करीमखान ठिकाणीं बसल्यामुळें दुसरे दोन पेंढारी सरदार दोस्तमहंमद आणि सीतू यांस पुढें येण्यास संधि मिळाली. नामदारखान म्हणून करीमचा एक चेला होता त्यानें सिंद्याचे मुलखांत धुमाकूळ मांडून आपल्या धन्याचा सूड पुष्कळसा उगविला. स. १८११ त कोटाच्या जालीमसिंगा मार्फत ६ लाख रुपये सिंद्यास दंड देऊन करीमखानानें आपली मुक्तता करविली; आणि लगेच आपला पहिला उद्योग अशा निकरानें चालविला कीं अल्पावकाशांत त्याची सत्ता चहूंकडे अनिवार वाढली. दुसरा पराक्रमी सरदार सीतू यानें करीमखानाशीं संगनमत केलें. त्या दोघांनीं स. १८११ सालच्या दसऱ्याचा समारंभ नेमावर प्रांतांत अपूर्व थाटानें साजरा केला. त्या समारंभास जें प्रचंड घोडदळ जमलें होतें, तें घेऊन भोसल्यांचा वऱ्हाड नागपुर प्रांत लुटावा अस

करीमचा बेत होता. ही बातमी भोसल्यांस कळतांच त्यांनीं सीतूस जहागीर देऊन आपल्या बाजूस वळविलें. त्यामुळें करीमखानाचा बेत सिद्धीस गेला नाहीं. अशा रीतीनें सीतू व करीमखान यांचें वितुष्ट आल्यामुळेंच पेंढाऱ्यांचा नाश झाला, नाहीं तर त्यांचें सामर्थ्य अपरिमित वाढण्याचा संभव होता. सिंद्यानें जगोबा बापूस फौज देऊन करीमखानावर रवाना केलें; त्यास सीतू सामील झाला आणि दोघांनीं करीमखानावर चाल केली. तेव्हां मनोहरठाणा येथें करीमखानाचा पाडाव होऊन तो पळून अमीरखानाचे आश्रयास गेला. तेव्हां सिंदे होळकरांनीं अमीरखानाकडून त्यास पुनः कैद करविलें. तो स. १८१६ च्या अखेरपर्यंत कैदेंतच होता. ही संधि साधून सीतूनें लगेच आपली चढाई सुरू केली. नर्मदेच्या उत्तरेस नेमावर प्रांतांत आपली छावणी ठेवून तो चहूं बाजूंस घाले घालूं लागला. दरसालचा दसऱ्याचा समारंभ भपकेबाज करून तो आपलें ऐश्वर्य प्रगट करी. स० १८१४ सालीं सीतूची फौज १५ हजार, करीमखानाची चार हजार, दोस्तमहंमदाची सहा हजार आणि दुसऱ्या एकंदर सरदारांची आठ हजार; अशी एकंदर ३३ हजार पेंढारी फौजेची संख्या होती. दसऱ्याचे प्रसंगीं एवढ्या प्रचंड फौजेचा जमाव पाहून लोकांस मोठी दहशत बसे.

पेंढाऱ्यांची सर्व भिस्त घोडेस्वारांवर होती. ते तोफा व पायदळ बाळगीत नसत. पण या पेंढारी सरदारां खेरीज दुसरे दोन पठाण सरदार **अमीरखान** व **शहामतखान** नांवाचे बऱ्याच मोठ्या फौजा बाळगून यशवंतराव होळकराचे पदरीं राहून एक प्रकारची मुलूखगिरी करीत होते. या दोघांजवळ घोडेस्वारांशिवाय कांहीं पायदळ व तोफखानाही होता, व शिस्तीच्या संबंधानें या दोन पठाण सरदारांच्या फौजा हुबेहूब युरोपियनांच्या तोडीच्या होत्या. त्यांना पगार महिनेमहाल वेळेवर देण्यांत येत असे. सिंदे, होळकर, राजपूत राजे वगैरे स्थाइक सत्ताधीशांस लढाई वेढे इत्यादि कामांत उत्कृष्ट साह्य त्यांनीं केलें. पेंढाऱ्यांप्रमाणें ते नुसत्या लुटीसाठीं बाहेर पडत नसत. मुख्यतः राजपूत राजांच्या आपसांतील भांडणांत त्यांनीं आपला फायदा करून घेतला. मराठ्यांप्रमाणेंच हे दोघे पठाण सरदार मुलूखगिरीवर जात आणि राजकीय व्यवहारांत होळकरांचेच नांवाचा ते उपयोग करीत. त्यामुळें त्यांचा उद्योग दौलतराव सिंद्यास जाचक होऊं लागला. त्याचा सरदार बापू सिंदे अजमीर येथें होता त्यानें या पठाणांवर थोडा बहुत धाक बसाविला. शहामतखान स० १८१४ च्या अखेरीस मरण पावला, तेव्हां त्याच्या हाताखालची फौज अमीरखानानें आपल्या पदरीं ठेविली. त्यामुळें अमीरखानाचा जमाव चांगला तीस हजार झाला. होळकरांचें

सगळें राज्य त्याच्याच तंत्रानें चाललें होतें; आणि भोसल्यांचें राज्य तो हस्तगत करण्यास उद्युक्त झाला होता, पण इंग्रजांनीं त्यास प्रतिबंध केला. एवढ्या अनुभवी व बलिष्ठ सरदाराची भीति इंग्रजांस वाटली यांत नवल नाहीं. अमीरखान व शहामतखान यांनीं आपल्या फौजांत पाश्चात्य कवाईत व तोफखाना यांची सिद्धता इंग्रजांसही मागें टाकील अशा पद्धतीची बनविली होती.

या पेंढाऱ्यांबद्दल मराठी राज्यांची भावना आपुलकीची होती. हे आपलेच लोक आहेत, यांचा निःपात करूं नये असें मराठे सत्ताधीशांस वाटे. इंग्रजांनीं आपलीं राज्यें नाहींशीं केलीं याचा खेद त्यांस वाटत होता, आणि जेणेंकरून इंग्रजांच्या अडचणी वाढतील आणि पूर्वीची आपली सत्ता थोडी बहुत कायम राहील, अशा गोष्टी त्यांस पाहिजेच होत्या. म्हणून पेंढाऱ्यांनीं इंग्रजांचे मुलखांत धुमाकूळ मांडलेला पाहून या राजांस तितकेंच बरें वाटलें, आणि त्यांचा निःपात करण्याचा उद्योग इंग्रजांनीं हातीं घेतला, त्यास त्यांनीं मनापासून अनुकूलता दर्शविली नाहीं. वास्तविक पेंढाऱ्यांचा हा उपद्रव यशवंतराव होळकराच्या युद्धापासूनच सुरू झाला होता. खुद्द यशवंतराव तर इंग्रजांच्या दृष्टीनें एक प्रचंड पेंढारीच होता असें म्हणण्यास हरकत नाहीं. परंतु लगोलग पेंढाऱ्यांवर शस्त्र उचलण्याचें धैर्य इंग्रजांस झालें नाहीं. परिस्थितीचा उमज पडण्यास उभय पक्षीं कांहीं काळ जाणें अपरिहार्य झालें. अंदाजीं स. १८०६ पासून मराठे सरदारांच्या आश्रयास राहणारे बरेचसे लोक निर्वाहाचें साधन गेल्यामुळें पेंढाऱ्यांत सामील झाले. तेणेंकरून हे पेंढारी बळावत चालले. आरंभीं चार दोन वर्षे त्यांचा उच्छेद बेताचाच होता तोंपर्यंत त्यांजकडे इंग्रजांनीं लक्ष दिलें नाहीं. पण इ. स. १८१०-११ पासून पेंढाऱ्यांचे थवे उत्तरोत्तर इंग्रजी मुलखांत धुमाकूळ घालूं लागले, त्यावरून एक दोन वर्षे येथील इंग्रज अधिकाऱ्यांची इंग्लंडचे सरकाराशीं वाटाघाट चालली, आणि तिकडून योग्य हुकूम आल्यानंतर लॉर्ड हेस्टिंग्सनें पेंढाऱ्यांचे बंदोबस्ताचें काम हातीं घेतलें.

**५ पेंढाऱ्यांवरील मोहिमेची पूर्व तयारी** (स. १८१७).—जयपुर, पुणें, नागपुर व भोपाळ इत्यादि प्रकरणांची तड लावल्या शिवाय पेंढाऱ्यांवर चढाई करणें इंग्रजांस शक्य वाटलें नाहीं. कारण समस्त संस्थानांचा पाठिंबा इंग्रजांस असल्याशिवाय पेंढाऱ्यांचा पाडाव झाला नसता. किनाऱ्याच्या बाजूंनीं जरी इंग्रजांनीं मराठ्यांचा मुलूख घेरला होता तरी मध्यें शेंकडों मैलांचा मुलूख संस्थानिकांच्या ताब्यांत असल्यामुळें हे पेंढारी लोक इंग्रजी मुलखांतून हुसकून लावल्याबरोबर

संस्थानांचे हद्दींत घुसत, आणि इंग्रजांशीं वितुष्ट असलेले संस्थानिक उलट त्यांस उत्सुकतेनें मदत करीत. संस्थानांच्या या भानगडी मिटविण्यांत १८१६ साल निघून गेल्यामुळें त्या सालीं योजलेली पेंढाऱ्यांवरची इंग्रजांची मोहीम सिद्ध होऊं शकली नाहीं. याच संधींत हातरस किल्ल्याचें प्रकरण उपस्थित झालें, त्याचा मराठी राजकारणाशीं प्रत्यक्ष संबंध नसला, तरी त्यामुळें लहानशा प्रकरणावरून हिंदी लोकांची चलबिचल कशी होत असे हें दिसून येईल. गंगा यमुनांच्या दुआवांत अलीगड परगण्यांत हल्लीं असलेलें **हातरस** नांवाचें रेल्वेचें एक प्रसिद्ध ठिकाण वाचकांस ठाऊक असेलच. हा प्रदेश सिंद्याकडून इंग्रजांस मिळालेला होता. दयाराम व भगवंतसिंग या नांवाचे दोन जमीनदार हातरस किल्ल्यांत राहून राजरोसपणें सभोंवारचा प्रदेश लुटून उद्ध्वस्त करूं लागले. दयाराम हा भरतपुरच्या जाटाचा नातेवाईक होता. त्यानें हातरसच्या किल्ल्याची मजबुदी इतकी चांगली केली कीं, तो किल्ला सर्वथा अजिक्य आहे अशी उत्तर हिंदुस्थानांत सामान्य समजूत पसरली. ही समजूत काढून टाकण्याकारितां ग० ज० नें हातरस जिंकण्यासाठीं चहूंकडून फौजा रवाना केल्या. ता. ११·२·१८१७ रोजी इंग्रज फौजांनीं किल्ल्यास वेढा घालून दयारामास स्वाधीन होण्याविषयीं आव्हान केलें. तें त्यानें नाकबूल करतांच मोठमोठ्या प्रचंड तोफांनीं इंग्रजांनीं चहूंकडून ता. १ मार्च रोजीं किल्ल्यावर मारा केला, त्याबरोबर पुष्कळ ठिकाणीं तट कोसळून पडला. दयाराम पळून गेला आणि भगवंतसिंग स्वाधीन झाला. त्यावरून इंग्रजांच्या अशा माऱ्यापुढें कोणतेंही ठिकाण दुर्भेद्य नाहीं अशी लोकांची खातरी झाली. याप्रमाणें अनेक भानगडींची निरवानिरव संपूर्ण झाल्यावर सन १८१७ च्या पावसाळ्यांत हेस्टिंग्सनें पेंढाऱ्यांवर स्वारी करण्याची सिद्धता चहूंकडून केली. होळकर, अमीरखान, जोधपुर, जयपुर, उदेपुर, कोटा, बुंदी, बासवाडा, बिकानेर, जसलमीर व किरवली इतक्यांशीं तहाच्या वाटाघाटी करून स्वारीची सिद्धता करण्याचें काम हेस्टिंग्सनें दिल्लीचा रेसिडेंट मेटकाफ याला सांगितलें. सिंद्याचे दरबारीं कॅप्टिन क्लोज * रेसिडेंट होता त्याजकडे सिंद्याचें साह्य मिळविण्याची कामगिरी सोंपविण्यांत आली बुंदेलखंडचा रेसिडेंट वॉशोप म्हणून होता त्याजकडे झांशी, सिमथर, जालौन, दतिया, तेहरी व सागर इतक्या संस्थानांची पेंढाऱ्याचे स्वारीसाठीं व्यवस्था ठेवण्याचें काम देण्यांत आलें. भोपाळचा नबाब

* हा सर बॅरीक्लोज नव्हे. तो यापूर्वींच मेला होता.

नजरमहंमद याजकडे बोलणें करण्याचें काम नागपुरच्या जेंकिन्सला सांगण्यांत आलें. सर टॉमस हिसलॉप आणि सर जॉन माल्कम हे दोघे त्याच कामगिरीवर दृष्टि ठेवीत नर्मदेवर नेमण्यांत आले. या संबंधांत पुण्यास बाजीरावाकडे चालविलेलें अनुसंधान पुढें स्वतंत्र सांगण्यांत येणार आहे.

अशा प्रकारें युद्धाची तयारी सुरू असतां स. १८१६ च्या पावसाळ्यांत त्रिंबकजी डेंगळे ठाण्यांतून पळून गेला, नागपुरचे दरबारांत आप्पासाहेबानें गडबड उडवून दिली, आणि सिंद्याची फौज भोपाळवर चालून गेली. अशीं हीं फाटलेलीं प्रकरणें आवरण्यांत स० १८१७ चा पावसाळा प्राप्त झाला. बाजीरावाला कायम बांधून टाकण्याचा तह झाल्यामुळें मराठ्यांची मुख्य भीति उरली नाहीं असें वाटून त्या सालच्या पावसाळ्यांत पेंढाऱ्यांवर मोहीम करण्याचा बेत ठरवून हेस्टिंग्सनें त्यासंबंधाची लष्करी व्यवस्था निश्चित केली. बाजीरावानें तह करून दिला खरा, परंतु त्यामुळें अत्यंत उद्विग्न होऊन तो एलफिन्स्टनची रजा घेऊन ता. १८ जून रोजीं पंढरपुरास निघून गेला. सरदारांचे वकील पुण्यास राहत असत, त्यांस घालवून देण्याचें कलम तहांत बाजीरावानें कबूल केलें होतें, परंतु उघडपणें वकील म्हणून पुण्यास न राहतां खाजगी रीतीनें सिंदे भोसल्यांचे हस्तक पुण्यास राहून खटपट करूं लागतील तर ती तहानें बंद पाडणें शक्य नव्हतें. परंतु मराठमंडळांतील बाजीरावाचें प्रमुखपण नाहींसें झाल्याचा पुकारा होतांच मध्यवर्ती सत्ता आपोआप ढासळली, त्याचा फायदा घेऊन गुजरातेंत इंग्रजांनीं गायकवाडांपासून पुष्कळसे फायदे करून घेतले.

पेंढाऱ्यांच्या निवासाचें मुख्य स्थान सिंदे होळकरांचे प्रदेश व राजपुताना एवढ्या वर्तुळांत समाविष्ट झालें होतें. या वर्तुळाचे आंत त्यांचा कोंडमारा करून बाहेर जाण्यास त्यांस सवड ठेवूं नये अशी ग० ज० ची योजना होती. त्यासाठीं बुंदेल-खंडांत कालिंजर येथें व उत्तरेस यमुनेच्या कांठावर मुख्य इंग्रज फौजा जमविण्यांत आल्या; आणि मद्रासची फौज सर टॉमस हिस्लॉप याच्या हाताखालीं दक्षिणच्या टापूंत ठेवण्यांत येऊन नर्मदेच्या उत्तरेकडील व्यवस्था खुद्द ग० ज० नें आपल्या हातांत घेतली. दुसरी एक गोष्ट त्यानें अशी जाहीर केली कीं, पेंढाऱ्यांवरील या मोहिमेंत हिंदुस्थानांतील सर्व लहान मोठ्या सत्ताधीशांनीं इंग्रजांस सामील झालेंच पाहिजे, मग ते सत्ताधीश इंग्रजांच्या तैनाती फौजा बाळगणारे असोत वा नसोत. जो कोणी या मोहिमेंत सामील होणार नाहीं, तो इंग्रजांचा शत्रु असें समजून त्याजवर सुद्धां

युद्ध पुकारलें जाईल. ही गोष्ट जाहीर करण्याचा हेतु असा कीं, एतद्देशीय सत्ताधीशांचें साह्य मिळालें तर इंग्रजांस हवेंच होतें, पण निदान त्यांनीं जाऊन पेंढाऱ्यांस सामील तरी होऊं नये एवढी खात्री पाहिजे होती. मोहिमेच्या व्यवस्थेकारितां खुद्द ग० ज० ता. ८.७.१८१७ रोजीं कलकत्त्याहून निघून सेप्टेंबरांत इटावा येथील मुख्य लष्करी छावणींत जाऊन राहिला. सर जॉन माल्कम हा आदल्या वर्षी इंग्लंडास रजेवर गेला होता तो सन १८१७ च्या आरंभींच परत आला, त्याची नेमणूक ग० ज० नें हिस्लॉपचे जोडीस राजकारणाचे कामासाठीं म्हणून केली, आणि नर्मदेवर त्याचे हाताखालीं कांहीं फौज ठेविली. दक्षिणेंत या मोहिमेवर हिस्लॉपचे हाताखालीं कर्नल्स डोव्हटन, स्मिथ, फ्लॉयर आणि प्रिट्झ्लर हे चार मुख्य इंग्रज अंमलदार नेमण्यांत आले. या चौघांचा नामनिर्देश बाजीरावाचे प्रकरणांत येईल. वास्तविक पेंढाऱ्यांच्या मोहिमेची कच्ची हकीकत येथें देण्याचा उद्देश नाहीं. मराठ्यांचे व्यवहार समजण्या पुरताच त्यांचा उल्लेख करावयाचा आहे. दिल्लीस मेट्काफ, सिंद्याजवळ कॅप्टिन क्लोज, नागपुरास जेंकिन्स व पुण्यास एल्फिन्स्टन हे इंग्रज रेसिडेंट आपआपल्या टापूंतील एतद्देशीय संस्थानिकांचें संधान बाळगून त्यांजवर देखरेख ठेवण्यास सिद्ध झाले. त्या कामीं योग्य त्या सूचना त्यांस व त्यांचे मार्फत समस्त सत्ताधीशांस सेप्टेंबरांतच देण्यांत आल्या. सर जॉन माल्कम यास ग० ज० नें पुढील युद्धाचा सर्व बेत समजावून देऊन पुढें त्यास बाजीराव, सिंदे, होळकर, निजाम यांजकडे समक्ष भेट घेऊन परिपूर्ण समजुती देण्यासाठीं पाठविलें. जूनपासून सेप्टेंबरपर्यंत माल्कमनें ठिक-ठिकाणीं प्रवास करून युद्धाच्या व राजकारणाच्या योजना ठरवून दिल्या. याच प्रवासांत माल्कम बाजीरावास माहुली येथें ऑगस्टचे पहिल्या आठवड्यांत भेटला तो प्रकार पुढें येईल. ता. १६ ऑक्टोबर रोजीं ग० ज० नें कानपुर सोडून पुढें यमुनेच्या कांठीं आग्र्याच्या समोर मुक्काम केला. इकडे बाजीरावानें या वेळीं सिंदे होळकर भोसल्यांकडे आपलीं संधानें विशेष जोरानें करून सर्वांनीं इंग्रजांचा बेत हाणून पाडण्याचा उद्योग केला, त्यावरून जिकडे तिकडे एकच दंगल सुरू झाली, आणि एतद्देशीय रजवाड्यांत मोठी चलबिचल उडून गेली. विशेषतः सिंद्याचे सरदार शिरजोर होऊन दौलतरावाचेंही हुकूम मानीनातसे झाले. दक्षिणेंतील नाक्याचें ठिकाण अशीर-गडचा किल्ला सिंद्याचे ताब्यांत असून तेथें यशवंतराव लाड म्हणून सिंद्याचा किल्लेदार होता, त्याची धूर्तता पुढें निदर्शनास आली. ता० ५ नोव्हेंबर रोजीं या युद्धाचे निमित्तानें ग० ज० नें सिंद्याशीं नवीन तह केला, तो पे. अ. बखर पृ० ८९.

वर तपशीलवार दिलेला आहे तो येथें ध्यानांत आणिला पाहिजे. या तहानें पेंढाऱ्यांचे युद्धांत ' तुम्हांस मनापासून साह्य करूं ' असें सिंद्यानें आपणास बांधून घेतलें. सिंद्याचा वकील रामकृष्ण भास्कर व इंग्रजांचा कॅप्टिन क्लोज यांनीं हा तह घडवून आणिला. सिंदे व बाजीराव दोघेही नेभळट वृत्तीचे इंग्रजांशीं चढाईनें वागण्यास अगदीं असमर्थ होते. खुद्द एल्फिन्स्टन लिहितो, " बाजीरावाच्या नेभळट स्वभावामुळेंच या वेळीं मराठ्यांची बाजू यशस्वी झाली नाहीं. आम्ही वारंवार पेशव्यास दरडावून त्याजकडून पाहिजे तशा अटी कबूल करून घेतल्या. त्यांत बाजीरावाचे ऐवजीं दुसरा एखादा शूर व तरतरीत पेशवा असता तर आमची गत काय झाली असती याचा विचार करणें फारसें कठिण नाहीं. इंग्रजांवर जोरानें चढाई करण्याचीं सर्व साधनें मराठ्यांकडे या वेळीं भरपूर होतीं. फौजा, पैसा, शस्त्रास्त्रें, दारू गोळा इत्यादि सर्व कांहीं सिद्ध होतें. पण दक्षिणेंत बाजीरावानें किंवा उत्तरेंत दौलतरावानें यत्किंचित् हिंमत दाखविली नाहीं. उलट त्यांनीं राष्ट्रद्रोहच केला असें म्हणावें लागेल." दौलतरावाचें वर्तन विशेष लक्षांत ठेवण्याजोगें आहे. अंबूजी इंगळे सन १८०९ सालीं मरण पावला, तेव्हां गोहद व ग्वालेर हे परगणे त्याच्या जहागिरींत मोडत असलेले आपल्या ताब्यांत घेण्याची संधि दौलतरावानें फुकट घालविली नाहीं. स. १८१० सालीं ग्वालेरीस जाऊन दौलतरावानें आपल्या लष्कराची छावणी केली, ती अद्याप पावेतों लष्कर या नांवानें प्रसिद्ध आहे. दौलतरावाच्या अंगीं थोडीशी करामत असती तर या अखेरच्या धामधुमींत मराठी राज्याचा जम बसविण्याची त्यास चांगली संधि होती. इंग्रजांनीं आपलें चढाऊ धोरण बंद ठेविलें होतें. यशवंतराव होळकर मरण पावल्यामुळें त्याचा एक जबरदस्त प्रतिस्पर्धी नाहींसा होऊन सर्व हिंदुस्थान त्यास मोकळें होतें. राजपूत राजांवर त्याची हुकमत कायम होती. सर्जेराव घाटगे, अंबूजी इंगळे वगैरे सरदार नाहींसे झाल्यानें दौलतरावास आपला पराक्रम दाखविण्यास पुष्कळ वाव होता. त्याचें वय या वेळीं तीस वर्षांचें असून नाना तऱ्हेच्या माणसांचा, प्रकरणांचा व समस्त हिंदी राजकारणाचा त्यास भरपूर अनुभव आलेला होता. किंबहुना सन १७९५ पासूनच्या हिंदी राजकारणाच्या प्रखर तापलेल्या भट्टींतून तो चांगलाच तावून सुलाखून व पुष्कळसा होरपळून निघालेला होता. नर्मदेपासून सतलज पर्यंतच्या प्रदेशांत त्याची प्रत्यक्ष हुकमत होती. याच वेळीं हिंदच्या क्षितीजावर दुसरा एक पराक्रमी तारा, पंजाबचा केसर रणजितसिंह उगवला होता. पण रणजितसिंहापेक्षां पुष्कळ गोष्टींची अनुकूलता दौलतरावास ज्यास्त होती. एवढेंच

नव्हे तर इकडे नेपाळचें युद्ध व युरोपांत नेपोलियनचा ससेमिरा या दोन कारणांनीं इंग्रज राष्ट्र बरेंच गोत्यांत आलें होतें. थोडीशी दूरदृष्टि किंवा स्फूर्ति दौलतरावांत असती, तर समान धर्मांच्या भावनेनें राजपुतांस जोडून घेऊन आणि हलके हलके आपलें बस्तान बळकट करून, तयारी होतांच इंग्रजांशीं सामना देण्याचें सामर्थ्य त्यास आलें असतें. फौजेचे देण्यापुढें तो अगदीं गांगरून गेला होता ही गोष्ट खरी; परंतु पतंग खेळण्यांतलें लक्ष अल्पांशानें त्यानें कारभारांत घातलें असतें तर ताब्यांतील प्रदेशाची व्यवस्था लावून जरूरी पुरता पैसा त्यास वसूल करतां आला असता. इंग्रजांनीं सुद्धां तीच गोष्ट केली. जो मुलूख ताब्यांत आला तेथली व्यवस्था लगेच लावून इंग्रजांनीं पैशाची व्यवस्था सुरळीत चालविली. परंतु अव्यवस्थित कारभारामुळें पैशाच्या अडचणींतून दौलतराव मरेपर्यंत मोकळा झाला नाहीं. अनुभवानें कांहीं एक शहाणपण तो शिकला नाहीं. पूर्वींचे नाद व खर्च त्यानें सोडले नाहींत, आणि स. १८१० पासून १८१५ पर्यंतच्या उत्कृष्ट संधीचा उपयोग त्यानें राष्ट्राच्या कार्याकडे बिलकूल केला नाहीं. या राष्ट्रघाताची संपूर्ण जबाबदारी त्याजवर येते. बाजीराव जरी मराठी राज्याचा मुख्य चालक होता तरी इंग्रजांनीं त्याचे हातपाय जसे व जितके आखडून टाकले तितके दौलतरावाचे टाकले नव्हते. तो पुढारपण स्वीकारता तर त्याचे हुकूम झेलण्यास हिंदुस्थानचे सत्ताधीश उत्सुक झालेले होते. सन १८५७ सालचें बंड यशस्वी कां झालें नाहीं असा प्रश्न एका गृहस्थानें सुप्रसिद्ध सर जॉन लॉरेन्स यास विचारला, तेव्हां त्यानें जबाब दिला, कीं 'केवळ नशीबानें आम्हांला हात दिला म्हणून आम्हीं बचावलों हें तर खरेंच. परंतु बंडाच्या पाडावाचीं कारणेंच हुडकूं लागल्यास त्यांच्या दीड लाख भरतींत सेनापतीचें काम यथायोग्य करणारा सबंध एक नव्हे अर्धा सुद्धां पुढारी कोणी नव्हता, हेंच सांगावें लागेल.' मराठ्यांच्या पाडावाची मार्मिक मीमांसा वरील उत्तरांत उपलब्ध होते. ( Hope's Sindia ).

**६ पेंढाऱ्यांचा पाडाव** ( स. १८१७-१८ ).—बुंदेलखंडाच्या बाजूस जो पेंढाऱ्यांचा मुख्य जमाव होता त्याजवर स. १८१७ च्या नोव्हेंबरांत चहूं बाजूंनीं इंग्रजांच्या फौजा चालून गेल्या. नोव्हेंबरच्या अखेरीस करीमखान व वसील महंमद हे नयासराईवरून ग्वालेरकडे जाऊं लागले, आणि सीतू पश्चिमेच्या बाजूस होळकराचे हद्दींत शिरला. सिंद्यानें आपला सरदार यशवंतरावभाऊ यास या स्वारींत इंग्रजांच्या मदतीस नेमिलें होतें. पण अंतस्थ रीतीनें यशवंतराव भाऊची मदत सीतूस होती. उदेपुर हद्दींत कमळनेरचा किल्ला यशवंतरावभाऊचे कब्जांत होता, तेथें त्यानें सीतूच्या

जनानखान्यास ठेवून घेतलें. त्याच वेळीं ग० ज० स्वतः मुख्यतः सिंद्यावर दहशत बसविण्याकरतां बुंदेलखंडांत येऊन बेटवा नदीचे कांठीं एलिच येथें राहिला. तेथून तो ता० ११ डिसेंबर रोजीं ग्वालेरच्या बाजूस सोनारी येथें आला. तेव्हां सिंद्यास एकदम मोठी दहशत पडली; आणि त्यानें करीमखान व वसील महंमद यांस कळविलें, कीं 'इकडे येऊन तुमचा निभाव लागणार नाहीं.' हे दोन पेंढारी सरदार ता. १३ डिसेंबर रोजीं झालावाड जवळ शाहबाद येथें होते. या ठिकाणीं निरनिराळ्या इंग्रज सेनापतींनीं चहूं बाजूंनीं घेरून त्यांस अत्यंत दमविलें. त्यामुळें नाइलाज होऊन त्यांचे बहुतेक लोक त्यांस सोडून गेले. तेव्हां सीतू, करीमखान, व वसील महंमद यांनीं उदेपुरच्या डोंगराळ प्रदेशांत प्रवेश केला. इकडे त्याच वेळीं मागून होळकराच्या फौजेनें इंग्रजांवर चढाई करण्याचा घाट घातल्यामुळें मेवाडच्या हद्दींत पेंढारी सरदारांचा पाठलाग इंग्रजांस लगेच करतां आला नाहीं. सगळ्यांत अत्यंत वस्तादगिरी सीतूनें केली. कैक दिवसपर्यंत मोठ्या शिताफीनें त्यानें मोठमोठ्या फौजांस झुकांड्या देऊन अत्यंत त्रासवून सोडिलें. मेवाडच्या हद्दींत इंग्रज त्याचे पाठीवर गेल्याबरोबर तिकडून परत फिरून तो मांडवगडच्या हद्दींत शिरला. करीमखान व वसील महंमद हेही परत फिरून चंबळ ओलांडून ता. १२·१·१८१८ रोजीं काली सिंध नदीवर कोट्री येथें मुक्कामास आहेत ही बातमी काढून, रात्रींच्या प्रहरीं त्यांजवर इंग्रज फौजेनें छापा घातला. त्या प्रसंगांत कित्येक पुढारी व पेंढाऱ्यांचे कित्येक लोक मारले गेले, आणि त्यांचा सर्व दम मोडून गेला. अशा स्थितींत 'तुम्ही आमच्या स्वाधीन झाल्यास तुमची सोय लावून देऊं' असें आश्वासन इंग्रजांनीं जाहीर करतांच, बरेचसे लोक त्याचा फायदा घेऊन आपण होऊन शरण आले. भोपाळहद्दींत देवराजपुर येथें ता. ३·२·१८१८ रोजीं नामदारखानही इतरांप्रमाणें कर्नल ॲडमचे स्वाधीन झाला. वसील महंमद दौलतराव सिंद्यास शरण गेला, तेव्हां सिंद्यानें त्यास इंग्रजांचे हवालीं केलें. करीमखान बरेच दिवस जावद येथें लपून होता. परंतु पुढें सर्व उपाय हरल्यामुळें तोही ता. १५ फेब्रुवारी रोजीं माल्कमचे स्वाधीन झाला. त्यास गोरखपुर येथें १२ हजार रुपये वार्षिक उत्पन्नाचें वतन इंग्रजांनीं करून दिलें. वसील महंमद यास इंग्रजांनीं पकडून गाजीपुर येथें ठेविलें. तेथून पळून जाण्याचा प्रयत्न केल्यावरून त्याचे इंग्रजांनीं इतके हाल केले, कीं ते दुःसह होऊन विषप्राशनानें त्यानें प्राणत्याग केला. सीतू मात्र बरेच दिवस मोकळा होता. जंगलाच्या आश्रयास राहून त्यानें पाठलाग करणारांस पुष्कळ काळ पर्यंत चांगलेंच चकविलें. ता. २५

जानेवारीस तो हंड्याजवळ कर्नोड येथें होता. बहुतेक लोक त्यास सोडून गेले. कांहीं दिवस त्यानें इंग्रजांचे स्वाधीन होण्याच्या वाटाघाटी भोपाळच्या नबाबाच्या मार्फत चालविल्या. आपल्या सर्व हाताखालच्या मंडळीसह इंग्रजांनीं आपणास नोकरीस घ्यावें, आणि माळवा प्रांतांत आपणांस जहागीर नेमून द्यावी अशी त्यानें मागणी केली. परंतु ती न कबूल करतां आपणांस इंग्रज नुसते पकडून घेणार असा त्यास संशय आल्यावरून तो रातोरात पळून गेला; आणि खानदेशाच्या बाजूस बरेच दिवस जंगलाच्या आश्रयानें राहिला. स० १८१८ च्या उन्हाळ्यांत कांहीं काळ त्यास बाजीराव व नागपुरकर आप्पासाहेब यांचा अंतस्थ पाठिंबा मिळाला. अशीरगडचा किल्लेदार यशवंतराव लाड यानें आप्पासाहेबास स. १८१९ च्या मार्च महिन्यांत किल्ल्यांत आश्रय दिला, परंतु त्याच वेळीं इंग्रजांच्या भीतीनें सीतूस त्यानें आंत घेतलें नाहीं. इंग्रजांच्या फौजा सभोंवार पाठीवर होत्याच. त्यांस चुकवीत सीतू व त्याचा मुलगा हे तेथील जंगलांत लपून छपून कांहीं काळ राहिले, आणि दोघे निरनिराळ्या वाटांनीं जंगलांतून पळून जात असतां सीतू एका वाघाचे भक्ष्यस्थानीं पडला. मागाहून त्याचा घोडा मोकळा चरतांना आढळला त्यावरून असा परिणाम पुढें निदर्शनास आला. घोड्यावर सीतूचें कांहीं सामान सांपडलें, त्यांत २५० रु. रोख, कित्येक मोहर करण्याच्या आंगठ्या, आणि आप्पासाहेब भोसल्यानें त्यास लिहून दिलेले कांहीं कागद सांपडले. त्या धोरणानें इंग्रजांनीं जंगलांत सीतूचा तपास चालविला. ते वाघाच्या पावलांचा माग काढीत चालले असतां सीतूचे कपडे रक्तानें भिजलेले सांपडले. त्या धोरणानें पुढें जातां हाडांचा सांपळा व त्याचें डोकें जंगलांत दिसलें. त्यावरून या अलौकिक साहसी पुरुषाचा असा अंत झाला हें कळून आलें. त्याचा मुलगा महंमद पहन्ना हाही पुढें लवकरच इंग्रजांस सांपडला. तेव्हां बाबाच्या अंत्यविधीसाठीं इंग्रजांनीं अत्यंत उदार अंतःकरणानें थोडीशी रकम त्यास दिली. सीतू पेंढाऱ्याचें हें चरित्र अत्यंत अद्भुत व त्या काळच्या वस्तुस्थितीचें निदर्शक आहे. राष्ट्रांत अराजक स्थिति उत्पन्न झाली म्हणजे शौर्य, साहस, पराक्रम इत्यादि उदात्त गुणांची माती होऊन राष्ट्राचा अधःपात कसा होतो हें या पेंढारी सरदारांच्या हकीकतींवरून चांगलें दिसून येतें. ऐतिहासिक दृष्टीनें पेंढारी सरदारांचीं चरित्रें अद्यापि लिहिलीं जाणें जरूर आहे.

**७ तुळसाबाईचा कारभार व खून** ( ता. २०·१२·१८१७ ).— यशवंतराव होळकर भानपुरा येथें मरण पावतांच त्याची आवडती रक्षा तुळसाबाई

इनें आपल्या सवतीचा चार वर्षांचा मुलगा मल्हारराव याची पदावर स्थापना करून अमीरखानाच्या साह्यानें कांहीं वर्षें कारभार चालविला. मल्हाररावाचे पदारोहणप्रसंगीं जालीमसिंग कोटेकर, लालाजी बल्लाळ, अमीरखान, गफूरखान, वगैरे सर्व प्रमुख सरदार व कारभारी हजर होते, आणि त्यांच्याच सल्ल्यानें तुळसाबाईनें नवीन व्यवस्था केली. मल्हाररावाचा मुक्काम बहुधा लष्करांतच छावणींत होत असे. मल्हाररावानें वस्त्रें घेण्याचे बाबतींत बाजीरावाकडे कांहीं एक विचारणा केली नाहीं. इंग्रजांस विचारतां त्यांनींही बाजीरावाची दरम्यानगिरी मान्य करूं नये असें सांगितलें. कारभारी पुष्कळ होते, पण लष्करी अंमलदारांचे हातीं सत्ता असून पैसा शिलकेंत नसल्यानें तुळसाबाईची फारच तारांबळ उडूं लागली. त्यांतून दौलतराव सिंदे सगळीच होळकरशाही घशांत टाकण्याच्या उद्योगांत होता. त्याच्या प्रतिकारासाठीं तुळसाबाईस इंग्रजांकडे संधान ठेवावें लागे. बाजीरावाची तर होळकरशाहीवर पहिल्यापासून वक्र दृष्टि असल्यामुळें या दोघां राहूकेतूंच्या तडाक्यांतून होळकरशाहीचा बचाव झाला याचें श्रेय यशवंत-रावाप्रमाणें तुळसाबाई व अमीरखान वगैरे सरदार यांसही दिलें पाहिजे.*

यशवंतरावाचे वेळचीं अनेक माणसें या वेळीं कारभारांत होतीं. त्यांत आरंभीं **बाळाराम शेट** व धर्माकुवर हे प्रमुख होते स. १८०५ त यशवंतरावाचा व इंग्रजांचा तह बाळारामानें घडवून आणला, तेव्हांपासून त्याजवर यशवंतरावाची मर्जी बसली. यशवंत-रावास वेड लागल्यावर सर्व मंडळींस आळा घालून त्यानें सुरळीत व्यवस्था चालविली. तो सज्जन व परोपकारी असून सर्व पक्षांना प्रिय होता. तुळसाबाईनेंच पुढें स १८१५त त्याचा खून करविला, तेव्हां कारभारांत घोटाळे उत्पन्न झाले, ते तिला आवरले नाहींत. दुसरा इसम **धर्माकुवर** हा जातीचा अहीर असून मोठा कल्पक व यशवंतरावाचा हरकामी नोकर होता. यशवंतराव बेफाम होई तेव्हां त्यास संभाळण्याचें बिकट काम धर्मा व तुळसाबाई यांनीं योग्य रीतीनें करून बाहेर न्यून असें दिसूं दिलें नाहीं. या धर्मास तुळसाबाईनेंच ता. ३१-३-१८११ रोजीं ठार मारविलें. कारण महिपतराम× नांवाचा निजामशाहींतील एक सरदार यशवंतरावाकडे येऊन राहिला होता त्यास धर्मा-

---

* भा. व. श.; का. सं. प. या. ४४९–८१; पे अ.; माल्कम; बर्वे कृत होळकरांचा इ०; प्रिन्सेप. × निजामशाहींत दुफळी झाली तेव्हां इंग्रजांचा पाडाव करण्याकरितां यशवंतरावास फौज घेऊन बोलावण्यासाठीं ह्या गृहस्थास निजामाच्या आईनें त्याजकडे पाठविलें, तो पुढें यशवंतरावाकडेच राहिला. (पहा पृ. ३१७ व ३६६)

कुवरनें ठार मारविलें होतें. बाळाराम शेट मेल्यावर गणपतराव शौचे तुळसाबाईचा दिवाण झाला. हा अगदीं सामान्य प्रतीचा निर्बुद्ध मनुष्य होता. तुळसाबाई दुर्वृत्त असून गणपतरावाशीं तिचा अश्लाघ्य संबंध असल्याचा बोभाटा झाल्यामुळें लष्करचे लोक सुद्धां शेवटीं तिजवर उठले.

तुळसाबाई शहाणी, देखणी, तडफदार व दुसऱ्यावर तेव्हांच छाप बसविणारी अशी असूनही, क्रौर्य व दुर्वर्तन यांमुळें तिच्या कर्तबगारीस मोठें वैगुण्य प्राप्त झालें. राज्यकर्त्यांच्या ठिकाणीं सदाचरणाबद्दल जो आदर लोकांत असावा लागतो तो तुळसाबाईचे संबंधानें कधींच उत्पन्न झाला नाहीं. अहल्याबाईची प्रतिष्ठा मिळवावी अशी तिची हाव होती, पण तिचें वर्तन त्या साध्वी बाईच्या अगदींच उलट होतें. सुस्वरूप व तरुण असल्यामुळें ती पडद्यांत बसूनच कारभार करी. तिला थोडें बहुत लिहितां वाचतां येत होतें. त्या वेळीं सर्व प्रदेश बंडांनीं व लुटींनीं उद्ध्वस्त झाल्यामुळें व फौजेचें देणें चढल्यामुळें मुलखांत बेदिली उत्पन्न झाली होती. तुळसाबाईचा सर्व आधार मल्हाररावावर होता. मल्हाररावाचें अल्पवयच मराठशाहीच्या त्या क्रान्तिकाळांत होळकरशाहीच्या घातास कारण झालें. तुळसाबाई व मल्हारराव यांस मारून टाकून होळकरशाहीवर आपला शह बसविण्यास दौलतराव सिंदे वगैरे टपून बसले होते. स. १८१२ त वरील दोघांच्या खुनाचा एक प्रयत्न झाला होता, त्याचा उगम दौलतरावाकडून असल्याची समजूत त्या वेळीं प्रचलित होती. हे सर्व प्रकार तटस्थ वृत्तीनें परंतु डोळ्यांत तेल घालून इंग्रज पाहत होते. अमीरखान व त्याचा हस्तक गफूरखान हे दोघे पठाण सरदार यशवंतरावाचे प्रमुख साह्यकर्ते फौजबंद असून त्यांच्याच तंत्रानें वागून तुळसाबाई आपला निभाव करीत होती. अमीरखानानें तात्या आळेकरास काढून बाळारामाचे हातीं सर्व कारभार दिला; आणि जयपुर जोधपुर वगैरे राज्यांतून खंडण्या वसूल करून खर्चाचा निभाव केला. तुळसाबाई व मल्हारराव यांचे खुनाचा प्रयत्न झाला, त्या प्रसंगीं गफूरखानानें व तात्या जोगानें सावधगिरी करून त्यांचे प्राण वांचविले; आणि उलट पक्षीं मल्हाररावाची बायको इमाबाई व यशवंतरावाची बायको लाडाबाई यांस खानानें स. १८१५ त मारून टाकिलें. कारण या बायांस कोणी तरी मुलगा दत्तक देऊन तुळसाबाईचा नाश करावा अशी खटपट दौलतराव सिंद्याची होती. अशा अडचणींत बाजीरावाशीं समेट करून होळकरशाहीचा बचाव करण्याचें काम कारभारी मंडळीनें चालविलें. रावजी गोविंद, खंडो महादेव, व सखाराम जगज्जीवन वगैरे होळकरांचे वकील त्यांनीं बाजीरावाची मर्जी संपादण्यासाठीं पुण्यास पाठविले.

बाजीरावाचे सल्लागार सदाशिव माणकेश्वर व विंचूरकरांचा कारभारी बाळाजी लक्ष्मण सलकडे यांचे मार्फत बाजीरावाचें मन होळकरांसंबंधानें अनुकूल करून घेण्याचा प्रयत्न त्या वकिलांनीं पुण्यास चालविला. ' खावंदांचा लोभ दिवसेंदिवस वाढावा, आमची सेवा करण्याची उमेद भारी आहे, असे भाव पेशव्यांस दर्शवावे; कै० यशवंतरावांनीं पदरचे माणस सर्व लोभांत ठेऊन फौजेची हुशारी ठेविली, तो ओघ यथास्थित चालवून सरकार चाकरी घडावी, याहून दुसरें लक्ष नाहीं; गणपतराव नारायण येथें कामकाजांत आहेत. ' अशा मजकुराचीं पत्रें मल्हाररावानें रावजी गोविंद यास स. १८१२ त लिहिलेलीं आहेत. परंतु या शिष्टाईपासून फलनिष्पत्ति मुळींच झाली नाहीं. बाजीरावाचा दुराग्रह बाधला.

सन १८१५ त नेपाळचे युद्धाचा फायदा घेऊन इंग्रजांवर उठण्यासाठीं मराठे सरदारांची मोठी तारांबळ उडाली होती. सेप्टेंबरांत होळकरांची फौज बाहेर पडण्यास अत्यंत आतुर झाली होती, परंतु त्यांस पगार न पोंचल्यामुळें लोक मीनाबाई ( मैनाबाई ? ) व तुळसाबाई यांजवर धरणें धरून बसले ( डिसेंबर १८१५ ). तो समय मोहरमचा होता. कत्तलच्या रात्रीं डोल्यांची मिरवणूक निघाली असतां त्या दोघींनीं बाळ मल्हाररावास घेऊन पळ काढला, आणि त्या कोटा येथें जालीमसिंगाचे आश्रयास गेल्या. त्या अंदाधुंदींत अत्यंत सावधगिरीनें वागून राज्याची व पैशाची व्यवस्था जालीम सिंगानें चांगली ठेविली होती परंतु कोट्यास त्या दोघींचा बेबनाव होऊन तुळसाबाई आपणास पकडून कैद करणार असें मीनाबाईस दिसून आल्यावर ती एकटीच सन १८१६ च्या एप्रिलांत परत आपल्या फौजेंत आली. पण लोकांनीं तिला पुनः कैद करून अटकेंत ठेविलें. या वेळीं अमीरखान बायांचे संरक्षणास धावून आला नाहीं.

पुढें पुण्यास बाजीरावाचा इंग्रजांशीं जेव्हां बेबनाव झाला तेव्हां होळकरावरचा राग विसरून त्याचें साह्य मिळविण्याची त्यास उत्कंठा लागली. त्यासाठीं त्यानें गणेशपंत पिटके नांवाचा आपला खास वकील ता० १८·६·१८१७ रोजीं म्हणजे पुण्याचा नवीन तह झाल्याबरोबर लगेच होळकरांकडे पाठविला. त्याजबरोबर धोंडोपंत तात्या म्हणून आपला दुसरा एक इसम बाजीरावानें दिला होता. आपली कामगिरी प्रगट होऊं नये म्हणून या धोंडोपंतानें कृष्णराव असें खोटें नांव मुद्दाम घेतलें होतें. सिंदे, होळकर, अमीरखान, जालीमसिंग कोटेकर या चार वजनदार सरदारांस मिळवून घेऊन इंग्रजांविरुद्ध चढाई करण्याचीही बाजीरावाची खटपट होती. परंतु ती माल्कमनें

सिद्धीस जाऊं दिली नाहीं. यमुनेवर ऑक्टरलोनी व नर्मदेवर हिस्लॉप हे दोन जबर-दस्त इंग्रज सेनापति ठांसून बसले होते, आणि खुद्द माल्कम एकंदर धोरण पारखून जरूर त्या सूचना सर्वत्र करीत होता. अशा संधींत ऑक्टरलोनीनें अमीरखानास लालूच दाखवून या नवीन कटांतून अलग केलें. परंतु तुळसाबाईनें मात्र प्रथमपासूनच बाजीरावास मिळण्याचें मनांतून ठरविलें.

पेंढाऱ्यांवर इंग्रजांनीं मोहीम पुकारली ही गोष्ट होळकरी लष्करास असह्य वाटूं लागली. सर जॉन माल्कम याची पेंढाऱ्यांवरच्या युद्धांत नर्मदेवर नेमणूक होती. ता. २६ नोव्हेंबर रोजीं तो सीतूच्या पाठीवर सारंगपुराजवळ चालून आला. त्या वेळीं होळकराची फौज व तुळसाबाई यांचा मुक्काम रामपुरा येथें होता. वाटेंत माल्कम यास बातमी कळली, कीं होळकराची फौज बिथरून इंग्रजांवर चढाई करण्याच्या बेतांत आहे. सीतूच्या व होळकर सरदारांच्या भेटी होऊन त्यांचें संगनमत झालें. तेथें पुढील योजना ठरवून सीतू आपलें कुटुंब कमळनेर येथें ठेवण्यास गेला. ही बातमी माल्कमनें सर टॉमस हिस्लॉप, कर्नल अॅडम वगैरे इंग्रज अधिकाऱ्यांस कळविली. सिंद्यांशीं ज्याप्रमाणें पेंढाऱ्यांचा पाडाव करण्याकरितां ग० ज० नें नवीन तह केला, तसाच तह होळकराशीं करून त्यांचा मुख्य साथीदार अमीरखान यास तेथून काढण्याचें ग० ज० नें योजिलें होतें. या उद्देशास अनुसरून दिल्लीचा रेसिडेंट मेटकाफ् यानें अमीरखानाशीं व होळकर दरबाराशीं पत्रव्यवहार सुरू केला. इकडे इंग्रजांचा आश्रय केल्याशिवाय आतां निभाव नाहीं अशी खात्री तुळसाबाई व तिचे कारभारी यांची होऊन त्या धोरणानें त्यांनीं मेटकाफ्कडे बोलणें सुरू केलें, आणि १५ नोव्हेंबर रोजीं मेटकाफ् यास कळविलें, कीं मल्हाररावास घेऊन आम्ही तुमचे आश्रयास येतों. तुळसाबाईचा हा उपक्रम दिवाण गणपतराव व तात्या जोग यांस माहीत झाला. परंतु अमीरखानाशिवाय दरबारांत पान हालत नव्हतें. सर्व खाशा बाया, कारभारी मंडळ व लष्कर व समस्त राज्य त्याच्याच हुकमतींत होतें असें म्हटलें तरी चालेल. इतक्यांत पुण्यास बाजीरावानें ता. ५ नोव्हेंबर रोजीं रेसिडेन्सीला आग लावून इंग्र-जांवर उघड युद्ध पुकारलें, ही बातमी ताबडतोब होळकर दरबारांत दाखल झाली; आणि ज्या अर्थीं बाजीरावानें पुढारपण घेऊन इंग्रजांचा पाडाव करण्याचें योजिलें आहे, त्या अर्थीं आपणही रामपुरा येथील छावणी उठवून ताबडतोब दक्षिणेंत जाऊन त्यास सामील होणें हें होळकराचें पिढीजाद कर्तव्य आहे अशी भावना लष्करी अंमलदारांची झाली; आणि कारभारी लोक राष्ट्रघात करून इंग्रजांस सामील होतील

तर त्यांचा एकदम बंदोबस्त करावा असा विचार त्यांनीं योजिला. विठ्ठल महादेव किबे ऊर्फ तात्या जोग यशवंतरावाजवळ सावकारी कामांत महत्त्व पावलेला हल्लीं तुळसाबाईचे कारभारांत वावरत होता. दक्षिणेंत गोविंदराव काळ्यानें इंग्रजांशीं बिघाड करून निभाव लागणार नाहीं अशी स्पष्ट सल्ला बाजीरावास दिली, त्याचप्रमाणें या तात्या जोगानें तुळसाबाईस मोठ्या मिनतवारीनें कळविलें, कीं इंग्रजांशीं बिघाड करूं नये. तेव्हां तात्या इंग्रजांस अंतस्थें साह्य करतो अशा संशयावरून त्यास तुळसाबाईनें ता. २४ नोव्हेंबर रोजीं गफूरखान व रामदीन यांजकडून सक्त कैदेंत ठेविलें; आणि रामपुऱ्याहून चोळी महेश्वरावरून दक्षिणेंत जाण्याकरितां महिद्पुराकडे फौजेचें कूच केलें. रस्त्यांत त्यांस आणखी पुष्कळ फौज व सीतू पेंढारी सामील झाले. इंदूर येथें पोंचल्यावर तुमचे सर्वांचे पगार भागवूं आणि नर्मदा उतरल्याबरोबर बाजीरावाकडून खर्चासाठीं मुबलक पैसा येत आहे तो तुम्हांस देऊं, अशी बातमी सरदारांनीं फौजेस कळविली, त्यामुळें सर्व लोक मोठ्या आशेनें दक्षिणेकडे निघाले. परंतु सर जॉन माल्कम दक्षतेनें त्यांच्या टेहळणीवर होता. त्यानें सर्व हालचाली ओळखून होळकराच्या सरदारांस पुष्कळ समजुतीच्या गोष्टी सांगितल्या. ' ग० ज० नीं पेंढाऱ्यांवर शस्त्र धरलेलें आहे तर तुम्ही सीतूची संगत सोडून द्या; बाजीरावाचा भरंवसा तुम्ही क्षणभर धरूं नका, तो तुम्हांस व्यर्थ तोंडघशीं मात्र पाडील,' असें माल्कमनें होळकराचे सरदारांस कळविलें. त्यावर बाह्यतः तोंडानें त्यांनीं माल्कमचें म्हणणें कबूल केल्यासारखें दाखविलें, परंतु दक्षिणेकडील प्रयाण त्यांनीं थांबविलें नाहीं. तेव्हां या एवढ्या फौजेस दक्षिणेस जाऊं देणें धोक्याचें आहे, त्यांचा एकदम प्रतिकार केला पाहिजे, असें मनांत आणून सर जॉन माल्कम आपल्या फौजेसह ताबडतोब सर टॉमस हिस्लॉप यास मिळाला; आणि ता. १४ डिसेंबर रोजीं त्यांनीं होळकराचे फौजेवर चाल केली. इंग्रज आपल्यावर चालून येतात अशी बातमी येऊन होळकरांचे छावणींत नाना प्रकारच्या भानगडी सुरू झाल्या, त्यांचा फायदा घेऊन प्रथम अमीरखानास अलग करून मग इंग्रजांनीं होळकरांस चेपलें.

जोग ऊ० किबे
विठ्ठल महादेव
| =रखमाबाई *
|
गणेश ऊ० दाजीसाहेब
| दत्तक
विनायकराव
|
माधवराव ( विद्यमान )
= कमळाबाई

* ज. स. १७९५
मृ. १८·६·१८५२

**८ महित्पुरची लढाई, मंदसोरचा तह** (२१ डिसें०–६ जाने. १८१८).—उज्जनच्या उत्तरेस सुमारें ३० मैलांवर क्षिप्रा नदीचे पश्चिम कांठीं महित्पुर येथें होळकरांचा तळ पडला असतां वरील प्रकार बनला. या फौजेस दक्षिणेंत जाऊं देऊं नये म्हणून माल्कम व हिस्लॉप उज्जनकडून त्यांजवर चालून गेले. त्यापूर्वीच सिंद्याशीं तह झाला होता, तशाच मासल्याचा मसुदा माल्कमनें होळकरांचे सरदारांकडे पाठविला. त्यावरून सरदारांनीं आपले वकील वाटाघाटीसाठीं माल्कमकडे रवाना केले. आतां तह पुरा झाला म्हणजे आपलें कांहीं चालणार नाहीं असें पाहून रामदीन, रोशनबेग, गफूरखान व सद्रुद्दीन या लष्करी अंमलदारांनीं ता० १७ डिसेंबर रोजीं गणपतराव व तुळसाबाई यांस कैद करून माल्कम बरोबर चाललेली वाटाघाट बंद पाडिली. त्यांचा उद्देश असा, कीं होळकरांनीं इंग्रजांचा आश्रय केल्यावर आपल्या नोकऱ्या जाऊन नुकसान होईल, त्यापेक्षां येथेंच इंग्रजांशीं संग्राम केल्यास त्यांत कांहीं तरी आपला निभाव लागेल. असें मनांत आणून त्यांनीं मल्हाररावास तिच्या पासून काढून घेतलें व ता० २०·१२·१८१७ रोजीं उत्तर-रात्रीं तुळसाबाईचा खून करून तिचें शव क्षिप्रा नदींत फेंकून दिलें. या वेळीं तिचें वय ३० वर्षांचें होतें. हा खून गफूरखानानें करविला असें म्हणतात. कदाचित् त्यास इंग्रजांकडचें प्रोत्साहनही असेल. परंतु ती बराच काळ सर्वांसच अप्रिय झाली असल्यामुळें खुनाबद्दल फारसें कोणास वाईट वाटलें नाहीं. त्याच धांदलींत माल्कमचा असा दरडावणीचा निरोप सरदारांस आला, कीं 'तह पत्करून शरण या, नाहीं तर आम्ही तुमच्यावर एकदम चाल करून येतों.' अशा रीतीनें प्रकरण हातघाईवर येऊन ता० २१ डिसेंबर रोजीं सकाळींच क्षिप्रेच्या पूर्व कांठावरून माल्कम व हिस्लॉप यांनीं नदींतून पलीकडे जाऊन होळकरांचे छावणीवर हल्ला केला. त्या प्रसंगीं इंग्रजांवर होळकराच्या तोफखान्यानें जबरदस्त मारा केला, त्यामुळें इंग्रजांचें भारी नुकसान झालें. तथापि इंग्रजांची बाकीची फौज पलीकडे जाऊन होळकराचे छावणींत घुसली, आणि भाल्यांनीं व तलवारीनें इंग्रजांनीं होळकरांचे पुष्कळसे लोक कापून काढिले. लढाईत कॅ. ब्रिग्ज व रंगो बापूजी हजर होते. होळकराच्या घोडेस्वारांनीं युद्धांत भाग घेतलाच नाहीं. इंग्रजांचा हल्ला येतांच ते पळून गेले. बारा वर्षांचा मल्हारराव हत्तीवर बसून लष्करांत हिंडत होता. त्यानें आपले लोक पळूं लागलेले पाहतांच डोळ्यांत आंसवें आणून त्यांस परत फिरण्याविषयीं नानाप्रकारच्या विनवण्या केल्या. चुलतभाऊ हरिराव होळकर हाही

युद्धांत टांसून उभा राहिला. या दोघां मुलांच्या अंगीं होळकर घराण्याचें बाणेदार रक्त चांगलेंच उसळत होतें, पण पळ काढणाऱ्या फितुरी लोकांस कोण आवरून धरणार ! ते सर्व सामानसुमान टाकून सितामऊकडे पळून गेले. छावणींतील सामान व ६३ तोफा इंग्रजांचे हातीं पडल्या. फौजेंत एकमुखी शिस्त असती तर या लढाईंत इंग्रजांचा साफ फन्ना उडाला असता. तथापि इंग्रजांचे ६०४ इसम जखमी व १७४ इसम मयत झाले. त्यांत मोठमोठे अंमलदारच पुष्कळ मारले गेले. जखमी लोकांच्या शुश्रूषेकरतां हिस्लॉप महिद्पुर येथें राहिला, आणि माल्कम होळकरांचे पाठलागावर गेला. यापूर्वींच गुजरातची इंग्रज फौज आगाऊ हुकूम आल्याप्रमाणें माळव्यांत येत होती, ती ता. २४ डिसेंबर रोजीं रतलाम येथें दाखल झाली, आणि तेथून लगेच माल्कमचे मदतीस त्याचे पाठोपाठ जाऊन ता. ३० डिसेंबर रोजीं मंदसोर येथें पोंचली. इकडे सीतामऊ येथें अमीरखान व गफूरखान यांनीं मल्हाररावाची आई केसराबाई व तात्या जोग यांस स्पष्ट कळविलें, कीं इंग्रजांशीं लढून निभाव लागण्याचा बिलकूल संभव नाहीं. तेव्हां कसेंही करून तहानें प्रकरण मिटविलें पाहिजे. या संबंधानें वाटाघाट होऊन सरदारांनीं केसराबाईस तह करण्याची कुलअखत्यारी दिली, आणि लगेच तिनें तात्या जोग यास तहाचे वाटाघाटीसाठीं माल्कमकडे पाठविलें. माल्कमचा तळ जवळच सीतामऊचे उत्तरेस मंदसोर येथें होता. पश्चिमेस प्रतापगडावर केसराबाईचा मुक्काम होता. या प्रकरणांत असें दिसून आलें, कीं एकूण एक मराठे सरदार इंग्रजांशीं लढण्यास उत्सुक होते. परंतु अमीरखानादि मुसलमान सरदारांस इंग्रजांनीं लालूच दाखवून अंतस्थपणें वश केलें होतें. त्यांनीं हातपाय गाळून इंग्रजांशीं तह करण्याचाच हट्ट धरला. गफूरखानानें आपला एक वकील मीरजाफीरअली नांवाचा माल्कमकडे पाठविला. त्यानें जाऊन तहाची विनवणी केली. त्यावरून बोलणें करण्यास माल्कमनें तात्याजोग यास आपल्या छावणींत भेटीस बोलाविलें. ता. १·१·१८१८ रोजीं त्यांच्या भेटी झाल्या, तेव्हां माल्कमनें त्यांना खालील अटी कळविल्याः—

१ मल्हाररावानें इंग्रजांचा ताबा कबूल करावा. २ अमीरखानास आपल्या जवळून काढून द्यावें आणि त्याच्याशीं इंग्रजांनीं स्वतंत्र तह केला आहे त्यास होळकरांनीं मान्यता द्यावी. ३ बुंदीच्या उत्तरेकडील व सातपुड्याच्या दक्षिणेकडील होळकरांचा जो प्रदेश असेल तो त्यांनीं इंग्रजांस द्यावा. ४ इंग्रजांची तैनाती फौज आपल्या-जवळ ठेवून होळकरांनीं स्वतःची फौज तीन हजारांहून जास्त ठेवूं नये. या अटीं-

संबंधानें वादविवाद होऊन शेवटीं ता. ६ जानेवारी रोजीं तहावर उभय पक्षांच्या सह्या होऊन व पुढें ता. १७ रोजीं ग० ज० ची मंजूरी मिळून तो कायम झाला, त्यास मंदसोरचा तह असें नांव आहे. या तहानें होळकरांचें राज्य संपुष्टांत आलें आणि राजपुतांवरील खंडणीचा त्यांचा हक्क बुडाला. एकंदर प्रकार माल्कमनें केवळ लष्करी धाक दाखवून परंतु मुख्यतः युक्तीच्या वाटेनें सिद्धीस नेले. सिंद्यांचे तहांत इंग्रजांनीं बाळाबाई सितोळे हिला जशी जहागीर दिली, तशीच यशवंतरावाची मुलगी भीमाबाई म्हणून होती तिला त्यांनीं बुंदेलखंडांत कुंच परगणा जहागीर दिला. हा केवळ खासगी मोहबतीचा प्रकार कडू गोळीच्या शर्करावगुंठना सारखा होता. भिमाबाईचें लग्न पूर्वी स. १८०९ च्या फाल्गुनांत गोविंदराव बुळे याजबरोबर झालें होतें. ती पुढें नोव्हेंबर स. १८५८ त मरण पावली. मंदसोरच्या तहाचें प्रकरण आटोपतांच गणपतराव दिवाण व गफूरखान इंग्रजांचे छावणींत येऊन स्वाधीन झाले. तेथें माल्कमच्या सल्ल्यानें तात्या जोग यास कारभारी नेमण्यांत आलें. तसेंच अमीरखानाचाही संबंध तुटला. गफूरखानास स्वतंत्र जहागीर देऊन स्वस्थ बसविलें. परंतु रामदीन बाणेदार होता त्यास हा एकंदर प्रकार बिलकूल पसंत पडला नाहीं. तो तडफदार सरदार तात्काळ आपला जमाव घेऊन दाक्षिणेंत बाजीरावाचे मदतीस धावून गेला. होळकरशाहीची पुढील व्यवस्था बांधून देण्याचें काम सरजॉन माल्कमनें सिद्धीस नेलें, म्हणूनच मध्य हिंदुस्थानांत त्याची एवढी प्रतिष्ठा वाढली. एवंच स० १८१७ च्या नोव्हेंबर डिसेंबर महिन्यांत पुणें, नागपुर, होळकर व सिंदे आणि राजपूत राजे यांची कशी हवाल झाली तें ध्यानीं येईल.

मल्हारराव होळकर पुढें क्षयरोगानें ता. २७·१०·१८३३ रोजीं मरण पावला. त्या वेळीं वय २८ वर्षांचें होतें. हा चैनी व उधळ्या होता. बायकोचें नांव गौतमाबाई ताईसाहेब. मृत्युसमयीं त्यानें विठोजीचा मुलगा मार्तंडराव यास दत्तक घेण्याचें ठरविलें. दत्तविधान ता. १७·१·१८३४ रोजीं झालें. पण मध्यंतरीं विठूजीचा दुसरा मुलगा हरिराव हा घराण्याचा मालक झाला, त्याची कारकीर्द ता. १८·४·१८३४ पासून चालली. मार्तंडराव पुढें १८४९ सालीं वारला, त्याच्या बायकोचें नांव रखमाबाई. हरिराव ता. १६·१०·१८४३ रोजीं वारला. त्याच्या बायकोचें नांव भागीरथीबाई. एकंदरींत होळकरांचे घराण्यांत मोठ्या घडामोडी दिसतात. इंदूरचे खासगीवाले व फडणीस यांचीं घराणीं ऐतिहासिक कालांतील आहेत. तीं हीं:—

| खासगीवाले | इंदूरचे फडणीस व्यास | पाराशर दादाजी |
|---|---|---|
| रघुनाथराव गानू | रावजी महादेव पारनेरकर | गोहलकर |
| गोविंदपंत | | दादो पाराशर |
| गोपाळरावबाबा | मल्हारपंत | |

गणपतराव नारायण शौचे हा होळकरशाहीचा पिढीजाद दिवाण, पण त्याचें वजन पुढें कारभारांत राहिलें नाहीं. कारभार मुख्यतः तात्याजोग व तात्या आळेकर या दोघांनीं चालविला. तात्या जोग ता. २९·३·१८२६ रोजीं मरण पावला. तसाच गणपतराव दिवाण पुष्कळ वर्षें जगून ता. १२·५·१८४७ रोजीं मरण पावला.

**तुळसाबाईची** कूळकथा लक्षांत ठेवण्याजोगी आहे. आजीबा नांवाचा एक मानभावी साधु असून त्याच्या पुष्कळशा शिष्यिणी होत्या. पहिल्या मल्हाररावाची रक्षा हरकूबाई ही सुद्धां या साधूची शिष्यीण होती. या शिष्यिणींचें राज्यकारभारांत पुष्कळसें वजन असे. मीनाबाई म्हणून हरकूबाईची एक नोकर होती ती या साधूच्या भजनीं असे. तुळसाबाई ही आजीबा साधूची मुलगी, सुस्वरूप, बुद्धिमान, व धाडसी असून तिचें प्रथम लग्न झालें होतें, तरी तिजवर यशवंतरावाचें मन जडलें, तेव्हां तिच्या नवऱ्यास कांहीं रक्कम देऊन यशवंतरावानें तिला आपल्या जवळ घेतलें. तेव्हां पासून उत्तरोत्तर तिचें वजन होळकरशाहींत वाढत गेलें. तिनेंच प्रथम मीनाबाईचा खून करविला. पराक्रमास क्षेत्र असलें कीं स्त्रियासुद्धां राजकारणांत चमकत.

महिद्पुरचा संग्राम आटोपल्यावर सर टॉमस **हिस्लॉप** उत्तरेकडची फौज घेऊन मंडलेश्वर येथें नर्मदा उतरून ता. २२·२·१८१८ रोजीं दक्षिणेस सेंधवा येथें आला. दुसऱ्याच दिवशीं होळकराचा तो किल्ला हस्तगत करून हिस्लॉप ता. २७ फेब्रुवारीस थालनेर येथें पोचला. तेंही ठिकाण होळकरांचें होतें आणि तें इंग्रजांच्या हवालीं करण्याचें मंदसोरच्या तहांत ठरलें होतें. तापीचा उतार बंद करण्यास थालनेरच्या या ठाण्याचा इंग्रजांस मोठा उपयोग होता. किल्लेदारानें स्थळ हिस्लॉपचे हवालीं केलें नाहीं आणि इंग्रजांवर तोफा डागल्या, तेव्हां इंग्रजांनीं तें ठिकाण लढून हस्तगत केलें. या प्रसंगीं इंग्रजांचे सात अंमलदार व अठरा गोरे शिपाई मारले गेले. किल्लेदारास पकडून इंग्रजांनीं फांशीं दिलें. थालनेरचें उदाहरण पाहून जालना, चांदवड वगैरे होळकरांचीं ठिकाणें इंग्रजांचे हस्तगत होण्यास विलंब लागला नाहीं.

**९ अमीरखान, यशवंतराव भाऊ व बॅप्टिस्ट.**—ठिकठिकाणीं इंग्रजांची सरशी होत चालली त्याचा परिणाम प्रत्येक सरदाराच्या मनावर ताबडतोब होत गेला. अमीरखानानें हाताखालच्या लोकांस थापा देऊन कसें तरी थांबवून धरलें होतें, आणि आपण इंग्रजांचें संरक्षण पत्करून त्यांजकडून कांहीं तरी कायम व्यवस्था लावून घ्यावी, अशी इतरांप्रमाणें तो अंतस्थ खटपट करीत होता. मेट्काफ्कडे पत्र लिहून आपण इंग्रजांच्या आश्रयाखालीं येण्यास कबूल आहों, असें त्यानें पूर्वींच कळविलें होतें. त्यासाठीं ता. १८·१२·१८१७ रोजीं त्यानें ऑक्टोरलोनीची भेट घेतली, आणि हाताखालच्या लोकांस दाखविण्याकरतां म्हणून त्यानें नवीन अटी लिहून कळविल्या, त्या ऑक्टोरलोनीनें अर्थात्च कबूल केल्या नाहींत. असा हा देखावा संपल्यावर त्यानें ता. १९ डिसेंबर रोजीं इंग्रजांकडून टोंकचें संस्थान कायम करून घेऊन शरणचिठ्ठी लिहून दिली. महिद्पुरच्या ऐन प्रसंगीं यशवंतरावाच्या या एकनिष्ठ सोबत्यानें शेवटीं असा विश्वासघात केला. त्यानंतर त्याच्या हाताखालच्या लोकांची समजूत पटून व्यवस्था लावण्यांत कांहीं काळ गेला. सन १८१८ च्या फेब्रुवारी अखेर सर्व पठाण सरदार ठिकाणीं बसले. राजपूत राजांनींही ऑक्टोरलोनी व टॉड यांच्या सल्ल्यानें इंग्रजांचा आश्रय पत्करून आपापली व्यवस्था लावून घेतली. या वेळीं राजपूत संस्थानांवर दडपण ठेवण्यासाठीं सिंद्याचा अजमीर प्रांत इंग्रजांनीं आपल्या हातांत घेतला. तेणेंकरून चंबळच्या पश्चिमेस सिंद्याची सत्ता नाहींशी झाली. भोपाळच्या हद्दींत सिंद्याचा इस्लामगड परगणा होता तो भोपाळच्या नवाबास देण्यांत आला. या प्रदेशाचे बदल्यांत बुंदेलखंडांत पेशव्यांचा मुलूख होता तो इंग्रजांनीं सिंद्यास दिला. येणेंप्रमाणें नर्मदेच्या उत्तरेकडील प्रदेशाची यथायोग्य व्यवस्था लावल्यावर म० ज० यास स्वतः उत्तरेंत राहण्याची गरज राहिली नाहीं; म्हणून ता. १३ फेब्रुवारीं रोजीं कालीसिंधवरील आपला मुक्काम हालवून तो परत कलकत्त्यास गेला. सागरच्या जहागिरीची व्यवस्था याच वेळीं लावण्यांत आली.

**यशवंतराव भाऊ** नांवाचा सिंद्याचा सरदार उत्तर मराठशाहींत मोठा हिंमतवान म्हणून नांवाजला होता. स्वतः दौलतरावानें लष्करी हालचाल केली नाहीं, तरी इंग्रजांचा उत्कर्ष होत चालला आणि पेंढाऱ्यांचें निमित्त करून त्यांनीं आपणावर सक्तीच्या अटी बसविल्या हा प्रकार अंतःकरणांतून त्यास मुळींच रुचला नाहीं. यशवंतराव भाऊनें प्रसंग ओळखून नवीन तह सिद्धीस नेण्याचें काम बाह्यतः अंगावर घेतलें. पण अंतःकरणांतून त्याचाही ओढा पेंढाऱ्यांकडेच होता.

सीतूच्या हाताखालील कित्येक मंडळीस त्यानें आश्रय दिला. करीमखानाचा सरदार भिकू सय्यद ज्यानें सन १८१५ त गुंतूर पर्यंतचा प्रदेश लुटून पुष्कळ लूट पैदा केली, त्यासही यशवंतरावानें आपल्याजवळ आश्रय दिला. यशवंतरावाचा मुक्काम जावद येथें असतां त्याजवर ता. २९·१·१८१८ रोजीं इंग्रज फौजेनें हल्ला करून त्याची फौज उधळून दिली. यशवंतरावभाऊचा घोडा फार चांगला होता त्यावरून जीव बचावून तो पळून गेला. त्याचे तीन किल्ले कमळनेर,* रायपुर आणि रामनगर उदेपुरच्या हद्दींत होते ते त्यांनीं हस्तगत करून उदेपुरच्या राण्यास परत दिले. या पूर्वींच थोडे दिवस त्या राण्यानें इंग्रजी छत्राचा आश्रय केला होता. जावद व नीमच हे दोन परगणे यशवंतरावभाऊस सिंद्यानें जहागिरी दाखल दिले होते ते, तो पुनः इंग्रजांवर उठणार नाहीं अशी हमी दौलतरावाकडून घेऊन सिंद्याच्या मध्यस्थीवरून इंग्रजांनीं त्यास परत दिले. तथापि यशवंतरावभाऊवर पुढें दौलतरावाची इतराजी होऊन आत्महत्या करून त्यानें हालअपेष्टेंतून आपली सुटका केली. यशवंतरावभाऊचे कुटुंबाचा तपास लागत नाहीं.

यशवंतराव भाऊप्रमाणेंच सिंद्याचे बहुतेक सरदार त्यास डोईजड झालेले होते. सिंद्याची प्राप्ति व सत्ता कमी झाली आणि सरदारांचें दडपण मात्र विनाकारण अंगावर राहिलें, तेव्हां त्यांचा बंदोबस्त करण्यासाठीं दौलतराव सिंद्यानें इंग्रजांशीं असा करार केला, कीं आपल्या पदरच्या प्रत्येक सरदाराबरोबर एक इंग्रज अंमलदार राहवा. हा करार ऐकून सिंद्याचा सरदार जीन बॅप्टिस्ट यास मोठी दहशत पडली. अलीकडच्या दहा बारा वर्षांत हाच सिंद्याचा प्रमुख सेनानायक असून लष्करी काम आलें म्हणजे त्यालाच पुढें व्हावें लागत असे. त्याची छावणी बहादूरगडास होती. सिंद्यास जी कांहीं थोडी बहुत स्वतंत्र होण्याची आशा होती, ती महिदपुरच्या लढाईनंतर सर्व नष्ट झाली, आणि आतां पुढें इंग्रजांशीं उघड सामना करावयाचा नाहीं असा दौलतरावानें आपल्या मनाशीं सिद्धांत बांधिला. तेव्हां बॅप्टिस्टचें लोढणें त्यास गळ्यांत नकोसें झालें. त्यानें त्यास व त्याच्या मुलांस एकदम कैद करून त्याच्या जहागिरीचा आजपर्यंतचा हिशेब मागितला; आणि त्याच्या हाताखालील सैनिकांचे पगार तुंबलेले होते त्यांस दौलतरावानें चिथवून दिलें, कीं हाच तुमचा सर्व पैसा खाऊन बसला

* कमळगड उदेपुरच्या उत्तरेस ४० मैल आरवली पर्वतांत आहे, हाच कमळनेर कीं काय ? रायपुर कमळनेरच्या उत्तरेस ३० मैल. कमळनेर व रायपुर यांच्या मध्यें रूपनगर आहे.

आहे. असें सांगून बॅप्टिस्टचे जागीं त्यानें दुसरा इसम नेमिला. तेव्हां हें प्रकरण हातघाईवर येऊन बंडावा मोडण्यास इंग्रज फौजेचें साह्य दौलतरावास घ्यावें लागलें. बॅप्टिस्टनें पुष्कळ दौलत लपवून ठेविली आहे ती दाखवावी म्हणून दौलतरावानें त्याचे अत्यंत हाल केले. फक्त शिवपुर येथें त्यास राहण्यापुरती थोडी जागा दिली. त्यानंतर त्यानें कांहीं हालचाल केली नाहीं. यशवंतरावभाऊनें आपणच आत्महत्त्या करून बॅप्टिस्टसारखा पेंच आपल्यावर आणिला नाहीं. तिसरा बलवान सरदार **बापू सिंदे** हा होता. त्याचे ताब्यांतील अजमीरचा किल्ला काढून घेतल्याबरोबर बापू सिंदे उघडा पडला. तो सन १८१९ त मरण पावला. **गोकूळ पारख** याजकडे आज कैक वर्षें दौलतरावाचा कारभार होता, तो पुनः मथुरेस जाऊन इंग्रज हद्दींत राहिला. यशवंतराव भाऊ, बापू सिंदे, जीन बॅप्टिस्ट हे सर्व पराक्रमी पुरुष राज्याचे उपयोगीं पडणारे काळ फिरल्याबरोबर इतके हीन बनले हें पाहून खेद वाटतो.

---

# प्रकरण पंधरावें

## गंगाधर शास्त्र्याचा खून, बाजीरावास शिक्षा

**फार दिवस आधिं जपत होते या इंग्रज राज्याला ।**
**अनायासें झालें निमित्त पंढरपुरास कज्जाला ॥**
**संकट पडलें कांहीं सुचेना प्रधान पूज्याला ।**
**थोर थोर मध्यस्त घातले साहेबांचे समजीला ॥**
**निरुपाय जाणुनी हवालीं केलें मग त्रिंबकजीला ॥**

—प्रभाकर.

१ पेशवे गायकवाडांचा तंटा. २ त्रिंबकजी डेंगळे व शास्त्री
३ त्रिंबकजीचा कावा, शास्त्र्याचा खून. ४ या खुनाची बाजीरावास बाधा.
५ गंगाधर शास्त्री, पूर्ववृत्त, योग्यता. ६ या खुनामुळें बडोद्यांतील स्थित्यंतर.
७ ठाण्याचे किल्ल्यांतून त्रिंबकजीचें पलायन ( १२.९.१८१६ ).
८ ता. १३–६–१८१७ चा तह, बाजीरावास तडाखा.

**१ पेशवे गायकवाडांचा तंटा** * ( स. १८०५–१३ ).–सिंदे होळकर व गायकवाड हे तीन पेशव्यांचे मुख्य आधार होते. पैकीं गायकवाडाशीं स्वतंत्र ठराव

---

* प्रकरणास मुख्य आधार प्रिन्सेप, बडोदा गझेटियर, पे. अ. इत्यादि.

करून इंग्रजांनीं हळूहळू सर्व गुजरात व काठेवाड प्रांत आपल्या कबजांत आणिला हें पूर्वी सांगितलेंच आहे. बाजीरावानें त्याजबद्दल पाहिजे तितक्या तक्रारी केल्या, पण त्यांस इंग्रजांनीं भीक घातली नाहीं. गुजरातेंत पेशव्यांचा निम्मा हिस्सा होता, त्याची वहिवाट दहा वर्षांच्या करारानें गायकवाडाकडे होती. या दहा वर्षांत मक्त्याची ठरीव रक्कम बाजीरावास गायकवाडाकडून बिनचूक मिळत गेली. मात्र पूर्वीचेंच जें घेणें होतें त्याचा निकाल लागला नाहीं. सन १८०४–५ च्या युद्धांत सिंदेहोळकर ठिकाणीं बसतांच बाजीरावानें इंग्रजांच्या पाठिंब्यानें दाक्षिणेकडील जहागीरदारांस नरम करून वाटेल त्या मार्गानें पैसा उपटण्याचा उद्योग चालविला. दहा वर्षें स्वस्थता मिळाल्यामुळें बाजीरावाजळ पैशाचा चांगला संचय झाला, आणि इंग्रजांच्या मदतीनें त्याचा अम्मलही प्रांतांत पूर्ण बसला. पुढें कोल्हापुर, सांवतवाडी, निजाम, गायकवाड वगैरे बाह्य संस्थानांकडे बाजीरावाची नजर फिरूं लागली. पण हीं प्रकरणें इंग्रजांचेच विद्यमानें सोडवावयाचीं असल्यामुळें त्यांचा निकाल बाजीरावास निमूटपणें मान्य करावा लागे. कोल्हापुर आणि सावंतवाडी हीं दोन संस्थानें आपलीं मांडलिक आहेत व त्यांनीं आपणास करभार द्यावा, ते हें न ऐकतील तर त्यांस फौज पाठवून नरम करावें, अशी मागणी बाजीरावानें इंग्रजांकडे केली. त्या संबंधाचा वाद कांहीं दिवस चालून शेवटीं इंग्रजांनीं स. १८१२ त बाजीरावास साफ कळविलें, कीं हीं संस्थानें स्वतंत्र आहेत, त्यांजवर पेशव्याचा हक्क नाहीं. इंग्रजांनीं असा निकाल दिल्यापासून बाजीरावाचें मन इंग्रजांविषयीं विशेष खट्टू झालें. इंग्रजांनीं त्या व्यवहारांत कोल्हापुरकरांशीं स्वतंत्र तह करून मालवणचा सिंधुदुर्ग किल्ला आपल्या ताब्यांत घेतला. बाजीरावानें निजामाकडील चौथाई वसूल करण्याचें प्रकरण असेंच उद्भवलें. त्या संबंधाची तक्रार त्यानें इंग्रजांकडे करतांच त्यांनीं एक कमिशन नेमून हैद्राबादेस पुरावा गोळा करून बाजीरावास निकाली जबाब दिला, कीं इतःपर निजामांकडे तुमचें कांहीं घेणें नाहीं व तुम्हीं त्यांजकडे कांहीं मागूं नये. गायकवाडाचें प्रकरण मात्र इतक्या झटपट निकालांत निघालें नाहीं. त्याचा ग्रंथ मोठाच वाढला तो आतां सांगितला पाहिजे.

अहंमदाबादच्या निम्या वसुलाची वहिवाट बाजीरावानें दहा वर्षांच्या करारानें गायकवाडास दिली होती, ती मुदत स. १८१४ त संपावयाची होती. त्यावरून बाजीरावानें इंग्रजांस अशी सूचना केली, कीं ही मुदत संपल्यावर आमची वहिवाट आम्हीं स्वतः करणार, गायकवाडाकडे चालू ठेवणार नाहीं. हा उभयतांमधील वादाचा एक मुद्दा झाला. दुसरा मुद्दा असा होता, कीं आनंदराव गायकवाडानें बाजीरावास

नजराण्याची रक्कम ५६ लाख रुपये द्यावयाची होती ती व पूर्वीचें देणें याची एकदम फेड करा, अशी मागणी बाजीरावानें गायकवाडावर केली. तें घेणें तीन कोटींच्या वर बाजीरावानें दाखविलें आणि त्याचे हिशेब स. १७५३ त मूळ अहंमदाबाद जिंकली तेव्हांपासून सालोसाल वाढत आले होते. तीन कोटी रक्कम देण्याची ऐपत गायकवाडास मुळींच नव्हती. हिशेबांतही उभय पक्षीं अनेक भानगडी उपस्थित झाल्या होत्या. बाजीरावानें गायकवाडाकडे विशेष तगादा लावला, तेव्हां तडजोडीनें निकाल करण्याचें ठरून त्यासाठीं गायकवाडाच्या तर्फेनें इंग्रजांनीं गंगाधरशास्त्री यास बोलणें करण्यासाठीं पुण्यास पाठविलें. खुद्द शास्त्री पुण्यास येण्यास फारसा खूष नव्हता, परंतु बाजीरावानें आग्रह धरला, कीं शास्त्री यांस वाटाघाटीं साठीं पुण्यास पाठवावें, त्यांचे जिवास आमच्याकडून यत्किंचित् अपाय होणार नाहीं, उलट समक्ष वाटाघाट करून फार दिवस सांचलेल्या हिशेबाचा निकाल करण्यास आम्हांस संतोष वाटेल. बडोद्यांत इंग्रजांचें वजन भारी वाढलें होतें, तें नाहींसें करून इंग्रजांविरुद्ध पुनः मोठी जूट उभारण्याचा बाजीरावानें अंतस्थ प्रयत्न या वेळीं चालविला होता. बडोद्यांत इंग्रजांचें अधिष्ठान कायम बसविण्यांत गंगाधर शास्त्रीच प्रमुख आहे हें बाजीराव जाणून होता; आणि हरउपायानें त्याचा तेथून उठावा केला म्हणजे इंग्रजांचें बस्तान बडोद्यांतून ढांसळेल अशी त्याची कल्पना होती. बाजीरावाचा हा हेतु शास्त्री यास ठाऊक असल्यामुळें तो पुण्यास जाण्यास प्रथम मुळींच खुषी नव्हता. तथापि बाजीरावाच्या रदबदलीवरून इंग्रजांनीं त्याच्या जीवाची हमी घेतली; आणि शास्त्री बडोद्याहून निघून मुंबईस इंग्रज गव्हर्नरास भेटून स. १८१४ च्या फेब्रुवारींत पुण्यास दाखल झाला. परंतु कांहीं महिनेपर्यंत बाजीरावानें त्याची भेट सुद्धां घेतली नाहीं. अहंमदाबादची वहिवाट तर स. १८१४ त मुदत भरतांच बाजीरावानें गायकवाडाकडून काढिली व त्या कामावर त्रिंबकजी डेंगळ्याची नेमणूक केली. त्रिंबकजीनें आपल्या तर्फेनें कारभार करण्यास दुसरा इसम अहंमदाबादेस रवाना केला. पुढील स्पष्टतेसाठीं त्रिंबकजीचें पूर्ववृत्त येथेंच सांगितलें पाहिजे.

**२ त्रिंबकजी व शास्त्री.**—त्रिंबकजी डेंगळे हा निंबगांव जाळी या गांवचा पाटील बाजीरावाजवळ हुजऱ्याचें काम करीत होता. पुढें ह्याची नेमणूक जासुदांत करून ठिकठिकाणची माहिती आणण्याच्या कामावर बाजीरावानें त्यास नेमिलें. यशवंतराव होळकरापासून पराभव पावून बाजीराव महाडास गेला, तेव्हां त्याजबरोबर त्रिंबकजी होता. महाडाहून एक जरुरीचें पत्र बाजीरावास पुण्यास पाठवावयाचें होतें,

तें पत्र पोंचवून त्याचा जबाब ताबडतोब त्रिंबकजीनें बाजीरावास आणून दिला, तेव्हांपासून हा कधीं रडत परत येणारा नव्हे, संकटांत उडी घालून वाटेल तें काम फत्ते करील, अशी बाजीरावाची खात्री होऊन त्याजवर त्याची मर्जी विशेष बसली; आणि अनेक नाजूक कामांत त्रिंबकजीनें बाजीरावाचें चांगलें साह्य केलें. विद्येचा किंवा राजकारणाचा उच्च संस्कार त्याला नव्हता तरी खटपटी व तरतरीत वृत्तीमुळें बाजीरावाचे बरे वाईट हुकूम न्यायान्याय न पाहतां अंमलांत आणण्यास तो कचरणारा नव्हता, हजर जबाब, हिकमत, साहस व धोरण इत्यादि गुणांनीं बाजीरावाचा त्याजवर अत्यंत लोभ जडला; आणि त्याच्याच पायीं बाजीरावास आपल्या पदास मुकावें लागलें. स. १८०३-०४ सालीं इंग्रजांशीं युद्ध झालें तें संपल्यावर त्रिंबकजीस बाजीरावानें सातार्‍यास छत्रपतीवर देखरेख ठेवण्यास नेमिलें. पानशांकडील तोफखाना काढून त्याजवर त्यानें त्रिंबकजीची नेमणूक केली हें मागें सांगितलेंच आहे. चतुरसिंग भोसल्यास त्यानें कशा हिकमतीनें पकडिलें हेंही पुढें सांगण्यांत येणार आहे. सदाशिव माणकेश्वर व खुरशेटजी यांचीं कारस्थानें त्रिंबकजीनेंच प्रथम बाजीरावाचे नजरेस आणिलीं. ते दोघेही रेसिडेंटापुढें नमतें घेऊन धन्याचें हित बिघडवितात अशी बाजीरावाची समजूत झाली. पुढें भाऊवरचा विश्वास उडतांच उत्तरोत्तर कारभाराचें काम बाजीरावानें त्रिंबकजीकडे सोंपविलें, आणि एल्फिन्स्टनकडे बोलणें करण्यासही पुढें तोच जाऊं लागला. त्यामुळें एल्फिन्स्टनचीं कारस्थानें व त्याचें दूरचें धोरण ओळखून त्याचा आगाऊ इशारा त्रिंबकजी बाजीरावास देऊं लागला. तेणेंकरून बाजीरावाचें व एल्फिन्स्टनचें फाटत गेलें. एल्फिन्स्टन त्यास पूर्णपणें ओळखीत होता. त्रिंबकजी बाजीरावापाशीं अशी बढाई मारी, कीं ' मी आपल्या बुद्धिबळानें इंग्रजांचा नक्षा उतरून तुमच्या पूर्वजांनीं कमावलेलें वैभव पुनः तुम्हांस मिळवून देतों. मी सांगेन त्याप्रमाणें तुम्ही वागा म्हणजे झालें. ' त्याच्या भूलथापांवर बाजीरावाचा विश्वास अखेर क्षणापर्यंत कायम होता. राज्याची शक्ति मुख्य मालकाच्या बळावर असते; नोकर कसाही जोरदार वागला, तरी मालकाचा नेभळटपणा त्यास भरून काढतां येत नाहीं.

त्रिंबकजी कितीही उपद्यापी असला तरी इंग्रजांचा पाय राज्यांतून काढून मराठी राज्य राखण्यासाठीं अत्यंत कष्ट करीत होता यांत संशय नाहीं. या संबंधांत चतुरसिंग भोसल्यासारखेच त्याचे प्रयत्न अहर्निश चालू होते. इंग्रजांचे विरुद्ध जेवढें कांहीं साहित्य उपयोगांत येण्यासारखें होते त्या सगळ्याचा संग्रह त्यानें चालविला. सन १८११ त

सिंदे व रघूजी भोसले यांजला बाजीरावाचे लक्षांत आणण्यासाठीं त्यानें पत्रें पाठविलीं. सन १८१४ त त्यानें सिंदे भोसल्यांकडे आपले गुप्त हस्तक कृष्णाजी गायकवाड वगैरे त्याच कामासाठीं रवाना केले. होळकराशीं बाजीरावाचें मुळींच प्रेम नव्हतें, तरी त्रिंबकजीच्या आग्रहावरून गणेशपंत पिटके नांवाचा आपला वकील बाजीरावानें होळकरांकडे रवाना केला. नेपाळशीं युद्ध सुरू असतांच इंग्रजांस लंगडे करण्याचे हे प्रयत्न होते. या उपक्रमांत गायकवाडास वश करून घेण्याचे प्रयत्न सुरू झाले, त्यामुळें गंगाधर शास्त्र्याचें प्रकरण उद्भवलें. असे हे निरनिराळ्या कारस्थानांचे धागे पुढील संगतीकरितां एकत्र लक्षांत ठेविले पाहिजेत.

त्रिंबकजीस उघडपणें कारभारांत घेतल्याचें बाजीरावानें रेसिडेंटास प्रथम स. १८१४ तल्या शास्त्र्याचे प्रकरणांत कळविलें; तेव्हांपासून एल्फिन्स्टनकडे बोलणें करण्यास बाजीराव त्रिंबकजीलाच पाठवूं लागला. एल्फिन्स्टनशीं बोलणें करितांना आपल्या धन्याच्या तर्फेनें अत्यंत चढाऊ व उद्दाम वृत्तीचा अवलंब त्रिंबकजी करी तें एल्फिन्स्टन यास सहन झालें नाही. उलट पक्षीं जाबजबाबांत रेसिडेंटाला हा अगदीं निरुत्तर करून आपली बाजू चांगली संभाळतो, अशी बाजीरावाची खात्री होऊन त्रिंबकजीवर त्याची मर्जी जास्तच बहाल होत गेली. बाजीरावानें इंग्रजांच्या ताबेदारींत जहागीरदाराप्रमाणें राबण्यापेक्षां मराठ्यांची जूट प्रस्थापित करून इंग्रजांचा पाडाव करण्याच्या गोष्टी मोठ्या दिमाखानें त्रिंबकजी बोलूं लागला, तेव्हां एल्फिन्स्टननें वरिष्ठांकडे साफ लिहून कळविलें, कीं त्रिंबकजीच्या संगतीनें बाजीराव लौकरच इंग्रजांवर उठल्या शिवाय राहणार नाहीं, त्याचें निवारण करण्याची तयारी अगोदर पासून आपण ठेविली पाहिजे. पुढील दोन वर्षांत प्रत्येक व्यवहारांत एल्फिन्स्टनची ही समजूत उत्तरोत्तर दृढ होत गेली. त्रिंबकजीचा हस्तक विठ्ठल नरसिंह गुजराथेंत गेला, तो सुद्धां गायकवाडांचे दरबारीं असलेलें इंग्रजांचें वजन कमी करण्याच्या उद्योगास लागला.

शास्त्री पुण्यास आल्यावर बाजीरावानें त्याच्या म्हणण्याकडे बिलकूल लक्ष दिलें नाहीं. खुद्द शास्त्री सुद्धां रेसिडेंटाच्या मध्यस्थीशिवाय बाजीरावाची भेट घेईना. गायकवाडाकडून नजराण्या दाखल त्यानें जिन्नस आणले होते ते रेसिडेंटासमक्ष बाजीरावानें स्वीकारावे असा आग्रह शास्त्र्यानें धरला, तें बाजीरावास मुळींच खपलें नाहीं. यावरून लौकरच शास्त्र्यास दिसून आलें कीं पेशवा आपली दाद घेत नाहीं, आणि हिशेबाचें बोलणेंही करीत नाहीं, त्याचे कारभारी सर्व आपल्याकडून पैसे मात्र

उपटण्याच्या बेतांत आहेत, तेव्हां आतां पुण्यांत राहण्यांत हांशील नाहीं, असें पाहून तो परत जाण्याच्या विचारास लागला. काम फत्ते करून तो बडोद्यास परत जाता कीं सीतारामाची दिवाणगिरी त्यास मिळाली असती. परंतु पुण्यास त्याचें काम बिघडलें तर हा पुढें इंग्रजांस मिळून पुणें व बडोदें या दोनही दौलतींस अपाय करणार ही गोष्ट प्रत्येकास स्पष्ट दिसत होती. म्हणून समस्त जनतेचे डोळे या वेळीं शास्त्र्याच्या हालचालींकडे लागले होते. बाजीरावालाही उमज पडेना, कीं या स्वारीला कसें वठणीस आणावें. भगवंतराव व गोविंदराव गायकवाड पुण्यास आले त्यांची भेट बाजीरावानें ता. १४·२·१८१५ रोजीं वसंतपंचमीच्या दरबारांत अत्यंत सन्मानपूर्वक घेऊन त्यांनीं आनंदरावाचें स्वदस्तुरचें पत्र आणिलें होतें, त्याचा स्वीकार केला. या वेळचीं कारस्थानें बाजीराव आपल्या बायकांमार्फतही चाल्वीत असे. त्याचे गुप्त हेर बडोद्यास गेले होते त्यांजकडून खात्रीलायक बातमी त्यास आली, कीं आनंदराव व फत्तेसिंगराव हे दोघे बंधु बडोद्यांत केवळ इंग्रजांच्या कैदेंत असल्यत्दाखल आहेत, इंग्रजांचा जाच त्यांस सहन होत नाहीं. पेशवे आपले मुख्य, त्यांनीं आपणांस या जाचांतून सोडवावें, अशी त्यांची धडपड होती. ही स्थिति बाजीरावानें त्रिंबकजीच्या मार्फत एल्फिन्स्टन यास कळविली. पण त्यानें त्याचा साफ इनकार केला. या संबंधानें बाजीराव व एलफिन्स्टन यांजमध्यें पुष्कळच बोलणें झालें. इंग्रज म्हणत 'गायकवाड तहानें आमचा मांडलिक बनला.' बाजीराव म्हणे, 'तो पूर्वापार आमचा ताबेदार असून आमच्या परवानगीशिवाय परभारें इंग्रजांचा ताबा स्वीकारण्यास तो बिल्कूल मुखत्यार नाहीं, तो आमचा नोकर आहे, आणि तो सुखरूप आहे कीं दुःखांत आहे, व इंग्रजांचा त्यास जाच होत आहे कीं काय हें पाहण्याचें काम आमचें आहे. बडोदा रेसिडेंटाच्या मध्यस्थी शिवाय गायकवाडांची भेट घेऊन त्याची खरी स्थिति पाहून येण्यास आम्ही आपलीं माणसें त्याजकडे पाठवितों.' अशा प्रकारच्या अनेक सूचना बाजीरावानें केल्या. परंतु 'तुमचा आतां गायकवाडांवर हक्क नाहीं,' हें एकच उत्तर एल्फिन्स्टननें बाजीरावास पुनः पुनः कळविलें. 'आमचा गायकवाडावर हक्क नाहीं म्हणतां, तर त्यास पदाचीं वस्त्रें कोण देणार? वस्त्रें देण्याचा हक्क पेशव्यांचा आहे कीं नाहीं? वस्त्रें घेण्यासाठीं गायकवाडांनीं पुण्यास आमच्या भेटीस आलें पाहिजे कीं नाहीं?' इत्यादि उलट सुलट प्रश्न विचारून बाजीरावानें एल्फिन्स्टन यास अगदीं कुंठित केलें. तेव्हां त्याचा नेहमींचा निर्वाणीचा जबाब, 'ग० ज० कडे विचारून खुलासा करतों' असा देऊन त्यानें वेळ मारून नेली. ही वेळ इंग्रजांस

मोठी आणीबाणीची होती. याच वेळीं नेपाळांत इंग्रजांना अपजय येत होते आणि भोपाळच्या नबाबावर सिंद्याची फौज चालून गेली होती.

**३ त्रिंबकजीचा कावा, शास्त्र्याचा खून** (२०•७•१८१५).—स.१८१४ च्या दसऱ्याच्या सुमारास एल्फिन्स्टननें शास्त्री यास कळविलें, कीं तुमचे येण्यापासून कांहीं एक फायदा नाहीं तर तुम्ही आतां परत जावें. तो या वेळीं परत गेला असता तर त्यास अपाय झाला नसता. परंतु हिशेबाचा निकाल केल्याशिवाय आपण परत गेलों तर आपली तिकडे नाचक्की होऊन आयताच सीताराम रावजीस जोर चढेल आणि आपले सर्व बेत ढांसळून पडतील, या भीतीनें त्यानें एल्फिन्स्टनला गळ घालून परत जाण्याची गोष्ट सुद्धां बोलूं दिली नाहीं. कालहरण करून आपण बाजीरावास वळवूं अशी त्यास आशा होती. पुण्यास भलत्याच खटपटी चालविल्या-बद्दल एल्फिन्स्टनचे मार्फत शास्त्र्यानें बडोद्याचे रेसिडेंटास लिहून सीतारामावर सक्त कैद बसवली. एल्फिन्स्टननें स. १८१५ च्या फेब्रुवारींत बाजीरावास साफ कळविलें, कीं 'गायकवाडावरील तुम्ही आपली ताबेदारी सोडून देण्यास तयार नसाल, तर आमच्या मध्यस्थीचा कांहीं एक उपयोग होणार नाहीं. सीताराम रावजीचे दोन वकील गोविंदराव बंधुजी व भगवंतराव हे आमच्या विरुद्ध तुमच्याकडे खटपट करीत आहेत त्यांस आमच्या हवालीं करावें. तसें न केल्यास आम्ही शास्त्री यास परत पाठवितों.' त्यावर बाजीरावानें एलफिन्स्टन यास कळविलें, कीं गायकवाडाचे तंट्यांत तुमच्या मध्यस्थीची आम्हास जरूर नाहीं. त्यावरून एल्फिन्स्टननें शास्त्री यास सांगितलें, 'तुमची शिष्टाई विफल झाली. तुम्ही एकदम निघून बडोद्यास जावें.' त्यावर शास्त्र्यानें एल्फिन्स्टनला कळविलें, कीं 'ज्या अर्थीं तुमचे मार्फत प्रकरणाचा निकाल होऊं शकत नाहीं, त्या अर्थीं मीच खाजगी रीतीनें कांहीं दिवस इंग्रजांची मध्यस्थी न ठेवितां बाजीरावाशीं समक्ष बोलणें करून पाहतों. जमलें तर बरेंच झालें; नाहीं तर मीं परत जाण्यास सिद्धच आहें.'

इतका हा बनाव बाजीरावास कळला, तेव्हां तो व त्याचे सल्लागार गोंधळांत पडले. त्यांना दिसून आलें, कीं इंग्रजांची मध्यस्थी जर आपण सोडून दिली तर गायकवाडांकडील आपलें घेणें आपण तरी परभारें कसें वसूल करणार ? सीताराम रावजीनें बाजीरावास असें आमिष दाखविलें होतें, कीं 'तुम्ही शास्त्र्याचा नाद सोडून द्याल तर आम्ही गायकवाडाकडील तुमचें सर्व घेणें वसूल करून देतों.' पण यांत असा प्रश्न उपस्थित झाला, कीं इंग्रजांचा पाडाव झाल्याशिवाय बडोद्यांतून

त्यांचें वजन कसें नाहींसें होणार? आणि इंग्रजांचें वजन बंद पडल्याशिवाय सीतारामा-कडून कर्जाची वसुली तरी कशी होणार? शास्त्री रागावून बडोद्यास परत गेला तर इंग्रज सरकाराचा आपणांवर द्विगुणित राग होईल; गायकवाडाकडील आपलें कर्ज व त्याजवरील आपला ताबा दोन्ही बुडतील. असें पाहून बाजीराव व त्रिंबकजी यांनीं निराळाच घाट रचिला. आजपर्यंतची तुसटपणाची जी वागणूक शास्त्र्याशीं त्यांनीं चालवली होती, ती सोडून त्याच्याशीं त्यांनीं आतां लाडीगोडीचें वर्तन सुरू केलें. ते म्हणाले, तुम्ही असे लगोलग परत जाऊं नका. तुम्ही आम्हीच गायकवाडांचा व्यवहार समजुतीनें मिटवूं. गुजरातेंत गायकवाडानें आम्हांस सात लक्षांचा मुलूख तोडून द्यावा, म्हणजे आम्ही पूर्वींचें सर्व कर्ज सोडून देतों. अशा प्रकारचें बोलणें बाजीरावानें सुरू केलें; आणि शास्त्र्यालाही तें पसंत पडलें. ही तडजोड वास्तविक उभयतांना फायदेशीर होती. बाजीरावास आपलें राज्य वाढविण्याची इच्छा असून गायकवाडास पेशव्यांचे ताबेदारींतून कायमचें मुक्त होतां येत होतें. सालीना नुसते २४ लाख रुपये खंडणीचे बाजीरावास देणेचे असत, ती रक्कम व पूर्वींचें सर्व कर्ज माफ झालें, हा फायदा गायकवाडांला फारच मोठा होता. अशी व्यवस्था घडवून आणण्यासाठीं आणखी कांहीं दिवस पुण्यास राहण्याची परवानगी शास्त्र्यानें एलफिन्स्टनपासून मिळविली. पुढें ही बोलाचाली शास्त्री व बाजीराव यांजमध्यें स. १८१५ च्या मार्च व एप्रिल हे दोन महिने सारखी चालू होती. त्या अवधींत शास्त्र्यास खूष करून आपल्या बाजूस वळविण्याचे पेशव्यानें व त्रिंबकजीनें अतोनात प्रयत्न केले. ते म्हणाले 'तुम्ही बडोद्यास कशास जातां? येथें राहून आमचाच कारभार करा ना. सदाशिव माणकेश्वराचे हातून आमचा कारभार बरोबर निभत नाहीं. तुमच्या सारख्या कर्तबगार मुत्सद्यांचें साह्य आम्हांस असेल तर, आम्ही मराठी राज्याची नवीन घडी चांगली बसवूं.' अशा अनेक गोड भाषणांनीं पेशव्यानें शास्त्र्याचे अंतःकरणास मोठी भुरळ पाडिली. ता. १९·४·१८१५ रोजीं शास्त्री यानें आपल्या पुत्राची मुंज पुण्यांत टोलेजंग समारंभानें केली. श्रीमंत आले होते. शास्त्र्यांनीं ब्राह्मणांस शालजोड्या वांटल्या, त्याबद्दल श्रीमंतांस फार वाईट वाटलें. पुढें बाजीरावानें बायकोची बहीण लग्नाची होती ती शास्त्र्याचे मुलास देऊं केली. हें सर्व बोलणें त्रिंबकजीच्या मार्फत चाललें होतें. त्यांत शास्त्री व त्रिंबकजी यांची मोठी गट्टी जमली. लौकिकांत सुद्धां हा प्रकार चर्चेचा विषय झाला. शास्त्र्याला निःशंक ठेवण्यासाठीं मे महिन्यांत बाजीरावानें ठिकठिकाणच्या यात्रा करण्याचें योजून नासिक व त्र्यंबक येथें जाण्याचा बेत ठरविला. बाजीरावानें

लग्नही नाशकासच करण्याचें ठरवून आपलें कुटुंब व सामान वगैरे बरोबर घेतलें. लग्नाच्या बेतानें पुण्यांतून मंडळी निघाली. त्यापूर्वीच शास्त्र्यानें बडोद्यास पत्र पाठवून सात लाखांचा प्रदेश बाजीरावाचे हवालीं करण्याची मंजुरी मागितली होती. परंतु असा प्रदेश कायमचा तोडून देण्याचें फत्तेसिंगानें साफ नाकबूल केलें. हा जबाब ऐकून शास्त्र्याचे मनाचा गोंधळ उडाला. लगेच तो जबाब बाजीरावास कळवून आपण मोकळें व्हावें तें शास्त्र्यानें केलें नाहीं; आणि बाजीरावाचे कचाट्यांतून निसटण्याची संधि तो पाहूं लागला. लग्नही आतांच करूं नये, पुढें पाहूं, असें त्यानें बाजीरावास कळविलें. बाजीरावाचे बायकोकडून शास्त्र्याचे बायकोस भेटीचें बोलावणें आलें. परंतु बाजीरावाची दृष्टि पापी आहे हें ओळखून शास्त्र्यानें आपल्या बायकोस वाड्यांत पाठविलें नाहीं. या वर्तनानें आपला अत्यंत अपमान झाला असें बाजीरावाच्या मनानें घेतलें. आम्ही एवढे याची मनधरणी करीत असतां हा उघडपणें आपणास असा लाथाडतो, याचें प्रायश्चित्त यास चांगलें भोगावयास लावावें, अशी बाजीरावाची भावना झाली. इकडे आयत्या वेळीं हें लग्न मोडणें त्रिंबकजीच्याही जीवावर आलें. नासिक येथें लग्नाची मोठी तयारी झाली होती. आमंत्रणें जाऊन लोकही जमले होते, अशा स्थितींत लग्न मोडणें म्हणजे खुद्द मराठी साम्राज्याच्या मालकाचा हा मोठाच अपमान होय; याचा सूड आपण पुरेपूर घेतला पाहिजे असें त्रिंबकजीचें मनानें घेतलें. यजमान व सेवक एकमेकांस शोभण्याजोगेच होते. बाजीरावाइतका वहिमी व भित्रा मनुष्य बहुधा कोणी सांपडावयाचा नाहीं; आणि त्रिंबकजीसारखा उलट्या काळजाचा सेवकही बहुधा मिळणें मुष्कील पडेल. शास्त्र्याला लंबे करण्याचा बेत त्यांनीं योजिला आणि तो इतक्या शिताफीनें घडवून आणिला कीं आपलें कपट सहसा कोणास उमगूं नये. इतउत्तर त्रिंबकजीनें शास्त्र्याशीं अत्यंत लघळपणा चालविला, आणि आपण किती निष्कपटपणानें वागतों हें दाखविण्यासाठीं त्यानें शास्त्र्यास असें सुद्धां सांगितलें, कीं 'पूर्वी तुमचा आमचा वाद विकोपास गेला असतां तुम्हांस मारून टाकावें असा सुद्धां आमचा विचार झाला होता.' बाजीरावाची स्वारी नाशकास जात असतां रस्त्यानें हीं बोलणीं चाललीं. स्वारीबरोबर एलफिन्स्टन होताच, त्याच्या कानावर लगेच हें बोलणें शास्त्र्यानें घातलें. अशा वल्गना तोंडानें करणाऱ्या गृहस्थावर शास्त्र्यानें विश्वास टाकून निःशंक राहवें ही गोष्ट पुढें एल्फिन्स्टनलाही अत्यंत गैर वाटली. परंतु बाजीराव व त्रिंबकजी यांच्या वर्तनाची शिताफीच अशी होती कीं, शास्त्री सर्वथैव निर्धास्त राहिला. योग्य

संधि मिळेना, म्हणून त्याचा खून योजलेल्या बेतापेक्षां एक महिना उशीरां झाला, तरी शास्त्र्यास कपट उमगलें नाहीं. पुढें लग्न राहिलें. नासिकची यात्रा संपली, तेव्हां बाजीरावानें आषाढी एकादशीनिमित्त सर्वांसह पंढरपुरास जाण्याचें ठरविलें. तेथें फार मोठा लवाजमा घेऊन जाऊं नये, थोडेच लोक घेऊन जावें, असा बेत झाला. शास्त्र्याबरोबर त्याच्या मदतीस म्हणून बापू मैराळ होता, त्यानें पंढरपुरास येऊं नये, पुण्यासच राहवें असें त्रिंबकजीनें सुचविलें. बापू मैराळ मोठा व धूर्त अंतःस्थ हालचाली ओळखून होता. तो बरोबर असता तर शास्त्र्याला त्यानें सावध केलें असतें. एल्फिन्स्टनही आपल्याबरोबर नसावा अशा उद्देशानें बाजीरावानें त्यास सुचविलें, 'आम्ही थोडेच लोक घेऊन येथून परभारें पंढरपुरास जाऊन दर्शन घेऊन लगेच पुण्यास येतों. तुम्ही बरोबर येण्याची तसदी घेण्याचें कारण नाहीं.' ती गोष्ट एलफिन्स्टनला पटली. त्यानें उत्तर दिलें, 'बरें आहे तर. वेरूळचीं लेणीं येथून जवळच आहेत, मला तीं केव्हां तरी पाहायचीं आहेत; तुम्ही पंढरपुराहून परत येईपर्यंत मी तेवढीं लेणीं पाहून येतों!' ज्येष्ठ वद्यांत बाजीराव नाशकाहून पंढरपुरास जाण्यास निघाला. बरोबर शास्त्री व त्रिंबकजी होते. रस्त्यांत बाजीरावानें अशी बातमी उठविली, कीं नागपुराहून आपला जीव घेण्याकरितां मारेकरी आलेले आहेत आणि हैदराबादेहूनही कांहीं पठाण मारेकरी त्याच उद्देशानें निघालेले आहेत. या बातमीमुळें रस्त्यांत बाजीरावाच्या बचावासाठीं मुद्दाम कडक बंदोबस्त ठेवण्यांत आला. कोणासही बाजीराव भेटेना, जवळ नेहमीं हत्यारबंद पहारेकरी सज्ज राहूं लागले. पंढरपुरास आल्यावर तर हा बंदोबस्त जास्त कडक करण्यांत आला. गोविंदराव बंधुजी याजवर बाजीरावाची मर्जी होऊन तो त्रिंबकजीच्या माणसांबरोबर पंढरपुरास आला. शास्त्र्यानें त्याबद्दल त्रिंबकजीकडे तक्रार केली, त्यावर त्रिंबकजीनें समयोचित उत्तर देऊन शास्त्र्यास निर्धास्त केलें. आषाढ शुद्ध अष्टमीच्या दिवशीं पेशव्यास मेजवानी झाली त्या ठिकाणीं शास्त्री भोजनास गेला होता. रात्रीं परत आल्यावर त्याची प्रकृति बिघडली आणि पुढें कांहीं दिवस त्यास बिलकूल चैन नव्हतें. शास्त्र्यानें बाजीरावास कळविलें, कीं 'माझी प्रकृति बरी नसून बाहेर येण्याची शक्ति नाहीं.' आतां शास्त्री बडोद्याचे दृष्टीस पडत नाहीं, अशा मजकुराचें राणी तख्ताबाईस गोविंदरावानें लिहिलेलें पत्र शास्त्री यास मिळालें. म्हणून घरांत त्यानें असा बंदोबस्त ठेविला, कीं कोणीही भेटीस आल्यास त्याची भेट घेऊं नये. पुढें ता. १७ जुलै १८१५ रोजीं आषाढी एकादशी होऊन गेली. चतुर्दशीच्या दिवशीं म्हणजे २० जुलै १८१५ रोजीं अस्तमानीं

त्रिंबकजीनें लक्ष्मणपंत नांवाचा कारकून शास्त्र्याकडे पाठवून कळविलें, कीं ' ये समई दाटी नाहीं. पेशव्यांची स्वारी उद्यां परत जाणार, तरी आपण आज या वेळीं येऊन दर्शन करून परत जावें. ' ' मला चालवत नाहीं, ' असा जबाब शास्त्र्यानें पाठविला, त्यावरून पुनः तसाच निरोप त्यास आला. तेव्हां शास्त्र्यानें रावजी मराठे यास त्रिंबकजीकडे पाठवून ' मला येण्याची शक्ति नाहीं ' असें पुनः कळविलें. त्याजला त्रिंबकजीनें फिरून शास्त्र्याकडे पाठविलें. ' आज दर्शनाची सोय चांगली आहे, तरी एकवार येऊन जा. ' हा निरोप रावजी मराठ्यानें कळविल्यावर वारंवार आपण नाहीं म्हटलें तर हटवादीपणा दिसतो. त्यामुळें त्रिंबकजीस उगाच वैषम्य वाटेल असें जाणून जवळचीं सात बिनहत्यारी माणसें बरोबर घेऊन शास्त्री देवळांत दर्शनास गेला. जात असतां बोळांत शास्त्री बोवा कोणते असा प्रश्न कोणी तरी त्याच्या नोकरांस केला. त्यावरून हे गळ्यांत कंठा असलेले शास्त्री असें एकानें बोटानें दाखविलें. मंडळींनीं या बोलण्याकडे विशेष लक्ष दिलें नाहीं. देवळांत आल्यावर त्यानें प्रथम दर्शन घेऊन नंतर क्षणभर तेथेंच बसून त्रिंबकजीशीं बोलणें केलें. देवळांत शास्त्र्याला त्याचा वृद्ध उपाध्या होता तो भेटला, त्याच्यापाशीं आपले तीन लोक प्रसादासाठीं मागें ठेवून शास्त्री बाकीच्या चार इसमांसह परत जाऊं लागला. बोळांतून वाट दाखवण्यास बरोबर त्रिंबकजीचे शिपाई पुढें चालत आले. पांच पन्नास पावलें चालून गेल्यावर एकदम पाठीमागून तीन इसम ' वाट द्या, वाट द्या, ' म्हणून मोठ्यानें ओरडत गर्दी मोडीत धावत आले. एकानें शास्त्र्यास पाठीमागून तरवारीनें वार केला, आणि दुसऱ्या दोघांनीं पुढून येऊन त्याचे तुकडे केले. हा प्रकार पाहतांच बरोबर जे शास्त्र्याचे चार इसम होते ते थोडे बहुत जखमी होऊन पळून गेले. इतक्यांत पाठीमागून तो वर सांगितलेला वृद्ध उपाध्या व बाकीचे तिघे त्याच वाटेनें आले, आणि चुडी घेऊन पाहतात तों तुकडे झालेलें शास्त्र्याचें प्रेत त्यांच्या नजरेस पडलें; आणि नागव्या तलवारींनिशीं धावत देवळाकडे पळत येणारे पांच इसम त्यांस दिसले. या सर्व मंडळींची खात्री झाली, कीं त्रिंबकजीनें हा खून स्वतः देखरेख ठेवून करविला. दुसरे दिवशीं सकाळीं शास्त्र्याच्या मंडळीनें त्रिंबकजीची विनंति केली, कीं ' या कृत्याचा तपास करा. ' त्यावर त्यानें जबाब दिला, " कोणाचा म्हणून वहीम घ्यावा! किती तरी इसम शास्त्र्याच्या जिवावर टपलेले होते. सीताराम रावजी बडोद्यास कैदेंत आहे तो यास पाण्यांत पाहतो. कान्होजी गायकवाड कर्नाटकांत इंग्रजांच्या कैदेंत आहे त्याचाही डोळा शास्त्र्यावर आहे. " परंतु यांत त्रिंबकजीनें गोविंदराव व भगवंतराव

यांचीं मात्र नांवें घेतलीं नाहींत. दुसरे दिवशीं शास्त्र्याची मंडळी निघून पुण्यास आली. तेथें त्यांस बाजीराव व त्रिंबकजी यांचा निरोप पोंचला, कीं तुम्हीं आतां आमचे भेटीस येण्याचें कारण नाहीं. यास्तव दोघेही त्या दिवसापासून कडक बंदोबस्त करून राहूं लागले. प्रकरण आपल्यावर शेकतें कीं काय याबद्दल त्यांस बरेच दिवस धास्ती वाटत होती. त्यांनीं तपास तर कांहीं एक केला नाहींच, परंतु या प्रकरणाचा कोणीं उच्चार सुद्धां करूं नये, अशी सक्त ताकीद देऊन जो कोणी बाहेर त्याची चर्चा करील त्याची वर्दी ताबडतोब त्रिंबकजीकडे लावण्यासाठीं त्यानें आपले गुप्त हेर चोहोंकडे ठेवून दिले. गोविंदराव बंधुजी व भगवंतराव हे पुण्यास येऊन निर्भयपणें वावरूं लागले. अशा रीतीनें जुलै महिना संपला. पुढें इंग्रजांनीं यासंबंधीं काय तजविजी केल्या तें सांगावयाचें आहे. एल्फिन्स्टननें सर्व संबद्ध इसमांच्या स्वतः साक्षी घेऊन तपास केला, त्यांत ज्या गोष्टी नजरेस आल्या त्यांवरून वरील हकीकत रचण्यांत आली आहे.

**४ शास्त्र्याच्या खुनाची बाजीरावास बाधा.**—खुनाची बातमी एल्फिन्स्टन यास वेरूळ येथेंच कळली, तेव्हां इतःपर बाजीरावासंबंधीं कांहीं तरी निश्चित धोरण ठरविलें पाहिजे असा त्याचा ग्रह बनला. गायकवाड व बाजीराव दोघेही इंग्रजांचे दोस्त. दोघांचा तंटा मिटविण्याचें काम त्यांनीं अंगावर घेतलेलें. त्यासाठीं एकाचा वकील दुसऱ्याकडे आला असतां आणि त्यास इंग्रजांची जामीनगिरी असतां त्याचा असा दिवसा ढवळ्या खून होतो काय, आणि त्या संबंधानें नुसतीं कानांत तुळशीपत्रें घालून आपण बसायचें कीं काय? असे विचार मनांत आणून एल्फिन्स्टननें बाजीरावास वेरुळाहूनच एक पत्र लिहून कळविलें, कीं 'तुम्ही या खुनाचा ताबडतोब तपास करून गुन्हेगारांना शिक्षा करा.' तसेंच ग० ज० कडेही त्यानें सर्व हकीकत कळवून पुढील तजविजीसाठीं अधिकार मागविला. त्रिंबकजीवर गुन्हा लागू होईल तर त्यास पकडून शिक्षा केल्याशिवाय इंग्रजांचा हा अपमान धुऊन निघावयाचा नाहीं, खुनांत बाजीरावाचा जरी संबंध असला, तरी त्यास बाजूस ठेवून त्रिंबकजीला शिक्षा झाली म्हणजे ती बाजीरावाला झाल्याप्रमाणेंच आहे, असें मनांत ठरवून त्यानें तैनाती फौज जालना येथें होती तिला घोडनदीवर जाण्याचा हुकूम पाठविला. बापू मैराळ वगैरे बडोद्याची मंडळी पुण्यास होती त्यांचें सर्व प्रकारें संरक्षण करण्याची त्यानें तजवीज केली; आणि आपण वेरुळाहून निघून ता. ६ ऑगस्ट रोजीं पुण्यास पोंचला. रस्त्यांत त्याला पंढरपुराहून निघालेली मंडळी भेटली.

त्यांनीं ह्या प्रकरणांत त्रिंबकजीचेंच नांव मुख्यतः घेतलें. ब्राह्मणी राज्यांत ब्राह्मणाचा खून भरवस्तींत सुप्रसिद्ध मंदिरानजीक अशा अकल्पित रीतीनें व्हावा, हा प्रकार सर्वांसच निंद्य वाटला. हां हां म्हणतां ती बातमी सर्व देशभर पसरली. परत येतांच एल्फिन्स्टननें बारकाईनें तपास चालविला. तेव्हां त्रिंबकजीचेंच हें कृत्य ह्यांत बिलकूल संशय त्यास वाटला नाहीं. इकडे बाजीरावाची व त्रिंबकजीची खात्री होऊन चुकली, कीं रेसिडेंट कांहीं तरी जबरदस्त प्रकार करणार. म्हणून ते फौजा जमवून आपल्या बचावाच्या उद्योगास लागले. खुद्द त्रिंबकजी ता. ७ ऑगस्ट रोजीं पुण्यास आला. त्यानें या प्रकरणाचा कांहीं एक तपास केला नाहीं. गोविंदराव बंधुजी व भगवंतराव यांस खुशाल उजळ माथ्यानें त्यानें वावरूं दिलें. स्वतः बाजीराव नागपंचमीस म्हणजे ता. ९ ऑगस्ट रोजीं रात्रीं गुप्तपणें बुरख्याच्या पालखींतून पुण्यांत आला. त्या वेळीं त्यास सलामी वगैरे नेहमींचे रिवाज कांहीं झाले नाहींत. नागपंचमीच्या दिवशीं श्रावणमास दक्षिणेची मोठ्या समारंभानें सुरुवात व्हावयाची, त्या ऐवजीं बाजीरावाचा प्रवेश असा गुपचूप झाला. भीतीमुळें पुण्यांतील लोक बडोदेकर मंडळीशीं कोणताही व्यवहार ठेवीनातसे झाले. कांहीं तरी भलताच प्रकार होणार अशीं दुश्चिन्हें बाहेर भासूं लागलीं. खुनाच्या कामांत बाजीरावाचें किंवा त्रिंबकजीचें अंग दिसेल असा कोणताही पुरावा शिल्लक राहूं नये अशी खटपट त्यांनीं चालविली. हें पाहून एल्फिन्स्टननें बाजीरावास ऑगस्ट ११ रोजीं कळविलें, ‘ आजच्या आज मला तुमची भेट पाहिजे. ’ बाजीरावानें जबाब पाठविला, ‘ आज प्रकृति बरोबर नसल्यानें भेट होणार नाहीं. ’ दुसरे दिवशीं पुनः एल्फिन्स्टननें तसाच निरोप पाठविला, त्यावर बाजीरावानें कळविलें, ‘ आजच उपजलेली आमची मुलगी मरण पावल्यानें तीन दिवस अशौच आहे.’ तें ऐकून एलफिन्स्टननें पेशव्याच्या नांवानें एक पत्र लिहून तें सदाशिव माणकेश्वराकडे पाठविलें. त्यानें जबाब पाठविला, ‘ आमच्यानें हें पत्र बाजीरावास देतां येणार नाहीं. ’ त्यावरून एल्फिन्स्टननें आपल्या मुनशीस तें पत्र देऊन बाजीरावाकडे पाठविलें. पण मुनशीची भेट बाजीरावानें घेतली नाहीं. मात्र पत्रांत काय मजकूर आहे तो समजून घेण्याकरितां त्यानें आपले दोन इसम रेसिडेन्सींत पाठविले. त्यांसच एल्फिन्स्टननें सांगितलें, ‘ या प्रकरणांत बाजीरावावर आमचा कांहीं एक आरोप नाहीं, गुन्हेगार त्रिंबकजी आहे त्यास आमचे स्वाधीन करा म्हणजे काम भागेल. पण त्यास बचावण्याचा प्रयत्न पेशवे करतील तर मात्र त्यांजवर जबाबदारी येईल. ’ असें बोलणें झाल्यावर शेवटीं तें पत्र ता. १५ ऑगष्ट

रोजीं बाजीरावानें स्वीकारिलें. पत्रांत मजकूर असा होता, कीं ' तुम्ही स्वतः ब्राह्मण आहां. ब्राह्मणी राज्यांत ब्राह्मणाचा खून होणें तुम्हांसही गैरशिस्त वाटल्याखेरीज राहणार नाहीं. याचा तपास झाला पाहिजे. खरा प्रकार तुमचे कानांवर जात नसावा, सबब तो तुमच्या नजरेस आणणें आम्हांस भाग पडत आहे. खुनाची मुख्य जबाबदारी त्रिंबकजीवर येते या विषयीं आम्हांस संशय वाटत नाहीं. सर्व जग हा प्रकार बाहेर उघड बोलत आहे. इतके दिवस झाले असतां अद्याप या प्रकरणाचा तपास तुम्हीं किंवा त्रिंबकजी बिलकुल करीत नाहीं, वहिमी माणसांना पकडीत नाहीं, तपास करण्याविषयीं आम्ही आग्रह धरीत असतां त्रिंबकजी त्यांत यत्किंचित् लक्ष घालीत नाहीं, त्रिंबकजीच्या विरुद्ध भरपूर पुरावा आहे, तोच या खुनाचा उत्पादक, अशी माझी खात्री झाली आहे. सबब त्याला व गोविंदराव बंधुजी व भगवंतराव गायकवाड यांना एकदम पकडून सक्त बंदोबस्तांत ठेवा. या मंडळीच्या गुन्ह्याबद्दल तुमची स्वतःची जरी खात्री नसली तरी त्यांस तूर्त अटकेंत ठेवण्याइतका पुरावा आहेच. पुढें त्याचा निकाल काय करावयाचा तो तुम्ही व ग० ज० मिळून करणें तो करितां येईल. आज माझें एवढेंच मागणें आहे, कीं या मंडळींस अटकेंत ठेवण्यांत एक क्षणाचा विलंब करूं नका. परराष्ट्राचा वकील तुमच्या डोळ्यां देखत मारला गेल्यानें तुमची जी बाहेर अत्यंत अब्रू नाहींशी झाली आहे ती भरून काढण्यासाठीं, त्रिंबकजीचा बंदोबस्त लगोलग झाला पाहिजे. नाहीं तर केवळ या एकट्यामुळें तुम्ही व तुमचें राज्य गोत्यांत आल्याखेरीज राहणार नाहीं. कारण आज त्याचे हातांत सर्वाधिकार व फौज आहे. निजाम, गायकवाड, व इंग्रज यांच्या प्रांतास तुमचें राज्य भिडलेलें असून त्रिंबकजीमुळें या सर्वांस नुकसान पोंचण्याचा संभव आहे. सबब त्रिंबकजीला अटक केल्याशिवाय बंदोबस्त होणार नाहीं. त्रिंबकजीकडून जे कांहीं अनाचार घडतील त्यांची जबाबदारी तुमच्यावर पडल्याशिवाय राहणार नाहीं. म्हणून तुम्हास मी वेळींच सावध करीत आहें. याचा बंदोबस्त न झाल्यास परराष्ट्राचे कोणीही वकील तुमच्याकडे येण्यास धजणार नाहींत. त्या योगें इंग्रज सरकाराशीं तुमचा संबंध तुटेल. हे सर्व परिणाम लक्षांत घेऊन तुम्ही काय इलाज करितां तें ताबडतोब कळवा. त्रिंबकजीच्या जागीं दुसऱ्या कोणास नेमावयाचें त्याचा विचार तुमचा तुम्ही पाहिजे तो करा. तुमच्या अंतर्गत कारभारांत ढवळाढवळ करण्याची ब्रिटिश सरकारची बिलकुल इच्छा नाहीं. ''

एल्फिन्स्टनचा हा खलिता म्हणजे बाजीरावाची झणझणीत कानउघाडणी होय; तिच्याकडे दुर्लक्ष केल्यामुळें प्रकरण विकोपास गेलें. वस्तुतः या खुनाचा उगम बाजीरावाकडून झाला असें मुळींच दिसत नाहीं. तितकें धाडस बाजीरावांत नव्हतें आणि खुनापासून त्याचा कांहीं फायदाही नव्हता. मात्र खुनाचें प्रकरण खुद्द आपल्याच अंगावर येईल अशी कल्पना त्यास झाली नाहीं. खुनाचा घाट रचला जात आहे याची पूर्ण माहिती त्यास असली पाहिजे, आणि इच्छा असती तर खून न होऊं देण्याचें सामर्थ्यही त्यास होतें; म्हणून परभारें खून होतो आहे तर होईना! इतकाच आरोप बाजीरावावर येणें शक्य आहे. खून मुख्यतः त्रिंबकजीनें करविला. त्यास भरपूर प्रोत्साहन बडोद्यांतून मिळालें. मूळ कल्पना बडोदेकर मंडळीची, त्याचें साहित्य सिद्ध केलें त्रिंबकजीनें, आणि माहिती असून दुर्लक्ष केलें बाजीरावानें, असा निर्णय पुराव्यावरून देतां येईल. गुजरातचा ताबा पेशव्यास हवा होता, आणि शास्त्री दूर झाल्याशिवाय गायकवाडींत पेशव्यांचा रिघाव झाला नसता. कोणीकडून तरी इंग्रजांचें नाक कापून गायकवाडांच्या साह्यानें गुजरातेंतून इंग्रजांस बाहेर काढावें असा त्रिंबकजीचा मनोदय या प्रकरणांत दिसून येतो. प्रकरण भलत्याच विकोपास जाईल अशी अटकळ त्यासही झाली नाहीं. एल्फिन्स्टननें मात्र या बनावाचा फायदा घेऊन तैनाती फौजेची एक तुकडी पुण्यास आपल्या जवळ आणिली, आणि बाजीरावास गुन्ह्यांत न गोवतां परभारें त्यास शह दिला. वरील खलित्यानें बाजीराव अगदीं गोंधळून गेला; आणि तुम्ही आम्ही समक्ष भेटून निकाल करूं, असा मोघम जबाब त्यानें रेसिडेंटास पाठविला. भेटीचा दिवस नेमला तोही पुष्कळ अवधीचा. एल्फिन्स्टननें कळविलें भेट हवी असेल तर ती ताबडतोब व्हावी, आणि भेटीच्या प्रसंगीं त्रिंबकजी हजर असतां नये. त्यावर दोन दिवसांनीं बाजीरावानें सदाशिव माणकेश्वराबरोबर कळविलें, कीं 'आमचे मतें खुनाचे प्रकरणांत त्रिंबकजीचें अंग अगदीं नाहीं. केवळ तुमच्या मर्जीसाठीं आम्ही त्यास अटकाव करण्यास कबूल आहों. एल्फिन्स्टननें ती गोष्ट मान्य केली, परंतु बाजीरावानें पुनः टाळाटाळी चालविली. इकडे या अवधींत बापू मैराळ व दुसरी बडोदेकर मंडळी यांचा त्रिबजीनें अत्यंत छळ चालविला. त्यांस पुण्यांत राहणें धोक्याचें वाटून ते इंग्रजी हद्दींत रेसिडेंटाच्या आश्रयास जाऊन राहिले. त्यांची पुष्कळशी मंडळी त्रिंबकजीनें फितूर केली. बापू मैराळ रेसिडेन्सींत राहण्यास जाऊं लागला, तेव्हां त्याच्या फितुरलेल्या मंडळींनीं पगारासाठीं त्याची अडवणूक केली, तेव्हां एल्फिन्स्टननें सव्वा लाख रुपये भरून बापू मैराळाची सुटका

केली. त्रिंबकजीनें मोठ्या फौजा पुण्याजवळ जमा केल्या. त्यावरून ता. २० ऑगस्ट रोजीं एल्फिन्स्टननें बाजीरावास कळविलें, तुम्ही या फौजा पुण्यांतून काढून द्या, नाहीं तर घोडनदीची इंग्रज फौज आम्ही येथें बोलावतों.

बाजीराव—इंग्रजांशीं वैरभाव धारण करण्याची आमची इच्छा नाहीं. परंतु त्रिंबकजीस युक्तियुक्तीनेंच हस्तगत केलें पाहिजे. कारण त्याच्या ताब्यांत दहा हजार स्वार व पांच हजार पायदळ एवढी फौज तयार असून, शिवाय ५०–६० किल्ले व पाऊण कोटी उत्पन्नाचा मुलूख आहे. अशा इसमास पकडणें ही गोष्ट सोपी नाहीं. त्याचे अंगीं गुन्हा लागू केल्याशिवाय कायद्यानें त्यास पकडतां येत नाहीं. कारण ज्या इसमांनीं खून केला त्यांचा संबंध त्रिंबकजीशीं पोंचविण्यास कांहीं एक पुरावा नाहीं.

इकडे एल्फिन्स्टननें त्रिंबकजीविरुद्ध ज्या इसमांचा पुरावा गोळा केला होता त्यांना नाहींसे करण्याचा प्रयत्न त्रिंबकजीनें चालविला; आणि खुद्द बाजीरावानेंही त्रिंबकजीला कोठें तरी बाहेर पाठविण्याचें योजिलें. बाहेर जाऊन त्यानें बंड उभारावें व पेशव्यानें त्यास अंतस्थ रीतीनें मदत करून इंग्रजांचा पाडाव करावा असा उद्योग सुरू झाला. त्यावरून एल्फिन्स्टननें हैदराबादची फौज जालना येथें बोलाविली; आणि कर्नल स्मिथ यास त्रिंबकजीच्या पाठलागास नेमिलें. बाजीरावानें दुसऱ्या अनेक युक्त्या चालू केल्या. अशा खालीं ऑगस्ट महिना संपला. ता. १ सेप्टेंबर रोजीं ग०ज०चा हुकूम आला त्यांत रेसिडेंटानें केलेली सर्व योजना त्यानें पसंत ठेवून आणखी बाजीरावास असें कळविलें, कीं त्रिंबकजीचा तपास करून त्याजवर गुन्हा लागू झाला, तरी त्यास फांसावर चढविलें जाणार नाहीं. फार तर जन्मभर कैदेंत ठेवण्यांत येईल. परंतु गुन्ह्याचा तपास झाला पाहिजे, आणि त्या कामीं बाजीरावानें मदत केली पाहिजे. बाजीराव जर त्रिंबकजीचा बचाव करील किंवा त्यास पळून जाण्यास संधि देईल, तर मात्र प्रकरण थोडक्यांत मिटणार नाही. ग० ज० नें बाजीरावास अशा मजकुराचें पत्र पाठवून रेसिडेंटास कळविलें, कीं आतां बाजीरावापाशीं पुढें सर्व व्यवहार तुम्ही बंद करा आणि त्रिंबकजी पळून न जाईल असा बंदोबस्त ठेवा.

ता. ४ सेप्टेंबर रोजीं ग० ज० चें पत्र व दुसरें आपलें एक पत्र अशीं एल्फिन्स्टननें बाजीरावास सादर केलीं; आणि त्रिंबकजीला एकदम स्वाधीन करा अशी मागणी केली. यापूर्वी त्यानें त्रिंबकजीला आपल्या ताब्यांत मागितलें नव्हतें, फक्त तुम्ही त्यास अटकेंत ठेवा एवढीच मागणी होती. अशा स्थितींत त्रिंबकजीस स्वाधीन करावें,

कीं एकदां इंग्रजांशीं दोन हात करून पाहवे, अशी बाजीरावाची कांहीं वेळ धरसोड चालली. त्रिंबकजी व आपण पुण्यांतून पळून जाऊन बाहेर युद्ध सुरू करावें असा प्रथम मनाचा निश्चय बाजीरावानें केला, परंतु बापू गोखल्यानें तो त्याचा बेत मोडून काढीला. इकडे एल्फिन्स्टननें ता. ४ च्याच पत्रांत बाजीरावास कळविलें होतें, कीं उद्यांच्या उद्यां त्रिंबकजीस हवालीं न कराल तर इंग्रज फौजा पुण्यावर चालून येतील. त्यावरून ता. ४ सेप्टेंबरच्या रोजीं बाजीरावानें वाड्यांत आपली सर्व मंडळी जमवून वाटाघाट केली. ता. ५ सेप्टेंबर रोजीं सकाळीं बाजीरावाकडून रेसिडेंटास निरोप गेला, कीं त्रिंबकजीला आम्हींच अटक करितों, तुम्ही आपल्या ताब्यांत मागूं नये. एल्फिन्स्टन—"प्रथम त्रिंबकजीस अटक करून मग काय तें बोला." त्यावरून ता. ५ रोजीं रात्रीं बाजीरावानें त्रिंबकजीस अटक करून वसंतगडचे किल्ल्यावर रवाना केलें; आणि त्याची वर्दी ता. ६ रोजी सकाळीं रेसिडेंटास पाठविली. त्यावरून रेसिडेंटानें कळविलें, 'एवढ्यावर हें प्रकरण मिटणार नाहीं. त्रिंबकजी पळून जाईल किंवा बंडखोरी करील तर त्याचा जाब तुम्हांस द्यावा लागेल. उलट पक्षीं तुम्हीं त्यास आमचे हवालीं केलें म्हणजे हें एकंदर प्रकरण संपून तुमचे आमचे व्यवहार पूर्ववत् सुरू होतील. न कराल, तर ग० ज० कडून तुमचे हितास अपाय होणारे हुकूम आल्यास ते अमलांत आणणें मला भाग पडेल.' त्रिंबकजीस केलेली अटक सर्वथा पोकळ असून रेसिडेंटाच्या समजुती पुरता तो देखावा केलेला होता. ता. ७ रोजीं सदाशिव माणकेश्वर येऊन एल्फिन्स्टनची पायधरणी करूं लागला. तो म्हणाला 'त्रिंबकजीस आपले ताब्यांत घेण्याचा आग्रह तुम्ही मेहरनजरेनें परत घ्या, मीं बाजीरावाची समजूत घालून त्यास अटक करविलीच आहे; एवढ्यावर मी साहेबांची समजूत करून येतों, असें आश्वासन मी श्रीमंतांस दिलें आहे. इतक्या उपर आपण माझी विनंति न मान्य कराल, तर मग मला विष घेऊन प्राणत्याग करावा लागेल. रेसिडेंटानें ही विनंति बिलकूल मान्य केली नाहीं आणि सदाशिव माणकेश्वरानें विष ही पण घेतलें नाहीं. पुनः रोज भेटीस येऊन तो अशाच गोष्टी रेसिडेन्टाशीं बोलूं लागला. इकडे बाजीरावानें वाईस जाऊन बंड उभारण्याचा घाट घातला. त्याबरोबर एल्फिन्स्टनें शिरूरची फौज पुण्यास बोलावली आणि बाजीरावास पुनः बजावलें, 'त्रिंबकजीस हवालीं करा म्हणजे सर्व प्रकरण अद्यापि मिटेल, शास्त्र्याच्या कुटुंबास थोडी नुकसानभरपाई मात्र द्यावी लागेल. आज तुमच्या एका शब्दानें हें सर्व भागणार आहे. तें न करितां तुम्हीं पुणें

सोडून जाल तर त्याचे परिणाम तुम्हांस भोगावे लागतील. हा निरोप जातो तों तिकडून बाजीरावानें मेजर फोर्ड यास भेटीस बोलावलें. त्या वेळीं बाजीरावानें आपल्या कारभारावर नुकतीच मोर दिक्षित मराठे याची नेमणूक केली होती. मेजर फोर्ड दाखल होतांच त्यास चिमाजी आप्पा व मोर दीक्षित यांनीं विचारिलें, या प्रसंगास तोड काय करावी ? त्यानें सांगितलें, ' त्रिंबकजीस हवालीं करण्याशिवाय दुसरा मार्ग नाहीं.' हें ऐकतांच बाजीरावानें त्या गोष्टीस मान्यता देऊन फोर्ड यासच रेसिडेन्सींत पाठवून त्रिंबकजीस आणून स्वाधीन करतों असें कळविलें. तदनुसार ता. ११ सेप्टेंबर रोजीं कॅप्टिन हिक यास ८५० लोक बरोबर देऊन वसंतगडास पाठविलें. तेथें ता. १९ सेप्टेंबर रोजीं त्रिंबकजी कॅप्टिन हिकचे स्वाधीन झाला, तसेंच ता. २५ रोजीं गोविंदराव बंधुजी व भगवंतराव यांस पुणें येथें बाजीरावानें रेसिडेंटाचे हवालीं केलें. ता. २६ रोजीं तिघांची रवानगी ठाण्याचे किल्ल्यांत झाली. कर्नल स्मिथ इंग्रजी फौज घेऊन पुण्यास आला होता तो ता. २९ रोजीं परत शिरूरला गेला.

अशा रीतीनें एलफिन्स्टनच्या नेटानें या प्रकरणाचा तात्पुरता निकाल लागला आणि केलेल्या कृत्याबद्दल आपला आवडता दोस्त आपण होऊन हवालीं करण्याचा अपमान बाजीरावास सहन करावा लागला. कांहीं तरी पळवाट काढण्याचे शक्य तितके इलाज त्यानें केले. इंग्रजांशीं एकवार झुंज घ्यावी असाही त्याचा बेत होता, पण तो बेत त्याच्या एकाही सल्लागारानें पसंत केला नाहीं. एल्फिन्स्टनची खात्री होऊन चुकली, कीं बाजीरावाशीं आतां आपली दोस्ती कायमची तुटली, आणि इतउत्तर तो सुडाच्या उद्योगास लागणार. त्यासाठीं आपणही आतां त्याच्याशीं अशाच जिकिरीचें वर्तन ठेविलें पाहिजे. अशा तडफदार निश्चयानें या आणीबाणीच्या प्रसंगीं पुण्यास इंग्रजांची बाजू संभाळल्याबद्दल जशी तेव्हां ग० ज० नें एल्फिन्स्टन यास शाबासकी दिली, तशीच अद्यापि त्याजबद्दल त्याची प्रशंसा होत आहे.

वसईच्या तहांतील कलमें उघडपणें मोडण्याचें धाडस बाजीरावानें हळूहळू सुरू केलें, त्यास या त्रिंबकजीच्या प्रकरणानें जास्तच दुजोरा मिळाला. त्रिंबकजीला कारभारांतून काढा असें सांगण्याचे अनेक प्रसंग घडले होते. परंतु शास्त्र्याच्या खुनानें ती गोष्ट परभारें साध्य होऊन इंग्रजांच्या पथ्यावर पडली; आणि ब्राह्मणाच्या खुनाचा मोबदला यथायोग्य घेतल्याबद्दल एल्फिन्स्टनची लोकांत वाहवा झाली. एकंदरींत बाजीरावानें कितीही अन्याय केले असले, तरी शास्त्र्याच्या या खुनानें त्याची बाजू अगदींच लंगडी पडली, आणि बाजीरावाचें राज्य गेलें त्याबद्दल लोकांस

दुःख वाटेनासें झालें. नारायणरावाच्या खुनानें जसा रघुनाथरावाचा नाश झाला, तसाच शास्त्र्याच्या खुनानें बाजीरावाचा झाला.

बडोद्याचा मात्र शास्त्र्याच्या खुनानें फायदाच झाला. पेशव्यानें गायकवाडांकडे तीन कोट घेणें काढलें होतें तें आपोआपच फिटलें, आणि त्रिंबकजी बडोद्याच्या कारभारांत ढवळाढवळ करणार होता ती बंद झाली. सीतारामरावजी इंग्रजांस काढण्याच्या उद्योगांत होता तोही शास्त्र्याच्या खुनानें कैदेंत पडला. बडोद्याचा कारभार शास्त्र्याच्या मुलास देऊन गोविंदराव बंधुजी व भगवंतराव या दोघांस इंग्रजांनीं गायकवाडांचे हवालीं केलें; आणि सीताराम रावजीस त्यांनीं आपले कब्जांत घेतलें. शास्त्र्याचे खुनाबद्दल पेशव्याकडून दंड वगैरे कांहीं एक घेण्यांत आला नाहीं. बापू मैराळ पुणें येथें दुखणें लागून त्याच सालीं मरण पावला.

**५ गंगाधरशास्त्री, पूर्ववृत्त व योग्यता***—गंगाधर कृष्ण पटवर्धन हा मेणवलीचा राहणारा. याचा जन्म सन १७७५ चे सुमारास झाला. त्यास वयाचे आठव वर्षीं पुण्यास पेशव्यांचे वाड्यांत कर्नाटक स्वारीचे दप्तरांत कारकुनीचें काम मिळालें. हे पटवर्धन हरिपंत फडक्याचे उपाध्ये असल्यामुळें त्यांच्याकडे गंगाधराचें जाणें येणें होतें. हरीपंत तात्यानें गंगाधर कारकुनी करतो म्हणून त्याचें उपाध्येपण काढून घेतलें, त्यावरून त्यानें कृष्णातीरीं वाईस जाऊन वयाचे वीस वर्षेपर्यंत शास्त्राध्ययन केलें.

सवाई माधवरावाच्या मृत्यूनंतर पेशवाईसंबंधानें ज्या घडामोडी झाल्या, त्या गंगाधर शास्त्री यास माहीत होत्याच. त्यानें बाळोजी कुंजराबरोबर पेशवे दरबारांत राहून बाजीरावाची मर्जी संपादिली. श्रीमंतांची शास्त्र्यावर मर्जी बसली म्हणून नानाचें व त्याचें वितुष्ट आलें. त्यास दुसरें एक कारण असें झालें, कीं 'नाना फडणीसाचा सासरा दादा गद्रे याची एक रक्षा होती, तिची शास्त्र्यावर मर्जी बसली, त्यामुळें नाना फडणीस त्याचा द्वेष करूं लागला, आणि त्यानें शास्त्र्याचे वडिलांस कळविलें, कीं गंगाधरशास्त्री आमचे कडील बातमी बाजीरावास कळवितो हें ठीक नाहीं. पुढें शास्त्र्याचे वडिलांस नाना आपला

**पटवर्धन**
**कृष्णंभट**
|
**गंगाधरशास्त्री**
|
**भिमाशंकर बाळकृष्ण विनायक**

* आत्मचरित्र त्रै. व. ३; का. प्र. इ. सा.

सूड घेईल अशी धास्ती पडून तो कुटुंबसह बडोद्यास राहवयास गेला. तेथें त्या वेळेचा दिवाण रावजी आप्पाजी यानें त्याचा चांगला परामर्ष घेतला. रावजी आप्पाजीचा व शास्त्र्याचे वडिलांचा स्नेह होता. गोविंदराव गायकवाडास बडोद्याचें पद मिळवून देण्याचे कामीं शास्त्र्याचे वडिलांनीं हरिपंत व नाना फडणीस यांकडे शिफारस करून व स्वतः पैसे वगैरे देऊन पुष्कळ खटपट केली होती, आणि या खटपटीमुळेंच पुढें गोविंदरावाची दिवाणगिरी रावजी आप्पाजीस मिळाली. एवंच रावजीवर शास्त्री घराण्याचे उपकार झालेले होते. रावजीचा मुलगा सीताराम व गंगाधरशास्त्री हे दोघेही लहानपणीं स्नेहभावानें एकत्र वाढले. गायकवाडींतून पटवर्धनास १२०० रु. वर्षासन करून देण्यांत आलें. रावजी आप्पाजी मरण पावल्यावर सीतारामबावास दिवाणगिरी देण्याची खटपट गंगाधरशास्त्र्यानें केली. रेसिडेंट वॉकरचा त्याजवर अत्यंत लोभ होता. त्यानें शास्त्र्यास गायकवाडाच्या दरबाराशीं बोलणें करण्याच्या नाजूक कामीं नेमिलें. त्या वेळीं " हें काम मला नको, लोक आपणास विरुद्ध समजावतील आणि सीतारामबावांचें व माझें वांकडें पडेल. त्या दिवशीं साहेबांनीं आज्ञा केली, कीं तुम्ही चोरी लांच न करतां उभय सरकारांचें काम निष्ठेनें करावें, म्हणजे तुमचा सांभाळ मी करीन. पुढें मी मगरूर, माझें बोलणें बहुत अमर्यादेचें पडतें असें सीतारामबापूस वाटूं लागलें, आणि उत्तरोत्तर उभयतांचें वितुष्ट पडत आलें." ता. १५·१२·१८०८ चे पत्रांत वाकरनें आनंदराव गायकवाडास खास पत्र लिहून शास्त्री याची त्याजकडे शिफारस केलेली आढळते. इंग्रजांस आंत आणणारा मुख्य पुरुष जो दिवाण रावजी आपाजी त्याला शास्त्र्याची मदत भरपूर होती. पुढें रावजी आपाजी ता. १८·७·१८०३ रोजीं मरण पावला, त्यापूर्वी थोडे दिवस म्हणजे ता. २·२·१८०३ रोजीं दरमहा शंभर रुपये पगारावर रेसिडेंटाशीं गुप्त बोलणें करण्याच्या कामावर शास्त्री याची नेमणूक प्रथम झाली. रावजीचे पश्चात् बाबाजी आपाजीशींही शास्त्र्याचा स्नेह कायम राहिला, हें त्यांच्या पत्रव्यवहारावरून व्यक्त होतें. शास्त्री याजबद्दल एल्फिन्स्टनचा अभिप्राय मार्मिक आहे तो असा. " गंगाधरशास्त्री हा मोठा धूर्त व बुद्धिमान आहे. त्यानें बडोदें संस्थानाची व्यवस्था उत्तम ठेविली आहे. येथें पुण्यास तो पुष्कळ खर्च करून मोठ्या मिजाशींत राहतो व आपली स्वारी अशा झोकांत काढितो, कीं सर्व शहर त्याच्याकडे पाहत राहतें ! तो जुन्या पद्धतीचा विद्वान् शास्त्री असला तरी थेट इंग्रज असल्याप्रमाणें राहण्याची ऐट करितो. तुरतुर चालतो, तडतड बोलतो, वाटेल त्याला उलट उत्तर करतो, पेशवा व त्याचे कारभारी यांना ' मूर्ख ' म्हणतो. ' डॅमरॅस्कल '

हा शब्द त्याच्या तोंडीं फार आहे; बोलतांना मधून-मधून इंग्रजी शब्द खूप घुसडून देतो ! " अशी या पुरुषाची पूर्व पीठिका आहे.

**६ शास्त्र्याच्या खुनामुळें बडोद्यांतील स्थित्यंतर** (स.१८१५–१७). बडोद्याचा पुढील वृत्तान्त येथेंच पुरा करणें संगतीच्या दृष्टीनें इष्ट आहे. शास्त्री नाहींसा झाल्यानें बडोद्यांतील इंग्रजविरोधी पक्षास किंचित्काळ मोठें समाधान वाटलें; आणि इंग्रजांचें धोरण ही कांहींसें कुंठित झालें. बडोद्यांतील इंग्रजांचा पाय बराच डळमळित होता. पुणेकर व बडोदेकर या दोन इंग्रजविद्वेषी पक्षांनीं शास्त्र्यास लंबे कलें अशी खात्री होऊन, इंग्रजांनीं दोघांच्याही पाठीमागें ससेमिरा लाविला. मात्र उघड युद्ध तात्काळ सुरू करण्याची त्यांस छाती झाली नाहीं. कारण नेपाळशीं युद्ध सुरू असल्यामुळें मराठ्यांचें युद्ध अंगावर घेण्याची त्यांस सोय नव्हती. म्हणून नुसत्या दबकावणींत त्यांनीं एक दोन वर्षे काढून व मराठ्यांत फोडाफोड करून आपली तयारी पूर्ण झाल्यावर स. १८१७च्या अखेरीस त्यांनीं मराठ्यांवर शस्त्र धरिलें. पुण्यांत खुनाचा आरोप त्रिंबकजीवर आणून त्यास स्वाधीन करण्याबद्दल बाजीरावास निकड लाविली, त्याचवेळीं बडोद्यांत त्यांनीं सीताराम, फत्तेसिंग वगैरेंस उपद्रव सुरू केला. सीतारामाच्या पक्षानें सर्व बाजूंनीं इंग्रजांचा उच्छेद चालविला होता. दरवडेखोरांस त्यांनीं आश्रय दिला. काठेवाडच्या संस्थानिकांस इंग्रजांविरुद्ध चिथविलें. खेडा अमदाबाद-कडील रयता इंग्रजांवर उठल्या. इंग्रजांनीं पुण्यास त्रिंबकजीला पकडण्याबद्दल उद्योग चालविला, तसाच भगवंतराव व गोविंदराव यांस स्वाधीन करण्याबद्दल फत्तेसिंगास निकड केली. स.१८१६ च्या नोव्हेंबरांत ते स्वाधीन झाले. सीतारामाची दिवाण-गिरी इंग्रजांनीं काढिली, त्याची तक्रार आनंदरावानें बाजीरावाकडे केली, कीं इंग्रजांस असा अधिकार नाहीं. गोविंदराव पुण्यास होता त्यास आनंदरावानें लिहिलें, 'तुम्हीं केलेंत तें तुमच्या निष्ठेस योग्यच होतें;' आणि धारेस काकाजी फणसे यास लिहिलें, 'येथील काम फत्ते झालें, आतां तुम्ही येऊन दिवाणगिरी करा.' गहिनाबाई व तख्ताबाई यांसही शास्त्री नाहींसा झाल्यानें फार संतोष झाला. सीताराम नजरबंदींत होता तरी त्यानेंही खटपट करण्यांत कसूर ठेविली नाहीं. बापू रघुनाथ धारेस होता त्यास त्यानें फौजेसह बडोद्यास बोलाविलें. फत्तेसिंग आपण होऊन सीतारामास इंग्रजांचे हवालीं करीना, तेव्हां त्याचे वाड्यास ता.२०·९·१८१५ रोजीं गराडा घालून त्यांनीं त्याचा वाहेरचा व्यवहार बंद केला, आणि पुढील सालाच्या एप्रिलांत त्यास मुंबईस नेलें. रस्त्यांत नवसरी येथें त्यास आनंदरावाची सनद पोंचली, कीं तुमची नेमणूक दीडपट वाढविली आहे.

फत्तेसिंग तर उघडपणें इंग्रजांविरुद्ध उठला, तेव्हां आपल्या तर्फेचा दुसरा कोणी बाहेरचा नवीनच इसम शास्त्र्याची जागा रिकामी होती तिजवर आणण्याचें ठरवून, कारनॅकनें आपल्या खास विश्वासाचा पोतदार **धाकजी दादाजी** यास दरमहा अडीचशें पगारावर स. १८१६ च्या फेब्रुवारींत दरबार वकील म्हणून बडोद्यास आणिलें. परंतु त्याजला फत्तेसिंग कोणत्याही बोलण्यांत घेईना. खुद्द इंग्रजांनींच त्यास पुढें हिंदुस्थानांतील अट्टल चोर ( the biggest rogue in India ) असें म्हटलें आहे. या भानगडी इतक्या बिकट होऊन बसल्या, कीं बडोद्याचें प्रकरण साफ अंगावरून काढून टाकावें असेही विचार इंग्रज करूं लागले. वर्ष सहा महिने अशी तारांबळ चालू असतां मुंबईचा गव्हर्नर सर इव्हॅन नेपियन यास ता. ७·४·१८१७ रोजीं ग० ज० चा हुकूम आला, कीं 'पेशव्यावर युद्ध पुकारण्याचा आम्हीं निश्चय केला आहे, तर गुजरातेंतही युद्ध चालविण्याची तुम्हीं तयारी ठेवावी.' यावरून पुढें ता. १३ जून रोजीं बाजीरावाशीं जो नवीन तह करण्यांत आला, त्यांत शास्त्र्याच्या खुनाचा भरपूर मोबदला घेऊन गायकवाडांचें संस्थान बाजीरावाचे कबजांतून इंग्रजांनीं उघडपणें आपल्या छत्राखालीं घेतलें; आणि ता. ६·११·१८१७ रोजीं त्यांनीं पुनः गायकवाडाशीं नवीन तह करून पूर्वीच्या भानगडी मिटविल्या. फत्तेसिंग ता. २३·८·१८१८ रोजीं मरण पावला, त्या वेळीं त्याचें वय अवघें २६ वर्षांचें होतें. मागाहून लवकरच ता. २·१०·१८१९ रोजीं खुद्द आंनदराव पंचावन वर्षांचें वय होऊन मरण पावला, तेव्हां बडोद्याचें आधिपत्य त्याचा धाकटा भाऊ सयाजीराव यास मिळालें. कोणाही बाहेरच्या इसमांवर न विश्वसतां या सयाजीरावानें स्वतंत्र बुद्धीनें आपला कारभार करून व सारखीं पंचवीस वर्षे इंग्रजांशीं भांडून संस्थानाची सुव्यवस्था लावून घेतली. सयाजीरावाचा हा पराक्रम अव्वल इंग्रजींतील एक अजब बनाव म्हणून इतिहासांत गणला जाईल; आणि त्याबरोबरच सयाजीरावासारखाच सातारचा प्रतापसिंग छत्रपति आपल्या हक्कांसाठीं भांडत असतां पदास मुकतो, हा देखावाही इंग्रज राजनीतींतली एक लहर म्हणावी लागेल. सयाजीरावानें सीतारामाची योग्यता ओळखून त्यास परत बडोद्यांत आणिलें; नंतर तो स. १८२३ त मरण पावला. धाकजी दादाजीनें मात्र मरेपर्यंत गायकवाडांस त्रास देण्यास कमी केलें नाहीं. पण हे प्रकार प्रस्तुतच्या विषयमर्यादेंत येत नाहींत. धाकजी स. १८४६ त मरण पावला.

**७ ठाण्याचे किल्ल्यांतून त्रिंबकजीचें पलायन** ( १२·९·१८१६ ).— त्रिंबकजी डेंगळे यास बाजीरावानें इंग्रजांचे हवालीं केल्यावर सदाशिव माणकेश्वरास

एल्फिन्स्टनकडे बोलणें करण्यास पाठविण्याचा क्रम सुरू केला. परंतु त्याच्यावर संपूर्ण भरंवसा नसल्यामुळें वसईचा एक विद्वान भिक्षुक मोर दीक्षित मराठे व चिमणाजी नारायण या दोघांसही कारभारांत घेऊन तो सदाशिवपंताबरोबर रेसिडेन्सींत पाठवूं लागला. या दोन्ही गृहस्थांनीं आपल्या विवाहित स्त्रिया वाड्यांत पाठवून बाजीरावाची मर्जी संपादिली होती. पोटसाहेबासही बाजीराव या मंडळीबरोबर रेसिडेन्सीच्या वाटाघाटींत बोलावीत असे. खडकीच्या लढाई पूर्वी मोर दीक्षित व पोटसाहेब यांनीं बरेच दिवस बाजीरावास आवरून धरिलें होते. पूर्वी चिंतोपंत देशमुख सदाशिव माणकेश्वराबरोबर होता तो ता. २·३·१८१७ रोजीं मरण पावला; आणि चिमणाजी नारायणावर पुढें इतराजी झाली, तेव्हां रामचंद्र भिकाजी ऊर्फ बापू करंदीकर यास बाजीरावानें जवळ आणिलें.

त्रिंबकजी डेंगळ्यास इंग्रजांनीं ठाण्याचे किल्ल्यांत बंदोबस्तानें ठेविलें. त्यास काशीस ठेवावें अशी बाजीरावाची सूचना असून अलाहाबादेस ठेवावें अशी एल्फिन्स्टनची सूचना होती. या सूचना अमान्य करून त्यास ठाण्यास ठेवण्याचा ग० ज० नें हुकूम केला, तो एल्फिन्स्टनला पसंत वाटला नाहीं. ठाण्यास बाजीरावाकडून त्रिंबकजीशीं दळणवळण चालण्यास पुष्कळ मार्ग होते. तसा प्रकार होऊं नये म्हणून मुद्दाम त्याचे पहाऱ्यावर इंग्रज शिपाई नेमण्यांत आले. परंतु याच मुळें बाहेरून त्रिंबकजीस सूचना करणें सोपें झालें. एक मराठा गृहस्थ पहाऱ्यावरील गोऱ्या अंमलदारापाशीं घोडेवाला म्हणून नोकरीस राहिला. वरच्या मजल्यावर त्रिंबकजीची कोठडी होती, तिच्या खालींच तळ-मजल्यावर घोड्याचा तबेला असून तेथें तो मोतद्दार घोड्याची चाकरी करितांना तोंडानें पोवाडे लावण्या वगैरे कवनें म्हणे. हा मनुष्य बाजीरावाकडूनच आलेला असल्यामुळें त्याचे द्वारें बाजीरावानें त्रिंबकजीशीं अनुसंधान बांधिलें. गाणीं म्हणण्यांतच उभयतांचे निरोप जाऊं येऊं लागले. हें अनुसंधान सुरू होण्यापूर्वी गोऱ्या अमलदाराशीं गोष्टी करितांना शास्त्र्याचा खून आपण केला, मात्र तो बाजीरावाचे हुकुमावरून केला, असें त्रिंबकजीनें कबूल केलें. तो मोतद्दार धन्याचा घोडा बाहेर फिरावयास घेऊन जाई, त्या वेळीं बाजीरावाच्या हस्तकांस भेटून त्यानें त्रिंबकजीच्या सुटकेची सिद्धता करून तसा इशारा कवनांच्या द्वारें त्रिंबकजीस दिला; आणि भाद्रपद वद्य ६ ता० १२·९·१८१६ रोजीं सायंकाळीं सात आठ वाजतां दोघेही तुरुंगांतून एकदम फरारी झाले. तबेल्याच्या भिंतीस भोंक पाडून त्यांतून हे बाहेर पडले आणि घोडे सिद्ध होते ते घेऊन पळाले. त्रिंबकजी प्रथम खानदेश बागलाणकडील डोंगरांत भिल्ल रामोशी मांग

यांच्यांत मिसळून राहूं लागला. पुढें उत्तरेकडचा प्रदेश सोडून तो दक्षिणेस शंभुमहादेवाचे डोंगरांत येऊन स्वारांचा जमाव करूं लागला. तो निसटून गेल्याची वार्ता हां हां म्हणतां चहूंकडे पसरली. 'त्यावर इंग्रजबहाद्दर यांनीं श्रीमंतांचे मुलखांत आल्यास धरून आमचे हवाली करावें असें सांगितलें. इंग्रजांचे अवघड कैदेंतून त्रिंबकजी सुटला तेव्हां हें इश्वरी कृत्य असें श्रीमंतांचे मनांत येऊन त्याजला ऐवज पाठवून श्रीमंत आंतून पुरवणी करूं लागले. ती बातमी इंग्रज सरकारास लागत गेली. त्रिंबकजी माणसें मारूं लागला; आणि त्याचा उपद्रव वाढला, तेव्हां प्रकरण निकरावर आलें.'

**८. ता. १३ जून स. १८१७ चा तह, बाजीरावास तडाखा.**—शके १७३७ च्या भाद्रपद शु॥ १ स त्रिंबकजी डेंगळे अटकेंत पडला तो एक वर्षानें ठाण्याच्या तुरुंगांतून भाद्रपद व॥ ६ स पळून गेला, आणि प्रथम कांहीं महिने बिलकूल हालचाल न करितां गुप्तपणें लपून राहिला. जणूं काय बाजीरावास त्याची वार्ताही नव्हती. तीन चार महिने पावेतों इंग्रजांची मर्जी संपादन करण्याकरितां बाजीरावानें एवढे शिताफीचे प्रयत्न केले, कीं खरोखरच त्याजबद्दल इंग्रजांस धन्यता वाटूं लागली. पेंढाऱ्यांवर स्वारी करण्याचे इंग्रजांचे जे बेत चालले होते त्यांत मुद्दाम आपण होऊन बाजीरावानें अनेक उपयुक्त सूचना केल्या, आणि कलहाचे म्हणून जेवढे प्रश्न चालू होते त्यांत माघार घेऊन इंग्रजांचे कलानेंच निकाल केले. ग० ज० यास मोठा संतोष वाटून बाजीरावाची ही वृत्ति अशीच टिकवा, उगाच त्याला दुखवूं नका, असें मुद्दाम त्यानें रेसिडेंटास लिहून कळविलें. हा सर्व कपटाविद्येचा प्रयोग असेल अशी शंका सुद्धां इंग्रजांस आली नाहीं. परंतु सन १८१७ च्या फेब्रुवारी महिन्यांत नीरेच्या दक्षिणेकडील प्रदेशांत त्रिंबकजीच्या हालचाली पुढें सुरू झाल्या. एल्फिन्स्टनच्या सूचनेवरून बाजीरावानें बापू गोखल्यास त्याजवर पाठविलें, आणि त्रिंबकजीस धरून देण्याविषयीं जाहीरनामा काढिला. तेव्हां बाहेर बंडावा वगैरे कांहीं नाहीं, सर्व शांत आहे असें सांगत गोखले परत आला. मार्च महिन्यांत त्रिंबकजीचा बंडावा फारच फैलावला. गुडी पाडव्याचे मुहूर्तानें (ता. १८·३·१८१७) त्रिंबकजी उघडपणें फौजा घेऊन बाहेर येणार अशी बातमी एल्फिन्स्टन यास लागली. त्या संधींत बाजीराव फुलशहर येथें नवा वाडा बांधला होता त्यांत तीन महिने जाऊन राहिला. 'श्रीमंत रथांत बसून पुण्याहून फुलगांवास जात होते. पांडुरंगपंत ढमढेरे यांची स्त्री रथांत होती. मार्गीं रथ लवंडला आणि श्रीमंतांचें अंग दुखावलें. सबब स्वारी बरेच दिवस

फुलगांवास राहिली. तेथेंच बाजीरावानें मोर दीक्षित याचे कन्येचें लग्न केलें. त्रिंबकजी तेथें येऊन श्रीमंतास चोरून भेटूं लागला. त्यानें पेंढारी स्वार बरोबर घेऊन कोंकणांतील गांव लुटले. बहुत खराबी केली.' त्रिंबकजीस बाजीरावानें हस्तें परहस्तें पैसा व मदत पोंचविली. हा प्रकार चालू असतां आपणांस त्यांतलें कांहीं एक माहीत नाहीं असा बहाणा बाजीरावानें चालविला; आणि ता. २४ फेब्रुवारी पावेतों यांत बाजीरावाचें कपट असेल असें एल्फिन्स्टनचे सुद्धां मनांत आलें नाहीं. त्या तारखेस कांहीं कागद रेसिडेंटाचे हातांत पडले, त्यावरून बाजीरावाची कपटनीति एल्फिन्स्टनचे प्रत्ययास आली. त्या संबंधानें मार्च महिन्यांत बाजीराव व एल्फिन्स्टन यांजमध्यें घासाघीस सुरू झाली. बाजीराव म्हणाला, "त्रिंबकजीनें बंडावा उभारला असेल तर मी फौजा पाठवून त्याचा बंदोबस्त करितों." एल्फिन्स्टन म्हणाला, "त्या कामीं तुमच्या फौजा नकोत, आम्हीच फौज पाठवून त्यास पकडूं. त्रिंबकजीचे नातेवाईक व अनुयायी उघडपणें वावरत आहेत त्यांस तेवढे पकडून तुम्ही कैदेंत ठेवा म्हणजे झालें. त्यांजला तुमची आंतून फूस आहे ती बंद करा. खुद्द तुम्ही फौजा जमवून जी लष्करी तयारी चालविली आहे तीही बंद करा." एल्फिन्स्टनचें हें म्हणणें ऐकून बाजीरावानें अत्यंत कांगावा केला. 'मा इंग्रज सरकारची मनधरणी करण्यांत इतका तत्पर असतां मजवर हें नसतें कुभांड उगाच रचण्यांत येत आहे,' अशी त्यानें बतावणी केली, आणि रेसिडें-टाची खात्री करण्याकरितां त्रिंबकजीच्या कुटुंबास अटक केल्याचा देखावा केला. तथापि खानदेशांत वगैरे सर्व ठिकाणीं त्यानें जारीनें फौजेची तयारी चालविली होती. ता. १५ मार्च रोजीं एल्फिन्स्टननें कर्नल स्मिथची फौज पुण्यास बोलाविली; व ता. २१ मार्च रोजीं ग० ज० ला खलिता लिहून बाजीरावाशीं आतां सलोखा ठेवणें बिलकूल शक्य नाहीं असें कळवून, त्या संबंधांत विशिष्ट हुकूम मागविले; आणि इकडे बाजीरावालाही त्यासंबंधानें त्यानें चांगली समज दिली. तरी बाजीरावानें युद्धाची तयारी झपाट्यानें चालविली, आपलें सर्व जडजवाहीर रायगडावर पाठविलें, पुण्याच्या कारखान्यांतील तोफा ओढण्याकरितां बैल वगैरे जमा केले. ता. १ एप्रिल रोजीं एल्फिन्स्टनचें बाजी-रावास झणझणीत पत्र आलें, त्यांत आम्ही तुमचेवर एकदम युद्ध सुरू करितों, असा धाक घातलेला होता. कर्नल फोर्डच्या मार्फत बाजीरावाची समजूत घालण्याचा एल्फिन्स्टननें प्रयत्न करून त्रिंबकजीस पकडून आमचे स्वाधीन करा अशी मागणी केली; आणि जिकडे जिकडे बंडावे ऐकूं येत होते तिकडे इंग्रज फौजांच्या अनेक टोळ्या ठिकठिकाणीं रवाना केल्या. ता. ६ मे रोजीं एल्फिन्स्टननें बाजीरावाचे खास

बोलावण्यावरून शनिवारवाड्यांत येऊन त्याची भेट घेतली. भेटींत बाजीरावानें आपलें अंतःकरण खुलें करून भाषण केलें. त्याचा गोषवारा ब्रिग्जनें आपल्या स्मरण-वहींत ठेवलेला खालीलप्रमाणें आहे. *

"साहेब बरोबरीच्या मंडळीसह भेटीस गेले. थोडा वेळ औपचारिक बोलणें होऊन नंतर बाजीरावानें आपल्या सर्व मंडळीस बाहेर जाण्यास सांगितलें आणि मग त्यानें मुख्य विषय सुरू केला तो असाः—'साहेब' मी तुम्हांस आज मुद्दाम भेटीस बोलावण्याचें कारण असें, कीं माझ्या संबंधानें तुमचे व तुमच्या सरकाराचे गैरसमज उगाच वाढत आहेत, ते मोकळेपणानें बोलून दूर करावे. तुमच्याबद्दल माझ्या मनांत यत्किंचित्‌ही द्वेषबुद्धि असण्याचें कारण नाहीं. मी तुमच्याच आश्रयानें लहानाचा मोठा झालों. कै० नारायणरावांचा वध त्यांच्याच रक्षकांनीं केल्यावर, माझे वडील कै० रघुनाथराव यांनीं राज्य संभाळण्याकरितां सर्व कारभार आपल्या हातीं घेतला, ही गोष्ट कारभाऱ्यांस दुःसह होऊन त्यांनीं वडिलांचा छळ आरंभिला आणि त्यांस देशोधडीस लाविलें. त्या वेळीं सिंदे, होळकर, गायकवाड वगैरे आपले बलवान् सरदार नजीक करून त्यांच्यांशीं त्यांनीं दोस्तीचा तह केला, हा सर्व प्रकार आपणांस विदित आहेच. त्यानंतर खुद्द मजवर तसा प्रसंग येऊन मला पुणें सोडावें लागलें, तेव्हां मीं निःशंकपणें मुंबईस जाऊन इंग्रज सरकाराचाच आश्रय केला, आणि त्यांच्या मदतीनें पेशवाईची गादी पुनः मला मिळाली. तेव्हां हे सर्व उपकार विसरून मी इंग्रज सरकाराविरुद्ध वागेन ही कल्पना तरी तुमचे मनांत कशी येते! माझें हें सर्व शरीर नखाशिखान्त इंग्रजांच्या अन्नानें वाढलेलें आहे हें मी कसा विसरेन! बरें, हा मुद्दा सोडून दिला तरी, इंग्रजांची सत्ता येथें कशी स्थापन झाली, त्यांचें बळ केवढें आहे, त्या सत्तेस विरोध करणारे सत्ताधीश एका मागून एक कसे धुळीस मिळाले, एवढीही गोष्ट मला कळत नाहीं असें आपण मानतां काय? एवढा पराक्रमी हैदर व मी मी म्हणणारा त्याचा पुत्र टिपू यांची वाट काय झाली तें मला कळत नाहीं कीं काय? अलीकडे सुद्धां इंग्रजांच्या लष्करी सामर्थ्यापुढें एतद्देशीयांच्या प्रचंड फौजांचा कसा चक्काचूर उडत गेला हें काय मला डोळ्यांनीं दिसत नाहीं? ज्या सिंदे होळकरांनीं पन्नास वर्षें हिंदुस्थान हालवून सोडिलें, त्यांचा इंग्रजांशीं सामना होतांच काय प्रकार झाला? एकदां नाहीं, दोनदां नाहीं, जेव्हां जेव्हां म्हणून एतद्देशीय फौजा इंग्रजांच्या सामन्यास पुढें आल्या, तेव्हां नेहमींच त्यांचा पाडाव होऊन अपरिमित नुकसान कसें

* Mod Review 1922–1; Brigg's Memoirs, p. 44–45.

झालें हें कोणास दिसत नाहीं ! खुद्द माझी स्थिति म्हणाल तर तेवढीही अव्यवस्थित फौज मजजवळ नाहीं, मग फलटणी वगैरे पाश्चात्य पद्धतीची तयारी तर नाहींच नाहीं. लढाईचा उच्चार करितांच माझे अंगांत कापरें भरतें. नुसत्या सलमीच्या तोफा करावयाच्या त्या सुद्धां स्वारीसमोर न करितां मी जरा बाजूस गेलों म्हणजे करीत जाव्या, अशी माझी ताकीद आहे. हें सर्व तुम्ही जाणत असतां मी इंग्रज सरकाराशीं युद्ध करूं इच्छितों ही कल्पना तरी तुमच्या मनांत कशी उत्पन्न होते ? माझ्याविषयीं उगाच तुम्हीं आपल्या मनांत हा भ्रम काय म्हणून धारण करावा ! ' असें पुष्कळ भाषण अत्यंत संथपणानें बाजीरावानें मराठींत केलें. त्यांत यत्किंचित् क्रोधाची भावना दिसून आली नाहीं.

बाजीरावाचें भाषण ऐकून एल्फिन्स्टननें आपला विचार न बदलतां निग्रहपूर्वक त्यास कळविलें, कीं एक महिन्याच्या आंत त्रिंबकजीस स्वाधीन करा आणि तों पर्यंत जामीन म्हणून २४ तासांच्या आंत तुमचे चार किल्ले रायगड, पुरंदर, सिंहगड व त्रिंबक आमचे ताब्यांत द्या. या दरडावणीनें बाजीरावानें बाहेरून शांत वृत्तीचा पाहिजे तितका देखावा केला, तरी अंतःकरणांत त्याची अगदीं घाबरगुंडी उडून गेली, आणि ता. ८ मे रोजीं सकाळीं इंग्रज फौजांनीं पुणें शहरास वेढा दिल्याचें पाहतांच त्याची अगदीं बोबडी वळली. लगेच दहा वाजतां त्यानें किल्ल्यांच्या सोडचिठ्ठया लिहून मुकाट्यानें एल्फिन्स्टनकडे पाठवून दिल्या. तेवढ्यानें हातघाईवर आलेलें प्रकरण तात्पुरतें मिटलें. बाजीरावाचे अंगीं यत्किंचित् नेट असता तर परिस्थितीचा उपयोग करून आणि मराठमंडळाचें पुढारपण स्वीकारून इंग्रजांवर चढाई करण्यास ही एक संधि आलेली होती, त्यांत त्यास यश येण्याचा अगदींच संभव नव्हता असें नाहीं. निदान बाणेदारपणाचें श्रेय तरी त्याचे पदरीं पडलें असतें. परंतु इतरांस पुढें करून आपण बाजूस राहण्याची त्याची स्वार्थी व भित्री वृत्ति कळसास पोंचल्यानें राज्य जायचें तें गेलेंच, पण आपल्या भित्रेपणानें पूर्वजांच्या शौर्यवृत्तीस कायमचा कलंक मात्र त्यानें लावून घेतला.*

---

* Elphinstone says:—Bajirao was physically an arrant coward & was not ashamed to avow the weakness. इ. वृ. १८३४ पृ. १५ पे. द. ८८; ऐ. टि. ४-२३.

बाजीरावानें किल्ले स्वाधीन केले तरी त्रिंबकजीस पकडण्याचा त्यानें कांहींच इलाज केला नाहीं. ता. १३ मे रोजीं पुण्यांतून पळून जाण्याचा त्यानें प्रयत्न केला. पुनः ता. १७ मे रोजीं इंग्रजांशीं युद्ध सुरू करण्याचा निश्चय करून त्यानें फौजा सिद्ध केल्या. पण युद्धाचे त्याचे हे देखावे क्षणमात्रांत विराम पावत. ता. २० मे रोजीं इंग्रजांकडे त्यानें संपूर्ण शरणागतीची याचना केली; आणि त्रिंबकजीस पकडून देण्याबद्दल दोन लाखांचें बक्षीस व इनाम गांव देण्याचे त्यानें जाहीरनामे लावले, ते असेः-" त्रिंबकजी डेंगळा इंग्रज बहादुरांचे कैदेंतून पळून बंड करीत पळतो, त्याचा ठिकाण लावून जिवंत अगर मेला सरकारांत हवालीं करून देईल त्याजला बक्षीस २ लक्ष रुपये व १ हजार रुपयांचा इनाम गांव दिला जाईल. समस्त रयत ब्राह्मण, मराठे, वाणी उदमी, मांग रामोशी, वगैरे जे कोणी डेंगळ्याचा पत्ता सरकारांत दाखवून देतील त्यास पांच हजार रुपये बक्षीस व १ चाहूर जमीन इनाम देण्यांत येईल. पत्ता ठाऊक असून तो दाखवून न दिल्यास त्याचें पारिपत्य होईल." डेंगळ्याचे मिलाफी बारा असामींचीं नांवें या कागदांत शेवटीं आहेत. जाहीरनाम्याचा उपयोग झाला नाहीं हें सांगणें नकोच.

बाजीराव जो बरेच दिवस त्रिंबकजी डेंगळयास इंग्रजांचे स्वाधीन करण्यास अनमान करीत होता त्याचें अंतस्थ कारण बाळोजी कुंजर होय. सिंद्याचा सरदार जीन बॅप्टिस्ट यास बाजीरावानें उत्तर हिंदुस्थानांतून फौज घेऊन आपल्या मदतीस बोलाविलें होतें. त्या वेळीं बाजीरावास भोसले आणि सिंदे यांनीं निक्षून कळविलें, कीं तुम्हीच प्रथम सर्वांचा पुढाकार घेऊन उघडपणें इंग्रजांवर युद्ध सुरू करा, म्हणजे आम्ही तुम्हास लगेच सामील होतों: पण आम्हांस तोंडघशीं पाडून तुम्ही नामानिराळे राहूं म्हणाल तर तुमचा विचार तुम्ही पाहवा आणि आमचा आम्ही पाहवा हें बरें. बाजीरावास हें पत्र सरदारांनीं मुद्दाम सावकारी हुंडीच्या सांकेतिक भाषेंत लिहिलेलें होतें. इंग्रजांचे हातीं तें पडलें तर त्यापासून त्यांस बोध होऊं नये अशी तजवीज ठेविलेली होती. बाजीरावाचा दुजऱ्या विठोबा नाईक गायकवाड यास त्यानें या कामगिरीवर सिंदे भोसल्यांकडे पाठविलें होतें, त्यास अनुलक्षून वरील पत्र असून त्यांतील विठोबा नाईक म्हणजे खुद्द पेशवा असें समजलें पाहिजे. तें पत्र असेंः-' ही पेढी खरें म्हटलें तर विठोबा नाईकांचीच आहे आणि जरूर लागेल तेव्हां ते ज्या हुंड्या करतील त्या आमच्या कडून स्वीकारण्यांत विलंब होणार नाहीं. पण तुमच्या पेढींत ऐवज ( फौज ) शिल्लकच नसेल तर तूर्त सावकारांची ( इंग्रजांची ) कशी तरी समजूत काढावी. कांहीं

दिवस विठोबा नाइकांनीं तीर्थयात्रेच्या निमित्तानें बाहेर पडावें आणि स्वहस्तानें हुंड्या पाठवाव्या, म्हणजे ज्या ज्या ठिकाणीं ऐवजाची जरूरी पडेल त्या त्या ठिकाणीं तो बिनतक्रार इकडून पाठविण्यांत येईल.' पत्राची तारीख ११·९·१७१५ आहे. सन १८१७ त खुद्द बाजीरावानें आत्मराम शिवराम वाकळे* यास असें पत्र लिहिलें कीं दौलतरावानीं आमच्या विषयीं कस्त करून रुपास आणिलें. त्यांची निष्ठा हें सर्व मनांत वागत आहे. परंतु सांप्रत आम्ही अडचणींत पडलों. कोठें कोणाशीं बोलावयासही जागा नाहीं. पुढें स्वराज्याचे कल्याण्याची भिस्त त्यांजवर आहे. सव दौलतदारांची एकवाक्यता होऊन पत्रें व निरोप इकडे यावे. यांत स्वराज्यास श्रेयस्कर अशी मसलत होऊन भेटीचा योग घडावा. स्वराज्यांत शत्रूंचा प्रवेश होऊन प्राबल्य बहुत झालें हें सर्व मनांत वागत आहे.'

प्रत्यक्ष युद्धाचा प्रसंग न आणितां नुसत्या दरडावणीनें एल्फिन्स्टननें बाजीरावास सुतासारखें नरम आणिलें. त्यांत थोडी दिवसगत लागण्याचें कारण त्यानें ग० ज० कडून नवीन तहाचे स्पष्ट हुकूम मागविले होते हें होय. ते हातीं येतांच फोर्डबरोबर त्यानें तहाचा मसुदा २८ मे रोजीं पेशव्याकडे पाठवून ता. १ जून रोजीं स्वतः भेट घेऊन कलमांची वाटाघाट केली. या तहाचीं संपूर्ण कलमें पे. अ. बखरींत पृ. १७६-१८६ पावेतों दिलीं आहेत तीं येथें देण्याचें प्रयोजन नाहीं. त्यांतील मुख्य मतलब म्हणजे महाराष्ट्राबाहेरील पेशव्याचे सर्व प्रदेश ३४ लाख वसुलाचे इंग्रजांनीं आपल्या कबजांत घेतले; आणि इतर मराठे सरदारांशीं त्याचा संबंध कायमचा तोडून टाकिला. तदनुसार बाजीरावाजवळ असलेले सिंदे होळकरादिकांचे वकील पुण्यांतून काढून, बाहेर असलेले त्याचे वकील त्यास परत बोलवावे लागले. "बाळोजी कुंजर, यशवंतराव घोरपडे, खंडोमहादेव व आनंदराव जाधव यांस सिंदे होळकर यांनीं पुण्यास रवाना केलें. परंतु श्रीमंतांचा तहनामा झाला त्यांत सरदारांशीं जाबसाल परभारा ठेवूं नये असें ठरल्यानें या वकिलांनीं पुण्यास येण्याविषयीं इंग्रजांची सल्ला पडली नाहीं; सबब ते बऱ्हाणपुरीं राहिले. खंडो महादेव आपले घरीं जावयाचे निमित्तानें घरास आले. बाळोजी कुंजर पुण्यास आले नाहींत." परभारें देशीं जाऊन तो ता. ९·५·१८१७ रोजीं पंढरपुर येथें मरण पावला. सदाशिव माणकेश्वरही ता. ८·१०·१८१७ रोजीं मरण पावला.

---

* यांचें कुटुंबास ग्वालेरीस जहागीर आहे. वंशावळ पृ. २६७ पहा. भालेराव म० शा० मीमांसा यांतील पत्रें.

वरील तह ठरतांना किती तक्रारी व बतावण्या बाजीरावानें केल्या त्यांचा येथें पाढा वाचण्याची जरूर नाहीं. अखेर क्षणापर्यंत नानातऱ्हेच्या बतावण्या करून तहास मान्यता देण्याचें बाजीरावानें शक्य तितकें टाळिलें. शेवटीं ता. १३ जून रोजीं मोठ्या नाखुषीनें तहावर सही केली. नंतर तो ग० ज० कडे पाठविण्यांत येऊन ता. ५·७·१८१७ रोजीं त्याजकडून मंजूर होऊन आला. वास्तविक या तहानेंच बाजीरावाचें मराठशाहींतील पुढारपण जाऊन तो केवळ एक लहानसा संस्थानिक बनला. याच वेळीं त्याचें राज्य गेलें असें म्हणण्यास हरकत नाहीं. वसईच्या तहापासून जीं पंधरा वर्षें गेलीं त्यांत उत्तरोत्तर बाजीरावाची अवनति कशी होत गेली हें वरील विवेचनावरून लक्षांत येईल. इंग्रजांनीं अगोदरच त्रिंबकजीवर फौजा रवाना केल्या होत्या. त्यांनीं त्याचा चोंहोंकडून कोंडमारा करितांच तो नर्मदा उतरून पावसाळ्यांत चोळीमहेश्वर येथें जाऊन राहिला. इंग्रज फौजा त्याचे पाठीवर होत्या त्या बरसातीसाठीं जालनाचे छावणींत परत आल्या. बाजीरावानें तह कबूल केल्यावर सिंहगड वगैरे चार किल्ले इंग्रजांनीं घेतले होते ते त्यास परत दिले.

---

# प्रकरण सोळावें

## पेशवाईची इतिश्री

३-६-१८१८

**ईश्वरसत्ता विचित्र सारें दैवानें घडविलें ।**
**हरिश्चंद्र आणि रामचंद्र नळ पांडवांस रडविलें ।**
**फितुर करुनी सर्वांनीं आपलें राज्य मात्र बुडविलें ॥** —प्रभाकर.

१ माहुली येथें बाजीराव माल्कमची भेट. २ बाजीरावाचा प्रक्षोभ (आक्टो. १८१७).
३ खडकीची लढाई. ४ येरवड्याची लढाई.
५ शनिवार वाड्यावर इंग्रजांचें निशाण. ६ वर्तुलाकार पलायन, कोरेगांवची लढाई.
७ गोपाळ आष्टीची लढाई. ८ चांद्याकडे प्रयाण, शिवनीची लढाई.
९ धूळकोट येथें बाजीरावाची शरणागति. १० त्रिंबकजी डेंगळ्याची अखेर व कौटुंबिक.

**१ माहुली येथें बाजीराव माल्कमची भेट** ( ता. ७·८·१८१७ ).— ता० १३ जूनच्या तहावर वैतागानें सही करून बाजीराव पंढरपुरास गेला. तो जवळ

जवळ तीन महिने बाहेर होता. आषाढी एकादशी करून पंढरपुराहून परभारें तो माहुलीस गेला. त्या सालीं अधिकश्रावण असून कृष्णावेण्यांचे संगमीं स्नानें व देवतार्चन करण्यासाठीं त्यानें मुद्दाम मोठा लवाजमा बरोबर घेतला. इकडे याच वेळीं ग० ज० नें माल्कम यास मराठी दरबारांकडे शिष्टाई साठीं पाठविलें. दसरा होतांच पेंढाऱ्यांवर मोहीम सुरू करावयाची, त्या कामीं मराठे सरदारांची मर्जी राखून आणि त्यांची समजूत पाडून त्यांचें साह्य मिळविण्यासाठीं माल्कम कलकत्त्याहून निघाला तो सिंदे व भोसले यांस भेटून ता. ५.८.१८१७ रोजीं पुण्यास आला. बाजीराव पुण्यास नसल्यामुळें तो त्याचे भेटीस माहुलीस गेला. बरोबर मोर दीक्षित व पोटसाहेब यांस त्यानें घेतलें. कात्रजचे घांटाजवळ म्याना ठेवून तेथून पुढें माल्कम डाकेच्या घोड्यावरून झटपट पुढें गेला. बापू गोखले, बाळोबा सलकडे, रामचंद्र बापू करंदीकर, चिमणाजी नारायण वगैरे मंडळी अगोदरच बाजीराबाजवळ बोलणें करण्यास होती. अधिक श्रावण व० ११ ता. ८ ऑगस्ट रोजीं उपासास्तव बाजीरावानें बोलणें केलें नाहीं; पण त्या दिवशीं इतरांच्या वाटाघाटी भरपूर झाल्या. दुसऱ्या दिवशीं द्वादशीस सकाळींच बाजीरावानें माल्कमास भोजनास बोलाविलें. त्या प्रसंगीं सर्व दिवस भरपूर बोलणें झालें, आणि ता. १० रोजीं माल्कम परत पुण्यास आला. पुढील मोहिमेंत ग०ज० नें एल्फिन्स्टन यास महत्त्वाचें काम दिलें नाहीं. दक्षिणेंतील सर्व कारभार हिस्लॉप व माल्कम यांजला सांगितला, याजबद्दल एल्फिन्स्टनला अत्यंत वैषम्य वाटत होतें. माल्कमच्या भेटींत बाजीरावानें आपलीं दुःखें व गाऱ्हाणीं अत्यंत कळवळ्यानें त्यास सांगितलीं आणि एल्फिन्स्टनच्या वागणुकीबद्दल फार तिरस्कार दाखविला. तो म्हणाला, ' साहेब मला सारखे दरडावणीनें वागवितात. माझ्यावर त्यांची अहोरात्र टेहळणी असते. मी रोज काय पदार्थ किती खाल्ले, इतकी बारीक माहिती ते आपल्या हेरांच्या मार्फत काढीत असतात. हा त्यांचा छळ मला बिलकूल सहन होत नाहीं.' एकाद्या विषयांत आपल्या बाजू परिणामकारक रीतीनें मांडण्यांत बाजीराव किती कुशल होता हें मशहूर आहेच. त्याच्या भाषणानें माल्कमची खात्री झाली, कीं एल्फिन्स्टननें निष्कारण कठोरपणा धारण करून बाजीराबास दुखविलें आहे; हा अन्याय दूर करून व त्याची समजूत पाडून त्याचें प्रेम संपादन करणें जरूर आहे; त्यास जास्त चिडविण्यांत इंग्रजांचेंच नुकसान आहे. अशा प्रकारचा आपला अभिप्राय माल्कमनें ग० ज० कडे लिहून कळविला; आणि पुण्यास परत आल्यावर एल्फिन्स्टनला मुद्दाम त्यानें बजाविलें, कीं " तुम्हीं बाजीरावास असें वरचेवर चिडवीत जाऊं नये. गोडीनें वागून त्यास सांभाळून घेत

जावें." "माहुली मुक्कामीं श्रीमंतांजवळ माल्कमचें बोलणें झालें, कीं पेंढाऱ्यांचे पारिपत्यास लाटसाहेब जातीनें आले. कर्नाटकांतून ज० हिस्लॉप साहेब येतात. त्यास श्रीमंतांनीं आपलेकडील फौज बरोबर द्यावी. या गोष्टीस रुकार देऊन श्रीमंत उघडपणें फौज जमा करूं लागले. माल्कमसाहेब पुण्यास येऊन मोर दीक्षितांचे घरीं मेजवानी घेऊन ता० १२ ऑगस्ट रोजीं हैदराबादेस गेले."

माल्कमची ही शिष्टाई एल्फिन्स्टन यास सर्वथैव नापसंत वाटली. त्याचें म्हणणें, बाजीरावाचा स्वभाव किती दुष्ट व पाताळयंत्री आहे हें नेहमींच्या सहवासावरून मला जसें कळतें, तसें दोन दिवसांच्या भेटींत माल्कम यास काय कळणार! बाजीरावाच्या भूलथापांस असेच सर्व लोक आरंभीं बळी पडतात. हें एल्फिन्स्टनचें स्वतःचें मत असलें तरी, माल्कमच्या आग्रहामुळेंच, तो म्हणतो, 'मी बाजारावावरची नजर ढिली करून त्यास जास्त मोकळीक दिली; म्हणूनच पुढील रेसिडेंटाचा बंगला जाळण्यासारखे अत्याचार त्यानें केले. प्रथमच त्याचा बंदोबस्त झटपट केला असता, तर पुढील युद्धप्रसंग व हानि साफ टळली असती.' माल्कमचा हा रोख ओळखून बाजीराव अखेरच्या प्रसंगीं त्यासच शरण गेला. एल्फिन्स्टनचा हात त्या बाबतींत असेल तर तो आपला पुरेपूर सूड घेईल असें बाजीरावास वाटत होतें. माल्कमनें मराठ्यांचें अंतःकरण बरोबर ओळखिलें होतें. हिंदुस्थानचे मध्यभागीं नर्मदेवर त्याचा मुक्काम पुष्कळ वर्षें झाल्यामुळें तेथील घडामोडींची त्याला जी भरपूर माहिती झाली तीच त्यानें आपल्या सुप्रसिद्ध ग्रंथांत पुढें ग्रथित करून ठेविली.

माल्कमची भेट व त्यानें माहुली येथें केलेल्या सूचना बाजीरावाच्या चांगल्या पथ्यावर पडल्या. माहुलीस राहूनच त्यानें आपले पुढील बेत मोठ्या सावधगिरीनें रचिले. श्रावण मासांत माहुलीस प्रचंड यात्रा जमते व कुस्त्यांच्या दंगली होतात, त्या गडबडींत स्नानसंध्येचा देखावा करून पेंढाऱ्यांच्या बंदोबस्तासाठीं फौजा जमविण्याचा त्यानें उद्योग केला; आणि कुस्त्यांच्या दंगलीसाठीं आलेल्या माणसांतून त्यानें आपली निवड केली. त्यासाठीं त्यानें बापू गोखल्यास मुख्य लष्करी सल्लागार व सेनापति नेमिलें. गोखल्यास बाजीरावाचा चंचल स्वभाव पूर्ण माहीत असल्यामुळें 'तुमच्या शिवाय दुसऱ्या कोणाचीही सल्ला मी ऐकणार नाहीं, तुमच्याच सांगणीप्रमाणें मी सर्वथा वागेन,' असा बाजीरावाचा स्वदस्तुरचा लेख गोखल्यानें लिहून घेतला आणि इमान पाळण्याच्या शपथा घेवविल्या. या पुढें कोणी गृहस्थ बाजीरावाकडे सूचना करण्यास आला, तर 'तुम्हास कांहीं कळविणें असेल ते गोखल्यांस कळवा,'

असें तो इतउत्तर ज्यास त्यास सांगे. अशी एकहातीं सत्ता दिल्याशिवाय लोकही जमा झाले नसते. सर्व शिलेदारांनीं बाजीरावाकडे मागणी केली, कीं ‘ कोणी तरी एक अधिकारी नेमा, म्हणजे आम्ही त्याचे आज्ञेंत वागूं. त्याप्रमाणें बाजीरावनें गोखल्यास सर्वाध्यक्ष नेमिलें, आणि तयारीसाठीं खर्चास एक कोट रुपये रोख दिले. या राष्ट्रीय उद्योगांत सर्वांनीं मनापासून झटावें म्हणून पूर्वी जहागिरी व इनामें जप्त केलीं होतीं तीं बाजीरावानें या वेळीं मोकळीं केलीं. तसेंच महाराजांस व माईसाहेबांस भेटून त्यांस आपला युद्धाचा हेतु कळवून सर्व बेत गुप्त ठेवण्याच्या शपथा त्यांजकडून घेवविल्या. इतकें करून शेवटीं त्यांस वासोट्या किल्ल्यावर पक्कया बंदोबस्तानें त्यानें ठेविलें. “ श्रीमंतांनीं गणपतीचा उत्सवही माहुलीस केला, आणि पुढें कार्तिकस्वामीस जावयाचें असा घाट बोलूं लागले. गंगाबाई राजमाची करीण हिच्या संबंधाचा जो पोरखेळ वर्णिलेला आहे तो याच माहुलीच्या मुक्कामांतील आहे. ज० स्मिथ पुण्यांतून पेढाऱ्यांचे कामाकरितां सरहद्दीवर जाऊं लागले, त्यांजबरोबर बाळाजी लक्ष्मण सलकडे यांचे पुतणे कुशाबा यांचे हाताखालीं विंचूरकरांचें पथक श्रीमंतांनीं पाठविलें. गोविंदराव काळे, अन्याब्या मेहेंदळे, दादा गद्रे, राघोपंत थत्ते वगैरे जे अलोभांत होते त्यांस लोभ दाखवून त्यांच्याशीं सल्लामसलत करूं लागले. गोविंद केशव कारकून यांस अमीरखानाकडे पाठविलें. मुधोजी भोसल्यास सेनासाहेब सुभ्याचीं वस्त्रें गुप्त रीतीनें पाठवून दिलीं. हे प्रकार एल्फिन्स्टन यास समजल्यावरून त्यांचें बोलणें पडलें, कीं स्वारी पुण्यांत येत नसल्यास आम्हीं तेथें भेटीस येतों. त्यावरून भाद्रपद वद्यांत पुण्यास आले. ”

इंग्रजांचे फौजेंत फितूर करून ती निकामी करण्याचा घाट बाजीरावानें मुद्दाम रचिला होता. “ विनायक नाना श्रौती, वामनभट कर्वे व शंकराचार्य स्वामी असे इंग्रजी पलटणांत फितूर करावयासाठीं ऐवज घेऊन कामास लागले; पण फितुरीच्या कामाची मुख्य भिस्त यशवंतराव घोरपडे याजवर होती. सर्जे अंजनगांवचा तह ठरवून दिल्याबद्दल इंग्रजांनीं या घोरपड्यास दरमहा एक हजार रुपये नेमणूक करून दिली होती. म्हणजे हा गृहस्थ पोटांत कपट ठेवून उभय पक्षांकडे रहस्य दाखवीत होता. सोंडूरचें संस्थान याचें वतनी असतां, त्याचा उपभोग यशवंतरावाचा भाऊ खंडेराव घेत होता. खंडेरावास काढून सोंडूर आपणास द्यावें अशी यशवंतरावानें बाजीरावास गळ घातली आणि त्या कामीं बाजीरावाच्या आग्रहावरून एल्फिन्स्टननें सोंडूरवर इंग्रजी फौज पाठविण्याचें कबूल केलें. परंतु यशवंतरावाच्या दुटप्पी वर्तनानें एल्फिन्स्टनचें मन

कलुषित झाल्यामुळें सोंडूरवर फौज पाठविणें त्यास इष्ट वाटलें नाहीं. तथापि बाजीरावानें अतिशय टोंचणी लावल्यामुळें क. मन्रो कर्नाटकांत होता त्यास एल्फिन्स्टननें सोंडूरवर जाण्याची सूचना केली. त्याप्रमाणें सन १८१७ च्या ऑक्टोबरांत इंग्रजी फौजेनें खंडेरावापासून सोंडूर जिंकून यशवंतरावाचे हवालीं केलें. पुढें यशवंतरावानें फौजा फितविण्यासाठीं पन्नास हजार रुपये बाजीरावापासून घेतले, सर्व प्रकार गुप्त ठेवण्या-बद्दल वाटेल तशा शपथा घेतल्या, आणि अंतस्थ रीतीनें सर्व प्रकार तो एल्फिन्स्टन यास कळवीत गेला. त्यामुळें बाजीरावाची सर्व खटपट एल्फिन्स्टनला आगाऊच कळून तो सावध राहिला. ( घोरडपडे वंशावळ मागें पृ. २६९ पहा. )

एल्फिन्स्टनचा दुसरा मोठा सल्लागार **बाळाजीपंत नातू** होय. हा वाई जवळ पांचवडचा राहणारा पूर्वी खंडेराव रास्ते याज पाशीं कारकून असून रास्त्यानें त्यास मरतांना आपला सर्व मुखत्यार नेमिलें; आणि क. क्लोजच्या मार्फत रास्त्यांची थोडी बहुत व्यवस्था लावून दिली. त्या संबंधानें तो रेसिडेंटाच्या भेटीस जाऊं लागला. स. १८०९ सालीं क्लोजनें त्यास नोकरींत ठेवून आपल्याबरोबर माळव्यांत नेलें. तेथून परत आल्यावर एल्फिन्स्टनची त्याची गांठ पडतांच दोघांचें उत्कृष्ट मेतकूट जमलें. वाईचा राहणार गोविंद महादेव साने ता.२२·४·१८४१ रोजीं लिहितो. ' माझे चुलत्याजवळ बाळाजीपंत नातू नोकर होता. त्यास माझे चुलते कामासाठीं खंडेराव रास्त्यांकडे पाठवीत. आमचे घरीं दोन वर्षें नोकरी केल्यावर त्यास रास्त्यांनीं आपणाकडे मागून घेतलें, तेव्हां त्याचे जागीं आमचे चुलत्यानें नागो देवराव याची नेमणूक केली. या नागो देवरावाचा व नातूचा पुढें स्नेह जमला. नागो देवरावाचा आप्त नीळकंठ शास्त्री थत्ते याचे मुलास नातूनें आपली मुलगी दिली. लग्न थाटाचें झालें.'* रेसिडेंटाकडे चांगला जम बसतांच बाजीरावाच्या कृत्यांची इत्थंभूत माहिती काढून ती हा नातू एल्फिन्स्टन यास कळवीत असे. त्याच कामगिरीबद्दल एल्फिन्स्टननें गव्हर्नर होण्यापूर्वीच नातूस इनाम वतन करून दिलें. बाजीरावाच्या कारकीर्दीचा व विशेषतः शेवटच्या खटपटींचा तपशीलवार विस्तृत वृत्तान्त मुद्दाम ग्रँट डफचे विनंतीवरून बाळाजीपंतानें त्यास लिहून दिला, त्याचा इंग्रजी तर्जुमा रिचर्ड मॉरिसनें करून डफ यास दिला. मूळ मराठी लेख नातूनें परत घेतला. +

**२ बाजीरावाचा प्रक्षोभ** ( ऑक्टोबर १८१७ ).—ता.१३·६·१८१७ च्या तहानें पेशव्याचा बराच मुलूख इंग्रजांचे ताब्यांत गेला; त्याच्या सैन्याची

* प्रतापसिंग प्रकरणांतील जबान्या. + हा लेख हुडकून प्रसिद्ध होणें जरूर आहे.

संख्या कमी झाली; आणि कॅप्टिन फोर्ड यास नोकरींत ठेवून जी कवाइती फौज बाजीरावानें मुद्दाम प्रसंगीं उपयोगी पडावी म्हणून तयार केली होती, ती इंग्रजांनीं मदतीच्या नांवाखालीं बाजीरावाकडून आपल्या ताब्यांत घेतली, आणि या तुकडीचें नांव ' दि पूना ऑक्झिलियरी फोर्स ' असें ठेविलें. इंग्रजांची मनधरणी करण्यांत ज्या पुरुषानें आज पंधरा वर्षे आपली अगदीं शिकस्त केली, त्या बाजीरावास ही आपली हीन स्थिति झालेली पाहून किती दुःख झालें असेल याची कल्पनाच केली पाहिजे. या संकटांतून सुटका करून घेण्याचा विचार त्याचे मनांत सारखा घोळूं लागला. पुढें पेंढाऱ्यांच्या युद्धांत तुम्ही इंग्रजांस सामील व्हा, असा ग०ज०चा संदेश मुद्दाम माल्कमनें माहुलीस बाजीरावाची भेट घेऊन कळविला, तेव्हां त्यानें फौज ठेवण्यास सुरवात केली. ही फौज त्यानें इंग्रजांस मदत करण्यासाठीं जमविली कीं त्यांजशीं लढण्यासाठीं जमविली हें केवळ त्याचे मनास ठाऊक. मात्र त्यास त्या बाबतींत दोहोंकडून पंचाईत उपस्थित झाली ही गोष्ट खरी. फौज न ठेविली तर मदत न केल्याचा ठपका येणार; ठेवली तर आपला इंग्रजांशीं लढण्याचा उद्देश आहे असा त्यांस संशय येणार. तथापि त्यानें ' नवे फौजेची कलम-जारी केली. अवघे सरदार रास्ते, आपा देसाई, पानसे, पटवर्धन, विंचूरकर वगैरे बोलावून ममतेंत घेऊन पुण्यास आणिले. दहा हजार आरब व तीन हजार नंगे गोसावी चाकरीस ठेविले. तोफखाना, नवीन बाण, दारूगोळा यांचा सरंजाम चाल-विला. फौजेचा भरणा सुमारें पन्नास हजार झाला, मुख्य बापू गोखले १५ हजार, आबा पुरंदरे ३ हजार, विंचुरकर १० हजार, शिवाय नारो विष्णु आपटे, मिरजकर, पटवर्धन, रास्ते, थोरात, जाधव इत्यादिकांची प्रत्येकीं सुमारें २ हजार. '

बाजीरावानें पुण्यास सैन्य जमविलें ही गोष्ट एल्फिन्स्टनला अत्यंत झोंबूं लागली. त्यानें कॅ. फोर्ड यास बाजीरावाकडे पाठवून कळविलें, पेंढाऱ्यांच्या युद्धासाठीं तुम्ही जर ही फौज जमवितां तर ती पुण्यास ठेवूं नका, बाहेर वऱ्हाडचे हद्दीकडे ठेवा. ही गोष्ट बाजीरावानें मान्य केली नाहीं. कारण या पूर्वींच इंग्रजांनीं आपल्या फौजा पुण्याच्या आजूबाजूस जमविल्या होत्या, त्या प्रथम तुम्ही दूर न्या असें त्यानें रेसिडेंटास कळविलें. इंग्रजांनीं मात्र पेंढाऱ्यांचें निमित्त करून सिंदे, होळकर, भोसले पेशवे यांच्या छातीवर आपल्या फौजा आणून ठेविल्या; आणि त्यांचे प्रतिकाराची सिद्धता या सरदारांनीं चालविली त्यास यांनीं हरकत करावी ही गोष्ट बाजीरावास बिलकूल आवडली नाहीं. खरें म्हटलें तर ता. १६·५·१८१७ रोजींच ग० ज० नें

पेशव्याचें राज्य जिंकण्याचा ठराव करून तसे हुकूम ठिकठिकाणच्या आपल्या हस्तकांस पाठविले होते; आणि त्या धोरणानें सर्व नाक्यांच्या ठिकाणीं आपल्या फौजा ठेवून दिल्या. इंग्रजांचा हा प्रकार कांहीं गुप्त नव्हता. आपल्यावर इंग्रजांनीं चढाई केल्यास त्याचा प्रतिकार करणें बाजीरावाचें कर्तव्य होतें आणि तें त्यानें सुचलें तसें केलें. सैन्याची जमवाजमव तर केलीच आणि शिवाय सिंदे, होळकर, भोसले यांजकडे आपल्या मदतीस येण्यासाठीं निकडीचे खलिते पाठविले. तसेंच आपल्या राज्यांतील सर्व किल्ल्यांची व आरमाराची तयारी लढाईच्या उद्देशानें त्यानें जय्यत करविली. बाजीराव आपलेकडून इंग्रजांचे फौजेंत फितुर करीत होता तो तर सिद्धीस गेला नाहींच, उलट यशवंतराव घोरपडे व बाळाजीपंत नातू हे बाजीरावाच्या हालचालींच्या संपूर्ण बातम्या रोजच्या रोज रेसिडेंटास पुरवीत असत.

बाजीरावाची एल्फिन्स्टनशीं सन १८१७ च्या ऑक्टोबरांत शेवटची भेट होऊन भाषण झालें तें असें:–"तुमचे आमचे ऐक्यतेस किती संवत्सरें झालीं, आगम निगम भूत भविष्य पाहून तुम्हांशीं ऐक्यता केली, ते समयीं करार मदार, कित्येक कामाच्या तजविजी करून रूपास आणावें त्याचा जिम्मा तुम्ही सर्व प्रकारें करितां, आज तागाईत काय झालें याचें स्मरण करावें." असें बहुतां प्रकारचें करणें त्यांचे पुढें ठेवून कुंठित करून बोलणें बंद झालें. इतकें तुम्ही करीत असतां तुमचें मानस मी कदापि तोडिलें नाहीं. येणेंकरून ऐश्वर्य अथवा जो पदार्थ माझे अंगीं होता तो तेजहीन झाला. मी मूळ मंत्रावेगळा तुमचे करण्यांनीं झालों. जो मी होतों तो आज नाहीं. तुम्ही कशास पुसतां ? तुमचे स्नेहाची जोड मात्र केली कीं जी कला अंगीं होती ती दवडून बसलों."

बाजीरावानें इंग्रजांशीं युद्ध सुरू करावें अशी सल्ला त्यास एका बापू गोखल्या-शिवाय दुसऱ्या कोणीं दिली नाहीं. विठ्ठलराव विंचूरकर हा ज० स्मिथच्या फौजे-बरोबर बरेच दिवस कामगिरीवर होता, त्याला सर्व इंग्रजी लष्कराची माहिती चांगली झालेली होती. मराठ्यांच्या बाजूस टापटीप व जूट बिलकूल नसल्यामुळें युद्धांत इंग्रजांशीं आपला निभाव लागणार नाहीं असा त्याचा अभिप्राय असून तो त्यानें स्पष्टपणें बाजीरावास कळविलाही होता. जुना मुत्सद्दी गोविंदराव काळे* यानेंही आपलें मत इंग्रजांशीं युद्धाचा प्रसंग आणूं नये असेंच स्पष्टपणें बाजीरावास सांगितलें. मुख्य

* हा गृहस्थ पुढें नोव्हेंबर १८२३ त मरण पावला ( ऐ. जु. गो. १०६ ).

सरदार सिंदे, होळकर व भोसले. पैकीं सिंदे तर आरंभापासूनच हातपाय गाळून बसला होता. होळकराच्या सरदारीवर खंबीर पुरुष कोणी नसून तेथें बहुनायकी झाली होती. नागपुरचा आप्पासाहेब स्वतः तडफदार होता, परंतु बाकाबाईच्या वगैरे द्वारें इंग्रजांनीं तेथचें दरबार अगोदरच पोखरून काढिलें होतें. दक्षिणेंतील मुख्य सरदार पटवर्धन यांच्याशीं बाजीरावानें कधींच प्रेम टेविलें नव्हतें.

बाजीराव इंग्रजांवर किती चिडला होता आणि निरनिराळ्या सत्ताधीशांस युद्धासाठीं उठविण्याचा प्रयत्न त्यानें किती दूरवर केला होता, त्याची साक्ष ग० ज० हेस्टिंग्जच्या खासगी रोजनिशींत मिळते. ता. ६·९·१८१८ चा उतारा असा आहेः—

"मी कारभारावर येऊन दाखल होण्यापूर्वींच बाजीरावानें आमच्या सत्तेविरुद्ध प्रचंड चढाई गुप्तपणें चालविली होती. त्यांत ब्रह्मदेशच्या बादशहाचेंही साह्य पेशव्यानें मिळविलें. त्यानें आपले वकील ब्रह्मदेशांत पाठवून तेथील बादशाहचें साह्य संपादन केलें. तदनुसार या वर्षाचे आरंभीं ब्रह्मी बादशहानें इंग्रज सरकाराकडे अशी मागणी केली, कीं 'मुर्शिदाबाद व त्याच्या पूर्वेकडील बंगालचा सर्व प्रदेश हा पूर्वापार आमच्या राज्यांत मोडत असून आमचा आम्हास ताबडतोब परत द्यावा.' या मागणीचीं पत्रें घेऊन वकील आले त्यांस डाक्का येथील इंग्रज अधिकाऱ्यानें तेथेंच ठेवून घेतलें आणि त्यांजवळचीं पत्रें तेवढीं माझ्याकडे पुढें रवाना केलीं. त्यावर मी बादशाहला रंगूनच्या मार्गानें जबाब पाठविला आणि कळविलें, 'आपली थोरवी व शहाणपणा सुप्रसिद्ध आहे, तेव्हां बंगालच्या प्रदेशाची मागणी आपण केली असेल असें मला वाटत नाहीं. कोणी तरी मधच्या मध्यें सरहद्दीवरील लबाड गृहस्थांनीं आपणांस फसविण्याचा हा प्रकार केलेला असावा. त्यांचा उद्देश केवळ आपल्या आमच्यामध्यें निष्कारण वैमनस्य उत्पन्न करावें असा दिसतो. आपल्या आमच्या दोस्तीचा भंग होण्यांत उभयतांचें वाईट आहे, आणि आपणांस खरा प्रकार कळेल तर त्याजबद्दल माझ्या प्रमाणें आपल्यालाही चीड उत्पन्न झाल्याशिवाय राहणार नाहीं.' असें पत्र गेल्यानंतर पुढें लवकरच बाजीरावाचा पाडाव होऊन त्याचें राज्य आम्ही हस्तगत केल्याची बातमी ब्रम्ही बादशाहास पोंचली, आणि पावसाळा आल्यामुळें आमचेवर स्वारी करण्याची सवडही त्यास राहिली नाहीं. माझी खात्री आहे कीं, हा प्रकार मी त्याचे नजरेस आणल्याबद्दल तो आतां आमचे आभारच मानील. मराठ्यांबरोबरच्या ह्या युद्धाचा निकाल तडकाफडकी झाला हें एक बरें झालें; नाहीं तर अशीं बाह्य विघ्नें किती उपस्थित झालीं असतीं तें सांगवत नाहीं."

पुण्यास इंग्रजांची छावणी सन १८०३ सालापासून गारपिरावर होती. त्या वेळीं तेथें क.बर नांवाचा मुख्य अंमलदार होता. ही फौज फारच थोडी होती. ऑक्टोबरांत पेशव्याच्या फौजा पुण्यांत जमा होऊं लागल्या, त्यांचाही तळ इंग्रजी छावणीच्या शेजारींच पडूं लागला. बाजीरावानें नवीन बनविलेलीं गोसाव्यांचीं पलटणें शेजारीं वानवडीवर येऊन उतरलीं. मुळामुठा नद्यांच्या गेळक्यांत संगमावर रेसिडेंटाचा बंगला होता. त्या बंगल्यानजीक भांबुर्डे गांवास वेढून विंचूरकरांचा तळ येऊन पडला. अशा रीतीनें पेशव्यांच्या फौजांचे ठिकठिकाणीं तळ पडून त्यांनीं इंग्रजांना घेरण्याचा उपक्रम हलके हलके चालविला. ता. २८ ऑक्टोबर रोजीं रात्रीं मराठी फौजांतील तोफांच्या हालचालींची गडबड एवढी उडाली, कीं एल्फिन्स्टन आपल्या बंगल्यावर रात्रभर जागत बसून पुढें काय करावें याची विवंचना करूं लागला. त्या वेळीं कॅप्टिन ग्रँट म्हणजे इतिहासकार डफ हा त्याजवळ होता. त्या रात्रीं विजा मेघगर्जना व पाऊस यांची गर्दी उसळून गेली होती. ता. २९ रोजीं सकाळीं इंग्रजांवर एकदम हल्ला करावा असें बापू गोखल्याचें मत होतें. परंतु बाजीरावाचे मनाचा निश्चय झाला नाहीं. रात्रभर वाटाघाट करून त्यानें दुसऱ्या दिवशींचा छाप्याचा बेत रहित केला. सकाळींच त्यास एल्फिन्स्टनचा निरोप आला, कीं तुम्हीं आपलें लष्कर गारपिरावर आमच्या छावणीस आणून भिडविलें आहे तें तेथून दूर हलवावें. ही गोष्ट बाजीरावानें मान्य केली नाहीं, म्हणून ता. ३० रोजीं मुंबईचें गोरें लष्कर खडकीस येऊन पोंचतांच गारपिरावरील आपलें लष्करही एल्फिन्स्टननें उठवून ता.३ नोव्हेंबर रोजीं खडकीस नेलें, आणि पेशव्यांचा हल्ला आल्यास त्याच्याशीं सामना करण्याची सिद्धता त्यानें खडकीच्या मैदानावर केली. इंग्रजांची छावणी होळकराच्या पुलापासून खडकी गांवापर्यंत पसरली होती. तिच्या पिछाडीस मुळा नदीचा प्रवाह होता. त्या नदीच्या पलीकडे दापोडी गांवाजवळ कॅ. फोर्डची पलटण होती. या पलटणानें खडकीस येण्याचा नदीचा उतार एल्फिन्स्टनकडून तपासून ठेविला होता. ता. २ नोव्हेंबर रोजीं ले. शॉ नांवाचा इंग्रज संगमावरून मुंबईस जात असतां गणेशखिंडीजवळ श्रीमंतांकडील स्वार विश्रामसिंह व दुसरे दोघांनीं भाला मारून जखमी केला. त्याचा जबाब विचारण्यास एल्फिन्स्टननें बाळाजीपंत नातू श्रीमंतांकडे पाठविलें. त्यावर विठोजी नाईक गायकवाड यास बाजीरावानें तपासास पाठविलें. तो तपास करून परत गेला.

सदाशिव माणकेश्वर मरण पावल्यावर पेशव्याचा कारभार मोर दीक्षित मराठे वसईकर हा पाहत असून त्याचा व फोर्डचा विशेष स्नेह जमला होता. कॅ.फोर्ड

यानें जी पलटण तयार केली त्यांतील शिपायांनीं नोकरीवर रुजू होते वेळीं आपण पेशव्याशीं इमानानें वागूं अशी शपथ घेतली होती. या शपथेला मागाहून एक पुस्ती * जोडण्यांत आली, कीं इंग्रजांशीं पेशव्याचा सलोखा असे पर्यंत आपण हें इमान पाळूं: अर्थात् बाजीरावानें जेव्हां इंग्रजांवर युद्ध पुकारलें तेव्हां कॅ. फोर्ड अगर त्याचे सैनिक यांनीं पेशव्याशीं इमान पाळण्याचें प्रयोजन उरलें नाहीं, असें इंग्रज लेखक फोर्डच्या विश्वासघाताचें समर्थन करितात. पण आपल्या फौजेकडून आपली मान कापून घ्यावी इतका बाजीराव खचित खुळा नव्हता. फोर्डशीं स्नेह ठेविल्यामुळें मोर दीक्षित इंग्रजांस फितुर झाला आहे अशी बातमी बाहेर पसरली होती ती खोटी होती. बाहेरील इंग्रज फौजांचा भरणा येऊन दाखल झाला नाहीं तोंच इंग्रजांस गांठावें, असा बाजीरावाचा निश्चय झाला आहे ही गोष्ट दीक्षितानें अंतस्थपणें फोर्ड यास कळविली; आणि युद्ध सुरू झाल्यास तुम्ही बाजीरावाचें साह्य करावें अशी विनंति केली. त्यावर फोर्डनें दीक्षितास साफ कळविलें, कीं मी आपल्या देशबांधवांशीं लढणार नाहीं. निदान तुम्ही तटस्थ तरी राहवें असें दीक्षितानें त्यास कळविलें, तेंही त्यानें मान्य केलें नाहीं. नंतर उभयतांचें पुष्कळ बोलणें पुढील प्रसंगा-संबंधानें झालें, त्यांत लढाईच्या प्रसंगांत आपलें कांहीं कमजास्त झाल्यास उभयतां पैकीं जो कोणी मागें जिवंत राहील त्यानें मयताच्या बायका मुलांचा सांभाळ करावा असें वचन एकमेकांनीं दिलें. दुर्दैवानें खडकीच्या लढाईत मोर दीक्षित प्रथमच गोळा लागून मृत्यु पावला. +

* मूळ कागद संपूर्ण छापलेला आहे त्यांत ही पुस्ती नाहीं. पे. द. यादी नं. ३५.

+ **डॉ. कोटस** (Coats).—मोर दीक्षित व कॅ. फोर्ड यांच्या एकमेकांस अंतर न देण्याच्या शपथा झाल्या, त्यांत डॉ. कोट्स याचाही जीव रक्षण करावा असा ठराव झाला होता. हा डॉ. कोट्स स. १७९७ पासून पुण्याच्या रेसिडेन्सींत नोकरीस होता. गोस्तन—देवींचा उपाय नुकताच डॉ. जेन्नर यानें इंग्लंडांत प्रसिद्ध केला त्याचा प्रसार या डॉ. कोट्सनें पुण्यांत पुष्कळ केला, आणि त्या कामांत पुणेकरांचा लोभ संपादिला. देवी काढून घेण्यास लोक धजेनात, तेव्हां लोकांस उदाहरण घालून देण्याकरतां बाजीरावानें आपली बायको वाराणशीबाई इजला डॉ. कोट्सकडून मुद्दाम देवी काढून घेतल्या. पुण्याच्या रेसिडेन्सींतला पहिला डॉ. टॉमस क्रूझो हा होय. त्याची बदली ता. ५.७.१७९४ रोजीं होऊन त्याच्या जागीं जेम्स फिंडले आला; आणि फिंडलेच्या मागून स. १७९७ त कोट्सची नेमणूक झाली, तोच पेशवाई अखेर तेथें होता.

**३ खडकीची लढाई.**—ता. ५·११·१८१७ आश्विन वा. ११ बुधवार रोजीं सकाळीं बापू गोखले यानें फौजेंत जाऊन हुशारी केली. त्यावरून शहरांत लोक भयभीत झाले. बाजीरावाचा हुजऱ्या विठोजी नाईक दोन प्रहरीं दोन वाजतां एल्फिन्स्टनला भेटून परत आला आणि तीन वाजतां मराठी लष्करानें खडकीच्या इंग्रजी लष्करावर चाल केली. तेव्हां खुद्द बाजीराव बायकामंडळी सुद्धां पर्वतीवर फौजेंत जाऊन तेथील खिडकींतून लढाई पाहत बसला. मराठी लष्कर बाहेर पडलें तेव्हां प्रथमच त्यांच्या जरीपटक्याची काठी मोडली, हा अपशकून भावी नाशाचा सूचकच झाला. मराठी लष्कर हल्ला करीत येऊं लागल्याचें चिन्ह दिसतांच प्रथम हे आपल्या बंगल्याला वेढा घालतील असें वाटून, एल्फिन्स्टन घाईघाईनें बंगला सोडून पाठीमागच्या बाजूनें नदी उतरून खडकीच्या लष्करांत जाऊन राहिला; आणि लगेच त्यानें क० बर यास पुढील लढण्याची व्यवस्था ठरवून दिली. बंगल्यांतील सामानाची आवराआवर करण्यास एल्फिन्स्टन यास अवकाश मिळाला नाहीं. निघण्यापूर्वी गुप्त स्वरूपाचे कागद जवळ होते ते मात्र त्यानें जाळून टाकिले. अर्थात् पेशव्याचे हातीं ते पडूं नयेत अशी त्याची इच्छा असावी. कारण पेशव्याचा नाश करण्यास ज्या कांहीं भल्याबुऱ्या गोष्टी त्यानें केल्या त्यांचा पुरावा त्या कागदांत मागें राहिला असता.

'आश्विन व॥ ११ स पुण्यांत हूल पडली, कीं फिरंगी तयार झाला. लोकांनीं आवई खाऊन दुकानें बाजार बंद केला. दोन प्रहरीं खासा स्वारी निघून पर्वतीस गेली. ते दिवशीं स्वारी घोड्यावर होती. मागून गोखले पुरंदरे वगैरे सरदार जमून गेले. पायरीवर बापू गोखले घोड्यावरून उतरून पायांवर डोकी ठेविली, कीं मला आज्ञा असावी. आशीर्वाद दिला, कीं 'बाळाजी विश्वनाथाचें पुण्य तुम्हांस तारो.' नंतर सर्वांनीं पायांवर डोई ठेवून आज्ञा घेऊन औंदचे मैदानांत गेले. दिवस पांच घटका राहिला, तेव्हां यांची त्यांची लढाई अंधार पडेपर्यंत चालली. इंग्रज आपले ठिकाणीं शिकस्त झाले. दोहोंकडील मिळून दोन हजार माणूस कामास आलें. प्रातःकाळीं सोरे दर्शनास पर्वतीस आले. तेथें मसलत करून दोन घटका रात्रीस शुक्रवारचे वाड्यांत आले. बारा घटका रात्रीं द्वादशीस निघून डेरा दाखल झाले.'

या खडकीच्या लढाईत मराठ्यांच्या फौजा मुठानदीच्या पश्चिमेस भांबुर्ड्यापासून चतुःशृंगी, संगम, गणेशखिंडीचा डोंगर एवढ्या भागांत हल्लींच्या शेतकी कॉलेजच्या मैदानास धरून पसरलेल्या होत्या. मध्यभागीं १४ तोफा व पायदळ होतें. मराठ्यांस तोंड देण्याकरितां क. बर खडकीवरून बराच पुढें चालून आला. युद्ध

मुख्यतः तोफांचें झालें. पांच गोळे श्रीमंतांचे अगोदर सुटल्यावर मग लढाई सुरू झाली. सायंकाळ होतांच श्रीमंतांच्या फौजा मागें गणेशखिंडीलगत येऊन राहिल्या. संगमावरील बंगले श्रीमंतांकडील लोकांनीं जाळले व सामान लुटलें. इंग्रज सैन्याची फळी फोडून आंत घुसत असतां बापू गोखल्याच्या घोड्यास जखमा लागून त्यास मागें परतावें लागलें. बाजीरावाच्या निकडीच्या निरोपावरूनही तो माघारी फिरला असावा, नाहीं तर त्या पहिल्याच हल्ल्यांत त्यानें रात्रीं सुद्धां इंग्रजांची पुष्कळशीं नासाडी केली असती. एवंच खडकीच्या लहानशा इंग्रजी लष्करावर मराठ्यांनीं केलेला हा पहिला हल्ला फुकटच गेला. त्यांत इंग्रजांकडचे ८६ व मराठ्यांचे ५०० लोक जायां झाले. एकंदरींत या लढाईनें कांहींच निकाल लागला नाहीं. पुनः दुसऱ्या दिवशीं मराठ्यांनीं लगोलग हल्ला केला असता तर इंग्रजांचा निभाव लागला नसता. पहिल्या दिवशीं हल्ला चालू होतांच ‘ इंग्रजांचें बोलणें श्रीमंतांकडे आलें कीं एल्फिन्स्टन साहेब घाबरले. त्यावरून श्रीमंतांचीं बोलावणीं बापू गोखले यांस गेलीं. परंतु गोखले माघारी न फिरत. त्यांचा लढाईचा आग्रह मोठा. खावंदांचे मनांत इंग्रज मोडावयाचा नाहीं. शेवटीं निदान श्रीमंतांनीं सांगून पाठविलें, तेव्हां गोखले शह सोडून माघारे आले.’

खडकीच्या उत्तरेस दापोडी येथें मेजर फोर्डच्या फौजेचें ठाणें होतें, त्यांत बाजीरावानें फितुर पेरला होता. त्यामुळें त्यांतले सुमारें २०० लोक नोकरी सोडून निघून गेले, तरी बाकी सर्व फौज घेऊन मेजर फोर्ड इंग्रजांचे मदतीस खडकीकडे येऊं लागला, पण त्यास विंचूरकराचे फौजेनें पुढें येऊं दिलें नाहीं. हा फोर्ड बाजीरावाचा नोकर व त्याची फौज बाजीरावानें मुद्दाम तयार केलेली होती. आयत्या वेळीं तो निःशंकपणें जाऊन इंग्रजांस मिळाला. मोर दीक्षिताबद्दल एल्फिन्स्टन यास मोठा आदर वाटत होता. मरणापूर्वी कित्येक दिवस प्रकरण निकरावर येऊं नये म्हणून दीक्षितानें शिकस्तीचे प्रयत्न केले. त्यावरून बाजीराव वगैरे मंडळींनीं त्याची भित्रेपणाबद्दल हेटाळणी केली. सबब मुद्दाम धीटपणानें स्वतः जरीपटका घेऊन तो मराठी फौजेच्या पुढें उभा राहिला, म्हणूनच युद्धारंभीं इंग्रजांचे गोळ्यांस बळी पडला. दोन प्रहर नंतर तोफांची मारगिरी सुरू झाली, ती आंधार पडेपर्यंत चालू होती. दुसरे दिवशीं सकाळीं घोडनदीची फौज येऊन खडकीस दाखल झाली.

येणें प्रमाणें युद्धाग्नीनें पेट घेतला. एकवीस वर्षें धुमसत असलेला बाजीरावाचा वैराग्नि असा निदर्शनास आला. एकदां युद्ध सुरू झाल्यावर उभय पक्षीं कित्येक अत्याचार घडल्याशिवाय राहिले नाहींत. कॅप्टिन वॉघन (Captain Vaughan)

व त्याचा भाऊ हे दोन इंग्रज अंमलदार मुंबईहून येत होते त्यांस मराठ्यांनीं पकडून ठार मारिलें. असेच दुसरे दोन इंग्रज अंमलदार मॅारिसन व हंटर या नांवाचे निजामाचे हद्दींतून पुण्याजवळ आले असतां बापू गोखल्याचे हातांत सांपडले. त्यानें त्यांस वासोटा किल्ल्यावर नेऊन कैदेंत टाकलें. तेथून युद्ध संपल्यावर त्यांची सुटका झाली.

**४ येरवड्याची लढाई** ( ता. १६·११·१८१७ ).— ज० स्मिथ जालना येथें होता. 'माझ्याकडून तुम्हास दररोज पत्र जाईल, पत्र चुकलें कीं कांहीं तरी घोटाळा आहे असें समजा आणि ताबडतोब पुण्यास या,' असें एल्फिन्स्टननें त्यास कळविलें होतें. ता. ५ चें पत्र चुकतांच ता. ८ नोव्हेंबर रोजीं तो निघाला तो ता. १३ नोव्हेंबर रोजीं येरवडा येथील टेकडीच्या पश्चिम अंगाला म्हणजे हल्लीं डेक्कन कॉलेज आहे त्या मैदानांत येऊन तळ देऊन राहिला. त्यास अडविण्यासाठीं अक्कलकोटकरांची फौज व बाजीरावाचा नारोपंत आपटे पुण्याहून बराच पुढें चालून गेला. स्मिथनें कोंडापुर मुक्कामीं त्यांचा पराभव केला. अक्कलकोटकर सरदार त्या लढाईंत मारला गेला. संगमाच्या धरणा खालील हल्लींचा पूल ओलांडल्याबरोबर जी टेकडी लागते, तिला पिकेट हिल्ल् किंवा शादिलबावाची टेकडी असें नांव होतें. हल्लीं या टेकडीवर विठ्ठलदास ठाकरसीचा बंगला आहे. इंग्रजांच्या फौजेवर हल्ला करण्याचें संधान बापू गोखले पाहतच होता. हा हल्ला खडकीच्या लढाईनंतर लगेच झाला असता तर इंग्रजांचा निभाव लागला नसता. परंतु वाटाघाटींत व बाजीरावाच्या धरसोडीमुळें आणि तोफा नदी पलीकडे न्यावयाच्या त्याच्या उताराची तजवीज करण्यांत ११ दिवस फुकट गेले. ता. १६ नोव्हेंबरच्या रात्रीं मराठी फौजा येरवड्याच्या पाय उतारानें पलीकडे जाऊन पोंचल्या. तेव्हां रात्रभर घोरपडी व येरवडा ह्या दोहोंच्या दरम्यान इंग्रज पेशव्यांची लढाई झाली तिचें वर्णन तत्कालीन कागदांत आहे तें असें.

"रविवार कार्तिक शु॥ ८ ( ता. १६·११·१८१७ ) दोन प्रहरांपासून लढाईची तोफ चालती झाली. घोरपडीजवळ खंडेरावाची टेकडी आहे, त्याचे नजीक पीराची टेकडी आहे, त्याजवर इंग्रजांनीं दोन तोफा लागू करून मोर्चा कायम केला. त्याजवर आरब व गोसावी पायदळ नदीपुढें जाऊन गोळी चालली; ती मध्यान्ह रात्र पावेतों. गोखले, पुरंदरे, रास्ते नारोपंत आपटे व पटवर्धन वगैरे मंडळी तोफां जवळ उभे होते. घोरपडी कडून एक पलटण आली म्हणून गोखले

वगैरे तिकडे लढत गेले. इंग्रजांस घोरपडी पलीकडे लढत नेला, तों रात्र प्रहर राहिली. संगमावर पलीकडे विंचूरकर पांच हजार फौज व रूपराम चौधरीच्या पांच तोफा असतां विंचूरकरांनीं घोडा घातला नाहीं व तोफ लावली नाहीं. पलटणांस मार्ग दिल्यामुळें दोन पलटणें सरकारचे तोफांजवळ जाऊन तोफा वेढून उभे राहिले. हें वर्तमान गोखल्यास कळल्यावर त्यास दोष लावून बोलल्यावर त्यांजकडून उत्तर आलें, कीं चौधरीचे लोक यावयाचे ते आले, परंतु इंग्रजांचे लोकांनीं सरकारच्याच तोफा त्यांजवर लागू केल्या. तेव्हां सूर्योदय झाल्यावर गोखले वगैरे तमाम निघून गेले. यास कारणें दोन झालीं. प्रथम रात्रीं श्रीमंत लष्करांतून पळून गेले, त्याजमुळें फौजेचा धर सुटून तमाम लोक पळूं लागले. गोखले वगैरे मंडळी निकरानें लढत असतां श्रीमंतांनीं असा प्रकार केला, त्यामुळें सरकारचा अपजय झाला. दौलत खराब झाली. सरकारवाड्यासुद्धां इंग्रजी अंमल बसला. सिंहगडास सरकारच्या तोफा होत्या, त्या आणावयास लोक गेले त्यांचा नाश फारच झाला. सावकारांची चीजवस्त सर्व गेलें. श्रीमंत माहुलीस गेले. एल्फिन्स्टन लोणीस गेले. बरोबर कारभारी नातू आहेत. शनवारचे वाड्यांत रॉबिन्सन साहेब कामकाज पाहतात. मी दोन तीन दिवस जाऊन भेटी घेतल्या. ' ( ऐ. टि. १·३१ ). हें पत्र नानाफडणिसाची बायको जिऊबाई हिला तिच्या भावानें लिहलेलें आहे. याच प्रसंगाची आणखी हकीकत. ' कार्तिक शु॥ ८ मीचे दिवशीं दोन प्रहरीं गोखल्यांचे आरब व सरकारचे गोसावी येरवडे गांव घेऊन आंत शिरले. तेव्हां मोठे कलागतीस आरंभ झाला. ते दिवशीं पेशव्यांचा लढाईचा बेत नव्हता. परंतु इंग्रजांचा बेत पडला. गणपतराव पानशांनीं महाकाली तोफ आणून बार काढिले. आरब व गोसावी यांनीं लढाईची शर्थ केली. अवशीस प्रहर रात्र पर्यंत लढाईची शर्थ झाली. पुढें गोखले व पुरंदरे यांशीं कांहीं फितुर असें समजलें, तेव्हां श्रीमंतांनीं पळ काढिला. बापदेवाचे घाटांत जाऊन उभे राहिले. विंचूरकर पुरते फितुरी असें समजण्यांत आलें. स्वारी बरोबर माधवराव रास्ते व चिंतामणराव आप्पा गेले. तेव्हां फौजेचा भणभणाट झाला. पानसे यांनीं तोफा काढून घेतल्या. मागील रात्र पांच घटका राहिली, तोंपर्यंत तोफांचे बार चालले. फिरंग्याकडील तोफेचा गोळा आबा पुरंदरे उभे होते त्यांच्या दहा हातांवर पडला. तेव्हां गोखले व पुरंदरे स्वारीचे मागें सासवडाकडे गेले. लढाई सुरू होतांच बाजीरावानें ठासून फौजेंत पुढें यावें, बिदान आपणास तरी संग्रामास जाऊं द्यावें, परंतु पुण्यांतून पळ काढूं नये अशी चिमाजीआपानें बाजी-

रावाशीं पुष्कळ हुजत घातली, पण त्याचा उपयोग झाला नाहीं. चिमाजीस घेऊनच तो निघून गेला.

**५ शनिवार वाड्यावर इंग्रजांचें निशाण** * ( १७·११·१८१७ ).— दीड प्रहर रात्र होते श्रीमंत दम खाउनी । गेली स्वारी मशाला हिलाला मग लावुनी ॥ जलदी करुनी साहेबांनीं लाविलें निशाण पुणियाला । खेंचून वाड्याबाहेर काढले कदीम शिपायांला ॥ —प्रभाकर.

बाजीराव पुण्यांतून आपण होऊन निघून गेल्यानें इंग्रजांस शहराचा ताबा अनायासें मिळाला. बाळाजी नारायण नातू यानें शनिवार वाड्यावर इंग्रजांचें निशाण लाविलें, ही गोष्ट सुप्रसिद्ध आहे. एल्फिन्स्टन पुण्यास आल्यावर मोदीवर त्याची इतराजी झाली तेव्हां बाळाजीपंत नातूस त्यानें आपल्या जवळ घेतलें. नातू लिहितो, " अलपिष्टनसाहेब मला कामकाजांत बोलावूं लागले तेव्हां बाजीरावानें आपल्याजवळ चाकरीस राहण्याविषयीं मला फार आग्रह केला. थोर थोर लोक बोलण्यास घातले, परंतु मी कबूल केलें नाहीं. यामुळें बाजीरावाची फार नाखुषी होऊन त्यांनीं फोर्डसाहेबाचे मार्फतीनें अलपिष्टनसाहेबांस सांगून पाठविलें, कीं ' बाळाजीपंतास तुम्ही आपले जवळ येऊं देऊं नये. ' त्याच वेळेस मी हा मुलूख सोडून काशीस जात होतों. तेव्हां अलपिष्टनसाहेब यांनीं जामीन देऊन ठेवून घेतलें. सन १८१० सालीं क्लोज साहेबांबरोबर मी माळव्यांत होतों, तेव्हां पन्नास स्वार व पालखी अशा तऱ्हेनें होतों. खंडेराव रास्ते यांनीं मरते वेळेस मी जवळ नसतां मृत्युपत्रांत मला मुखत्यार लिहून ठेविलें. बाजीरावसाहेब ता. १६ नोव्हेंबर रोजीं पुण्यांतून पळून गेले, त्या वेळेस पेशव्यांचे वाड्यावर बावटा लावावयास रॉबिन्सन साहेबाबरोबर मलाच पाठविलें. मी जात नव्हतों, तेव्हां तुम्ही भितां कीं काय असें म्हणूं लागले. सबब मी बरोबर जाऊन बावटा लाविला. कार्तिक शु. ९ सोमवारीं इंग्रजबहादुरांनीं शहरांत शनवारचे वाड्यांत झेंडा लावून लोक हवालदील होऊन पळूं लागले, त्यांस दील भरंवसा देऊन वाणी, उदमी, सावकार वगैरे रयतेचा बचाव केला आणि पुण्याचे कामावर रॉबिन्सनसाहेबांस ठेविलें. ' या प्रसंगीं ज. स्मिथनें एल्फिन्स्टन यास सांगितलें, कीं–' आम्ही शहरांत जाऊन वाड्यावर झेंडा लावतों, परंतु फौजेस लूट मिळाली पाहिजे. तेव्हां जवळ बाळाजीपंत नातू होते त्यांनीं विनंति केली, शत्रु तर पळून गेले, आतां गरीब

* इ. वृ. १८३८ पृ. ८; इ. वृ. १८३५; पे. अ. पृ. २००; जु. ऐ. गो. पृ. ११०.

रयतेस लुटण्याचें प्रयोजन काय ? सर्व लोक इंग्रजी अंमल होण्याचीच वाट पाहत आहेत.' ज० स्मिथ बोलले, ' दादा तुम्ही झेंडा लावून याल काय ? ' नातू म्हणाले, ' मजबरोबर २५ स्वार द्या म्हणजे मी झेंडा चढवून येतों. ' त्या प्रमाणें स्वार घेऊन बाळाजीपंत शहरांत जाऊन वाड्याचे दिल्ली दरवाज्यावर झेंडा लावून आले. तेव्हां पुढें शहराचा बंदोबस्त नातूंस सांगण्यांत आला.

पुणें शहराची त्या वेळची हवाल लक्षांत ठेवण्यासारखी आहे. ' शु॥ ९ सोमवारीं ऊन पडतांच तोफांचे दोन गोळे शहरावर टाकले, आणि बुधवारचे रस्त्यानें हजार स्वार पळत गेला. फिरंगे यांनीं सरकारचे तळावरील डेरे येऊन जाळले. गावांत आईस लेंकरूं पुसेनासें झालें. रस्त्यांत वाट मिळेनाशी झाली. कोणी पर्वतीचे डोंगरांत, कोणी कोणीकडे अशीं गेलीं. नवरा एकीकडे बायको एकीकडे अशी अवस्था झाली. गांवांत बातमी, आतां पुणें जाळतो. इतक्यांत गोसावीपुऱ्यांतील बंगला जाळला. त्यानें लोकांची फार हवालदील झाली. इतक्यांत ' गोखले यांची हवेली कोणती, पुरंदरे यांची कोणती ' असें पुसत बुधवार रस्त्यानें एक सांडणीस्वार गेला. सरकारचे चारी वाडे ओस पडले. एक शूद्र कीं ब्राह्मण राहिला नाहीं. तों दिवस दोन प्रहर आला. तेव्हां गांवांत बातमी आली, कीं इंग्रज नाकेबंदी करतो. बाहेर कोणास जाऊं देत नाहीं. थोड्या वेळानें गावांत दौंडी आली, कीं द्वाही बाबासाहेब, हुकूम कंपनी बाहादरांचा. लोकांनीं दुकानें उघडावीं, आमचेकडून उपद्रव होणार नाहीं. हरेश्वर भाई ( नगरशेट ? ) यास एल्फिन्स्टन साहेबांनीं बोलावून नेलें. बाळाजी-पंत नातू आणखी चार साहेब बसले होते. साहेबानें हरेश्वर भाईस विचारलें, पुण्यास धनी कोण ? जशी आमच्या बेटाची अवस्था केली तशी आम्ही करूं. ' तेव्हां भाई बोलले. रयत गरीब त्यांजकडे काय आहे ? त्या वेळेस बाळाजीपंत नातू यांनींही तीच विनंति केली. त्यावरून साहेब बोलले, शहर राखणें असेल तर निशाणें लवकर लावा. असें ऐकतांच साहेब व बाळाजीपंत नातू तीनशें कुडतीवाले घेऊन शहरांत शनवार वाड्यापाशीं येऊन किल्ल्या आणून दरवाजे उघडले. उभयतांनीं आंत जाऊन गादीस कुर्निस्त केल्या; आणि आकाशदिव्याचे काठीस निशाण लावलें, आणि शंभर लोक वाड्यापाशीं ठेऊन पुढें बुधवारचे हवेलीपाशीं आले. तेथें आठ आसामींचा पाहरा ठेवून इतर वाड्यांत जाऊन तसेच पाहरे ठेवले. तों अस्तमान झाला. तोफेचे गोलंदाजास शिरस्त्याप्रमाणें तोफ सोडावी म्हणून सांगितलें. तो म्हणाला, ' दारू नाहीं व गज नाहीं !' दुसरे दिवशीं बंदोबस्त करून दिला. मंगळवार

तारीख १८ नोव्हेंबर रोजीं सरकारवाड्यांतील मोजदाद केली; व हरेश्वर भाईस सांगितलें, कीं गावांत सावकार मंडळीस दिल दिलासा देऊन दुकानें उघडावीं. बुधवार प्रातःकाळीं दौंडी पिटली, कीं बेटावरील चीजवस्त कोणीं नेली असेल ती सर्व जकाते यांचे हवेली पाशीं आणून टाकावी. तेथें दोन पहारेकरी बसविले. असा बंदोबस्त करून गुरुवार तारीख २० रोजीं एल्फिन्स्टनसाहेब कुच करून सिंहगडास गेला. मागें शहरांत दरोडे वगैरे पडून पुष्कळ धामधूम चालली. तेव्हां पोटसाहेब एल्फिन्स्टन याजकडे जाऊन म्हणूं लागला, मला कारभार शहराचा सांगावा. एलफिन्स्टननें उत्तर केलें, तूं निमकहराम आहेस. आमचे जाती वेगळा रहा. तरवार धरूं नको. कंपनीचे उपयोगीं पडला म्हणून दरमहा ६ हजार होता तो अडीच केला. अल्फिन्स्टनसाहेब गारपिरावर राहून शहरचा कारभार करीत.' यानंतर पुढें जो बाजीरावाचा पळ चालला त्याचीं नानाविध वर्तमानें कांहीं खरीं, कांहीं खोटीं पुणें शहरांत वरचेवर येऊन त्यामुळें लोकांची त्रेधा कशी उडे त्याची विस्तृत अखबार लिहिलेली अवश्य वाचण्यालायक आहे.

**६ वर्तुळाकार पलायन, कोरेगांवची लढाई** (१६ नोव्हें०–१ जाने०).— प्रहर रात्रीस बाजीराव पर्वतीवरून आपलें सामान आटपून पुरंदर कडील रस्ता धरून आप्पासाहेब सुद्धां हजारों मशाली लावून सासवडाकडे गेला. ही बातमी थोड्या वेळानें फौजेंत कळतांच बापू गोखले वगैरे सरदार लढाई सोडून श्रीमंतांच्या बचावासाठीं त्यांचे पाठोपाठ गेले. इकडे आरब व गोसावी हे मोठ्या निकरानें लढले. पण त्यांचा दारूगोळा संपल्यामुळें बहुतेक ठार पडले व राहिले त्यांनीं पळ काढला, तेव्हां टेकडी इंग्रजांनीं काबीज केली. ता. १७ ला सकाळीं इंग्रज घोरपडीच्या तळावर चालून आले तेव्हां तेथें तंबू मात्र उभे होते. फौजा सर्व रात्रींच बाजीरावाचे पाठोपाठ निघून गेल्या होत्या.

खडकी व येरवडा या दोन्ही लढाया बाजीरावाच्या घाबरटपणामुळें निष्फळ ठरल्या. पहिल्या पासूनच निश्चय करून त्यानें चढावाचें धोरण स्वीकारावयास पाहिजे होतें. स्मिथ्‌ची फौज शिरूरहून येत असतां तिच्यावर नुसता एकटा नारोपंत आपटे न पाठवितां मोठी फौज चालून गेली असती म्हणजे ह्या लढाया पुण्याच्या बाहेर चालून राजधानीचा बचाव झाला असता. शिवाय लोकांस धीर येण्याकरितां खुद्द यजमानानें फौजेंत ठासून राहणें जरूर असतें, तें बाजीरावानें न केल्यामुळें त्याच्या फौजा मोडल्या गेल्या. बाजीराव निघून गेल्यामुळें पुणें शहर इंग्रजांस उघडें सांपडलें,

आणि इंग्रजांनीं वाड्यांत येऊन त्याजवर आपला झेंडा उभारला, त्यामुळें बाजीरावाचें राज्य संपलें.

ता. १६ नोव्हेंबर रोजीं रात्रीं बाजीराव पुणें सोडून सासवडास गेला. तेथून दुसरे दिवशीं त्यानें जेजुरीस मुक्काम केला. तेथून पुलावरून तांबव्याचे मुक्कामास आले. तेथून घाट चढून देहूचे आंबराईंत स्वारी आली. तेथें एल्फिन्स्टन यांचें पत्र आलें त्याचें हंशील, कीं पाडाव आलेल्या इंग्रजांस गळीं दिलें, इतःपर असें होऊं नये. तेथून स्वारी कार्तिक शु॥ ११ स ता. १९ नोव्हेंबर रोजीं पाडळीचे मुक्कामीं आली. तेथें तुळशीचें लग्न केलें. पाडळीहून पुनःस्वारी देहूरचे मुक्कामास गेली. मध्यें माहुलीस जाऊन छत्रपति त्रिवर्ग बंधू व माईसाहेब यांस आणावयास नारो विष्णु आपटे यास स्वारसुद्धां वासोट्यास पाठविलें; आणि ज० स्मिथ आपल्या पाठलागास सालप्याचे वाटेनें येत आहेत असें समजतांच माहुली सोडून बाजीराव ता. २७ नोव्हेंबर रोजीं दक्षिणेस पुसेसावळी येथें गेला. तेथें दोन दिवस मुक्काम करून ता. २९ नोव्हेंबर रोजीं पहाटेस निपाणकर व पटवर्धन यांजकडील ५ हजार स्वार बरोबर घेऊन पेशवा मिरजेकडे जाण्यास निघाला. मागें इंग्रजांस अडविण्याकरितां बापू गोखले, विंचूरकर व घोरपडे यांच्या हाताखालीं त्यानें मुख्य सैन्य ठेवून दिलें. मिरजेकडून येडूर गोकाक पावेतों जातांना दक्षिणेकडून इंग्रजी फौज आडवी येते असें कळतांच परत फिरून, गलगले आथणीवरून पुनः माहुलीस येऊन तेथून पूर्वेकडे फलटण, नातेपुतें वरून पंढरपुराकडे आपला मोर्चा वळविला. नाहवीचा घाट चढून हिंगणगांव, कलेढोण, भालवणी, पढंरपुर, गुरसाले, करकंभ, कळासी, राजोरी, जिंती, बाभळगांव वरून स्वारी ता. १४ डिसेंबर रोजीं सिद्धटेकचे मुक्कामीं आली, तेथें छत्रपति येऊन सामील झाले. बापू गोखले इंग्रजांचे रोखावर होता. त्यानें नीरा नदीवर जाऊन इंग्रजांस गांठलें. लढाई लागून घाटापर्यंत उभयतां सैना आल्या. नंतर दुसरे दिवशीं घाटांत मातबर लढाई झाली. पुढें श्रीमंत पंढरपुराकडे आल्याचें कळतांच त्या बाजूस फौजा वळल्या. परंतु गोखल्याची चिकाटी सुटेना. त्यामुळें इंग्रजांस बहुतच अडचण पडली. नाहवीच्या भैदानांत लढाई मातबर झाली. भीमा तीरावर कूरी येथें गोखल्याचा मुक्काम असतां पहाटेच्या पांच घटका रात्रीं त्याजवर इंग्रजांनीं छापा घातला. त्यांतून संभाळून इंग्रजाची आघाडी पिछाडी रोखीत बापूनें इंग्रजांस अत्यंत त्रासवून सोडलें, * तों बाजीराव नगरच्या बाजूस पीरगांवाकडे

* पहा रु. २ बापू गोखल्याची कैफियत.

गेला. तेथेंही इंग्रज फौजा पाठीवर येतात असें कळतांच तो संगमनेरास आला. वारंवार मुक्काम बदलून कोणत्या दिशेनें कोणीकडे जातों याचा इंग्रजांस मागमूस लागू न देतां झुकांड्यांची पद्धत स्वीकारल्यामुळें ज. स्मिथ् अगदीं रडकुंडीस आला; आणि तूर्त नाशकाकडे बाजीरावाचे पाठीवर जाण्याचें सोडून बरोबरचें जड सामान त्यानें शिरूर येथें ठेविलें, आणि पुनः बाजीरावाचे पाठीवर संगमनेराकडे गेला. हा प्रदेश डोंगराळ व अवघड आहे. यांतच त्रिंबकजी डेंगळे फौज जमवून इंग्रजांस अडविण्यास राहिला होता, तो वाटेंत बाजीरावास सामील झाला. छत्रपतीची मंडळी बाजीरावाबरोबरच होती. कवठें, पारगांव, तळेगांव ढमढेरे, लोणी, पाबळ, नारायणगांव ओतुरावरून ब्राह्मणवाड्याचे मुक्कामास स्वारी आली. तेथें बापू गोखल्याचा पुत्र गोविंदराव बाबा हा ज्वर येऊन मृत्यु पावला. त्याची स्त्री बारा वर्षांची होती, ती सती गेली. राहण्याविषयीं बापूनें अत्यंत आग्रह केला असतां तिनें ती गोष्ट मानली नाहीं. तेथून पुढें फुलगांव आपटीस मुक्काम केला.

बाजीराव नासिककडे न जातां ओझरचा घाट उतरून जुन्नर खेडावरून ता. ३० डिसेंबर रोजीं चाकण येथें येऊन पोंचला, अशी बातमी स्मिथ यास कळली. त्याचे पूर्वी कोंकणांतून मुंबईकडून इंग्रज फौज येत होती तिला गांठावें किंवा पुण्यावर येऊन तें शहर एकदम हस्तगत करावें असा बाजीरावाचा बेत असल्याचें स्मिथ यास दिसून आलें. दोन्ही गोष्टी इंग्रजांस बिकटच होत्या. पुण्यास इंग्रजांचा बंदोबस्त अगदींच तात्पुरता होता. दीड महिन्यांत फौजांचा ४०० मैल प्रवास झाला, आणि बाजीरावाचा पाडाव झाला नाहीं तो नाहींच. त्यानें पुणें घेतलें तर पुढें पंचाईत पडेल आणि क० बर पुण्याचे बंदोबस्तास होता त्यानें आपल्या मदतीस शिरूरहून जास्त फौज बोलावली होती, त्यावरून कॅ. स्टॉटन थोडें इंग्रज सैन्य बरोबर घेऊन ता. ३१·१२१८१७ रोजीं रात्रीं ८ वाजतां शिरूरहून निघाला, तो दुसऱ्या दिवशीं सकाळीं १० वाजतां कोरेगांवाजवळ येऊन उतरला. तेथील टेकडीवरून त्याला पेशव्याची प्रचंड फौज समोर भीमा नदीच्या कांठीं दिसली. स्टॉटनची बातमी बापू गोखल्यास होतीच.

घोडनदीहून वरील इंग्रज फौज पुण्यास येत होती तिची बाजीरावाशीं अकस्मात् गांठ पडली. बापू गोखल्यास श्रीमंतांनीं आज्ञा केली, कीं आज लढाई करून आम्हास पुढें जाण्यास मार्ग करून द्यावा. गांवास लहानशी तटबंदी होती तींत इंग्रज आश्रयार्थ गेले. त्यांजवर दुसऱ्या बाजूनें मराठ्यांनीं तोफांचा मारा सुरू केला. जागा अडचणीची असल्यामुळें तोफा बंद करून मराठ्यांकडील आरबांनीं व पायदळांनीं

इंग्रजांवर चालून घेतलें. तेव्हां संगिनीचें व तरवारीचेंच युद्ध झालें. इंग्रज शिकस्त झाले. त्यांचे पुष्कळसे ऑफिसर्स व लोक मारले गेले. रात्रीं ९ वाजेपर्यंत लढाई चालून पेशव्यांचें सैन्य आपल्या छावणीकडे परत आलें. इंग्रजांचे १७५ जखमी झाले, त्यांपैकीं बहुतेक होतकरूच होते. मराठ्यांचे सुमारें ५०० लोक पडले. थोडक्या लोकांनीं पुष्कळांशीं लढून आपला निभाव केल्याबद्दल कोरेगांव येथें इंग्रजांनीं स्मारकाचा स्तंभ उभारला आहे. बाजीराव तर अगोदरच जेजुरीच्या वाटेनें साताऱ्याकडे निघाला होता. पाठीमागून ज० स्मिथ येत असतां त्यास ओझरच्या घाटांत त्रिंबकजी डेंगळ्याच्या रामोशांनीं इतकें सतावून सोडलें, कीं ता० २ जानेवारी रोजीं जेमतेम तो चाकणला येऊन पोंचला. त्याच दिवशीं कॅ. स्टॉटन जखमी झालेले लोक व उरलेली फौज बरोबर घेऊन परत शिरूरच्या छावणींत गेला.

**७ गोपाळ आष्टींची लढाई** ( २०·२·१८१८ ).—कोरेगांवच्या लढाई-नंतर श्रीमंतांच्या फौजेपैकीं पांचदहा हजार लोक घेऊन नारो विष्णु आपटे वाघोली पावेतों आला. त्यावरून या फौजा आतां पुण्यावर येणार असें वाटून इंग्रजांनीं पुणें सोडून पळून जाण्याची तयारी केली. परंतु पेशव्यानें आपला मोर्चा पुण्याकडे बिलकूल वळविला नाहीं. तो पुनः साताऱ्याकडे जाऊं लागला, आणि मागून त्याच्या फौजा कोरेगांवाहून राजेवाडी पावेतों गेल्या. तेथून दोन टोळ्या करून एक तोफखाना व पायदळ घेऊन बागलकोटावरून निपाणीच्या मैदांनांत लढाई ध्यावी अशा बेतानें पुढें गेली, आणि दुसरी एल्फिन्स्टनसाहेब छापा घालण्यास येणार ही बातमी आल्यामुळें त्याची आघाडी पिछाडी मारण्यास कवठें पावेतों गेली. त्याची व एल्फिन्स्टन साहेबाची झटापट होऊन साहेब निसटून साताऱ्याचे रोखानें रहिमतपुरास पोंचला. तेथें त्याची व स्मिथ साहेबाची गांठ पडून दोघे बोरगांव येथें मुक्कामास गेले. हे आपल्यावर चालून येतात असें बाजीरावास कळतांच तो साता-ऱ्याचा बेत सोडून फलटणकडे वळला. पाठीमागून स्मिथ साहेब त्यास पकडण्यास नांदगिरी येथें आला. तेथें त्यास बापू गोखल्यानें येऊन दोन प्रहर पर्यंत अडवून धरलें, त्यामुळें श्रीमंतांस पळून जाण्यास अवकाश मिळाला. बाजीराव आपण होऊन पळतो, त्याचे पाठीस लागण्यांत हांशील नाहीं, पुण्याप्रमाणेंच सातारा हस्तगत करून आपला राज्यकारभार मुलखांत चालू करावा असा बेत ठरवून, तेथून एल्फिन्स्टननें साताऱ्यावर चाल केली, आणि स्मिथ बाजीरावाचे पाठलागावर गेला. बाजीराव सोलापुरास गेला, तेथें नागपुरकर आपसाहेबाचा सरदार गणपतराव सुभेदार त्यास

येऊन मिळाला. सोलापुरचा बंदोबस्त विसाजी देवराव पाच्छापुरकर देशपांडे* यास सांगून बाजीराव परिंड्याचे रोखें आष्टीजवळ मुक्कामास आला. पूर्वी निपाणीच्या बाजूस लढाई घेण्याचा बापू गोखल्याचा विचार होता तो रहित करून सोलापुरच्या बाजूस लढाई द्यावी असें त्यानें आतां ठरविलें. दोन तीन महिन्यांत सारखी पळापळ चालली त्यामुळें मराठी फौजा कंटाळून गेल्या होत्या. पानशांचा तोफखाना व पटवर्धन मंडळी सोलापुरच्या बाजूस बाजीरावाचे संरक्षणास धावून गेली. गोसाव्यांच्या व आरबांच्या पलटणीही तयार होत्या, परंतु बाजीरावाचा पाय कोठें ठरेना. ता० १९ फेब्रुवारी रोजीं रात्रीं गोपाळाच्या आष्टीवर तो मुक्कामास असतां दुसऱ्या दिवशीं सकाळींच स्मिथची फौज त्याचे पाठलागास दोन कोसांचे अंतरावर वेळापुर येथें आली. बापू गोखले, त्याची स्त्री यमुनाबाई व सातारकर मंडळी सर्व बाजीरावाबरोबर होती. सकाळींच लौकर जेवण उरकून पुढें निघण्याचा बाजीरावाचा बेत होता. इतक्यांत बापूनें येऊन श्रीमंतांस विनविलें, "इंग्रज जवळ आले आहेत, आतां आपण पळूं नये." त्यावर श्रीमंत म्हणाले, "आजपर्यंत तुम्ही लढाईची मसलत दिलीत आणि आतां आम्हांस जेवणाखाण्यास देखील हरकत येते, असेंच तुम्ही आमचें संरक्षण करणार कीं काय ?" या भाषणानें बापूस राग आला, आणि त्यानें लगेच उत्तर केलें, 'आपला हुकूम असो वा नसो, मी आज लढाई देणार.' इतकें बोलून गोटांत येऊन एकटाच इंग्रजांचे सामन्यास निघून गेला. 'सरदार मंडळींचें चित्त शुद्ध नव्हतें. कोणीही सरकार कामास झटत नव्हता, आणि श्रीमंत आपल्या एकट्यालाच दोष देतात, यामुळें संताप येऊन मी रणमुख होणार, मागें काय पाहिजे तें होवो, असें अलीकडे गोखले बोलतच होते. आज रण सिद्धच आहे. सेवकजनांवर स्वामीचें चित्त असें विटल्यावर रंणागणीं स्वामिकार्यावर आल्यानें बहुमानच आहे. या उपरी चरणदर्शन होईल तर उत्तम, नाहीं पेक्षां हेंच शेवटचें असें बोलून नमस्कार करून इंग्रजांचे सन्मुख जाऊन उभे राहिले. पाठपुराव्यास आपासाहेब निपाणकर गेले नाहींत. इंग्रज चालून येतांच मुधोळकर गोविंदराव घोरपडे व बहिरजी सितोळे गोखल्यांचे फौजेंतून त्यांजवर चालून गेले. त्यांजबरोबर गोखलेही शिरून मारीत चालले, तेव्हां इंग्रजांची पहिली तुकडी माघारी हटली. तें पाहून दुसऱ्या तुकडीनें गोखल्यांवर चाल केली. गोखले यांस गोळी लागली. घोडा मोकळा झाला. गोखले गर्दीत मिसळून काटले गेले. वर्तमान ऐकून

---

* याच गृहस्थानें बापू गोखल्याची बखर लिहिली आहे. रु. २ पहा.

श्रीमंतांस दुःख झालें. श्रीमंत पळून गेले. छत्रपति मातुश्री बंधू सहवर्तमान जाग्यावर राहिले ते इंग्रजांचें स्वाधीन झाले. आष्टीची ही लढाई माघ शु॥ १५ ता. २० फेब्रुवारीस झाली. श्रीमंतांचें सर्व सामान लुटलें गेलें. गोविंदराव घोरपडे, आनंदराव बाबर वगैरे कित्येक प्रमुख लोक लढाईंत मारले गेले. इंग्रजांचेंही पुष्कळ नुकसान झालें. खुद्द स्मिथच्या डोक्यास तरवारीची जखम झाली. बापू गोखल्याला ३ पिस्तुलाच्या गोळ्या व २ तरवारीच्या जखमा लागल्या. प्रत्यक्ष संग्रामांत दोन्ही-कडचीं सैन्यें फारच थोडीं होतीं. इंग्रजांचा १ इसम मेला व २० जखमी झाले; आणि मराठ्यांचेही शेंपन्नासांहून जास्त दगावले नाहींत. बापूगोखल्याची स्त्री यमुनाबाई हिला रामचंद्र भोजराज देशपांडे यानें श्रीमंतांजवळ आणून पोंचविलें.

बाजीरावाची इच्छा इतक्यांतच इंग्रजांशीं लढाई द्यावी अशी नव्हती. परंतु सारखे पळत राहिल्यानें सर्व फौजा बेहिम्मत झाल्या, तेव्हां कसा तरी एकदां सोक्षमोक्ष करून घ्यावा असा निश्चय बापू गोखल्यानें केला, त्यामुळेंच आष्टीची ही लढाई झाली. सिंदे, होळकर व भोसले यांजवर बाजीरावाची मोठी भिस्त होती. गोदावरीच्या पलीकडे उत्तरेकडून या सरदारांच्या फौजा मदतीस आल्या म्हणजे त्यांस आपण सामील व्हावें आणि मग इंग्रजांशीं लढाई द्यावी असा बाजीरावाचा बेत होता. होळकरांचा सरदार रामदीन हा तिकडून दक्षिणेकडे येण्यास निघाला होता, आणि आपासाहेब स्वतः येणार अशी बाजीरावास आशा होती. बाजी रेटरेकराचा वंशज त्रिंबकराव हा पेशव्याची सेवा निष्ठेनें बजावीत होता. बाजीरावाचे वऱ्हाडाकडे जाण्याचे बेत अगोदरच ओळखून इंग्रजांनीं नागपुरास आपासाहेबास कैद केलें, आणि महिद्पुर येथें होळकराच्या फौजेचा विध्वंस केला. सिंद्याचा दम तर त्यांनीं पूर्वींच ओळखला होता. तथापि बाजीरावास त्याची मोठी आशा वाटत होती. आष्टीच्या लढाईनंतर बाजीराव वऱ्हाडाकडे वळला त्याचें प्रयोजन हें असें आहे. या लढाईनें दक्षिणेंतील मुख्य युद्ध संपलें, आणि बाजीराव निघून गेल्यामुळें अनायासें त्याचे प्रांत इंग्रजांस मिळाले.

**बाजी रटरेकर**
|
**गंगाधरराव**
|
**त्रिंबकराव**
पहा म. वि. ३
पृ. ३१९

बाजीराव जेव्हां आष्टीहून निसटून वऱ्हाडांतून चांद्याकडे चालला, तेव्हां हें युद्ध आतां पुष्कळ लांबणार; कदाचित् सिंदे भोसले एक होऊन त्यास मिळणार, बाजीराव हैद्राबादकडे वळल्यास तेथेंही त्यास पुष्कळसा पाठिंबा मिळण्याचा संभव आहे;

अशी धास्ती बरेच दिवस पर्यंत एल्फिन्स्टन यास होती. ता. १६·४·१८१८ रोजीं तो लिहितो, "आम्हीं एकेक राज्यें घशांत टाकलीं. म्हैसुरास नवा राजा केला, नागपुरास केला आणि आतां साताऱ्यास केला. पण न जाणों, सिंदे आपल्यावर उलटेल, होळकर त्यास सामील होईल. निजाम आम्हांवर उलटेल, किंवा शीख आणि गुरखे हे सुद्धां फिरतील, तर प्रसंग मोठा कठिण येईल, नुसती एक ठिणगी पडण्याचा अवकाश आहे, कीं आमचें राज्य पत्त्यांच्या घराप्रमाणें कोसळून पडेल. अजीर्ण होई पर्यंत खाऊं नये हें बरें. इतकीं सगळीं राज्यें खालसा करून असलेल्या अंदाधुंदींत आम्हीं भरच घातली आहे. बाजीराव केवळ आपल्या भित्रेपणामुळें आमच्या कबजांत आला. सन १८१४ त तो आमचेवर उठला नाहीं याचें कारण केवळ भित्रेपणा. थोडी छाती त्यानें केली असती तर त्या वेळीं आमचा निभाव लागला नसता. या खटपटींत खर्चाचें ओझें आमचे डोक्यावर केवढें चढलें आहे याची कल्पनाही कोणास होणार नाहीं." अभ्यासूंनीं एल्फिन्स्टनचें चरित्र अवश्य वाचावें.

बाजीरावाचा पळ हा गनिमी काव्याचा उत्कृष्ट मासला आहे. त्याच्या पुढें इंग्रज फौजा हतवीर्य झाल्या. पळतांना त्याच्या बरोबर कोणासही टिकाव धरवेना. असाच जर हा देशभर भटकत राहिला तर आपला निभाव कसा लागणार, याची इंग्रजांस विवंचना पडली. यशवंतराव होळकराचे जिवास जीव देणारे पाठिराखे होते तसेच बाजीरावानें जोडले असते तर त्याला सुद्धां अटकेपर्यंत मजल गांठणें शक्य झालें असतें. भोजन आराम झोंप यांची परवा न ठेवतां त्यानें व्यवस्थित पळ काढला असता तर इतरांसही पाणी चढून नवीन आवेश उत्पन्न झाला असता. पण आनंदीबाईची कूस इतकी भाग्यशाली नव्हती. आनंदीबाई व जिजाबाई दोघींनाही गर्भारपणीं पळ काढावा लागला, पण एकीस त्याचा फायदा झाला तो दुसरीस झाला नाहीं. तरी बाजीरावानें इंग्रजांस दमविलें हा गनिमी काव्याचाच विजय म्हटला पाहिजे.

**८ बाजीरावाचें चांद्याकडे प्रयाण, शिवनीची लढाई** (१०·४·१८१८).—पुढें बाजीराव उत्तरेस येत आहे असें पाहून हिस्लॉप त्याचे मुकाबल्यास गेला. भोसल्यांचा सरदार गणपतराव परांजपे सुभेदार सिताबर्डीवर मोडलेली फौज जमा करून लगबगीनें बाजीरावाचे साह्यास धावून आला. आष्टीच्या लढाई पूर्वीं थोडे दिवस टेंभुर्णी येथें बाजीरावाशीं त्याची भेट झाली. त्या वेळीं नारो सखाराम म्हणून एक इसम आपासाहेबाचा गुप्त निरोप घेऊन गणपतरावाबरोबर बाजीरावाकडे आला होता. इतक्यांत ता. २० फेब्रुवारी रोजीं आष्टीच्या लढाईत बाजीरावाचा पराभव

होऊन तो पळून परिंड्याचे बाजूस गेला, तेथें त्यास आपासाहेबाचे दोन हुजरे भेटले, त्यांचे पाठोपाठ आणखी दोन हुजरे खुद्द आप्पासाहेबाच्या हातची चिठ्ठी घेऊन आले. निरोप आणिला, कीं ' मी अत्यंत संकटांत आहें. या प्रसंगीं कसेंही करून माझें साह्य करा.' * आपासाहेबाचे हे हुजरे बरोबर घेऊन बाजीराव नेवाशाला गेला. तेथून कोपरगांवास जाऊन पुणतांब्यास त्यानें गोदावरी ओलांडली. लगेच कोणी पाठलागावर येत नाहीं असें पाहून नाशकास देवदर्शन करून तो सप्तशृंगाजवळ सात आठ दिवस मुक्काम करून असतां, होळकराचा सरदार रामदीन महिदपुरच्या लढाईतून निघालेली कांहीं पेंढारी फौज घेऊन आलेला बाजीरावास सामील झाला. नंतर ता० २ मार्च रोजीं नागपुरचे हुजऱ्यांस जबाब देऊन बाजीरावानें परत रवाना केलें. गणपतराव सुभेदार व सखारामपंत यांनीं बाजीरावास विनंति केली, कीं ' आम्हांस कांहीं पैसे देऊन नागपुरास रवाना करा म्हणजे आम्ही आपासाहेबांच्या मदतीनें तिकडे उठावा करून तुमचें साह्य करूं; तों पर्यंत तुम्ही खानदेशांतून बऱ्हाणपुरावर यावें. ' परंतु बाजीरावानें त्यांस रजा न देतां तसेच पुढें आपणाबरोबर घेतलें, आणि इंग्रजांच्या फौजेची बातमी ठेवीत तो पुढें खानदेशाकडे चालला. अणकाई येथें त्यास बातमी कळली कीं सर टॉमस हिस्लॉप बऱ्हाणपुर रोखून आपणास अडविण्यास बसला आहे. त्यामुळें घाबरून बाजीराव घाईनें परत फिरून पुनः कोपरगांवास आला. तेथून पीरी नदीवर आसी येथें आला. परंतु जनरल स्मिथ दक्षिणेकडून चालून येत आहे अशी तेथें बातमी लागतांच तो नागपुरचे आश्रयास जाण्यासाठीं पूर्वेकडे वळला; आणि गणपतराव सुभेदारानें पूर्वीं सुचविलेला बेत त्यानें आतां स्वीकारिला. त्यासाठीं नर्मदाघाटांचा व आसईचा नकाशा पाहवा.

हिस्लॉप यास बाजीरावाची बातमी पुरेपूर होतीच. उत्तरेकडून ता. ११ मार्च रोजीं तो गोदावरीवर आला आणि बाजीराव निसटून पूर्वेकडे गेल्याचें ऐकून त्यास पकडण्यासाठीं एकंदर फौजांची नवीन व्यवस्था त्यानें ठरविली. इकडे बाजीराव राक्षस-

* " Sumana Meer to Gangana Dobeeya–सुमना मीर गंगना दोबीया—" Assist me in any way you can ". The names are those of two holy men, famous in Maratha legends for the assistance they mutually rendered each other in extremity. " Prinsep.

भुवनाजवळ गोदावरी उतरून चांद्याकडे चालला. मार्गानें रामदीनच्या हाताखालील पेंढाऱ्यांनीं मुलखाची अत्यंत नासाडी केली. पाठलाग करणारांस चुकविण्याचे शेंकडो उपाय बाजीरावानें केले. आपण कोणीकडे जाणार याची वार्ता सुद्धां तो कोणाला लागूं देत नसे. जनरल स्मिथ सातारचें प्रकरण उरकून परत बाजीरावाचे पाठीवर आला, तों शिरूर येथें ता. १० मार्च रोजीं त्यास बातमी कळली, कीं बाजीराव चांद्याकडे निघून गेला असून हिस्लॉप व डोव्हटन त्याचे पाठीवर आहेत. बाजीरावाची आघाडी ता. २ एप्रिल रोजीं वर्धा नदीवर वणी येथें आली. तितक्यांत नागपुराहून कर्नल स्कॉट बाजीरावावर चालून आला. त्याची व गणपतरावाची गांठ ता. ३ एप्रिल रोजीं वर्धेवर पडली. त्या वेळीं उभयतांत लहानशी चकमक उडून गणपतराव निसटून गेला. तितक्यांत इंग्रजांनीं आपासाहेबास पकडून अलाहाबादेस रवाना केल्याची बातमी बाजीरावास मिळून तो अत्यंत कुंठित झाला. तीन बाजूंनी ॲडम्स, स्मिथ आणि डोव्हटन या तिघांच्या तीन फौजा त्याजवर चालून आल्यामुळें त्यास निसटून जाण्यास अवकाश राहिला नाहीं. सशास पारधी कुत्रे घेरतात तशी त्याची स्थिति झाली. पांढरकवडा व वणी यांच्या दरम्यान तो कित्येक दिवस घोटाळत राहिला. नंतर इंग्रजांस चुकवीत बाजीराव आंवढ्या नागनाथाजवळ शिवणी येथें पोंचला. तेथें त्याचे पाठलागावर ॲडम्स धावून आला. शिवनी येथें बाजीरावाची व ॲडम्सची बरीच झटापट झाली. ता. १० एप्रिल रोजीं इंग्रजांच्या गोळ्या अंगावर येऊं लागल्या बरोबर बाजीराव घोड्यावर बसून परत पांढरकवड्याकडे पळाला. त्याच दिवशीं डोव्हटन पांढरकवड्यास * दाखल झाला, आणि त्यानें बाजीरावाचा सारखा पाठलाग चालविला. ले. कर्नल स्कॉट् नागपुराहून निघून ता० ६ एप्रिल रोजीं हिंगणघाट येथें पोंचला. ता० १३ रोजीं बाजीराव पुणें नांवाच्या गांवीं वर्धा ओलांडून पलीकडे गेला. तिकडे ता० १४ रोजीं कर्नल ॲडम्स आलमडोहो येथें त्यास आडवा आल्यामुळें बाजीराव परत फिरला. त्याच दिवशीं ज० डोव्हटन पांढरकवड्याचे दक्षिणेस पन्नास मैल हारण नदीवर दूधगांवीं होता. तेथून त्यानें ॲडम्स यास लिहिलें, कीं मी ता० १७ ला पांढरकवड्याला येऊन पोंचतों.' तोंपर्यंत ज० स्मिथ दक्षिणेस होता तोही बाजीराव दक्षिणेस वळल्यास त्यास अडविण्यासाठीं गोदावरीच्या कांठानें पुढें येत होता. ता० १६ एप्रिल रोजीं ॲडम्सला बातमी कळली कीं आलमडोहोच्या आग्नेयीस जवळच बाजीराव आहे, तेव्हां आपण एकदम त्याजवर जाऊन हल्ला करावा,

---

* यासच पूर्वीं केळापुर हें नांव होतें.

म्हणजे झाला तर तो आपल्या हस्तगत होईल किंवा परत फिरला तर पांढरकवड्यावर डोव्हटनच्या हातीं पडेल; म्हणून ता. १६ ला रात्रीं ८ वाजतां अॅडम्स आलमडोहोहून निघाला, तो ता० १६ ला सकाळीं पिंपळकोट येथें आला. या ठिकाणीं पेशवा ता० १७ ला होता. तेथें त्यास असें कळलें कीं पिंपळकोटचे नैर्ऋत्येस दहा मैलांवर शिवनी येथें बाजीरावाचा मुक्काम आहे. लगेच त्यानें घोडेस्वारांसहित धावत जाऊन बाजीरावास गांठलें. अॅडम्स आल्याबरोबर बाजीराव परत वळून पांढरकवड्याकडे जात असतां डोव्हटनच्या अंगावर आला. पांढरकवडा शिवनीच्या दक्षिणेस बारा मैल आहे. पण डोव्हटन अंगावर येतो असें कळल्याबरोबर बाजीराव पुनः परत शिवनीकडे निघाला. त्यास ओळखून अॅडम्सनें एकदम त्याजवर झडप घातली. तेव्हां शिवनी येथें लढाई होऊन बाजीरावाची अत्यंत वाताहत झाली, आणि तो नैर्ऋत्येच्या बाजूस पळून उमरखेड येथें व तेथून पश्चिमेस बोरी येथें दाखल झाला. या ठिकाणाहून बहुतेक लोक पळास कंटाळून त्यास सोडून गेले. डोव्हटन त्याचे पाठीवर उमरखेड पावेतों आला आणि तेथून उत्तरेच्या बाजूस वासीमहून सामान येत होतें तें घेण्यास वळला. पिंप्री पावेतों त्याचा पाठलाग डोव्हटननें केला. डोव्हटन ता. ३ मे रोजीं पिंप्रीस पोंचला. यांत खरें म्हटलें तर डोव्हटनची अगदींच फसगत झाली. कारण पिंप्रीच्या बाजूस खुद्द बाजीराव आलाच नव्हता. त्याचे बरोबरची एक टोळी मात्र तिकडे गेली होती. शिवनी येथें पराभव झाल्यावर बाजीराव उत्तरेच्या बाजूस धाऊन तापी उतरून सिंद्याकडे जाण्याच्या मार्गास लागला. या वेळीं अशीरगडचा किल्लेदार यशवंतराव लाड यास सिंद्याचें खालील पत्र आलें होतें.

'तुम्हास बातमी कळविण्याची कीं, आमचा व कंपनीसरकारचा स्नेह असून पेंढाऱ्यांचे युद्धांत त्यांस मदत करण्याचें आम्हीं कबूल केलें आहे. हर्दा व हंडिया हीं दोन स्थळें आम्हीं त्यांचे हवालीं केलींच आहेत. परंतु तुम्ही अशीरगड बिलकूल स्वाधीन करूं नये. अखेरपर्यंत इंग्रजांशीं लढावें. अत्यंत सावधगिरी ठेवावी. वायकामुलें जवळ ठेवूं नयेत; बाहेर कोठें अगोदरच लावून द्यावीं. मग जें होणार असेल तें होईल. आम्ही तुमचा बचाव करूं याची खात्री असों द्यावी. बहुत काय लिहिणें. ( पुढील मजकूर स्वदस्तुरचा ) श्रीमंत पेशव्यांकडून मागणी येईल ती पुरवीत जावी. आमचा हुकूम नाहीं अशी सबब त्यांस सांगूं नये. नाहीं तर आमचे पदरीं बदनामी येईल. येथून तुम्हांस संपूर्ण समजुतीचीं पत्रें जातच आहेत, त्यांवरून सर्व कळून येईल. हें पत्र हजार पत्रांचे ठिकाणीं मानून त्याप्रमाणें वर्तन ठेवावें.' (मिलचा इ० भाग ८).

**१ धूळकोटावर बाजीरावास इंग्रजांचा घेरा, त्याची शरणागति.** दौलतराव सिंद्यानें येऊन आपणास मिळावें म्हणून बाजीरावानें अखेरपर्यंत प्रयत्न चालविला होता, त्या संबंधानें " मध्य हिंदुस्थानच्या आठवणी " या आपल्या पुस्तकांत माल्कम लिहितो,—" सन १८१८ च्या एप्रिलांत माझ्या हातांत अखबारांबरोबर एक पत्र बाजीरावानें दौलतरावास लिहिलेलें पडलें त्याचें शब्दशः भाषांतर येणें प्रमाणें. ' तुमचे वडील महादजी सिंदे यांनीं सरकार हुकमानें दिल्लीस जाऊन वजिरी मिळवून मोठा लौकिक संपादिला आणि अंतःकरणापासून सरकारची सेवा केली. परंतु तुम्हांस त्यांचें पद प्राप्त झालें असतां तुम्ही इंग्रजांशीं मैत्री करून हिंदुस्थानांत राज्य करीत आहांत. अशीच तुमची सरकाराशीं निष्ठा असावी काय ? त्यापेक्षां तुम्ही हातांत बांगड्या भरून बायकांसारखे जनानखान्यांत बसून राहिल्यास काय वाईट ? माझें राज्य गेल्यावर तुमची सत्ता कायम राहील असें तुम्हांस वाटतें कीं काय ? ' आपलें राज्य जाऊन दौलतरावाचें कायम राहणार असा योग आला, तेव्हां वैतागानें हें पत्र लिहिलेलें दिसतें. इतिहासकार ग्रँट डफ हा या वेळीं डोव्हटन बरोबर बाजीरावाच्या पाठलागांत होता.

पांच महिनेपर्यंत बाजीरावाचे व बरोबरच्या लोकांचे अत्यंत हाल झाले, त्यांचीं वर्णनें गोंधळ्यांच्या कवनांत अमर झालीं आहेत. उदाहरणार्थः-जे श्रीमंत सुकुमार वनांतरीं ते भटकत फिरती । कळेल तिकडे भरदिसास प्रभु कांट्यांमधिं शिरती ॥ आपला घोडा आपण स्वहस्तें चुचकारून धरती । खालीं पसरून उपवस्त्र दिलगिरींत वर निद्रा करती ॥ अस्तमानीं कधीं रात्रीं भात भक्षिती पाटावरती । दरकुच दर मजलीस कृपेंतिल सेवक अंतरती ॥ ( चाल ) पेशव्यांचे वंशांत नाहीं कोणी असा कहर पाहिला । हत्ती घोडे उंट खजीना जेथील तेथें राहिला । बाजीराव होय धन्य म्हणून यापरी आक्रांत साहिला ॥ तुमची आमची हीच भेट अतां राव सर्वांना सांगती ॥ कृपा लोभ परिपूर्ण करित जा द्या दर्शन मागती ॥—शाहीर प्रभाकर. बाजीरावानें बोरीवरून उत्तरेस नर्मदेचा मार्ग धरल्याची बातमी डोव्हटन यास कळली. या वेळीं बाजीरावाजवळ दहा हजारांहून जास्त लोक नव्हते. त्रिंबकजी डेंगळे, रामदीन, वाळोबा विंचूरकर व बापू गोखल्याची स्त्री यमुनाबाई एवढीच प्रमुख मंडळी बरोबर होती. बाकीचे सरदार माधवराव रास्ते, आप्पा देसाई निपाणकर, नारोपंत आपटे चिमणाजी नारायण व खुद्द चिमाजी आपा हीं मंडळी बोरीहून बाजीरावास सोडून नांदेडवर गोदावरी उतरून परत स्वदेशीं आली. येसाजीपंत गोखले व विठोबा नाईक

हेही असेच सोडून परत आले. आबा पुरंदरे व विठ्ठलराव विंचूरकर हे पुढें बरोबर गेले. कसेंही करून दौलतराव सिंद्याजवळ पोंचावें अशी एकच तोड बाजीरावास उरली. पण ती सिद्धीस जाण्याचा संभव दिसेना, म्हणून सिंद्याकडे जाण्याचा बेत फसल्यास त्यास गत्यंतर राहिलें नाहीं, तेव्हां शरण जाण्याचे विचार त्याच्या मनांत घोळूं लागले. ता० ५ मे रोजीं तापी उतरून तो चोपडा येथें गेला. तेथून पुढें सेंधव्यावरून इंदुरास जाण्याचा त्याचा बेत होता. पण सेंधव्याचें ठाणें यापूर्वींच इंग्रजांनीं हस्तगत केलें असल्यामुळें तिकडून जाण्याचा त्याचा मार्ग खुंटला. अर्थात् शरण जाण्याशिवाय दुसरा इलाजच त्यास उरला नाहीं. म्हणून चोपड्याहून माल्कमकडे बोलणें करण्यास माणसें पाठवून बाजीराव पूर्वेस बऱ्हाणपुरचे बाजूस अशीरगडचे उत्तरेस पांच मैल धूळकोट येथें गेला. अशीरगड किल्ला अद्यापि सिंद्याचे ताब्यांत होता, तेथें आपणास आश्रय मिळेल अशीहि बाजीरावाची अपेक्षा होती. बाजीराव उत्तरेकडे जातो ही बातमी ठिकठिकाणच्या इंग्रज अधिकाऱ्यांस पोंचतांच तेही सर्व बाजूंनीं त्यास घेरण्यास नर्मदेकडे धावून गेले. अशीरगडचा किल्लेदार यशवंतराव लाड यानें बाजीरावाचें थोडें बहुत साह्य केलें. धूळकोट येथें मुक्काम असतां सर्व बाजूंनीं इंग्रजांनीं आपणास घेरलें अशी बाजीरावाची खात्री झाली. तेव्हां त्यानें आनंदराव यशवंत चंदावरकर ( निसबत रघूत्तमराव ) व हणमंतराव लिमये व रामचंद्र भोजराज * हे आपले वकील माल्कमकडे पाठविले, ते ता. १६ मे रोजीं महू येथें पोंचले. त्यांजवळ बाजीरावानें स्वदस्तूरचें पत्र दिलें होतें. पत्रांत माल्कमची भरपूर स्तुति होती. "माझे अत्यंत जुने दोस्त तीन. पैकीं कर्नल क्लोज दिवंगत झाले, दुसरे जनरल वेल्स्ली स्वदेशीं आहेत, आणि तिसरे आपण. आपण आजपर्यंत अनेकांचा सांभाळ करून त्यांस पदरांत घेतलें आहे. सिंदे, होळकर वगैरे सरदारांवर मेहरनजर करून आपण त्यांचा सांभाळ केला आहे तर या संकटसमयीं मलाही आपण हात देऊन माझा निभाव करावा." असा पत्राचा आशय होता. पत्रांत स्पष्ट मुद्दा कांहींच नव्हता. तथापि कांहीं अटींवर बाजीराव स्वाधीन होण्यास कबूल आहे असा पत्राचा मतलब माल्कमनें घेऊन त्याप्रमाणें त्यानें वकिलांशीं बोलणें केलें, तो संवाद असाः—

वकील—आपणच बाजीरावाचे भेटीस चला.

माल्कम — मला येथून जातां येत नाहीं, मी जबाब लिहून तुमचे जवळ देतों, आणि बरोबर माझे दोन मदतनीस देतों, ते बाजीरावास भेटतील.

---

* देशपांडे पाच्छापुरकर. रु. २ बापू गोखले याची बखर.

दोघांपैकीं एक असिस्टंट लेफ्टिनंट लो म्हणून होता, त्यास माल्कमनें ताकीद दिली, कीं बाजीरावास खालील अटी कळवा; आणि त्या तुम्ही मान्य करीत असाल तर डोव्हटन वगैरे सेनापति तुमचेवर चालून येत आहेत त्यांस मी मना करीन, असें सांगा. त्या अटी या. १ राज्याची साफ सोडचिठ्ठी द्यावी. ही सोडचिठ्ठी एकट्या बाजीरावा पुरती नसून त्याचे सर्व वारसांसही लागू असावी. २ पुनः दक्षिणेंत जाऊं नये. ३ तळेगांवाजवळ ज्यांनीं दोन गोरे इसम मारले तीं माणसें व त्रिंबकजी डेंगळे यांस इंग्रजांचे हवालीं करावें. या तीन गोष्टी बाजीराव कबूल करील तर पुढें त्यास असें कळवावें, कीं ४ रामदीन व पेंढारी सरदार तुमच्या जवळ आहेत त्यांस घालवून द्यावें; आणि ५ तुम्हीं खुद्द जनरल डोव्हटन यांचे स्वाधीन व्हावें. असें केल्यास ६ तुम्हास कोणत्याही प्रकारची तोशीस न पडतां उत्तर हिंदुस्थानांत एकाद्या क्षेत्राच्या ठिकाणीं स्वस्थपणें राहण्याची परवानगी मिळेल.

आपल्याच जबाबदारीवर माल्कमनें वरील अटी कळविल्या हा प्रकार ग० ज० यास पसंत पडला नाहीं. बाजीरावाचा साफ निकाल लावण्याची ऐन संधि आलेली यामुळें फुकट गेली असें त्यास वाटलें. बाजीरावाच्या बोलण्यावर किंवा कृतीवर ग० ज० चा बिलकूल विश्वास नव्हता.

वरप्रमाणें बोलणें होऊन ता.१८ मे रोजीं आनंदराव यशवंत व ले०लो महूहून निघाले ते दुसऱ्या दिवशीं मंडलेश्वर येथें आले, तेव्हां आपासाहेब भोसले कैदेंतून पळून गेल्याची बातमी ले० लो यास कळून त्यानें स्वतः पुढें बाजीरावाकडे जाणें तहकूब केलें, आणि सय्यद हुसेनअली नांवाचा इंग्रज फौजेंतील सुभेदार त्याजबरोबर होता त्यास आनंदरावाबरोबर बाजीरावाकडे पाठविलें. जनरल डोव्हटन ता० १५ मे रोजीं बऱ्हाणपुरास दाखल झाला, आणि तेथून धुळकोटावर जाऊन बाजीरावावर हल्ला करण्याची तयारी करीत असतां त्यास ता० २३ मेचें ले० लोचें पत्र मिळालें. त्यावरून बाजीरावास पुढील निश्चय करण्यास सवड मिळावी म्हणून डोव्हटन लगोलग त्याजवर चालून गेला नाहीं. दुसरीकडून कर्नल स्मिथ भीकणगांवापर्यंत चालून आला होता, तोही तेथेंच थबकून राहिला. ता० ३० मे पर्यंत बाजीराव धूळकोटावर घुटमळत होता. इतक्यांत खुद्द माल्कम आपली फौज घेऊन भीकणगांव पावेतों चालून आला. तेथें ले० लो व पेशव्यांचे वकील त्यास भेटले, तसेंच हंड्या येथील इंग्रज फौज पिपळोदा पर्यंत चालून आली. अशा रीतीनें धूळकोट येथें बाजीराव सर्व बाजूंनीं साफ वेढला गेला. तेव्हां ता० ३१ मे रोजीं त्यानें विंचूरकरांचा दिवाण बाळोबा यास माल्कमकडे पाठवून कळविलें,

उद्यां मी तुमचे भेटीस करीरी येथें येतों. त्याप्रमाणें ता० १·६·१८१८ रोजीं बाजीराव सायंकाळीं ५ वाजतां माल्कमचे भेटीस गेला. बरोबर त्याचें सर्व कुटुंब, स्वार व पायदळ मिळून २५०० लोक होते. भेटींत प्रथमच माल्कमनें पूर्वीच्या अटी पुनः कळविल्या, आणि त्रिंबकजीस एकदम हवालीं करा अशी निकड लावली.

बाजीराव—त्रिंबकजीस हवालीं करणें माझ्या हातांत नाहीं. तो येथून दूर आपल्या छावणींत फौजबंद आहे.

माल्कम—तर मग आम्हींच त्यास एकदम हल्ला करून पकडतों.

बाजीराव--आपण खुशाल त्यास पकडावें, माझी त्यास हरकत नाहीं. परंतु माझे कांहीं आप्त त्रिंबकजीजवळ आहेत त्यांस मी प्रथम आपल्याकडे बोलावून घेतों.

माल्कमनें ही गोष्ट असावधपणें कबूल केली. या निमित्तानें बाजीरावानें त्रिंबकजीस पुढील धोक्याची सूचना देण्याची खाशी युक्ति केली. तेवढ्या इशाऱ्या वरून त्रिंबकजी पळून गेला तो इंग्रजांचे हातीं येण्यास आणखी कांहीं काल लागला. रात्रीं दहा वाजेपर्यंत माल्कमशीं बोलणें होऊन बाजीराव परत आपल्या मुक्कामावर आला. लगेच माल्कमनें सर्व अटी लिहून कागद तयार केला व दुसरे दिवशीं ता० २·६·१८१८ रोजीं सकाळीं तो बाजीरावाकडे पाठविला. त्यांत पूर्वीच्या अटींशिवाय आणखी असा मजकूर होता, कीं २४ तासांचे आंत बाजीरावानें आमचे स्वाधीन व्हावें आणि लगेच उत्तरेकडे चालूं लागावें. बाजीरावानें त्यांत आणखी एवढें मागून घेतलें, कीं ( १ ) "माझा बंधु अमृतराव याची नेमणूक सालाची आठ लाख आहे त्या पेक्षां माझी कमी असूं नये; ( २ ) ज्या सरदारांनीं माझी नोकरी एकनिष्ठपणें केली त्यांच्यावर इंग्रजांनीं दंश ठेवूं नये; आणि ( ३ ) ब्राह्मणांचा व धार्मिक बाबतींचा जसा परामर्ष पेशवे आजपर्यंत घेत आले तसाच इंग्रजांनीं पुढें घ्यावा." यानंतरही बाजीरावानें कालहरणाचा थोडासा प्रयत्न केला. ता० ३ जून रोजीं सकाळीं सद्‌गदित अंतःकरणानें त्यानें सर्वांची रजा घेतली. कंठ दाटून आल्यामुळें कोणाशीं कांहीं न बोलतां सर्वांचें शेवटचें दर्शन घेऊन बाजीराव म्यान्यांत बसून निघाला तो ११ वाजतां माल्कमचे छावणींत दाखल झाला. या वेळेपासून त्याची श्रीमंत पदवी जाऊन इंग्रज लेखक त्यास 'महाराज' म्हणूं लागले.

माल्कमनें बाजीरावाशीं केलेला ठराव पुढें हेस्टिंग्जनें बऱ्याच नाखुषीनें मंजूर केला, आणि कानपुरच्या उत्तरेस १० मैल गंगेच्या पश्चिम कांठीं बिठूर उ० ब्रह्मावर्त येथें

बाजीरावानें राहवें असें ठरविलें. आठ लाखांची मोठी नेमणूक बाजीरावाचे खर्चास देऊं नये असें हेस्टिंग्जचें म्हणणें होतें. कारण पेशव्याच्या खाजगी खर्चास एवढ्या मोठ्या रकमेची जरूर नव्हती, आणि फाजील रक्कम हातीं आल्यास पुनः इंग्रजांवर उठण्याचा तो प्रयत्न करील अशी भीति राहिली. बापू गोखल्याची जहागीर एल्फि-न्स्टननें खालसा करून त्याची बायको यमुनाबाई हिच्याकडे सत्तावीस हजारांचा सरंजाम त्यानें चालू ठेविला. इचें माहेर वडूथ येथील करमरकरांकडे होतें. कांहीं दिवस माहेरीं राहून ती पुढें ब्रह्मावर्तास जाऊन तेथेंच मरण पावली. हिला नवऱ्याच्या मृत्यूची प्रत्यक्ष खात्रीलायक हकीकत कोणीं कळविली नाहीं, म्हणून ही बाई अखेरपर्यंत कुंकूं बांगड्या वगैरे सवाष्णचिन्हें धारण करीत असे. ही बापूची दुसरी बायको. पहिली बायको आनंदीबाई हिचा मुलगा गोविंदराव वारल्याचें मागें सांगितलेंच आहे.

बाजीरावाचा एकनिष्ठ सरदार नारो विष्णु आपटे हा पुढें इंग्रजांचे परवानगीनें ता० १७·१०·१८१८ रोजीं पुण्याहून निघून ब्रह्माव-र्तास गेला. तेथून त्यास सिंदेशाहींत सन १८३० त जहागीर मिळाली. त्याचेच नातवास बाजीरावाची मुलगी बयाबाई दिली. बाजीरावाच्या पुढील कुटुंबाची समस्त हकीकत बयाबाईकडून बाहेर आली.

**नारो विष्णु आपटे**
**|**
**हरि ऊ० बाबासाहेब**
**|**
**गणपतराव, मृ. १८८३**
**= बयाबाई**

बाजीराव स्वाधीन झाल्यामुळें पुढील मोहिमेचा इंग्रजांचा पुष्कळसा खर्च वांचला. पावसाळा जवळ आल्यामुळें मोहीम लांबती तर इंग्रजांस आणखी अतोनात कष्ट पडले असते. देशभर अंदाधुंदी माजलेली होती. अशा स्थितींत बाजीराव एकदम हस्तगत होण्यांत आपला फायदा आहे अशी माल्कमची खात्री झाली, म्हणूनच त्यानें बाजीरावाशीं जो व्यवहार केला तो सर्वांस एकंदरींत फायद्याचा व हितावह वाटला. त्याबद्दल अद्यापि स्वकीय परकीयांकडून माल्कमची तारीफ होत आहे.

बाजीरावाची स्वारी माळवा बुंदेलखंडांतून पुष्कर मथुरा वृंदावन इत्यादि यात्रा करीत ब्रह्मावर्तास गेली, ती पाहून सर्वांची खात्री झाली कीं मराठ्यांचें राज्य संपलें. इंग्रजांच्या उदार अंतःकरणाची चोंहोंकडे तारीफ होऊं लागली. शरण आलेल्याचा सूड घेऊं नये या इंग्रजी नीतीचा लोकांचे मनावर विशेष परिणाम झाला. बाजीराव स्वाधीन झाला तेव्हां त्याजबरोबर ३ हजार पायदळ व २ हजार स्वार एवढी फौज होती. बाळोबा सलकाडे व रामचंद्रपंत सुभेदार हे त्याजबरोबर बिठूरला गेले. बाकीचे

लोक हळूहळू आपल्या घरीं चालते झाले. बरोबरची फौज कमी करण्याचा प्रथमच आग्रह धरून माल्कमनें मुद्दाम बाजीरावास दुखविलें नाहीं. पुढें त्या लोकांनीं पगाराकरितां गिल्ला केला, तेव्हां माल्कमची पायधरणी करून बाजीरावानें त्यांची समजूत काढिली: आणि नर्मदेवरून बहुतेकांस परत जाण्यास रजा दिली. नर्मदापार झाल्यावर सहाशें स्वार व दोनशें पायदळ इतकेच लोक त्याजबरोबर पुढें गेले.

बाजीरावाला अखेरपर्यंत चिकटून राहिलेला प्रमुख सरदार **विंचूरकर** होय. खंडेराव विठ्ठल ता. २४·४·१७९५ रोजीं मृत्यु पावल्यावर नरसिंह खंडेरावास जहागिरीचीं वस्त्रें मिळालीं.* तो ता. ३१·३·१८०८ रोजीं मरण पावला, तेव्हां त्याची बायको रमाबाई इनें पुढें दत्तक मुलगा घेतला त्याचें नांव विठ्ठल नरसिंह. तो लष्करी कवाईत शिकून चांगला तयार झाला व बाजीरावाचा सहायक बनला. दुसरा सरदार नीळकंठराव आबा पुरंदरे हाही त्याचा समवयस्क जोडीदार होता. रमाबाईनें हुशारीनें वागून त्या वेळच्या राष्ट्रकार्यांत चांगलें लक्ष घातलें. त्यांचा पिढीजाद कारभारी बाळाजी लक्ष्मण ऊर्फ बाळोबा तात्या सलकाडे, हा नानाफडणिसाचे तालमींतला गृहस्थ बाजीरावाचे अत्यंत उपयोगी पडला. काशीपंतबाबा जोगळेकर म्हणून दुसरा एक विंचूरकरांचा अधिकारी बाळोबा तात्याचे जोडीस असे. यजमानास बरोबर घेऊन स्वाऱ्या करण्याचें काम मुख्यतः बाळोबाच करी. खानदेशांतील भिल्लांचें बंड मोडण्याचे कामीं बाळोबा व मनोहरगीर गोसावी प्रमुख होते. त्रिंबकजीचीं मुलेंमाणसें पकडण्याचें काम बाळोबानें केलें. बाजीरावाचे पळांत विंचूरकर व बाळोबा अखेरपर्यंत त्याजबरोबर राहून इंग्रजांशीं लढले, त्यामुळें त्यांचें फार नुकसान झालें. त्यांचे पुष्कळ महाल बुंदेलखंडांत होते ते सिंद्यानें बळकाविले एल्फिन्स्टन मुंबईस गव्हर्नरीवर असतां विठ्ठलरावानें तेथें जाऊन त्याची गांठ घेतली आणि आपली विपन्न स्थिति त्यास कळविली. धन्याशीं बेइमानी न केल्यामुळें सर्वस्वास मुकलेलें असें हें विंचूरकरांचें घराणें आहे.

**१० त्रिंबकजी डेंगळ्याची अखेर व कौटुंबिक.**—बाजीराव स्वाधीन झाल्याबरोबर त्याचा मुख्य साथीदार रामदीन हाही क्षमेची याचना करून इंग्रजांस शरण गेला. हा पूर्वी होळकराचा मोठा सरदार होता हें मागें सांगितलेंच आहे. महिदपुरच्या लढाईनंतर मंदसोरचा तह झाल्यावर उरलेला जमाव घेऊन रामदीन

* यांच्या सरंजामासंबंधीं पे. द. सरंजामयादी नं. २२,२३,२४ चे कागद अवश्य ध्यानांत घेण्याजोगे आहेत.

दक्षिणेंत बाजीरावाकडे आला. दुसरा साथीदार त्रिंबकजी डेंगळे त्यानेंही पुढें स्वाधीन होण्याचें बोलणें जनरल डोव्हटनकडे सुरू केलें. 'जीवदानापलीकडे दुसरें कांहीं एक अभिवचन आम्ही तुम्हास देऊं शकत नाहीं' असा जबाब त्यास मिळाला, तो त्यानें मान्य केला नाहीं. म्हणून डोव्हटननें त्याजवर हल्ला केला तेव्हां तो पळून गेला आणि देशीं येऊन गुप्तपणें राहूं लागला. वणी दिंडोरीजवळ अहिरगांव येथें सन १८१८ च्या जुलै महिन्यांत एल्फिन्स्टननें त्यास पकडून बेड्या घालून कबिल्या-सुद्धां चांदवडचे ठाण्यांत आणून ठेविलें. त्याचा शिरच्छेद करणें क्रूरपणाचें कृत्य मानलें जाईल असें वाटून, इंग्रजांनीं त्यास चुनारगडचे किल्ल्यांत ठेविलें. तेथेंच तो मरेपर्यंत राहिला. त्याच्या मृत्यूची तारीख उपलब्ध नाहीं. त्रिंबकजीचा जोडीदार अन्याबा राहतेकर चांदवडचे किल्ल्यावर होता त्यासही पकडून कैदेंत ठेवण्यांत आलें. लहान-पणींच त्रिंबकजीचा बाप वारल्यामुळें त्याची आई मानाबाई हिच्यावरच कुटुंबाचा सर्व भार पडला. पुढें त्रिंबकजी नांव लौकिकास चढला, आणि अठरावर्षे अनेक यातना सोसून त्यानें बाजीरावाची सेवा एकनिष्ठपणें केली. त्रिंबकजीस आठ बायका होत्या. पैकीं चाळीस-गांव येथील देशमुख घराण्यांतील मुलीस एक मुलगा झाला, त्याचें नांव गणपतराव. गणपत-रावास जयवंतराव, पर्वतराव व बाबूराव असे तीन मुलगे होते. पैकीं पर्वतरावाचें नक्कल असून, जयवंतराव बाबासाहेब याचा वंश शिंगवें ता. कोपरगांव येथें नांदतो; व बाबूराव दादासाहेब याचा वंश निमगांव जाळी येथें पाटिलकी करून आहे. त्रिंबकजीची सून पुणें येथें शुक्रवारांत त्याचा वाडा होता, तेथें कांहीं वर्षांपूर्वी वारली. निंबगाव जाळीचा त्रिंबकजीचा वाडा जळाला, त्यांत त्याचे जुने कागद दग्ध झाले असें कळतें.

**निंबगांव जाळीचे पाटील**

**मल्हारजी डेंगळे**
**| =मानाबाई**
**कुसाजी त्रिंबकजी**
**मल्हार उ. बापूजी. गणपतराव**

बिशप हीबर नांवाचा विद्वान इंग्रज गृहस्थ स. १८२४–२५ सालीं हिंदुस्थानांत प्रवास करून परत गेला आणि त्यानें आपलें प्रवासवृत्त छापलें. प्रवासांत त्यानें ता. ११.९.१८२४ रोजीं चुनारगडावर त्रिंबकजी डेंगळ्याची भेट घेतली त्याचें वर्णन लिहिलें आहे तें असें. 'किल्ल्यांतील बंदिवानांच्या कोठडींत त्यास ठेवलेलें असून त्याजवर युरोपियन व एतद्देशीय अशा दोन्ही लोकांचा कडक पाहरा ठेवलेला होता.

निजण्याची खोली होती तिला सुद्धां लोखंडाच्या जाळीच्या खिडक्या होत्या. आंतल्या बाजूस बागेसारखी थोडी मोकळी जागा असून तेथें एक पिंपळाचें झाड व लहानसें देऊळ होतें. बागेंत त्यानें कांहीं फुलझाडें लाविलीं होतीं. बरोबर त्याचे चार चाकर नोकर होते. बाहेर जातांना व आंत येतांना त्यांचा कसोसीनें झाडा घेण्यांत येत असे. त्रिंबकजी लहानसा ठेंगू गृहस्थ असून चेहेऱ्यावरून चिडखोर दिसतो. अंगावर एक रेशीमकांठीं धोतर, अर्धें नेसलेलें व अर्धें गळ्यावरून टाकलेलें होतें. माझी त्याच्याशीं ओळख करून देण्यांत आली, तेव्हां त्यानें मला आंत नेऊन ती बाग व देऊळ दाखविलें; आणि थोडीं फुलें काढून मला दिलीं. मी म्हटलें, ' तुमच्या सारख्या सुप्रसिद्ध पुरुषाची भेट झाल्याबद्दल मला आनंद होतो. ' त्यावर तो किंचित् हसून बोलला ' ही भेट दुसऱ्या ठिकाणीं झाली असती तर मलाही आनंदच झाला असता. ' आज पांच वर्षें तो चुनारगडला आहे आणि आतां जन्मभर त्याला येथें राहवें लागेल हें उघड आहे. ' कंपनी सरकारानें मोठा दंड घेऊन मला सोडावें, आणि माझेकडून कांहीं सेवा घ्यावी; मीं बाजीरावाची चाकरी केली, त्याहूनही जास्त निष्ठेनें मी कंपनी सरकाराची नोकरी करून दाखवीन, असे अर्ज त्यानें वारंवार केले पण त्यांचा उपयोग झाला नाहीं, याचें कारण एल्फिन्स्टन साहेब होत. हेच गृहस्थ माझे परम दोस्त व परम शत्रु. त्यांनींच माझा जीव वांचविला, तेच माझ्या बायका मुलांची व घरादाराची अत्यंत काळजी घेतात; पण मला येथें कायमचें अडकवून ठेवणारही तेच.' असें त्रिंबकजी म्हणाला. एवढा शूर पुरुष असून त्यास लिहितां वाचतां येत नाहीं* हें आश्चर्य. भजनपूजनांत व नोकरांशीं गप्पा गोष्टी करण्यांत तो काल कंठीत आहे. नोकरांपासून पैन पैचा हिशेब घेण्यांत तो अत्यंत दक्ष आहे. एकदां स्वयंपाक्यानें तूप चोरलें त्याबद्दल त्यानें केवढा तरी गवगवा केला. '

---

* हें विधान मला खरें वाटत नाहीं. त्रिंबकजीचा पत्रव्यवहार विपुल आहे व त्याचें हस्ताक्षर बऱ्यापैकीं आहे. ( गो. स. स. )

# प्रकरण सतरावें.

## सातान्यास छत्रपतींचा पुनरुद्धार

**कुंकवा वांचुन कपाळ मंगळसूत्रा वांचुन गळा ।
तैसा सैन्य समुदाय उदाशित रंग दिसे वेगळा ॥
धर्म बुडाला अधर्म दुनिये मधिं आगळा ॥ चाल ॥
× × × कांहीं तर तोंड दिसेना जीव जगायाला ।
कोणास शरण जावें कोण हरि देईल खायाला ॥** प्रभाकर.

१ प्रतापसिंहाचें राज्यारोहण, चतुरसिंग भोसले.
२ प्रतापसिंह व बाजीराव यांचा पत्रव्यवहार, इंग्रजांकडील राजकारण.
३ पुण्याचे क्रान्तींत इंग्रजांचीं धोरणें व सातारचें राज्य.
४ सातान्यास छत्रपतीची स्थापना, ग्रँटडफ व बापू कान्हो फडणीस.
५ किल्ल्यांचा पाडाव, अव्वल इंग्रजी.

**१ प्रतापसिंहाचें राज्यारोहण चतुरसिंग भोसले.**—छत्रपति दुसरा शाहू वैशाख शु. ९ ता. ४-५-१८०८ रोजीं मृत्यु पावला. त्यापूर्वीच कार्तिकांत बाजीराव कार्तिकस्वामीचे यात्रेहून परत येत असतां माहुलीस आला. तेव्हां महाराजाचें दर्शन घेऊन निखालसता करावी असें मनांत आणून " महाराजांस सांगून पाठविलें. तेव्हां महाराजांनीं शरीर प्रकृति नीट नाहीं, आमचे भेटीचें कारण नाहीं असें सांगून त्रिवर्ग पुत्र व माईसाहेब माहुलीस प्रधानांचे भेटीस रवाना केली. त्यांनीं सामोरें जाऊन नजर मेजवानी केली. अधिक खर्चाचा बंदोबस्त करून दिला. " पुढें महाराज मरण पावतांच दहन किल्ल्यावर करावें, माहुलीस नेऊं नये असें कारभारी बोलले. त्यावरून प्रतापसिंह व बाईसाहेब यांनीं त्रागा करून माहुलीस नेऊन दहनविधि केला. तेरावे दिवशीं प्रतापसिंहास राज्याभिषेक करून नांव आपला शिक्का फिरेल सबब तीर्थरूपाचेंच शाहू असें ठेविलें.* सातारचा बंदोबस्त त्रिंबकजी डेंगळे याजला सांगितला. त्याचे तर्फेनें काशीपंत बंदरे राहिले. समारंभासाठीं पंतप्रधान वाईस जाऊन

* धा. शा. च.; पे. अ. पृ. १४४; रु. १ शेडगाव बखर; ऐ. स्फु. ले. बापू कान्हो आत्मचरित्र; मोडक कोल्हा० इ०; खरे इत्यादि.

राहिले, व पोईचे माळावर भेटी झाल्या. चार दिवसांनीं लग्न केलें. मोहित्यांची कन्या करून नांव अंबिकाबाई ठेविलें. चिंतोपंत देशमुखास महाराजांकडे पाठवून श्रीमंतांनीं आपल्यास प्रधानकीचीं वस्त्रें आणवून तीं वाई येथें गंगापुरचे वाड्यांत समारंभें करून घेतलीं. ''

शाहूचा सहोदर चतुरसिंग यानेंच बाजीरावाच्या अमदानींत छत्रपतिप्रकरणांत विशेष पुढाकार घेतला असल्यामुळें त्याचें चारित्र स्वतंत्रपणें सांगणें जरूर आहे. त्यावरून मराठ्यांचें एकंदर राजकारण सुस्पष्ट होऊन तदनुषंगानें छत्रपतींच्या घराण्याचे कौटुंबिक तपशीलही कळून येतील.

**चतुरसिंग,**—चतरसिंग ( छत्रसिंह ? ) राजे भोसले हा मालोजी व विठोजी या सुप्रसिद्ध भोसले बंधूंपैकीं विठोजीचा वंशज होय. विठोजीच्या आठ मुलांपैकीं नागोजी म्हणून एक होता, त्या नागोजीचा मुलगा रावजी उर्फ काकाजी हा वावी येथें राहूं लागला. काकाजीचा नातू त्रिंबकजी यास तीन मुलगे झाले,—विठोजी, परशुराम, आणि चतुरसिंग. पैकीं वडील विठोजी हा सातारकर छत्रपति रामराजा यास इ० सन १७७७ त दत्तक होऊन धाकटा शाहू या नांवानें साताऱ्यास सिंहासनारूढ झाला, तेव्हां त्याजबरोबर चतुरसिंगही तेथेंच राहूं लागला. मधला परशुराम याचा वंश हल्लीं वावीस नांदत आहे.+ या तिघां बंधूंचा वयोनिर्देश आढळून येत नाहीं. धाकटा शाहू इ० सन १८०८ सालीं सुमारें ४५ वर्षें वयाचा असतां वारला, हें वय बरोबर धरल्यास त्याचा जन्म इ० सन १७६३चा ठरून दत्तविधानप्रसंगीं तो १५ वर्षांचा असेल; आणि चतुरसिंग बहुधा त्याहून आठदहा वर्षें लहान असावा. या बंधूंच्या कर्तबगारीचा अंदाज करण्यासही फारसें साधन नाहीं. शाहू अगदींच निर्बुद्ध नव्हता. तो शरीरानें भक्कम सुदृढ व सशक्त होता. त्याची बुद्धि चमकण्यास लागणारें स्वातंत्र्य व क्षेत्र त्यास कधीं मिळालें नाहीं. साताऱ्च्या किल्ल्यावर अटकेदाखल त्याचें जीवित खर्च झालें. पुण्यास राज्याचा कारभार सुरळीत चालला होता तोंपर्यंत पेशव्यांच्या विरुद्ध उठण्याची उचल त्याच्या मनानें कधीं घेतली नाहीं. सवाई माधवरावाच्या मुंजीस व लग्नप्रसंगीं दोन वेळां पुण्यास जाऊन समारंभांत मनापासून सामील होण्याचें सौजन्य त्यानें दाखविलें. त्या पेशव्याच्या मृत्यूनंतर पुण्यास वारंवार नवीन बनाव सुरू होऊन मुलुखांत बेबंदशाही

---

+ जनकपिता त्रिंबकजी वृद्धावस्थेंत मुलांचे पश्चात् प्रतापसिंग राज्य करीत असतां साताऱ्यास मरण पावला. परशराम प्रतापसिंहाबरोबर काशीस होता.

माजत चालली, तेव्हां शाहूच्या मनांत मराठी राज्याच्या भवितव्यतेचे विचार घोळूं लागले शाहूची चवथी बायको शिर्के यांजकडील आनंदीबाई बरीच कर्तबगार असावी. इचें लग्न ता. २५-३-१७८६ रोजीं झालें. तिला माईसाहेब म्हणत. नवऱ्याचे पश्चात् प्रतापसिंह लहान असतां साताऱ्याचा कारभार तिनें दक्षतेनें चालविला. एल्फिन्स्टननें तिची प्रशंसा केली आहे. एक इंग्रज प्रवासी लिहितो, ' ही बाई घोड्यावर बसण्यांत फार प्रवीण होती. मुळच्याच सौंदर्यास तिचा भरजरी पोशाख चांगला खुलून दिसे. ती पडद्यांतून उघडपणें बाहेर येऊन भेटी घेई त्या वेळीं तिचा बोलका व प्रेमळ स्वभाव सहज निदर्शनास येई. हिंदु स्त्रियांचे अंगीं सामान्यतः भित्रेपणा असतो तो तिच्या ठिकाणीं मुळींच नव्हता. व्यवहारचातुर्य व प्रसंगावधान या गुणांच्या योगानें तिची कर्तबगारी विशेष झळकत असे. '

माईसाहेबाच्या पोटीं शाहूला तीन पुत्र झाले, प्रतापसिंग बुवासाहेब, रामचंद्र भाऊसाहेब व शहाजी आपासाहेब. प्रतापसिंहाचा जन्म ता. १८·१·१७९३ रोजीं झाला, म्हणजे इ० सन १८०८ त राज्यारोहणप्रसंगीं तो अवघा पंधरा वर्षांचा होता. दुसरा मुलगा भाऊसाहेब सन १७९५ त जन्मला आणि सत्तावीस वर्षांचा होऊन ता. २१·१·१८२१ रोजीं मरण पावला. मागाहून एक वर्षानें त्याची आई माईसाहेब यात्रेस गेली असतां भीमातीरीं वारली. सर्वांत धाकटा आपासाहेब याचा जन्म१८०५ चा असून तो पुढें गादीवर येऊन इ० सन १८४८ सालीं वारल्यावर सातारचें राज्य खालसा झालें. शाहूची पहिली बायको लक्ष्मीबाई ही नारायणजी मोहिते याची कन्या. इचीच बहीण बबईसाहेब शाहूनें बंधु चतुरसिंगास करून ता.२६·११·१७८९ रोजीं त्याचें लग्न साताऱ्यास केलें. या बबईसाहेबाच्या पोटीं चतुरसिंगास पुढें ता. १८·७·१७९८ रोजीं मुलगा झाला त्याचें नांव बळवंतराव प्रतापसिंगानें या बळवंतरावास पुढें आपला सेनापति नेमिलें, त्यावरून तो बळवंतराव सेनापति या नांवानें प्रसिद्ध आहे. माईसाहेबाचा भाऊ खंडेराव मामा शिर्के यास सरलष्कर म्हणत चतुरसिंगाच्या उद्योगांत हा शिर्के त्याजबरोबर होता. पुढील हकीकती कळण्यास छत्रपतींच्या कुटुंबाची ही माहिती ध्यानांत ठेवणें जरूर आहे.

पूर्वीच्या पेशव्यांपेक्षां नाना फडणिसानें छत्रपतींचा कोंडमारा विशेषच केला. " त्यांचे खर्चाचे ऐवज परभारें येणें तें कशास पाहिजे, जो ऐवज देणें तो पुण्याहून नक्त पाठवावा, कारखाने व कारखानदार यांचा खर्च पांचसहा लक्ष रुपयांचा ऐवज पोंचत होता, त्यास लाख रुपयांत खर्च आटपतों म्हणून पागा, हत्ती सर्व पुण्यास

आणिले. देशमुखी व खासगी गांव यांचे ऐवज पुण्यांतच घेऊं लागले. महाराजांची अमर्यादा करून चौकी पहारा ठेवून, राजमंडळाचे लोक कोणी जाऊं नये ऐसें केलें. चाकरीच्या बायका दोनचार व लेकावळे दोनचार खेरीज करून सर्वांच्या अडेश्री बंद केल्या. राजपत्रें, कागदपत्र होणें याचें कांहीं एक कारण नाहीं. याप्रमाणें बंदोबस्त केला. "

अशा या साताऱ्याच्या वातावरणांत चतुरसिंग लहानाचा मोठा झाला. सुप्रसिद्ध प्रतापराव गुजराचा नातू रघुनाथराव* गुजर हाही त्याजबरोबर पुढील सर्व संकटांत सारखा हजर असून त्याचें साह्य करीत असे. छत्रपतींची हीन स्थिति चतुरसिंगास खुद्द शाहूपेक्षां जास्त दुःसह वाटूं लागली, आणि अहोरात्र त्याच त्या विषयाची चर्चा सातारकर मंडळींत चालून त्याच्या निराकरणाचे उपाय या तरुण मंडळींच्या मनांत घोळत असतां, पुण्यास सवाई माधवरावाचा अंत होऊन पुढें पेशवाईसंबंधानें घोटाळे उत्पन्न झाले, आणि भानगडी सुरू झाल्या त्यांच्या योगानें पेशव्यांविरुद्ध उठण्यास सातारकर राजमंडळास पाहिजे असलेली संधि आली, पण तींत बाजीरावानें छत्रपतींचा पाडाव केला. तरी शाहू छत्रपतींची सर्व भिस्त चतुरसिंगावर होती. तो हुशार, धाडसी व कल्पक होता. तोच छत्रपतीच्या गादीस मालक झाला असता तर राज्याची नवीन घडी बसवूं शकला असता असें वाटल्याशिवाय राहत नाहीं.

**प्रतापराव गुजर**
- **खंडेराव**
- **जगजीवन**
  - **रघुनाथराव**
    - **यशवंतराव**

मराठशाहीच्या त्या पडत्या काळांत चतुरसिंगाच्या उद्योगास बंडखोरीचें स्वरूप यावें हा दैवदुर्विपाक होय. त्याच्या हालचालींची भरपूर माहिती सुद्धां आज आप-

* रघुनाथराव गुजराचा मुलगा यशवंतराव यास प्रतापसिंगानें आपली मुलगी गोजराबाई दिली. ता. ७·१०·१८२९ रोजीं रघुनाथरावास प्रतापसिंग लिहितो, 'तुम्ही राज्यांतील पुरातन सेवक, एकनिष्ठपणें सेवा करीत आलां. ती० आबासाहेबांचे आज्ञेवरून चतुरसिंग यांजसमागमें राजकारणाबद्दल अवल अखेर स्वदेशीं व हिंदुस्थानांत सेवा करून श्रमसाहस बहुत केलेत, त्यामुळें पेशव्यांनीं तुम्हांस कैदेंत ठेविलें. तेथून पेशवाई अखेरीस मुक्त होऊन हल्लीं स्वामीपाशीं निष्ठेनें सेवा करीत आहां.' जुनीं शिवकालीन घराणीं मागें पडलीं त्याचें हें उदाहरण आहे.

णास उपलब्ध नाहीं. ब्राह्मण, प्रभु, मराठे वगैरे सर्व जातींचे जिवास जीव देणारे साहाय्यक त्यानें जवळ पैदा केले. सातारा व करवीर येथील राजमंडळें आणि त्या बाजूचे लहानमोठे लोक त्याचें साह्य करून यश चिंतीत होते. व्यासराव गोपाळ डबीर, बापू कान्हो फडणीस, मल्हार रामराव चिटणीस, मुंगीकर मालोजी राजे, भवानजी राजे शिर्के, रघुनाथराव गुजर वगैरे समस्त गुजर मंडळी या चतुरसिंगाबरोबर रानोमाळ फिरून कष्ट करूं लागली. चतुरसिंगाची समजूत घालून त्यास सरदारी देण्याचा प्रयत्न पुण्यास सर्जेराव घाटग्यानें पुष्कळ केला मुद्दाम त्यास सर्जेरावानें सन १८०१ सालीं पुण्यास आणून बाजीरावास व दौलतरावास भेटविलें. त्या सालच्या पावसाळ्यांत चार महिने चतुरसिंगाचा मुक्काम पुण्यास होता. परंतु तेथें बाजीरावाच्या उच्छृंखळ वर्तनाचा त्याला वीट येऊन दसऱ्याचे सुमारास चतुरसिंग पुणें सोडून विजापुराकडे गेला. त्याजबरोबर हजार पांचशेंचा जमाव नेहमीं असे. त्यापुढील सालीं यशवंतराव होळकरानें पुण्यावर चाल केली, तेव्हां बाजाराव पळून वसईस इंग्रजांकडे गेला; आणि इंग्रजांची मदत आणून पुनरपि पेशवाईवर दाखल झाला, हें पाहून सातारच्या राजमंडळाची मनःस्थिति तोंड दाबून बुक्क्यांचा मार द्यावा तशी झाली. तेव्हां बिलकूल वेळ न गमावतां चतुरसिंग सिंदेभोसले वगैरे सरदारांस भेटण्यासाठीं सन १८०३ च्या उन्हाळ्यांत साताऱ्याहून निघाला. त्यानें आपली स्त्री व मुलगा यांस महाराजांचे हवालीं करून, 'सेवा करून यश मिळवून परत येऊं अगर मरून जाऊं', असें सांगून छत्रपतींचा निरोप घेतला. सिंद्याचा मुक्काम बऱ्हाणपुराकडे होता. तिकडे जातांना वाटेंत चतुरसिंगानें सिंदखेड येथें पुण्यशील जिजाबाईच्या वंशांतील प्रतिष्ठित जाधव सरदार जगदेवराव याची गांठ घेऊन त्याजबरोबर एकंदर परिस्थितीचा विचार केला. तेथून पुढें अजिंठ्याचे घाटांत चतुरसिंगानें जाऊन दौलतराव व सर्जेराव घाटगे यांची भेट घेतली. ही भेट ता. १०·८·१८०३ रोजीं झाली. दौलतराव आपण होऊन चतुरसिंगाचे डेऱ्यास जाऊन मोठ्या सन्मानानें भेटला. आदलेच दिवशीं इंग्रजांनीं सिंद्यावर युद्ध पुकारलें होतें. आसईआडगांव वगैरे लढायांत प्रत्यक्ष भाग घेऊन इंग्रजांचा पाडाव करण्याची चतुरसिंगानें शिकस्त केली. परंतु कालचक्र फिरलेलें होतें. सर्वच दिङ्मूढ होऊन पराभव पावले. युद्ध थांबून पराभव झाल्यावर एकंदर घडामोडींचा प्रकाश सर्वत्र स्पष्ट दिसूं लागला. मोठमोठ्या सरदारांचा पाडाव झालेला पाहून सातारा करवीर प्रांतांतील लहान मोठ्या जुन्या घरंदाज पुरुषांच्या अंगाचा तीळपापड झाला. हे पेशवे आपण तर सर्वस्वी बुडतात आणि

आपल्या बरोबर सगळ्या राज्याची वाट लावतात असें त्यांस वाटलें. सिंद–होळकरांच्या पदरीं मोठमोठ्या फौजा असतां त्यांनीं आपसांत लढून मरावें आणि अल्पसंख्यांक इंग्रजांनीं त्यांना सहज चीत करावें, हा देखावा कोणाचेंही हृदय फाडणारा होता. हा लोकांच्या मनांतील त्वेष चतुरसिंगाचे द्वारें मूर्तिमंत बाहेर पडून तो मराठी राज्य बचावण्याचे उद्योगास प्रवृत्त झाला. या प्रयत्नांस त्यास यश आलें नाहीं म्हणून तो आतां स्मरणांतूनही लुप्तप्राय झाला आहे.

युद्धाचा भडका थोडा शांत झाल्याबरोबर चतुरसिंग नागपुरास रघूजी भोसल्याकडे गेला. रघूजीनें त्याची महत्त्वाकांक्षा समजून घेऊन त्यास सन्मानानें जवळ ठेवून घेतलें, आणि दरमहा पंधरा हजार रुपयांची नेमणूक करून दिली. तेथें तो दहा महिने राहिला. त्या वेळीं दौलतराव सिंदे सागराकडे होता, तेथून त्यानें नागपुरास माणसें पाठवून चतुरसिंगास आपल्याजवळ बोलावलें. तेव्हां नागपुरची दोन हजार फौज घेऊन चतुरसिंग निघाला, तो जबलपुर–सागरवरून पुढें जाऊन चंबळ नदीचे कांठीं दौलतराव शिंदे व यशवंतराव होळकर यांचा मुक्काम एकत्र असतां सन १८०५ चे वैशाखांत त्यांजवळ दाखल झाला. त्या वेळीं अमीरखान, करीमखान वगैरे पेंढारी व इतर सरदार पुढील विचाराकरितां तेथें जमले होते. सिंदे होळकरांनीं चतुरसिंगाचे गोटास जाऊन सन्मानानें त्याची गांठ घेतली. सर्वांचीं मोकळेपणानें पुष्कळ बोलणीं झालीं. सर्जेराव घाटगेही त्या वाटाघाटींत होताच. त्यास चतुरसिंगानें, छत्रपतीस सोडविण्यासंबंधीं तुम्हीं पूर्वीं करार काय केले आणि पुढें कृति काय झाली, वगैरे बोलून चांगलें फजित केलें. नंतर पुढील उद्योगासाठीं यशवंतराव होळकर, सर्जेराव व चतुरसिंग अजमिरास गेले. यशवंतरावाच्या धाडसी वृत्तीमुळें त्याजबद्दल चतुरसिंगास मोठा आदर उत्पन्न झाला होता. इंग्रज सेनापति लॉर्ड लेक त्या वेळीं दिल्लीकडे होता. त्याजकडे आपले वकील चतुरसिंगानें पाठविले; आणि मागाहून भरतपुरास जाटाची गांठ घेऊन आपण स्वतः दिल्लीस गेला. तेथें लेक व माल्कम यांची त्यानें भेट घेतली. या प्रसंगीं इंग्रजांकडून सरदारी मिळविण्याची मोठी संधि चतुरसिंगास होती; पण स्वार्थापेक्षां राज्यसंरक्षणाचाच हव्यास त्यास लागलेला असल्यामुळें त्यानें त्या भावानें इंग्रजांकडे बोलणें काढलेंच नाहीं. दिल्लीहून चतुरसिंग परत सन १८०६ च्या जुलईंत यशवंतराव होळकराकडे पुष्करास आला. तेथें जोधपुरकर राजा मानसिंग यानें त्याची मुद्दाम भेट घेतली. तेथून डिसेंबरांत चतुरसिंग जयपुरास गेला. जयपुरच्या जगत्सिंगानें मोठ्या प्रेमानें त्याचा सत्कार केला. तेथें असतां उदेपुरच्या राण्यानें

आपल्याकडे येण्याविषयीं चतुरसिंगाकडे वकील पाठविले. परंतु अशा रीतीनें फिरत राहण्यांत आपला मुख्य उद्देश दुरावतो असें वाटून तो परत फिरला, तों बडोद्याचा कान्होजी गायकवाड त्याच्याच सारखा भटकत होता, त्याची गांठ पडून ते दोघे मंदसोर येथें आले. तेथून उज्जनीस आल्यावर चतुरसिंगास बातमी कळली, कीं सातारा येथें बंधु शाहू छत्रपतीस कैलासवास जाला, आणि आपली स्त्री व पुत्र बाळासाहेब यांस बाजीरावानें कैदेंत ठेविलें. या बातमीनें त्याचा सर्व धीर खचला. ज्याच्या जिवावर आपण एवढा वनवास पत्करला तो छत्रपति गेल्यानें त्याचा आधारच तुटला. अशा स्थिततींत पुन यशवंतरावाचे भेटीसाठीं जानेवारी स. १८०९ त तो परत गेला असतां त्यास वेड लागलेलें पाहून चतुरसिंगाची अत्यंत निराशा झाली. आपल्या राष्ट्राचा तरणोपाय आतां बिलकूल राहिला नाहीं असें वाटून चतुरसिंग अत्यंत विव्हळ झाला. इकडे बाजीरावानें प्रतापसिंग महाराजास छतपति करून त्याची मर्जी प्रसन्न करून घेतली हेंही वर्तमान मागून आलें, तेव्हां आतां सातार्‍यास गेल्यानें आपली तेथें कशी शोभा होते याचीही चिंता चतुरसिंगास मोठी लागली. बापू कान्हो, व्यासराव डबीर, मल्हारराव चिटणीस वगैरे सर्व साथीदार त्याच्या बरोबरच प्रवासांत फिरत होते. सर्वांच्या विचारास आलें कीं, आजपर्यंत पुष्कळ फिरलों, पण कांहीं उपाय चालला नाहीं, तेव्हां कांहीं होईल तो इलाज देशीं जाऊनच करावा असें ठरवून, सर्व मंडळी सन १८०९ च्या जुलईंत उज्जनी सोडून धारेस. आली. धारेस त्या वेळीं मोठी धामधूम चालू असल्यानें तेथें चतुरसिंगाचीं दोन वर्षें गेलीं. त्या अवधींत सातारचे बंदोबस्तास बाजीरावानें त्रिंबकजी डेंगळ्यास नेमिलें होतें. त्या त्रिंबकजीनें चतुरसिंगाकडे माणसें पाठवून अगत्यानें त्यास सातार्‍यास बोलाविलें, आणि अभिवचन दिलें कीं, बाजीरावाचे मनांत तुमचा सर्व बंदोबस्त चांगला करून द्यावा असें आहे. या विनंतीस मान देऊन चतुरसिंग धारेहून गुजरातेंत उतरून इ. सन १८१० च्या श्रावणांत बडोद्यास आला. तेथें गंगाधरशास्त्री याची गांठ घेऊन मराठी राज्यसंरक्षणास बडोद्याहून कितीसें साह्य होईल याचा अंदाज त्यानें काढिला. गंगाधर शास्त्र्यानें त्यास कळविलें कीं, बडोद्यांत इंग्रजांचे इतल्याशिवाय पान सुद्धां हालत नाहीं, येथें तुमची दाद बिलकूल लागणार नाहीं. असा प्रकार पाहून आणि त्रिंबकजी डेंगळे खानदेशांत आला होता त्याजकडून पुनरपि अगत्यवादाचीं बोलावणीं आल्यावरून, चतुरसिंग बडोद्याहून निघाला तो सोनगडचे वाटेनें खानदेशांत आला. त्या वेळीं त्रिंबकजी मालेगांवास होता. तेथें बेलभंडार

इमान होऊन ता. १०·२·१८११ रोजीं भेटीचा दिवस मुकर झाला. गिरणेच्या काठीं उत्तरेस चतुरसिंगाचा मुक्काम असून दक्षिणेस त्रिंबकजीचा तळ होता. मेजवानीखर्चास ऐवज, शाखभाजी व फर्मास त्रिंबकजीनें पाठविला. सहा घटका रात्रीस गोटाबाहेर खलबताची बैठक केली. तेथें चतुरसिंग राजे, रघुनाथराव गुजर, बापू फडणीस व अप्पाजीराव इंगळे हे चार असामी व गोपाळराव न्यायाधीश, आपाभट पुणेतांबेकर व त्याचे दोन बंधू, बाबाजी केशव पाडलीकर, लाडेखान जमादार व हवालदार खिजमतगार वगैरे एकंदर अकरा असामींस एकाएकीं घेरा घालून दगा केला. त्रिंबकजी तर समक्ष आलाच नाहीं. मालेगांवचे किल्ल्यांत नेऊन कैदेंत ठेविले. गोठ लुटून साफ नेला. नंतर वैशाखमासीं ( मे १८११ ) बाजीराव नाशकास आला असतां, तेथें या मंडळीस त्रिंबकजीनें बंदोबस्तानें नेलें. लगेच बाजीरावानें चतुरसिंगास बेड्या घालून रायगडावर रवाना केलें; आणि बरोबरच्या दहावीस मंडळींस निरनिराळ्या किल्ल्यांवर बंदोबस्तांत पाठवून कैदेंत ठेविलें. कैदेंत असतांच चतुरसिंग रायगडनजीकच्या कांगोरी किल्ल्यावर ता. १५·४·१८१८ रोजी मरण पावला. अशा रीतीनें छत्रपतीच्या वंशांतील या अप्रसिद्ध व्यक्तीचा शेवट शोकपर्यवसायी झाला. चतुरसिंगाच्या अस्थी इंग्रज सरकारांतून बाळाजीपंत नातूच्या विद्यमानें वाईस आल्या; तेथून त्या साताऱ्यास आल्यानंतर उत्तरकार्य झालें. चतुरसिंगाचे पश्चात् त्याचा पुत्र बळवंतराव सेनापति यानेंही प्रतापसिंहाच्या सेवेंत आपला देह खर्चिला. ‘ उभयतां बापलेकांनीं एकनिष्ठपणें छत्रपतींची सेवा मारुतीसारखी केली. चतुरसिंगानीं राज्यासाटीं कष्ट मेहनत करून लढाया फार केल्या. प्राणानिशीं खर्च झाले. या पितापुत्र भोसल्यांनीं चाकरी करून निमक आदा केलें, आपलें इनाम कायम राखिलें, आणि आपली अन्नाची क्रिया जतन केली. असे दुसरे कोणी कामास आले नाहींत. ’ बळवंतराव सेनापतींचेंही चरित्र असेंच हृदयद्रावक आहे.

चतुरसिंगासारखे किती तरी पुरुष राष्ट्राकरितां देह कष्टवून झिजले असतील. ज्यांना यश मिळतें, त्यांचा तेवढा बोलबाला होतो. यशवंतराव व विठोजी होळकर, अमीरखान, सर्जेराव घाटगे, धोंडजी वाघ, चतुरसिंग वगैरे बहुत पुरुषांची कर्तबगारी राष्ट्राचे उपयोगास न येतां वायां गेली, हा विचार मनांत येऊन अत्यंत उद्वेग वाटतो. ‘ योजकस्तत्र दुर्लभः ’ या नियमास अनुसरून राष्ट्रांतील समुचित कर्तबगारी उपयोगांत आणणारा एखादा कल्पक नेता मराठी राज्याच्या उत्तरावस्थेंत त्यास लाभला नाहीं, हेंच त्याच्या नाशाचें आद्य कारण होय.

चतुरसिंगाचा वर वर्णिलेला पंधरा वर्षांचा प्रचंड उद्योग अनेक दृष्टींनीं बोधप्रद वाटेल. कितीही संकटें आलीं तरी इंग्रजांकडे तोंड वेंगाडून राष्ट्रद्रोहाचें पातक त्यानें जोडलें नाहीं. त्याच्यापेक्षां जास्त सामर्थ्याचे सरदार इंग्रजांमार्फत आपली व्यवस्था लावून घेण्यांत किती दंग होते ही गोष्ट त्याचे जोडीस ध्यानांत आणावी. 'छत्रपती स्वामींची सेवा करून कीर्ति संपादावी अथवा स्वामिकार्यावर मरून जावें, हा मनाचा निर्धार त्यानें अखेरपर्यंत कायम ठेविला. उदेपुरास असतां त्यानें तेथील राण्याशीं भोसल्यांचा संबंध जोडणाऱ्या वंशावळी पैदा करून आणिल्या, त्यांचा उपयोग पुढें प्रतापसिंहानें केला.

**चतुरसिंग गोसावी.**—चतुरसिंग भोसले कांगोरीच्या किल्ल्यावर कैदेंत असतां त्यास सोडविण्याचे कित्येक प्रयत्न झाले. चतुरसिंग नांवाचा एक गोसावी होता त्यानें कांहीं रामोशी जमा केले आणि चतुरसिंग भोसले कैदेंतून पळाला अशी बातमी उठवून तो मुलखांत दंगा करूं लागला; आणि प्रचितगड वसंतगड वगैरे किल्ले हस्तगत करून असा घाट रचिला, कीं बाजीरावास काढून छत्रपतींचे नांवाखालीं मराठमंडळ जमवून पुनः राज्याची नवीन व्यवस्था करावी. परंतु बापू गोखल्यानें हा बंडावा मोडिला. प्रतापसिंहाचे राज्यारोहण प्रसंगींच चतुरसिंग भोसले कांगोरीवर ता० १२·४·१८१८ रोजीं मरण पावला. त्यानंतर चतुरसिंग गोसाव्याकडून इंग्रजांनीं प्रचितगड किल्ला घेतला.

**२ प्रतापसिंह बाजीरावांचा पत्रव्यवहार, इंग्रजांकडील राजकारण.** शाहूपासून पेशवाईची वस्त्रें घेतांना बाजीरावानें खालील मधुर पत्र त्यास लिहिलें. 'खावंदांनीं कृपाकरून पेशवाईचीं वस्त्रें पाठविलीं त्यांचा अत्यादरें यथाज्ञानें स्वीकार केला. सर्व प्रकारें मी स्वामीचा सेवक आहें. माझा अभिमान हातीं धरल्याचा स्वामीस असावा, आणि मला आधार स्वामीचे पायांचा आहे. खावंदांशिवाय सेवकजनास दुसरा आधार नाहीं. त्राता स्वामी आहेत. दोन्ही हस्तक तिसरा मस्तक स्वामींचे पायांवर ठेविला आहे. याची लज्जा स्वामीस असो.' (३१·१२·१७९६). ही भाषा बाजीरावानें किती खरी केली तें इतिहास सांगतोच.

पुढें ता. १६·५·१८०८ रोजीं प्रतापसिंहास वयाचे सोळावे वर्षीं राज्याभिषेक झाला, त्या वेळीं बाजीरावानें 'आपला शिक्का फिरेल सबब त्यास शाहू हेंच तीर्थरूपाचें नांव ठेविलें. हें चाली खेरीज झालें असें लोक म्हणूं लागले. राज्याभिषेक करावयाच्या

पूर्वी त्यांची मुंज करण्याची चाल शिवाजी महाराजापासून होती ती श्रीमंतांनीं या वेळेस मना करून मुंज केल्याशिवाय राज्याभिषेक करविला.' बाजीरावाचें हें कृत्य अत्यंत असमंजस असून त्यामुळें प्रतापसिंगाचा व हिंदुसमाजाचा पुढें घात झाला. प्रतापसिंहाचें वय लहान असल्यामुळें आरंभीं कांहीं वर्षें त्याचा कारभार मातुश्री माईसाहेब पाहत असे. माईसाहेब व बाजीराव यांचा बराच पत्रव्यवहार* उपलब्ध झाला आहे, त्यावरून प्रथम कांहीं काळ उभयतांमध्यें चांगला लोभ होता असें दिसतें. ता. १·५·१८०८ चें प्रतापसिंहाचें बाजीरावास पत्र गेलें तें असें. " भेटीस बहुत दिवस झाले. भेट व्हावी अशी इच्छा. त्याचा योग सत्वर घडावा आणि किती अवकाशें भेट होईल तें कळवावें. आमचा सर्व भार तुमच्यावर आहे. " त्यानंतर ता. २·१·१८०९ रोजीं माईसाहिब बाजीरावास लिहते. " लग्नाच्या तिथीचा निश्चय लिहून पाठवावयाचा, त्यास त्रिंबकजी डेंगळा यास पाठवून द्यावा, म्हणून पेशजी आज्ञापत्र पाठविलें, परंतु मशारनिल्हे आले नाहींत. तरी त्यांस सरंजामसुद्धां पाठवून द्यावें. मुलाचे व नवरी-मुलीचे दागिने येथें नाहींत, त्यांची तरतूद झाली पाहिजे. मंडपाचें सामान व नवरे मुलीस आणावयास पालख्या व घोडीं सत्वर पाठवावीं. " त्यानंतर ता. १३·१·१८०९ चें पत्र. " खाशा पालख्या वगैरे सरंजाम पाठविला तो प्रविष्ट झाला. त्रिंबकजी डेंगळा येथें आल्या नंतर शनिवारीं चि. बाबा ( प्रतापसिंह ) व आप्पा ( शहाजी ) यांस घेऊन शहरांतील वाड्यांत राहिलों आहोंत. चि. भाऊ ( रामचंद्र ) किल्ल्यावर आहे. चि. बाबाची स्वारी खालीं येते समयीं अंबारींत बसली होती. खवासखान्यांत बसावयास त्रिंबकजी डेंगळा यास आज्ञा केली. त्यानें अपेक्षा घेतली, कीं रायांचे परवानगी शिवाय बसणार नाहीं. मग खंडेराव शिरके यांस बसविलें." ता. ३१·१·१८०९ चें पत्र. " आप्पाचे लग्नाबद्दल लिहिलें, त्यास आप्पाजोगती लहान मुलगी पाहण्यांत नाहीं. पुढें करावयास येईल चि. बाबा याचें दुसरें लग्न करावयाचें त्यास साताऱ्यांत भिकाजी शिरके यांची नात दहा वर्षांची चांगली स्वरूपवंत पाहण्यांत आली आहे. त्रिंबकजी डेंगळा यानेंही पाहिली. त्यास करावयाचा बेत असल्यास वैशाखमासीं घडावें. पत्राचें उत्तर पाठविणें म्हणजे ठरावांत आणावयास येईल." ता० १·२·१८०९ चें पत्र. श्रीनरसोबाची अर्चा करावयाची त्यास ४०० चारशें रुपये पर्यंत लागतील, त्याचा बंदोबस्त करून पाठविणें. " ता० १६·३·१८०९ चें पत्र, " श्री० महाराज मातुश्री यानीं समस्त राजकार्य धुरंधर विश्वासनिधि बाजीराव पंडित प्रधान यांसी

* रा. बा. वि. जोशी यांजकडून; पे. अ.; भा. व. १ प. या. ले. १६, ३२, ३५.

आज्ञा केली ऐसीजे. तुम्ही कोपरगावांस गेल्यापासून पत्र आलें नाहीं तरी वरचेवर पत्र पाठवून खुशाल अर्थ कळवीत जाणें. आम्हां विषयीं कोणे गोष्टीचा संशय मनांत न यावा. कोणीं कांहीं समजावल्यास समक्ष गांठ पडोन संशय निवृत्त होत असावा. चित्तांत संशय धरूं नये. भेट व्हावी हा मानस आहे तरी याचा योग कधीं घडेल त्याची सूचना लिहून पाठवावी. आमचा सर्व भार तुम्हांवर आहे तुम्हीं पेशजी सातारियाचे मुक्कामास येऊन गौरव करून मर्जीचा संतोष केला त्याचें स्मरण वारंवार येतें तें पत्रीं कोठवर लिहावें! आम्हास जोड राव तुमचीच आहे. त्यास मनोमन साक्ष आहे. भेटी अंतीं सर्व सविस्तर कळून येईल. जाणीजे. छ २९ मोहरम तिसा मया तैन व आलफ. बहुत लिहणें तरी सुज्ञ असा.' ता. १०·६·१८०९ चें माईसाहेबाचें पत्र, "पेशजी तुम्हांकडील खिजमतगार चार आसामी तेथें होत्या. त्या चांगल्या साळसूद येथें राहण्याजोग्या होत्या. तरी त्या अगर दुसऱ्या येथून हुजरे आले आहेत त्यांजबरोबर सत्वर पाठवून देणें.' ता. २५·७·१८०९ चें पत्र. "तुम्ही गेल्या पासून वर्तमान कळत नाहीं, याज करितां सदोबाची रवानगी केली आहे ते बोलतील. अलपिस्टनसाहेब पुण्यास गेले, त्यांचा समाचार व खुषी बहुत तऱ्हेनें करून उत्तर पाठवावें." ता. ३०·९·१८०९ चें पत्र, "पेशजी तुम्ही विठ्ठ जगन्नाथ याजबरोबर सासवडचे मुक्कामाहून निरोप सांगितला. कच्चा मजकूर त्रिंबजी डेंगळा याजबरोबर लिहून पाठवावा, म्हणजे ध्यानीं येईल. आम्हास कोणतीही गोष्ट कळविणें तरी तुम्हां खेरीज कळविणार कोण आहे? येथील काळजी तुम्हांस आहे. आंब्यांच्या डाल्या पाठविल्या त्या पोंचल्या." ता. ४-१-१८१० चें पत्र. "भृगुवारीं सायंकाळचे सहा घटका दिवसास चि० आप्पा महाताचे पुढें बसून हत्ती चालवीत होता. हा हत्ती तुम्हीं दिलेला होता. तो भडकला. खालीं बसेना. शेवटीं हत्तीस वैरण दाखवून लंगर केला. मग आप्पा खालीं उतरला. बाबा महातास खूप रागावला. मग त्यास दोन चपराकाही लगावल्या. महात बदलला पाहिजे." ता० ६-२-१८१० चें पत्र. "माईसाहेबांस समाधान नाहीं. सबब आपण औषध खर्चाबद्दल व मर्जी खर्चाबद्दल त्रिंबकजी डेंगळा याजकडून एक हजार रुपये देवविले ते पावले." ता० १०-१२-१८१० चें माईसाहेबाचें पत्र, "श्री पंढरी, शंभु महादेव व जेजुरी येथें स्वारी गेली होती ती आश्विन शु॥ १५ भृगुवारीं सातारीं आली. यात्रेस जावें असें मनांत होतें, त्याची गोष्ट तुम्हांपाशीं काढतांच तुम्ही अगत्य धरून घडविलें त्याचा संतोष वारंवार होतो. त्याचा विस्तार पत्रीं कोठवर लिहावा? आजवर घडलें नाहीं. पुढें घडण्यास अशक्य, तें राव तुम्ही

आमचे वचनास अनुमोदन देऊन मनांत होतें, त्यापेक्षां खर्चवेंचाचा बंदोबस्त यथास्थित करून देऊन त्रिंबकजीस पाठविला त्यानें कोणी गोष्टीचें कमी पडूं दिलें नाहीं.'' ता० ४·११·१८१० चें पत्र, '' किल्ल्यावरील नव्या वाड्याची चौसोपी करावयाविषयीं पुणें मुक्कामीं बोलणें झालें. अजमास लिहून पाठवावा म्हणून तुम्हीं सांगितलें. त्यावरून त्रिंबकजी डेंगळा याजबरोबर अजमासाची बेरीज लिहून पाठविली त्याचें उत्तर आलें नाहीं. तुम्हास पुत्र झाला त्याची शर्करा घेऊन तुम्हां कडील खिजमतगार आला. बहुत संतोष झाला.'' ता० १८·५·१८११ चें माईसाहेबांचें सदाशिव माणकेश्वरास पत्र. '' राव यांचे भेटीस बहुत दिवस झाले. आमचे तर्फेचें बोलणें पेशजी पासून तुम्हांकडेच आहे. तरी भेटीस येण्याविषयींचें रायास खातरजमेचें पत्र पाठवून भेट होय तें करावें. राव येथें आले असतां कोणत्याही गोष्टीची अडचण घालावयाची नाहीं. रायाचे भेटीची उत्कंठा चि० बाबास व आम्हांस बहुत आहे. हा हेतु पूर्ण करणें तुम्हांकडे आहे. आम्हास सर्व जोड रायां खेरीज दुसरी नाहीं. राव माहुलीस आहेत तोंच भेटीचा योग करून पत्राचें उत्तर सत्वर पाठविणें.'' यानंतर माईसाहेबांस बाजीरावानें पुण्यास भेटीस आणून विश्रामबागेंत ठेविलें आणि मोठा सत्कार केला. ता० १६·२·१८१२ चें पत्र, '' पागेकडे खाजगीकडील घोडीं आहेत ती पुण्यास पाठवून यावीं म्हणून चिंतो वामन देशमुख यांजकडील कारकुनांनीं विनंति केली. त्यास तुम्हीं चार घोडीं दिलीं. त्यांत दोन घोडीं अद्याप बसावयाच्या धारणेस लागलीं नाहींत, याजकरतां घोडीं ठेवावीं असें तुमचे विचारें ठरून उत्तर आल्यास ठेऊं, अगर पाठवून देऊं.''

या शेवटच्या दोन पत्रांवरून बाजीराव व छत्रपति यांचे दरम्यान थोडथोडी तेढ येऊं लागल्याचें दिसतें. ही तेढ उत्तरोत्तर वाढत गेली, आणि उभयतांत घासाघीस सुरू झाली. या पुढच्या कित्येक याद्या उपलब्ध आहेत त्यांत नेमणुकी खर्च पुरत नसल्याच्या छत्रपतीच्या तक्रारी वाढत गेलेल्या दिसतात. उ. '' डौलाकडून कापड व वार्षिक मोइनी बद्दल पेशजी नेमणूक पांच हजार आहे. त्यांत महाराजांची व माईसाहेबांची नेमणूक आहे. जास्ती खास मंडळीस नेमणूक नाहीं. सबब जास्ती नेमणूक बांधून द्यावी. २ सेवा चाकरीचे माणसास रोजमारा आहे ती कधींही पुरत नाहीं सबब इजाफा करावयास दरमहा नेमणूक पाहिजे. ३ जास्ती किरकोळ खर्च धर्मादाय वगैरे खाजगी खर्चाबद्दल नेमणूक नाहीं. ४ सेवा चाकरीस माणसें पुरत नाहींत. सबब जास्ती माणसें पाहिजेत, त्यांची याद अलाहिदा असे. त्याप्रमाणें

बंदोबस्त करून द्यावा. ५ पागेकडे व गाईम्हशींकडे मिळून सालबेगमीस कुरणाचे बेगमी खेरीज कडबा २० हजार खरेदी करावा लागतो. त्याचे ऐवजाची नेमणूक व्हावी. " अशा मागण्या बाजीरावाकडून पुऱ्या होईनात, आणि पुण्यांत शास्त्र्याचा खून झाल्यावर बाजीरावाचें आसन डळमळूं लागलें, तेव्हांच पुढें छत्रपतींनीं इंग्रजांकडे संधान चालविलें, त्याची हकीकत आतां द्यावयाची आहे.

**३ पुण्याचे क्रान्तींत इंग्रजांचीं धोरणें व सातारचें राज्य.—** नोव्हेंबर १८१७ पासून बाजीरावाचें राज्य जिंकण्याकरितां इंग्रजांनीं जें युद्ध केलें त्यास ते आपल्या इतिहासांत मराठ्यांशीं तिसरें युद्ध असें नांव देतात, आणि त्यांत पुणें, नागपुर, महिद्पुर इत्यादि प्रसंगांचा समावेश करितात. या सर्व प्रकरणांच्या हकीकती मराठी कागदांच्या व इतर आधारानें येथपर्यंत मांडल्या आहेत. पण खुद्द एल्फिन्स्टन वगैरे लेखकांनीं आपलीं धोरणें व अभिप्राय विवेचक दृष्टीनें नमूद केले आहेत, त्यांतला उपयुक्त अंश विषयपूर्तीसाठीं येथें देणें जरूर आहे.*

बाजीराव पुण्यांतून पळून गेला तेव्हां त्याच्या पाठलागाची तजवीज इंग्रजांना एकदमच करितां आली नाहीं. ठिकठिकाणच्या इंग्रज फौजांस वर्दी देऊन तजवीज होण्यांत बराच काळ गेला. एल्फिन्स्टन यास ग० ज० चे हुकूमही त्या संबंधानें आले नव्हते. पेशवा दक्षिणेकडे गेला तो एकाद्या किल्ल्याचा आश्रय करून राहील असें त्यास वाटलें होतें. परंतु तो छत्रपतीस ताब्यांत घेण्यासाठींच प्रथम सातान्याकडे गेला; कारण छत्रपतीनें अगोदर पासून आपल्या विरुद्ध इंग्रजांशीं संधान लावलेलें बाजीरावास ठाऊक होतें आणि तो जर एकदम जाऊन इंग्रजांचा आश्रय करता, तर मग बाजीरावास कांहींच आधार नव्हता. बाजीरावाचा हा डाव ओळखून एल्फिन्स्टननें ज. प्रिट्झ्लर यास पंढरपुराकडे व मन्रो यास मिरजेकडे येण्यास लिहिलें आणि आपण ज स्मिथ व कॅ. ग्रँट यांसह ता. २५ नोव्हेंबर रोजीं पुण्यांतून सातान्याकडे निघाला. ता. २८ रोजीं त्याचा मुक्काम देहूर येथें होता तेथून ता. १ डिसेंबर रोजीं तो पुसेसावली येथें पोंचला. तेव्हां बाजीराव पंढरपुराकडे वळल्याची खबर कळून स्मिथ त्याचे पाठीवर गेला. ता० ३ डिसेंबर रोजीं एल्फिन्स्टनचा मुक्काम कलेढोण येथें असून त्याचे पाठीवर बापू गोखले याची फौज होती. ता० ७ डिसेंबर रोजीं एल्फिन्स्टनचा मुक्काम पंढरपुरास झाला तेव्हां त्यास कळलें, कीं पेशव्यानें

* आधार एल्फिन्स्टन चरित्र.

पूर्वदिशा सोडून उत्तरेकडे प्रयाण केलें. ता० १० डिसेंबर रोजीं नागपुरास बंडावा झाल्याची हकीकत त्यास कळली. ता० १३ डिसेंबर रोजीं भीमेवर टाकळी येथें एल्फिन्स्टनचा मुक्काम झाला. अशा रीतीनें धावपळ करण्यांत इंग्रज अगदीं रडकुंडीस आले, तेव्हां तोफखाना व अवघड सामान शिरूर येथें ठेवून सड्या फौजेनें स्मिथ बाजीरावाचे पाठलागास चालला. ता० १४ डिसेंबर रोजीं सिद्धटेक येथें प्रतापसिंग कुटुंबसह येऊन पेशव्यास मिळाला, आणि दुसरे दिवशीं त्यांचा मुक्काम मांडवगणास झाला. पुढें पेशव्यास अडविण्यासाठीं स्मिथ संगमनेरकडे गेला, आणि तेथून परत पेशव्याचे पाठीवर ता० २ जानेवारीस चाकण येथें आला. त्या ठिकाणीं आदल्या दिवशीं कोरेगांव येथें स्टॉटनच्या फौजेचा नाश मराठ्यांनीं केला अशी बातमी त्यास कळली त्या वेळीं बाजीराव फुलशहर येथें एका उंच टेकडीवर बसून कोरेगांवचें युद्ध पाहत होता. या लढाईनंतर पेशवा पुनः दक्षिणेकडे वळला. प्रिट्झ्लर व स्मिथ यांची गांठ होऊं देऊं नये अशी युक्ति बापू गोखल्यानें दीड महिना पावेतों मोठ्या शिताफीनें चालविली. पुढें ता० ७ फेब्रुवारी रोजीं त्यांची गांठ रहिमतपुर येथें पडली. या धावपळींत २६ दिवसांत ३०० मैलांचा प्रवास इंग्रज फौजेनें केला, हें त्या वेळचें एक अजब आश्चर्य असें मानलें जातें. या मुक्कामींच ग० ज० चे स्पष्ट हुकूम एल्फिन्स्टन यास पोंचले.

बाजीरावानें इंग्रजांवर युद्ध सुरू केल्याचें वर्तमान कळतांच ग० ज० नें एल्फिन्स्टन यास हुकूम पाठविला, की पेशव्याचें सगळें राज्य खालसा करावें; आणि त्याच हुकमांत त्यानें एल्फिन्स्टन यास त्या प्रांताचा मुख्य कमिशनर म्हणून नेमणूक सुद्धां केली. म्हणजे सन १८१८ पासून एल्फिन्स्टन हा डेक्कन कमिशनर या हुद्यावर दाखल झाला. इंग्रज सरकाराचा पुढें विचार काय आहे या संबंधानें सर्व लोकांस मोठी धास्ती पडली होती, ती धास्ती नाहींशी करून लोकांना आश्वासन देण्यासाठीं आपले हेतु जाहीर करावे असें एल्फिन्स्टननें मनांत आणिलें. ग० ज० च्या हुकमा-प्रमाणें एकदम मराठ्यांचें राज्य आम्ही हस्तगत करणार एवढेंच जाहीर केलें असतें, तर लोकांचीं मनें इंग्रजांविषयीं क्षुब्ध होऊन मुलखांत शांतता होण्यास अडथळा आला असता. पेशव्याची सत्ता अद्याप पुष्कळ जोरांत असून त्याचें मराठे सरदारांवर वजनही पुष्कळ, आणि किल्ले वगैरे मजबूद स्थळें त्याच्या कबजांत असल्यामुळें, एकदम सगळें राज्य हस्तगत करण्याचें सामर्थ्य आपल्या फौजेंत आहे असें एल्फिन्स्टन यास वाटलें नाहीं. आपला हा हुकूम लगोलग सर्वत्र जाहीर करा असें ग० ज० नें मुद्दाम

कळविलें होतें. पण एल्फिन्स्टननें तो हुकूम तूर्त गुप्तच ठेवावा असें हाताखालच्या सर्व आधिकाऱ्यांस कळविलें. एका अर्थानें या वेळीं इंग्रज फौजांस मराठ्यांचा धावता वेढाच पडला होता. हा वेढा सोडवून प्रथम बाजीरावावर मात करणें एल्फिन्स्टनला जरूर वाटलें. या वेळचीं त्यानें लिहिलेलीं पत्रें शत्रूंच्या हातीं पडूं नयेत म्हणून कागदांच्या लहान तुकड्यांच्या वळकट्या करून त्या बारीक नळकांड्यांतून ठिकठिकाणीं पोंचविण्यांत येत असत. धावपळीचें युद्ध कसें चालवायचें हा मोठा पेंच एल्फिन्स्टन यास पडला होता, म्हणून मन्रोचा सल्ला घेण्याचा बेत त्यानें ठरविला; आणि पत्रानें त्याचा अभिप्राय मागविला. तो आल्यावर दूरवर विचार करून त्यानें ता. ११·२·१८१८ रोजीं एक लांबलचक जाहीरनामा काढून तो सर्व महाराष्ट्रांत प्रसिद्ध केला. हा जाहीरनामा अत्यंत महत्त्वाचा असून त्यांत बाजीरावाच्या दुष्ट बुद्धीचें व नालायकीचें माप त्याचे पदरांत भरपूर घालून इंग्रजांचे उद्देश स्पष्टपणें जाहीर करण्यांत आले. तसेंच त्यांत भावी सुस्थितीचीं आश्वासनें लोकांस मिळाल्यानें ते लगोलग बाजीरावास सोडून आपापल्या पुरती व्यवस्था ठरवून घेऊन ठिकाणीं बसले. एल्फिन्स्टन्ची धूर्तता या जाहीरनाम्यांत उत्कृष्टपणें व्यक्त होते. बाजीरावास सोडून गेलों तर तो आपला सूड घेईल ही भावना ह्या जाहीरनाम्यानें लोकांच्या मनांतून पार नाहींशी झाली; आणि त्यास चिकटून राहण्यांत कल्याण नाहीं अशी त्यांची खात्री झाली. भराभर त्या जाहीरनाम्याच्या नकला घेऊन लोक वाचूं लागले. त्यांतील आश्वासनांची चर्चा देशांत कैक दिवस चालू होती. दोन महिन्यांचे आंत जे बाजीरावास सोडून स्वस्थ बसतील त्यांस त्यांचीं वतनें पूर्ववत् चालविलीं जातील, या अभिवचनामुळें बाजीराव एकदम उघडा पडला. शिवनीची लढाई आणि सोलापुरावर पानशांचा पाडाव हे दोन प्रकार यशस्वी होण्याचें कारण हा जाहीरनामा होय. जाहीरनाम्यानंतर १२ दिवसांनीं प्रतापसिंह इंग्रजांचे स्वाधीन झाला. आष्टीच्या लढाई पासून बाजीरावाचें राज्य संपलें अशी लोकांची भावना होऊन जो तो पुढील व्यवस्थेंत आपला स्वार्थ कसा संपादावा या उद्योगास लागला. बाजीरावाच्या कारभाराचें संपूर्ण हृद्गत एल्फिन्स्टनच्या इतकें दुसऱ्या कोणींच ओळखिलें नव्हतें. अगोदरच पेशव्यांच्या राज्यांत ब्राह्मण, देवस्थानें वगैरे बाबतींकडे पुष्कळसा खर्च होत असून बाजीरावाच्या कारभारांत तर ब्राह्मण संतर्पणापलीकडे दुसरें कांहीं त्यानें केलेंच नव्हतें. तेव्हां धार्मिक बाबती आहेत तशा आपण पुढें चालवूं असें आश्वासन एल्फिन्स्टननें जाहीरनाम्यानें दिलें, आणि आष्टीची लढाई झाल्याबरोबर तो स्वतः मुद्दाम ब्राह्मणांचा संतोष करण्यासाठीं

वाईस गेला. त्या ठिकाणीं त्यानें सभोंवारच्या प्रमुख लोकांची सभा भरविली, आणि जाहिरनाम्यांतील प्रत्येक बाब स्वतः स्पष्ट करून सांगितली. त्याच प्रसंगीं बाजीरावाच्या वहिवाटीप्रमाणें सर्व प्रमुख व विद्वान लोकांस त्यानें बक्षिसें व देणग्या वगैरे वांटल्या. वाई सारखी सभा लगेच त्यानें पुण्यासही भरविली आणि ब्राह्मण मंडळींचा संतोष मिळविला. अशा रीतीनें ब्राह्मणांचीं मनें आकर्षून घेतल्यानंतर दुसरा मुख्य वर्ग लष्करी पथक्र्यांचा. मराठ्यांचा पहिला मुख्य बाणा लष्करी होय हें ध्यानांत घेऊन, त्यांना कोणी मालक असावा असें मनांत आणून साताऱ्च्या महाराजांचें लहानसें छत्र मुद्दाम एल्फिन्स्टननें उभें केलें. वरील जाहीरनामा काढल्यामुळेंच बाजीरावाची बाजू अगदीं दुर्बल होऊन त्याचें युद्ध संपलें. अशा एकंदर दृष्टीनें तो जाहीरनामा एल्फिन्स्टनच्या इंग्रजी राजकारणांतला पहिला मुख्य डाव असा समजला जातो. *

जाहीरनामा काढून एल्फिन्स्टननें प्रिट्झ्लर यास सातारा व दुसरे किल्ले हस्तगत करण्यास पाठविलें; आणि ज० स्मिथ यास बाजीरावाचे पाठलागावर नेमिलें. ता० १० फेब्रुवारी रोजीं प्रिट्झ्लर व एल्फिन्स्टन साताऱ्याजवळ आले. त्यांचे चार दोन गोळे किल्ल्यांत येऊन पडतांच वरून शुभ्र निशाण दाखविण्यांत आलें; आणि लगेच किल्ला एल्फिन्स्टनचे हस्तगत झाला. ता० ११ रोजीं त्यानें सर्व किल्ल्यांची तपासणी करून दरबार भरविला आणि तेथें वर सांगितलेला जाहीरनामा प्रसिद्ध केला दुसरे दिवशीं सिंहगडही आपाजी शेवडे किल्लेदार यानें इंग्रजांच्या स्वाधीन केला. छत्रपति व एल्फिन्स्टन यांची भेट ता० ४·३·१८१८ रोजीं बेलसर येथें झाली.

**४ साताऱ्यास छत्रपतींची स्थापना** ( १०·४·१८१८ ).—" विठ्ठल बल्लाळ महाजनी फडणीस, दाजीबा उपाध्ये व तात्या नारळकर अशांचे मतें एकविचार करून छत्रपति राज्याचे खटपटीस प्रवर्तक झाले. त्यांनीं आपले तर्फेनें नरसू काकडे जामदार यास पुण्यास एल्फिन्स्टनकडे व मुंबईस गव्हर्नराकडे भेटीस पाठविलें. साहेबांनीं हकीकत ऐकून घेऊन नरसू काकडे यास खात्रीनें सांगितलें, कीं महाराजांस कळवावें, तुम्हीं आपले राज्याविषयीं फिकीर करूं नये. थोडक्या दिवसांनीं आपल्या मनोदयानुरूप आपला बंदोबस्त होईल." त्यानंतर सन १८१७ त पुनः नरसू

* हा जाहीरनामा पुष्कळ ठिकाणीं छापलेला आहे. पे. अ. पृ. २०२, खंड ४ पृ० १६०, रु. २ पृ० १४१ का. सं. प. या. पृ० ४८९ व अन्यत्रही आहे.

काकडे यास छत्रपतीनें एल्फिन्स्टनकडे पाठविलें. तों पुढें बाजीरावाचा व इंग्रजांचा बिघाड झाला. त्यावर साहेबांनीं नरसू काकडे याजबरोबर निरोप पाठविला, कीं ‘ बाजीरावाची व आमची लढाई होईल त्या वेळेस हुशारी ठेवून लढाईचे प्रसंगीं तुम्हीं आमचे लष्करांत येऊन मिळावें. ’ या कामीं गोविंदराव काळे याचाही सल्ला छत्रपतींनीं घेतला माहुली मुक्कामीं छत्रपतीस आणून बाजीरावानें त्याजकडून आणा शपथा घेवविल्या. तो प्रकारही त्यांनीं अंतस्थ रीतीनें एल्फिन्स्टन यास कळविला. ता. ५ नोव्हेंबर रोजीं पुण्यास इंग्रजांचा बाजीरावाशीं बिघाड झाला आणि लगेच आश्विन व. ३०, ता. ९ नोव्हेंबर रोजीं बाजीरावानें प्रतापसिंहास कुटुंबसह साताऱ्यावरून काढून वासोटा किल्ल्यावर बंदोबस्तांत ठेविलें. तेथून मार्गशीर्ष मासीं नारोपंत आपटे यास बाजीरावानें वासोट्यास पाठवून छत्रपतीस आपले लष्करांत आणिलें. चंपाषष्ठीच्या दिवशीं (म्ह०ता. १४·१२·१८१७ रोजीं) गारदौंडाजवळ बाजीराव व छत्रपति यांच्या भेटी झाल्या. पुढें सोलापुरचे मुक्कामीं इंग्रजांनीं सातारा किल्ला घेतल्याची बातमी छत्रपतीस कळली, आणि नरसू काकडे याजबरोबर त्यास निरोपही आला, कीं आतां पंधरा रोजाचे आंत आम्ही तुम्हांस नेऊन साताऱ्यास पोंचवितों. त्याप्रमाणें पुढें प्रकार घडला तो अन्यत्र सांगण्यांत आलाच आहे.

आष्टीच्या लढाईनंतर सातारकर छत्रपतींच्या हालचाली कशा झाल्या तें प्रथम सांगितलें पाहिजे. * ‘ मार्गशीर्ष शु॥ ६ ता० १४ डिसेंबर १८१७ रोजीं श्रीमंत प्रताप शाहू महाराज, बंधु भाऊसाहेब व आप्पासाहेब व मातुश्री माईसाहेब यांस बाजीरावांनीं वासोट्याहून आपले लष्करांत सिद्धटेक येथें आणिलें. आष्टी वाळकीचे मुक्कामीं इंग्रज फौजा आल्याची बातमी कळून बाजीरावाची स्वारी भोजन करून निघावयाची त्वरा झाली. बिनी कूच करून गेली. छत्रपति स्वामींचीं भोजनें झालीं होतीं. बाजीराव जेवावयास बसले होते. अर्धे जेवणांत बापू गोखल्यानें बातमी सांगून पाठविली, कीं इंग्रज आले. आपली स्वारी जलद निघून अंतरा पाडावा. मी तोंडावर जातों. आजचा समय कठिण आहे. त्याबरोबर लष्करांत गलबल झाली. घाबरेपणें बाजीराव भोजन टाकून डेऱ्याबाहेर आले. लष्करांत आरडा चालला. मेणा जलद आणवून बसून चालीस लागले. महाराजांस चलावें म्हणून सांगून पाठविलें. इंग्रजांशीं मुकाबला होतांच बापू गोखल्यांनीं चालून घेतलें. पन्नास आसामींनिशीं हत्यार चालविलें. घेरा पडला. मागून कुमक पोंचली नाहीं. बाजीराव निघून जातांच सर्व

* रु. २ पृ. २५; छत्रपींची दिनचर्या; इ वृ. १८३८ पृ. २०.

फौज पळून गेली. गोखल्यानें इरेस पडून खुद्द स्मिथसाहेबावर तरवार केली. तीन चार गोरे मारले. आडवे बाजूनीं स्मिथसाहेबांनीं पिस्तोल मारिला. जोड गोळ्या लागल्या. तत्रापि संभाळून ज. स्मिथवर हात टाकला. बोलले, बापू गोखले म्हणतात तो मी. उजवे मानेवर जखम केली. ज. नीं. बापूचे डोईवर हात चालविला. डोईची कपरी फुटून घोड्याखालीं आले. प्राण सोडिला. बरोबरचे कांहीं जखमी, व खंडेराव व गोविंदराव घोरपडे, आनंदराव बाबर वगैरे ठार झाले. लगेच इंग्रजांनीं दोन तुकड्या करून बाजीरावाचे पाठीवर डावे उजवे गेले. तेव्हां आपा देसाई निपाणकर बाजीरावाचे जवळ येऊन रागें भरला, कीं हा समय म्यानांत बसायचा कीं काय? तेव्हां उतरून घोड्यावर बसले, आणि छत्रपतीसह भरधाव घोडी हांकावयास लागले. पंचवीस तीस हजार फौज बरोबर पळूं लागली. भाले, अबदागिरे, म्याने, पालख्या, वगैरे टाकीतच चालले. लगट फारच झाला. माईसाहेबांचा म्याना मागें राहिला. तेव्हां घोडा बसावयास दिला. त्रिवर्ग महाराज पुढें गेले ते माईसाहेबांस दिसेनात बाजीराव यांनीं आपले बायकोस* छिटाचा अंगरखा व पायजमा घालून रुमाल बांधविला होता. ती व ढमढेरे यांच्या चार दोन बायका घोड्यावर घालून बरोबर चालविल्या होत्या. इतक्यांत माईसाहेब अंमळ मागें राहिली, तिला पाठलाग करणाऱ्या तुर्कानें पकडून नेली पळणारांवर मागून तुर्कांच्या गोळ्या येतच होत्या. महारांजाबरोबर बळवंतराव चिटणीस, त्याचा बंधु यशवंतराव व भीमराव विठ्ठल पोतनीस व आनंदराव केसकर चालले होते. तों इंग्रजांचे स्वारांनीं येऊन गांठलें. बळवंतराव चिटणिसांनीं पुढें होऊन पुकारा केला, कीं छत्रपति महाराज उभे आहेत, गोळ्या घालूं नये. तों मेजर डप्टिन् ( Dobdin ) महाराजांजवळ येऊन त्यांचा हात धरला. सातारकर सचे म्हणून पुसलें. महाराजांनीं अंगावरचा दुपेटा डपटिन्‌चे अंगावर घातला. डपटिननें महाराजांस मनगट धरून ज० स्मिथजवळ आणिलें. या प्रसंगाबंसंधानें खुद्द प्रतापसिंग पुढें बळवंतराव चिटणिसास लिहितो ‘ तुम्हीं आम्हांपाशीं एकनिष्ठेनें बाजीराव यांची अडचण असतां सरकारकडे लक्ष ठेवून इंग्रजांशीं राजकारण करण्याची आज्ञा जाहली, त्याजवरून राजकारण केलें तें व बाजीराव व इंग्रज यांची लढाई झाली, तेव्हां खासास्वारी लढाईत असतां, गर्दीसमयीं बाजीराव सोडोन उधळोन गेले; खासास्वारी उभे राहिली; इंग्रजांकडील तुर्कांची वगैरे गर्दी फार जाहली; ते समयीं तुम्ही मजजवळ उभे असोन घोड्यावरून उडी टाकून तुर्कांतील सरदार साहेब लोक धावून येत होते, त्यांजकडे

* ही सरस्वतीबाई. दुसरी बायको वाराणसीबाई या वेळीं रायगडावर होती.

पुढें धावून जाऊन, खासा स्वारी आहे हें नांव कळवून, गर्दी करूं नये असें बोललां. गर्दी फेर मना होऊन साहेब वगैरे यांच्या भेटी जाहल्या. ऐसी बहुत सक्तीची चाकरी केली.'* 'या प्रसंगांत खाशांसुद्धां एकंदर ४२ माणसें इंग्रजांचे हस्तगत झालीं. इंग्रजांनीं तोफांची सरबत्ती केली. आष्टीचे तळावर एक कोटि रुपयांचा विषय इंग्रजांस सांपडला. महाराजांबरोबर सामान कांहीं नव्हतें, म्हणून लुटींतील सामानाचे सतरा उंट महाराजांकडे देऊन डेरे उभे केले. नंतर सर्वांनीं साखरपाणी घेतलें. बापू गोखल्याचा मुर्दा डोलींत घालून आणिला तो बळवंतराव चिटणिसांनीं ओळखला. चार घटका रात्रीं ओढ्याचे कडेस नेऊन अग्नि दिला. एल्फिन्स्टनची भेट घेण्यासाठीं पुण्याचे रोखें चालले. दुसरे दिवशीं कूच करून करकंभ, टेंभुर्णी, हिंगणगांव इंदापुरावरून बारामतीस आले. तेथून ता. ४ मार्च रोजीं बेलसरास आले. तेथे एल्फिन्स्टन व बाळाजी पंत नातू सिंहगडाहून त्याच वेळीं आले तेव्हां भेटी झाल्या. तेथून पुढें सर्व मंडळी साताऱ्यास येण्यास निघाली. महाराज व एल्फिन्स्टन यांजमध्यें भेटी दरबार पाहुणचार मेजवान्या वगैरे वारंवार होऊन उभय पक्षीं आनंदोत्सव सारखे चालू होते. वीर, माणकी, जेजुरीवरून सर्व मंडळी पुरंदरखालीं भिंवडी येथें आली. किल्ला आबा पुरंदऱ्याच्या ताब्यांत होता. थोडा वेळ लढाई होऊन ता० ९ रोजीं किल्ला सर झाला. मंगळवारीं सर्वांनीं वर जाऊन किल्ला पाहिला. तेथून बाळाजीपंत नातूस महाराजांबरोबर ठेवून एल्फिन्स्टन पुण्यास गेला. कारभारांत नातूचें वजन वाढून त्यानें साहेबाच्या पाठिंब्यामुळें महाराजावर दाब ठेवण्याचा प्रयत्न चालविला. तेणेंकरून पुढें उभयतांचें सडकून वांकडे आलें. नातूस आपल्या जवळ ठेवूं नये अशी सूचना आरंभींच प्रतापसिंहानें एल्फिन्स्टनला केली होती. स्वारी भिंवडीहून ता० ११ मार्चला निघून कोथळें, वाल्हें, पांडेगांव, तांबवें, बनवडी येथें चंदनवंदन खालीं आली. दोन्ही किल्ल्यांच्या सोडचिठ्या आल्या. तेथें एल्फिन्स्टन पुण्याहून पुनः प्रतापसिंहाचे भेटीस आला, आणि साताऱ्यास जाण्यापूर्वी अगोदर वासोटा किल्ल्यावर छत्रपतींच्या बायका होत्या त्यांस आणण्यासाठीं सगळी मंडळी पांडवगड, केळंजा, कमलगड हे किल्ले घेऊन स्वाऱ्या ता० २९ मार्च रोजीं वासोट्याखालीं आल्या. रस्त्यांत एल्फिन्स्टननें एकट्यानेंच वाईस जाऊन तेथें शास्त्री पंडितांची मोठी सभा भरवून वस्त्रें व दक्षणा वांटली. वासोट्याचा किल्ला लढल्याशिवाय हातीं आला नाहीं. तोफांचा मारा सुरू झाल्यावर आंत नुकसान होऊं लागलें त्यामुळें निभाव नाहींसा होऊन ता० ६ एप्रिल रोजीं किल्ला स्वाधीन झाला. हंटर व

---

* भा. ॰ ॰ ग. या. ७२; चित्रेकुल वंशवृक्ष पु. ६ पृ. २४.

मॉरिसन हे दोन इंग्रज शिपाई युद्ध सुरू झालें त्या सुमारास पुण्याकडे येत असतां हस्तगत झाले, त्यांस बाजीरावानें कांगोरी किल्ल्यावर अडकवून ठेवून त्यांचे फार हाल केले व पुढें वासोट्यावर आणिलें. किल्ला घेतल्यावर त्यांची या प्रसंगीं सुटका झाली. वासोट्याहून निघून चैत्र शु॥ ५ ता० १०·४·१८१८ रोजीं करंज्या जवळ आंबराईत स्वारी उतरून भोजन केलें. तृतीय प्रहरीं मुहूर्तें करून त्रिवर्ग खासे बराबर अल्फि-न्स्टन व साहेब लोक सुद्धां स्वारी समारंभानें सातारा येथें वाड्यांत दाखल झाली. सिंहासनारोहण केलें. खुषीच्या तोफा झाल्या. दरबारांत पूर्वी सांगितलेला जाहीरनामा एल्फिन्स्टननें वाचून दाखविला. बाजीरावानें ठेवलेलें शाहू हें नांव सोडून यापुढें प्रतापसिंह नांव चालू केलें. ग्रँट साहेबास महाराजांचे बंदोबस्तास नेमिलें. ज० प्रच्छकसाहेब* व मन्रो विलायतेस जावयाकरितां साताऱ्यास आले. एल्फिन्स्टननीं आणून भेटविले. सोमवार ता० १३ एप्रिल रोजीं महाराजांची स्वारी किल्ल्यावर राहवयास गेली.' नंतर दोनच दिवसांनीं चतुरसिंग भोसले कांगोरी किल्ल्यावर कैदेंत होता, तो तेथेंच मृत्यु पावला. त्याच दिवशीं एल्फिन्स्टन छत्रपतींचा निरोप घेऊन पुण्यास गेला. तो पुनः ता० २८ मे रोजीं साताऱ्यास प्रतापसिंहाचे भेटीस आला. परस्पर बोलणें झालें. बाजीरावाचे बोलणे चालण्याची गोष्ट निघाली तेव्हां एल्फि-न्स्टन साहेब बोलले, " बाजीराव बोलणार बहुत सावध, लिहणार वगैरे सर्व चांगला, परंतु बोलल्याप्रमाणें चालावयाचें नाहीं, दगलबाजी फार. " या भेटींत प्रतापसिंहाचें राज्य व व्यवस्था ग० ज० च्या हुकमाप्रमाणें चालेल असें एल्फिन्स्टननें आश्वासन दिलें. पूर्वीं पेशव्यांचें सगळें राज्य तुम्हांस देऊं असा पहिला समज असतां, या वेळी फक्त नीरेअलीकडे भीमा नदीची हद्द व वारणेची हद्द, कृष्णा भीमांचा संगम झाला तेथपर्यंतचा मुलूख पश्चिमेस सह्याद्री पासूनचा द्यावा, अशी शिफारस ग० ज० कडे एल्फिन्स्टननें करून पाठविली. त्यामुळें बरेच दिवस प्रतापसिंग लोंबकळत राहिला. प्रथम जेव्हां इंग्रजांनीं बाजीरावास पदावरून काढण्याचा विचार मनांत आणिला, तेव्हां पेशव्यांचे ताब्यांत असलेला सर्व प्रदेश बाजीरावाकडून काढून छत्रपतीचे हवालीं करावा असा कदाचित् आरंभीं त्यांचा विचार असेल. परंतु पुढें जेव्हां पेंढाऱ्यांची मोहीम सुरू होऊन इंग्रजांचे बेत सिद्धीस जाऊन खर्च वाढले, बाजीरावाचा पाठलाग करण्यांत इंग्रजांस अतोनात कष्ट पडले, आणि नागपुरकर भोसले, होळकर व बाजीराव

* Pritzler. पुढें ज० मन्रो मे अखेर पुण्यास होता. त्याच्या स्वभावाची व अक्कलेची एल्फिन्स्टननें फार तारीफ केली आहे.

यांच्याशीं लढण्याचे प्रसंग इंग्रजांस आले, तेव्हां त्यांचे पहिले विचार फिरले. मन्रो, माल्कम इत्यादींचा अभिप्राय असा होता, कीं पेशव्यांनीं अपहार केलेलें राज्य मूळचे मालकास परत द्यावें; त्याचा आक्रम करण्यास आपणास अधिकार नाहीं. अशा स्थितींत आरंभीं मुंबईचे गव्हर्नर व एल्फिन्स्टन वगैरेनीं प्रतापसिंहास कांहींही वचनें गुप्तपणें दिलेलीं असलीं, तरी पुढें उघडपणें जेव्हां तो प्रश्न ग० ज० कडे आला, तेव्हां त्यानें बहुतेक मुलूख खालसा करून केवळ लोकांचीं मनें दुखवलीं जाऊं नयेत म्हणून अगदीं थोडा प्रदेश प्रतापसिंहास तोडून दिला. गादीवर बसवितांना ता. १०•४•१८१८ रोजीं खालील दुसरा जाहीरनामा छत्रपतीकडून इंग्रजांनीं प्रसिद्ध करविला.

" बाजीराव रघुनाथ यांनीं कुंटुब सुद्धां नरजबंदींत ठेऊन शेवटीं प्राणांचाही घात करावा अशी योजना केली, हें त्यांचे कामगार यांजकडून समजण्यांत आलें. या तऱ्हेची अमर्यादा कोणतेही प्रकारें करण्यांत कमी केली नाहीं. हें वर्तमान कंपनी-बाहादर यांजकडे समजाविल्यावरून त्यांनीं कै. महाराजांचें पूर्वापार हें राज्य याजवर नजर देऊन, बाजीरावाचे प्रतिबंधांतून खुलासा करून राज्याचे ठायीं सिंहासनारूढ करून समारंभ केला, यावरून बहुत संतोष होऊन या सरकारची दोस्ती झाली. जे त्यांचे दोस्त ते इकडील दोस्त. त्यांचे दुष्मन ते इकडील दुष्मन हें सर्वांस महशूर व्हावें. "

यानंतर पुनः ता. १९•४•१८१८ रोजीं तिसरा जाहीरनामा प्रतापसिंहाकडून काढण्यांत आला तो असा:—"कंपनी सरकारची व या सरकारची दोस्ती होऊन स्वारी सातारियाच्या पदावर सिंहासनारूढ झाल्याचीं पत्रें सादर झालीं आहेत, त्यांत सरकारांत जो मुलूख होईल त्याची आबादी व्हावी व रयतेस उपद्रव करणाऱ्यांचा बंदोबस्त व्हावा व जे गैर चालतील त्यांस शिक्षा होऊन या सरकारची उत्तम रीत सरकारांत प्रगट व्हावी, याजकरतां ग्रँटसाहेब बहादूर यांस आज्ञा केली असे. तरी मशारनिल्हे ज्या तऱ्हेनें मुलखाची आबादी होईल तें करतील व जे गैरराहा चालतील व सरकार कामांत प्रतारणा करतील व रयतेस उपद्रव देतील, त्यांस हे शिक्षा करतील. हें सर्वांस महशूर व्हावें. "

प्रतापसिंह व बाजीराव यांच्या संबंधानें कै. भावे यानीं रुमाल २ या आपल्या पुस्तकाच्या प्रस्तावनेंत छत्रपतींवर विश्वासघाताचा आरोप करून बाजीरावाची तरफदारी केली आहे. ती एकंदर वस्तुस्थिति व येथें दिलेला पत्रव्यवहार यांवरून अत्यंत अवास्तव आहे या विषयीं संशय राहत नाहीं. त्याजबद्दल जास्त विवेचन करण्याचीही आतां आवश्यकता दिसत नाहीं.

प्रतापसिंहाची तात्पुरती व्यवस्था लावून एल्फिन्स्टन पुण्यास गेला. नंतर लवकरच बाजीराव माल्कमचे स्वाधीन झाल्याची बातमी येऊन पेशव्याचें प्रकरण संपलें परंतु छत्रपतीची व्यवस्था अद्यापि ठरावयाची होती. बाळाजीपंत नातूस प्रतापसिंहाची दिवाणगिरी करण्याची मोठी हाव होती. छत्रपतींस तो नको होता, म्हणून विठ्ठलपंत फडणिसास दिवाण नेमून बाळाजीपंत नातूस कॅ. ग्रँटचे हाताखालीं मदतनीस नेमण्यांत आलें. सातारच्या व्यवस्थेसंबंधीं ता० १८-४-१८१८ रोजीं एल्फिन्स्टननें आपलीं एकंदर धोरणें लिहून ग्रँट यास दिलीं. त्यांवरून ग्रँटची व सातारकर मंडळीची फार तक्रार होऊं लागली. छत्रपतींना आपल्या ताब्यांतला लहानसा संस्थानिक इंग्रजांनीं बनविलें, ही गोष्ट त्यांस अत्यंत दुःखप्रद वाटूं लागली, आणि त्यांचा राग बाळाजीपंत नातूवर झाला. छत्रपतींनीं आपल्या तक्रारी तोंडीं व लेखी एल्फिन्स्टनकडे केल्या. अद्याप ग० ज० कडून निकाल लिहून आला नाहीं, तो आल्यावर सर्व व्यवस्था करूं, अशा जबाबांनीं त्यानें बरेच दिवस चालढकल केली. अखेरीस कायम व्यवस्थेचा ठराव ग० ज० कडून आला, त्यास अनुसरून ता० २५·९·१८१९ रोजीं प्रतापसिंहाशीं नवीन तह इंग्रजांचा होऊन त्याजकडे सातारचें राज्य कायम झालें. बाहेर कोणाशीं पत्रव्यवहार न करणें, फौज न वाढविणें, इंग्रज सरकाराशीं राजनिष्ठ राहून त्यांचे हुकूम पाळणें इत्यादि कडक बंधनांनीं छत्रपतींना चांगलेंच बांधून घेण्यांत आलें. मिळून सातारचें राज्य निर्माण करण्यांत इंग्रजांचा हेतु केवळ आपलें नवीन राज्य लौकिकांत स्थिर करण्यापुरताच होता. त्यामुळें छत्रपतींच्या राज्याचें कल्याण झालें नाहीं. शिवाय प्रतापसिंहास अनुभव नाहीं या सबबीवर त्यास कारभाराचे अधिकारही एकदम देण्यांत आले नाहींत.

ग्रँट डफ व प्रतापसिंह यांचा स्नेह बराच जुळला; आणि इतिहासाचे कामीं त्यास प्रतापसिंहानें मनापासून मदत केली. ग्रँट यास पुढें आईची जिंदगी मिळाली तेव्हां त्यानें आईकडचें डफ हें आणखी एक आडनांव धारण केलें. त्याचें पूर्ववृत्त असें.

**ग्रँट डफचा** जन्म बन्फ येथें ता. ८·७-१७८९ रोजीं झाला. आईचें नांव मार्गरेट डफ. स. १८०५ त तो मुंबईस येऊन तेथील ग्रेनेडियर पलटणींत नोकर राहिला. स. १८०८ त गुजरातेंतील बंडावे मोडण्याची लष्करी कामगिरी त्यानें केली. फारशी भाषा चांगली शिकला म्हणून त्यास फारशी दुभाष्याची जागा मिळाली. पुढें त्याची ग्रेनेडियर पलटण पुण्यास आली तिजबरोबर ग्रँटही तेथें एल्फिन्स्टन जवळ येऊन राहिला. तेथें पॉटिंजर, ब्रिग्ज वगैरे त्याचे सहकारी बनले. स. १८१८ त सातारा येथील रेसिडेन्सीवर त्याची नेमणूक होऊन त्यास दरमहा दोन हजार पगार आणि वर खर्चो-

साठीं आणखी दीड हजार असा तनखा मिळूं लागला. त्याचेच हाताखालीं बाळाजीपंत नातूची नेमणूक पांचशें रुपये दरमहावर झाली. स. १८२२ त ग्रँट निवृत्त होऊन स्वदेशीं गेला आणि त्याचे जागीं ब्रिग्जची नेमणूक झाली. मराठ्यांच्या इतिहासाचें साहित्य येथें तयार करून इंग्लंडांत गेल्यावर त्यानें सर्व भाग व्यवस्थित लिहून पहिली आवृत्ति १८२६ त प्रसिद्ध केली. ता. २३·९·१८५८ रोजीं कॅ. ग्रँट डफ मरण पावला.

डफनें मराठ्यांचा इतिहास लिहिला त्याप्रमाणें त्याचे समकालीन माल्कम, टॉड्, जेम्स फोर्ब्स्, मेन्रो, जेंकिन्स, वुइल्क्स, वॉकर इत्यादींनीं अनुक्रमें मध्य हिंदुस्थान, राजपुताना, गुजरात, दक्षिण हिंदुस्थान, नागपुर, म्हैसूर, बडोदे इत्यादींच्या हकीकती लिहिल्या, त्या अद्यापि इतिहासास मुख्यतः उपयोगी पडतात. हे वृत्तान्त लिहिण्यास कदाचित् त्यांस वरीष्ठांची सूचना असेल. यांतले कांहीं ग्रंथ मार्मिक व इंग्रजांना आपल्या पराक्रमाची स्फूर्ति देणारे आहेत. कॉर्नवॉलिस, शोअर, वेल्स्ली, मेट्काफ् इत्यादींचे खलिते म्हणजे राजकारणी डाव पेंचांचे उत्कृष्ट नमुने म्हणून सदैव गणले जातील. त्यांच्या तोडीचे मराठी खलिते फार थोडे सांपडतील. नानासाहेब पेशवे, नाना फडणीस, महादजी सिंदे इत्यादींचे थोडे खलिते मात्र राजकारणांत नांवाजले जाण्यास पात्र आहेत. वरील इंग्रज मुसद्यांचीं चरित्रें मागें ठिकठिकाणीं येऊन गेलीं आहेत. इंग्रजांचें राज्य स्थापन झाल्यावर त्यांच्या कृतींस महत्त्व प्राप्त झालें म्हणून त्यांचीं नांवें इतिहासांत सुप्रसिद्ध झालीं. राजकारण, देशस्थिति, व्यापार धंदे, क्रिस्तधर्म-प्रसार इत्यादि विषयांत उद्योगी व धूर्त इंग्रजांनीं आपापल्या परी उद्योग करून आपल्या राष्ट्रास मदत केली. होरेस वुइल्सन, वुल्यम जोन्स वगैरे गृहस्थांचीं नांवें वरील मुत्सद्यांच्या पंक्तींत गणलीं पाहिजेत.

गुजरातच्या वृत्तान्तांत **फोर्बसचें** नांव स्मरणीय आहे. 'प्राच्य संस्मरणें' (Oriental Memoirs) व 'रासमाला' हे दोन ग्रंथ या गृहस्थाचे विद्वन्मान्य आहेत. याचा जन्म लंडन येथें ता. १९·५·१७४९ रोजीं होऊन सोळाव्या वर्षी कारकुनी नोकरी पत्करून तो मुंबईचे वखारींत दाखल झाला. पण नोकरींत त्यास चैन पडलें नाहीं. हिंदुस्थानच्या निरनिराळ्या भागांत त्यानें प्रवास करून स. १७८४ त स्वदेशीं प्रयाण केलें. स. १७७५ त मुंबईहून रघुनाथरावाचे मदतीस कर्नल कीटिंगची फौज गेली, तिजबरोबर फोर्ब्सची नेमणूक होऊन पुढें पांच चार वर्षे त्याचें वास्तव्य सुरत बडोदें, डभई, भडोच इत्यादि ठिकाणीं झालें. एवढ्या मुदतींतील घडामोडींची कांहीं माहिती त्याच्या टांचणांत पाहवयास मिळते. स्वदेशीं परत गेल्यावर त्यानें हिंदुस्थानांत क्रिस्ती धर्म प्रसार करण्याविषयीं पराकाष्ठेची खटपट केली, तिचें प्रयोजन आपणास नसलें, तरी तत्कालीन देशस्थितीचें चित्र तिऱ्हाईत दृष्टीनें काढलेलें त्याच्या लेखांत दिसतें.

प्रतापसिंहाच्या रासवटींत दुसऱ्या एका गृहस्थाचें नांव सुप्रसिद्ध होतें, तो **बापू कान्हो फडणीस** हा होय. तो प्रतापसिंहाजवळ प्रमुख मुत्सद्दी होता. याचें उपनांव खांडेकर. याचा पूर्वज गोपाळ महादेव कोंकणांत देवरुखाजवळ आपल्या वतनाच्या गांवीं राहत असतां हबशाच्या जाचानें साताऱ्यास येऊन शाहू महाराजांजवळ नोकरीस राहिला. शाहूनें त्यास देवरुख परागण्यांतील कनकाडी गांव इनाम करून दिला. त्याचा मुलगा धोंडो गोपाळ यास शाहूनें आपली हुजूर फडणिसी दिली. पुढें त्याचा मुलगा बाळाजी धोंडदेव फडणिसी करीत असतां काशीस जाऊन वारला. पश्चात् त्याचा भाऊ कान्हो धोंडो यास फडणिसीचा दरख मिळाला; पण ताराबाईचे लक्षांत वागत असल्यामुळें त्याजवर नानासाहेब पेशव्याची इतराजी झाली. त्याचा मुलगा बापू कान्हो धाकटे शाहूचे पदरीं राहून नानाफडणिसाचे तंत्रानें वागत असे. बाजीरावाच्या वेळीं साताऱ्यास छत्रपतीसंबंधानें ज्या उलाढाली व युद्धें जालीं त्यांत बापू कान्हो महाराजांचे तर्फेनें पुण्यास सिंदे, सर्जेराव वगैरेकडे वारंवार जात असे. रास्ते, पटवर्धन यांजपुढें पराभव पावून चतुरसिंग भोसले स. १७९८ त बाहेर बंडाळी करूं लागला, त्याचा कारभारी म्हणून बापू कान्हो यास छत्रपतीनें नेमून दिलें. त्याजपाशीं एकनिष्ठेनें राहून बापूनें अनेक राजकारणें केलीं व बिकट प्रसंग अनुभविले. चतुरसिंगानें छत्रपतींस मोकळे करण्याची पराकाष्ठा केली. त्यासाठीं करवीरकर छत्रपति, सिंदे, होळकर नागपुरकर भोसले यासर्वांकडे चतुरसिंग गेला, त्याबरोबर बापू कान्हो सदैव असे. स. १८१२ सालीं चतुरसिंगाबरोबरच त्यासही मालेगांव येथें त्रिंबकजी डेंगळ्यानें दगा करून कैद केलें; आणि जीवधन किल्ल्यावर अडकवून ठेविलें. त्यांतून बापू कान्हो मुक्त होऊन प्रतापसिंहाच्या फडनिसीवर रुजू झाला. ग्रँट डफ यास इतिहासाचे व अन्य कामीं त्यानें फार साह्य केलें. त्याच्याच सांगण्यावरून बापूनें स. १८२१ त एक आत्मवृत्त तयार केलें तें छापलें आहे.×

**खांडेकर**

**गोपाळ महादेव**
|
**धोंडो गोपाळ**
|
**बळवंतराव** — **कान्हो**
| (कान्हो)
**बापू कान्हो**

× ऐ. स्फू. ले. ३·२१. बापू फडणीस, बळवंतराव मल्हार चिटणीस, अंताजीपंत व विठ्ठल बल्लाळ महाजनी, रंगो बापूजी गुप्ते वगैरेंनीं प्रतापसिंहाचें साह्य केलें, त्यांच्या हकीकती छापलेल्या आहेत त्या अभ्यासूंनीं वाचाव्या. राजवाडे खंड १५·३२३ यांत रंगोबापूजीनें दिलेली हकीकत मनोरंजक वाटेल.

**५ किल्ल्यांचा पाडाव, अव्वल इंग्रजी** ( मे-जून १८१८ ).-छत्रपति इंग्रजांकडे आल्याबरोबर बाजीरावाचा दक्षिणेंतील प्रपंच आटोपला. सिंहगड, पुरंदर व वासोटा हे किल्ले एप्रिलचे आरंभींच प्रिट्झलरचे हातीं आले. ता ११ एप्रिल रोजीं प्रतापसिंहाचें राज्यारोहण झालें. नंतर प्रिट्झलर दक्षिणेंत जाऊन मन्रो यास सामील झाला. त्यांनीं बदामीचा मजबूद किल्ला हस्तगत करून पुढें बाजीरावाचा तोफखानेवाला पानसे सोलापुरचे किल्ल्यांत राहिला होता त्याजवर चाल केली. त्या ठिकाणीं निकराची लढाई होऊन मन्रोनें सोलापुर हस्तगत केलें. कोंकणचा भाग मुंबईच्या फौजेनें हळू-हळू ताब्यांत आणिला. ता. १७ मे रोजीं क. प्रॉथर यानें रायगड किल्ला हस्तगत केला, त्या वेळीं बाजीरावाची बायको वाराणसीबाई ही त्याच्या स्वाधीन झाली, तिला इंग्रजांनीं वाई येथें माहेरीं नेलें: आणि तेथें नऊ महिने राहिल्यावर तिला बाजीरावाकडे ब्रह्मावर्तास पोंचविलें. अहंमदनगर व आजू बाजूचे किल्ले मेजर एल्डिज़ यानें हस्तगत केले. क. मॅडॉवेल यानें चांदवड पहाडांतील किल्ले काबीज केले. चतुरसिंग गोसावी याजपासून प्रचितगड किल्ला कॅ. कनिंगहॅम यानें हस्तगत केला. बेळगांव, कलादगी, कऱ्हाड, सातारा, सोलापुर, पुणें, शिरूर, जुन्नर, अहंमदनगर आणि मालेगांव इत्यादि ठिकाणीं इंग्रजांनीं आपलीं मजबूद लष्करें ठेवून पुनः बंडाळी होऊं नये असा बंदोबस्त केला. सातारा व कोल्हापुर येथील छत्रपतींची व्यवस्था बांधून देण्यांत आली. एवंच राजधानींतल्या भागांतले लोक हळूहळू स्थिर झाले, तरी प्रांतांत ठिकठिकाणीं पेशव्यांचे अंमलदार व किल्लेदार होते, त्या सर्वांनींच आपलें पूर्वीचें इमान एकदम सोडून दिलें असें नाहीं. त्यांपैकीं बरेचसे लोक इंग्रजांशीं शक्य तोंपर्यंत लढले.

खानदेश प्रांतांत आरबांच्या अनेक वसाहती पूर्वी पासून होत्या. लढण्याशिवाय त्यांना दुसरा धंदा नव्हता, आणि शक्तीच्या जोरावर ते तेथील रयतेला सुद्धां भारी उपद्रव देत असत. ही दांडगाई इंग्रजी राज्यांत चालण्याजोगी नसल्यानें त्यांस हा मुलूख सोडून परत स्वदेशीं आरबस्थानांत जाण्याशिवाय गत्यंतर राहिलें नव्हतें. कॅ. ब्रिग्ज खानदेश भागाचे बंदोबस्ताकरितां नेमलेला होता. जाहीरनाम्याचे आधारानें त्यानें आरबांस कळविलें, कीं तुमचें आतां येथें कांहीं एक प्रयोजन नाहीं. तुम्ही स्वदेशीं निघून जात असाल तर तुमचा प्रवासखर्च व राहिलेला पगार सरकार देईल. **मालेगांव** येथें आरब आपला जमाव करून बंदोबस्तानें राहिले होते. विंचूरकरांचें हें ठिकाण त्यांनीं बळजबरीनें हस्तगत केलें होतें, म्हणून तेथून त्यांस हुसकून देण्याचा विचार ब्रिग्जनें योजून ता. १५.५.१८१८ रोजीं मालेगांवावर आपली फौज रवाना केली. ता. १८

रोजीं आरबांनीं त्या इंग्रजांवर चालून घेतलें. तेव्हांपासून उभय पक्षांत कांहीं दिवस निकराचें युद्ध झालें, त्यांत पुष्कळ वेळां इंग्रजांचाच पराभव होत गेला. इतक्यांत तिकडे बाजीराव शरण गेल्यामुळें त्याचे पाठीवर असलेल्या इंग्रज फौजा मोकळ्या होऊन मालेगांवावर लढत असलेल्या इंग्रजांचे मदतीस आल्या. थालनेर येथें आरबांचा दुसरा एक जमाव होता, तो मोडून थालनेर हस्तगत करून तेथून त्या इंग्रज फौजा मालेगांवावर आल्या. तेव्हां मालेगांवच्या आरबांनीं शरणचिठ्ठी लिहून पाठविली. त्यावरून ता. १४·६·१८१८ रोजीं मालेगांवचें ठाणें आरबांनीं इंग्रजांचे स्वाधीन केलें, आणि राहिलेला पगार व वाटखर्ची घेऊन ते गांवोगांव निघून गेले. तथापि खानदेशांत इंग्रज सत्ता व्यवस्थित चालू होण्यास पुढें बराच काळ लागला. (Prinsep).

**अशीरगड** किल्ला युद्धारंभींच इंग्रजांनीं सिंद्याकडून आपल्या ताब्यांत मागितला, आणि सिंद्यानें त्याची सोडचिठी लिहून दिली, परंतु किल्लेदार यशवंतराव लाड किल्ला सहजासहजीं खालीं करून देणार नाहीं असें वाटल्यावरून इंग्रजांनीं त्याजवर हल्ला केला नाहीं. आपासाहेब व सीतू पेंढारी यांचा महादेवाच्या डोंगरांतून उठावा झाल्यावर ते दोघेही अशीरगडाकडे आले. यशवंतराव लाडानें आपासाहेबास मात्र किल्ल्यांत घेतलें, आणि सीतूस आंत घेतलें नाहीं. इतक्यांत माल्कम फौज घेऊन अशीरगडाकडे आला, तेव्हां आपासाहेब बैराग्याचें सोंग घेऊन बाहेर पडला. अशा स्थितींत अशीरगड प्रथम हस्तगत केल्याशिवाय या बंडखोरांचा पाडाव होणार नाहीं असें जाणून, मालकम व डोव्हटन किल्ल्यावर चालून गेले. प्रथम त्यांनीं किल्लेदारास दौलतरावाचा लेखी हुकूम आणून दिला, कीं किल्ला इंग्रजांचे हवालीं करावा. यशवंतरावानें होय म्हणून दिरंगाई चालविली आणि आपासाहेबास युक्तीनें बाहेर काढून दिलें. तेव्हां स. १८१९ फेब्रुवारी अखेरीस माल्कमनें किल्ल्यावर तोफा चालू केल्या; आणि कित्येक हल्ले चढविले ते यशवंतरावानें परत फिरविले. शेवटीं त्याचा नाइलाज होऊन त्यानें शरण जाण्याची बोली ठरविली आणि ता. ९·४·१८१९ रोजीं स्वतः स्वाधीन होऊन किल्लाही इंग्रजांचे हवालीं केला. किल्ल्यांत एक पेटी गुप्त कागदांची मिळाली तींत पेशवा, आपासाहेब व दौलतराव यांचा स्वदस्तुरचा पत्रव्यवहार माल्कम यास पुष्कळच मिळाला. त्यांच्या हातचीं पत्रें किल्लेदारास होतीं, कीं किल्ला इंग्रजांचे हवालीं करूं नये. याबद्दल इंग्रजांनीं सिंद्यास जाब विचारला असतां त्यानें हीं पत्रें आपलींच असें कबूल केलें, परंतु बाजीरावाच्या भिडेस्तव आपणास असें लिहावें लागलें, असें सांगून सिंदे म्हणाला, ' मीं बाजीरावास ग्वालेरीस बोला-

विलें होतें. कारण बाजीराव आतां इकडे येऊं शकत नाहीं याची मला खात्री होती, पण बुडत्या माणसास काढतां येत नाहीं तर नुसते हात पुढें करून त्यास आश्वासन देण्याचा फुकटचा चांगूलपणा तरी कां घेऊं नये ! ' सिंद्याचें हें वर्तन काय लायकीचें आहे याचा विचार वाचकांनींच करावा. जी जबाबदारी खुद्द दौलतरावास घेतां येत नव्हती, ती त्यानें किल्लेदारावर ढकलावी हें धनीपणास अनुचित होय.

असें कळतें कीं जिवाची परवा न करितां राज्य राखण्यासाठीं अखेरची धडपड करणारा हा **यशवंतराव लाड** पुढें अन्नास मोताद झाला. दौलतराव सिंद्यानें त्याचा परामर्ष घेतला नाहीं व इंग्रजांस तर त्याची कींव करण्याचें कारणच नव्हतें. शिरवळ जवळील वाटार बुद्रुक या आपल्या राहत्या गांवीं येऊन पुढें एक वर्षानें तो मरण पावला ( स. १८२० ). हा जातीचा मराठा होता. मुलाचें नांव बापोजीराव.

**काशीराव गोखले** नांवाचा बाजीरावाचा एक लष्करी सरदार कृष्णा आणि तुंगभद्रा यांच्या दुआबांतील प्रदेशांचे संरक्षणार्थ बाजीरावानें नेमला होता, असें मन्रो आपल्या पत्रांत लिहतो. त्याच्या हाताखालीं घोडदळ व पायदळ फौज चांगली होती. ता. १३ जूनच्या तहानें दुआबांतील हा प्रदेश बाजीरावानें इंग्रजांस लिहून दिला, आणि ' तो ताब्यांत घेण्यास इंग्रज फौजा येतील तर तो त्यांच्या हवालीं करूं नये,' अशी बाजीरावानें काशीरावास आंतून ताकीद दिली होती. प्रदेश ताब्यांत घेण्याची कामगिरी मन्रो याजकडे होती. त्यामुळें मन्रो यास मुख्यतः काशीरावाशींच लढावें लागलें. नवलगुंद इंग्रजांनीं घेतलें त्याजवर काशीराव चालून आला. त्याची व मन्रोची डिसेंबर १८१७ त बरीच झोंबाझोंबी झाली. नवलगुंदच्या ठाण्यांत मन्रोनें म्हैसूरचा रहिवासी रामराव यास किल्लेदार नेमिलें. काशीरावाचा मुलगा गोविंदराव गोखले यानें ता. १९·१२·१८१७ रोजीं रामरावावर चाल केली, पण रामरावानें नवलगुंदच्या बाहेर येऊन त्याचा पाडाव केला. त्या वेळीं काशीराव बदामी येथें होता, तेथून तो गोविंदरावाच्या मदतीस धावून आला. इतक्यांत इंग्रज फौजांनीं येऊन गोखल्यास नवलगुंदांतून घालवून दिलें. नंतर इंग्रजांनीं गदग, डंबळ, हुबळी वगैरे ठाणीं घेतलीं. या कामीं इंग्रजांना काशीरावानें सारखा त्रास देऊन त्यांचा पिच्छा पुरविला. ता. १८·१·१८१८ रोजीं बदामीचें ठाणें इंग्रजांचे हातीं पडलें. पुढें मन्रो बेळगांवावर आला; आणि ता. १० एप्रिल रोजीं बेळगांव मन्रोच्या हस्तगत झालें, तेव्हां काशीराव कृष्णा उतरून भीमेवर आला. यापुढें काशीराव गोखल्याचें काय झालें याचा खुलासा मन्रोच्या कागदांत नाहीं. त्याच्या कुटुंबाचाही पत्ता लागत नाहीं.

एवंच ता. ३ जून रोजीं बाजीराव नर्मदाप्रदेशांत माल्कम यास शरण गेला तावत्-कालपर्यंत इकडची दक्षिण इंग्रजांस मोकळी झाली. लगेच एल्फिन्स्टननें एकंदर प्रदेशाचे चार भाग करून त्यांजवर चार हुशार इंग्रज अंमलदार कमिशनर म्हणून नेमिले. कृष्णेच्या दक्षिणेकडील प्रदेशाचा कारभार व कोल्हापुर संस्थानाची देखरेख चॅपलिन् यास सांगण्यांत आली. वारणेपासून नीरेपर्यंतचा प्रदेश छत्रपतीस द्यावयाचा होता, ती व्यवस्था अंमलांत येईपावेतों त्याजवर कॅ. हेन्रि डंडास रॉबर्ट्सन याची नेमणूक करण्यांत आली. भीमेपासून चांदवडपर्यंतच्या प्रदेशावर हेन्रि पॉटिंजर याची नेमणूक झाली, आणि खानदेशाकडील मुलखाचा कारभार कॅ. जॉन ब्रिग्ज याचे सुप्रत करण्यांत आला. हे चारही गृहस्थ हुशार व इभ्रतीचे आणि क्रांतीच्या काळांत लोकांचीं मनें संतुष्ट ठेवून इंग्रजांचा अंमल स्थिरावण्यांत अत्यंत दक्ष होते. एल्फिन्स्टननें त्यांस कामाची दिशा लावून दिली. मुलखाचा बंदोबस्त, वतनदारांचे हक्क, कायदे. सरकार देणें, रीतरिवाज, देवस्थानें वगैरे नानाविध बाबतींसंबंधानें एक मोठी व्यापक प्रश्नावलि तयार करून ती एल्फिन्स्टननें या चौघांकडे पाठविली. चौघांनींही मोठ्या कसोशीनें तपास करून अत्यंत काळजीनें व मेहनतीनें त्या प्रश्नावलीचे जबाब तयार केले; ते व त्यांनीं गोळा केलेली माहिती आज सुद्धां मोटी उपयोगाची समजली जाते. चॅप्लिन, रॉबर्टसन, पॉटिंजर व ब्रिग्ज हीं चार नांवें अव्वल इंग्रजी कारभारांत विशेष नामांकित गणलीं जातात. यांस डेक्कन कमिशनर्स अशी संज्ञा आहे. खुद्द पुणें शहराचा कारभार रॉबिन्सन याजकडे होता. हा रॉबिन्सन व त्याच भागाचा कमिशनर कॅ. रॉबर्ट्सन या दोन व्यक्ती वेगळ्या आहेत हें वाचकांनीं ध्यानांत ठेवावें.

पेशव्याचे राज्याचा वसूल स. १८१५ सालीं इनामें जहागिरी वगैरे सोडून ९६७१७५३रु. होता. त्यापैकींपुढें २३ लक्षांचा मुलख साताराचे राजास देण्यांत आला; आणि बाजीरावास आठ लाखांची नेमणूक झाली, ते ३४ लाख वजा जातां बाकी ६२ लाखांचा मुलख इंग्रजांचे ताब्यांत आला. शिवाय जहागिरी वगैरे खालसा झाल्या त्यांचे २५ लाख वाढले. मिळून सर्व खर्च भागून इंग्रजांस सालीना पन्नास लाखांची निव्वळ बचत होऊं लागली. ( प्रिन्सेप ).

पुण्यास राहून एल्फिन्स्टननें मुलखांत इंग्रजी अंमल बसविण्याचे इलाज तावडतोब घेतले. त्यासाठीं तो प्रांतांत सारखा फिरत राहून किल्ले काबीज करीत होता. **चिमाजी आपा** पेशव्याची रजा घेऊन स. १८१८ च्या जून महिन्यांत परत येऊन फुलगांवीं राहिला. तेथें एल्फिन्स्टननें त्याची भेट घेऊन काशीस राहण्याची त्याची व्यवस्था लावून

दिली. ग० ज० कडून मंजुरी येईपर्यंत चिमाजीआपा चार महिने वसईस जाऊन राहिला. तेथून परत फुलगांवास येऊन साहेबांची रजा घेऊन पौष मासीं काशीस निघून गेला. मिळून स.१८१८ चें साल एल्फिन्स्टनला चांगलें फळास आलें. त्याच्या अपूर्व कामगिरीचें बक्षीस म्हणूनच कीं काय मुंबईच्या गव्हर्नरीवर नेमणूक झाल्याचा हुकूम त्यास ता. १८·२·१८१९ रोजीं मिळाला.

मराठे जहागीरदारांची व्यवस्था बांधून देण्यासही वेळ लागला नाहीं. जहागीरदारांचे तीन वर्ग करण्यांत आले. पहिल्या वर्गांत फलटणचे निंबाळकर, जतचे डफळे, मुधोळचे घोरपडे असे कित्येक दाखल करून दुसर्‍या वर्गांत प्रतिनिधि, सचिव इत्यादि प्रधान, व आंग्रे, अक्कलकोटकर वगैरे दाखल करण्यांत आले. पेशव्यांचे पदरचे सरदारांचा तिसरा वर्ग बनविण्यांत आला. हे सर्व आपापल्या सोईप्रमाणें बाजीरावाचा पडता काळ पाहतांच ता. ११ फेब्रुवारीच्या जाहीरनाम्यास अनुसरून थोड्या बहुत अवकाशांत इंग्रजांकडे येऊन आपली व्यवस्था लावून घेऊं लागले. बहुतेक बाजीरावाच्या अंमलास कंटाळलेच होते. जाहीरनामा लागल्याबरोबर लगेच इंग्रजांकडे जाण्याचा पहिला मान पंतसचिवानें मिळविला. नंतर प्रतिनिधीनें बाजीरावास सोडिलें. अक्कलकोटकरांस तर बाजीराव प्रथमपासूनच नको होता. तासगांवकर पटवर्धन गणपतराव परशुराम हा बाजीरावास मुळींच सामील झाला नव्हता. बाकीची पटवर्धन मंडळी फेब्रुवारी अखेर बाजीरावास सोडून इंग्रजांचे आश्रयास आली. आपा देसाई निपाणकर हा मूळ-पासून प्रसंग पडेल तसें धोरण ठेऊन वागणारा होता. बाजीरावाचें साह्य त्यानें मनापासून कधींच केलें नाहीं. पटवर्धनांप्रमाणें त्यानेंही थोडेंबहुत एल्फिन्स्टनकडे अनुसंधान ठेविलें होतें. माधवराव रास्ते शक्य तों पावेतों बाजीरावास चिकटून राहिला. पांढर-कवड्याजवळ शिवणी येथें बाजीरावाची वाताहत झाल्यावर तो उशिरां परत आला, त्यामुळें दोहींकडच्या फायद्यास अंचवला. प्रतिनिधि, सचिव, निंबाळकर, अक्कलकोटकर, डफळे व शेखमिरा यांनीं सातारा राज्यांत प्रतापसिंहाचे दिमतीस राहण्याची इच्छा दर्शविली, ती मान्य करण्यांत आली.

वरप्रमाणें जिंकलेल्या मुलखाची व्यवस्था करून एल्फिन्स्टन मुंबईस जाऊन ता. १·११·१८१९ रोजीं तेथील गव्हर्नरीवर रुजू झाला, तेव्हां त्याचे जागीं कमिशनर म्हणून पुण्यास चॅप्लिनची नेमणूक झाली.

# प्रकरण अठरावें

## पेशवे घराण्याची अखेरची अहवाल

What man has done, the little triumphs of his present state and all this history we have told, form but the prelude to the things that man has yet to do.

—H. G. Wells' a Short History of the World.

१ बाजीरावाचीं बायकामुलें व राहणी. २ पेशवे घराण्याचा शेवट.
३ बाजीरावाची योग्यता,–समकालीन लोकमत. ४ मोरोबादादा फडणीस.
५ अमृतराव रघुनाथ व त्याचा वंश. ६ चिमाजी आपा.

**१ बाजीरावाचीं बायका मुलें व राहणी.**—बाजीरावानें एकंदर अकरा बायका लग्नाच्या केल्या, त्यांपैकीं सहा दक्षिणेंत पेशवाईवर असतां आणि पांच राज्यच्युतीनंतर बिठूर येथें. त्यांचीं नांवनिशी येणें प्रमाणें:—

१ भागीरथीबाई, धोंडभट भागवताची कन्या, ल. १६·७·१७८६, मृ. १७९३.

२ सत्यभामा ( कीं सरस्वती ? ) धोंडोपंत मंडलिकाची*कन्या, ल. १८·६·१७९३, मृ. ६·१·१७९७ जांबगांवास सिंद्याचे कैदेंत असतां, क्रिया मुंढव्यास केली.

३ राधाबाई चिंतामण हरि ऊ० दाजीबा फडके याची कन्या, ल. १६·२·१७९७ ऋतुप्राप्ति ४·३·१८०० मृ. १९·५·१८०६.

४ वाराणसी, नानारास्ते फाटक वाईकर याची कन्या, ल. ११·६·१८०६ मेणवलीस नानाफडणिसाचे वाड्यांत.

५ वेणूबाई उ० कुसाबाई, हरि रामचंद्र देवधर याची कन्या, हिला बाईसाहेब म्हणत. ल. ३·६·१८०८, मृ. कार्तिक व. ७ शके १७३८ ता. १२·११·१८१६.

६ सरस्वती, बळवंतराव पेंडसे याची कन्या, ल. स. १८१२.

७ सत्यभामा, मुखरीकर अभ्यंकराची कन्या.

८ गंगाबाई, बळवंतराव आठवले पाडळीकर याची कन्या. इला दोन मुली झाल्या, १ योगाबाई व १ कुसुमाबाई. योगाबाईचा ज. श. १७६५, ल. श. १७७७ स. १८५५ बापूसाहेब कुरुंदवाडकर पटवर्धनाशीं, मृ. ब्रह्मावर्त येथें श. १७८०. कुसुमा

* यांचे नातू विश्वनाथ नारायण मंडलिक होत.

उ० बयाबाई उ० सरस्वतीबाई आपटे, जन्म १६·१·१८४७, ल. स. १८५५ त इंदुरास ग्वालेरचे बाबासा० आपट्यांचा चिरंजीव गणपतराव बापूसा०. हा स. १८८३ सालीं वारल्यावर बयाबाई काशीस जाऊन राहिली. तेथें तिच्या मालकीचा वाडा होता. स. १९१३ त इतिहासकार राजवाड्यांनीं तिची भेट घेऊन सर्व हकीकत लिहून ठेविली ते म्हणतात 'पेशव्यांच्या घराण्यांतील औरस संतति आज ही एकटी बाई आहे. ती निस्पृह, धैर्यशाली, व अभिजात असून भटांच्या घराण्यांतील मुखवट्याची ठेवण तिच्या चेहऱ्यांत दिसते.' मृ. ता.१९·६·१९१७.

९ मैनाबाई गोखले यांजकडील, मृ. नेपाळांत सईबाईच्या पूर्वी.

१० सईबाई रिसबूड यांजकडील, मृ. नेपाळांत १८९६.

११ चितळे यांजकडील एक.

'लाला परदेशी याचे लेकीशीं कव्यारीबरोबर श्रीमंतानीं लग्न केलें. तिजला पुत्र झाले आहेत,' असा आणखी उल्लेख आहे.

यांशिवाय बयाबाई दातार, सीताबाई शेंडे, मोरदीक्षित मराठे यांची स्त्री काशीबाई, उमा फडके, ताई पेठे वगैरे स्त्रिया बाजीरावाच्या मर्जीतल्या होत्या असें म्हणतात.

अनु. ४ वाराणसीबाई इच्या पोटीं १०·१०·१८१० रोजीं पुणें येथें पुत्र झाला, त्या प्रसंगीं बाजीरावानें मोठा उत्सव केला, त्याचा खर्च रु. १७८६४१ झाला. 'शुक्रवारचे वाड्याजवळ पाण्याच्या घागरी वोतल्या तें पाणी नदीस जाऊन मिळालें. नांव वामनराव ठेविलें. परंतु हा मुलगा पांच महिन्यांनीं ता. २७·३·१८११ रोजीं शुक्रवारचे वाड्यांत मृत्यु पावला. अ. ५ कुसाबाई ता. १०·९१८१६ रोजीं माहुली येथें प्रसूत होऊन मुलगा झाला, तो अकरावे दिवशीं वारला. त्याचे पश्चात् दोन महिन्यांनीं कुसाबाई माहुलीस वारली. अ ६ सरस्वतीबाई इला एक मुलगी झाली होती तीही लहानपणींच वारली. बाजीराव माल्कमचे स्वाधीन होऊन बिठूरला जाण्यास निघाला, तेव्हां अ. ४ वाराणसीबाई+ रायगडास होती, तो किल्ला इंग्रजांनीं मोर्चे लावून

---

+ स्कॉट वेरिंग लिहितो, 'The Maratha ladies ride out unveiled and I have seen the Peshwa's late wife plunging her horse before a crowd of spectators'. Duff says, 'the most ladylike Brahman ladies I have ever had occasion to couverse with, were the wives of the last Peshwa & of the Pratinidhi. The celebrated Waranasibai I

घेतला, तेव्हां बाईस खालीं उतरून त्यांनीं नवऱ्याकडे पोंचविलें त्या वेळीं तोफांच्या मारागिरींत शिवाजीचा राजवाडा व त्यांतला दप्तरखाना जळून गेला. वाराणसीबाई-शिवाय बाकीच्या बायका अगोदरच मेलेल्या होत्या असें दिसतें अ. ७-११ या चार बायका बाजीरावानें पुढें उत्तरेंत केल्या, परंतु त्यांपासून त्यास पुत्रसंतति झाली नाहीं.*

ब्रह्मावर्तास असतां पुत्रसंततीची निराशा वाटून बाजीरावानें बोर घांटाखालील माथेरान जवळच्या वेणगांव येथें राहणाऱ्या भट उपनांवाच्या एका सगोत्र कुटुंबास आपल्या जवळ आणिलें, ते माधवराव नारायण भट व त्याची बायको गंगाबाई होत. यांस धोंडू म्हणून एक मुलगा स. १८२४ त झाला होता. त्या नंतर आणखी मुलें झालीं, त्यांची नांवनिशी पुढील कोष्टकांत दाखविली आहे. धोंडोपंतास ता. ७·६· १८२७ रोजीं बाजीरावानें दत्तक घेऊन नांव नानासाहेब ठेविलें. त्याचा आणखी एक भाऊ व एक चुलतभाऊ यांसही आणखी दत्तक घेऊन बाजीरावानें आपल्या मतें निर्वंश होण्याची भीति पार नाहींशी केली.

बाजीरावाची दत्तक संतति

| १ द. धोंडोपंत नानासाहेब जन्म १८२४ | २ द. सदाशिवराव दादा साहेब | ३ द. गंगाधरराव बाळा साहेब |
| --- | --- | --- |
| | ४ पांडुरंग रावसाहेब ( द. )=रमाबाई ( ओक ) | |

was obliged to send from Wai & she behaved well when I told her that she had to proocced to join the Shrimant'.

* बा. रो.; इ. वृ. १८३९ पृ. ४१९: ऐ. स्फु. ले. ३·३; पे. ब: पे. अ; भा. व. श; ऐ. गो.

१ नानासाहेबाच्या बायका ३, सारजाबाई ( करमरकर ), सारजाबाई ( पाटणकर ), व कृष्णाबाई ( करमरकर ). नानासाहेबाचा मृत्यु नेपाळांत ता. ६·१०·१८५८. नं. २ ची बायको रोहिणीबाई ( कारलेकर ) व नं. ३ ची काशीबाई ( गोडबोले ), मृत्यु नेपाळांत. ४ फांशी ब्रह्मावर्त येथें ता. २०·८·१८६२. नं. १ व ३ हे सख्खे बंधु, नं. २ व ४ हे चुलत बंधु.

बाजीरावाच्या ब्रह्मावर्त येथील राहणीसंबंधानें खालील उल्लेख वाचनीय आहेत. बापू गोडबोले लष्करसह, हुजरातपैकीं पांच पागा, बापू गोखल्याचे हाताखालील रामचंद्र व्यंकटेश व पागा, बापू गोखल्याचे मामा बाळाजीपंत मराठे यांची पागा, बापू गोखल्याचे तैनातींतील भिकाप्पा जगताप याची पागा, ढमढेऱ्याचे हाताखालील श्रीधर बापू दामले याची पागा, बाळोबा दादा सलकाडे १५० स्वारांसह, शिवाय घोडे, हत्ती, उंट, पालख्या, गाड्या वगैरे लवाजमा बाजीरावाबरोबर ब्रह्मवर्तास गेला.

ब्रह्मावर्त येथें भागीरथीचे कांठीं सुमारें ६ मैल परीघाची जागा बाजीरावाचे छावणी-साठीं नेमून दिलेली होती. खुणेकरितां सोळा दगडी स्तंभ सभोंवार उभे केले. कॅप्टन लो जो पूर्वी माल्कमनें बाजीरावाचे भेटीस पाठविला होता, त्यासच बाजीरावाचे बंदोबस्तास रेसिडेंट म्हणून नेमिलें. यापूर्वी तीनच वर्षें इंग्रजांचा युरोपांतील दुसरा शत्रु नेपो-लियन यास स. १८१५त त्यांनीं सेंट हेलेना येथें नेऊन ठेविलें त्या वेळीं त्याच्यावर देख-रेख ठेवण्यासाठीं लो याच नांवाचा गृहस्थ नेमलेला होता. मात्र नेपोलियनचे जसे त्या लोनें हाल केले तसे बाजीरावाचे यानें हाल केले नाहींत. बाजीराव अखेरपर्यंत मोठ्या चैनींत राहिला, त्यास आपल्या बंदीवासाचें यत्किंचित् दुःख वाटलें नाहीं. भागीर-थीच्या सान्निध्यांत त्याचे धार्मिक व कौटुंबिक आचार यथासांग व यथेच्छ चालले.

कॅप्टिन लोनें स. १८२५ पर्यंत काम केलें. नंतर त्याचे जागीं कॅप्टिन बेकन स. १८२५–२९ पर्यंत, मेजर मॅन्सन १८३०–५० पर्यंत व शेवटीं कॅप्टिन मोर्लंड असे चार इंग्रज अंमलदार झाले. त्यांपैकीं मॅन्सननें पुष्कळ वर्षें कारभार केल्यामुळें त्याचें नांव बाजीरावाचे मंडळींत विशेष परिचित होतें. पुनः कोणताही उपद्याप करण्याचें धाडस बाजीरावास झालें नाहीं, त्यामुळें इंग्रजांकडूनहीं त्यास कांहीं उपसर्ग झाला नाहीं. एकदां स. १८३६ त मॅक्स्वेल व त्याचा हस्तक उमराव अली या दोघांनीं बाजीरावाची भेट घेऊन तुम्हांस पुण्यास परत पाठवितों आणि तुमची पेशवाई तुम्हांस देववितों अशा थापा मारून, साडेअकरा हजार रुपये उपटले. त्याबद्दल कानपुर येथील जज्जापुढें त्या दोघांची चौकशी होऊन त्यांस शिक्षा झाली. या कामीं मॅन्सनें सरळपणा ठेविल्यामुळें बाजीरावाचा निभाव लागला.

स. १८२७ सालीं बाळोबा सलकाडे बाजीरावास सोडून काशीस जाऊन राहिला आणि तेथें स. १८३३ त मरण पावला. ब्रह्मावर्त येथें बाजीरावाचा मुख्य कारभार रामचंद्र व्यंकटेश सुभेदार पाहत असे. तो बाजीरावाचे पश्चात् एक वर्षानें मरण पावला. त्याच्या वंशाकडे हल्लीं बिठूर येथील कांहीं शेतें व वाड्या चालत आहेत.

'बाजीरावांनीं ब्रह्मावर्त येथें एक उत्तम राजवाडा बांधिला होता, तो फार भव्य व युरोपियन तऱ्हेनें भरपूर शृंगारलेला होता. दिवाणखाने मोठमोठ्या आरशांनीं व झुंबरांनीं गच्च भरून गेले होते. तसेंच भरगच्ची पडदे, रेशमी व जरीचे गालीचे, आणि अनेक मौल्यवान चिजा यांचे योगानें पेशवाईचें वैभव तेथें मूर्तिमंत वास करीत आहे असें दिसत होतें. चांदीसोन्याचीं भांडीं, हत्तीघोड्यांचे सोन्यारुप्याचे अलंकार, हौदे, अंबाऱ्या, मेणे, रथ, पालख्या वगैरे पेशवाई दौलत तेथें पूर्ण अस्तित्वांत होती. तसेंच कुत्रीं, हरणें, काळवीट वगैरे नानाप्रकारचीं जनावरें हौसेनें पाळलेलीं दिसत होतीं. त्या योगें ब्रह्मावर्त येथें एक नवीनच राजधानी निर्माण होऊन ती राजवैभवानें व जनसमुदायानें प्रफुल्लित दिसत होती.'

'बाजीराव मोठे उदार व धर्मात्मे अशी सर्वत्र प्रसिद्धि असल्यामुळें तेथें दक्षिणेंतून व काशी, प्रयाग, ग्वालेर, इंदूर वगैरे ठिकाणांहून ब्राह्मण लोकांचा समुदाय पुष्कळ जमला होता. त्यांत नित्यशः पंचपक्वान्नांचें सुग्रास भोजन व रौप्य दक्षिणा मिळत असे. ज्या ठिकाणीं ब्राह्मणभोजनें होत, त्या जागेस ' वर्दी' असें म्हणत. अद्यापि ती जागा त्या नांवानें प्रसिद्ध आहे. बाजीरावाच्या औदार्यानें ब्रह्मावर्तास नुसते ब्राह्मण लोकच जमा झाले नव्हते, तर पहिलवान, गवई, बीनकार, बहुरूपी वगैरे अनेक गुणिजन जमले होते. त्यांना त्यांच्या गुणांप्रमाणें आश्रय व बिदागी मिळे. बाळंभट दादा हा प्रख्यात पेहलवान बाजीरावाजवळ होता. त्यांनीं लखनौच्या नबाबाकडून आलेल्या एका गर्विष्ट पेहलवानाचा गर्व एका क्षणांत परिहार केला. बाळंभटाप्रमाणेंच सिद्दीक, बडा हरि, छोटा हरि, असे आणखी तीन पेहलवान बाजीरावाचे पदरीं सुप्रसिद्ध होते. बाजीराव शोकी व विलासी होते हें प्रसिद्धच आहे. ही त्यांची वृत्ति अखेरपर्यंत कायम होती. शरीरप्रकृति खंबीर असून त्यांच्या ऐषआरामांत व सुखांत कधीं अंतर पडलें नाहीं. रघुनाथराव विंचूरकर काशीयात्रेस गेले असतां त्यांनीं बाजीरावाकडे जाऊन कांहीं दिवस त्यांच्या सहवासांत घालविले, त्याची मनोरंजक हकीकत त्यांनीं आपल्या तीर्थयात्रा प्रबंधांत छापली आहे. तीर्थयात्रा करून रघुनाथरावास बाजीरावानें पुनः ब्रह्मावर्तास बोलाविलें आणि सांगितलें, ' यात्रा करून परत यावें. याच मुक्कामीं तुमचें लग्न कर्तव्य आहे.' या वेळीं बाजीराव व विंचूरकर दोघेही समवयस्क पाऊणशें उमरीचे होते !

बाजीरावाच्या सांनिध्यांतील तीन माणसें पुढील शिपायांच्या बंडांत प्रसिद्धीस आलीं. पैकीं खुद्द नानासाहेबाची हकीकत वर आलीच आहे. तात्या टोपे व त्याचा बाप अण्णा टोपे हे येवलें येथील राहणार ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मण प्रथम गोदातीरीं

कान्हे गांव आहे तेथील नरहरीची पूजा करून राहत असत. तेथून ते विंचूर-करांचे पागेंत बाजीरावाकडे ब्रह्मावर्तास गेले.' तात्या दिसण्यांत सुरूप व रुआबदार असून १८५७ सालीं सुमारें पंनाशीच्या जवळ होता. ता. १८ एप्रिल १८५९ रोजीं शिप्री येथें त्यास फांशीची शिक्षा झाली. तिसरी व्यक्ति झांशीची लक्ष्मीबाई. इचे वडील मोरोपंत तांबे व मातुश्री भागीरथी बाई काशी येथें चिमाजी आपाजवळ असत. चिमाजी आपा वारल्यावर तीं बाजीरावाजवळ गेलीं. काशी येथें त्यांस स. १८३५ त मुलगी झाली तिचें नांव मनूबाई. हिचें लग्न स. १८४२ त झांशीचे गंगाधरराव बाळासाहेबांशीं होऊन तिचें नांव लक्ष्मीबाई असें ठेवण्यांत आलें. लहानपणीं इचा काल नानासाहेब व त्याचे बंधु यांचे सांनिध्यांत गेला. स. १८५३ त गंगाधरराव वारला. ही बाई इंग्रजांशीं लढत असतां १८·६·१८५८ रोजीं ग्वालेरजवळ समरांगणीं पतन पावली. त्या वेळीं तिचा दत्तक पुत्र दामोदर नऊ वर्षांचा होता. *

**२ पेशवेघराण्याचा अंत** शोकजनक झाला ही गोष्ट कै. राजवाड्यांनीं बाजीरावाची मुलगी बयाबाई आपटे यांस समक्ष भेटून जी हकीकत प्रसिद्ध केली, तिजवरून स्पष्ट आहे. ही हकीकत त्या बाईकडून निघाली नसती तर बाजीरावाचे तीन दत्तक मुलगे व त्यांच्या बायका वगैरेंचें काय झालें हें इतिहासांत कधींच बाहेर येऊं शकलें नसतें. ' बाजीराव ब्रह्मावर्तास राजैश्वर्यानें रहात. स्नान संध्या, जेवणखाण, व्रतें–उद्यापनें, मंत्रघोष व जुजबी ऐष आराम अशा सुखवस्तु स्थितींत बाजीरावानें ब्रह्मावर्तास ३३ वर्षें काळ लोटला. तो शरीरानें धष्ट पुष्ट, काठीनें उंच व चेहऱ्यानें उमदा दिसे. ७५ वर्षांचे वयांत सुद्धां चेहऱ्यावर उमदेपणा जास्त दिसतो. एकंदरींत पुरुष निष्काळजी व बालिश खरा. स्वशरीर–संरक्षण एवढीच या गृहस्थाची काळजी. यापलीकडे दुसरी जबाबदारी त्यानें ओळखिली नाहीं, व ओळखण्याचें सामर्थ्यही त्याच्या अंगांत नव्हतें. साम्राज्य, तत्संबंधक राष्ट्राच्या पुढाऱ्यावरील जबाबदारी, प्रजेचें ऋण वगैरेंची जाणीव या पुरुषाला भासलीच नाहीं.'

बाजीरावाच्या पश्चात् त्याचें ८ लाखांचें वेतन आपल्यास मिळावें म्हणून धोंडोपंत नानासाहेबानें फार खटपट केली. पण वेतन नाहीं तर इतर हिंदी सत्ताधीशांच्या साह्यानें राज्य मिळविण्याचा प्रयत्न केला, त्यास उत्तरेंत ' नानागर्दी ' म्हणतात. स. १८५७ च्या जुलईंत नाना कानपुर सोडून परिवारासह अयोध्या प्रांतांत गेला.

---

* ऐ. स्फु. ले. ३. २४; विं. घ. इ.

हीच तात्या टोपे याची व त्याची शेवटची भेट. अनेक अडचणी व हाल अपेष्टा खात नानासाहेब नेपाळांत शिरला. बरोबर दोघी मातुश्री, स्वतःचें व बंधूंचें कुटुंब व पुतण्याचें व त्याचें कुटुंब आणि कुसुमाबाई आपटे वगैरे बराच मोठा परिवार होता. बंडाच्या सुरवातीनंतर नानासा० व राणी लक्ष्मीबाई यांची गांठ पडलेली नाहीं. रावसाहेबाची व तिची मात्र गांठ ग्वालेरीस पडली होती. नेपाळांत लपत छपत कांहीं दिवस काढल्यावर नानासाहेबास दोषी ज्वर येऊन तो नेपाळ हद्दींत ठाडाजवळ देवखरी येथें ता. ६·१०·१८५८ बुधवार रोजीं मरण पावला. उत्तर कार्य ठाडा येथें झालें. नानासाहेबाबद्दल ज्या उगाच कंड्या पिकल्या त्या सर्व झूट आहेत. नानासाहेबाच्या अगोदर तीन महिने ता. १०·७·१८५८ रोजीं बाळासाहेबही दोषी ज्वरानेंच मरण पावला. स्वतः रावसाहेब व त्याचें कुटुंब रमाबाई हीं दोघें नेपाळांतून परत आलीं. रावसाहेबानें लक्ष्मीबाईस मिळून बरीच दंगल माजविली. तेव्हां त्यास पकडून ब्रह्मावर्त येथें राजवाडे यांच्या घरासमोर ता.२०·८·१८६२ रोजीं फांशीं देण्यांत आलें. नानासाहेबाच्या पश्चात् बायांनीं खाटमांडूस जाऊन तेथें एक स्वतःचा वाडा बांधिला; तीन चार लाख रुपये खर्चून उत्पन्नासाठीं कांहीं गांव खरेदी केले; नेपाळ हद्दींतच राणीगंज नांवाचें गांव नवीन वसवून तेथें एक रामाचें व एक लक्ष्मीनारायणाचें अशीं दोन मंदिरें स्थापिलीं; आणि त्यांत मराठ्यांचा भगवा झेंडा व पेशव्यांची गादी ठेविली, ती अद्यापि आहे. बाजीरावाची बायको सईबाई स.१८९६ त वारली, त्यापूर्वींच बाकीच्या सर्व बाया वारल्या होत्या. त्या सर्वांनीं आपला काळ अत्यंत साधु वृत्तीनें वैराग्यावस्थेंत कंठिला. कानपुरच्या कत्तलीशीं नानासाहेबाचा बिलकूल संबंध नव्हता, उलट त्यांनीं इंग्रजांचे जीव वांचविण्याचाच प्रयत्न केला असें बयाबाई सांगत. ही बाई बंडाचा उपशम झाल्यावर ग्वालेरीस आली आणि वैधव्य प्राप्त झाल्यावर काशीस जाऊन राहिली. ती स.१९१३त पुण्यास आली होती. तिचा मृत्यु काशी येथें ता.१९·६·१९१७ रोजीं वयाचे ७० वर्षी झाला. नेपाळ सरकारानें सईबाईच्या मृत्युनंतर जहागीर खालसा केली. देवस्थान मात्र चालू असून त्याची पूजा तांबे नांवाच्या कुटुंबाकडे आहे. अमृतराव पेशव्याचा वंश बरेली येथें आहे, त्यांस चित्रकूटवाले म्हणतात.

**३ बाजीरावाची योग्यता, समकालीन लोकमत.**—याच्या योग्यतेसंबंधानें लोकसमजुतींत पुष्कळ मतभेद असल्यानें आज नवीन अभिप्राय बनविण्यापेक्षां समकालीन लोकांचे अभिप्राय जास्त प्रमाणभूत मानतां येतील. सबब तसे लेख खऱ्यांच्या व इतर पुस्तकांतून एकत्र करून खालीं देण्यांत येत आहेत.

आरंभीं पुणेकर मंडळींना बाजीरावाचा बिल्कूल परिचय नव्हता. ता. ४ डिसेंबर १७९६ रोजीं जुन्नराहून येऊन त्यानें पुण्यांत प्रथम प्रवेश केला तेव्हां लोकांना त्याजबद्दल अत्यंत आदर वाटला. ता. २६·२·१७९६ रोजीं पटवर्धनांचा कारकून लिहितो:—'उभयतां श्रीमंत बाजीराव व बंधु चिमाजीअपा योग्य आहेत. त्यांत थेरले श्रीमंत वय लहान होत्साते, यश थोर. सहनशीलताही बहुतच. पत्रीं काय लिहावी ?' ता. ८ मार्च. ' श्रीमंतांचे बुद्धीची शर्त आहे. शरीरेंकरून दृढ, गोड भाषण, बोलण्यांत जरब, याप्रमाणें तारीफ आहे. बाजीरावसाहेब किंचित् सांवळे वर्णाचे आहेत. गोरे फार नाहींत. नाकडोळे चांगले आहेत. वित्पन्न आहेत. बोलणें फार पाहिजे. माणसांचा कंटाळा नाहीं. स्नानसंध्या फार आहे. अठरावे घटकेस भोजन होतें. रात्रौ बारावे घटकेस भोजन होतें. एकादशी केवळ निरशन करितात. तीन स्नानें करितात. धर्माविषयीं वासना बहुत आहे. कृपणपणा अगदीं नाहीं. देवब्राह्मण यांजवर निष्ठा फार आहे. परंतु कांहींशी वृत्ति भोळी आहेशी भासते. चिमाजी आपा गोरे फार. उभयतांची प्रकृति चपळतेविषयीं आणि बुद्धिविषयीं सारखीच आहे; परंतु बाजीरावाचे ठायीं क्रोध कांहीं जाजती आहेसा भासतो. मेहेनती चांगले, शरीरेंकडून चांगले बळकट असे आहेत. बोलणें बहुत समयोचित आहे. बोलण्यांत व चालण्यांत सरळता बरी दिसते. बंधूची मर्जी चिमाजी आपा बरी राखितात. उभयतांचें भोजन वेगळें होतें. आजपावेतों अज्ञातवासीं होते, त्यास विना समजून सांगितल्या-शिवाय आगतस्वागत कोणास कसें करावें हें अंमळसें अवघड दिसतें. परंतु धूर्त आहेत, समजतात लवकर. एक वर्षपर्यंत दुसऱ्यांचें काम लागेल, मग कोणताही कारभार स्वतः करतील यांत संदेह नाहीं.'

कालांतरानें बाजीरावाचे एक एक गुण लोकांस माहीत होत चालले, तसें त्याज-बद्दलचें मत बदलत गेलें. ता. ९·७·१७९७ ची नोंध. ' वाड्यांत कांहीं एक कारभार श्रीमंत करीत नाहींत. जाबसाल करावयास अगदीं कळत नाहीं. कोणी विनंति केली असतां, ' नानाकडे जावें, आमचेकडे काय आहे; जुन्नरास ( कैदेंत ) आहों ऐसें समजोन त्यांजकडून जाबसाल करवून घ्यावे, ' ऐसें म्हणतात. देण्याचा सुमार नाहीं. फकीर बैरागी, हातपाय तुटके याप्रमाणें दहा पांच खुळें वाड्यांत जाहलीं आहेत. नाच रागरंग, पोऱ्यांचें गाणें श्रीमंत ऐकत असतात. कारभाराविषयीं कांहीं एक बोलत नाहींत, त्यावरून गांवांत लोक म्हणतात, कीं, यांजवळ ऐवज ( अकलेचा ) कांहीं नाहीं. यांच्या हातून कांहीं व्हायचें नाहीं. त्यांचें व अमृतरावांचेंही आंतून वांकडें आहे. मन शुद्ध नाहीं. श्रीमंत त्रिवर्ग यांचें व नानांचें कालत्रयीं बनायचें नाहीं.'

'श्रीमंतांस देण्याचा सुमार नाहीं. स. १७९७ च्या श्रावण मासांत ब्राह्मण सालाबादपेक्षां जास्ती आले. प्रथम दिवशीं तीस हजार आले गुदस्तां वीस हजार होते. दुसरे दिवशीं छत्तीस हजार शिधा पावले. शिवाय तीन हजार रिकामे आले. यंदां साठ हजार पर्यंत ब्राम्हण होईल अशी बोलवा आहे. गांवांतून रस्त्यांत ब्राम्हणच ब्राम्हण दिसतात. नवीन ब्राम्हणही ( सालाबाद दक्षणेच्या पटांत ) लिहिले त्यांस आंख उत्तम १५–४० पर्यंत घालून रुपये दिले. गेल्या वर्षी दीड लक्ष दक्षणा होती ती यंदां दुप्पट झाली. श्रीमंतांनीं आपल्या हातें दोनशें, चारशें, बाराशें, चवदाशें, दोन हजार पर्यंत दक्षिणा दिली. आजपर्यंत चार दरवाजे चालू होते, पांचवा दादासाहेबांचा चिणला होता, तो यंदां चालू केला. त्याच दरवाजावर श्रीमंतांनी बसून मोहरा, होन, पुतळ्या, रुपये, मोतीं वगैरे मिळून खिचडी करून वांटली. नानांनीं रमण्यांत जाऊन पायउतारा प्रदक्षिणा घातली.' नंतर मग सिंदे आले ते दोन घटका रात्रीस गेले. ब्राह्मण सुटावयास प्रहर रात्र झाली.' ही पैशाची लूट व ब्राह्मणांची संभावना, आणि फौजेची उपासमार व रयतेची दैना एकसमयावच्छेदें मनांत आणावी, म्हणजे राज्याचें संरक्षण फौजेच्या बळापेक्षां ब्राह्मणांच्या आशीर्वादानें होतें ही बाजीरावाची भावना स्पष्ट दिसेल. मात्र खुद्द त्याच्या 'सरकारी राहत्या वाड्यांत दिव्यास तेल, विडयांस पानसुपारी वगैरे व बारीक तांदुळ सुद्धां मानसिक,' अशी स्थिति होती.

स. १७९८ त सर चार्लस् मॅलेट इंग्लंडास गेला त्याजबरोबर बाजीराव पेशव्यानें इंग्डलंचे राजास एक पत्र व कांहीं चिजा नजर पाठविल्या. पत्राचा तर्जुमा फोर्बसनें दिला आहे ( भा. २ पृ. ३०२ ), त्यांत बाजीरावानें मॅलेटची स्तुति भरपूर करून राजाचें अभीष्ट चिंतिलें आहे.

ता. ७·११·१८००. 'श्रीमंतांची मर्जी बहुत कठिण. कोणास अंत लागत नाहीं. ब्रह्मादिकांस कळावयाची नाहीं, मग मनुष्यांस काय कळे ! लोक तों दीनप्राय जाले आहेत. कोणे समयीं कोणती अदावत येईल समजत नाहीं.' एका प्रसंगीं बाजीराव पटवर्धनांचे वकिलास बोलला, 'इंग्रजांनीं पुढें पुणे प्रांतावर येऊं नये, सिंद्यांनीं देशीहून निघोन जावें, म्हणोन सिंदे लाथा मारतात त्याही सोसतों.' 'पुढें ईश्वरें संहार रयतेचा मांडिला, कोठेंच स्वस्थ नाहीं. श्रीमंतांना सांगितलें असतां रोष येतो. रोष यावयाचें कारण पारिपत्य हातून होत नाहीं; आणि लोकही श्रीमंतांस मनस्वी बोलतात, कीं यांची मुद्रा जाल्यापासून ( राज्याचा ) संहार आला, श्रीगजाननाखेरीज त्राता

दुसरा नाहीं. समय विषम आहे. सरकारांत कोटि होमास प्रारंभ केला होता. काल समाप्त जाहली. मोठें अनुष्ठान श्रीमंत पुण्यवान. ब्राह्मणास दक्षणाभोजनादिक साहित्य धर्मराज गृहींसारखें. भोजनसमयीं अत्यादर विनंति करावी असे नियम. श्रीमंतांनीं सहकुटुंब येऊन यज्ञाची सांगता केली. ब्राह्मणांचें आतिथ्य होतें तें पत्रीं काय लिहावें! रांगोळ्या, पांच सात भाज्या, नित्य एक मिष्टान्न, दहीं, कोशिंबिरी, आतिथ्य, उत्या गंधाच्या, केळींचीं पानें.'

या पुढील सुमारें एक वर्षाची हकीकत ता. २२·९·१८००ची. 'येथील दरबारचे केवळ बारीक विचार पाहतां दौलतीमध्यें पांच पिढ्यांचे सेवक आहेत, त्यांचे ठायीं अगत्य असावें, याखेरीज अलीकडेही श्रीमंतांचे दौलतीमध्यें दहा वीस वर्षांमध्यें नांवलौकिकास सेवा करून आले असे गृहस्थ पदरीं आहेत, पुढेंही सरकारकामास अंतर करावयाचे नाहींत, त्यांचें संरक्षण करावें, हा विचार श्रीमंतांच्या ध्यानांत तिलप्राय येत नाहीं. जेणेंकरून नाहीं सारखे होतील तो अर्थ करावा. पागा दहा पंधरा मोडिल्या. बाकी राहिलेल्या पुढें ठेवीत नाहींत. दोन महिन्यांमागें चार दोन घटका चांफेखणांत बसून कारभार आठ पंधरा दिवस चालला. अलीकडे तोही विचार राहिला. निकटवासी तूर्त शागीर्द, खिजमतगार, कोपरगांवकर मंडळी तितकेच मात्र आहेत. जवळ कारभारी शागीर्द ज्यांस कोणाची ओळख नाहीं, अक्षर-शत्रु, केवळ शुद्ध शागीर्द त्यांस मोठमोठीं कामें सांगावीं, त्यांस उजेडास आणावें, हें ध्यानांत रात्रंदिवस वसतें. कोथरुडास स्वारी एक दोन दिवसांनीं जात असत्ये. दोन अडीच प्रहर रात्रीस माघारी येते. श्री. सौ. बाईसाहेब नेहमीं स्वारी समागमें असतात. भरं-वसा बोलण्याचा तिलप्राय नाहीं. दहा पांच गृहस्थ मातबर चार घटका एक जागां बसोन, कामकाज बोलणें चालणें विचार व्हावा, तो अर्थ होत नाहीं. पहिलें कांहीं नसावें हे उमेद आहे. गोड बोलोन विश्वासघात करावा ही विद्या पूर्ण आहे. असो. परंतु कारभारही करितां येतो ऐसा प्रकार आहे म्हणावें तर तोही नाहीं. नाहीं येत असा म्हणावा तरी घोटाळा चाललाच आहे. बरें अथवा वाईट जें खावंद सांगेल तें सेव-कानें ऐकलेंच पाहिजे. मनांत कांहीं येक ठेवून उपायच नाहीं. कामकाजें तूर्त होणें अथवा आज्ञा चालणें ते या रीतीची चालली आहे. कोणास भरंवसा बोलण्याचा नाहीं. एक अवसरें सर्वांचा भोग उत्पन्न जाहला आहे. लाचार, उपाय नाहीं. सरकारचे पदरचे सेवक किंवा अन्यत्र बहुतां दिवसांचे, कुटुंबवत्सल, त्यांच्या दिनचर्या चालणें कठिण. प्राणांशीं गांठी आहेत. पुण्यामध्यें कोणी एक आबालवृद्ध चांगलें

म्हणत नाहीं. पुढें याचा विचार श्रीनें कसा योजिला आहे कळत नाहीं. परिणाम चांगला नाहीं, असें लोक स्पष्ट बोलतात. पत्र विसर्जन जालें पाहिजे.'

'इंग्रजांचा वकील पामराशीं बोलावयाचे भाव लिहिले त्यास हा सुमनुष्य नाहीं. श्रीमंताचें जें लक्ष तेंच राखल्यास परिणाम आहे. आपण म्हणतील असें कां? त्यास राज्य बुडतें हें तर खरेंच. या श्रीमंतांचें दैवच तसें आहे. घरचे घरीं राज्य बुडावें, परशत्रूंनीं उठों नये; आणि त्यांनीं आज्ञेप्रमाणें वर्तावें, त्यास इलाज कोणाचा! त्यास हे भाव चित्तीं आणून वर्तणूक झाल्यास चार दिवस कालहरण होईल. श्रीमिंतांपाशीं प्रमुख बाळोजी कुंजर ( पुरंदऱ्याचे लेकावळे ), बळवंतराव नागनाथ ( श्रीमंतांची दया ), गोपाळराव मुनशी ( इंग्रज पामराकडील संधान ), सदाशिव माणकेश्वर ( नबाबाकडील संधान ), आणि चिंतोपंत देशमुख फडावर, अशी मंडळी जवळ आहे.

'श्रीमंतांनीं विजयादशमीस नवीन पालख्या वगैरे बक्षिसें दिलीं. सासरे धोंड-भट भागवत यांचे घरीं रात्रौ फराळास गेले. सासूस लुगडें आठशें रुपयांचें व त्यांचे सुनेस सहाशें रुपयांचें भरजरी दोन्ही दिलीं. शिवाय सहा हजार रुपयांचा कंठा सुनेस दिला. धोंडभटाचे मुलास कर्नाळा किल्ल्याची मामलत दिली. वरकड जव-ळच्या मंडळीस झाडून पोषाख सोनेरी बुट्टीचे दिले. हजार आठशें खालीं पोषाख कोणास नाहीं. रामचंद्र गोसावी गाणार चांगले त्यांस हत्ती दिला, रविवारांत सरकारी वाडा देऊन ठेविले. त्यांचें गाणें एकांतीं नवे इमारतींत (=विश्राम बागेंत ) चार पांच दिवशीं होत असतें. ते समयीं अन्यत्राचा प्रवेश नाहीं. सुप्रसिद्ध गाणारीण व्यंकटनरसी इचा नाच व रामचंद्र गोसावी पैठणकराचें गाणें तीन रात्र संतत केलें. श्रीमंतांनीं प्रसन्न होऊन अनुक्रमें २६ हजार व दहा हजार रु. बक्षीस दिले. जन त्रिविध वाटेल तें बोलतात. श्रीमंतांचा कावा अट्टल. मनचें मुखचें कोणास कळावयाचें नाहीं. काल काय बोललों, आज काय बोलतों याचा सुमार नाहीं. दोन घटकांनीं एखाद्याचा घात अथवा ऊर्जित करावें असें असतां कोणास कळावयाचें नाहीं. मागील मातबर सरदार मुत्सद्दी सहजांत निर्माल्य होतील तिकडून करावे हा भाव सात पडद्या आंत आहे. चटक कारभाराची नाहीं; उत्तर समर्पक होत नाहीं, सारांश विचार पाहतां चांगला नाहीं. मुख्य, ज्येष्ठ, कनिष्ठ येणेंप्रमाणें पौष शुद्ध ६ स. ( १२·१·१७९९ ) तुळापुरीं जाऊन तेथें स्नान संध्यादि भोजन करून सायंकाळचे सहा घटका दिवसास पुण्यास आले.' हा दिवस संक्रान्तीचा असावा. 'नाशकास गोदातीरीं व वाईस

कृष्णातीरीं नक्षत्रवृष्टि दोन घटका पावेतों झाली. श्रीमंतांनीं शास्त्रतः विचार करून सरकारवाड्यांत अद्भुत शांत केली. गंगेपलीकडे भूकंप जाला, त्यावरून शांति करावयास आज्ञा गेली.'

ता. १·१·८०० 'बहुता दिसांचे सरकारवाड्यांत भोजन करीत होते, त्यास थोरले पंगतीस दीडशें पावेतों पात्र होत असे, त्यांस फांटा दिला. दहावीस असामी मात्र करार केले. बाकीचे दूर करून थोरली पंगत मोडली. शागीर्द देखील पंगतीस जेवण्याचे दूर जाले. वाड्यांत पंधरा असामी ब्राह्मण हौदाचे चौकांत मोऱ्या वगैरे धुवावयास चौकीदार ठेविले. ब्राह्मण कामाठी असें नांव त्यांस सहजांतच पडलें. श्रीमंतांचें सोवळें फार. ईश्वराची कृपा म्हणून राज्याधिकार आहे. नित्य दानास वीस रुपये आकार होता, त्यास वैदिकासच द्यावें हा विचार सोडून जवळ शागीर्द आहेत त्यांसही द्यावें. दर असामीस दोन तीन चार वेळां नित्यदान पावलें. दादा गद्रे यांस एके दिवशीं आग्रहानें पाटावर बसवून संकल्पपूर्वक नित्यदान दिलें.'

ता. १४·८·१८००. 'अमृतरावसाहेब काय मनसबा करून पुण्यांतून गेले म्हणोन लिहिलें, त्यास सिंदे अपकार करतील म्हणोन बंधूंचा निरोप घेऊन गेले. जीव वांचवावा या अर्थे गेले. याचा परिणाम काय म्हणोन विचाराल तर श्रीमंतांचें व सिंद्यांचें काय आहे समजत नाहीं. सिंद्यांनीं विकलें तरी विकून घेणार. सिंद्यांविशीं विकार म्हणून मनांत येतच नाहीं; आणि तादृश सामर्थ्येही नाहीं. ते म्हणतील तसेंच ऐकणें प्राप्त. त्यांतही मुख्य स्थानीं इतकी हिंमत, जुरत ( शौर्य ), पद मात्र दैवीं आहे, मागील सर्व मोडावें ही बुद्धि आहे. राज्य बुडतें हें गांवीं नाहीं. यांत परिणाम लागेल तो खरा. जो यांसीं वाईट होतो त्याचें कल्याण होत नाहीं, असा क्रम चालला आहे.'

खरे लिहितात, 'या वेळच्या पत्रांतून ज्या मुख्य हकीकती आढळतात, त्यांचा एक विशेष असा आहे, कीं त्यांतील शेंकडा पाऊणशें पत्रें तरी लुटीच्या मजकुरानें भरलेलीं सांपडतील. करवीरकर, सिंदेबाया, सिंदे होळकरांच्या फौजा, पठाण, मोगल फौजा व त्यांचे अंमलदार व हस्तक या सर्वांचा हात नेहमीं रयतेवर उगारलेला. जो तो खंडणी मागतो, गांव लुटतो, जाळतो, कत्तल करतो, गुरें वळून नेतो, बायकापोरें धरून नेतो, रयतेपैकीं प्रमुखांस पकडून लष्कराबरोबर हिंडवतो, माणसांचे तोंडास मशाली लावतो, असे प्रकार एक ना दोन, सर्व पत्रांतून तोच तो कंटाळवाणा मजकूर. मराठी राज्याची अवनति कशी किती झपाट्यानें होत होती तें यावरून दिसतें.'

चिदंबर दीक्षित, शामभट बाबा, सिद्धेश्वर बावा वगैरे साधूंचीं नांवें पत्रांतून येतात. बहुतेक लहान थोर मंडळी अशा साधूंच्या भजनीं असत व पुष्कळ त्यांचा उपदेश घेत. या साधूंवर व त्यांचे मठांवरही हल्ले करण्यास या फौजा चुकत नसत. नीरानरसिंगपुरच्या जागृत स्थानांत सुद्धां सिंद्यांकडील कृष्णाजी हुजऱ्या यानें देवास बेलाशक स्पर्श करून त्याच्या अंगावरचे वस्त्रालंकार काढून घेतले.

' देशीं दंगे बहुत आहेत. दौलत सरकारची गारद व्हावयाचा सुमार आला आहे. लक्ष्मीनें हातचें सोडलें आहे. प्रांत अगदीं बुडाला. कोणास कोणी पुसत नाहीं. सरकारांतून बंदोबस्त होत नाहीं. अब्रूशीं गांठ पडली आहे. श्री रक्षील ती खरी. '

' सरकारांत जी पैशाची ओढ आहे ती ईश्वर जाणें. श्रीमंतांचे मुदबकास तांदूळ देखील नाहीं अशी गति दौलतीची आहे. अशीच सर्व सिंदे, होळकर, आम्ही पटवर्धन सुद्धां एकच दर. मुख्य द्रव्यशोक सर्वत्र श्रीमंतांचे राज्यांत पडला आहे. दौलत वांचणें संकट आहे. श्रीमंतांस व नानांस वरचेवर लिहून उपयोग नाहीं. यांचेकडून कांहींच बंदोबस्त व्हावयाचा नाहीं. मग व्यर्थ करुणा भाकून फळ काय ! सर्वांचीं सत्त्वें गेलीं. ईश्वरें मोठा क्षोभ मांडला आहे. परवां थेउरावर सिंद्यांची कही गेली. बहुत उपसर्ग होऊन एक ब्राह्मण मेला. गरोदर बायको तीन चार दिवसांत प्रसूत होणारी ओढून बाहेर काढिली. कही चाकणेवर गेली. वैरण, भांडें, वस्त्र वगैरे झाडून सारें लुटलें: बायकांची अब्रू राहिली नाहीं. कांहीं जणींनीं जीव दिला. कोणाचा जोडा कोणाचे पायांत नाहीं. परवां कही मावळांत गेली. दहा पांच खेडीं उध्वस्त झालीं, लुटलीं गेलीं. सिंद्यांचे लोक शहरांत कही करितात. सरकारचे गाडदी लोकांचे घरांत येऊन राहतात. घरें खणतात. शहराची धूळधाण होते. पाछापुरांतून ब्राह्मण पंनास साठ व बायकामुली शंभर पर्यंत गांवांतून निघाले. भीक मागून राहवें या अर्थें गेले. बायकांच्या नाकांतील मोतीं व गळ्यांतील मंगळसूत्र हरण जालें होतें. पुरुषांस दोन दोन हात लज्जा रक्षणार्थ वस्त्रें होतीं. तशींच बायकांस. गांवांतील नागवणेचा विस्तार कोठवर लिहावा ! मातीच्या भांड्यांतून पाणी पितात ' अशा गोष्टी लिहूं लागल्यास पार येणार नाहीं. खऱ्यांच्या १३ भागांपैकीं पांच फक्त बाजीरावाच्या सात वर्षांचे आहेत. त्यांतील निम्याहून जास्त हकीकती तरी अशा हृदयद्रावक भारुडानें भरलेल्या आहेत.

दुसऱ्या कोणत्याही पेशव्यापेक्षां जास्त काल म्हणजे बावीस वर्षें बाजीरावानें मराठी राज्याचा कारभार केला, त्यांपैकीं वसईच्या तहा पूर्वींच्या सहा वर्षांत पाहिजे

ती गोष्ट करण्यास तो मुखत्यार होता. तथापि त्या सहा वर्षांतली त्याला यत्किंचित श्रेय देतां येईल अशी एकही राजकारणी उलाढाल इतिहासांत दाखवितां येत नाहीं. त्यानें स्वतः एकही मोहीम केली नाहीं. एकाही पूर्वीच्या खानदानी सरदाराचा किंवा मुत्सद्याचा पाठिंबा त्यानें मिळविला नाहीं. एक दोनदां कार्तिकस्वामीची यात्रा व शेवटच्या पलायनाची दीर्घ स्वारी सोडली तर जुन्नर, नासिक, कोपरगांव, पंढरपुर, माहुली व महाड, वसई एवढ्या टापूच्या पलीकडे त्यानें कधीं प्रवास केला नाहीं. म्हणूनच या अलौकिक व्यक्तीचें नांव इतिहासांत अमर झालें आहे.

बाजीराव व दौलतराव या जोडीच्या प्रतापाचें वर्णन रा. खऱ्यांनीं फार सुंदर केलें आहे तें असें. ' रयतेचें रक्षण करावें हा विचार दौलतरावाच्या मनास कधींच शिवला नाहीं. आपला चरितार्थ चालविण्याकरितां रयतेचें वाटोळें करण्यांत त्याला कधींच दया आली नाहीं. रयत मारून व पीळ पिळून त्यांनीं इतकी दीन व दुर्बळ बनविली कीं, चोरचिरट्यांपासून सुद्धां स्वतःचा बचाव करण्याचें अवसान तिच्यांत बिलकूल राहिलें नाहीं. कोठें स. १७०० तला महाराष्ट्र व कोठें स. १८०० तला ! फक्त एका व्यक्तीचें मात्र दौलतरावानें कल्याण केलें खरें. ती व्यक्ति खुद्द बाजीराव होय. मला सांबानें राज्यपद दिलें आणि तें सिंद्यानें राखलें असें बाजीराव वारंवार बोलून दाखवी तें अक्षरशः खरें होतें. राज्याचें वाटोळें झालें तरी बेहत्तर पण मीच पेशवाईच्या गादीवर बसणार हा त्याचा दुराग्रह होता. लोकांना तर तो मुळींच नको होता. सिंद्यानें त्याजभोंवतीं बागनिटाचें कुंपण घातलें नसतें तर त्याचा निभाव क्षणभरही लागताना. अशा स्थितींत आपणाला पाण्यांत पाहणारें हें जुनें राजिक मुळींच नसावें असें बाजीरावास साहाजिकच वाटूं लागलें आणि दौलत-रावाच्या साह्यानें तें त्यानें मोडून टाकिलें. तसें करतांना त्यानें धर्मार्थ, पापपुण्य, सूक्तासूक्त याचा कांहीं एक विचार पाहिला नाहीं. त्याचा परिणाम असा झाला कीं, जुन्या सरदाऱ्या लिलावांत निघाल्या, पागा मोडल्या, पथकें देशोधडीस लागलीं, मोठमोठे सरदार, मुत्सद्दी, सावकार, कार्यकर्ते पुरुष, समाजाचे धुरीण सर्व धुळीस मिळाले. देशांत पौरुषत्वाचा लेश राहिला नाहीं. अशा दुर्दशेमुळें इंग्रजांना हा देश काबीज करण्याचा मार्ग सोपा झाला.'

आतां गोडबोले कृत एल्फिन्स्टनचे चरित्रांत खुद्द त्या निरीक्षक इंग्रज गृहस्थाचा मार्मिक अभिप्राय वाचण्यासारखा आहे तो असा. "बाजीराव पेशवा रूपानें फार सुंदर आणि प्रौढ आहे, अक्कडबाज नाहीं. तो सुरेख, प्रौढ आणि साधा मनुष्य

आहे. त्याचें तोंड कांहींसें चमत्कारिक दिसतें. तरी त्याचा चेहरा चांगला आणि प्रौढ आहे. चिमाजीअप्पा सुरूप मनुष्य नाहीं. दिसण्यांत कुरूप आहे. बाजीरावाच्या मनाचा मुख्य धर्म भित्रेपणा हा असून त्याशीं विसंगत अशा पुष्कळ गोष्टी करण्यास ते प्रवृत्त होतात. दुसरें कारण असें कीं, आपल्या मनांतल्या गोष्टी लोकांस न कळूं देण्याच्या कामांत ते फार पटाईत आहेत. यामुळें स्वतःच्या मनाची खरी स्थिति व स्वतःचे हेतु हे लोकांच्या दृष्टोत्पत्तीस येऊं न देतां, आपल्या मनांत लवमात्र नसणाऱ्या गोष्टी दुसऱ्यांस आहेतशा भासवाव्या ही गोष्ट त्यांना अगदीं उत्कृष्ट साधून गेली आहे. त्यांच्या अंगीं थोडें अधिक धैर्य असतें तर ते महत्त्वाकांक्षी होऊन आपण म्हणूं ती पूर्व दिशा असें करते. स्वतःच्या निश्चयांत लवमात्र न ढळतां आपलें वर्तन दृढ ठेवते. फार तर काय, अंगांत खिळलेल्या भित्रेपणाच्या कारणानें त्यांना जी ऐषआरामाची अनिवार इच्छा होत असते, तिलाही त्या योगानें आळा पडला असता. सध्याची स्थिति पाहूं जातां आपण बलाढ्य व अधिकारसंपन्न असावें, ही हौस त्यांना फार आहे. परंतु तसें होण्याला जें धैर्य पाहिजे तें अंगीं नाहीं; आणि फार आळशी असल्यामुळें त्यांना आपला अधिकार चालवितां येत नाहीं. तरी पण तो हातचा सोडूं नये ही फार इच्छा आहे. ते फार आळशी आहेत खरे, परतु त्यांचा स्वभाव संशयखोर असल्यानें सदा सावध असतात. त्यामुळें त्यांना तो आळस केव्हां केव्हां बाजूस ठेवावा लागतो. त्यांच्या अंगीं परिपूर्ण भरलेला असा एकही गुण नाहीं, व जो जो म्हणून गुण घ्यावा त्याच्या बरोबर त्याच्याच विरोधी गुणाचें मिश्रण त्यांचे अंगीं दिसतें. त्यांना मोठेपणाची हौस असल्यानें पदरच्या हलक्या माणसांची संगत फार आवडते. कारण त्यांच्यामध्यें आपलें श्रेष्ठत्व त्यांना अगदीं मनसोक्त मिरवावयाला सांपडतें. त्यांच्याशीं ते तोऱ्यानें आणि उद्दामपणानें वागतात. परंतु त्यांना जेव्हां एखादें आपलें कार्य साधावयाचें असेल, तेव्हां मान, प्रतिष्ठा वगैरे सर्व गुंडाळून ठेवून ते कोणतेंही नीच कृत्य करण्याला मागें सरणार नाहींत. जरी त्यांचा स्वभाव लहरी आणि घटकेंत बदलणारा आहे, तरी त्यांचे जे मोठमोठे बेत असतात ते अगदीं कायम असतात. त्यांचें जें म्हणणें असतें तें कोणीं थोडेंसे कबूल केलें म्हणजे आपला हेतु सिद्धीस नेण्याचा दृढनिश्चय करण्यास त्यांना उत्तेजन येतें; आणि त्यांच्या मनाच्या उलट गेलें म्हणजे ते अधिकच आग्रहास पडतात. परंतु त्या आग्रहांत परिणामी भय आहे असें त्यांच्या नजरेस आलें म्हणजे आपलें म्हणणें लागलींच सोडून देतात. ते अतिशय आकसखोर केवळ

कृष्णसर्प आहेत. त्यांना कोणी अपकार केला असला तर ते तो कधीं विसरत नाहींत; आणि आपल्या वैऱ्याचा नाश करण्यास व त्याचा सूड उगविण्यास हरतऱ्हेनें प्रयत्न केल्याशिवाय राहत नाहींत; त्यासाठीं कुलंगडीं करावयाचे त्यांना कांहींच प्रयास पडत नाहींत; कारण ते स्वभावतःच कपटी असून लाघवी आहेत, आणि त्यांना कारस्थानें व गारूड रचण्याची जातीचीच मोठी हौस आहे. ही मूर्ति गुणगणानीं मंडित असल्यानें एकटा त्रिंबकजीखेरीज करून बाकी प्रत्येक व्यक्तिविषयीं त्यांला अविश्वास वाटावा यांत कांहीं आश्चर्य नाहीं. त्रिंबकजीवर तरी त्यांचें प्रेम बसलें, तें त्याच्या आंगीं तसेच गुण आहेत म्हणून. तो अगदीं हलका असल्यानें त्याचें त्यांला भय बाळगावयास नको; आणि अति नीच असल्यामुळें त्याच्याविषयीं मत्सर उत्पन्न व्हावयाला नको; आणि अत्यंत खुशामती थुंकी झेलणारा असल्यामुळें आपल्या उलट वागून संतापवील, हेंही मनांत आणावयास नको. अशा परमभक्तिमान सेवकाची निष्ठा पाहून त्यांनीं त्याच्यावर अत्यंत प्रेम करावें आणि मानवजातींत कधीं कोणावर ठेविला नाहीं असा त्याच्यावर विश्वास ठेवावा, हें विहितच आहे.

'याप्रमाणें बाजीराव साहेबांच्या अंगांत अनेक दोष मात्र आहेत आणि गुण मुळींच नाहींत असें मात्र नाहीं. तेही आहेत व ते सांगितले पाहिजेत. ते बुद्धिमान नाहींत असें खचित नाहीं पैशाच्या देव-घेवींत ते फार सचोटीनें वागतात. त्यांच्या मनाला एकाद्याविषयीं भीति किंवा सूड घेण्याची इच्छा यांनीं ग्रासलें नसलें म्हणजे तें दयार्द्र असतें. ते खर्च बेतानें करतात, परंतु कद्रू नाहींत. त्यांची चालरीत सभ्यपणाची आणि प्रौढ आहे. त्यांच्या वर्तनांत आणखी कांहीं गोष्टी सांगण्यासारख्या आहेत, त्यांचा संबंध त्यांच्या राजकीय वागणुकीशीं कांहीं नाहीं हें खरें, परंतु त्या सांगितल्या पाहिजेत. ते अतिशय देवभोळेपणाचे केवळ बंदे गुलाम आहेत. त्यांचें अर्धें आयुष्य उपासतापास, जपध्यान, पाठप्रार्थना आणि यात्रा यांत व स्नानसंध्या, पूजाअर्चा, होमहवन यांत जातें. उत्पन्नापैकीं बराच भाग मंत्रतंत्र प्रकरणांत खर्च होत असतो, आणि कांहीं करूं लागले तरी मुहूर्त, शकुन अपशकुन हे पाहत असतात, त्यामुळें त्यांना चैन पडत नसतें. परंतु हा प्रकार त्यांच्या ऐषआरामाला किंवा चैनबाजीला आड येत नाहीं. स्नानसंध्यादिकर्मांत त्यांचा जेवढा वेळ जातो तेवढा शिवाय करून बाकी सारा अनाचाराच्या, लाजिरवाण्या गोष्टी करण्यांत जातो. ते बाहेर मोठा सोवळेपणा दाखवितात. परंतु खुषमस्करी मंडळी आणि निर्लज्ज बायका ह्यांत बसून प्रहर सहा घटका घालविल्या वांचून त्यांचा दिवस जात नाहीं.

त्या मंडळींत जो बीभत्सपणा आणि व्यभिचाराचा अत्यंत निंद्य प्रकार चालतो, तो उच्चारूं सुद्धां नये, इतका घाणेरडा असतो. हे राजश्री तो पाहून आनंदांत निमग्न होत असतात. ह्या मंडळींत येणाऱ्या बायका पुष्कळ बहुधा थोरथोरांच्याच असतात. जे सरदार आपल्या बायका वाड्यांत पाठवीत नाहींत त्यांवर श्रीमंतांची अवकृपा होते, आणि कितीएकांशीं त्यांचें जें अगदीं हाडवैर पडलें आहे, त्याचें कारण हेंच आहे. खंडेराव रास्त्याचा जो नाश झाला तो त्यानें आपली बायको साफ पाठवीत नाहीं म्हटलें म्हणून. माधवराव रास्त्याचा अगदीं निर्दयपणानें अजून जो छळ चालला आहे, त्याला तरी अंशतः तेंच कारण आहे. बापू गोखल्याची मागें जी अप्रतिष्ठा झाली आणि तो आतां जो मर्जीत आला आहे त्याला कारण तो आपल्या कुटुंबाची विडंबना करून घेण्यास पहिल्यानें कबूल नव्हता आणि मग हळू हळू कबूल झाला हेंच आहे, असें लोक निःशंकपणें बोलतात.'

'श्रीमंतांचें दुर्दैव उभें राहिलें यामुळें जे आचार कधीं कोणीं केले नसतील तसे करूं लागले. माहुलीचे वाड्यांत गंगाबाई राजमाचीकरीण विधवा बाइको तिचे अंगावर आपला मर्दानी पोशाख व जवाहीर घालून तिला गादीवर बसवून आपण खिजमतगार होऊन चवरी वारूं लागले. असे अनेक प्रकारचे वेव्हार होऊं लागले ते किती ल्याहावे!' माल्कमनें मुद्दाम बाजीरावाची भेट स. १८१७ च्या ऑगस्टांत माहुलीजवळ घेतली त्या सुमारचा वरील प्रकार आहे.

नारायणरावाचा वध झाल्यामुळें शनिवारचे वाड्यांत बाजीरावास कधीं चैन पडलें नाहीं म्हणून त्यानें बुधवार, शुक्रवार, व विश्राम हे वाडे पुण्यांत बांधिले. 'विश्राम बाग वाडा हरिपंताचा बाग होता, तो श्रीमंतांनीं घेऊन त्याचें नांव विश्राम बाग ठेविलें. आठ चार दिवशीं स्वारी तेथें जात असते' (१५-१-१७९९, खरे ४६३५). पुढें मोठा वाडा बांधिला. त्यासाठीं ४० हजार रुपये ता. २९-१२-१८०८ रोजीं त्रिंबकजीस दिले. प्रथम एकान्त विलासाकरितां शुक्रवार वगैरे वाडे बांधिले. पण ते फार नजीक पडल्यामुळें पुढें कोथरूड, फुलशहर, पाषाण वगैरे ठिकाणें बाजीरावानें तयार केलीं. शिवाय गुहागर, नासिक, वाई व माहुली येथेंही वाडे बांधिले. कोपरगांव येथें त्याचे वाडे पूर्वींचेच होते. ठिकठिकाणच्या वाड्यांत स्नान भोजन व विलास यांचे समारंभ तो वारंवार करी. बहुतेक काळ बायकांचे घोळक्यांत जाई. न्याय नोकऱ्या वगैरेंचे वशीले बायकांचे मार्फत चालत. बाजीरावास कृष्णावतार समजून त्यांची स्तुति करून बक्षिसें उपटण्याचा क्रम चालला.

'त्रिंबक अमृतेश्वर पेठे यांची स्त्री काशीबाई श्रीमंतांस पेशवाई मिळाल्यापासून त्यांजकडे जात येत असे आणि त्यांचे मर्जीप्रमाणें वागून त्यांस हरवक्त खूष ठेवी. श्रीमंत वसईहून परत आल्यावर त्रिंबकरावांचा सरंजाम जप्त केला आणि काशीबाईस वर्षाचे दोन हजार रुपये ठरवून दिले. पुढें तिच्या गैर चालीबद्दल नवऱ्यानें बाजीरावाकडे हकीकत कळविली, त्यावरून काशीबाईस कैद करून त्रिंबकचे किल्ल्यावर पाठविलें. नंतर ती ता. २७-९-१८१२ रोजीं मेली '*

" जीवनराव सुमंत यांचे ठायीं बाजीरावाची कृपा बहुत झाली. त्यांनीं मोगलाई-तील स्त्रियांचे विलास, जनान्याची तऱ्हा, बाग झाडें लावणें वगैरे तरतुदी तिकडील चाली सांगितल्यावरून जनाना व स्त्रियांचे ठायीं बहुत लुब्ध. सर्वकाळ दहापांच स्त्रिया जवळ नेहमीं असाव्या ऐसे विलासांत राहूं लागले. पुण्याचे भोंवतीं आंबराई फणस नारळ लक्षावधी झाडें करविलीं. तीं पर्वतीवरून सर्व बाजूस दिसतात. हजारों पखाल्या लाविल्या. इंग्रजांनीं साह्य करून उपकार केल्यामुळें परशत्रु, मसलत, लढाया सर्व बंद झाल्या. पृथ्वी निर्वीर्य झाली, त्यावरून स्वारीस जाणें तें कोपरगांव, गुहागर, पंढरपुर, नासिक वगैरे करून स्वस्थ राहिले. कारखाने मोडत गेले. खाजगी मुदबग सुद्धां मक्त्यांनीं बांधून खर्च कमी केला. खजीना जमूं लागला. कोणाचेंच कारण राहिलें नाहीं. दानधर्म अनुष्ठानें, ब्राह्मणभोजनें यज्ञयाग यथासांग यांजवर बहुत प्रीति करूं लागले."

वाईटांतही पुष्कळदां थोडेंसे चांगलें असतें. बाजीरावाच्या ढंगांत सुद्धां कित्येक कलांस उत्तेजन मिळालें, पुष्कळांची उपजीविका झाली, व तमासगीर वगैरे सारख्यांस बक्षिसें मिळालीं, हेंही कांहीं खोटें नाहीं. त्यामुळेंच शाहिरांच्या पोवाड्यांत बाजीरावाच्या औदार्याची स्तुति व त्याचें वियोगजन्य दुःख याचीं अप्रतिम हृदयभेदी वर्णनें ओतप्रोत उतरलेलीं दिसतात. परंतु बाजीरावाची योग्यता ठरवावयाची दृष्टि एकच असली पाहिजे, तीही कीं ज्या स्थानावर तो आला त्याचीं कर्तव्यें त्यानें कितपत पार पाडलीं. बाजीरावासारख्या दुसऱ्या किती तरी व्यक्ती समाजांत वावरतांना आढळतात, परंतु जोंपर्यंत त्यांचा संबंध एकंदर राष्ट्राच्या बऱ्या वाइटाशीं पोंचत नाहीं तोंपर्यंत त्या बद्दल ते स्वतःच जबाबदार असतात. बाजीरावानें मराठी राष्ट्राचें पुढारपण अंगावर घेतलें म्हणूनच राष्ट्रनाशाची जबाबदारी त्याजवर येऊन पडली. यशोदाबाईस दत्तक

* खरे; पे. अ.; धा. शा. च.; बा. रो. २४०–२४४; का. सं. प. या. १४५; भा. व. ऐ. जु. गो. १४·१५; पे. द. पृ. १४९, २६१–२६४.

देऊन नानाफडणीस राज्याची व्यवस्था ठरवीत होता, ती मान्य करून आणि नाना-फडणिसापासून मुबलक नेमणूक तोडून घेऊन जर बाजीराव अलग राहता तर त्याचा इतिहास इतका वाढला नसता. कोणत्याही व्यक्तीस तारणारी किंवा मारणारी शक्ति म्हणजे त्याची दानत होय. ही दानत किंवा योग्यता ज्याची त्याजबरोबर राहत असते, आणि ती लोकांना पूर्णपणें ठाऊक असते. याच योग्यतेवर समाजांत प्रत्येकाचा व्यवहार चालतो. एखादा चोर अथवा मद्यपी आपल्याकडे कर्ज मागावयास आला तर आपण बहुधा त्याची मागणी मान्य करीत नाहीं. अशा दृष्टीनें पाहतां बाजीरावानें आपल्याबद्दल लोकांच्या मनांत यत्किंचित् आदर उत्पन्न केला नव्हता, म्हणून कितीही जीव तोडून त्यानें सरदारांस पत्रें अगर बोलावणीं पाठविलीं, तरी हा मनुष्य घातकी आहे असें समजून त्याजवर विश्वास ठेवण्यास कोणी तयार झाले नाहींत. हाताखालच्या दुर्बलांस तो फसवूं शकला. परंतु प्रबल इंग्रजांशीं जेव्हां त्याची गांठ पडली आणि एल्फिन्स्टन सारख्या जहांबाज मुत्सद्याशीं त्याचे व्यवहार चालू झाले, तेव्हां तुलनेनें एल्फिन्स्टन-पुढें तो अगदीं फिका पडला, आणि दानतीचें दिवाळें निघाल्यामुळें पुढें निभाव करण्यास त्याजजवळ भांडवलाची पुंजी बिलकूल राहिली नाहीं.

बाजीरावाच्या कारभारांतील एक चांगली गोष्ट सांगण्याची संधि सांपडली याबद्दल आनंद वाटतो. 'ब्राह्मण ज्ञातीमध्यें कन्याविक्रय करितात, व अविवाहित कन्या नवा वर्षांपुढें ठेवितात म्हणोन हुजूर विदित झालें, तरी त्या संबंधानें निक्षून ताकीद करून जो तशी गोष्ट करील त्याची चौकशी करून बहिष्कृत करावें,' असे हुकूम बाजी-रावानें गांवगन्नाच्या अधिकाऱ्यांस सोडिले. ता. २८·४·१७९८ ही तारीख अशा हुकुमांची आहे. वरील दोन बाबतीं पैकीं कन्याविक्रय बंदीची बाबत प्रशंसनीय म्हणतां येईल. वरील हुकुमानंतर लगेच ता. ४·७-१७९८ चा आणखी हुकूम नमूद आहे तो असा, 'कीं साष्टी व मुंबईकर कसाब यांनीं देशांतून गायी विकावयास न्यावयाची मनाई सरकारांतून असतां चोरून रातबिरात गाई नेतात. त्याची चौकशी सरकारांतून करण्यासाठीं अनंत नाईक अणजूरकर यांस बाजीरावानें मुद्दाम पाठविलें. 'ब्राह्मण ज्ञातींत कन्येचा नक्त ऐवज कर्जवाम वगैरे घेऊन विवाह करतील त्यांस चौकशी करून घेतलेला ऐवज वरपक्षास माघारें देऊन तितकीच गुन्हेगारी कन्यापक्षापासून व मध्यस्थापासून सरकारांत घेण्याचा हुकूम' ता. ९·२· १८१२ चा पुनः दाखल आहे. तथापि या हुकमाचा अंमल विशेष झाल्याचें दिसत नाहीं. 'भवानी शंकर हैबतराव यानें बाजीरावास कळविलें, वाई येथील गांव बहुत

करून दुमाले आहेत, तेथें आमचा रोखा पत्र चालत नाहीं, कळलें पाहिजे. ' क्रिस्ती झालेल्या हिंन्दूस पुनः स्वधर्मांत घेण्याची परवानगी बाजीरावानें दिल्याचे उल्लेख आहेत. वेदाध्ययन व मोडी अक्षर या दोनच गोष्टी लहानपणीं बाजीराव चांगल्या शिकला. त्यानें आपले रोजचे हिशेब स्वहस्तानें मोडींत लिहून ठेविलेले असून त्यांतील कित्येक बाबती सांकेतिक भाषेंत लिहिलेल्या आहेत. अक्षर सुवाच्य व नाना फडणिसाच्या धर्तीवर होतें. पट्टीच्या ब्राह्मणांबरोबर तो वेद मंत्र म्हणूं शके. घोड्यावर बसण्यांत तो सामान्यच असावा. त्याचें आवडीचें वाहन घोड्या ऐवजीं पालखी होती. पेशव्यांचे घराण्यांत रथ वापरलेला उल्लेख या एकट्याचाच आहे. त्याच्या रत्नशाळेंतील जवाहिराची मोजदाद केली, तिची किंमत अवघी रु. साडे चौतीस लाख भरली. बाजीरावाचा स्वभाव कळण्यास निराळ्या तऱ्हेचे कांहीं अन्य तपशील उपयुक्त वाटल्यावरून खालीं देतों.

बापू गोसावी कोपरगांवकर यानें सोनाराचे पोरीशीं लग्न केलें. तो बाजीरावाचे वाड्यांत पंक्तींत जेवीत होता. सबब गावांत पंचगव्य दिलें.

एकदां बाजीरावाची स्वारी नाशकास गेली होती. तेथें गंगेस जातांना घारपुरे यांचे घाटावर मुसलमान पालखी जवळ येऊन शिवला. सबब त्यास कैदेंत ठेवून ती पालखी विटाळली म्हणून श्रीमंतांनीं माणिकभाई नांवाच्या इसमास देऊन टाकली ! हा पालख्या विटाळण्याचा तमाशा वारंवार होत असे असें दिसतें.

शनिवारवाड्यांत नारायण रावसाहेबांचें भूत आचाऱ्याचे अंगांत आलें. एक लक्ष ब्राह्मण भोजन घालावयास सांगितलें. त्यावरून श्रीमंतानीं स. १८११ सालीं लक्ष भोजन उत्तम प्रकारचें घालून अर्धे रुपया दक्षणा दिली.

शनिवारवाड्यांत ईशान्य कोपऱ्यास बुरुजाजवळ मस्तानीचा वाडा होता त्यांत अलीबहादूरची मातुश्री व स्त्री राहत होती. त्यांस बाजीरावानें वाड्यांतून काढून दुसरे जागीं ठेविलें. वाडा दरोबस्त खणून माती वगैरे झाडून बाहेर टाकली आणि जाग्यावर झाडें लाविलीं. हा एक शुद्धीचाच प्रकार त्यानें केला. ( स. १८१२ ).

सदाशिव माणकेश्वर यास पुण्यांत राहण्यास दादा गद्रे यांचा वाडा दिला होता. त्यानंतर तो कांहीं वर्षें नाना फडणीस यांचे वाड्यांत येऊन राहिला. त्या ठिकाणीं बाजीराव त्याचे भेटीस गेला असतां बाहेर पालखी होती तीस सय्यद जैन शिलेदार याचे घोड्याचा विटाळ झाला. सबब पालखी बिच्छान्यासकट नदीस पाठवून धुऊन आणिली.

कोपरगांवीं श्रीमंतानीं राघोपंत ढमढेरे यांचें लग्न आपले वाड्यांत केलें. मुलगी मुकुंद जोशी यांची कन्या. त्या प्रसंगीं सरकारांतून मोठा समारंभ बाजीरावानें केला ( मे १८२२ ). ही मंडळी पुढें ब्रह्मावर्तास गेली. कोपरगांवीं बाजीराव बहुधा दरसाल कांहीं दिवस जाऊन राही, आणि माघ शु० ४ स गणपतिपुळ्यास जात असे.

नारायण रामचंद्र व हरि उद्धव यांस बाजीरावानें आपले वकील म्हणून कलकत्त्यास पाठविलें होतें.

शनिवारवाड्यांत नवा सात खणी बंगला बाजीरावानें बांधला होता, तो ता. २५.२.१८१२ रोजीं मध्यरात्रीं आग लागून जळाला. दादासाहेबांचा बंगला जवळ होता तोही जळाला. श्रीमंतांस कळविलें तर बेमर्जी होईल म्हणून कोणीं कळविलें नाहीं. प्रातःकाळीं कळलें.

बाजीरावानें आपल्या बायकांस खर्चाची नक्त नेमणूक बांधून दिली होती. त्यांत भोजन खर्च, शागीर्दपेशा, धर्मादाय, कापड, वगैरे सर्व खर्चाचा समावेश होता. वाराणसीबाईस वीस हजार व कुसाबाईस सोळा हजार.

पंक्तीच्या भोजनाचे वर्षारंभीं लिलांव करून खर्च कमी केले. गणपति-उत्सवांतील ब्राह्मण भोजनाचा मक्ता साडेसव्वीस हजार रुपयांस दिला. दररोज पांचशें असामींचें भोजन असे. सव्वीस दिवस. यावरून पात्रीं आठ आणे दर पडतो. शुक्रवार वाडा बांधण्याचा मक्ता ता. २९.१२.१८०८ रोजीं चाळीस हजार रुपयांस देण्यांत आला.

स. १८०७ व १८१४ या दोन सालीं कार्तिकांत बाजीराव कार्तिक स्वामीस गेला होता. हीच त्याची सर्वांत लांब पल्याची स्वारी.

**व्यंकट नरसी** नांवाची पुण्यांत सुप्रसिद्ध वारांगना होती. बाजीरावानें दोन तीन दिवस अहोरात्र नाच करवून तिला सवीस हजार रुपये बक्षीस दिले. हिचें पहिलें नांव नरसी. विश्वगुणादर्श ग्रंथाचा कर्ता पंडित व्यंकटाध्वरि यानें तिच्या नाचांत कांहीं दोष काढून ते स्वतः तिला समजावून दिले, तेव्हांपासून ती त्या पंडिताची शिष्या बनली, आणि त्याचें नांव तिनें आपल्या नांवास जोडिलें.

**४ मोरोबा दादा फडणीस.**—अंगीं योग्यता असून जन्मभर विपत्ति भोगावी लागल्याचीं उदाहरणें मोरोबा फडणिसासारखीं इतिहासांत थोडींच आढळतील. मोरोबा व नाना सख्खे चुलत बंधु जवळ जवळ समवयस्क. नाना किंचित थोडा वयानें मोठा.

स. १८०० च्या डिसेंबरांत मोरोबाचें वय साठ वर्षांचें होतें. ( ख. ले. ५९०२ ). थोरल्या माधवरावाचे वेळेस मोरोबा स्वारींत सर्व कारभार करी आणि नाना पुण्यास असे. सन १७७८ तील कारस्थानांत मोरोबा नगरच्या किल्ल्यावर अटकेंत पडला, तेथें त्याचीं बावीस वर्षे गेलीं. फडणिशीच्या उत्पन्नांत त्याचा विभाग असून तें उत्पन्न सालीना लाखों रुपयांचें नाना एकटाच घेत होता. मोरोबाच्या हिशावर बाजीराव सिंदे वगैरेंचा डोळा होता. नगरचा किल्ला सिंद्यास देण्याचें ठरून मोरोबास तेथून हलविणें प्राप्त झालें. त्यास रायगडास पाठविण्याचें ठरवून नानानें त्यास आणण्यास दादा गद्रे यास नगरास पाठविलें. परंतु मोरोबा हें नानाचें वर्म केव्हां तरी आपल्या उपयोगास येईल, त्यास हातचा जाऊं देऊं नये, अशा बुद्धीनें नगरच्या किल्लेदारास बाजीरावानें गुप्त निरोप पाठविला, कीं मोरोबास नानाचे माणूस येतील त्यांचे हवालीं करूं नये. ही फूस मिळतांच गद्रे यास मोरोबानें साफ कळविलें कीं मी प्राण देईन, पण येथून हालणार नाहीं. किल्लेदारानें गद्रे यास कळविलें कीं मोरोबा खुशीनें जाईल तर खुशाल न्या, पण मी त्याच्यावर सक्ती करणार नाहीं. परंतु या वेळीं नाना व सिंदे एक विचारानें वागत असून सिंद्यास किल्ला पाहिजे होता, त्यानें बाजीरावास सांगतांच त्यास नाहीं होय म्हणण्याची सोय राहिली नाहीं. बाजीरावानें किल्लेदारास निक्षून हुकूम लिहून दिला. तो हुकूम घेऊन पुनः नानाचे हस्तक दादा गद्रे व बजाबा शिरोळकर फौज घेऊन नगरास गेले. त्याबरोबर मोरोबानें त्रागा सुरू केला. 'शिखा सूत्र व वस्त्रें टाकून किल्ल्याखालीं येऊन परमहंस दीक्षा घेतली. उपोषणें करूं लागले. पुण्यांत त्यांची स्त्री अन्न घेत नाहीं. गद्रे यांनीं आपल्या राहुटीस आणून ठेविले. उचललेंत तर प्राणत्याग करीन असें म्हणूं लागले.' श्रीमंताकडे तक्रार गेली. बहुत दिलगीर आहेत. सिंदे म्हणतात मी नानास वचन दिलें आहे. नानांचा कृतसंकल्प आहे कीं संन्यास घेतला तरी सोडायचे नाहींत, संन्याशांनीं महाडास राहवें. सिंदे लोभाविष्ट. पंधरा लक्षांची जहागीर व नगरचा किल्ला मिळतो, मग ते कां मध्यें पडतील. शेवटीं सन्यास घेतला. रागानें घेतला सबब शास्त्रार्थानें रद्द ठरवून मोरोबास आगस्टचे आरंभीं नगराजवळच रतनगडावर ठेवण्यांत आलें आणि सिंद्याचे निशाण नगरावर लागलें. आतां मोरोबास कैदेंत ठेवण्याचें प्रयोजनच नव्हतें. राज्य उलथून पाडणारे अंदमानचे कैदी सुद्धां हल्लीं सुटतात. मोरोबा सुटता तर नानाच्या द्रव्यास वाटेकरी झाला असता, हें कैदेचें बीज होय. मोरोबा पुढें ता. २३·१·१८०० रोजीं पुण्यास आला. 'श्रीमंत व सिंदे होळकर गारपिरावर जाऊन भेटले. श्रीमंतांनीं त्यास खवास-

खान्यांत घेऊन वाड्यांत आणिलें. नंतर दादा मुरलीधराचे देवालयीं येऊन राहिले. तेच दिवशीं रात्रीं श्रीमंतांनीं भोजनास बोलाविलें. भुईवर भोजन करीत होते, ते ते दिवशीं ताटांत जेवले. पुढें कारभार घ्यावा आणि सिंद्याचें देणें भागवावें असें श्रीमंतांनीं म्हणतांच माझ्या जवळ पैका नाहीं आणि मला कारभारही नको. आजपर्यंत कैदेंत जन्म गेला. आतां म्हातारपणीं श्रीमंतांनीं सुखें घरीं राहूं दिलें तर राहीन. नाहीं तर वाटेल तेथें ठेवावें, माझें कांहीं म्हणणें नाहीं.' जुना मुत्सद्दी म्हणून बाजीरावानें मोरोबास आदर दाखविण्याचें ढोंग केलें. पुढें अमृतरावाचा पुत्र यशोदाबाईस दत्तक देण्याचें कारस्थान बाजीरावास कळलें, त्यावरून मोरोबा दादा व बाबा फडके यांस किल्ले घनगड येथें पाठविलें. सेप्टेंबर स. १८०३ त मोरोबा मृत्यु पावला. स्त्री चिमाबाई. त्याचा मुलगा नाना यानें पुढें इंग्रजी अमलांत बंड केलें. *

**५ अमृतराव रघुनाथ व त्याचा वंश.**—बाजीरावाचा वडील बंधु अमृतराव सालाची आठ लाख नेमणूक घेऊन कुटुंब सुद्धां सन १८०४ चे आरंभी काशीस जाऊन राहिला हें मागें सांगितलेंच आहे. काशी येथें अमृतरावानें मोठा लौकिक मिळविला. घाट, देवालयें अन्नछत्रें, वगैरे धर्मकृत्यांत काशी येथें त्याचें नांव विख्यात झालें. कांहीं काळपावेतों ब्राह्मणसंतर्पणाच्या कामीं पेशवाईनें पुणें सोडून काशी व ब्रह्मावर्त येथें वास्तव्य केलें अशी लोकांची भावना झाली. बिशप हीबर यानें आपल्या प्रवासवर्णनांत अमृतरावाच्या दानशौर्याचें वर्णन केलें आहे. बाजीरावाची रवानगी ब्रह्मावर्तास झाल्यावर पुढें सहा वर्षांनीं ता. ६·९·१८२४ रोजीं अमृतराव काशी येथें मरण पावला. त्यानें जी इंग्रजांशीं निष्ठा एकदां धरली ती अखेरपर्यंत चालविली. स. १८१४ त गव्हर्नर जनरल लॉर्ड हेस्टिंग्स काशीस गेला होता, त्यानें अमृतरावाची भेट घेतली त्याची खालील मनोरंजक हकीकत त्यानें आपल्या खासगी रोजनिशींत लिहून ठेविली आहे.

'ता. ३१·८·१८१४ रोजीं अमृतराव माझे भेटीस आले. ते हत्ती घोड्यांच्या स्वारीनें प्रवेशद्वारापर्यंत येऊन तेथून पुढें पालखींतून बंगल्यांत आले. त्यांच्या अंगावर भलीं मोठीं मौल्यवान रत्नें होतीं. लॉर्ड वेल्स्लीनें मराठ्यांचें राज्य लवकर नाहींसें करण्याकरितां अमृतरावास सात लाखांची नेमणूक देऊन भावापासून फोडलें. मी अमृतरावास एक नवीन कृतीची चांगली बंदूक व विनायकरावास दोननळी पिस्तूल नजर केलें, त्याबद्दल त्यांस फार संतोष वाटला.'

---

* पु. द. २·१४९; पे. अ; खरे ५६०६, ५६९०.

ता. ५ सप्टेंबर १८१४ रोजीं हेस्टिंग्सनें अमृतरावाचे वाड्यावर जाऊन त्यास परत भेट दिली. गाडीजवळ सामोरे येऊन, बागांतच उघड्या मंडपांत बैठकीवर अमृतरावानें पाहुण्यांस नेलें. पुढील बाजूस फवाऱ्यांचीं सुंदर कारंजीं चालू असल्यामुळें मंडपाची हवा त्यांस आल्हाददायक वाटली. लेडी हेस्टिंग्सनें बाईची भेट आंतल्या बाजूस घेतली. या बायांस पडद्याची आडकाठी नसमुळें मुसलमानी गोषासारखा त्रास झाला नाहीं. अमृतरावाची एक नात सात वर्षांची मोठी चलाख व सुस्वरूप होती ती धीटपणानें पुरुषांत येऊन साहेबांस भेटली, त्याबद्दल तिचें त्यांस मोठें कौतुक वाटलें. अमृतरावानें कांहीं मोलवान रत्नें साहेबांस देण्याकरितां पुढें आणलीं व बाहेर दोन हत्ती व चार घोडे आणिले. परंतु ह्यांपैकीं आपण किंवा मेमसाहेब कांहींच स्वीकारणार नाहीं असा निर्धार त्यानें जाहीर केला, तेव्हां अमृतरावास फारच खेद वाटला. एक घोडा तरी घ्या असा त्यानें फार फार आग्रह केला, पण साहेबानें कांहींच घेतलें नाहीं. अतिशयच आग्रह केला, तेव्हां रत्नाच्या ताटावरील सरपोस तेवढा घेऊन साहेबानें अमृतरावाचे आभार मानिले, आणि हा सरपोस तुमची आठवण माझे मनांत सदैव कायम ठेवील, असें कळविलें. उठण्यापूर्वीं गुलाबपाण्याचा मृदु तुषार एकदम मंडपाचे छतांतून सर्वांचे अंगावर सुरू झाल्यामुळें मंडळीस संतोष वाटला.

अमृतरावाची पहिली बायको मे १८०३ त बाळंत होऊन मेली. ती बरेच दिवस आसन्नमरण होती. तिच्या मृत्युपूर्वीं ता. १८·३·१८०३ रोजीं त्यानें दुसरें लग्न केलें. पहिलीचा मुलगा विनायकराव जन्म स. १७९२, याचेंही लग्न ता.२३·४·१८०३ रोजीं संगमनेरास झालें. हा विनायकराव बापू पेशवाई बुडाली तेव्हां सुमारें बावीस वर्षें वयाचा सज्ञान असून, काशींत बापानें दानधर्माचीं कृत्यें सुरू केलीं तेंच काम पुढें चालविण्यापलीकडे दुसरें कर्तव्य त्यास नव्हतें. सात लाखांची नेमणूक नियमित पदरांत पडत असल्यामुळें त्यानें द्रव्यसंचय चांगला केला. काशी येथील अमृतरावाचें गणपति मंदीर व तेथील व्यवस्था उत्कृष्ट समजली जाते. ' पुण्यासारखीच काशींतही त्यानें रमण्याची जागा तयार केली. दक्षणेच्या कामीं सालाचा दीड लाखपर्यंत त्याचा खर्च होतो. मिशनऱ्यांचे तोंडून क्रिस्ती धर्माचें वर्णन ऐकण्याची विनायकरावास मोठी हौस असे. '

निष्फळ चैनबाजींत विनायकरावानें खर्च केला नाहीं. सन १८२९ सालीं चित्रकुटाजवळ करवी येथें वाडा बांधून तेथें विनायकराव राहूं लागला. करवी हें गांव बांद्यापासून ४५ मैलांवर पयोष्णी नदीजवळ आहे. विनायकरावानें बांधलेला वाडा शनिवार-

वाड्याचीच प्रतिमा होती असें म्हणतात. मैनाताई म्हणून विनायकरावास एक बहीण होती असें ख. ले. ६७५९ वरून दिसतें. स. १८३५ सालीं त्यानें ईस्ट इंडिया कंपनीस पसतीस लाख रुपये कर्ज दिलें. तें कर्ज परत येईना तेव्हां त्याबद्दल त्याच्या मुलांनीं पुष्कळ वाद सांगितला परंतु तें मिळालें नाहीं. विनायकरावास मुलगा झाला नाहीं. एक मुलगी होती ती जोगांचे घराण्यांत दिली. त्यानें एक मुलगा दत्तक घेतला, त्याच्याशीं पटलें नाहीं म्हणून मागाहून दुसरा घेतला. या दुसऱ्याचा वंश अद्यापि हयात आहे. विनायकराव स. १८५६ त मरण पावला. पुढील सालच्या दंग्यांत त्याच्या कुटुंबावर सरकारची इतराजी झाली आणि करवी येथील वाडा व मिळकत लुटली गेली. इंग्रजांनीं त्यास काशीस राहण्याची बंदी करून बरेली येथें सक्त देखरेखीखालीं लहानशी नेमणूक देऊन ठेविलें.

१ अमृतराव रघुनाथ पेशवे मृ. ६·९·१८२४
|
२ विनायकराव बापू=सरस्वतीबाई
|
३ नारायणराव ( द० ) =गंगाबाई    ४ माधवराव ( द० )=लक्ष्मीबाई
|
५ कृष्णराव बापूसा०    ६ सदाशिवराव बापासा०
|
७ विनायकराव = मालतीबाई    ८ विश्वनाथराव    ९ रघुनाथराव=कमलिनीबा०
|
१० सरोजिनी    ११ कृष्णराव

नं. ७–११ प्रस्तुत हयात (१९३१).

३ पहिला दत्तक बापानें रद्द केला. ४ यास १८५८ त कर्वी इंग्रजांनीं हस्तगत करून बरेली येथें नेऊन ठेविलें. मृ. मार्च १९१३. ५ मृ. १९०७, बायको रमाबाई ही मिरजमळा येथील पटवर्धनांची मुलगी. ६ मृ. १९१६, बायको पार्वतीबाई. ८ आग्रा येथील बी. ए., बायको कुसुमाबाई. हे बरेलीस असून यांनींच माहिती पुरविली.

**६ चिमाजी आपा.**—बाजीरावाहून हा त्याचा भाऊ थोडा जास्त समंजस होता. बाजीरावाचे ढंग पाहून त्यास पुष्कळदां अत्यंत त्वेष येई, आणि संधि साधून तो बाजीरावाचा चांगला निषेध करी. त्यामुळें उभयतांमधें रहस्य राहिलें नव्हतें. आपल्याहून वरचढ मनुष्य असला कीं बाजीराव त्याचा द्वेष करी. उभयतांमध्यें पुष्कळदां सडकून वांकडे येई. त्याचे खर्चास सुद्धां बाजीराव वेळेवर व जरूरीप्रमाणें देईनासा झाला.

तेव्हां त्यानें आपली नेमणूक स्वतंत्र तोडून मागितली, ती बाजीराव देईना. म्हणून चिमाजी आप्पा उपास करूं लागला. बयाजी नाइकाचे मार्फत त्यानें ही हकीकत रेसिडेंटास कळविली, तेव्हां रेसिडेंटानें मध्यस्थी करून त्यास सालाची दोन लक्ष रुपये नेमणूक स. १८०६ च्या मार्गशीर्ष महिन्यांत तोडून देवविली. तथापि उभयतां मधील तक्रारी दिवसेंदिवस वाढतच गेल्या. चिमाजी शनिवारचे वाड्यांत राहत होता, परंतु वाड्यावर त्रिंबकजीचा बंदोबस्त असल्यामुळें चिमाजीकडे भेटीस कोणी येईनासें झालें. चिमाजी कोठें बाहेर प्रांतांत गेला असतां त्यास कोणी भेटूं नये आणि भाजी-फुलें वैरण वगैरे कांहीं देऊं नये, अशा ताकिदी ठिकठिकाणच्या मामलेदारांस बाजीरावानें लिहून पाठविल्या. चिमाजी आप्पाचीं घोडीं सरकारचे कुरणांत चरणीस असत, तीं बाजीरावानें तेथून काढून लाविलीं. चिमाजी आप्पानें त्यांची व्यवस्था केली नाहीं, तेव्हां तीं घोडीं एक महिनाभर शनिवारवाड्यापुढें मोकळीं होतीं. तीं बहुतेक कांहीं वैरणी वांचून मेलीं व कांहीं बाजीरावानें अन्याबा राहातेकर याचे हवालीं केलीं. अशा तक्रारी उभय बंधूंमधें अखेर पर्यंत सारख्या चालू होत्या. फारच अडचण झाली म्हणजे रेसिडेंटाकडे कागाळी जाऊन त्याचे कडून निकाल होत असे. स. १८१७ चे नोव्हेंबरांत घोरपडीची लढाई झाल्यावर बाजीराव आपला अजबाब घेऊन पुरंदराकडे निघाला, त्या प्रसंगीं चिमाजी आप्पानें त्याचा पुष्कळ निषेध केला; तुम्ही फौजेंत जाऊन ठासून उभे राहा म्हणजे जय मिळेल असें परोपरीनें त्यास विनविलें. शेवटीं मला तरी लष्करांत जाण्यास परवानगी द्या अशी विनंति केली, पण ती सुद्धां बाजीरावानें मान्य केली नाहीं; आणि हट्टानें चिमाजीस बरोबर घेऊन तो बाहेर गेला. आप्पाची स्त्री सीताबाई (दामले) ओंकारेश्वराचे देवळांत वाती लावावयास गेली असतां लुगड्यास आग लागून जळून ता. २६·२·१८०९ रोजीं मरण पावली. दुसऱ्या लग्नासंबंधीं खालील उल्लेख आहे.

" चिमाजी रघुनाथ यास सालीना दोन लक्ष रुपयांची नेमणूक केली, त्यांत लग्न-कार्य वगैरेचा खर्च त्यांनीं करावा, या खेरीज कांहीं त्यांस द्यावयाचें नाहीं; परंतु यांचें दुसरें लग्न कारण्याविषयीं अनुमान दिसून प्रपंचास उदास झाले. याजकरितां सरकारांतून एक वेळ लग्न करावें असें एल्फिन्स्टन वकील यांचे विद्यमानें ठरून कोपरगांव येथें वैशाख शु॥ १० शके १७३४ ( ता. २०·५·१८१२ ) रोजीं लग्न महादाजीपंत जोशी यांच्या कन्येशीं केलें." याशिवाय सत्यभामाबाई म्हणून महेंदळे यांजकडील चिमाजी आप्पाची एक बायको असल्याचा उल्लेख सांपडतो ती तिसरी असावी. चिमाजीआप्पा सन १८१९त काशी येथें जाऊन राहिला आणि तेथेंच ता.९·६·१८३०

रोजीं मरण पावला. त्याच्या काशीवासासंबंधानें कांहींच हकीकत उपलब्ध नाहीं. त्यास मूलबाळ वगैरे नव्हतें. पुढेंही बाजीरावाचें व त्याचें रहस्य असल्याचें दिसत नाहीं. झांशीच्या राणीचा बाप मोरोपंत तांबे चिमाजी आपाचे आश्रयास काशींत होता तो पुढें बाजीरावाचे आश्रयास गेला.*

---

# प्रकरण एकोणिसावें

## दौलतरावाचे खेळ व राज्यनाश

**कीरति सब जगमें करत, शिवको हरन क्लेश ।**
**अलीजाह सुजान प्रभु, दौलतराव नरेश ॥**
**उपवन प्रभुको अतिसुखद, जानत सब संसार**
**याते बाग विलासकों, कीन्हो सरस विचार ॥**—शिवकवि ॥

१ दौलतराव सिंद्याची रहाणी. २ बायजाबाई. ४ अंबूजी इंगळे.
३ सर्जेराव घाटग्याचा अंत. ५ कित्येक सामाजिक विषयांचा उल्लेख.
६ मराठशाहीच्या नाशाचीं कारणें. ७ मन्रोची मीमांसा.

**१ दौलतराव सिंद्याचा उत्तरकालीन कारभार व राहणी.**—अठराव्या शतकाचे अखेरीस मराठशाहीचें राज्य एकदम कोसळलें, यास दुसरीं कांहींही कारणें असलीं, तरी पेशवा बाजीराव व फौजबंद दौलतराव सिंदे या दोन उल्लू व तरुण व्यक्तींचा सहा वर्षांतला बेबंदशाही कारभारच पुढील नाशाचें मुख्य कारण होय, याविषयीं तत्कालीन ग्रंथ वाचल्यावर संशय राहत नाहीं. कर्तबगार माणसें दौलतींत त्या वेळींही कांहीं कमी नव्हतीं, पण या दोघां प्रमुख व्यक्तींनीं तीं सर्व नाहींशीं करण्यांतच भूषण मानलें. बाळोबा तात्या, यशवंतराव होळकर, चतुरसिंग भोसले, लखबा दादा लाड, अंबूजी इंगळे, सर्जेराव घाटगे वगैरे किती तरी पुरुष आपापल्यापरी कर्तृत्ववान् होते, पण त्यांचा उपयोग राज्यरक्षणार्थ करून न घेतां राज्यनाशाकडे करून घ्यावयाचा असा जणूं काय त्या दोघांनीं विडाच उचलला होता. स.१८०३च्या

---

* बा. रो. पृ. ४२; पे. अ; पे. ब. खं. ४. मागील पृ. ४९ टीप पहा.

युद्धांत इंग्रजांची सार्वभौम सत्ता स्थापन झाल्यावर बाजीराव, दौलतराव वगैरे प्रमुख व्यक्ती एकदम निष्प्रभ झाल्या. आपण हें काय केलें याची जाणीव त्यांस यत्किंचित् असल्याचा भास होत नाहीं. या दोघां व्यक्तींचे पुढील काळाचे आत्मगत विचार उपलब्ध व्हावे अशी मोठी उत्कंठा वाचकांस वाटूं लागते. कृतकर्माचा यांस कांहीं पश्चात्ताप झाला कीं नाहीं, कीं अखेरपर्यंत ते आपल्याच घमेंडींत आनंदानें वागले हें समजण्याची आतुरता उत्पन्न होते. बाजीराव पुढें ४०-५० वर्षें जगला, पण त्या दीर्घायुष्यांत त्यास यत्किंचित् खेद झाल्याचें आढळत नाहीं. तशीच स्थिति बहुतेक दौलतरावाची. शंभर सवाशें वर्षांपूर्वीच्या वस्तुस्थितीची बरीचशी बोधप्रद माहिती तत्कालीन इंग्रजी लेखांत वाचावयास मिळते. दौलतराव ता. २१·३·१८२७ रोजीं ४८ वर्षें वय होऊन मरण पावला. उंची पांच फूट पांच इंच, वर्णानें काळसर व अंगानें स्थूल होता.

शके १७२५ ची नारळी पौर्णिमा, ता. ३ आगष्ट स. १८०३ बुधवार या दिवशीं इंग्रजांनीं दौलतराव सिंद्यावर युद्ध पुकारून चार महिन्यांत त्याचा पाडाव केला. तेव्हां-पासून त्याजवर आपला शह कायम ठेवण्यासाठीं त्यांनीं त्याचे दरबारीं आपला रेसिडेंट ठेवून दिला. या रेसिडेंटाजवळ इंग्रजांची एक लहानशी लष्करी तुकडी असे. तिचा अंमलदार कॅप्टन ब्राउटन स. १८०८·९ सालीं राजपुतान्यांत दौलतरावाच्या स्वारी-बरोबर फिरत असतां त्यानें डिसेंबर १८०८ पासून फेब्रुवारी १८१० चे अवधींत नानाविध माहितीनें भरलेलीं ३२ विस्तृत पत्रें इंग्लंडास लिहून पाठविलीं, तीं पुढें लगेच छापून प्रसिद्ध झालीं. त्यावरून दौलतराव, त्याचें कुटुंब व कारभारी, त्याचें लष्कर, त्यांत वावरणाऱ्या अनेक व्यक्ती इत्यादिकांचीं सुंदर लेखचित्रें आपणास पाहवयास मिळतात. दसरा, होळी, संक्रान्त, ताबूत, कुस्त्या, नाच, गाणीं, रागरंग, प्रवासाच्या सोयी गैरसोयी, बाजार, लोकस्थिति वगैरे शेंकडों बाबतींची भरपूर माहिती ब्राउटनच्या लेखांत वाचावयास मिळते. ब्राउटननें ही माहिती स्वतः पाहिलेली अथवा मोठ्या परिश्रमानें व कसोसीनें तपासून लिहिलेली असल्यामुळें तिच्या खरेपणाविषयीं संशय वाटण्याचें कारण नाहीं. तिचाच सारांश आतां देतों.

पैशाची अडचण हा मोठा रोग त्या वेळीं सर्व सिंदेशाहीस ग्रासीत होता. धरणीं पारणीं, खून मारामाऱ्या वगैरे गोष्टी रोजच्याच परिचयाच्या झाल्या होत्या. मोठमोठ्या सरदारांची पैशापायीं होणारी कुचंबणा उत्तर मराठशाहींत आपण नेहमींच वाचतों. पण त्याहीपेक्षां भयंकर प्रकार अव्वल इंग्रजींत सुद्धां कांहीं दिवस चालू असल्याचें

दिसतें. याचें मुख्य कारण म्हणजे आपण आतां जिंकलें गेलों ही भावना या सरदारांचे गळीं उतरण्यास पुष्कळ अवधि लागला. अंगवळणीं पडलेले पूर्वीचे सर्व बडेजाव त्यांनीं तसेच चालू ठेविले, आणि पूर्ण शांतता प्रस्थापित होईपर्यंत वसुलाचें नांवानें पूज्य होतें. पांचपन्नास हजार फौजेचें सर्व लटांबर बरोबर घेऊन दौलतराव खंडणी वसूल करण्यासाठीं राजपुतान्यांत दौरे काढीत होता. दरमहा दरशेंकडा पांच रुपये व्याज देऊनही कर्ज मिळण्याची मारामार पडे. राजपूत राजे तर आतां मराठ्यांस फुकटच्या खंडण्या भरण्यास अगदींच नाखूष होते.

पण बाहेर कितीही अडचणी असल्या तरी दौलतरावाची चित्तवृत्ति सदैव आनंदी असे. त्याच्या चैनीचा भंग असा कधीं झालाच नाहीं. त्यास शिकारीचा नाद अतिशय होता. आजूबाजूस कोठें वाघ आहे अशी बातमी लागली कीं पुरे; लगेच भूक तहान विसरून तो धावत शिकारीस जाई. वाघाची शिकार तो बहुधा हत्तीवरून करी. थंडीच्या दिवसांत आठवड्याचे चारपांच दिवस तरी त्याचे शिकारींत जात. शिकारींत न्यावयाच्या हत्तींस मुद्दाम विशिष्ट औषधी चारून तयार करीत.

दौलतरावाचा हा दौरा आगऱ्यापासून जयपुरच्या राज्यांतून चंबळच्या कांठानें दक्षिणेस कोट्या पावेतों येऊन तेथून पुढें उत्तरेस अजमीर पर्यंत सुमारें दीड वर्ष चालू होता. जयपुरकडून पुष्कळ वर्षें तुंबलेली जबरदस्त खंडणी दौलतरावानें मागितली, तेव्हां तेथील राजानें आपला वकील खुशालीराम बोहरा यास तडजोडीसाठीं दौलतरावाकडे पाठविलें. येतांना या वकिलानें चार सुंदर घोडे, उत्तम शृंगाराचे दोन भव्य हत्ती, आणि कुशल नाचणारणींचे दोन ताफे असा नजराणा सिंद्यासाठीं आणिला. सुस्वरूप तरुण पोरींच्या आगमनानें जितकें दौलतरावाचें मन द्रवेल तितकें दुसरें कशानें द्रवणार नाहीं हें राजपूत दरबारी जाणून होते. दौलतराव केवळ चैनीचा पुतळा होता. स्वातंत्र्य गमावून आपण आतां इंग्रजांचे पूर्ण ताबेदार बनलों ही हीन स्थिति त्यास कळत नव्हती असें नाहीं, पण दुःख किंवा मान अपमान सर्व विसरून जाण्याचें उत्कृष्ट साधन म्हणजे चैन व रागरंग असें समजून तो त्यांचा आश्रय करी. वाघाची शिकार, तरुणींचें नाचगाणें, रंगीबेरंगी चांगलेसे पतंग किंवा हत्तींच्या टकरा असे कांहीं विषय पुढें आले कीं सर्व अडचणी व दुःखें त्याच्या मनांतून पार नाहींशीं होत. एकदां स्वारी एका गढीस वेढा घालून लढत होती. वेढ्याचें काम आपण स्वतःच सर्व पाहणार असें सांगून त्यानें जवळच एका शेतांत तंबू उभारून तेथें चार खुषमस्कऱ्यांचें संगतींत अत्यंत अर्वाच्य क्रीडा चालविली. त्या वेळीं

बाहेरून कोणी सुद्धां आपल्याकडे येऊं नये असा त्यानें सक्त बंदोबस्त ठेविला होता. त्याचा जीव खाणारे मुख्य प्राणी म्हणजे दोन,—एक बायको बायजाबाई व दुसरा त्याचा कारभार पहाणारा दिवाण. या दोघांच्या कचाट्यांतून सुटण्याची संधि त्यास कधीं काळींच चोरून मारून प्राप्त होई; आणि एकदां अशी संधि मिळाली कीं त्याच्या त्या बेफाम व निर्लज्ज चैनबाजीचें वर्णन शब्दांनीं करणें अशक्य होय; आणि केलें तरी तें कोणास खरेंसुद्धां वाटणार नाहीं. हलकट स्त्रीपुरुषांच्या संगतींत तो अमला म्हणजे दुसरी कशाची त्यास शुद्ध राहत नसे. रोज नव्यानव्या तरुणींच्या लीलांत गर्क राहिल्यानें त्याची पूर्वींची तरतरीत बुद्धि साफ नाहींशी झाली. आपले हे वेडेबिद्रे चोज पुरविण्यासाठीं त्यास नीच व हलकट लोकांची संगत बाळगावी लागे; आणि या विषयाचें एक स्वतंत्र खातेंच त्यानें नेमिलेलें होतें. तरी बरें. त्याच्या तीन विवाहित स्त्रिया स्वारींत बरोबर होत्या. त्या सर्व तरुण व सुस्वरूप होत्या. बाहेर त्यानें कितीही ख्याल केले तरी त्याचा सर्व जीव कीं प्राण बायजाबाईवरच होता यांत संशय नाहीं. तिची सर्व व्यवस्था तो उत्तम ठेवीत असे. इतरांचे हाल मात्र कांहीं पुसूं नयेत. बायजाबाई आपल्या या सवतींस अगदीं पाण्यांत पाही. तिची एक दासी होती, तिला तिनें काढून टाकिलें, तेव्हां ती जाऊन ब्राउटनचे परिवारांत राहिली. ती गोष्ट लगेच यजमानणीस कळली. दुसरे दिवशीं ब्राउटनला दौलतरावाचा निरोप आला, कीं तुम्हीं त्या बाईस आश्रय देऊं नये, घालवून द्यावी. त्या वेळीं तिनें आपली कहाणी त्यास सांगितली ती अशी कीं, ' आज तीन वर्षें मी बाईजवळ कपडे शिवण्याचें काम करीत असतां, सर्जेरावाचा एक पठाण नोकर मजकडे येऊन लघळपणा करूं लागला. पण त्याला मी झिडकारून दिलें, त्याबरोबर त्यानें जाऊन मजविरुद्ध नाहीं नाहीं त्या कागाळ्या बाईस सांगितल्या. त्यावरून त्यांनीं मला काढून देऊन या परदेशांत अन्नान्न करीत भटकायला लाविलें. माझें घर दिल्लीस आहे. इतक्या लांब मला आतां कोण पोंचविणार ! '

पैशाचा पेंच तर दौलतरावास सारखा जाचीत होता. सरदार व सावकार नेहमीं जवळ धरणें धरून त्यास उपास पाडीत; व नाहीं नाहीं त्या अपेष्टा सहन करण्यास लावीत. मात्र यावरून असें कोणी समजूं नये कीं तो सर्वथा निष्कांचन होता. त्याची खासगी पुंजी निदान पन्नास लाखांची तरी खास होती. कितीही अडचणी आल्या तरी तो या पुंजीस हात लावीत नसे. या द्रव्याची व्यवस्था अशी होती कीं तिच्यांत सदैव भर पडत राहवी, पण त्यांतून बाहेर मात्र कांहीं जाऊं नये.

निरनिराळ्या खेळांचे मोसम ठरलेले होते. पतंगांचे दिवस आले, कीं खाशी स्वारी दररोज सायंकाळीं हजारों लष्करी इसमांबरोबर मोठ्या पटांगणांत तासांचे तास पतंग खेळतांना दिसायची. मग मांजा तयार करणें, तऱ्हेतऱ्हेचे नवीन रंग व कागद बनविणें इत्यादि कामांत सर्व मंडळी चूर झालेली दिसे. असाच प्रकार इतर खेळांचा. हत्तींच्या टकरांची तर दौलतरावास भारी हौस. त्यासाठीं शेंकडों हत्तींस खुराक व औषधी चारून मस्त करीत. एखादे वेळीं असे हत्ती ठाणावरून सुटून जो प्रलय उडवीत तो कांहीं पुसूं नये. त्यांत कित्येकांचे प्राण जात. नाहीं दाद ना फिर्याद, अशी स्थिति होई. याशिवाय दुसरें मोठें करमणुकीचें साधन म्हणजे कुस्त्या. नाना तऱ्हेच्या खुराकांनीं पुष्ट बनविलेले उत्तमोत्तम पेहेलवान दौलतरावाचे पदरीं असत; आणि दूरदूरचे दुसरे कसबी येत त्यांच्या कुस्त्यांची दंगल वारंवार चाले. पुरुषांप्रमाणें स्त्रीपेहेलवानही नेमणुका देऊन दौलतरावानें पदरीं बाळगिल्या होत्या. या स्त्रिया शरीर कमावून गांवोगांव हिंडत आणि ठिकठिकाणीं पुरुषांस देखील सामन्यास बोलावीत. त्यांची शरीरें व शक्ति इतकी मजबूद झालेली असे कीं बहुधा कोणी पुरुष त्यांजबरोबर कुस्ती खेळण्यास उभा राहत नसे. न जाणों, बाईनें आपणांस चीत केलें तर फिरून दुनियेंत तोंड दाखविण्यास जागा नाहीं. बंदुकीनें निशाण मारण्यांतही दौलतरावाचें कौशल्य फार चांगलें होतें. शिकारीस जातांना तो हरणाच्या कातड्याचाच सर्व पोषाख वापरी.

सामाजिक वगैरे महत्त्वाचे नानाविध विषय तत्कालीन परिस्थिति दर्शविणारे त्या वेळच्या लेखांतून भरपूर येतात, त्यांचा अभ्यास जिज्ञासूंनीं स्वतंत्रच करणें इष्ट आहे. दौलतराव सिंदे व त्याचा बाप महादजी यांचें कूल कित्येक मराठे मंडळी त्या काळीं हलकें समजत, आणि त्यांच्याशीं सोईरगत करण्यास सहसा तयार नव्हते. दौलतरावास ही गोष्ट अत्यंत दुःसह होऊन उच्च मराठे कुटुंबांशीं बेटीव्यवहार करण्याचे प्रयत्न त्यानें अतोनात केले. मराठी राज्यांत आपण सर्वथा प्रमुख सरदार असतां, एवढ्या एका गोष्टींत आपणास वैगुण्य काय म्हणून असावें, असें त्यास वाटे. चतुरसिंग भोसल्यास राज्याची नवीन घडी बसविण्यासाठीं दौलतरावाचें साह्य अवश्य पाहिजे होतें, सबब त्याचे मार्फत आपलें आमचें एक ताट व्हावें अशी खटपट दौलतरावानें छत्रपतीकडे केली. तसेंच फलटणचे निंबाळकर वगैरे महाराष्ट्रांतील प्रमुख मंडळीकडे त्यानें असेच प्रयत्न सारखे कैक वर्षे केले.

**२ बायजाबाई.**—बापाचा भयंकर खून झाल्यामुळें बायजाबाईला अतोनात

दुःख झालें. दौलतराव तिची समजूत घालीत रात्रभर जवळ जागत बसला. आपल्या हातानें तो तिचे अश्रु सारखे पुशीत होता. त्या वेळीं बाई सहा महिन्यांची गरोदर होती. आनंदराव फाकड्यानें खून केला त्यास शिक्षा करण्याचा तिनें हट्ट धरिला. तेव्हां अंतस्थ रीतीनें त्यास बरीच रक्कम पोंचवून दौलतरावानें पळून जाण्यास सांगितलें. तेव्हां सिंदेशाही सोडून तो पुढें बडोद्यास गायकवाडांचे आश्रयास गेला. तेथें हें फाकडे घराणें हल्लीं नांदत आहे. मेल्यावरही सर्जेरावानें लोकांस छळण्यास कमी केलें नाहीं. कैक वर्षे त्याचें भूत दौलतरावाचे देवडीवर बसून लोकांस पछाडी आणि सर्वांस त्याची मोठी दहशत वाटे असें सांगतात.

बायजाबाईच्या कारणानें सर्जेरावाची आठवण पुष्कळ काळ मागें राहिली. तिच्या अंगीं सुद्धां बापाची कपटनीति कांहीं कमी उतरली नव्हती. नवऱ्यास तर तिनें सर्वथा मुठींत ठेविलें होतें. बायजाबाईचा धाक व बडेजाव मोठा होता. जवळ नेहमीं बटकींचा मोठा घोळका असे. त्या बटकींत सर्व हिंदुस्थानांतील अठरापगड जातींच्या बायका असत. वर्षाचीं दोन लुगडीं व पोटास अन्न मिळालें कीं त्या नोकरींत राहण्यास खुषी असत. कारण बाईजवळ थाटांत राहून असन्मार्गानें त्यांस चांगलीच किफायत करण्याची संधि मिळे. रात्रीं फक्त चौघींनीं आळीपाळीनें नोकरीवर राहवयाचें. बाकीच्यांना पाहिजे तिकडे भटकण्यास मुभा असे. प्रत्येकीचा कोणी ना कोणी लहान मोठा गृहस्थ ठरलेला प्यार असे. त्याजकडून दागिने व अन्य मोलवान् वस्तू त्या उपटीत, इतकेंच नव्हे, तर आपण कोणास कसें आपल्या जाळ्यांत अडकविलें आणि त्याजपासून कशी पैदास केली याची बढाई त्या मोठ्या आतुरतेनें आपल्या धनिणीस सांगत. इतर सरदारांजवळ सुद्धां अशा बटकी असत. मेल्यावर त्यांची जिंदगी मालकिणीस मिळे. त्यांनां कांहीं मुलें वगैरे असलीं तर त्यांच्या निर्वाहास त्या जिंदगीचा कांहीं अंश ठेवून बाकीचा पैसा नवीन होतकरू बटकीस वांटून देण्याचा रिवाज होता. स्त्रीनोकर फुकटांत मिळविण्याची ही साधी पद्धत पाहून ब्राउटननें तिचीं वाखाणणीच केली आहे.

दौलतरावास संतति नव्हती, ती व्हावी म्हणून त्यास सारखी मोठी हुरहूर लागलेली असे. बायजाबाईच्या लग्नानंतर दोन वर्षांनीं ती गरोदर राहिली. दौलतराव स. १८०० च्या दिवाळींत पुण्याहून बाजीरावाची रजा घेऊन उत्तर हिंदुस्थानांत जाण्यास निघाला, तेव्हां बायजाबाईच्या प्रसूतिनिमित्त दोन महिने त्यानें जांबगांवास मुक्काम केला पण तें मूल जगल्याचा उल्लेख नाहीं. सर्जेरावाचा खून झाला, त्या वेळीं म्हणजे स. १८०९ सालीं

ती गरोदर होती. त्या प्रसंगीं मुलगा व्हावा म्हणून नानाविध उपचार सारखे चालू होते. ब्राउटन म्हणतो, मुलगाच होणार असें अनेक देशी विदेशी ज्योतिष्यांनीं छातिठोक भविष्यें वर्तवून दौलतरावापासून बक्षिसें सुद्धां उपटलीं. पुढें प्रसूति होऊन तिला मुलगी झाली हें वर्तमान ता. २०•१०•१८०९ रोजीं जाहीर झालें, तेव्हां जो प्रचंड आशाभंग सर्वत्र पसरला, त्याचें वर्णन करणें कठिण आहे. कांहीं काळ तर अशीच लोकांची समजूत झाली कीं मुलगी झाली असें खोटेंच वर्तमान मुद्दाम जाहीर करण्यांत आलें आहे. मुलगा असला कीं त्याला दृष्ट वगैरे बाधून तो अल्पायुषी होतो, परंतु मुलगी झाली म्हणजे जें खेदप्रदर्शन सर्वत्र होतें त्याच्या योगानें मुलाची बाधा टळते, अशी समजूत लौकिकांत असल्यामुळें, खोटीच बातमी बाहेर सांगण्यांत आली असा पुष्कळांस भ्रम होता. पण ता. २९•१०•१८०९ रोजीं बारशाचा समारंभ होऊन मुलीचें नांव कृष्णाबाई ऊर्फ सोनुबाई असें ठेवण्यांत आलें, तेव्हां लोकांची खात्री झाली.

महादजीची मुलगी **बाळाबाई शितोळे** वरील बाळंतपणाचे प्रसंगीं व पूर्वीहि कैक वर्षें दौलतरावाकडे येऊन राहिली होती. वयानें ती बायजाबाईहून पुष्कळ मोठी होती सर्जेरावाच्या विरुद्ध म्हणून जो मोठा पक्ष दरबारांत होता, त्याचें अध्वर्युपण या बाळाबाईकडेच होतें. दौलतरावाच्या अव्यवस्थित कारभाराबद्दल ती कैकवार त्याची चांगली खरडपट्टी काढी. जवळ असतांना तो तिचें सर्व बोलणें निमूटपणें ऐकून घेई; आणि व्यसनमोचनाच्या शपथा घेऊन पश्चात्तापाची बतावणी परिपूर्ण करी. पण पुनः तो आपल्या पहिल्या संवगड्यांत आला कीं सर्व शपथा व वचनें पार विसरून जाई. बायजाबाई ऐशीं वर्षें वयाची होऊन ता. २७•६•१८६३ रोजीं मरण पावली. दत्तक पुत्र जनकोजी याच्याशीं तिचें पटलें नाहीं. तिनें बंडावा केला तेव्हां इंग्रज सरकारानें तिला ग्वालेर राज्यांतून काढून दिलें ( ता. ८•७•१८३३ ), तेव्हां ती थोडे दिवस आग्र्यास जाऊन राहिली. तेथें तिची मुलगी चिमणाबाई ता. १४•१०•१८३३ रोजीं मरण पावली. आगरा सोडून स. १८३५ पर्यंत फत्तेगड येथें, पुढें पांच वर्षें प्रयाग व काशी येथें, नंतर स. १८४०—४५ पावेतों नासिक येथें अशा रीतीनें फिरून परत ती पुनः स. १८४५ त इंग्रजांच्या परवानगीनें ग्वालेरीस गेली. तदनंतर तिनें विशेष हालचाल केली नाहीं. तिच्या प्रवासाचें वृत्त विनायक रामचंद्र उ० दादा कुंटे तिच्या बरोबर होता त्यानें लिहिलेलें आहे.

**३ सर्जेराव घाटग्याचा अंत.**—याचें भरपूर वृत्त पूर्वी आलेंच आहे. ‘ तरीच जन्मा यावें ’ अशा कोटींतील माणसांत सर्जेरावाची गणना केली पाहिजे.

ज्या गृहस्थानें मराठी राज्याची पूर्वपरंपरा यत्किंचितहि पाळली नाहीं, ज्यानें हातीं आलेल्या संधीचा व अधिकाराचा उपयोग केवळ पुढें आलेल्या प्रसंगाच्या निभावणी-पुरताच केला, ज्याला सत्य, दया, प्रेम इत्यादि गुणांचें वारेंसुद्धां कधीं शिवलें नाहीं, अशी ही अमानुष व्यक्ति मराठशाहीच्या नाशास पुष्कळशी कारण झाली आहे. त्याच्या उत्तरायुष्याचा ब्राउटननें लिहिलेला कथाभाग तेवढाच आतां सांगावयाचा आहे.

" सर्जेराव शरीरानें ठेंगू व जाड आहे. उंची पांच फुटांहून अधिक नाहीं. अवयव सर्व बटबटीत असून डोळे घारे पण काकदृष्टीचे आहेत. रंग गोरा व डोकीचे केंस पांढरे शुभ्र आहेत. मूर्ति पाहतांच अंतर्यामाची भरपूर कल्पना होते. कपट, क्रौर्य, खुनशीपणा हे सर्व गुण चेहऱ्यावरच उमटलेले दिसतात. पण तोंड उघडतांच बुद्धीची चमक झळकूं लागते. पायघोळ धोतर नेसून अंगांत एक बन्यान, त्यावर खांद्यावरून घेतलेला एक शेला आणि डोक्यास दाभणी जरी किनारीची पातळ टोपी, टोपीच्या किनारीचे दोन गोंडे डाव्या खांद्यावर लोंबतात, अशी ही मूर्ति पाहिली म्हणजे वाटेल कीं हा प्राणी वेडसर असावा. हातांत एक माळ असून तींतील चंदनी मणी तो झराझर बोटांनीं ओढीत असतो. अलीकडे धन्याची मर्जी त्याजवरची साफ उडाली आहे. नाहीं तर ल्हान-थोर सर्व त्यास चळचळा कांपत असतात. जरा कोणी मर्जीविरुद्ध काम केलें कीं तो मेलाच म्हणून समजावें; आणि तो मृत्यु सुद्धां असा तसा नव्हे, तर गळफांस, विषप्राशन हें तर नेहमींचेंच, पण वेळीं अंगास बाण अगर नळे बांधून ते पेटवून दिले, कीं त्या दुर्दैवी प्राण्याचे तुकडे तुकडे होऊन ते वर हवेंत उडून जात."

'**जवाहीर**' नांवाची सर्जेरावाची एक आवडती रक्षा होती. तिच्याशीं एकदां त्याच्या नोकरानें फाजीलपणा केला. त्याबरोबर सर्जेरावानें त्याचे हात पाय व नाक छेदून टाकिलें. सर्जेरावाजवळ राहून तिनें मोठा द्रव्यसंचय केला. तिची दुसरी एक मैत्रीण रतनकुंवर म्हणून चांगली गाणारीण सर्जेरावाचा मेहुणा पाटणकर याची रक्षा होती, तिनेंही असाच पुष्कळ पैसा मिळविला. सर्जेरावाचा खून झाल्याबरोबर बायजाबाईनें त्या दोघींस एकदम कैद केलें; आणि जवाहीरला आपल्यासमोर आणवून स्वतः प्रथम छडीनें व मग चाबकानें बेदम मारिलें. दौलतरावानें तर तिचें नाक कान कापण्याचाच हुकूम फर्माविला; पण तिनें जवळचा सर्व संचय त्यास देऊन जिवानिशीं सुटका करून घेतली. तीच दशा नंतर रतनकुंवरचीही झाली. तिची एक लाख तरी संपत्ति दौलतरावानें हस्तगत केली. तथापि आणखी तिच्या-पाशीं पुष्कळ संचय ठिकठिकाणीं आहे असें समजतें.'

सिंद्यानें सर्जेरावास जवळच्या कारभारांत ठेवूं नये असें कलम तहांत लिहून दिल्यामुळें त्यानें नाइलाजास्तव सर्जेरावास खंडण्या वगैरे वसूल करण्याचें कांहीं तरी काम देऊन बाहेर प्रांतांत ठेविलें. दोन अडीच वर्षे बाहेर राहिल्यावर, दौलतरावानें विशेष आग्रह धरल्यामुळें तहांतील निर्बंध इंग्रजांनीं काढून घेतला; आणि दिवसेंदिवस आपला कारभार बिनसत चाललेला पाहून आणि विशेषतः बायजाबाईच्या आग्रहास्तव स. १८०९च्या आरंभीं दौलतरावानें सर्जेरावास पुनः जवळ बोलावून त्यास आपला कारभार सांगितला. दौलतराव अजमीरच्या बाजूस असतां सर्जेराव त्याच्या भेटीस आला. पहिल्या भेटी मोठ्या समारंभानें झाल्या, परंतु चार दोन महिन्यांतच त्याच्या जुल्माला लोक इतके कंटाळून गेले कीं कागाळ्या ऐकतां ऐकतां दौलतरावास जीव नकोसा झाला. तो पदोपदीं सर्जेरावाचा पाणउतारा करून नाहीं नाहीं तें त्यास टाकून बोलूं लागला. यजमानाची त्याजवर मर्जी नाहीं हा भाव बाहेर उघड होतांच लोकही त्यास बिलकूल मानीनातसे झाले. सरदार सावकार, व सामान्य लोक त्याचा घटके घटकेस पाणउतारा करूं लागले. खुद्द दौलतरावानें सुद्धां त्याची सारखी टवाळकी चालविली; आणि उगाच ' तुम्ही अवाचे सवा खर्च करितां ' अशीं दूषणें दिलीं. तेव्हां डोक्यावरची फाटकी घामट टोपी यजमानापुढें आपटून सर्जेराव म्हणाला, ' माझा खर्च तुमचे डोळ्यांत खुपतो काय? माझा खर्च किती आहे याची साक्ष ही टोपीच पटवील. ' असें म्हणून रागारागानें तो आपल्या तंबूवर गेला आणि एक उंट, एक कांबळी व तीन तोळे चांदी आणून त्यानें त्या वस्तू फकिरास दान केल्या. असें दान केलें म्हणजे यजमानाची मर्जी आपल्यावर पुनः बसेल अशी त्याची समजूत होती. पण सर्जेरावाचे शत्रुही कांहीं कमी खंबीर नव्हते. गोकुळ पारख म्हणून एक सावकार होता तो लगेच जाऊन दौलतरावास बोलला, ' सर्जेरावाचें नशीबच खोटें आहे, तो अपेशी आहे. तुम्ही त्यास दूर करा, कीं लगेच तुमचें सर्व सुरळीत चालेल.' त्या दिवशीं दौलतराव संतापून इतका लाल झाला होता कीं तशी त्याची वृत्ति पूर्वी कधीं कोणीं पाहिली नव्हती. असले हे रुसवे व तंटेभांडणें नेहमींचीच होतीं. देवबा काळ्या म्हणून दौलतरावाच्या मर्जीतला एक नोकर होता. त्याचे पाय धरून सर्जेरावानें यजमानाची समजूत घालण्याचा पुष्कळ प्रयत्न केला. कारभाराची मुख्य अडचण म्हणजे पैसा. फौज कमी करावी, तर तिचा तनखा चुकवून दिला पाहिजे. पण पैशाशिवाय तनखा कसा चुकणार! सरदार पाटणकर सर्जेरावाच्या बायकोचा भाऊ, त्यानें कांहीं रक्कम दौलतरावाचे खासगींतून कर्ज घेतली होती. मुदत झाली तरी रक्कम परत येईना. तेव्हां त्याचे घरीं दौलतरावानें धरणें धरलें. तेणेंकरून घाटगे अगदींच चिडून गेला.

दसऱ्याचे दिवशीं घाटग्यानें मोठा दानधर्म केला; पांच हजार रुपये ब्राह्मणांस वांटले; दोन हजार गरीबांस भोजन घातलें. तरी त्याचें जांवयाशीं जमलें नाहीं तें नाहीं, उत्तरोत्तर फाटतच चाललें. उभयतांत भयंकर वितुष्ट पडलें. तेव्हां नाइलाज होऊन घाटगे चंबूगवाळें आटपून स्वारींतून चालता झाला. तेव्हां त्याची समजूत करून परत आणावा म्हणून बायजाबाईनें नवऱ्याजवळ हट्ट धरिला. परंतु दौलतराव ऐकेना. मात्र सर्जेरावाची रक्षा जवाहीर जवळ होती तिला दौलतरावानें अडकवून ठेविलें. त्याची खात्री होती कीं तिच्यासाठीं घाटगे झकत परत येईल. जवाहीरला महाराजानें अडकवून ठेविलें ही गोष्ट सर्जेरावास समजली, तेव्हां तो अत्यंत विव्हळ झाला. त्यानें महाराजांस निरोप पाठविला, कीं ' जवाहीर परत आली नाहीं तर मी प्राण ठेवणार नाहीं. तिला अडकवून ठेवण्याचें प्रयोजन काय, तिनें कांहीं तुमचा गुन्हा केलेला नाहीं. ' असें होतां होतां बाळोबा इंगळ्यानें मध्यस्थी करून सर्जेरावास समजावून परत आणिलें. पण ही गोडी फार दिवस टिकली नाहीं. जुलई ता. १५ सन १८०९ रोजीं सर्जेरावानें जांवयास मेजवानी केली. त्या प्रसंगीं दोघांनीं यथेच्छ पान करून रात्रभर नाचरंग केले. पण रात्र संपतांच दुसऱ्या दिवशीं पुनः त्यांच्या भांडणाचा पहिला दिवस सुरू झाला. दरबारांत कामें चाललीं असतां दौलतरावानें घाटग्याचा असा कांहीं पाणउतारा केला कीं तो तसाच उठून चालता झाला. मुक्कामावर जाऊन जवाहीरला त्यानें पुढें रवाना करून आपली आटपाआटप चालविली. अशा गडबडींत एक दोन दिवस गेले. पुनः सर्जेराव ता. २६ जुलई रोजीं रजा घेण्याकरितां म्हणून दौलतरावाकडे जाऊन आपल्या कांहीं मागण्या त्यानें निकरानें पुढें ठेविल्या. त्या तुच्छतेनें झिडकारून दौलतराव रागारागानें हत्तीच्या टकरा पाहण्यास निघाला. त्या वेळीं सर्जेरावानें यजमानाचा अंगरखा धरून, ' माझा निकाल करा आणि मग कोठें ते जा, ' असें म्हणून त्यास थांबविलें. त्याबरोबर दौलतरावाचे कांहीं नोकर पुढें होऊन घाटग्यास दूर करूं लागले. तेव्हां घाटग्यानें कंबरेची तलवार काढून नोकरांवर हात उगारला, त्या योगें थोडी दंगल होऊन तींत कांहीं लोक मारले गेले; आणि घाटगे जीव बचावून परत आपल्या तंबूंत गेला. त्याचे पाठोपाठ मानाजी फाकड्याचा मुलगा आनंदराव दौलतरावाचे देवडीवरील पाहऱ्यावर अमलदार होता तो नागव्या तलवारीचे कांहीं शिपाई बरोबर घेऊन घाटग्याचे तंबूवर गेला. तंबूच्या दोऱ्या कापून त्यांनीं तंबू पाडला. तंबूखालीं घाटगे सांपडला त्यास बाहेर रस्त्यावर आणून आनंदरावानें तलवारीनें त्याचे तुकडे पाडिले. एवढा घोर प्रकार भर बाजारांत झाला, पण त्याबद्दल यत्किंचित् कोणास वाईट वाटलें नाहीं. वर्तमान बाहेर कळतांच

पलटणें सज्ज झालीं. पण घाटग्याचे बाजूनें कोणीच पुढें न आल्यामुळें लगेच सर्व शांत झालें. अशा रीतीनें हिंदुस्थानांतील एक अत्यंत दुष्ट व धाडसी व्यक्ति पापाचें प्रायश्चित्त भोगून दुनियेंतून नाहींशी झाली. त्याच्या इतक्या सुपीक मेंदूचा गृहस्थ क्वचितच निर्माण झाला असेल. अमुक एक गोष्ट करायची त्यानें मनांत आणिली कीं मग बरें वाईट, न्याय अन्याय, सत्यासत्य वगैरेची पर्वा त्यास बिल्कूल वाटत नसे. लोकांस आवडेल असें एकही कृत्य त्याचे हातून घडलें नाहीं. कैक वेळां निष्कारण दुसऱ्याचे हाल करण्यांत तो आनंद मानी. एकंदर मराठशाहींत सर्जेरावाइतका दुष्टपणा दुसऱ्या कोणाचेही हातून घडला नसेल. तथापि त्याच्या शेवटच्या या पांच सहा महिन्यांच्या कारभारांत त्याच्या हातून घोर अन्याय कांहींच झाले नव्हते. निमित्तास कोणी तरी पुढें पाहिजे इतक्याच उद्देशानें दौलतरावानें त्यास पुनः जवळ आणिलें; पण तो कारभार सुरळीत चालण्यास दौलतरावानें त्यास बिलकूल साह्य केलें नाहीं. शेवटची दंगल चालू झाली, तेव्हां " सर्जेरावास दगा करूं नका, " असा हुकूम दौलतरावानें मुद्दाम दिला, तरी पण त्यानें इतके शत्रु करून ठेविले होते, कीं हा केव्हां एकदां नाहींसा होतो अशीच सर्वांची उत्कंठा होती.

कुलाबेकर **बाबूराव आंगरे** हा बहुतेक दौलतरावाजवळच असे. हा त्याचा मातुल, येसाजी आंगऱ्याचा मुलगा, म्हणजे थोरल्या कान्होजीचा नातू. येसाजीची मुलगी मैनाबाई ही दौलतरावाची आई. बाबूराव विशेष शूर किंवा चतुर होता असें नाहीं, पण सर्जेरावास इंग्रजांनीं दूर काढलें, तेव्हां कांहीं काळ आपला कारभार बाबूरावानें करावा असा त्यास दौलतरावानें भारी आग्रह केला. पण कारभार म्हणजे सगळ्यांचे शिव्याशाप, ती जोखीम बाबूरावानें बिलकूल पत्करली नाहीं. तो पुढें हिंदुस्थानांतून देशीं येत असतां ता. १·९·१८१३ रोजी जांबगांव येथें मरण पावला. ब्राउटनच्या लेखांत या बाबूराव मामाचें वर्णन पुष्कळ आहे, पण तें मामुली स्वरूपाचें असल्यामुळें येथें देण्याचें कारण नाहीं.

येसाजी आंगरे, कुलाबेकर.
- मैनाबाई
  - दौलतराव सिंदे
- महादजीराव
  - संभाजीराव, सवाई सरखेल मृ. १८४५
    - बाबूराव आपासाहेब, १८४५–१८९२
      - संभाजीराव बाबासाहेब १८९२–१९०२
        - चंद्रोजीराव प्रस्तुत
- बाबूराव मामा

**४. अंबूजी इंगळे.**—दौलतरावाजवळच्या मंडळींतील आणखी एक प्रमुख व्यक्ति म्हणजे अंबूजी इंगळे होय. हा ८१ वर्षांच्या वृद्धावस्थेंत ता.४.६.१८०९ रोजीं म्हणजे सर्जेराव घाटग्याचे पूर्वी दीड महिना मरण पावला. मरेपर्यंत तो प्रकृतीनें अगदीं खडखडीत होता. वर्ण काळा, चेहरा तरतरीत व भाषण थट्टेखोरा पोषाख तर अगदींच साधा, कीं ज्यावरून त्याच्या मोठेपणाची बिलकुल कल्पना होऊं नये. पायांत चोळणा, अंगांत रुंदार बंडी व डोक्यास शुभ्र मुंडासें, अंगावर कधीं काळीं शालजोडी असे. अजमीरचे कारभारावर असतां अंबूजी आजारी पडला, तेव्हां युरोपियन डॉक्टरास बोलावून कांहीं उपचार त्यानें केला; पण बरें वाटेना तेव्हां बनास नदीच्या कांठीं जवळच बायकामुलें होतीं तेथें जाऊन सर्वांचा निरोप घेऊन त्यानें देह ठेविला. त्याजपाशीं द्रव्यसंचय मोठा असावा अशी सर्वांची कल्पना होती. परंतु सर्जेरावानें त्यास छळून त्याचें द्रव्य उपटण्यास कमी केलें नाहीं. त्यासाठीं तेलाचे बोळे त्याच्या बोटांवर ठेवून ते सर्जेरावानें पेटवून दिले होते. मरणापूर्वी थोडे दिवस अंबूजीचें लग्न ठरलें होतें, पण पोरीच्या नशीबीं वैधव्य नसल्यानें तें घडून आलें नाहीं. अंबूजीचे पश्चात् त्याचा भाऊ बाळोबा हा पुढें इंगळ्यांचे दौलतीची व्यवस्था पाहूं लागला. बाळोबाही मोठा वजनदार असून त्याचें घराणें अद्यापि ग्वालेरीस नांदत आहे.

**५ कित्येक सामाजिक विषयांचा उल्लेख.**—मराठी राज्याच्या संवर्धनांत सारस्वत ब्राह्मणवीरांचा व मुत्सद्यांचा जो भाग आहे, त्याचा इतिहासास विसर पडणें युक्त नाहीं. कारण राष्ट्राचे सर्व घटक जेव्हां यथायोग्य उद्योग करतात तेव्हांच त्या राष्ट्राचा उदय होतो. मालवणपासून कारवारपर्यंतच्या प्रदेशांत त्या ब्राह्मणांचा भरणा विशेष आहे. पोर्तुगीज अमलांत त्यांची कर्तबगारी झळकूं लागली. मराठशाहींत तर यांची कामगिरी फार मोठी झाली. यांस त्या वेळेस शणई वा शेणवी असें म्हणत. पीतांबर शेणवी व रामचंद्रबाबा सुखटणकर यांचीं नांवें सुप्रसिद्ध आहेत. डॉ० सेन यानीं पोर्तुगीज कागदांतील हकीकती प्रसिद्ध केल्या आहेत त्यांत ह्या शेणवी गृहस्थांची कर्तबगारी चांगली दिसून येते. मुख्यतः परराष्ट्रीय वकिलीचें व राज्याच्या हिशेबाचें काम या दोन बाबतींत आरंभीं सारस्वत मंडळी प्रवीण असून पुढें ते तलवार-बहाद्दरही बनले. दुभाषगिरीचें काम पोर्तुगीजांचे वेळेपासून हेच करीत असल्यामुळें मुंबई, गोवा वगैरे ठिकाणीं नारायण शेणवी, नारायण विठ्ठल धुमे, रणछोड कृष्ण संजगिरी व त्याचा मुलगा रघुनाथ रणछोड वगैरे नामांकित वकिलांचीं नांवें आढळून येतात.

विसाजीपंत जाखी व नारोराम शेणवी हे पेशव्याचे अत्यंत ऋणानुबंधी सहायक होते. पराक्रमास क्षेत्र मिळाल्याबरोबर एकमेकांच्या प्रोत्साहनानें मराठशाहींत त्यांचा फैलाव झाला. विठ्ठल विश्राम व जिवाजी विश्राम सबनीस हे नानासाहेब पेशव्याचे वेळीं सावंतवाडीचा कारभार उरकीत होते. रामचंद्रबावा बाजीरावाचे तर्फेनें सिंद्यांचे पदरीं राहतांच त्यानें नर्मदोत्तर हिंदुस्थानांत मराठी सत्तेचें अधिष्ठान बसविलें. सदाशिवराव भाऊ त्यास गुरुस्थानीं मानीत असे. मराठ्यांची वसुलाची व हिशेबाची पद्धत त्यानेंच बांधून दिली. महादजीच्या वेळीं लखबा लाड व जीवबा बक्षी यांचा उदय झाला. लखबानें आग्र्याचा किल्ला व तेथील कारखाना मोठ्या चतुराईनें संभाळला. तदुत्तर दौलतराव सिंद्याचे हातीं सिंदेशाहीचीं सूत्रें आल्यापासून या सारस्वत वीरांचा छळ व उच्छेद कसा झाला त्याची हृदयद्रावक कहाणी मागें सांगण्यांत आलीच आहे. जीवबाचा चुलत बंधु जगोबा बापू पुष्कळ वर्षें उत्तर हिंदुस्थानांत वावरून ता. १९·५·१८१३ रोजीं मरण पावला. विठ्ठल यशवंत व जिवाजी यशवंत वर्दे बागनपागे, दौलतराव सिंद्याचे पदरीं कारभार करणारे कित्येक गृहस्थ यादवराव भास्कर, बाळकृष्ण गंगाधर, येसाजी रामकृष्ण व विठ्ठल गोरक्ष वगैरे मंडळी सारस्वत कीं अन्य याचा तलास लावणें जरूर आहे. निंबाजी भास्कर हा दिंडोरीचा ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मण असावा अशी माहिती मिळते. यादवराव भास्कर त्याचाच भाऊ कीं काय तें नकळे.

उपलब्ध कागदांत दुसरी अनेक प्रकारची उपयुक्त माहिती मिळते, तिचें संपूर्ण विवेचन करण्यास येथें सवड नाहीं. थोडें दिग्दर्शन मात्र येथें करितों. सरदार, नोकर, प्रमुख रहिवासी अशांच्या याद्या ठिकठिकाणीं छापलेल्या आहेत, त्या सर्वांचा स्वतंत्र अभ्यास केल्यास सरकारी नोकरी, सामाजिक व्यवसाय व तत्कालीन रीतरिवाज वगैरे बाबतींत कित्येक निश्चित सिद्धांत बांधतां येतील. खरे ले० ३१३४ यांत महाराष्ट्रांतील प्रमुख मंडळींस पटवर्धनांकडून लग्नाचीं आमंत्रणें गेल्याची एक महत्त्वाची यादी छापलेली आहे; व इ. सं. पे. द. यांत सरंजामाच्या १० यादी परिपूर्ण तपशिलाच्या छापल्या आहेत, त्यांचाही उपयोग करतां येईल. भा. इ. मं. इतिवृत्त शके १८३८ या पुस्तकांत पृ. ६४—७० वर अव्वल इंग्रजींतील सरदारांची व प्रमुख व्यक्तींची दुसरी एक यादी व पे. द. पृ. २९५ वर जातवार कारकुनांची यादी छापलेली आहे, तिचाही असाच उपयोग करितां येईल. पेशव्यांच्या रोजनिशा छापलेल्या आहेत, त्यांत शेवटच्या तीन चार पेशव्यांच्या वेळचे समारंभ, नजराण्याचे दरबार किंवा जहागीर-

दारांचीं नांवनिशी ठिकठिकाणीं छापलेली आहे, त्यांचाही उपयोग करून कित्येक घराण्यांचा व व्यक्तींचा शोध लावितां येईल. शिवकालीन सरदारांच्या व पानिपतावर पडलेल्या इसमांच्या याद्या छापलेल्या आहेत. अशा सर्व नामावळी एकत्र करून दर-पिढीस राष्ट्रीय उद्योगांत कोणत्या जातीचे किती पुरुष खपत होते, आणि त्यांच्या लायकींत उत्तरोत्तर कसा फरक पडत गेला हें पाहतां येईल. कै. राजवाडे यांनीं महाराष्ट्रांतील कर्तबगार माणसांचा तुलनात्मक आढावा काढिला त्याच धर्तीवर वरील काम करितां येईल.

सामाजिक बाबतींत सारस्वतांचा वाद, कोंकणस्थ कऱ्हाड्यांचा वाद, कायस्थ कऱ्हाड्यांचा वाद, कायस्थ प्रभूंच्या ग्रामण्याचा वाद, पाताणे प्रभूंचा वाद वगैरे संबंधांत पुष्कळच कागद छापलेले आहेत. शेणव्यांस षट्कर्माचा अधिकार नाहीं असा वाद निघाला असतां पुण्यांतील शास्त्री मंडळीनें शेणव्यांस सर्व बाबतींत इतर ब्राह्मणांच्या बरोबरीचे पूर्ण हक्क आहेत असा निकाल दिला, आणि गोपाळ नाईक तांबवेकर यानें स्वतः ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मण असतां दशग्रंथी शेणवी ब्राह्मणांस अग्रहार दिले त्याचा उल्लेख स्मरणीय आहे ( जु. ऐ. गो. १·२५ ). कऱ्हाडे व चित्तपावन यांचा कलह वृत्तिविषयक असून एकमेकांनीं सभा भरून बहिष्कार घातले; उभय पक्ष वाडीच्या सावंतांकडे फिर्याद गेले, त्या संबंधाची मनोरंजक हकीकत खरे ले. ४४५१ ४६९०, ४७००, ४७३२, ५२५८ यांत पाहवी. पृ. ५५८६ वर खऱ्यांनीं याची चर्चा केली आहे. जीवबा बक्षीचे चरित्रांतील ले. २२२, २२८, २६४, २६७ याच विषयाचे आहेत. स. १७९९ त मुंबईंत मोठें वादळ झालें त्याची हकीकत खरे ले. ५११० यांत आहे. फिरंगी वैद्यांचा संचार बाजीरावाचे वेळेस इंग्रजांच्या आक्रमानुसारच वाढत गेला ( ले. ४६५७ ). डॉ. कोटस् हा गृहस्थ पुण्यांत गोस्तन-देवीचा प्रसार करणारा पहिला इंग्रज होय. जादू, चेटकें वगैरे प्रयोगांचा संचार त्या काळीं अतोनात होता. ( पहा खरे ले. ३९५८ व पृ. ५०६६ ). तत्कालीन सांकेतिक भाषेचे मासले म्हणून खरे ले. ५३२५, ५३३४, ५३३७, ५३६०, ५४१०, ५४१८, ५४३३ हे वाचकांनीं अवश्य पाहवे. सातारकर महाराज दौलतराव सिंद्यास कमी समजून त्याच्याशीं पंक्तिव्यवहार करीत नसत. अशा प्रकारच्या सामाजिक आचाराचे अनेक प्रश्नांस त्या वेळीं महत्त्व येऊन पुष्कळ खळबळ उडे प्रतापसिंगाचा या बाबतींतील प्रयत्न कसा विकोपास गेला, त्याचें विवेचन दुसरीकडे केलें आहे.

पेशवाई जातांच एल्फिन्स्टन वगैरे अधिकाऱ्यांनीं पुण्यास विश्रामबागेंत संस्कृत पाठशाळा सुरू केली. प्रतापसिंगानें अशीच पाठशाळा साताऱ्यास घातली. क्रिस्ती पादऱ्यांनीं चहूंकडे इंग्रजी शिक्षणाच्या शाळा घातल्या. मराठीचे कोश तयार होऊन पाश्चात्य ज्ञानभांडार देशी भाषांत उतरूं लागलें. बाजीरावाचें राज्य घेतल्यावर जमीन, शेतसारा, लोकस्थिति, वगैरे विषयांचे तपास करून व खानेसुमारी घेऊन पहिल्या डेक्कन कमिशनरांनीं पुष्कळ उपयुक्त माहितीचा संग्रह केला. हे सर्व विषय अभ्यसनीय असूनही त्यांचा अंतर्भाव मला या ग्रंथांत करितां येत नाहीं. हल्लींचें युग तज्ञांचें आहे; प्रत्येक बाबतीचा विशिष्ट अभ्यास त्या त्या तज्ञांकडून झाला पाहिजे. अगोदरच माझ्या उद्योगाचा विस्तार कल्पनेबाहेर वाढल्यामुळें आतां आटोपतें घेण्याचा विचार मीं ठरविला आहे. शिवाय अशा अवांतर बाबतींचें दिग्दर्शन मी आपल्या पुस्तकांत प्रसंगानुसार यावच्छक्य केलेंही आहे.

६ **मराठशाहीच्या नाशाचीं कारणें**.—राजकीय घडामोडींचें मुख्य काम संपल्यावर कित्येक सामान्य विषयांची चर्चा इतिहासकारास करावयाची असते. इतिहास शास्त्राची व्याप्ति फार मोठी आहे हें मी जाणून आहें. पण हें शास्त्र तरी अनेकांच्या विचारांनींच वाढत असतें. वाङ्मय, समाज, आर्थिक स्थिति वगैरे विषयांचा व्यासंग तज्ञांकडून होत जाईल तशी इतिहासांत भर पडणार आहे. असा विशिष्ट व्यासंग मराठ्यांच्या इतिहाससंबंधानें अद्यापि म्हणण्यासारखा फैलावलेला नाहीं; आणि निश्चित अनुमानें बांधतां येतील इतकी विपुल साधनसामुग्री पण बाहेर आलेली नाहीं. जी सामुग्री माझ्या अवलोकनांत आली, तिचा परामर्ष मीं ठिकठिकाणीं शक्य तितका घेतला असून, ज्या त्या वेळीं वरील बाबतींसंबंधीं आपले विचार वाचकांपुढें मांडलेच आहेत. म्हणून आतां अशा तात्त्विक बाबतींचा आणखी एखादा उपसंहारात्मक स्वतंत्र भाग लिहिण्याची आवश्यकता मला वाटत नाहीं. पेशवेदप्तरांतील कागद छापले जात आहेत, तें काम पूर्ण झाल्यावर कदाचित् ज्यास्त अधिकारानें या विषयावर बोलण्याची सोय होईल. तथापि मराठ्यांचा राज्यनाश कां झाला, शिवाजीनें अत्यंत बिकट परिस्थितींतून जें राज्य निर्माण केलें तें अल्पावधींत एकदम नाश कां पावलें, हा या इतिहासाध्ययनांत मोठा महत्त्वाचा प्रश्न प्रत्येकाच्या मनांत सदैव उभा असतो. सबब तेवढ्या प्रश्नासंबंधीं माझे विचार येथें संक्षेपानें नमूद करणें मला इष्ट व जरूर वाटतें. कारण आजपावेतों या विषयाचा खल अनेक व्यासंगी

व अधिकारी विद्वानांनीं केला असून त्या संबंधानें त्यांच्यांत मतभेदही भरपूर दिसून येतो.

मला वाटतें मी सुद्धां या पूर्वी जीं अनुमानें वेळोवेळीं नमूद केलीं, तीं आतां ज्यास्त वाचनानें व अभ्यासानें सर्वथा बदलावींशीं वाटतात. मराठींत जितकी म्हणून साधनसामुग्री प्रसिद्ध आहे, ती आतां बहुतेक माझे नजरेखालून गेली आहे. शिवाय दुसऱ्या बाजीरावाचे काळीं जे मोठमोठे इंग्रज अधिकारी पामर, वेल्स्ली बंधु, एल्फिन्स्टन, मन्रो, हेस्टिंग्ज वगैरे ठिकठिकाणीं कारभारावर होते, त्यांचीं विस्तृत लिखाणें आतांच माझे वाचण्यांत आलीं. मराठी सामुग्री बरोबरच याही इंग्रजी सामुग्रीचा विचार या विषयावर लेख लिहिणारानें अवश्य केला पाहिजे. एवढ्या विस्तृत साधनसंभाराचा साकल्यानें विचार करून नंतर आजपर्यंतच्या लेखकांनी आपलीं मतें नमूद केलीं होतीं असें मला दिसत नाहीं. मराठ्यांचें राज्य कां नाश पावलें, यासंबंधानें मला वाटतें गोपाळराव हरि देशमुखांपासून शिवराम महादेव परांजप्यांपर्यंत गेल्या पंन्नास वर्षांतील सर्व नामांकित लेखकांनीं व वक्त्यांनीं प्रसंगानुसार आपले विचार नमूद केले आहेत. यां पैकीं बरेचसे लेखक विशिष्ट व्यासंगाच्या आधारानें बोलत नसून, केवळ प्रतिपाद्य विषयाच्या समर्थनासाठीं मनांत गृहीत घेतलेले सिद्धान्त जोरानें प्रतिपादून आपण मोकळे होतात. सामाजिक सुधारणेचे भोक्त्यांस मराठ्यांचीं सामाजिक व धार्मिक व्यंगें तेवढीं ठळक दिसतात, तर राजकीय विषयांवर बोलणाऱ्यांस मराठ्यांची राज्यघटना सदोष वाटते, किंबहुना व्यवस्थित राज्यघटनेचा अभाव हेंच राज्यनाशाचें प्रमुख कारण त्यांस आढळतें. लष्करी शास्त्राचे पुरस्कर्ते सांगतात कीं पाश्चात्यांचें शास्त्रीय ज्ञान, शस्त्रास्त्रें, कवाईत व युद्ध पद्धत मराठ्यांनीं स्वीकारली नाहीं म्हणून त्यांचा पाडाव झाला. उलटपक्षीं मराठ्यांनीं आपला गनिमी कावा सोडून पाश्चात्य पद्धत स्वीकारिली म्हणूनच ते हरले असेंही एक मत तितक्याच आवेशानें मांडलेलें आढळतें. अर्थशास्त्राचे अभ्यासी मराठ्यांच्या आर्थिक परिस्थितीकडे बोट दाखवितात. अशीं भिन्न मतें अनेक लेखकांकडून पुढें आलेलीं पाहून सामान्य वाचकांची किंवा नूतन अभ्यासकांची दिशाभूल होणें साहजिक आहे. त्यासाठीं एवढें लक्षांत ठेवणें जरूर आहे, कीं अशा सामान्य लेखकांपैकीं केवळ आपापल्या विषयप्रतिपदनार्थ बोलणारा कोण, आणि विशिष्ट अभ्यास करून तेवढ्याच मुद्याचें विवेचन करणारा कोण, हा भेद मनांत जागृत ठेविला म्हणजे या विषयावर केवळ ऐतिहासिक दृष्टीनें बोलणाऱ्यांची संख्या पुष्कळ कमी होते. कै. राजवाडे, खरे व

प्रो. लिमये यांनीं किंवा यांच्या सारख्यांनीं या विषयांतील तज्ञ या नात्यानें जें प्रतिपादन केलें असेल तेंच जमेस धरणें अवश्य आहे. विद्यमान व्यक्तींपैकीं श्री. केळकर व रा. शेजवलकर यांनींही आपले सिद्धान्त स्पष्टपणें मांडलेले आहेत; प्रो. लिमयांचा 'गनिमी कावा वि. कवाइती कंपू' हा लेख मार्मिक विवेचनाचा मासला समजतां येईल. शेजवलकरांची विचारसरणी नानासाहेब पेशव्याच्या चरित्राचे प्रस्तावनेंत मांडलेली आढळते. खऱ्यांचें प्रतिपादन 'मराठे व इंग्रज' या पुस्तकाच्या प्रस्तावनेंत व इतरत्रही तितकेंच निर्भीडपणें दर्शविलेलें आहे; आणि खुद्द श्री. केळकरांनीं 'मराठेशाही कशानें बुडाली' असें एक स्वतंत्र प्रकरण त्या शतसांवत्सरिक श्राद्धाच्या पुस्तकांत घालून आपली विवेचक व संग्राहक बुद्धि उत्तम दाखविली आहे. इतकें सगळें विवरण वाचूनही माझें मन अशी ग्वाही देत नाहीं कीं सर्व उपलब्ध साहित्य नजरेपुढें ठेवून मगच या थोर विद्वानांनीं आपली लेखणी चालविली. तथापि त्यांच्या लेखांनीं माझें कामही पुष्कळसें हलकें झालें आहे. बऱ्याचशा बाबतींचा पूर्वीं खल होऊन गेला असल्यामुळें पुनः त्या सर्व विवेचनाचे भरीस न पडतां, त्यांत अधिक उणें मला काय वाटतें तेवढेंच सारांशानें येथें सांगितल्यानें काम भागणार आहे.

राज्यनाशाच्या कारणांची नामावळी व त्यांचें भरपूर विवेचन मराठे व इंग्रज या पुस्तकांतच पाहवें. सवत्या सुभ्याची आवड, राष्ट्राभिमानाचा अभाव, आपसांतील फूट, मध्यवर्ती सत्तेचा कमकुवतपणा, सरंजामी पद्धत, जातिभेद, इत्यादि लहान मोठ्या सामान्य कारणांचा विचार व त्यांचें खंडन मंडन त्या पुस्तकांत विशेष मार्मिकतेनें केलेलें कोणासही पटण्या जोगेंच आहे. जातिभेदामुळें मराठ्यांचें राज्य बुडालें ही सर जदुनाथांची विचारसरणी श्री. केळकरांनीं सप्रमाण खोडून काढिली आहे. बाकीचीं वर निर्दिष्ट केलेलीं कारणें भिन्न नसून मराठ्यांचा अंगस्वभावच भांडखोर, अव्यवस्थित व फाटाफुटीचा आहे, एवढ्या एकांत त्या सर्वांचा समावेश होण्याजोगा आहे. मराठ्यांचें राज्य संस्थाप्रधान असें कधीं बनलें नाहीं. तें अखेर पर्यंत व्यक्तिप्रधान राहिलें. याचा अर्थ मराठी राज्याची घटना निश्चित व टिकाऊ झाली नाहीं हा होय ज्या वेळीं जी प्रबल व्यक्ति पुढें आली तिनें आपल्या मगदुराप्रमाणें मागचें राजकारण पुढें रेटीत नेलें. बाळाजी विश्वनाथापासून माधवरावापर्यंत प्रत्येक पेशव्यानें आपली विशिष्ट छाप कारभारावर बसविली. तदुत्तर नारायणरावाचे वधापासून नानाफडणिसानें राज्य चालकाचें काम परिस्थितीनें जितकें साधलें तितकें सिद्धीस नेलें. राज्यघटनेचें माहात्म्य सांगणारे लोक बहुधा पाश्चात्य इतिहास लक्षांत घेऊन बोलतात

असें वाटतें. इंग्लंड, फ्रान्स इत्यादि देशांतील राज्यघटना राज्योत्कर्षास पोषक झाली, तशी घटना मराठ्यांनीं बनविली नाहीं म्हणून त्यांचा नाश झाला असा यांचा अभिप्राय आहे. परंतु युरोपांत सुद्धां कोणी तरी जबरदस्त व्यक्तिच अडीअडचणींत प्रसंग निभावून नेते असें पाश्चात्य इतिहास सांगतो. जर्मनीचीं राज्यसूत्रें एकट्या कैसरनें हालविलीं महायुद्धाचे प्रसंगीं इंग्लंडचा लॉइड जार्ज व फान्सचा क्लमांसो यांनीं घटना बाजूस ठेवून एक हातीं सर्व सत्ता घेतली तेव्हांच त्यांस युद्धांत जय मिळाला. सारांश व्यक्तीचें माहात्म्य अद्यापि संपलेले नाहीं. परवांच इंग्लडांत पौंडाची पत बुडाली तेव्हां प्रधान मॅक्डोनल्ड यानें नवीनच डाव कसा सुरू केला हेंही आपण पाहतों. व्यवस्थित घटनेचा थोडा बहुत परिणाम चालू राजकारणांत होतो, परंतु संकटकाळीं कोणतीही घटना पुरी पडत नाहीं असा अद्यापपर्यंतचा तरी अनुभव आहे. मात्र योग्य व्यक्ति पुढें येण्यास घटनेचा उपयोग कांहीं अंशीं होतो. या दृष्टीनें जिज्ञासूंनीं मराठी राज्याचें अवलोकन करावें.

सवाई माधवरावाचे अखेरी पर्यंत मराठी राज्याची इभ्रत व चलती कायम होती असें धरून मी चालतों. तदुत्तर राज्यसत्ता व लष्करी सामर्थ्य बाजीराव व दौलतराव या दोघां तरुणांचें हातीं आलें. दोघेही अननुभवी, स्वार्थी व अत्यंत नालायक होते. प्रथम त्यांचे हातीं कारभार आला तो केवळ यदृच्छेनें आला. बाजीरावास पेशवाई पद मिळण्यांत किती घोळ पडला तें आपणास ठाऊकच आहे. महादजीनें दौलतरावास दत्तक घेतलें त्यापूर्वी त्याची लायकी त्यानें कांहीं सुद्धां पाहिली नव्हती. चार दोन वर्षांतच हे दोघे उल्लू व चैनी गडी राज्य घालविणार असा अंदाज लोकांस स्पष्ट दिसूं लागला. तेव्हां पासून त्यांस अधिकारावरून काढून नवीन व्यवस्था करण्याचे प्रयत्न कांहीं थोडेथोडके झाले नाहींत. इंग्रजांविरुद्ध सर्व मराठे सरदारांची व इतर हिंदी सत्ताधीशांची जूट बनविण्याचे प्रयत्न सारखे चालू होते. घरभेदेपणाचा फायदा घेऊन व सदैव जागृत राहून इंग्रजांनीं हे प्रयत्न निष्फल केले. बाजीराव व दौलतराव केवळ जन्माच्या हक्कानें गादीवर आले, परंतु त्यांचे उलट बाजूस जे इंग्रज सामना करण्यास आले, ते त्यांच्या सिद्ध झालेल्या कर्तबगारीवरून नेमलेले होते. हे दोघे कितीही नालायक असले तरी निजाम, अयोध्येचे वजीर, अर्काटचे नबाब किंवा म्हैसूरचा राजा कृष्णराज वोडियार या हिंदी सत्ताधीशांचे मानानें बाजीराव व दौलतराव भिन्न नव्हते. सारांश, सर्वांस धाकांत ठेवून सर्वांकडून योग्य कामगिरी घेणारा चालक राष्ट्रास मिळाला नाहीं, हें राज्यनाशाचें आद्य कारण आहे. पेगॅन

किंवा फोर्ड अशा पाश्चात्य सेनानींस बाजीराव दौलतरावानें जवळ बाळगिलें, त्यांनीं तर धन्यांचा गळाच कापिला !

याच्याच जोडीला दुसरें महत्त्वाचें कारण म्हणजे इंग्रजांचें जबरदस्त राजकारण होय. वेल्स्ली बंधु, पुण्याचे, सिंद्याकडचे किंवा नागपुरचे इंग्रज रेसिडेंट हे सर्व एकापेक्षां एक इंग्रज अंमलदार मराठ्यांचा पाडाव करण्यास चंग बांधून उभे राहिले. त्यांनीं राजकारणानें व अर्थदानानें आमच्यांत फूट पाडिली, गुप्त बातम्या मिळविल्या, फितूर केले, जाहीरनामे काढून व नानाप्रकारची लालूच दाखवून लोकमत आपल्या बाजूस वळविलें; सरदारांत व सावकारांत आपल्या सत्यवचनाची व व्यापारी देवघेवीची पत हलके हलके वाढविली, आणि तितक्या अंशानें मराठ्यांची पत कमी केली तसेंच सूक्तासूक्त मार्गांनीं संधि साधून त्यांनीं एक एक मराठे सरदारांस हलकें केलें त्यांची जूट होऊं दिली नाहीं. युक्तीच्या करारांनीं त्यांस आंखडीत नेलें. इंग्रजांच्या कारभारांत एक हातीं हुकमत व संपूर्ण एकसूत्रीपणा होता. मुख्य धोरण ग० ज० ठरवून देई. प्रत्येक ठिकाणचा रेसिडेंट आपणास मिळालेली बातमी लागोलाग सर्व ठिकाणीं कळवी. परिस्थितीप्रमाणें स्वतःचे जबाबदारीवर पाहिजे तें कृत्य सिद्धीस नेण्याचे संपूर्ण अधिकार प्रत्येकास दिलेले होते. सर्व देशांतील नाक्यांच्या ठिकाणीं कोणत्या ना कोणत्या सबबीवर त्यांनीं आपल्या फौजा विभागून दिल्या होत्या. मराठ्यांशीं लढण्यासाठीं म्हणून मुद्दाम आपली टपालाची व्यवस्था प्रथम इंग्रजांनीं ठराविली, तीच पुढील टपालखात्याचा पहिला पाया होय. मुख्य उद्योगाची रूपरेषा ठरवून दिल्यावर त्यास पोषक असें धोरण प्रत्येक ठिकाणच्या रेसिडेंटास आपापल्या अकले-प्रमाणें व सोयीप्रमाणें ठरवितां आलें; आणि बाजू अगदीं अंगावर आली असतां चढाऊ धोरण सोडून स्वस्थ बसणें त्यांस शक्य झालें. पैशाचा पुरवठाही वरिष्ठांकडून भरपूर होत होता. म्हैसूर, मद्रास, बंगाल इत्यादि प्रदेशांतील उत्पन्न अविच्छिन्नपणें मराठ्यांस जिंकण्याचे कामीं इंग्रजांस वापरतां आलें. या प्रत्येक बाबतींत मराठ्यांचा प्रकार इंग्रजांचे मानानें हीनबल होता ही गोष्ट सहज लक्षांत येईल. पैशाचा मुबलक पुरवठा, दक्षतेचें जागरूक धोरण, एकतंत्री कारभार, न्यायान्याय सर्व बाजूस ठेवून प्रसंगीं वाटेल तसें वर्तन करण्याची तयारी, आणि पराभव झाला तरी ठासून पुनः प्रयत्न करण्याची चिकाटी, इत्यादि इंग्रजांच्या गुणांनीं मराठ्यांचा पाडाव होत गेला. मोठमोठे भरभक्कम खडक बारीक भेगांतून पाणी झिरपून अंतीं खिळखिळे होतात, तशी स्थिति इंग्रजांनीं मराठमंडळाची म्हणजे मुख्यतः पुण्यांतील पेशवे दरबाराची व

बाहेर सिंदे, होळकर, भोसले, गायकवाड या चार प्रमुख सरदारांची केली, हें मागील हकीकतींवरून केव्हांही स्पष्ट आहे. मिळून दोन नालायक तरुणांचे हातीं सत्ता जाणें आणि त्याबरोबरच इंग्रजांचें जबरदस्त राजकारण हीं दोन राज्यनाशाचीं मुख्य कारणें बिनधोक दाखवितां येतात.

पाश्चात्य युद्धपद्धति व पाश्चात्यांचें शास्त्रीय ज्ञान यांच्या अभावामुळें मराठ्यांचा पाडाव झाला, असें जें राजवाडे प्रभृति अनेक तज्ज्ञांचें ठाम मत एके काळीं जाहीर होतें, तेंही मला मान्य नाहीं. उलट एकंदर कागदपत्र वाचून माझें मत असें बनलें आहे कीं महादजी सिंद्याच्या वेळेपासून प्राच्य व पाश्चात्य युद्धपद्धति व शस्त्रास्त्रें यांची अनेक प्रसंगांत भरपूर परीक्षा होऊन मराठ्यांनीं पाश्चात्यांचें ज्ञान हस्तगत केलें आणि इंग्रजांनींही मराठ्यांचा गनिमी कावा थोडाबहुत स्वीकारला, तेव्हांच पेंढारी व बाजीराव यांचा पाठलाग त्यांस करितां आला. म्हणजे मराठ्यांनीं आपला मूळचा गनिमी कावा न सोडतां त्यास पाश्चात्य पद्धतीची जोड स्वीकारिली, हें बाजीरावाच्या वेळच्या संग्रामांचें सूक्ष्म निरीक्षण केलें असतां स्पष्ट कळून येतें. यशवंतराव होळकर, सिंदे, अमीरखान इत्यादींची तयारी लक्षांत घेतली तर देशी फौजा इंग्रजी फौजांपेक्षां कोणत्याही बाबतींत कमी नव्हत्या, असें खुद्द इंग्रज लेखकांनींच नमूद केलें आहे. तोफांचे बाबतींतही हीच गोष्ट होय. यशवंतराव होळकराचे तोफांचे कारखाने, महादजीचे आग्रा-अलीगडचे कारखाने किंवा बाजीरावाचे कारकीर्दींतील पुण्याचे व अन्य ठिकाणचे कारखाने परिपूर्ण स्थितींत होते, क्वचित् इंग्रजांपेक्षाही वरचढ होते. यावरून एतद्देशीयांनीं पाश्चात्य युद्ध-पद्धती आत्मसात करून घेतल्या होत्या असें स्पष्ट दिसतें. इंग्रजांना मराठ्यांशीं लढतांना तोफा वगैरे जड सामानाची अडचण भासूं लागली तेव्हां त्यांनीं मराठ्यांशीं टक्कर देण्यासाठीं घोडदळाच्या चपळ फौजा तयार केल्या होत्या. तरीही बाजीराव, यशवंतराव, नागपुरकर आप्पासाहेब, पेंढारी सरदार वगैरेंच्या दौडीशीं इंग्रजांना टिकाव धरितां आला नाहीं, ही गोष्ट सिद्ध आहे. अर्थात् शस्त्रास्त्रांचें किंवा कवाइती युद्धकलेचें अज्ञान मराठ्यांत होतें, व त्यांनीं या कलेचें शास्त्रीय ज्ञान मिळविलें नव्हतें, म्हणून त्यांचा पाडाव झाला, हें प्रतिपादन वस्तुस्थितीस सोडून आहे. सुऱ्या घड्याळांवरून बंदुका तोफांची वासलात लावूं नये.

'लायक माणसांची कमतरता पडली, म्हणून मराठ्यांचा पाडाव झाला' हें म्हणणेंही टिकत नाहीं. मराठ्यांच्या घसरत्या काळांत देखील इतके पराक्रमी स्त्रीपुरुष

व सेनानायक उदय पावलेले दिसतात कीं, मराठशाहींतील दुसऱ्या कोणत्याही कालखंडापेक्षां बाजीरावाची अमदानी हीन तर नव्हतीच, कदाचित् थोडीबहुत वरचढच ठरेल ! यशवंतराव होळकर अमीरखान, सिंद्याचे शेणवी सरदार, बापू गोखले, रामचंद्र आपा पटवर्धन, भोसल्यांचा आप्पा साहेब व त्याचा एकनिष्ठ सेवक गणपतराव सुभेदार ( परांजपे ), सातारचा चतुरसिंग भोसले, वगैरे किती तरी सैनानायक चांगल्यापैकीं होते, आणि राजकारण ओळखणारे मुत्सद्दी सुद्धां कमी होते असें नाहीं. ही सर्व मंडळी मराठी राज्य जिवंत ठेवण्याकरितां पराकाष्ठेची धडपड करीत होती. ही गोष्ट ठळकपणें लक्षांत यावी म्हणूनच ऐतिहासिक व्यक्तींचे पुष्कळसे तपशील या पुस्तकांत दिले आहेत. हे सर्व तपशील एकत्र वाचले म्हणजे कर्तबगार माणसें नसल्यामुळें राज्य बुडालें असें म्हणतां येत नाहीं. माणसें थोड्या बहुत फरकानें कोठेंही सदैव हाताशीं असतात. त्यांस वागवून उपयोगांत घेणारा योजक मात्र पाहिजे असतो.

आर्थिक बाबतींत मराठे इंग्रजांपुढें कमकुवत ठरले असें कित्येकांचें प्रतिपादन असून तें एक राज्यनाशाचें कारण म्हणून दाखविण्यांत येतें. राष्ट्रीय कर्जाची कल्पना इंग्रजांनीं काढिली ती मराठ्यांनीं कां काढिली नाहीं आणि पुण्याचे सावकार मुंबईस जाऊन व्यापार कां करूं लागले असे प्रश्न विचारण्यांत येतात. परंतु या मुद्याचा समावेश पहिल्या दोन मुख्य कारणांतच करितां येतो. नानाफडणिसाचा कारभार आर्थिक स्थितीचा आदर्श असा गणला जातो. त्याचे पश्चात् बाजीरावानें आपण होऊन आपली पत घालविली. वसईच्या तहानें मराठमंडळाची जूट फुटली. ही जूट म्हणजेच पत. हिंदुस्थानांतील इंग्रजांना समस्त इंग्रज राष्ट्राचा सांपत्तिक व नैतिक पाठिंबा सदैव भरपूर होता. इंग्रज लोक व्यापारी असल्यामुळें प्रत्येक व्यवहार ते आर्थिक दृष्टीनें पाहत. तैनाती फौजांसाठीं तोडून घेतलेल्या व जिंकलेल्या प्रदेशांत सुव्यवस्था उत्पन्न करून त्यांनीं पैशाची पैदास अविच्छिन्न चालू केली. उलट पक्षीं खुद्द बाजीरावानें व सिंद्यानें इतरांचे प्रदेश उद्ध्वस्त करावे, आपल्याच रयतेस व सावकारांस लुटावें, अशा प्रकारांनीं होती नव्हती ती सर्व ऐपत वेचून टाकिली. विस्कळित झालेलें मराठमंडळ पुनः एकत्र जोडण्याचा योग स. १८०५ च्या उन्हाळ्यांत यशवंतराव होळकरानें जुळवून आणिलेला पाहतांच कॉनवालिसनें येऊन वेल्स्लीचें चढाऊ धोरण साफ फिरविलें आणि राजकारण पूर्व

स्थितीवर आणून मराठमंडळाचीं दुखवलेलीं मनें तितक्या पुरतीं निर्धास्त केलीं. तद्नंतरच्या दहा वर्षांत मराठमंडळ आणखी खिळखिळें झाल्याचें दिसून येतांच मराठ्यांस जिंकण्याचा पूर्वीचा अपुरा प्रयोग लॉर्ड हेस्टिंग्सनें सिद्धीस नेला. मिळून हें तरी एक इंग्रजांचें श्रेष्ठतर राजकारणच म्हणावें लागतें.

अगदीं ओंठाशीं आलेला पेला सांडून जावा, तशी गत मराठी राज्याची झाल्यामुळें राज्यनाशाचा हा प्रश्न महाराष्ट्रास अत्यंत जिव्हाळ्याचा वाटतो, आणि म्हणूनच त्याची चर्चा आज पावेतों पुष्कळ झाली आहे व पुढेंही होईल. शिवाय जो तो आपापल्या भावनेनुसार त्याचें निदान ठरविणार, हेंही योग्यच आहे. तसें निदान ठरविण्यास लागणारे भरपूर तपशील या पुस्तकाचे द्वारें वाचकांस मिळण्याची सोय मीं केली असून, त्यावरूनच माझे उद्योगाचें सार्थक झालें असें मला वाटल.

**७ मन्रोनें केलेली मीमांसा.**—मराठ्यांचा पाडाव करून इंग्रजी राज्याची घडी या देशांत आरंभीं यथायोग्य बसवून देणारे जे कित्येक उदार इंग्रज अधिकारी हिंदुस्थानांत प्रसिद्धि पावले, त्यांत सर टॉमस मन्रो याचें नांव प्रमुख गणलें जातें. या गृहस्थाचा बहुतेक कारभार मद्रास इलाख्यांत झाला. एकदांच बाजीरावावर मोहीम चालू असतां कृष्णेच्या दक्षिणेकडील प्रांतांत ठेवलेल्या इंग्रज फौजेचें पुढारपण मन्रोकडे असल्यामुळें, धारवाड, सोंडूर, सोलापुर, इत्यादि ठिकाणच्या संग्रामांत तो हजर असून, स. १८१८ च्या मे महिन्यांत तो प्रतापसिंहाचे भेटीस साताऱ्यास आला होता. मन्रोच्या हुशारीबद्दल एल्फिन्स्टन यास मोठा आदर वाटत असून अनेक बिकट प्रसंगांत तो त्याचा सल्ला घेई. मन्रोचा जन्म ता. २७.५.१७६१ चा असून ता. १५.१.१७८० रोजीं तो मद्रासच्या लष्करांत दाखल झाला. तेव्हां पासून टिपूवरील मोहिमांत व इतरत्र त्यानें कामें केलीं. जिंकलेल्या प्रदेशाची व्यवस्था बांधून देण्यांत त्याचें चातुर्य विशेष प्रकट झालें. अखेरीस त्यास मद्रासची गव्हर्नरी मिळाली आणि त्या कामांतून निवृत्त होण्याचे बेतांत असता तो ता. ६.७.१८२७ रोजीं गुत्तीजवळ महामारीच्या उपद्रवानें मरण पावला. लेखनांतही तो विशेष कुशल असून हिंदुस्थानांतील व इंग्लंडांतील अधिकाऱ्यांस, आप्तांस व स्नेह्यांस त्यानें लिहलेलीं मुबलक पत्रें छापलीं आहेत त्यांवरून त्याचें स्वतःचें उदार धोरण, जिंकलेल्या लोकांबद्दल सहानुभूति व तत्कालीन देशस्थिति यांचें उत्कृष्ट विवेचन उपलब्ध होतें. वेल्स्ली, हेस्टिंग्स इत्यादिकांच्या जयिष्णु कारभाराचा त्यानें झणझणीत निषेध

केलेला आढळतो. सन १८१७ च्या अखेरीस जें युद्ध झालें त्या संबंधानें त्यानें आपले विचार ग० ज० स कळविले त्यांचा गोषवारा असा. 'हिंदी सेनानायकांचा आमच्या पुढें फार दिवस निभाव लागणें शक्य नाहीं. थोडे दिवस ते इकडे तिकडे धामधूम करतील, परंतु आम्हीं निकडीनें पाठलाग सुरू ठेवला तर त्यांस लूट करण्यास अगर विश्रांति घेण्यास अवकाशच मिळणार नाहीं. युद्धसामुग्रीची त्यांना कमतरता आहे असें बिलकूल नाहीं. परंतु त्या सर्वांना एकसूत्रांत वागवून त्यांजकडून राष्ट्रकार्य करून घेणारा एकही लायक पुढारी त्यांजकडे नाहीं हेंच त्यांचें मोठें वैगुण्य आहे. शिस्त म्हणून काय चीज आहे ही त्यांना बिलकूल माहीत नाहीं. सिंद्याची सत्ता काय लहान होती? पण केवळ नेभळटपणानें त्यानें सर्वस्व गमावलें. होळकर तर सिंद्याहून कमी प्रतीचा, पण लेक पुढें कोणाचाच निभाव लागला नाहीं. शिवाय अलीकडील दहा वीस वर्षांत आपल्या फौजा पुष्कळच सुधारल्या आहेत. पूर्वी आपल्याकडे घोडदळ बिलकूल नव्हतें. त्यामुळें मराठ्यांसारख्या गनिमी काव्यानें लढणाऱ्या शत्रूपुढें आपला निभाव लागत नसे. ही उणीव अलीकडे आपण घोडेस्वारांचीं पुष्कळ पलटणें तयार करून चांगलीच भरून काढली आहे. मराठ्यांच्या घोडदळापेक्षां हल्लीं आमचें घोडदळ संख्येनें व तयारीनें पुष्कळच वरचढ आहे; म्हणून आतां आपणांस त्या संबंधांत बिलकूल भय वाळगण्याचें कारण नाहीं. अशा स्थितींत मला आतां असें वाटतें, कीं देशी सत्ताधीशांचे दरबारीं आपल्या तैनाती फौजा ठेवून देण्याचा जो आपण उपक्रम केलेला आहे तो इतःपर साफ सोडून द्यावा भोपाळसारखें संस्थान हाताखालीं घालून तेथें आपल्या फौजा कायम ठेवण्याचें बिलकूल प्रयोजन उरलें नाहीं. उलट येथील दौलतदारांच्या छातीवर आम्हीं आपल्या फौजांचें दडपण ठेवल्यानें त्यांची अगदीं दुर्दशा उडून गेली आहे. क्षात्रतेज किंवा राष्ट्रीय बाणा ज्यास म्हणतां येईल तो त्यांचा साफ नाहींसा होऊन प्रजा निःसत्त्व व दरिद्री बनत आहे. राजा लोकांस छळूं लागला तर पूर्वी लोक बंडें उभारून त्याला काढून टाकीत आणि आपल्या सोईची राज्यघटना निर्माण करीत. तें साधन आतां आमच्या फौजा सान्निध असल्यामुळें लोकांचे हातीं राहिलें नाहीं. राजा कितीही दुर्वृत्त किंवा नालायक निघाला तरी आमचा पाठिंबा त्यास निर्धास्त मिळत असल्यानें तो आपली सुधारणा तर करीत नाहींच, परंतु परभारें इंग्रजांकडून संरक्षण होत असल्यामुळें तो जास्तच ऐदी, लोभी व क्रूर बनतो, त्यामुळें त्याचें व प्रजेचें प्रेम राहत नाहीं. अशा रीतीनें आमची ही तैनाती फौजांची पद्धत

देशाची धूळदाण उडवीत आहे. निजाम, पेशवा, म्हैसूर वगैरेंचीं उदाहरणें आपल्यापुढें ठळक दिसत आहेत. आमचें सार्वभौमत्व टिकविण्यापुरताच जर तैनाती फौजांचा उपयोग घडला असता तर गोष्ट वेगळी. परंतु त्यामुळें राजे स्वच्छंदी व दुर्वृत्त होतात हा देशास केवढा अपाय आहे ! जेथें जेथें इंग्रज फौजांचें दडपण संस्थानांवर बसलें तेथें त्यांस पुनः डोकें वर काढण्याची संधिच राहिली नाहीं. पुण्याचा मोरेदीक्षित एकदां एल्फिन्स्टनला म्हणाला, 'तुम्ही आमच्याकडून अपेक्षा ठेवतां, इतका निष्कपटपणा कोणाही सत्ताधीशास इंग्रजांशीं वागतांना धारण करणें शक्यच नाहीं.' हे मोरदीक्षिताचे शब्द अगदीं खरे आहेत. आमचा रेसिडेंट संस्थानांत सर्वाधिकारी होऊन बसतो आणि राजा कसाही वागला तरी त्याचा संतोष होत नाहीं. त्यामुळें या पेंचांतून सुटण्याची राजा सारखी धडपड करीत असतो. आपण म्हणाल, असें आहे तर सर्वच देश एकदम जिंकून एकदम आपले खास कबजांत आणावा. पण असें केल्यानें लोक निर्वीर्य बनतील त्याची वाट काय? संस्थानी प्रजांना जीं सुखें व फायदे मिळूं शकतात ते आमच्या परकीय अंमलाखालीं त्यांस कसे मिळूं शकतील ! राष्ट्राचें स्वातंत्र्य गेलें कीं त्याची दानत जाते आणि दानत गमावून राहिलेलें जिणें काय कामाचें ! लष्करी सामर्थ्यानें आपण हिंदुस्थान जिंकलें तरी त्यांत एकंदर राष्ट्राचा अधःपात होतो तो आपण कसा बंद करणार ! राज्यसूत्रें आमच्या हातांत आल्यापासून लोक आपले व्यवहार आपण उलगडण्यास असमर्थ झाले याचें उदाहरण हिंदुस्थानाबाहेर कोठेंही सांपडणार नाहीं. युद्धें थांबविण्याकरतां आम्हीं तैनाती फौजा निर्माण केल्या. परंतु त्यांपासून युद्धें वाढलीं कीं बंद झालीं याचा विचार करावयास नको काय ! ज्या राजाच्या संरक्षणासाठीं आम्ही आपल्या फौजा खुद्द त्याच्या राजधानींत ठेवून दिल्या, त्याजपासून आम्ही त्या फौजांच्या धाकानें पाहिजे ते करार कबूल करून घेतले, यास शहाणपण म्हणावयाचें कीं काय !' हे विचार बाजीरावाचे स्थितीस किती तंतोतंत लागू होते हें वाचकांच्या लक्षांत येईल. तसेंच आजच्या स्थितीस सुद्धां मन्रोचें हें विवेचन किती लागू आहे हेंही स्पष्ट दिसून येईल.*

वास्तविक मराठी राज्याचा प्रपंच येथेंच संपला. पण मूळवृक्ष सातारची गादी तिची अखेर पोंचवून मगच वाचकांची रजा घेणें योग्य होईल.

---

* Gleig's Life of Munro—Vol I.

# प्रकरण विसावें

## सातारचें राज्य व त्याची परिसमाप्ति

### १८१८-१८४८

"I have lost my throne, my name, my property, all but the inward consciousness of my innocence and my rectitute, because I would not, at the sacrifice of my conscience, declare myself to be what my enemies had represented me, because instead of accepting mercy, I demanded justice."

—Pratapsinh's Letter to Lord Hardinge.

१ प्रतापसिंहाचा स्वभाव व परिस्थिति. २ इंग्रज अधिकाऱ्यांचा रोष.
३ पदच्युति व काशीस रवानगी. ४ प्रतापसिंहाचें आत्मनिवेदन.
५ सातारा राज्याचा शेवट. ६ रंगो बापूजीचा प्रवास व शेवट.

७ कांहीं ऐतिहासिक वंशावळी.

१ अंतिम छत्रपती. २ राजे महाडिक. ३ नागपुरकर चिटणीस.
४ ग्वालेरचे गाढवे. ५ ग्वालेरचे बक्षी. ६ मोरशेट करंजे.
७ गोपाळ नाईक तांबवेकर. ८ गुप्ते बाबूराव हरि, बडोदें.

**१ प्रतापसिंहाचा स्वभाव व परिस्थिति.***—प्रतापसिंहास सातारचें राज्य कोणत्या परिस्थितींत मिळालें हें मागें सांगितलेंच आहे. त्याचा जन्म

* **प्रकरणास मुख्य आधार**—म. सा. छो. ब; त्रै. ४ पृ. ९५; सगुणाबाईचें अपील; अ. प्र. इ; पारसनीसकृत महाबळेश्वर; पार्लमेंटाचे सातारा पेपर्स; ऐ स्फु. ले. ४०३; रु. १ शेडगांवकर बखर; रु. २ ले. २; इ. वृ. १८३८; केळकरकृत ऐ० पोवाडे; राणेकृत प्रतापसिंहचरित्र; Satara Gazetteer; Story of Satara; Cal. Univ. Magazine, Nov. 1895. सातारा गॅझेटियरमध्यें दाखल असलेल्या हकीकती उघड उघड एकतर्फी व विकृत आहेत. संशोधनानें तपासून घेतल्याशिवाय त्या इतिहास म्हणून स्वीकारितां येण्याजोग्या नाहींत.

१८·१·१७९३ रोजीं होऊन ता. १६·५·१८०८ रोजीं बापाचे पश्चात् त्यास छत्रपतिपद मिळालें. बाजीरावानें इंग्रजांशीं युद्ध सुरू केल्यावर त्यानें प्रतापसिंहास कुटुंबसह आपल्या बरोबर ठेविलें. ता. २०·२·१८१८ रोजीं आष्टीच्या लढाईनंतर प्रतापसिंह इंग्रजांचे स्वाधीन झाला. त्या उपरान्त ता. ११·४·१८१८ रोजीं त्यांनीं त्यास साताऱ्यास आणून स्थानापन्न केलें आणि आपल्या तर्फेनें कप्टिन ग्रॅन्ट यास त्याच्या व्यवस्थेस नेमिलें. ग्रॅन्ट प्रतापसिंहाहून फक्त चार वर्षांनीं मोठा होता. पुढें सातारच्या राज्याची व्यवस्था ठरण्यांत आणखी दीड वर्ष गेलें. ता. २५·९·१८१९ रोजीं रीतसर तह ठरून नीरेपासून वारणेपर्यंतच्या प्रदेशाची मालकी प्रतापसिंहाकडे आली; आणि या प्रदेशांतील जहागीरदार प्रतिनिधि, सचिव, फलटणचे निंबाळकर, अक्कलकोटचे भोसले राजे, जतचे डफळे व वाईचे शेखमिरे असे सहा असामी सातारचे मांडलिक समजून छत्रपतींचे ताब्यांत देण्यांत आले. परंतु मुलकाची व्यवस्था लागली नव्हती व प्रतापसिंहाची लायकीही कळली नव्हती, म्हणून प्रथम कारभार ग्रॅन्टनें करून पुढें हळू हळू तो प्रतापसिंहाचे हवालीं करावा असें तहांत ठरलें होतें. त्याप्रमाणें स. १८२२ च्या एप्रिलांत संपूर्ण कारभार प्रतापसिंहाचे हवालीं झाला.

ग्रॅन्ट डफनें तहाच्या अटींच्या मर्यादेंत प्रतापसिंहाची व्यवस्था शक्य तितक्या उदार व ममत्वाच्या दृष्टीनें ठरवून दिली. प्रथमच त्यानें आपली दररोजची रोजनिशी लिहून ठेवण्याचा नियम प्रतापसिंहास लावून दिला. सकाळपासून रात्रीं निजेपर्यंत एकंदर वेळ कसा कोणत्या कामांत गेला, कोणाच्या भेटी घेतल्या, काय कामें केलीं, देवदर्शन, प्रवास, सणवार, वादविवाद इत्यादि विशिष्ट प्रसंग कोणते कसे घडले ते रोजच्या रोज मोडी लिपींत तपशीलवार लिहून ठेवण्याची शिस्त प्रतापसिंहास लागल्यामुळें, अव्वल इंग्रजींतील सामाजिक व राजकीय घडामोडींचा संपूर्ण तपशील प्रतापसिंहाच्या या रोजनिशींत पाहवयास मिळतो. ता. ४·९·१८३९ रोजीं प्रतापसिंहास इंग्रजांनीं पदच्युत करून काशीस नेऊन ठेविलें आणि तेथेंच तो पुढें ता. १४-१०-१८४७ रोजीं पंचावन वर्षांचे वयांत मरण पावला. या घडामोडी लक्षांत घेऊन पुढील विवेचन करावयाचें आहे.

‘ आपण मराठ्यांचें राज्य बुडविलें नाहीं, उलट छत्रपतींचा छळवाद पेशव्यांनीं चालविला, तो दूर करून आपण त्यांचें राज्य राखलें, अशा देखाव्यानें इंग्रजांनीं

केलेला प्रयोग अयशस्वी कां झाला, उपकारकर्त्या इंग्रजांबद्दल प्रतापसिंहाचे मनांत वैषम्य कां आलें आणि एवढ्या हुशार राजपुरुषाचा शेवट असा शोचनीय कां झाला, इत्यादि प्रश्न ऐतिहासिक दृष्ट्या विवेचनार्ह असूनही त्या संबंधानें आपल्याकडे साधार माहिती फार थोडी प्रसिद्ध आहे. प्रतापसिंहाच्या पदच्युतीबद्दल इंग्रजींतील ग्रंथसंभार प्रचंड आहे. पार्लमेंटापुढें सादर झालेले छापील कागदांचे विस्तृत भाग, बसूक्रत सातारा, राणी सगुणाबाईचें अपील इत्यादिकांत प्रतापसिंहाच्या राजद्रोह प्रकरणाची माहिती भरपूर मिळते, तथापि त्याच्या इतर कारभाराचें विवेचन त्यांत फारसें आढळत नाहीं. किंबहुना त्याचा स्वभाव व योग्यता यांची निर्विकार चर्चा फारसी कोठें केलेली दिसत नाहीं. शेडगांवकर बखरींत प्रतापसिंहाबद्दल अभिप्राय आहे तो समकालीन व ग्राह्य समजला पाहिजे ' त्यांची बुद्धि फार विशाल असोन ते बोलके उत्तम प्रकारचे होते. धूर्तता चांगली होती. घोड्यावर बसणें व शिपाइगिरींत शूर व सर्व गुण जाणते व सर्व विद्याप्रवीण होते. अंतःकरण निर्मळ असोन पदरचे लोकांचा अभिमान फार होता. इन्साफाचें काम वक्तशीर करोन जातीचे अकलेनें राज्यकारभार सुव्यवस्थित चालविला. अपराधी शरण आल्यावर क्षमेविशीं औदार्य फार होतें. त्यानें स्वारसिबंदी व कामगार वगैरेंचा पगार वेळेवर देऊन व रयत सुखी राखोन लोक हुशार ठेविले. स्नान संध्या पूजादि नित्य नेम व सुकर्में करण्याची आवड व कुळस्वामीवर भक्ति होती. पुरातन नोकर लोक गरीबींत आले होते त्यांचें ऊर्जित केलें.' वीस वर्षांच्या कारभारांत चाळीस लाख रुपये लोकोपयोगी कार्यांत प्रतापसिंहानें खर्चिले असा हिशेब बखरींत दिला आहे, तो चौदा लाखांचे उत्पन्नाचे मानानें सढळच होय.

प्रतापसिंहाचा स्वभाव समजल्याशिवाय त्याचें इंग्रजांशीं वैषम्य कां उपस्थित झालें हें कळणार नाहीं. लहानपणीं बाजीरावानें त्यास अडकवून ठेवून विद्येची किंवा जगाची ओळख त्यास होऊं दिली नाहीं. तो निर्व्यसनी, शुचिर्भूत, मानी, उदार, स्पष्टवक्ता व कनवाळू होता. म्हणजे शूर शिपायास शोभेसें त्याचें आचरण होतें. जातीचा व धर्माचा अभिमान जरा फाजील होता म्हटला तरी चालेल. राजनीतींत आंत एक बाहेर एक असा प्रकार चालवून पुष्कळदां मतलब साधावा लागतो, तशी हातोटी प्रतापसिंहास नसून ताडफाडीच्या उघड्या स्वभावामुळें तो गोत्यांत आला. अंग बचावून व प्रतिपक्षाचें छिद्र ओळखून त्याजवर संधि येतांच आघात करण्याचें कसब त्यास नव्हतें. राजनीति बहुरूपी आहे, त्यांत खऱ्याखोट्याचा विधिनिषेध सदैव बाळगणें शक्य नसतें, ही गोष्ट प्रतापसिंहास पटली नाहीं. त्याचा

गांठ पडली मतलबी व वेळ पडेल तसें वागणाऱ्या इंग्रजांशीं, म्हणून त्याचा शेवट विपरीत झाला. मान व मतलब यांपैकीं मानास जपेल तो मतलबास मुकतो, व मतलबाचे पाठीस लागला, त्यास मानापमान गुंडाळून ठेवावा लागतो, तसा प्रकार या दुर्दैवी राजाचा झाला. त्याच्या या स्वभावाचें प्रत्यंतर वर सांगितलेल्या रोजनिशींत भरपूर पाहवयास मिळतें. या रोजनिशा सालोसालच्या स. १८३७ पावेतों वेळच्या वेळीं लिहिलेल्या असून त्यांत अव्वल इंग्रजींतील समाजाचें, विचारभावनांचें व लोकप्रघातांचें अल्प चित्र पाहवयास मिळतें. रेसिडेंटाच्या, गव्हर्नरांच्या, जहागीरदारांच्या भेटी, संभाषणें व वादविवाद झाले त्यांची माहिती पुष्कळदां राजा प्रतापसिंहानें स्वहस्तानें लिहिलेली आहे. रोजनिशीचा बराच भाग व ठराविक प्रकरणें कारकुनानें लिहिलीं असून दिवस पुरा करण्यापूर्वी विशिष्ट कारभार किंवा गुप्त स्वरूपाचीं प्रकरणें त्यानें स्वतः रोजनिशींत दाखल केलेलीं आढळतात. रा. पारसनीस यांनीं या रोजनिशांचे उतारे प्रसंगानुसार दिलेले उपलब्ध आहेत.

कनिष्ठ बंधूस आत्मीय भावनेनें वागवावें तशी चाल कॅ. ग्रँटनें प्रतापसिंहाशीं ठेविली. अधिकाराचा दिमाख शक्य तितका दाखविला नाहीं. प्रतापसिंहास शिकारीचा शोक ग्रँटनें लाविला व दोघेही वारंवार जंगलांत जाऊन शिकार करीत. कारभार व न्याय इन्साफ उघडपणें कचेरींत बसून करावा, नियमितपणें वेळच्या वेळीं सर्व कामें उरकावीं, आदा पाहून खर्च करावा, कोणत्याही सबबीनें कर्ज करूं नये, रयतेवर करांचा बोजा शक्य तितका हलका ठेवून त्यांचें सुख दिवसेंदिवस वाढेल अशी काळजी घेत जावी, अशा अनेक गोष्टी ग्रँटनें प्रतापसिंहाचे मनावर चांगल्या ठसविल्या. शाळा घालून विद्यादानाची सोय केली. अदालत, पोलिस, तुरुंग, पागा इत्यादि बाबतींत जे उपक्रम ग्रंटनें घातले तेच पुढें प्रतापसिंहानें चालविले. ग्रँटचा राहण्याचा वाडा प्रतापसिंहाचे शेजारींच असून दोघेही शेजारधर्माप्रमाणें बंधुसमान प्रेमानें वागत. समवयस्क असल्यामुळें दोघांची चांगली गट्टी जमली. घोड्यावरून प्रवास करणें, जंगलांत शिकार करणें, प्रांतांत फिरून रयतेची पाहणी करणें इत्यादि गोष्टींची आवड प्रतापसिंहास ग्रंटच्या सहवासानें उत्पन्न झाली. तह ठरून कारभार सुरू झाल्यावर तीनच वर्षे ग्रँट साताऱ्यास राहिला; आणि स. १८२२ अखेर तो निवृत्त होऊन परत स्वदेशीं गेला. या अवधींत मराठ्यांच्या इतिहासाचें साहित्य जमवून व पुष्कळशा कागदांचीं भाषांतरें करवून घेऊन ग्रँटनें बरोबर नेलीं; आणि मग इंग्लंडांत त्यानें आपला इतिहास बनविला. पुढेंही ग्रंटचा प्रतापसिंहाशीं पुष्कळ वर्षे पत्रव्यवहार चालू असून तो इकडील

व्यवहारांची विचारपूस अतिशय ठेवीत असे. इंग्लंडांतून अनेक उपयुक्त चिजा प्रतापसिंग ग्रँटकडून मागवी आणि इकडून पाठविलेल्या पैशाचा हिशेब तो बिनचूक पाठवीत असे. प्रतापसिंहास आलेलीं ग्रँटचीं कित्येक पत्रें प्रसिद्ध झालीं आहेत, त्यांवरून परस्परांमधील आदर चांगला व्यक्त होतो. प्रतापसिंहाचा पहिला जम बसवून देणारा सर्वाधिकारी एल्फिन्स्टन मुंबईस गव्हर्नर व साताऱ्यास त्याचा हस्तक ग्रँट असा हा सगळा नवा नवा प्रकार असल्यामुळें, या नवीन राज्यप्रयोगाची सुरुवात चांगली झाली आणि प्रतापसिंहास रॉयल ए० सो० चें सभासदत्व मिळालें. तथापि लवकरच उभय पक्षांत तेढ उत्पन्न होण्याचीं कारणेंही प्रथमपासूनच घडत गेलीं हेंही लक्षांत ठेवणें जरूर आहे. आरंभीं सर्वत्र सुयोग दिसत असतां परिणामीं अत्यंत विपन्नावस्था झाल्याचें उदाहरण प्रतापसिंहाइतकें इतिहासांत बहुधा दुसरें मिळणार नाहीं.

पेशव्यांचें सगळें राज्य आपणास मिळेल अशी आरंभीं छत्रपतीची अपेक्षा होती, ती सफल न होतां बरेच दिवस हा प्रश्न इंग्रज अधिकाऱ्यांनीं मुग्ध ठेवून अखेरीस एका जिल्ह्याचें लहानसें राज्य त्यास दिलें तेणेंकरून सुरुवातीसच त्यांची मोठी निराशा झाली. छत्रपतींची वरील अपेक्षा कदाचित् निराधार असेल. बाजीरावाचे अंमदानींत सातारकरांचीं चोरटीं अनुसंधानें इंग्रजांकडे चालू असतां, स्थानिक अधिकाऱ्यांनीं प्रसंगानुसार कितीही गोड वचनें दिलीं असलीं, तरी तीं जमेस धरण्याचें कारण नाहीं. आष्टीच्या लढाईनंतर इंग्रजांनीं प्रतापसिंहास साताऱ्यास आणिलें, तरी बाजीरावाचा निकाल लागेपर्यंत कोणतीही कायम व्यवस्था त्यांस ठरवितां येत नव्हती. हल्लीं प्रमाणें जलद टपालाची सोय नसल्यामुळें कलकत्त्यास गव्हर्नरजनरलकडे प्रकरणें रुजू करून हुकूम आणण्यास वेळ लागे. त्यांत नानातऱ्हेचे भानगडीचे प्रश्न व उपद्व्यापी लोकांच्या खटपटी यांजमुळें पुनः खुलासा करून घेण्यांत आणखी वेळ जाई. तह होईपर्यंत दीड वर्ष प्रतापसिंहाचें अत्यंत विवंचनेंत गेलें; आणि इंग्रजांकडून शक्य तितकें राज्य पदरांत पाडून घ्यावयाचें असल्यामुळें कोणाही इंग्रज अधिकाऱ्यास कोणत्याही तऱ्हेनें नाराज करणें सातारकरांस शक्य नव्हतें. अशा रीतीनें इंग्रजांनीं सुचविलेल्या जबरदस्त अटींस मान्यता देऊन गाडें चालू करणें प्रतापसिंहास भाग पडलें. तह ठरत असतां त्यांतील कलमांची पुष्कळ वाटाघाट झाली आणि त्यांपासून कशा अडचणी पदोपदीं येणाऱ्या आहेत हें सातारकरांनीं अधिकाऱ्यांचे नजरेस आणिलें. पण मूळच्या मसुद्यांत अणुरेणुइतका फरक इंग्रजांनीं केला नाहीं. ही पहिलीच गोष्ट प्रतापसिंहास व त्याची कर्तृत्ववान मातुश्री माईसाहेब यांस अतिशय

झोंबली. कर्मधर्मसंयोगानें ही त्याची माता फार दिवस वांचली नाहीं. जतच्या जहागिरीचा बंडावा मोडण्याकरितां ग्रँटसह प्रतापसिंह त्या बाजूस सकुटुंब गेला असतां पौष व० ३ स ( २१·१·१८२१ ) बंधु रामचंद्र भाऊसाहेब जत जवळ मृत्यु पावला, आणि पश्चात् एक वर्षानें मातुश्री तुळजापुराहून परत येत असतां भीमातीरीं धूळखेड येथें पौष शु० १० रोजीं ( ३·१·१८२२ ) मरण पावली. तेव्हांपासून प्रतापसिंहास कुटुंबांतला आधार असा राहिला नाहीं.

स. १८१९ सेप्टेंबरचा तह लक्षपूर्वक वाचला असतां प्रथमपासूनच छत्रपतींचे हातपाय कसे बांधून घेतलेले होते हें लक्षांत येईल. विशेषतः त्यांतलें पांचवें कलम इतकें सर्वव्यापी आहे, कीं त्यामुळें कोणताही व्यवहार अशक्य व्हावा. हें पांचवें कलम अत्यंत जाचक होऊन त्यावरूनच पुढें बेबनाव उपस्थित झाला, त्यांतील मजकूर असा. ‘आपले राज्याबाहेर हर कोणासीं महाराजांनीं पत्र पाठविणें, जाबसाल करणें वगैरे व्यवहार ठेवूं नये. लग्नाचें किंवा घरगुती कारण पडल्यास रेसिडेंटाचे मार्फतीनें काम उलगडून घ्यावें.’ दसऱ्याचा पोषाख, तीळगूळ, सणतेहवार, श्राद्धपक्ष वगैरे शेंकडों बाबती हरहंमेश उत्पन्न होणार, त्या सर्व जाहीर रीतीनें रेसिडेंटाचे मार्फत उलगडणें कसें अशक्य आहे याची स्पष्टता करण्याची जरूर नाहीं. इंग्रजी मुलूख व सातारचें राज्य यांचा संबंध अभेद्य होता. तथापि प्रथमचे रेसिडेंट समंजस होते तोंपर्यंत या कलमासंबंधानें मोठीशी तक्रार उपस्थित झाली नाहीं. पण कर्नल ओव्हॅन्स रेसिडेंट झाल्यापासून या कलमांतील शब्दांसंबंधानें घडोघडी तक्रार उपस्थित झाली. मुंबईचे गव्हर्नरास महाराजानें परभोरें पत्र लिहिणें, गव्हर्नराचे हुकुमावर इंग्लंडचे सरकाराकडे किंवा डायरेक्टरांकडे अपील करणें, किंवा आपलीं गाऱ्हाणीं समक्ष कळविण्यासाठीं बाहेर वकील पाठविणें, या गोष्टी सुद्धां वरील कलमानें मना होऊन, त्या केल्या कीं तह मोडल्याचा आरोप सिद्ध झाला. तहांतील दुसरा एक मुद्दा जाचक झाला तो असा, कीं ‘ हें राज्य महाराज व त्यांचे वारसांस कायमपणें देण्यांत येत असून, त्यांनीं इंग्रजांचे कह्यांत व मदतींत संतोषानें राहून त्यांचे सल्यानें कारभार करावा.’ या कलमानें प्रतापसिंह इंग्रजांचा दोस्त कीं सर्वथैव ताबेदार बनला याबद्दल वाद उपस्थित होऊन रेसिडेंटापुढें पदोपदीं मान वांकवावी लागल्यानें शिवछत्रपतीच्या त्या मानधन वंशजास आपलें सर्व जिणेंच दुःसह झालें. ग्रँट डफचे अंमदानींत प्रतापसिंहास कारभाराची मुखत्यारी अगदीं शेवटीं मिळाली. स. १८१८ त प्रतापसिंह पंचवीस वर्षांचा असूनही कारभार करण्यास नालायक समजला

गेला; आणि त्याहून अवघा चार वर्षांनीं मोठा कॅप्टिन ग्रँट स्वराज्याचीं मोठमोठीं कामें करून प्रतापसिंहास तयार करण्यास लायक गणला गेला. त्यानें योग्य शिफारस केल्यावर मग राजास अधिकार मिळावयाचा अशी स्थिति असल्यामुळें त्यांजमध्यें धुसपूस होण्याचें कारणच नव्हतें. राजास संपूर्ण अधिकार देऊन स. १८२२ चे शेवटच्या दिवशीं ग्रँटनें आपलें काम सोडिलें. तेव्हां त्याचे जागीं कर्नल ब्रिग्जची नेमणूक साताऱ्यास झाली.

पुढील हकीकती कळण्यास साताऱ्याचे रेसिडेंट व मुंबईचे गव्हर्नर यांचीं नांवें व काल ध्यानांत ठेवणें जरूर आहे. कारण केव्हां झालें तरी कोणताही कारभार पुष्कळसा व्यक्तीवरच अवलंबून राहणार, त्या व्यक्ती दृष्टिसमोर असल्या पाहिजेत.

२ क. ब्रिग्ज—१·१·१८२३—डिसेंबर १८२६
३ क. रॉबर्ट्सन—जून १८२७—जानेवारी १८३२
४ क. लॉड्विक—जानेवारी १८३२—१४·६·१८३७
५ क. ओव्हन्स—१५·६·१८३७—१९·५·१८४५
६ जेम्स आउट्रॅम—२०·५·१८४५—मे १८४७
७ बार्टल फ्रियर—मे १८४७—१८४८.

मुंबईचे गव्हर्नर या काळांत खालीलप्रमाणें झाले:—

| | |
|---|---|
| १ एल्फिन्स्टोन | ३१·१०·१८१९—३१·१०·१८२७ |
| २ माल्कम | १·११·१८२७—१·१२·१८३० |
| ३ सिड्ने बेक्विथ | १·१२·१८३०—मृ. १५·१·१८३१ |
| ४ अर्ल क्लेअर | १८३२—मार्च १८३५ |
| ५ रॉबर्ट ग्रँट | मार्च १८३५—मृ. ९·७·१८३८ |
| ६ फेरिस ॲव्हिंग | १८३८–१८३९ |
| ७ रिव्हेट कारनॅक | ३१·५·१८३९—८·६·१८४१ |
| ८ जॉर्ज आर्थर | ९·६·१८४१—५·८·१८४६. |

प्रतापसिंहाच्या कारभाराचे छापील कागद इतके विपुल आहेत, कीं त्यांचा अभ्यास करणारांस वरील नांवाचा उपयोग विशेष होईल. प्रतापसिंहास छळणारे मुख्य इसम दोन, गव्हर्नर ग्रँट व त्यानें साताऱ्यास नेमलेला आपला हस्तक ओव्हॅन्स. त्यास पदच्युत करण्याचें शेवटचें कृत्य कारनॅकनें सिद्धीस नेलें.

प्रतापसिंह व इंग्रज यांच्या मनोरचनेंतील फरकही आपण लक्षांत ठेविला पाहिजे. प्रतापसिंहास वाटे आपल्या बापजाद्यांच्या राज्याचा अल्पांश आपणास मिळाला. इंग्रजांस वाटे, आम्ही प्रतापसिंहास नवीन राज्य दिलें, हा आमचा त्याजवर मोठा उपकार. सर्वच प्रदेश आपण हस्तगत करितों तर आम्हांस नको कोण म्हणत होतें ! हा उपकार प्रतापसिंहानें जाणला पाहिजे. पण उपकारा ऐवजीं प्रतापसिंह नाराज कां होता हें वर दाखविलें आहे. पूर्वजांच्या लौकिकास साजेसा पराक्रम करून आपण मराठी राज्य राखावें, व धर्म वृद्धिंगत करावा, बाजीरावानें नादानपणानें घालविलें तें राज्य आपण परत मिळवावें अशी त्याची हाव होती. त्याचे उलट प्रकार होऊन आपणास केवळ जहागीरदाराप्रमाणें दुसऱ्यांच्या हातांतील बाहुलें होऊन बसावें लागतें, या स्थितीचा त्यास पराकाष्ठेचा वीट आला. ग्रँट, ब्रिग्ज, एल्फिन्स्टन, माल्कम वगैरे पहिली परिस्थिति पाहिलेली मंडळी अधिकारावर असेपर्यंत त्यांनीं वारंवार प्रतापसिंहास भेटून त्याचा गौरव करण्याचा प्रघात ठेविल्यामुळें तो संतुष्ट राहिला. पण पुढें जीं नवीन माणसें कारभारावर आलीं त्यांस वाटूं लागलें, कीं सातारचें राज्य निर्माण करण्यांत पूर्वीच्या अधिकाऱ्यांनीं चूक केली. आयता सर्व प्रदेश सलंग हस्तगत झाला असतां त्यास मध्यंतरीं लहान मोठ्या संस्थानिकांचे व जहागिरदारांचे अडथळे कायम ठेवण्यांत पैशापरी पैशाचें नुकसान होऊन वरती कारभारास मात्र हरकत येते. ती दूर करण्याचा जो पुढें प्रयत्न सुरू झाला, त्यांत सातारच्या राज्याची आहुति पडली. बाजीरावाच्या युद्धांत इंग्रजांनो कशी परिस्थिति उत्पन्न झाली होती, खुद्द ग० ज० चा हुकूम सर्व प्रदेश हस्तगत करण्याचा असतांही एल्फिन्स्टननें सातारचें राज्य मुद्दाम ठेवण्याचा सुप्रसिद्ध जाहीरनामा कां काढिला, वगैरे प्रकार ज्यांस अवगत आहेत, त्यांस वरील पश्चात्‌बुद्धि बिलकूल पटणारी नाहीं. स. १८१८ च्या युद्धांत मराठ्यांची व हिंदी सत्ताधीशांची इंग्रजांविरुद्ध जूट बनती तर ती त्यांस कशी जाचक झाली असती, हें ध्यानांत न राहून पुढच्या अधिकाऱ्यांची राज्यतृष्णा इतकी अनावर झाली, कीं नुसतीं हिंदी संस्थानेंच खालसा करून त्यांची तृप्ति होईना. ब्रह्मदेश, अफगाणिस्तान, सिंध वगैरे बाहेरचे प्रदेश सुद्धां ते हस्तगत करूं लागले. ही इंग्रजांची पुढील आक्रमणप्रवृत्ति प्रतापसिंहास बाधक झाली.

या अव्वल इंग्रजीच्या संधिकाळांत दोन बाणेदार पुरुष निर्माण झाले, एक हा सातारचा प्रतापसिंह व दुसरा त्याचाच समकालीन व समवयस्क बडोद्याचा सयाजी-

राव गायकवाड. दोघांनाही इंग्रजांशीं स्वराज्यसंरक्षणार्थ तीव्र झगडा करावा लागला. या दोघांपैकीं वास्तविक पाहतां प्रतापसिंहाची भरभराट व्हावी व सयाजीरावाची उचलबांगडी व्हावी अशी परिस्थिति असतां, त्याचे उलट प्रकार झालेला पाहून ' वारांगनेव नृपनीतिरनेकरूपा ' या तत्त्वाची आठवण झाल्याशिवाय राहत नाहीं. ही गोष्ट मनांत ठेवून आतां प्रतापसिंहाची पुढील हकीकत सांगावयाची आहे.

**२ इंग्रज अधिकाऱ्यांचा रोष.**—एल्फिन्स्टन, ग्रँट, ब्रिग्ज इत्यादि पहिले अधिकारी मराठ्यांच्या राजकारणांत मुरलेले होते. त्यांनीं लिहिलेले ग्रंथ अद्यापि प्रमाणभूत मानले जातात. जिंकिलेल्या लोकांस आदरानें वागवून परकी अंमलाचें त्यांचें दुःख हलकें करावें अशी त्यांची मनोभावना होती. ब्रिग्जचे मागून साताऱ्यास रेसिडेंट झालेला रॉबर्टसन हाही वरच्यांचाच जोडीदार पुण्याचा पहिला कलेक्टर होता. त्या सर्वांनीं प्रतापसिंहाच्या कारभाराची मनसोक्त वाखाणणी केलेली आहे. यांच्याच सांगण्यावरून प्रतापसिंहानें महाबळेश्वरचा टापू हवा खाण्याचें ठिकाण म्हणून इंग्रजांस दिला; तेथपावेतों रस्ते केले, व ते सांगतील त्या सुधारणा घडवून आणिल्या. प्रतापसिंहानें सालोसाल गव्हर्नराचे भेटीस उन्हाळ्यांत महाबळेश्वरीं जावयाचें व गव्हर्नरानें परत जातेवेळीं साताऱ्यास येऊन तेथील पाहुणचार घ्यावयाचा, असा प्रघात सारखा पंधरा अठरा वर्षें अव्याहत चालला. स. १८२६ त एल्फिन्स्टन साताऱ्यास गेला असतां लिहितो. ' मराठ्यांचे कुळांत प्रसापसिंहाइतका सुसंस्कृत पुरुष दुसरा मला आढळला नाहीं. त्यानें राज्यांत उत्कृष्ट व्यवस्था ठेविली असून, रस्ते, पूल, पाण्याच्या सोयी वगैरे जागजागीं करून लोकसुखासाठीं तो सारखा झटत आहे. त्याच्या वाड्यांतील बसण्याची खोली मला अप्रतिम वाटली. या ठिकाणीं शिवाजीचा हा वंशज हिरवी सकलाद घातलेल्या टेबलावर आपली दररोजची रोजनिशी लिहीत बसतो, हें पाहून कोणास कौतुक वाटणार नाहीं ! ' ता. ६·१०·१८३३ रोजीं गव्हर्नर लॉर्ड क्लेअरनें साताऱ्यास प्रतापसिंहाची भेट घेतली, त्या वेळची खालील हकीकत त्यानें लिहून ठेविलेली आहे. ' प्रसापसिंह तरुण, ठेंगू, लठ्ठ व गौरवर्ण आहे. त्याचें कपाळ रुंद असून डोळ्यांत तीव्र चमक आहे. लोकांस विद्यादान देण्याची त्यास मोठी हौस असून त्यासाठीं साताऱ्यास त्यानें पाठशाळा घातली आहे, त्यांत इंग्लिश, पर्शियन, मराठी या भाषा शिकविल्या जातात. राममोहन राय या सुप्रसिद्ध सुधारकाची हा राजा मोठी वाखाणणी करितो. त्याचा भाऊ आपासाहेब जड व निर्बुद्ध दिसतो. त्याच्या तोंडावर तेज कसें तें बिलकूल

नाहीं. त्याची अक्कलही बेताचीच असल्यामुळें लोकांस त्याजबद्दल मोठासा आदर वाटत नाहीं. प्रतापसिंहास मुलगा नसल्यामुळें, आपासाहेब पुढें गादीवर आल्यास कठिण प्रसंग ओढवेल असें लोकांस वाटतें. त्याऐवजीं लोकांचे डोळे बाळासाहेब सेनापतीकडे लागतात, कारण तो हुशार व तरतरीत आहे.' ता. २३·३·१८१९ रोजीं डफ लिहितो, 'आपासाहेब हट्टी व दुर्वृत्त आहे. त्यास वाईट वाईट व्यसनें जडलेलीं आहेत. प्रतापसिंहानें कितीही त्यास शिकविलें तरी त्याच्या खोड्या सुटत नाहींत.' * योगायोग असा कीं अशा या नालायक आपासाहेबास इंग्रजांनीं मुद्दाम राज्यपद दिलें.

महाबळेश्वरामुळें प्रतापसिंहास विशेष महत्त्व प्राप्त झालें. या सह्यशिखरावर वास्तव्य करण्याची मूळ कल्पना लॉड्विकची. त्यापूर्वीं पेशव्यांपैकीं सवाईमाधवरावच काय तो एकदां ता. १४·१०·१७९१ रोजीं महाबळेश्वरास गेला होता, तेव्हां त्याजबरोबर मॅलेट व प्राइस हे दोघे इंग्रज होते. प्रतापगडचा किल्ला व तेथील भवानीचें मंदिर प्रतापसिंहाचे हद्दींत येत नव्हतें, तरी राजानें मागितल्यावरून स. १८२३ त तें इंग्रज सरकारानें त्याच्या हवालीं केलें. स. १८२४ च्या मार्चांत राजानें दोन हजार लवाजम्यानिशीं समारंभानें प्रतापगडास जाऊन देवीचें दर्शन घेतलें. कर्नल ब्रिग्जनें सांगितल्यावरून राजानें आपल्या खर्चानें साताऱ्याहून महाबळेश्वर व पुढें प्रतापगड-पावेतों गाडीचा सुंदर रस्ता तयार केला, व तोच पुढें महाड पर्यंत नेण्यांत आला. महाबळेश्वरावर पहिला बंगला ब्रिग्जनें बांधिला. एल्फिन्स्टन गव्हर्नर कारभार सोडून गेल्या वेळीं त्यास सर्व इलाख्याच्या लोकांनीं मानपत्र दिलें, त्याजवर पहिली मानाची सही प्रतापसिंहाची होती. त्याचे पश्चात् माल्कम गव्हर्नर आल्यावर त्याचे नांवानें माल्कम पेठ वसवून राजानें स. १८२८ त महाबळेश्वरची प्राणप्रतिष्ठा केली. पेठेस प्रतापसिंहाचें नांव द्यावें अशी माल्कमची सूचना होती, ती राजानें मान्य केली नाहीं. प्रतापसिंहानें स्वतःसाठीं म्हणून तेथें बंगला बांधिला तो हल्लीं अस्तित्वांत नाहीं. महाबळे-श्वरचा टापू स्वतंत्र तहानें त्यानें इंग्रजांस तोडून दिला, तो तह ता. १६·५·१८२९ चा आहे. माल्कम, राबर्ट्सन व दुसरे अधिकारी यांनीं प्रतापसिंहाच्या कारभाराची

---

* Appasaheb is an obstinate ill-disposed lad with very low vicious habits which all the admonition of the Raja cannot get the better of.

अत्यंत वाखाणणी करून त्यास कांहीं तरी चांगलें पारितोषिक देण्याची शिफारस इंग्लंडचे सरकारास केली, त्यावरून तिकडून एक मोठ्या प्रशंसेचा खलिता व मोलवान तरवार नजर म्हणून ता. २९·१२·१८३५ रोजीं पाठविण्यांत आली. परंतु ती आली तेव्हां गव्हर्नर ग्रॅन्ट कारभारावर होता, त्यास ही राजाची प्रतिष्ठा न आवडून त्यानें तलवार व खलिता मधच्या मध्यें दडपून ठेविला, आणि राजावर कांहीं तरी किटाळ आणण्याची उभारणी केली, त्यावरून चिडून जाऊन ता. ३०·४·१८३७ रोजीं प्रतापसिंहानें महाबळेश्वरावरील आपला बंगला पाडण्याचा हुकूम केला. पण लॉड्विकच्या आग्रहावरून त्यानें हा आपला हुकूम मागें घेतला. महाबळेश्वरावरील निसर्गसौंदर्य व्यक्त करणाऱ्या निरनिराळ्या प्रोत्तुंग स्थलींना जीं नांवें अद्यापि चालतात, त्यांत प्रतापसिंहाचाच इतिहास भरलेला आहे.

अशा या चतुरस्त्र राजाशीं मुंबईसरकाराचें वैमनस्य येण्यास काय कारणें झालीं तीं आतां सांगितलीं पाहिजेत. सामान्य कारणांचा उल्लेख मागें आलाच आहे. विशिष्ट कारणांचें येथें केवळ दिग्दर्शनच करितां येईल. जे आरोप किंवा गुन्हे राजावर लागू करण्यांत आले त्यांची तपशीलवार हकीकत देणें झाल्यास त्याचा स्वतंत्र ग्रंथ होईल. त्यासाठीं जिज्ञासूंनीं अव्वल वाङ्मयच पाहिलें पाहिजे. सामान्यतः खालील आरोप राजावर ठेवण्यांत आलेले आढळतातः—

१ ताब्यांतील जहागीरदारांवर प्रतापसिंहानें आपला हक्क सांगितला. जहागीरदार निपुत्रिक मेल्यावर किंवा त्यांच्यांत तंटे भांडणें लागल्यावर, चालू व्यवस्थेंत कमी जास्त करण्याचा अधिकार राजानें गाजविणें मुंबईसरकारास मंजूर वाटलें नाहीं.

२ इंग्रज सरकाराचा हिंदुस्थानांतून उठावा करण्यासाठीं प्रतापसिंहानें गुप्त कट रचून त्यासाठीं

( १ ) सातारा येथें ठेविलेल्या इंग्रज पलटणांतील देशी अंमलदार शिवगुलामसिंग व गुलजार मिश्र यांस त्यानें फतविलें;

( २ ) जोधपुरास असलेला आपासाहेब भोसले याच्याशीं व इतरत्र फितुरीचा पत्रव्यवहार चालविला, आणि

( ३ ) गोवा येथील पोर्तुगीजांशीं असाच फितुरीचा पत्रव्यवहार केला;

३ भाऊ आपासाहेब याचा छळ केला; आणि

४ कित्येक उत्पाती माणसांच्या नादीं लागून ब्राह्मणांचीं मनें दुखविलीं.

अशा प्रकारच्या कित्येक आरोपांवरून इंग्रज सरकारानें प्रतापसिंहास पदच्युत करून काशीस हद्दीपार केलें आणि बंधु शहाजी आपासाहेब याजबरोबर नवीन तह करून त्यास गादी दिली.

इंग्रजी अंमलांत जातिद्वेष व घरगुती भांडणें यांस कसा ऊत येत चालला ही गोष्ट सामान्य परिचयाची आहे. राष्ट्रसंचाराचा बाह्य प्रवाह अविच्छिन्न वाहत असला म्हणजे लोकांचें लक्ष नेहमीं व्यवसायमग्न राहून घरच्या घरीं कुटाळक्या करण्यास त्यांस अवकाशच मिळत नाहीं. पहिला बाजीराव किंवा सदाशिवरावभाऊ यांस सर्व देशाची उठाठेव करण्याचा लकडा पाठीवर असल्यामुळें, त्यांच्या रासवटींत ब्राह्मण प्रभु मराठे वगैरे सर्व जाती खांद्यास खांदा लावून राष्ट्रकामें उरकीत होत्या. दुसऱ्या बाजीरावापासून बाह्य संचार आकुंचित होत गेल्याबरोबर घरांतील लहानशा पुंजीवर सर्वांचीच धाड पडूं लागली. बाजीरावाचें राज्य गेल्याबरोबर शेंकडों ऐतिहासिक घराण्यांचे पूर्वींचे व्यवसाय बंद होऊन ते एकमेकांसच खाऊं म्हणून उठले. मागील अनिरुद्ध संचारस्वातंत्र्याची आठवण त्यांचे मनांत ताजी असल्यामुळें कोंडलेल्या वाघांप्रमाणें ते अविचारानें आपापसांतच लढूं लागले. खुद्द प्रतापसिंहास आपल्या भोसले घराण्याची प्रतिष्ठा अतोनात वाटून सिंदे, गायकवाड, किंवा अक्कलकोटचें घराणें वगैरे सोयरिकीस नापसंत दिसूं लागलीं. त्यानें आपल्या जातिकुळांचा तपास जोरानें चालविला. उदेपुरास वकील पाठवून त्याच पुरातन क्षत्रिय घराण्यांतून भोसल्यांची शाखा उत्पन्न झाली असें त्यानें सिद्ध केलें, आणि इकडच्या मुली राजपुतांस व त्यांच्या मराठ्यांस कराव्या असा प्रयत्न चालवून 'सिसोदे राजे भोसले' असें उपनांव धारण केलें. या प्रयत्नांत पुष्कळसे दुय्यम गणले जाणारे मराठे नाराज झाले. मल्हार रामराव चिटणीस व त्याचा पुत्र बळवंतराव यांस प्रभूंच्या क्षत्रियत्वाचा विशेष अभिमान उत्पन्न होऊन त्यांनीं प्रतापसिंहाच्या मदतीनें पूर्वी पेशवाईत झालेला अन्याय दूर करण्याचा उद्योग चालू केला. चतुरसिंगाचा कर्तृत्ववान पुत्र बळवंतराव सेनापति मराठ्यांचा अत्यंत अभिमान बाळगणारा होता. प्रतापसिंह, बळवंतराव सेनापति, व बळवंतराव चिटणीस व पुढें प्रसिद्धीस आलेला रंगोबापूजी हे सर्व तरुण व होतकरू पुरुष एकविचारानें वागून बदललेल्या परिस्थितींत राज्याची व समाजाची ऊर्जितावस्था करण्यास अत्यंत आतुरतेनें झटूं लागले. त्यांस उद्योगाचें अन्य क्षेत्र मोकळें असतें तर या घरगुती प्रपंचांत ते इतके गुंतून गेले नसते हें उघड आहे. दिवाण विठ्ठलराव महाजनी, व त्याचा मुलगा गोविंदराव,

बापू कान्हो वगैरे कित्येक सातारकर ब्राह्मण मंडळीही प्रतापसिंहास मिळून होती. तथापि जातीच्या किंवा धर्माच्या बाबतींत ते फारसें लक्ष घालीत नसत.

वरील मंडळीच्या विरुद्ध असा दुसरा एक पक्ष, आघातास प्रत्याघात या न्यायानें, निर्माण झाला. त्याचें पुढारपण बळवंतराव नातूकडे आलें. या पक्षाचें अधिष्ठान वाई पुणें येथें होतें. सांगलीकर चिंतामणराव पटवर्धन यासही या पक्षाचा अभिमान असे. बळवंतराव नातू व गंगाधरशास्त्री पटवर्धन दोघेही हुशार व कारस्थानी गृहस्थ स्वार्थाच्या नादीं लागून इंग्रजांच्या कच्छपीं लागून बाममार्गास गेले. पश्चिम-हिंदुस्थानांत इंग्रजी राज्याची प्रतिष्ठा वाढण्यास या दोन पुरुषांची करामत उपयोगास आली. नातू लोभी व साहसी होता. नवीन राज्याची घडी बसविण्यांत मुंबईच्या गव्हर्नरांस त्याचा उपयोग अतिशय झाला. म्हणून त्याजवर इंग्रजांची मर्जी असे. त्याचीं कुंलगडीं ते ओळखून नव्हते असें नाहीं, पण मतलबासाठीं त्यांनीं त्यास हाताशीं धरिलें. नातूला दुखविल्यामुळेंच प्रतापसिंह बुडाला असें निःसंशय म्हणतां येतें. पैशाचा लोभी असल्यामुळें नातूस प्रतापसिंहाची दिवाणगिरी पाहिजे होती. दिवाणगिरीच्या पोटीं अनेक फायदे होते. जहागीरदारांवर सत्ता गाजविणें दिवाणाच्या हातांत होतें. बळवंतराव चिटणीस व बळवंतराव सेनापति यांस पेशव्यांचा संबंध तोडून साताराच्या राज्यांत नवीन प्रघात पाडण्याची मोठी उत्सुकता होती. इंग्रजांस राज्य मिळवून देणारा नातू आपल्याजवळ नको अशी त्यांनीं प्रतापसिंहाची समजूत करून त्यास दिवाणगिरी दिली नाहीं. विठ्ठल बल्लाळ महाजनीस त्यानें दिवाण केलें. तें पाहून नातूनें एल्फिन्स्टनचे मार्फत रेसिडेंटाच्या असिस्टंटाची जागा मिळविली. अर्थात् चिटणीस व नातू एकाच राजधानींत दोन भिन्न धन्यांचे नोकर बनले. तथापि मागें सांगितलेले प्रतापसिंहास चाहणारे इंग्रज अंमलदार अधिकारावर होते तोंपर्यंत नातूच्या हातून दुसऱ्यास अपाय होऊं शकला नाहीं. स. १८३० नंतर जहागीरदारांचें प्रकरण उपस्थित झालें तोंपर्यंत फक्त जातिनिर्णय व प्रभु–ब्राह्मणांचा कलह एवढा एकच विषय उभय पक्षांचीं मनें वेधणारा उत्पन्न झाला होता. प्रतापसिंहानें प्रभूवरील आचरणाचे ब्राह्मणांनीं बसविलेले निर्बंध काढिले, तेव्हां पुणें वाई प्रांतांतील ब्राह्मणांनीं मोठा गवगवा चालविला, त्यांस चिंतामणराव पटवर्धनानें प्रोत्साहन देऊन ब्राह्मणांच्या तर्फेनें संकेश्वरच्या शंकराचार्याकडून आज्ञापत्र घेतलें कीं कलींत क्षत्रिय नाहींत, शिवाजी महाराज वगैरे क्षत्रिय नव्हते, प्रतापसिंहानें ‘ क्षत्रियकुलावंतस ’ हें पद धारण करूं नये आणि आपल्या

वाड्यांत वेदोक्त विधीनें कृत्यें करूं नयेत. त्यावरून प्रतापसिंहानें या प्रकरणाचा तपास करून तंजावर, म्हैसूर, नागपुर, धार, उदेपुर वगैरे ठिकाणीं क्षत्रियांस वेदोक्त विधीनें संस्कार होतात कीं नाहींत याचा शोध आणविण्यासाठीं रेसिडेंटाची परवानगी घेऊन माणसें पाठविलीं (ता. ११·१२·१८२८). शिवाय या प्रश्नाचा शास्त्राधारें निर्णय करण्यासाठीं एक पंडितांची सभा बोलावली. विवादप्रसंगीं क्षत्रिय पक्षाचा पुढारी विठ्ठल सखाराम उर्फ आबा पारसनीस हा गृहस्थ असून ब्राह्मणांचा पुढारी राघवाचार्य गजेन्द्रगडकर होता. सभेचा निकाल क्षत्रियांचे तर्फेचा झाला, तरी छत्रपतींचे वाड्यांत ब्राह्मण वेदोक्त कर्म करीनात. उलट त्यांनीं गव्हर्नर माल्कम स. १८३१ च्या मार्चांत साताऱ्यास आला असतां त्याची गांठ घेऊन महाराजांविरुद्ध अर्ज दिला. नंतर त्याच सालीं प्रतापसिंहानें रेसिडेंटाच्या परवानगीनें शिवानंदशास्त्री यास उदेपुरास पाठविलें. आपली मुलगी गोजराबाई उदेपुरास द्यावी, उदेपुरच्या मुली आपल्याकडे कराव्या, भोसले घराणें उदेपुरचीच शाखा होय, या गोष्टींचा खास तपास व निर्णय करण्यासाठीं प्रतापसिंहानें आपलीं माणसें तिकडे पाठविलीं. उदेपुराहून जबाब आला कीं सातारकर भोसले आपल्याच घराण्याची शाखा आहे. शिवाय बंधुभावनेनें राण्यानें हत्ती, घोडे, पोशाख वगैरे नजराणे रेसिडेंटाच्या मार्फतीनें प्रतापसिंहास पाठविले, (आगस्ट १८३६). पुढें शिवानंदशास्त्री दक्षिणेंत परत आल्यावर मरण पावला. मुलीचें लग्न उदेपुरास जुळलें नाहीं.

या ज्ञातिप्रकरणामुळें समाजांत तट पडून त्याचा थोडाबहुत परिणाम प्रतापसिंहास राजकीय बाबतींतही बाधक झाल्याशिवाय राहिला नाहीं. प्रतापसिंहाचे राज्यांत ब्राह्मणांवर जुलूम होतो आणि आपला धर्म बुडतो अशी हाकाटी नातूच्या मार्फत सरकारांत जाऊन त्याजविरुद्ध वरीष्ठांचें मत बनत गेलें, आणि इरेस पडलेल्या पक्षानें पराचा कावळा करून राजद्रोहाचीं प्रकरणें उपस्थित केलीं. निदान उठाठेवी करणारांस हें एक निमित्त झालें. या ज्ञातिप्रकरणाची सुरवात सन १८२५ पासून होऊन तें पुढें सारखें चालूच होतें. त्यांत स. १८३६ सालच्या पावसाळ्यांत पलटणांतील फितुराचें काम निर्माण झालें. प्रतापसिंहानें दुश्चिन्हें लक्षांत घेऊन आवरतें घ्यावें तें घेतलें नाहीं. उलट हीं प्रकरणें जास्त पेट घेत असतांच वेदोक्त विधीचा नवीन ग्रंथ तयार करवून तदनुसार सन १८३८ त पुनः त्यानें आपला राज्याभिषेक करविला.

बाळाजीपंत नातूच्या विरुद्ध प्रतापसिंहानें तक्रारी केल्या त्यांकडे सरकारानें मुळींच लक्ष दिलें नाहीं, आणि स. १८३५ च्या मार्चांत सर रॉबर्ट ग्रंट गव्हर्नरीवर आल्या-

पासून पूर्वीचें धोरण बदलत गेलें. त्या वेळीं रेसिडेंट लॉड्विक सातान्यास होता, तो स्वतः भला होता, तरी वरीष्ठांचें मत राजाचे विरुद्ध कलुषित झाल्यामुळें त्यास आपलें काम दिवसेंदिवस अवघड वाटूं लागलें. शिवगुलामसिंग व गुलजारमिश्र या लष्करी अमलदारांस फितवण्याचा प्रयत्न लॉडविकचे कानावर आला. वास्तविक त्या माण-सांची व प्रतापसिंहाची बोलाचाली झाली नसतां अनेक गोष्टी जुळवून हा खोडसाळ आरोप तयार करण्यांत आला होता. लगेच त्याची वर्दी लॉड्विकनें गव्हर्नरास पाठ-विली. तेव्हां गव्हर्नरानें लॉड्विक, ओव्हॅन्स व आपला सेक्रेटरी विलोबी यांचें एक गुप्त कमिशन सातान्यास पाठवून या फितुरी प्रकरणाचा तपास करविला. ता. १२·१० १८३६ पासून ता. ४·११·१८३६ पर्यंत हा तपास चालून साक्षी पुरावे घेण्यांत आले. तपास चालू असतां आपणास किंवा आपले वकिलास हजर ठेवावें अशी मागणी प्रतापसिंहानें केली, ती मान्य करण्यांत आली नाहीं. साक्षींची उलट तपासणी झाली नाहीं. ता. २९·१०·१८३६ रोजीं प्रतापसिंहास रेसिडेन्सींत बोलावून त्यास तो पुरावा तोंडीं वाचून दाखविण्यांत आला. त्यावर त्यानें त्या कागदांच्या नकला मागितल्या त्या त्यास देण्यांत आल्या नाहींत. तपास सुरू होण्याच्या पूर्वींच म्हणजे ता. ७·१०·१८३६ रोजीं प्रतापसिंहाचा दिवाण गोविंदराव व दुसरे दोन गृहस्थ यांस रेसिडेंटानें अटकेंत ठेविलें आणि त्यांची मदत प्रतापसिंहास होऊं दिली नाहीं. पुढें तपास संपल्यावर गोविंदराव दिवाणास सोडण्याऐवजीं सातान्याहून उचलून पुण्यास व तेथून नगरास सक्त नजरकैदेंत ठेवण्यांत आलें. गुन्हा कबूल करावा म्हणून तेथें त्याचे फार हाल करण्यांत आले. पण अखेरपर्यंत त्यानें आपलें पहिलें वचन सोडलें नाहीं. स. १८४१ त त्याची नगराहून सुटका झाली, पण सातान्यास राहण्याची बंदी झाल्यामुळें तो आरंभीं पुणें व पुढें आळंदी येथें राहिला.

प्रतापसिंहाकडून गुन्हा घडला आहे असा निकाल कमिशननें एकमतानें करून शिक्षेसाठीं प्रकरण गव्हर्नराकडे पाठविलें. तपास चालू असतां लॉड्विकनें साक्षीदारांस छेडून सत्य बाहेर आणण्याचा पुष्कळ प्रयत्न केला. त्या संबंधानें पुढें स. १८४२ त त्यानें डायरेक्टरांस लिहून कळविलें, कीं 'प्रतापसिंहानें गुन्हा केला अशी माझी खात्री नव्हती, तरी त्या ठरावावर भिन्न मत लिहिण्याऐवजीं मीं सही केली याचें मला अत्यंत वाईट वाटतें, आणि यावज्जन्मांत ती एक माझी मोठी चूक झाली असें मी समजतों.' हें प्रकरण पुढें इतकें विकोपास जाईल अशी अटकळ त्यास प्रथम बिलकूल नव्हती.

**३ पदच्युति व काशीस रवानगी.**—लॉड्विकची वृत्ति अनुकूल नाहीं असें पाहून गव्हर्नरानें कमिशनच्या निवेदनावर लगेच निकाल दिला नाहीं. त्यानें प्रथम

लॉड्विकची बदली करून ओव्हन्सची नेमणूक साताऱ्यास केली, आणि मग आणखी पुरावा गोळा करण्याचा उद्योग सुरू केला. ता. १५ जून १८३७ रोजीं रेसिडेंटाच्या बदल्या अंमलांत आल्या. या प्रकरणांत इतक्या व्यक्तींचा संबंध व तपशीलाची इतकी गुंतागुंत झालेली आहे कीं त्याची स्पष्टता थोडक्यांत करणें शक्य नाहीं व इतिहासास त्याचा तादृश उपयोगही नाहीं. व्यवहारांत इंग्रजांच्या न्यायान्यायाचीं शेंकडों उदाहरणें हरहंमेश घडत आहेत, त्यांतलेंच एक प्रतापसिंहाचें प्रकरण होय. मराठी राज्याच्या इतिहासांत त्यास महत्त्व आलें इतकेंच. सरकारचें वातावरण आपल्या विरुद्ध होत चालल्याचें निदर्शनास येतांच प्रतापसिंहानें लंडनास दाद मागण्यासाठीं आपला एक वकील पाठविण्याचें मनांत आणिलें. मुंबईस सय्यद मीर अफजल अली म्हणून एक गृहस्थ होता त्यास प्रतापसिंहानें इंग्लंडास पाठविण्याचें ठरविलें. त्यानें हा वकील पाठवूं नये म्हणून दोन वर्षें पावेतों गव्हर्नरानें नानाप्रकारचे अडथळे आणिले. शेवटीं स. १८३८ त मीर अफजलअली इंग्लंडास गेला. परंतु तेथें त्याचे हातून व्हावें तसें काम झालें नाहीं म्हणून दुसरे खास भरंवशाचे गृहस्थ यशवंतराव राजे शिर्के, भगवंतराव विठ्ठल, चिटकोजी सुर्वे, रंगो बापूजी गुप्ते यांस त्यानें फेब्रुवारी १८३९ त लंडनास रवाना केलें. त्यांसही जाण्यास जहाज वगैरे मिळूं नये अशी खटपट चार दोन महिने होऊन त्यांचें जाणें लांबलें, तरी वकील अखेरीस गेले. त्यांनीं सर्व कागदपुराव्यानिशीं प्रकरण इंग्रजी भाषेंत सजवून डायरेक्टर्स, प्रोप्रायटर्स व पार्लमेंट या सभांपुढें मांडिलें. पांच वर्षें हा उद्योग तिकडे सारखा चालू होता. हजारों पृष्ठें त्या कामीं छापलीं गेलीं. इकडे स. १८३९ त प्रतापसिंहाची उचलबांगडी झाल्यामुळें लंडनांत गेलेल्या वकिलांस खर्चाची अडचण पडून त्यांचे अतोनात हाल झाले. राजास मोठा अन्याय झाला ही गोष्ट तिकडे बहुतेकांस चांगली पटली, परंतु होऊन गेलेला प्रकार फिरविण्याइतकी मजल अधिकाऱ्यांची गेली नाहीं. एकवार केलेला ठराव आम्ही फिरवीत नाहीं असा त्यांनीं निकाल दिला, आणि लंडनास गेलेली मंडळी कशीबशी हाल अपेष्टेनें परत आली.

प्रतापसिंहाचा धाकटा भाऊ आपासाहेब कसा होता त्याजबद्दल गव्हर्नराचाच अभिप्राय मागें देण्यांत आला आहे. तो व्यसनी असून हलकट लोकांच्या नादानें चाले. पुण्याहून एक रक्षा आणून त्यानें आपल्याजवळ ठेविली. तिच्या संगतींत राहून त्यानें आपल्या बायकोचा इतका भयंकर छळ चालविला, कीं जिवाच्या भीतीनें ती दीराजवळ येऊन राहिली. याचा अर्थ प्रतापसिंहाच्या शत्रूंनीं असा प्रसृत केला कीं

त्यानें भावाची बायको पळवून आपल्या जवळ आणिली. त्याजवर आणलेल्या आरोपांत हा एक घाणेरडा आरोप त्यास विशेष झोंबणारा होता. त्यासंबंधानें क० ब्रिग्जनें लंडनांत कोर्टापुढें असें स्पष्ट भाषण केलें, कीं 'हा अत्यंत बदनामी करणारा आरोप सर्वथैव खोटा आहे. हिंदुस्थानांत असतां शेंकडों राजांचा व माझा संबंध घडला. पण त्या सर्वांत सच्छील व सद्वर्तनासंबंधानें प्रतापसिंहाची बरोबरी करणारा एकही इसम मला आढळला नाहीं. तसेंच शहाजी इतका स्त्रीलंपट पुरुषही माझे पाहण्यांत दुसरा नाहीं.' या म्हणण्यास दुसरा रेसिडेंट रॉबर्ट्सन यानें पुष्टि दिली. यावरून त्या आरोपाचें निरसन होतें. आपासाहेबास कामांत गुंतवून ठेवण्याचा प्रतापसिंहानें शिकस्तीचा प्रयत्न केला. पण त्यांतही त्याजबद्दल सारख्या कागाळ्याच येऊं लागल्या. अदालतीचें काम दिलें असतां तो उघडपणें लांच घेऊं लागला. शिवाय त्यानें प्रतापसिंहाकडे राज्याच्या अर्ध्या हिशाची मागणी केली ती अर्थात्च कबूल होण्याजोगी नव्हती. अशा स्थितींत उभय बंधूंमध्यें दिवसेंदिवस भयंकर वितुष्ट वाढत गेलें, त्याचा फायदा नातूनें घेऊन आपासाहेबास त्यानें चढवून धरिलें आणि त्याच्या साह्यानें प्रतापसिंहास खाली ओढण्याचा प्रयत्न चालविला, तो शेवटीं सफल झाला. प्रतापसिंहावर सरकारची गैरमर्जी झाल्याचें दिसूं लागतांच आपासाहेबानें भावाजवळ वाड्यांत राहण्याचें सोडिलें. येथें राहिलों तर आपल्या जिवास अपाय होईल असें रेसिडेंटास कळवून त्याच्या परवानगीनें तो ता. १४·३·१८३९ रोजीं रेसिडेन्सींतच राहवयास गेला. रेसिडेंट ओव्हॅन्सनें त्यास आश्रय दिला.

मध्यंतरीं गव्हर्नर सर रॉबर्ट ग्रँट पुण्याजवळ दापोडी * येथें मरण पावला, त्याचे जागीं पूर्वी बडोद्यास रेसिडेंट असलेला रिव्हेट कारनॅक याची नेमणूक होऊन तो दाखल झाल्यावर त्यानें प्रतापसिंहाचें प्रकरण हातीं घेतलें. प्रतापसिंहाची वाखाणणी करून त्यास तलवार नजर दिल्याचें पत्र डायरेक्टरानीं पाठविलें, त्यावर याच कारनॅकची

* खडकीच्या दक्षिणेस पवना व मुळा यांच्या संगमास लागून दापोडी गाव असून तेथें फोर्डच्या पलटणासाठीं बाजीरावानें बांधिलेले बंगले होते. पुण्याच्या संगमावरील इंग्रजी बंगला जळल्यावर इंग्रज अधिकाऱ्यांनीं आपलें वास्तव्य दापोडीस केलें. गव्हर्नर एल्फिन्स्टन पुण्यास येई तेव्हां दापोडीस राहूं लागला, तेव्हांपासून तेंच ठिकाण गव्हर्न्मेंट हाऊस बनलें. पुढें स. १८६९ त गणेशखिंडींतील सरकारी बंगले तयार झाले, त्यांत गव्हर्नर सर विल्यम फिट्जरल्ड हा प्रथम राहण्यास गेला.

सही होती. त्यानें या बाबतींत ग० ज० चा हुकूम विचारला. त्यावर तुम्हासच योग्य वाटेल त्या रीतीनें प्रकरणाचा निकाल करा असा ग० ज० चा हुकूम कारनॅकला मिळाल्यावर त्यानें मुंबईच्या कौन्सिलांत बरेच दिवस या प्रकरणाची भरपूर चर्चा केली. पांच वर्षे प्रतापसिंहाचें प्रकरण भिजत पडलें होतें. त्यांत खरा कोण व खोटा कोण हें ठरविणें कठिण होऊन गव्हर्नरापासून खालपर्यंत अनेक अधिकाऱ्यांचा त्यांत संबंध आला. जाहीर चौकशी केल्यास त्यांत थोर अधिकाऱ्यांची इभ्रत संभाळणें अवघड होतें. शिवाय अशा चौकशीचा पारही लवकर येणारा नसतो. तेव्हां चौकशीच्या नादास न लागतां झटपट निकाल करण्याचा विचार गव्हर्नरानें ठराविला. मग पुढें दोन मार्ग उरले, एक राजास एकदम उचलून कोठें तरी अडकवून ठेवणें किंवा त्यास चांगली समज देऊन व गुन्ह्याची कबुली त्याजकडून लिहून घेऊन अपराधांची क्षमा करून त्यास पदावर कायम ठेवणें; अथवा अशी कबुली न दिल्यास त्यास काढून भावास राज्यावर बसविणें. या दोहों पैकीं राजावर अशा रीतीनें दया करण्याचा दुसरा मार्ग मोठ्या उदार मनानें मीं ठरविला असें कारनॅक म्हणतो. त्यानें असें नमूद केलें आहे कीं ' राजानें गुन्हा केला याजबद्दल आमचे मनांत बिलकूल संशय नाहीं. प्रश्न काय तो शिक्षा काय करावी एवढाच आहे. सातारचें राज्य निर्माण करण्यांत पूर्वी चूक झाली, ती दुरुस्त करण्यास ही संधि योग्य आहे. सातारचें हें उदाहरण कांहीं नवीन नाहीं. पूर्वी असे प्रकार घडले आहेत. तथापि सगळेंच राज्य खालसा करण्यास कांहीं विशिष्ट अडचणीही आहेत. मला जरी राजाचा गुन्हा पूर्णपणें शाबीद झालासा वाटतो तरी दुसऱ्या कित्येकांस त्याबद्दल शंका आहे. राजा निरपराधी आहे असें मानण्यासही सबळ कारणें कित्येकांस दिसतील. अशा स्थितींत कडक शिक्षा त्यास केल्यास हा मोठा अन्याय झाला असें म्हणणारे लोक निघतील राजाचे विरुद्ध साक्षी देणारे सर्व गृहस्थ इंग्रजांचे नोकर आहेत. म्हणून त्याचें राज्य खालसा केल्यास लोकांस वाटेल कीं केवळ अपहारबुद्धीनेंच आम्ही मुद्दाम खोटा पुरावा तयार केला. असें काहूर उठविणारे पुष्कळ मिळतील आणि त्यांचेंच म्हणणें पुष्कळांस खरें वाटण्याचा संभव आहे.' या अडचणी लक्षांत ठेवून कारनॅकनें तडजोडीचा मधला मार्ग काढिला. राज्यलोभास्तव प्रतापसिंह गुन्ह्याची कबुली देण्यास तयार होईल; आणि तशी कबुली मिळविली म्हणजे विरोधकांचीं तोंडेंही आपोआप मिटतील; इकडे आपला मतलब सिद्धीस गेला, तिकडे राजासही विशेषसें नुकसान नाहीं, अशी ही गव्हर्नराची तडजोड होती. तिला त्या मानी राजानें अपूर्व आत्मयज्ञ करून कायमचा जबाब दिला.

कौन्सिलांत वाटाघाट करून कारनॅक साताऱ्यास गेला. ता. २३·८·१८३९ रोजीं राजानें रेसिडेन्सींत जाऊन त्याची भेट घेतली. पांच दिवस गव्हर्नर साताऱ्यास राहिला. तेवढ्या अवधींत उभयतांच्या पुष्कळ भेटी होऊन मनमुराद वाटाघाट झाली. पण प्रतापसिंहानें गुन्हा कबूल केला नाहीं. तो म्हणे ' हा सर्व पुरावा बनावट आहे. नातूनें हें प्रकरण मुद्दाम द्वेषानें उभें केलें आहे. याचा आपण जाहीर रीतीनें तपास करा, आणि माझे अंगीं गुन्हा लागू झाला तर पाहिजे ती शिक्षा करा. ती भोगण्यास मी तयार आहें. केवळ शिक्षेच्या भीतीनें गुन्हा पदरांत घेऊन आपण मागतां त्या अटी लिहून देण्यास मी तयार नाहीं. ' या हट्टाचा परिणाम भलताच होईल, निष्कारण ओढून धरूं नये असें गव्हर्नरानें पदोपदीं राजास समजाविलें, आणि खालील अटींचा कागद सहीसाठीं पुढें ठेविला.

१ स. १८१९ च्या तहांतील बाहेर कोणाशीं संबंध न ठेवण्याचें कलम पाळण्याची कबुलात लिहून देणें;

२ रेसिडेंट सांगेल तसें वागण्याचें कबूल करणें;

३ जहागीरदारांच्या तक्रारींचा निकाल इंग्रज करतील तो मान्य करणें;

४ आपासाहेबास आवडेल तेथें राहूं देऊन त्यास खर्च पुरविणें;

५ बळवंतराव चिटणिसास नोकरींतून दूर करणें;

६ सोबतच्या यादींतील इसमांस कोणतीही तोसीस न लावणें.

या अटींवर सही करण्याचें राजानें साफ नाकबूल केलें. त्यानें आपला बाणा सोडिला नाहीं, शिक्षा पत्करिली. त्यास वकिलाची किंवा दुसऱ्या गृहस्थाची सल्ला घेण्यास सरकारानें संधि दिली नाहीं. सरकारचा मुख्य डॉक्टर मिल्न प्रतापसिंहाचा दोस्त होता. त्यानें राजास भेटण्याची परवानगी मागितली, ती परवानगी खुद्द ग० ज० नें दिली असतांही मुंबईकरांनीं ती सफल होऊं दिली नाहीं. कारनॅक हताश होऊन पुण्यास परत गेला.

पुण्यास गेल्यावर पुनः ता. ३०·८·१८३९ रोजीं कारनॅकनें निर्वाणीचें पत्र राजास लिहिलें, पण त्यानें आपला निश्चय सोडला नाहीं. तेव्हां गव्हर्नरानें पुण्याहून कांहीं लष्करी पलटणें साताऱ्यास पाठवून प्रतापसिंहास पदच्युत करून त्याचे भावास गादीवर बसविण्याचा हुकूम रेसिडेंटास सोडिला. तदनुसार ता. ४·९·१८३९ रोजीं आपासाहेबाशीं नवीन तह करून त्यांत पूर्वीच्या सहा जहागीरदारांवरील छत्रपतींचा ताबा

काढून घेण्यांत आला; आणि स. १८३९ च्या तहांत ज्या गोष्टी सरकारास अडचणीच्या वाटल्या त्या सर्व दुरुस्त करण्यांत आल्या. त्याच रात्रीं ओव्हॅन्सनें शहराची नाकेबंदी करून वाड्यास वेढा घातला. तेव्हां प्रकरण हातघाईवर येऊं नये म्हणून प्रतापसिंहानें बळवंतराव सेनापतीस जवळ बोलावून त्याची तलवार काढून घेतली आणि त्याचे हातीं काठी देऊन त्यास आपल्याजवळ पहाऱ्यावर ठेविलें. कारण तो शूर गडी प्रसंग प्राप्त झाल्यास कोणत्याही साहसास कचरणारा नव्हता. अपरात्रीं ओव्हॅन्स लष्करी माणसें घेऊन वाड्यांत गेला, तेथें पदच्युतीचा हुकूम त्यानें राजास वाचून दाखविला; आणि प्रतापसिंहास बिछान्यावर पकडून बरोबर घेऊन दहा मैलांवर लिंब येथें एका गांवठी घरांत नेऊन पाहऱ्यांत ठेविलें. तेथें दुसरे दिवशीं कुटुंबीय मंडळी व बळवंतराव सेनापति वगैरे कित्येक लोक लिंबास त्याजकडे पाठविण्यांत आले. ता. ५ रोजीं शहाजी आपासाहेबास समारंभानें गादीवर बसवून नवीन तह जाहीर करण्यांत आला. यथाविधि राज्याभिषेक पुढें दीड महिन्यानें ता. १८·११·१८३९ रोजीं झाला. नोकरचाकर आप्तस्वकीय वगैरे सुमारें एक हजार माणसांचा जमाव लिंबास प्रतापसिंहाजवळ जमला. दोन महिने त्यांचा मुक्काम त्याच जागीं झाल्यावर पुढें त्यास काशीस ठेवण्याचा ठराव होऊन ता. ७ डिसेंबर रोजीं प्रयाण झालें. वाटेनें त्यांची देखरेख ठेवण्यास ले० क्रिस्टॉल नांवाचा अंमलदार नेमिलेला होता, त्यानें या मंडळींचे निष्कारण हाल केले. खानदेशांत सांगवीच्या मुक्कामावर बळवंतराव सेनापतीची बायको ता. १२·१·१८४० रोजीं प्रसूत होऊन मुलगा झाला, त्याचें नांव त्रिंबकजी उ० 'जंगली महाराज' असें ठेवण्यांत आलें. उपरांत प्रवासांतच बळवंतराव सेनापति आजारी होऊन महू-नजीक तिकुराई येथें ता. २७·१·१८४० रोजीं मरण पावला. त्यासाठीं क्रिस्टॉलनें मुक्काम केला नाहीं. हालअपेष्टेचा हा प्रवास संपून ता. २५-३-१८४० रोजीं प्रतापसिंहाचें आगमन काशींत झालें. पुढें तेथें तो आणखी सात वर्षे जगला. त्याचे खर्चास दहा हजारांची दरमहा नेमणूक असून कॅप्टिन कार्पेटर नांवाचा एक भला गृहस्थ बंदोबस्तास नेमिलेला होता. काशींत राहण्यासाठीं एक नवीन घर बांधण्यांत येऊन त्याचा खर्च प्रतापसिंहाच्या नेमणुकींतून घेण्यांत आला.

वकील इंग्लंडास गेले त्यांजकडून कांहींच कार्य झालें नाहीं. परंतु रंगोबापूजीनें जॉर्ज **टॉम्प्सन** नांवाच्या विद्वान गृहस्थास मदतीस घेऊन प्रतापसिंहाची हकीकत तिकडे जाहीर केली, आणि डायरेक्टर्स, प्रोप्रायटर्स व बोर्ड ऑफ कंट्रोल यांजकडे वारंवार अर्ज

करून जाणत्या वजनदार गृहस्थांस आपलें म्हणणें पटवून दिलें. ता. १३-२-१८४० व ता. ८-२-१८४१ रोजीं कोर्टाच्या सभा भरून कित्येक दिवस वाटाघाटी झाल्या. जॉर्ज टॉम्प्सननें योग्य वेतन घेऊन स. १८४० पासून आठ वर्षें पावेतों या प्रकरणाचा पिच्छा पुरविला. त्यानें निरनिराळ्या प्रसंगीं केलेलीं भाषणें वक्तृत्वपूर्ण व उद्बोधक आहेत. त्यानेंच पुढें सांगावयाचें लॉर्ड हार्डिंगचें पत्र लिहिलें असावें. स्वतः सातारा प्रकरणाचा तपास करण्यासाठीं तो द्वारकानाथ टागोर यांजबरोबर ता. १२-१२-१८४२ रोजीं हिंदुस्थानास आला. एक वर्ष ठिकठिकाणीं फिरून त्यानें अधिकाऱ्यांच्या गांठी घेतल्या. मी तुमच्यावर लांच घेतल्याचे उघड आरोप करितों असें आव्हान त्यानें मुंबई सरकारास दिलें असतां त्याजवर कोणीं खटला केला नाहीं. बनारस येथें जाऊन ता. १६-६-१८४३ रोजीं त्यानें प्रतापसिंहाची भेट घेतली. भेटीचे वेळीं मे० कार्पेंटर हजर होता. सर्व बोलणें दुभाष्याचे मार्फत झालें. टॉम्प्सन लिहितो, 'कार्पेंटरच्या बंगल्यावर माझा मुक्काम होता तेथें ही भेट झाली. तीन तास बोलणें झालें. अत्यंत सत्यनिष्ठेच्या आविर्भावानें प्रतापसिंहानें सर्व गोष्टी मला उघड उघड निवेदन केल्या. त्याची वाणी आवेशयुक्त होती. 'सेनापतीच्या मुलाचें लग्न साताऱ्यास जाऊन उदेपुरच्या घराण्यांतील मुलीशीं करावें, एवढीच माझी इच्छा आतां राहिली आहे, जन्माचे सोबती बळवंतराव चिटणीस नुकतेच वारले, तेव्हां आमचाही काळ आतां जवळ आला.' पुनः कलकत्यास जाऊन परत आल्यावर ता. २१·११·१८४३ रोजीं टॉम्प्सननें प्रतापसिंहाची गांठ घेतली, आणि स. १८४४ च्या फेब्रुवारींत इंग्लंडास परत जाऊन तेथें पुनः सातारा प्रकरणाची झोड उठविली. ओव्हॅन्सवर लांच घेतल्याचे आरोप केले, तसेंच मुंबईसरकारावर ही केले, आणि तपास होईल म्हणून एक वर्ष वाट पाहिली. ता १९·३·१८४५ रोजीं प्रोप्रायटर्सची सभा भरली तींत भाषण करून त्यानें आपणावर खटला करण्याचें पुनः आव्हान दिलें. ओव्हॅन्स इंग्लंडास परत आला, त्याजला त्यानें आपल्या भाषणाच्या व आरोपाच्या नकला पाठविल्या. अशा रीतीनें त्यानें मुंबईकरांचीं कृष्ण कृत्यें चव्हाट्यावर आणिलीं. पुनः ता. १८·६·१८४५ रोजीं कोर्टाची सभा भरली, त्या सभेस बोलावणें गेलें असतांही ओव्हॅन्स हजर राहिला नाहीं. यापूर्वीच प्रकरण पार्लमेंटापुढें गेलें होतें. ता. २६·२·१८४५ रोजीं कॉमन्स सभेस अर्ज करण्यांत आला कीं ओव्हन्स व नातू यांनीं लांच घेऊन जीं अनन्वित कृत्यें केलीं आहेत त्यांचा तपास व्हावा. नातूनें तर जहागीरदार व इतर लोक यांजकडून लक्षावधि रकमा लांचादाखल घेऊन आपल्या हस्तकांच्याही तुंबड्या भरल्या;

नातू व रेसिडेन्सी कचेरींतील कारकून बाळाजी केशव कीबे यांनीं खोटे कागद तयार केले. हे सर्व प्रकार साक्षीपुराव्यानिशीं पार्लमेंटपुढें मांडून निदान प्रतापसिंहाचा छळवाद चालू आहे, तो तरी बंद करावा अशी विनंति पार्लमेंटास टॉम्प्सननें केली, आणि कळविलें, कीं ' प्रतापसिंहावरील आरोपाचा डोलारा एका नातूच्या साक्षीवर उभारलेला आहे. ती त्याची साक्ष गुप्तपणें घेण्यांत आली. त्याची उलट तपासणी करण्यांत आली नाहीं.' राजाचें डोकें ठिकाणावर नाहीं असा जो आरोप सरकारानें त्याजवर केला आहे, त्यासंबंधानें रेसिडेंट रॉबर्टसन यानें लिहून पाठविलें कीं ' कारभाराचीं व इनसाफाचीं कामें करण्यांत प्रतापसिंहाइतका हुशार गृहस्थ माझे पाहण्यांत दुसरा नाहीं. त्याची सत्यनिष्ठा व निर्मळ आचरण हे गुण अनुपम आहेत. '

परंतु या खटपटीचा बिलकूल उपयोग झाला नाहीं. होऊन गेलेल्या गोष्टी पुनः उकरून काढून कालक्षेप करण्याची इच्छा कोणासच नसल्यामुळें वरील अर्ज ता. १८.६.१८४५ रोजीं पार्लमेंटानें नामंजूर केला. अशा प्रकारें रंगो बापूजींची सर्व खटपट निष्फळ झाली. त्यानें अनिर्वाच्य संकटें व यातना भोगल्या, खर्चापायीं आपलें व धन्याचें सर्वस्व वेचलें, तरी त्यामुळें नाउमेद न होतां शेवटचें हत्यार म्हणून त्यानें लंडन येथेंच मोडी लिपींत ' प्रतापसिंहावरील आरोपांचें खंडन ' हें पुस्तक लिहून प्रसिद्ध केलें, तें हल्लीं दुर्मीळ आहे. इमान व चिकाटी या दोन गुणांत रंगोबापूजी सारखे पुरुष क्वचित्‌च आढळतात. त्यास थोडी समयज्ञतेची जोड पाहिजे होती. रंगोबापूजीची ही करुणाप्रद हकीकत पुढें स्वतंत्रच दिली आहे. स. १८५० त पुनः एकदां टॉम्प्सन हिंदुस्थानांत आला होता. सारांश टाम्प्सनची विद्वत्ता व लेखणी यांचा उपयोग आपल्या इतिहासास विशेष झाला आहे.

**४ प्रतापसिंहाचें आत्मनिवेदन.**—प्रतापसिंहानें आपली एकंदर हकीकत अर्जद्वारा ग० ज० लॉर्ड हार्डिंग यास कळवून न्यायाची याचना केली. ता. २.१२.१८४४ चें ४२ छापील पृष्ठांचें हें पत्र इंग्रजी भाषेचा उत्कृष्ट नमुना म्हणून सुद्धां वाचावेंसें वाटेल. त्यांतील सुसंगत व हृदयस्पर्शी मजकूर अंशतः तरी येथें दिल्याशिवाय राहवत नाहीं.

" एवढ्या अफाट देशांतील लोकांचें हिताहित पाहण्याची भरपूर सत्ता परमेश्वरानें आपल्या हातीं दिलेली पाहून ही माझी कष्टमय व असहाय स्थिति आपल्यापुढें मांडण्याची मला उमेद वाटते. मी जी विनंति करणार आहें ती म्हणजे अवघड किंवा

बेसुमार आहे असा भाग नाहीं. माझी करुण कहाणी महशूरच आहे. परमेश्वरास स्मरून मी निःशंकपणें सर्व जगापुढें असें जाहीर करूं इच्छितों कीं मजवर आणलेले आरोप सर्वथैव बनावट असून त्यांपैकीं एकही गुन्हा मजकडून घडलेला नाहीं. मी पूर्ण निरपराधी असून नाहक ही शिक्षा मला भोगावी लागत आहे. तथापि त्या शिक्षेनेंही मला एवढेंसें दुःख वाटत नाहीं, पण त्यामुळें माझ्या अब्रूला जो भयंकर काळिमा लागला आहे, तो आतां मला अगदीं सहन होत नाहीं. मरणापूर्वी माझी ही अब्रू जगापुढें निष्कलंक व्हावी, एवढी एकच इच्छा आतां माझी राहिली आहे. इंग्लंडांत अगदीं यःकश्चित् पामरास सुद्धां न्यायासनासमोर उघड चौकशी झाल्याशिवाय शिक्षा होत नसते. एवढाही चौकशीचा हक्क मला मिळूं नये हें केवढें दुर्दैव ! सरकाराचे मनांत मजबद्दल तेढ उत्पन्न होण्याचें आद्य कारण जहागीरदारांचा प्रश्न होय. या प्रश्नाची चर्चा कैक वर्षे होऊन अखेरीस ता. २४·१२·१८३४ रोजीं डायरेक्टरांनीं निर्णय दिला, कीं जहागीरदारांवर माझाच ताबा कायम समजावा. असा निकाल डायरेक्टरांनीं केला तरी तो मला मात्र कधींच कळविण्यांत आला नाहीं. हा वाद उत्पन्न झाला मूळ तहांतील शब्दांच्या अर्थावरून; तह बनविला एल्फिन्स्टनसाहेबांनीं; ते अद्यापि हयात आहेत. मीं केलेला अर्थ बरोबर नसेल तर त्यांसच खरा अर्थ काय तो विचारा. ते सांगतील तो निकाल बिनतक्रार ऐकण्यास मी तयार आहें. ही माझी मागणी मुंबई सरकारास अमान्य कां व्हावी हें मला समजत नाहीं. माझी येथें चौकशी होईना, तेव्हां इंग्लडांतील अधिकाऱ्यांकडे दाद मागण्याकरितां सय्यद मीर अफजल अली या गृहस्थास वकील म्हणून पाठविण्याचें मीं ठरविलें, ही गोष्ट मुंबईकरांचे मनास झोंबली. वकिलाचे मार्फत आपले अन्याय बाहेर येतील, त्याबद्दल वैषम्य वाटून सरकारांनीं मजवर अनेक आरोप आणिले. त्यासंबंधानें गुप्त कमिशनामार्फत एकतर्फी तपास होऊन माझा लेखी जबाब न घेतां असा रिपोर्ट करण्यांत आला, कीं 'पुढें आलेला पुरावा मीं खोडून काढूं शकलों नाहीं.' यास न्याय म्हणावें कीं काय याचा आपणच विचार करा. जहागीरदारांच्या प्रकरणा शिवाय आणखी आरोप मजवर ठेवण्यांत आले आहेत ही गोष्ट मला प्रथम स. १८३९ च्या ऑगस्टांत खुद्द कारनॅक साहेबांनीं कळविली. पोर्तुगीझ सरकाराशीं कैक वर्षे मीं गुप्त पत्रव्यवहार ठेविला, नागपुरकर आपासाहेबाशीं मीं अंतस्थ स्नेह जुळविला, आणि पलटणांचे हिंदी अंमलदारांस फितवून इंग्रज सरकाराविरुद्ध कट उभारला, असे आरोप मजवर सिद्ध असल्याचें ता. २३·८·१८३९ च्या भेटींत मला गव्हर्नर-

साहेबांनीं कळविलें; आणि त्यांतच असें सांगितलें, कीं " गुन्हा कबूल असल्याचें लिहून द्या म्हणजे सर्व अपराध माफ करून सरकार पूर्ववत् तुमचें राज्य तुमच्याकडे चालू ठेवील गुन्हे नाकबूल कराल तर मात्र तुम्हांस राज्यावरून काढावें लागेल." जे गुन्हे मजकडून घडले नाहींत, ते बळेंच कबूल करून कायमचा खोटेपणा पदरांत घेणें मला मान्य झालें नाहीं. सत्यासाठीं मी राज्यावर पाणी सोडिलें. सत्यापुढें राज्य किंवा ऐहिक ऐश्वर्य यांची किंमत काय ! आरोप खोटे असल्याचें सरकारास माहीत असल्यामुळेंच त्यांस माझ्या लेखी कबुलीची एवढी अवश्यकता वाटली. अशा रीतीनें स्वतःच्या कृष्ण कृत्यांवर झांकण घालण्याचा मुंबई सरकाराचा खटाटोप होता, तो मीं सफल होऊं दिला नाहीं, हाच सरकाराच्या मतें माझा मोठा अपराध होय. जबरदस्तीनें ते मला वांकवूं लागले, पण मी त्यास मान्य झालों नाहीं. त्यामुळें गव्हर्नरसाहेबांचा डाव फसला. आपणच विचार करा कीं गव्हर्नरसाहेबांशीं मीं जें हें बर्तन केलें त्यावरून मीं गुन्हेगार ठरतों कीं निर्दोषी ठरतों. गव्हर्नरसाहेबांसमोर मी राज्यास लाथ मारून अब्रूसंरक्षणाचा मार्ग पत्करिला, यांत मी गुन्हा तो काय केला ! माझ्या ठिकाणीं आपण असतां तर काय केलें असतें याचा विचार मनांत आणा. टक्कर, फोर्ब्स, शेपर्ड, कॉटन, साइक्स्, रॉबर्ट्सन्, सलीव्हन, शेक्सपियर, लॉड्विक, ब्रिग्ज अशा थोर गृहस्थांनीं माझ्या वर्तनाची तारीफ करून मजवर आणिलेले आरोप साफ खोटे आहेत, असें असंदिग्ध शब्दांनीं लिहून कळविलें आहे. 'अब्रूसाठीं राज्य सोडणारा हा पुरुष खचित गुन्हेगार नव्हे आणि तो निरपराधी असतां अन्यायानें आम्हीं त्यास शिक्षा करून राज्यावरून काढिलें, हा इंग्रजांचे नांवास इतिहासांत कायमचा डाग राहील; प्रतापसिंगानें मात्र बाणेदार वर्तनानें आपल्या कीर्तीत ज्यास्तच भर घातली आहे,' असें या मंडळींनीं आपलें मत प्रसिद्ध केलें आहे प्रत्यक्ष गव्हर्नर ग्रँट व कारनॅक यांचा देखील अभिप्राय माझें म्हणणें ऐकून घेतल्याशिवाय शिक्षा करूं नये असाच होता.

"बरें ! झाल्या गोष्टी त्या कांहीं नव्हेशा होत नाहींत. मला जो अन्याय झाला त्याची भरपाई करून देणें आतां सरकाराच्या हातांत नाहीं. तथापि माझ्या नांवास लागलेला कलंक अद्यापि धुऊन निघत नाहीं ह्याचेंच मला अत्यंत दुःख होत आहे. माझ्या नशिबीं यातना भोगावयाच्या होत्या त्या मीं भोगिल्या. सरकारानें व त्याच्या उच्छृंखल अधिकाऱ्यांनीं नाहक माझा छळ केला ही गोष्ट जगजाहीर आहे. अद्यापि माझ्या गुन्ह्यांची उघड चौकशी करून अब्रू साफ करण्याची संधि आपण मला द्यावी

एवढेंच माझें आपणांपाशीं शेवटचें मागणें आहे. परमेश्वरानें आपल्या हातीं जो थोर अधिकार दिला आहे, त्याचा योग्य उपयोग करून मला अन्यायानें शिक्षा झाली हें सिद्ध करण्याची संधि एकवार द्याल तर मी आपला सदैव आभारी होईन. ”

या पत्राचा उपयोग झाला नाहीं हें दिसतेंच आहे. तशाच स्थितींत सरकारी अन्यायाच्या दडपणाखालीं त्रस्त होऊन प्रतापसिंह ता. १४·१०·१८४७ रोजीं काशी येथें मरण पावला. त्याचे वकील लंडनास गेले त्यांस परत येण्यास खर्चास नसल्यामुळें इंग्रज सरकारानें कर्जाऊ रकम देऊन ती येथें प्रतापसिंगाकडून वसूल केली. केवळ तत्त्वनिष्ठेकरितां एवढा आत्मत्याग करणारीं माणसें सहसा आढळत नाहींत. प्रतापसिंहाचें सर्वच चरित्र उदात्त, वीर्यशाली व हृदयद्रावक प्रसंगांनीं इतकें भरलेलें आहे कीं त्याजवर काव्यें, नाटकें, कादंबऱ्या वगैरे रचून लेखकांनीं आपली हौस भागवून घ्यावी. मराठशाही व इंग्रजशाही यांच्या संधिकालांतील या पुरुषाची सुसंगत हकीकत सुद्धां स्वभाषेंत उपलब्ध नसावी हा कालमहिमा होय. शंभर वर्षांचे आंत आपणांस त्याचें एवढें विस्मरण झालें आहे. त्याचा इतिहास संशोधनानें नवीनच बनविला पाहिजे. साताऱ्याहून प्रतापसिंहाचें प्रयाण काशीस झालें, त्याची करुणकहाणी ऐकली तर ती कोणास खरी सुद्धां वाटणार नाहीं. वर त्याचा शुष्क आराखडा मात्र दिग्दर्शनापुरता वर्णिला आहे. मरणापूर्वी प्रतापसिंहानें वर सांगितलेला सेनापतीचा मुलगा जंगली महाराज यास काशी येथें ता. २५·१·१८४७ रोजीं दत्तक घेऊन, त्याचें नांव शाहू महाराज ठेविलें, त्याच वेळीं बळवंतराव सेनापतीची स्त्री गुणवंताबाई इला दुसरा मुलगा दत्तक देऊन नांव दुर्गासिंग उ० तात्याबा राजे ठेविलें. साताऱ्यचें राज्य खालसा झाल्यावर प्रतापसिंहाची मुलगी गोजराबाई ता. १३·१·१८५० रोजीं परत साताऱ्यास आली. तिचें लग्न ता. १०·१२·१८३४ रोजीं यशवंतराव गुजर याच्याशीं झालें होतें ही बाई साताऱ्यास ता. ३०·८·१८५३ रोजीं वारली.

**५ राज्यसमाप्ति.**—शहाजी आपासाहेब याच्या अंगीं कर्तृत्व कांहींच नव्हतें. तो स्त्रैण व सर्वथा परावलंबी असल्यामुळें मतलबी लोकांनीं त्यास वाटेल तसें वागवून आपले कावे साधले. त्यास गादीवर आणण्याची सर्व खटपट बाळाजीपंत नातूनें केली, म्हणून त्याचेंच वजन आरंभीं आपासाहेबावर होतें. तरी पुढें त्याच्याशीं बेबनाव होऊन त्यास त्यानें कोंकणांत घालवून दिलें. आपासाहेबाच्या कारभारांत महत्त्वाच्या गोष्टी घडल्या नाहींत. तो रेसिडेंटाचेच तंत्रानें पूर्णपणें वागला. प्रतापसिंहाचा द्रव्यसंचय मोठा होता, तो सर्व खर्चून त्यानें इमारती, पूल, वाडे, नळ वगैरे बांधिले आणि पदरच्या

मंडळीस मुबलक बक्षिसें वांटलीं. इंग्रज सरकारास त्यानें कधीं दुखविलें नाहीं हा त्याचा गुण इंग्रज लेखक विशेष वर्णितात. त्याचा मामा खंडेराव शिर्के हा कारभारांत प्रमुख असून, लोकांची दाद अधिकाऱ्यांकडे लागत नसे असें अनुमान खालील लौकिकी आर्येत उमटलेलें दिसतें:—

**हर्षे आग्रटे महाजानि नृपमातुल खंडरावजी शिरके ।**
**यां विरहित दरबारीं अन्य जनाचा कधीं न पद शिरके ॥**

खंडेराव हा भवानजी शिरक्याचा मुलगा व आनंदीबाई माईसाहेब इचा भाऊ. खंडेरावास मामासाहेब म्हणत. प्रतापसिंहानें त्यास सरलष्कर किताब दिला होता. आर्व्हेन्स व फ्रियर या रेसिडेंटांचे सल्ल्यानें वागून इंग्रजांस कोणत्याही कारणानें दुखवूं नये अशी आपासाहेबाची व्यवस्था खंडेरावानें ठेविली. खंडेराव ता. १३·७·१८४८ रोजीं मरण पावला.

सातारचें राज्य इंग्रजांच्या तृष्णेस बळीं पडलें हें तर खरेंच, पण त्याचा असा त्वरित अधःपात होण्यास बाळाजीपंत नातू पुष्कळ अंशीं कारण झाला हेंही खोटें नाहीं. यांत स्वार्थापलीकडे त्याचा दुसरा कांहीं हेतु नव्हता. बाजीरावाच्या अव्वलीपासून आमचीं छिद्रें इंग्रजांस दाखवून देऊन त्यानें पेशवाईचें मरण जवळ आणिलें; आणि पेशवाई संपल्यावर सातारच्या कारभारांत प्रवेश करून प्रतापसिंगास बुडविण्याचें श्रेय संपादिलें. मोठ्या खुबीनें वागून व अकल्प्य खटपटी करून त्यानें मोठमोठ्या इंग्रज अंमलदारांस आपल्या तंत्रानें वागविलें. खऱ्याखोट्याचा विधिनिषेध त्यानें कधीं बाळगिला नाहीं. त्याच्यावर अपहाराचे व लांचाचे असंख्य आरोप पार्लमेंटरी कागदांत छापलेले आढळतात. ब्राह्मणब्राह्मणेतरांचे वादाचा उगम शोधूं लागल्यास अव्वल इंग्रजींतील नातूंसारख्या व्यक्ती मनांत आल्याशिवाय राहत नाहींत. बाळाजीपंत नातूचीं कृष्ण कृत्यें बाहेर जाहीर होऊन प्रतापसिंहाच्या पदच्युतीचा दोष लौकिकांत त्याचे माथीं आला, तेणेंकरून त्याची समाजांत अत्यंत नाचक्की होऊन त्यास बाहेर तोंड दाखविणें सुद्धां अशक्य झालें. इकडे नवीन इंग्रज अधिकाऱ्यांसही त्याचा विसर पडून ते त्याची भेट देखील घेईनासे झाले. असी उभयत्र नाचक्की झाल्यामुळें त्यास जिणें दुःसह होऊन तो काशीयात्रेस निघून गेला. तेथेंही प्रतापसिंहाच्या राणीस भेटून त्यानें इग्रजांशीं तिची गोडी करून देण्याची खटपट केली. अशा पश्चात्तापस्थितींत पापक्षालनार्थ चतुर्थाश्रम स्वीकारून त्यानें काशी येथें ता. २४·६·१८५० रोजीं देह ठेविला.

दुसरा एक शोचनीय प्रकार अव्वल इंग्रजींतील क्रान्तीचा उघड उघड दिसून येतो. त्या वेळीं समंजस व सन्मान्य व्यक्तींना पुढें येण्यास अवघड पडून हलकट, खटपटी व मतलबी माणसांची सरकारांत चहा होऊन समाज अधोगतीस पोंचला. बाजीरावाच्या अंमदानींत अशी अवनति चहूं बाजूंनीं झाली असें आपण समजतों, आणि इंग्रजी राज्य म्हणजे सद्गुण व सुव्यवस्था यांचें प्रतिष्ठान सुरू झालें असा सामान्य सिद्धान्त रूढ झालेला आहे, तो प्रत्यक्ष परिस्थिति ध्यानांत आणल्यास निराधार ठरतो. एल्फिन्स्टन सारख्या जहांबाजांस आपलें राज्य स्थापण्याची इतकी हाव सुटली होती, कीं वाटेल त्या हलक्या फाटक्या व्यक्तींस हाताशीं घेण्यास त्यांस दिक्कत वाटली नाहीं. चहूंकडे हेरांचा सुळसुळाट एल्फिन्स्टननें इतका पेरून ठेविला, कीं खऱ्या खोट्याची चाड साफ सोडून केवळ इनामें व बक्षिसें कशीं उपटावीं एवढा एकच ध्यास उत्पाती माणसांनीं चालू ठेविला. अव्वल इंग्रजींत अशा उपटसुंभांची पोळी पिकून सच्छील व पापभीरु माणसांस उघडपणें बाहेर येण्याची भीति वाटूं लागली. प्रतापसिंहावरील कारस्थानांचे हजारों कागद लक्षपूर्वक वाचले म्हणजे वरील उद्वेगकारक प्रकार ठळकपणें नजरेस आल्याशिवाय राहत नाहींत. सबब केवळ पुढील इंग्रजींतले एकतर्फी व सारवासारवीचे इंग्रजी लेख वाचून आपण आपली दिशाभूल होऊं देऊं नये एवढें सांगणें जरूर आहे. स. १८५७ सालचा स्फोट हा जितका राजकीय अन्यायांचा परिणाम होता, तितकाच तो नैतिक, सामाजिक व आर्थिक कारणांचाही विकोप होता हें ध्यानांत ठेवणें जरूर आहे. १८५८ नंतर हे प्रकार निवळत गेले असावे नातू, किबे, भिडे वगैरेंचीं नांवें केवळ शितावरून भाताची परीक्षा या न्यायाचीं समजलीं पाहिजेत.

शहाजीस मुलगा झाला नाहीं. स. १८४८ त प्रांतांत फिरत असतां प्रकृति बिघडून तो साताऱ्यास आला. नंतर दुखणें उत्तरोत्तर विकोपास जाऊन ता. १·४·१८४८ रोजीं रेसिडेंटास भेटीस बोलावून त्यानें दत्तकाची परवानगी मागितली. ती येण्यापूर्वीच अत्यवस्थ होऊन ता. ५ एप्रिल रोजीं शेडगांवकर शाखेपैकीं भाऊसाहेब यास रेसिडेंटासमक्ष दत्तक घेऊन नांव व्यंकाजी राजे ठेविलें. त्याच दिवशीं नंतर त्याचा अंत झाला. त्यास औरस संतति नसल्यामुळें दत्तक नामंजूर करून इंग्रज सरकारानें ता० १६·५·१८४९ रोजीं सातारा येथें जाहीरनामा प्रसिद्ध करून शिवछत्रपतीच्या राज्याचा हा अवशेष समाप्त केला. त्यापूर्वींच इकडे आपासाहेब वारल्याबरोबर लोकांच्या अनेक खटपटी सुरू झाल्या होत्या. बनारस येथें प्रतापसिंहाचें

कुटुंब होतें, त्यांच्याशीं साताऱ्याहून पत्रव्यवहार सुरू झाला. राज्य खालसा करण्याचा हिंदुस्थानसरकारचा हुकूम ता. १·५·१८४९ रोजीं सुटला, त्यांतच राजकुटुंबांतील माणसांस पोटगी खर्च नेमून देण्यांचें फर्मान होतें. त्या पोटगीची वाटाघाट एक वर्ष चालली. राण्यांनीं पोटगी स्वीकारण्याचें नाकबूल केलें, त्यावरून त्यांची समजूत घालण्यांत आली. प्रत्येकाची खासगी जिंदगी सरकारचे बंदोबस्तांत होती, ती स. १८५१ त ज्याची त्यास देण्यांत आल्यावर स्थिरस्थावर झाली. अशा रीतीनें तीन वर्षें गेल्यावर प्रतापसिंहाचे कुटुंबास साताऱ्यास येण्याची परवानगी मिळाली, आणि ता. ३·७·१८५४ रोजीं ती मंडळी साताऱ्यास दाखल झाली.

स. १८५७ सालच्या उन्हाळ्यांत देशांत सर्वत्र इंग्रजांविरुद्ध उठावा सुरू झाला, त्याचा संपर्क साताऱ्यासही अल्पांशानें पोंचला. रामोशांनीं ठिकठिकाणीं बंडें उभारलीं, त्यांतच इंग्रजांस ठार मारण्याचा एक कट रंगोबापूजीनें बनविला आहे, आणि त्यास भोरच्या पंतसचिवाचा पाठिंबा आहे अशी बातमी त्यांस लागली. सातारच्या वाड्यांत प्रतापसिंहाचा पुत्र शाहू व शहाजीचा पुत्र व्यंकाजी राहत असत. त्यांच्या वाटाघाटी सुरू झाल्या. एके दिवशीं शाहू व सेनापतीचा मुलगा दुर्गासिंग यांचे घोडे रात्रभर जीन घालून वाड्यापुढें सज्ज असलेले आढळले. सातारचा पोलिस अंमलदार अंताजीबावा शिर्के छत्रपतींचे कुटुंबास सामील आहे अशी बातमी इंग्रजांस मिळाली. शाहू व व्यंकाजी यांचें एक चित्त नव्हतेंच, त्यामुळें ते एकमेकांस वचकून असत. कोल्हापुराहून व बेळगांवहून रामोशी वगैरे आणून मी तुमचें साह्य करितों, असा रंगोबापूजीनें आपला विचार राजकुटुंबास कळविल्याची वार्ता इंग्रजांस समजली. परत आल्यापासून रंगोबापूजी साताऱ्यांत वावरत असून त्याचे मनांत छत्रपतीचे कुटुंबाबद्दल मोठा आदर वागत होता. उत्तरेंत दंग्याचा स्फोट झाल्याचें पत्र इकडे एका ब्राह्मणास आलें तें त्या ब्राह्मणानें प्रतापसिंहाचे राणीस वाचून दाखविलें, त्यावरून शहरांत चळवळ उडाली. त्या सुमारास रशिया इंग्लंडचें युद्ध चालू होतें त्याची भर या चळवळींत पडली.

या उठाठेवीचा बंदोबस्त इंग्रजांनीं साताऱ्यास लगोलग केला. जुलई महिन्यांत त्यांनीं एकदम धरपकड चालविली. रंगोबापूजीचा मुलगा कोल्हापुरहद्दींत पकडला गेला, त्याचा तांत्रिक तपास करून ता. ८-९-१८५७ रोजीं त्यास व त्याच्या दुसऱ्या नातेवाइकांस गेंड्याच्या माळावर फांशीं देण्यांत आलें. त्यापूर्वीच ता.

६·८·१८५७ रोजीं शाहू, त्याचा चुलता काकासाहेब, दत्तक मातुश्री राजसबाई, जनकमाता गुणवंताबाई, व दुर्गासिंग सेनापति वगैरे मंडळीस सरकारानें मुंबईस नेऊन बुचर बेटावर अलग अलग अटकेंत ठेविलें; आणि तेथून पुढील सालच्या मार्चांत त्यांस कराचीस पाठविण्यांत आलें. एकमेकांच्या भेटी होऊं दिल्या नाहींत. शहाजीचा पुत्र व्यंकाजी यास प्रथम अहंमदाबादेस व तेथून स. १८५९ त अहंमदनगरास नेऊन ठेविलें, तेथेंच व्यंकाजी स. १८६४ त मरण पावला. स. १८५७ च्या बखेड्या-नंतर या सर्व मंडळींचा मासिक तनखा रु. ३८० होता.

व्यंकाजी मरण पावल्यावर राणी सगुणाबाईनें दुसरा मुलगा ता. १८·५·१८६५ रोजीं दत्तक घेतला त्याचें नांव राजाराम आबासाहेब. यास मुलगे दोन, शिवाजी उर्फ अण्णासाहेब व प्रतापसिंह उ० भाऊसाहेब. अणासाहेब स. १९१४सालीं व भाऊसाहेब स. १९२५ सालीं दोघेही निपुत्रिक मरण पावले. नंतर भाऊसाहेबाची बायको ताराबाई इनें शेडगांवकर घराण्यांतला मुलगा तारीख २८·५·१९२५ रोजीं दत्तक घेतला, त्याचें नांव शाहू राजे. भोसले छत्रपतींच्या वंशाचें नांव हेंच हल्लीं साताऱ्यास चालवीत आहेत. राणी सगुणाबाईनें पुढें सुप्रसिद्ध कायदेपंडित विश्वनाथ नारायण मंडलिक यांजकडून सातारचें राज्य परत मिळण्याबद्दल विनंतिअर्ज लिहवून तो ता. १४·३·१८७४ रोजीं व्हिक्टोरिया राणीकडे रवाना केला. हा अर्ज विस्तृत असून त्यांत छत्रपतींच्या हक्कांचें भरपूर विवेचन केलेलें आहे. सगुणाबाईच्या या अर्जाचा उपयोग झाला नाहीं हें आपण जाणतोंच. अर्ज रवाना केल्यानंतर दहाच दिवसांनीं ता. २४·३·१८७४ रोजीं सगुणाबाई मरण पावली. अशी सातारकर घराण्याची थोडक्यांत हकीकत आहे.

६ **रंगो बापूजीचा प्रवास व शेवट**.—बाजीरावाचे अंमदानींत रंगो बापूजी गुप्ते इंग्रजांचे नोकरींत असून स. १८१७ त क० ब्रिग्जबरोबर तो महिपुरचे लढाईत हजर होता. तो व बळवंतराव चिटणीस या दोन प्रभु घराण्यांचा आप्तसंबंध असून दोघेही प्रतापसिंहाचे विश्वासु सल्लागार झाल्यामुळें त्यांजबद्दल नातुप्रभृति ब्राह्मणवर्गास वैषम्य वाटूं लागलें. बळवंतराव चिटणीसानें एक मराठी बखर लिहून त्यांत बाजीरावाशीं इंग्रजांचें युद्ध सुरू असतां एल्फिन्स्टननें प्रतापसिंहास आश्वासनें देऊन कसें अलग केलें त्याचा संपूर्ण वृत्तान्त साक्षी मोझ्यानिशीं प्रसिद्ध केला, तो वाचून गव्हर्नर सर रॉबर्ट ग्रँट यास फारच चीड आली. या बखरीचा इंग्रजी तर्जुमा

' स्टोरी आफ् सातारा ' या पुस्तकांत पुरवणी ए मध्यें छापला आहे, तो वाचल्यास इंग्रजांचीं कारस्थानें स्पष्ट होतील. प्रतापसिंह आपल्या हक्कांबद्दल भांडे त्याचें आद्य-कारण हा चिटणीस असें समजून गव्हर्नरानें ता. २५·१·१८३७ रोजीं त्यास कैद करून पुण्याचे तुरुंगांत अडकवून ठेविलें. तेथेंच तो पुढें सहा वर्षांनीं मरण पावला. त्यास दररोज एक रुपया पोटगी मिळत होती.

वकिलांस इंग्लंडास जाण्यास मुंबईंत अटकाव झाला, तेव्हां सय्यद मीर स.१८३७ त दहा हजार रुपये खर्चास घेऊन मक्केस जाण्याचें निमित्त करून मुंबईतून निघाला तो थेट इंग्लंडास गेला. परंतु त्यानें तिकडे कांहींच कामगिरी केली नाहीं, म्हणून प्रतापसिंहानें मागाहून दुसरे वकील यशवंतराव, शिर्के भगवंतराव विठ्ठल वगैरे रवाना केले, ते रिलायन्स जहाजांतून स.१८३९च्या मार्चांत मुंबईहून निघाले. रंगोबापूजी मागें मुंबईसच होता. साताऱ्यास गव्हर्नराची व प्रतापसिंहाची भेट झाली तिजवरून ता. ३० आगस्टचें रंगोबापूजीस प्रतापसिंहाचें पत्र गेलें, कीं तुम्हींच लंडनास गेल्याशिवाय भागणार नाहीं. लगेच रंगोबापूजीनें ता. २·९·१८३९चा जबाब पाठविला, कीं मी जाण्यास सिद्ध आहें. त्याचा दरमहा दोन हजार पगार ठरून खर्चासाठीं पन्नास हजार रुपये त्यानें घेतले. अशा रीतीनें तयारी करून ता. १२·९ रोजीं त्यानें मुंबई सोडली, तो डिसेंबर अखेर इंग्लंडास पोंचला. त्याच संधीस पहिला वकील मीर अफजल अली याची रक्कम संपली. बरोबर नोकर अकरा होते. एवढ्यांचा खर्च निभेना म्हणून कंपनीकडून कर्जाऊ रक्कम घेऊन तो परत आला. पुढें शिर्के वगैरे सर्वच मंडळीस तिकडे खर्चाची भारी अडचण पडूं लागली; आणि प्रतापसिंहाचे प्रकरणीं मुंबईकरांचाच निकाल इंग्लंडचे मुख्य सरकारानें कायम ठेविला, तेव्हां वकिलांस तिकडे काम राहिलें नाहीं, म्हणून कंपनीपासून चार हजार पौंड कर्जाऊ घेऊन ता. २·७·१८४१ रोजीं ते सर्व परत येण्यास निघाले. रस्त्यांत रंगोबापूजीचा मुक्काम मॉल्टा येथें असतां, त्यास प्रतापसिंहाचीं पत्रें आलीं, कीं तुम्ही परत न येतां पत्रदेखत परत लंडनास जाऊन झालेला हुकूम फिर-विण्याची खटपट करा. त्याप्रमाणें तो मॉल्टाहून पुनः परत गेला. इकडे वकिलांस कर्जाऊ दिलेली रक्कम मुंबईसरकारानें प्रतापसिंहाचे नेमणुकींतून वसूल करून घेतली. परत जाऊन रंगोबापूजीनें तेथील अधिकारीवर्गास भेटून मुंबईसरकाराचे अन्याय चव्हाट्यावर आणिले. ता. ८·२·१८४३ रोजीं प्रोप्रायटसच्या सभेपुढें मराठींत भाषण करून प्रतापसिंहाची हकीकत त्यानें जाहीर केली. त्यावरून या प्रकरणाचे सर्व कागद सरकारांतून छापले गेले. इंग्लंडांत इंग्रजी भाषेचा अभ्यास रंगोबापूजीनें इतक्या आस्थेनें

केला कीं बोलतां नीट न आलें तरी इंग्रजी लिहिण्यांत तो चांगला तरबेज झाला. ता. २६·५·१८४७ व ता. ११·११·१८४७ रोजीं त्यानें मुद्देसूद पत्रें इंग्रजींत लिहून सर्व हकीकती प्रोप्रायटरांचे कोर्टास कळविल्या. इतक्यांत प्रतापसिंह मृत्यु पावल्याची बातमी त्यास पोंचून तो अगदीं निराश झाला. अर्थात् इतउत्तर त्याचा दोन हजारांचा तनखा बंद होऊन त्यास विपन्नावस्था प्राप्त झाली. तथापि त्यानें आपली चिकाटी सोडिली नाहीं. आणखी सहा वर्षे इंग्लंडांत राहून प्रतापसिंहाचा दत्तक पुत्र शाहू याचे नांवानें त्यानें आपली खटपट सुरू ठेविली. पुढें शहाजी आपासाहेबही जाऊन साताऱ्चें राज्य खालसा झालें, तरी रंगोबापूजीचा ससेमिरा इंग्रज सरकारास सोडीना. तेव्हां त्यांनीं नाना प्रकारच्या खटपटी सुरू केल्या. बाळाजीपंत नातू स. १८५० त काशीस गेला, त्यानें प्रतापसिंहाचे राणीस भेटून तिला कळविलें, कीं तुम्ही राज्याचा बदोवा लिहून द्या, म्हणजे तुमच्या योगक्षेमाची व्यवस्था तुमचे मनाजोगती मी सरकारांतून लावून देतों. ता. ७·१२·१८४९ रोजीं राणीनें ग० ज० कडे अर्ज करून साताऱ्यास परत येण्याची परवानगी मागितली होती, तें काम इंग्लंडास मंजुरीकरितां गेलें. तिकडून हुकूमही आला कीं या मंडळीस आतां बाहेर ठेवण्याचें प्रयोजन नाहीं, त्यांस शक्य तितक्या त्वरेनें परत साताऱ्यास जाऊं द्यावें. परंतु हा हुकूम मुंबईसरकारानें अंमलांत आणिला नाहीं, मग त्यास बाळाजीपंत नातू कारण झाला कीं काय नकळे. काशी येथें त्यानें राणीस भेटून सल्ला दिला, कीं तुम्ही रंगोबापूचा कैवार घेतां म्हणून तुमचेवर सरकाराचा रोष आहे, सबब तो कैवार सोडून द्या. नाइलाज होऊन राणीनें नातूचें म्हणणें मान्य केलें, आणि ता. २४·६·१८५० रोजीं तिनें व पुत्र शाहूनें डलहौसीस राज्याचा बदोवा लिहून दिला आणि रंगोबापूजीस परत बोलाविलें. त्यावरून डलहौसीनें त्यांस सालीना तीस हजारांची नेमणूक बांधून दिली. या कारणानें रंगोबापूजीचा सर्वच आधार गेला. तो तिकडे अर्ज करकरून थकला. इंग्लंडांत त्यास भिक्षा सुद्धां कोणी मागूं देईना. हिंदुस्थानांत वर्गणी जमविण्याची खटपट त्याचा भाऊ रावजी बापूजी यानें केली, त्यासही सरकारानें बंदी केली. छत्रपतीचा वकील म्हणून तो वागे तेंच सरकारास असह्य झालें; परंतु त्यानें आपला हट्ट सोडिला नाहीं. ता. १९·१·१८५३ रोजीं त्यास पत्र लिहून सरकारानें कळविलें, कीं आम्ही तुम्हांस वकील म्हणून ओळखीत नाहीं. सहा वर्षांच्या अवधींत त्यास दहा हजार पौंड कर्ज झालें. शेवटीं चहूंकडून नाइलाज होऊन स. १८५४ चे अखेरीस तो परत आला. निघण्यापूर्वी त्याच्या अनेक इंग्रज दोस्तांनीं

वर्गण्या जमवून एक चांदीचें तबक सुंदर वेलबुट्टीचें नजर केलें, त्यावर जोझेफ ह्यूम, जॉन ब्राइट, जॉर्ज टॉमस, जॉन सलिव्हन, जॉन ब्रिग्ज, जनरल रॉबर्ट्सन, ग्रँट डफ, जॉन बुल, कॅरोलिन, कोगन वगैरे बावीस नामांकित इसमांच्या सह्या आहेत. या नांवांवरूनच रंगोबापूजीच्या सत्यनिष्ठेची खात्री होईल. तबकावर लेख कोरलेला आहे तो असा. 'चौदा वर्षे इंग्लंडांत धन्याची एकनिष्ठेनें सेवा बजावणारे रंगोबापूजी यांस त्यांचे चहात्यांनीं वर्गणीनें रकम जमवून हें तबक नजर दिलें आहे.'

रंगोबापूजीचा शेवट कसा झाला हें थोडक्यांत सांगून छत्रपतीच्या राज्याची ही हकीकत पुरी करूं. परत आल्यावर प्रायश्चित्त वगैरे घेऊन जातिसंग्राह्य होण्यांत त्याचा बराच काळ गेला. नंतर तो आपली सांसारिक व्यवस्था लावतो तोंच इकडे स. १८५७ सालचा भडका सुरू झाला. त्या सालच्या जून महिन्यांत सातारानजीक परळीजवळ एक मोठा दरवडा पडला. त्याचे तपासांत असें आढळून आलें कीं रंगोबापूजी महिनाभर परळीचें किल्ल्यावर राहत होता, त्यानेंच लोक जमवून हा दंगा चालविला आहे. सातारा, यवतेश्वर, महाबळेश्वर इत्यादि ठिकाणीं एकदम हल्ला करून इंग्रजांस ठार मारावें, असा गुप्त कट असल्याची वार्ता सरकारास लागली. स. १८५७ सालचे आरंभापासूनच लोक जमविण्याची तयारी चालून त्या मसलतींत पंतसचिव वगैरें अनेक प्रमुख गृहस्थ सामील असावे असा सरकारचा समज झाला. त्यावरून जुलई महिन्यांत सर्वत्र धरपकड चालू झाली, तेव्हां रंगोबापूजी जीव बचावण्यासाठीं पळून गेला, त्याचा पुढें पत्ता लागला नाहीं. त्याचा मुलगा सीताराम कोल्हापुर हद्दींत पकडला गेला. ता. २७·८·१८५७ रोजीं गुन्हेगारांची झटपट चौकशी होऊन ता. ८·९·१८५७ रोजीं ते सर्व सातारा येथें फाशीं गेले. या सीतारामाचा वंश रोहिडखोऱ्यांत करंजवें येथें हल्लीं हयात आहे.

रंगो बापूजी शरीरानें निमगोरा, बांधेसूद, तेजस्वी, डोळे पाणीदार, फार उंच नसून ठेंगणाही नव्हता. त्याचे वडील बापूजी तीन गांवचें कुळकर्ण करीत असे. रंगोबापूजी इंग्लंडाहून आला तेव्हां त्याचे बरोबर एक युरोपियन नोकर होता, त्यास इकडील लोक "झील साहेब" असें म्हणत. रंगो बापूजीचा इकडे फार दरारा असे. त्याच्या पत्नीनें नांव "काकई" ही मरणसमयीं ८०·८२ वर्षांची होती. त्याचें घर दोन चौकी असून त्यांत वाचनपुस्तकें ३·४ गाड्या भरतील इतकीं होतीं. एकंदरींत प्रतापसिंहाच्या निमित्तानें रंगो बापूजीच्या घराण्याचा लौकिक इतिहासांत झाला हें उघड आहे.

## ७ वंशावळी.—

**१ अंतिम छत्रपति.** १ शाहू छत्रपति दुसरे [ ऐ. स्फु. ले. ५–३; . १.
=आनंदीबाई माईसा० मुलगे ३

२ प्रतापसिंग बुवा सा० — ३ रामचंद्र भाऊसा० — ४ शाहाजी आपासा०

२ प्रतापसिंग बुवा सा० → ५ त्रिंबकजी उ० शाहजीराजे सिसोदे भोसले, उ० जंगली महाराज

४ शाहाजी आपासा० → ६ व्यंकोजी द० — ७ राजाराम आबासा० द०, मृ. १०·४·१९०४

मुलगी साहेबजीबाई

८ शिवाजी अण्णासा० मृ. ५·११·१९१४ — ९ प्रतापसिंह भाऊसा० ज. २६·५·१८७४

१० शाहूराजे द० २८·५·१९२५

१ आई सगुणाबाई रामराजाची स्त्री, बरानजी मोहिते हंबीरराव याची कन्या मृ. १८१३; शाहूच्या बायका चार, ( १ ) लक्ष्मीबाई नारायणजी मोहिते याची कन्या; ( २ ) कमळजाबाई नरसिंगराव गुजर याची बहीण; ( ३ ) गुणवंताबाई आबाजीराजे महाडिक याची बहीण; ( ४ ) आनंदीबाई माईसाहेब भवानजीराजे शिर्के याची कन्या. इचें लग्न २५·३·१७८६, मृ. ३·१·१८२२.

२ ज. १८·१·१७९३, मृ. १४·१०·१८४७; बायका तीन ( १ ) लक्ष्मीबाई रामराव मोहिते याची बहीण: (२) लक्ष्मीबाई पहिलीचीच बहीण, मृ. १०·७·१८४५ काशी येथें,—इला दोन मुली झाल्या, पहिली कमासाहेब मृत्यु लहानपणीं; दुसरी गोजरासाहेब ज. १८२२, ल ता. १०·१२·१८३४ यशवंतराव गुजर; इचा मृ. ३०·८·१८५३; ( ३ ) राजसबाई माईसा० मुलगा दत्तक जंगली महाराज.

३ यास राजाराम असेंही नांव होतें. ज. स. १७९५, मृ. २१·१·१८२१; स्त्री बाईसाहेब इचा मृ ३·५·१८२७.

४ ज. सन १८०२; मृ. ५·४·१८४८; लग्नें चार ( १ ) ताराबाई जीसाहेब, तारळेकर महाडिक, ल. स. १८१४,—इचाच छळ होऊन ती प्रतापसिंहाकडे जाऊन राहिली; रंगमहालचे वाड्यांत मृ. १३·३·१८४०; ( २ ) सगुणाबाई आईसाहेब–कुटरेकर तानाजी शिर्के याची कन्या मृ. २४·३·१८७४; ( ३ ) बनूबाई माईसाहेब कुटरेकर कान्होजी शिर्के याची कन्या; ( ४ ) राधाबाई बयासाहेब कीरतसिंग शिर्के याची कन्या. मृ. १८·५·१८५२.

५ ज. १२·१·१८४०, जनक मातुश्री गुणवंताबाई; दत्तक २५·१·१८४७,

स. १८५८त त्यास कराची येथें नेऊन कैदेंत ठेविलें. तेथून स. १८८५ च्या जुलईत त्यास सोडिलें, तेव्हां तो पुण्यांत भवानी पेठेंत घर नं. ५४३ येथें येऊन राहिला आणि तेथेंच ता. १·६·१८९२ रोजीं मृत्यु पावला. बायकोचें नांव आनंदीबाई. त्यास होळकर दरबारांतून २८००० रु. नेमणूक होती. त्यानें ब्रह्मसमाजाची दीक्षा घेतली आणि त्याच पंथानुसार त्याचा अंत्यविधि झाला.

६ द. ता. ५·४·१८४८; मृ. नगर येथें ता. २३·१२·१८६४; लग्न (१) ता. १४·३·१८५२ अंजिराबाई शिर्के—मुलगी तापी उ० साहेबजी बाई ज. १०·८·१८५३, (२) शिवाजी महाडिकाची कन्या, इचा मृ. १६·८·१८६३.

७ राजाराम आबासाहेब, सगुणाबाईचा दत्तक ता. १८·५·१८६५, मृ. १०·४·१९०४.*

**१ राजे महाडिक.**–भोसले छत्रपतींशीं या घराण्याचा निकट संबंध कसा आहे हें या वंशावळीवरून दिसून येईल. आंकड्यांचे तपशील पुढील पानावर पहा.

१ मुधोजीराजे महाडिक
- २ कृष्णाजी (मृ. १६१४)
- ३ कानोजी (मृ. १६५०)
  - ६ परसोजी
    - ८ हरजी ( चंदीचे वेढ्यांत मृ. १६९४).
      - १० प्रतापजी
      - ११ दुर्गोजी
      - १२ शंकराजी
        - १७ दुर्गोजी
        - १८ अंबाजी
          - १९ गुणवंताबाई
          - २० हरजी
            - २२ भवानजी
            - २३ कुसाजी
              - ल. रामचंद्र भाऊसाहेब = २४ बाईसाहेब (मृ. १८३३)
              - २५ भवानजी
          - २१ सखोजी
      - १३ जयासिंग
      - १४ उदितासिंग
      - १५ सुभानजी
      - १६ गुणाजी
    - ९ नारायणराव
- ४ रुद्राजी
  - ७ प्रतापराव
- ५ प्रतापराव

* समक्ष तपासावरून वरील कित्येक तपशील दिले आहेत.

६ कर्नाटकांत शहाजीचे आश्रयास असून पुढें शिवाजीस मिळाला. ८ हा शिवाजीचा जावई, अंबिका बाईचा नवरा, कर्नाटकचा सुभेदार जिंजीस असे. ११ हा बापाबरोबर व पुढें जिंजीस असे. १२ हा शाहूची बहीण भवानीबाई इचा नवरा शाहूबरोबर कैदेंत होता. यास तारळ्याची देशमुखी होती. सन १७०९–२६ पर्यंत हा शाहूचे आज्ञेनें कर्नाटकाचे बंदोबस्तास होता. १७ अमर्यादेनें वर्तोन कोल्हापुरकर संभाजीस सामील झाले ( स. १७२५ ), म्हणून त्याजवर शाहूचा राग झाला, आणि त्यानें १८ अंबाजी यास तारळ्याची देशमुखी दिली. २५ यास इंग्रजींत सरदार बहादुर पदवी मिळाली.

## ३ नागपुरकर चिटणीस.

१ रखमाजी गणेश रणदिवे
- २ चिमणाजी
- ३ माधवराव
- मुलगी=ल. वैद्य
  - ४ कृष्णराव
  - ५ गंगाधरराव
    - ६ माधवराव
      - ७ गंगाधरराव
      - ८ शंकरराव

१ रखमाजी हा सातारकर गोविंदराव चिटणीसाचा भाचा. गोविंदरावानें त्यास पहिल्या रघूजीजवळ चिटणीस नेमून दिलें. ३ व ४ यांचा उल्लेख या पुस्तकांत वारंवार आला आहे. ४ नें आपलें नांव कृष्णराव माधव असें घेतलें. ५ हा स. १८०४ त ल्हान होता ( C. U. Wills P. 253 ). ७ गंगाधरराव हे ता. २८·६·१९२९ व ८ शंकरराव हे ता. १६·५·१९३१ रोजीं वारले.

## ४ ग्वालेरचे गाढवे.

राघोजी
- फकीरजी ( पृ. १४५ पहा )
  - नानासाहेब

## ५ ग्वालेरचे बक्षी.

रंभाजी
- येसाजी
  - रामकृष्ण
    - येसाजी ( पृ. १७८ पहा )

**६ करंजे पाटील,** जात मराठे रा. शिखरापुर

मोरशेट ( स. १७१० पासून हयात ).

घनशेट ( स. १७६६ त हयात ) — सदाशिव शेट — त्रिंबकशेट ( ज. १८०४, स. १८४४ त हयात ) — केशवशेट ( ज. १८३२ ).

[दुसरी शाखा:] व्यंकट शेट, एस शेट

**७ तांबवेकर,** ऋ. दे. ब्रा. राहणार तांबवें ता. वाळवें.

गोपाळ नाईक ( शाहूकडून मालखेड गांव इनाम )

| मनोहर | विश्वनाथ | गोपीनाथ |
| --- | --- | --- |
| गणपत | गोपाळ | नारायण |
| मनोहर | कृष्णराव | रामचंद्र |
| गोपाळ × | विश्वनाथ × | नारायण × |

हल्लीं या सर्वांची वसती डाकोर येथें आहे. डाकोरचें मंदिर गोपाळ नाइकानें स.१७७२ त बांधिलें. × प्रस्तुत ( स. १९३२ ) हयात.

**८ गुप्ते बडोद्याचे**

बाबूराव हरि ( सखाराम हरीचा बंधु )

दौलतराव — कृष्णराव, माधवराव

महिपतराव

बाबूराव व सखाराम हरि या बंधूंनीं अंबेगावचें देशकुलकर्ण व गांव कुलकर्ण सबासितैनमया व आलफमध्यें माधवराव जनार्दन व अमृतराव व खंडेराव व आनंदराव जनार्दन दिघे प्रभु कुलकर्णी यांजपासून खरेदी घेतलें.

# सूची